मनोहर ग्रंथमाला, प्रकाशन ७ वें

# समग्र केळकर वाङ्मय

## १० साहित्य खंड




सन १९३८

रु. 300/-

# प्रकाशकाचें निवेदन



संकल्पाप्रमाणें 'समग्र केळकर वाङ्मया'चे हे बारा खंड छापून आज वाचकांच्या हातीं देतां येत आहेत याविषयीं फार आनंद होतो. हें छपाई-चें काम अपेक्षेपेक्षां पुष्कळच लवकर पूर्ण करितां आलें याचें श्रेय पुणें शहरांतील अनेक छापखान्यांनीं केलेल्या सहकारितेलाच दिलें पाहिजे.

हें समग्र केळकर वाङ्मय प्रसिद्ध करण्याची मूळ कल्पना स्वत: केळ-करांची नाहीं त्याप्रमाणें ती प्रस्तुत प्रकाशकाचीहि नाहीं. केळकर वाङ्म-याचा अभ्यास आज सुमारें वीस वर्षें सतत करणाऱ्या एका गुणग्राही वाचकाच्या सहृदय अंत:करणांत त्या कल्पनेचा उगम झाला. आणि त्याच्याच सक्रिय प्रोत्साहनामुळें त्या कल्पनेला हें दृश्य स्वरूप प्राप्त झालें हें सांगणें आम्ही आमचें कर्तव्य समजतों.

वास्तविक केळकरांचें **'समग्र'** वाङ्मय प्रसिद्ध करण्याची वेळ अजून आलेलीच नाहीं! कारण त्यांची लेखणी अजून थांबलेली नाहीं. आणि त्यांची प्रकृति चांगली राहिली तर यापुढें त्यांनीं निर्माण केलेलें आणखीहि वाङ्मय वाचकांना वाचावयास मिळेल अशी आशा करण्यास जागा आहे. तथापि बारा हजार पृष्ठें भरतील इतकें वाङ्मय आजच सिद्ध असल्यामुळें हा पहिला मोठा हप्ता छापून मोकळें व्हावें ही गोष्ट सर्वच दृष्टींनीं इष्ट होती. पण यांत आणखी एक सोय विशेष होती ती अशी कीं, केळकरांच्या छापील ग्रंथांशिवाय त्यांनीं वर्तमानपत्रें मासिक पुस्तकें यांत लिहिलेले लेख, इतर ग्रंथकारांच्या ग्रंथांना लिहिलेल्या प्रस्तावना, प्रसंगविशेषीं त्यांनीं दिलेल्या व्याख्यानांचे लेखी सारांश इत्यादि जें अवांतर वाङ्मयहि बरेंच आहे, तें आठवून मिळवून जुळवून युक्तायुक्त पाहून तपासून देणें हें काम इतरांच्या हातून कसें होणार? तें त्यांचें त्यांनींच करणें शक्य. म्हणून

त्यांना श्रम देऊनहि पण तें त्यांच्या हातून होण्यासारखें आहे तोंपर्यंत करवून घेण्याशिवाय गत्यंतर नव्हतें.

या ग्रंथांतल्या 'वाङ्मय' शब्दाचा अर्थ नेहमीं आपण समजतों त्याहून किंचित् अधिक व्यापक केला पाहिजे. कारण केळकरांच्या लेखांप्रमाणें त्यांनीं दिलेल्या तोंडी व्याख्यानां–भाषणांचाहि समावेश त्यांत केला आहे. पण त्यांपैकीं बरींच, तोंडी बोलून झाल्यावर, स्वतः त्यांचीं त्यांनीं लिहून दिलेलीं आहेत. इतर वार्ताहरांनीं लिहून घेतलेलीं अशीं थोडीं आहेत.

दुसरीहि एक गोष्ट सांगणें अवश्य आहे ती ही कीं, या बारांपैकीं कांहीं थोडया खंडांत, केळकरांनीं स्वतः लिहिलें नाहीं किंवा ते बोलले नाहींत असेंहि कांहीं 'वाङ्मय' पुरवणी कागदपत्रांच्या रूपानें समाविष्ट केलें आहे. उदाहरणार्थ, टिळकांचीं मृत्युपत्रें, केसरीवरील खटल्यांतील न्यायमूर्तींचे निर्णय, एखाद्या सभेच्या हकीकतींतील प्रास्ताविक किंवा समारोपाचा असा कांहीं त्रोटक मजकूर इत्यादि. पण त्या ठिकाणीं केवळ तो प्रसंग किंवा तो विषय यांची नीट समजूत पटण्याला तो मजकूर साधनभूत असल्यामुळेंच घालावा लागला आहे. उलट कांहीं वाङ्मय केळकरांनीं लिहिलेलें असेंहि खंड–पृष्ठांच्या मर्यादेमुळें वगळावें लागलें.

हें प्रचंड वाङ्मय जवळ जवळ सारख्या पृष्ठ संख्येच्या बारा खंडांत बसवून देणें हें काम सहजच जरासें अडचणीचें झालें. तथापि शक्य तोंवर विषयानुसंधान साधण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे.

**प्रकाशक.**

# अनुक्रमणिका

## प्रस्तावना व परीक्षण



श्री. न. चिं. केळकर

अध्यक्ष, साहित्य संमेलन, बडोदें ( १९२१ )

# कला, वाङ्मय व साहित्य

## वाङ्मय म्हणजे काय ?

### ( बडोदें साहित्य संमेलन १९२१ )

आज बडोद्यास भरलेल्या या दहाव्या साहित्यसंमेलनाचें अध्यक्षस्थान आपण मला दिलें याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहें. या मान्यतादानाला माझ्या पात्रतेपेक्षां आपली कृपाच अधिक कारणीभूत आहे हें मीं जाणतों; आणि हें अंगीकृत कार्य तडीस जावयाचें तर त्याला अखेरपर्यंत आपलीच मदत मला लाभली पाहिजे, म्हणून त्या मदतीची मी याचना करितों.

पूर्वीं बडोद्यास साहित्यसंमेलन भरलें त्याला बारा वर्षें झालीं. त्या प्रसंगीं श्रीमन्महाराजसाहेबांनीं जें भाषण केलें त्यांत ‘ या संमेलनासारखे प्रसंग वारंवार यावे ’ अशी उदार इच्छा त्यांनीं प्रगट केली होती. बडोद्याहून निघाल्यावर मुंबई, अकोला वगैरे शहरांना भेट देऊन संमेलन फिरून आपल्या राजधानीला आलेलें पाहून महाराजसाहेबांना खचित आनंद होईल. बारा वर्षांच्या अवधीला तप किंवा छोटें युग म्हणण्याची चाल आहे. या अवधीमध्यें मराठी वाङ्मयाच्या तपस्येंत बरीच भर पडलेली असून कांहीं दृष्टींनीं त्याच्या स्वरूपांत युगांतरहि झालेलें आढळेल.

पुण्याबाहेर बडोदें हें एक असें शहर आहे कीं, तेथें मराठी साहित्यसंमेलनाची पुनरुक्ति झाली आहे. पुण्यांत दरवर्षी उन्हाळ्यांत बहुतेक सर्व महाराष्ट्रांतून विद्वान् लोक येतच असतात, यामुळें तेथें संमेलन भरविणें ही गोष्ट विशेष महत्त्वाची नाहीं. पण बडोद्यासारख्या एका बाजूस पडणाऱ्या व महाराष्ट्रांत समाविष्ट नसलेल्या शहरांत दुसऱ्या वेळीं संमेलन भरणें ही गोष्ट येथील महाराष्ट्रभाषाभिमान्यांच्या उत्कट स्फूर्तीवांचून घडणें शक्य नाहीं. बडोद्याची ‘ सहचारिणी ’ सभा आज अनेक वर्षें मराठी साहित्य-

सेवा करीत असल्याचें प्रसिद्ध आहे; व यंदाच्या संमेलनाचें सर्व श्रेय तिच्याच वांट्याला दिलें पाहिजे. पण 'सहचारिणी' सभा झाली तरी महाराजसाहेबांच्या उदार आश्रयाशिवाय काय करूं शकली असती? महाराजांच्या विद्याभिरुचीमुळेंच ही गोष्ट घडून आली. स्वतःची जन्मभाषा म्हणून मराठी, प्रजेची भाषा म्हणून गुजराथी व भावी अखिल हिंदी राष्ट्राची भाषा म्हणून हिंदी अशा रीतीनें या तीन भाषा महाराजांना सारख्याच प्रिय आहेत. तिहींचाही ते निःपक्षपात बुद्धीनें परामर्ष घेतात. या तीनही भाषांतील विद्वानांना महाराजांच्या बहुश्रुतत्वाचा लाभ घडलेला आहे. अज राजाचें वर्णन करितांना कालिदास म्हणतो:—

बलमार्तभयोपशांतये विदुषां सत्कृतये बहुश्रुतम् ।
वसु तस्य विभोर्न केवलं गुणवत्तापि परप्रयोजना ॥

राजे लोकहि बहुश्रुत असले पाहिजेत, पण ते स्वतःच्या आनंदाकरितां किंवा दिमाखाकरितां नव्हे, तर विद्वानांचा यथायोग्य सत्कार करण्याकरितां. आजचें हें साहित्यसंमेलन बोलावण्याविषयीं महाराजांनीं 'सहचारिणी' सभेला आज्ञा केली, ती येथें जमणाऱ्या विद्याव्यासंगी लोकांकडून स्वतः त्यांना शिकण्याजोगें विशेष कांहीं आहे म्हणून नव्हे तर उलट त्यांचें सत्कारगौरव व्हावें म्हणून !

निराश्रया न शोभन्ते पंडिता वनिता लताः ।

राजाश्रयांत अंशभागी या नात्यानें वनिता व लता यांच्या पंक्तीला पंडितांनाहि बसविण्यांत कवीचा कुचेष्टेखोर स्वभाव व्यक्त होतो खरा; पण पंडित तरी त्याचें वैषम्य कां मानितील ? वनिता व लता दोनहि ललितवाङ्मयाच्या अनेक अधिष्ठात्री देवतांपैकीं प्रमुख अशा नाहींत काय ?

बारा वर्षांपूर्वीं बडोद्यास साहित्यसंमेलन भरलें, त्यानंतर तें फिरून बडोद्यास येण्यापूर्वीं दुसऱ्या एका संस्थानाचा पाहुणचार त्यानें घेतला. १९१७ सालीं नववें संमेलन इंदुरास भरलें, तेथेंहि श्रीमंत होळकरसरकारांनीं मराठी भाषेच्या कार्यास उदार हस्तानें मदत केली. तथापि संमेलनास पाहुणचार लाभण्यासारखीं बरींच संस्थानें अद्यापि शिल्लक आहेत व ते ते संस्थानिक कृपा करितील, तर संमेलन खालसा हद्दींत आणखी दहा वर्षें

भरविण्याचें कारण नाहीं. बडोदें व इंदूर यांच्या आधींच ग्वाल्हेरास संमेलनाला निमंत्रण यावयास पाहिजे होतें. पण आधीं न आलें तर मागाहून तरी येवो पण येवो ! धार, देवास हीं संस्थानें नर्मदेपलीकडे असलीं तरी मराठीच आहेत. दक्षिणेंतील हैद्राबाद, कोल्हापूर, सांगली, मिरज, इचलकरंजी, जमखंडी, मुधोळ, औंध, फलटण, जत, या संस्थानांनीं मनावर घेतल्यास मराठी साहित्य–संमेलनास आमंत्रण देणें त्यांस दुरापास्त नाहीं. याला थोडासा खर्च लागेल; पण भरल्या गाड्याला सूप जड नाहीं. या प्रत्येक संस्थानांतून अनेक प्रकारच्या गुणिजनांना आश्रय मिळत असतां, भाषेचा सत्कार तेवढाच कां मागें पडावा समजत नाहीं. मराठी भाषेची सेवा ही निर्दोष निर्लेप भूमि आहे. तिजमध्यें राजकारणाचा प्रवेश फारसा होऊं शकत नाहीं व होण्याचें कारणहि नाहीं. उलट भाषाव्यवहार हाच सर्व प्रकारच्या प्रगतीचा आधार आहे. काल्पनिक भीतीमुळें संस्थानिक वर्गानें पवित्र अशा सरस्वतीमहोत्सवापासून कां पराङ्मुख व्हावें समजत नाहीं.

पण केवळ वरील संस्थानांतून संमेलन फिरून आल्यानें माझें समाधान होणार नाहीं. तें मद्रास इलाख्यांत व तंजावरासही एक वेळ जावें अशी माझी आकांक्षा आहे. कारण तंजावराकडे अद्यापि मराठी बोली उराशीं बाळगून ठेवलेलीं मराठी घराणीं आहेत; व त्यांना मराठी भाषा-व्यवहार वाढविण्याची उत्कट इच्छा आहे. खुद्द मद्रासेसहि मराठी थोडेंबहुत कोठें कोठें ऐकूं येऊं शकतें. आपलें साहित्यसंमेलन तिकडे एक वेळ भरल्यास या आमच्या मराठे बांधवांना फार आनंद होईल हें मी निश्चयानें सांगतों, व साहित्यपरिषदेच्या अधिकाऱ्यांनीं याविषयीं चौकशी करून शक्य तर हा योग घडवून आणावा असें मी सुचवितों. पारशी लोकांनीं इराणांतून आपणाबरोबर आणिलेला पवित्र अग्नि निर्जीव इंधनाच्या साहाय्यानें अग्यारींतून आज हजार बाराशें वर्षें जिवंत ठेवला आहे. तंजावरास मराठी राज्याचा लोप होऊन अद्यापि दीडशें वर्षेंहि झालीं नाहींत; अर्थात् येवढ्याशा अवधींत तिकडच्या मराठी भाषेच्या अंगावर जी राख चढली असेल, ती फुंकून टाकून भाषा शुद्ध व सतेज करण्याचें काम त्यांना किंवा आम्हांला अवघड जाण्याचें कारण नाहीं.

साहित्यसंमेलन हा सरस्वती देवीच्या क्रीडांगणांतील उत्सव असला तरी

या उत्सवांत जमलेल्या मानवी खेळगड्यांमुळेंच त्याला रंग येतो. अर्थात् त्याच क्रीडांगणावर कालांतरानें आपण फिरून खेळण्यास जमलों असतां जुन्या काळच्या खेळगड्यांची आठवण होणें अगदीं स्वाभाविक आहे. मागील बडोदासंमेलनाचे अध्यक्ष ले. क. कीर्तिकर हे आज स्मृतिशेष झाले आहेत. तसेंच त्या संमेलनांत भाग घेतलेले इतर कांहीं प्रमुख गृहस्थ म्हणजे कवि ना. वा. टिळक, संमोहलहरीचे कर्ते गो. वा. कानिटकर, कुशल शब्दचिकित्सक डॉ. वि. गो. चिपळुणकर, जुन्या पद्धतीचे पंडित कवि पारखीशास्त्री व खुद्द या संमेलनांत प्रथमतःच 'बालकवि' ही पदवी लाभलेले त्र्यं. बा. ठोमरे यांचें स्मरण झाल्याशिवाय राहत नाहीं. पण बडोद्याच्या संमेलनाशीं विशेष संबंध ज्यांचा नव्हता असेहि इतर अनेक सरस्वतीभक्त गेल्या बारा वर्षांत किती निवर्तले हें लक्षांत आणिलें म्हणजे मराठी भाषेची फारच मोठी हानि झाली असें म्हणावें लागतें. बडोद्यानंतर भरलेल्या अकोला येथील साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष ह. ना. आपटे व इंदूर येथील नवव्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष ग. ज. आगाशे हेहि आपणांमधून आज गेले आहेत. संमेलनाशीं ज्यांचा विशेष संबंध आला नाहीं, अशा इतर मृत वाङ्मयसेवकांची यादी फारच मोठी होईल. पैकीं लेंभे, लोंढे, गडकरी, रेंदाळकर, प्रो. पटवर्धन, प्रो. लिमये. भारदे, गजाननराव वैद्य, मित्र, मालवणकर, ग. वि. कुळकर्णी, पांडोबा पटवर्धन, गो. का. चांदोरकर, फडके, बर्वे, नि. बा. रानडे, चिं. वै. राजवाडे, ज. वि. ओक, शेट तुकाराम जावजी हीं नावें स्मरणीय होत.

या सर्वांहून विशेष स्मरणीय असें नांव म्हटलें म्हणजे लो. बाळ गंगाधर टिळक यांचें होय. अमुक एका वर्गांत न घालतां स्वतंत्रपणेंच ज्याचा उल्लेख करणें योग्य होईल असेंच तें नांव आहे हें कोणीहि कबूल करील. टिळकांनीं सर्व आयुष्यांत, ज्याला 'ग्रंथ' असें म्हणण्याची चाल आहे असा एकच मराठी प्रबंध लिहिला; पण तोच इतक्या श्रेष्ठ दर्जाचा आहे कीं, मराठी वाङ्मयाच्या इतिहासकाराला त्या प्रबंधाचें, त्यानें केलेल्या विचारक्रांतीचें व उडवलेल्या खळबळीचें स्वतंत्रपणेंच एकाद्या भागांत विवेचन करावें लागेल. वाङ्मय-इतिहासांच्या प्रत्येक खंडाला एखाद्या लोकोत्तर ग्रंथाच्या किंवा ग्रंथकाराच्या योगानें नामाभिधान मिळत असतें.

मराठी वाङ्मयाच्या इतिहासांतील वर्तमानकालाचा निर्देश करावयाचा तर भावी इतिहासकार त्याला ' गीतारहस्ययुग ' असें नांव देईल. जन्मभर अनेक ग्रंथ लिहून जी कीर्ति इतर अनेकांना लाभली नाहीं, ती टिळकांना एका ग्रंथानें लाभली.

एकेनापि सुपुत्रेण सिंही स्वपिति निर्भयं ।
तदेव दशभिः सार्धं भारं वहति रासभी ॥

ही म्हण या ग्रंथानें खरी करून दाखविली. कित्येकांच्या मतें गीतारहस्याला मराठी ग्रंथ म्हणण्यापेक्षां संस्कृत ग्रंथ म्हणणेंच अधिक योग्य होईल. कारण त्यांतील विषय व त्याची भाषा पाहिली म्हणजे तो वर्तमान समाजांत वावरणाऱ्या कोणी लौकिक मनुष्यानें लिहिलेला नसून जुन्या ' आचार्य पद्धतीला ' योग्य अशा एखाद्या मठवासी महंतानें लिहिलेला असावा असें वाटतें. पण लौकिक आणि लोकोत्तर या दोन गुणांचा मेळ घालण्याची जी उत्कट हातोटी लोकमान्य टिळकांना इतर व्यवहारांत साधली होती तीच या ग्रंथांतहि दिसून येते.

वाङ्मयसेवेच्या दृष्टीनें वर दिलेल्या यादींतील महत्त्वाचें नांव म्हटलें म्हणजे हरिभाऊ आपटे यांचें होय. मराठी भाषेंतील ' आद्य कादंबरीकार ' हें नांव त्यांना यथार्थतेनें लावितां येईल. त्यांच्या कादंबऱ्यांनीं अनेक होतकरू कादंबरीकारांना स्फूर्ति दिली. परंतु त्यांना मागें टाकील असा मराठी कादंबरीकार अजून जन्मास यावयाचा आहे. कविवर्गांपैकीं नारायण वामन टिळक यांस वडीलपणाचा मान सहजच येतो व तो त्यांना शोभतोहि. त्यांचें काव्य मनांत आणलें कीं, प्रशांत व प्रसन्न अशा एखाद्या विस्तृत सरोवराची आठवण होते. या सरोवरांत जलक्रीडा करण्यास उतरणाऱ्या वाचकाला धोका फारच कमी; पण खेळण्याबागडण्याला व कमळें तोडीत तोडीत पोहण्याला वाव पुष्कळ. याच्या उलट राम गणेश गडकरी यांचें काव्य लक्षांत आणल्याबरोबर, आपण पहाडांत व जंगलांत हिंडत असून, कड्यावरून बेधडक उड्या घेणाऱ्या उद्दाम जलप्रवाहाचें पाणी मधून मधून पीत आहों, वाचा फुटलेल्या वृक्षलतांशीं व पशुपक्ष्यांशीं बोलत आहों, या दगडावरून त्या दगडावर उड्या मारीत आहों, क्वचित् भुतांसमंधांशीं

गुजगोष्टी करीत आहों, क्वचित् दगडाखालीं टपून बसलेले वक्रोक्तीचे विंचू हंसतमुखानें आपल्या पायाला नांग्या मारीत असून 'हें दुःख सौख्य कीं झालें' या कव्युक्तीची आठवण करून देत आहेत, अंधार तर पडूं लागला आणि बाहेर निघण्याची वाट तर सांपडत नाहीं अशा स्थितींत असतांहि आपण धाडसी प्रवासी आहों या जाणिवेनें मनाला धीर वाटत आहे असा भास होतो. इतक्या थोड्या दिवसांत कवि व नाटककार या दृष्टीनें गड-कऱ्यांइतका मोठा लौकिक मिळविलेला वाङ्मयसेवक हल्लींच्या काळांत झाला नाहीं. ठोमऱ्यांची गोड कविता वाचून मोहून जात नाहीं, असा वाचक बहुधा विरळा. लेंभे व लोंढे यांची कविता जुन्या बालबोध धाटाची पण मोठी प्रौढ असे. रेंदाळकरांच्या कवितेंत शब्दसौष्ठव व सुटसुटीतपणा विशेष होता. प्रो. वासुदेवराव पटवर्धन यांचा विनय व त्यांच्या अभिरुचीचीं लहरीबंधनें यांमुळें ते कवि असतांहि कवि म्हणून पुढें आले नाहींत, तथापि भाषेच्या दृष्टीनें त्यांची गणना मार्मिक रसिक वर्गांतच केली पाहिजे. प्रो. लिमये यांचें श्रेष्ठत्व त्यांच्या विवेचक बुद्धींत होतें. भाषा सजविण्याकडे मुळींच कधीं लक्ष न देतांहि विचारांच्या जोरदारपणामुळें सफाईनें ठस-ठशीत लिहिण्याची कला त्यांना साध्य झाली होती. चांदोरकर व पटवर्धन यांनीं इतिहाससंशोधनाच्या द्वारें मराठी भाषेची बहुमोल सेवा केलेली आहे. भारदे यांचें जुन्या कवींचें अध्ययन नमुनेदार असून त्यांची शब्दरचना विचारशक्तीचा क्षुद्बोध करणारी आहे यांत शंका नाहीं. जनार्दन विनायक ओक यांचें 'लोकशिक्षण' काशिनाथपंत मित्र यांचें 'मनोरंजन' व मालवणकरांचें 'नवयुग' यांनीं आपापलें नांव सार्थ करण्यासारखी काम-गिरी पुष्कळच केली. गणेश विठ्ठल कुलकर्णी हे 'शीघ्र कादंबरीकार' म्हणून प्रसिद्ध आहेत, व ते आणखी जगते तर वाङ्मयाच्या या खात्यांत त्यांनीं पुष्कळ भर टाकली असती. प्रोफेसर रानडे यांनीं तडीस नेलेला इंग्रजी-मराठी कोशाचा उद्योग बराच परिश्रमाचा व खर्चाचा होता. या कोशानें इंग्रजी वाङ्मयाच्या द्वारें मराठी भाषा समृद्ध करण्यास पुष्कळ मदत झालेली आहे. इंग्रजी—मराठी कोशापेक्षां मराठी—मराठी कोशाची आवश्यकता आज अधिक आहे. कै० नामजोशी यांनीं अशा एका कोशाचा पाया रचला होता व त्यावरील इमारत कोणाकडून तरी पुरी करविण्याचा

लो. टिळकांनीं पुष्कळ प्रयत्न केला; पण तें काम अपुरेंच राहिलें. इंदूरच्या साहित्यसंमेलनापासून या विषयास फिरून जागृति आली. अखेर तो सिद्धीस नेण्याचें श्रेय वासुदेवराव आपटे यांस लाभेल असें दिसतें. त्यांचा कोश निम्याहून अधिक छापून झाला असून पुढील संमेलनाच्या आंत त्याची सुधारून वाढविलेली आवृत्ति काढण्याचा सुप्रसंग येवो असें मी इच्छितों. गजानन भास्कर वैद्य यांनीं मुद्रक व हिंदु मिशनरी पत्राचे संपादक या दोनहि नात्यांनीं कल्पकता व स्फूर्तिस्वातंत्र्य दाखविलें आहे. फडके, बर्वे व राजवाडे यांचीं धर्मप्रवचनपर पुस्तकें भाषांतरित असलीं, तरी लोकप्रिय होण्यासारखींच आहेत. शेट तुकाराम जावजी हे स्वत: लेखक नसले, तरी वाङ्मयाची आश्रयदात्री मुद्रणकला जी त्यांच्या हातीं होती, तिचा उपयोग त्यांनीं आपल्या वडिलांप्रमाणेंच उदार बुद्धीनें चालविला होता. माझ्या विस्मरणामुळें इतरही कित्येक नांवें या वाङ्मयतर्पणांत समाविष्ट होण्यासारखीं असून गळलीं असतील तर त्याबद्दल त्यांच्या मित्र–मंडळींची मी क्षमा मागतों. हे वाङ्मयसेवक मृत झाले तरी अस्तंगत झाले असें म्हणतां येणार नाहीं. त्यांची कामगिरी त्यांच्यामागें राहणारी आहे.

वाङ्मय–अंतरिक्षांतील जुने तारे क्षितिजाखालीं जाण्यापूर्वी नवे तारे उदयास येऊं शकतात. गेल्या बारा वर्षांत मराठी वाङ्मयाच्या वाढीचें काम बऱ्याच जोरानें सुरू आहे व ही वाढ कायमची होण्यास वाङ्मय-स्फूर्तीखेरीज जीं इतर साधनें अवश्य तींहि हळू हळू मिळूं लागलीं आहेत. या साधनांत मी दोन गोष्टींचा मुख्यत: समावेश करतों.—( १ ) सरकारी युनिव्हर्सिटींत मराठीचा प्रवेश पूर्वींहून अधिक झाला आहे, व ( २ ) राष्ट्रीय सभेनें भाषावार प्रांतरचनेचें तत्त्व मान्य करून अमलांतहि आणलें आहे. बडोदें येथील मागच्या संमेलनांत डॉ. भांडारकर यांनीं अशी भीति प्रदर्शित केली होती कीं, युनिव्हर्सिटींत मराठीचा प्रवेश झाल्यानें संस्कृताच्या अभ्यासाला कमीपणा किंवा धोका येईल. संस्कृत घालवून मराठी ठेवणें हें चांगलें नव्हे. कारण संस्कृताच्या अभ्यासाशिवाय मराठीची उन्नति होणार नाहीं असा अभिप्राय त्यांनीं तेव्हां व्यक्त केला होता. डॉ. भांडारकर यांचा अभिप्राय सर्वथा योग्यच आहे; पण त्यांनीं दर्शविलेली भीति अद्यापि अनुभवास आलेली नाहीं व पुढेंहि येण्याचा

संभव नाहीं. कारण संस्कृत घालवून मराठी मिळवूं पहाणें हें पुढच्या खांदीवर बसून मागची खांदी तोडण्यासारखेंच आहे ही गोष्ट मराठी भाषेचा अभ्युदय इच्छिणाऱ्यांना पूर्णपणें माहित होईल. संस्कृत भाषेला मृत हा शब्द लावणें सर्वस्वीं चुकीचें आहे. भाषा सामान्य लोकांच्या बोलण्यांत नसली म्हणून ती मृत होत नाहीं. निदान मराठी भाषेपुरता तरी संस्कृत हा अमृताचा अखंड झराच आहे. मराठींत आज मौल्यवान् असा कोणताहि शब्दसमूह किंवा वाङ्मयखंड दाखवितां येणार नाहीं कीं, जो संस्कृताच्या मदतीशिवाय सिद्ध झालेला असतो. जोर किंवा ठसकेदारपणा या बाबतींत मराठी जरी कांहीं अंशीं अनार्य अशा शब्दांवर अवलंबून असली, तरी अंतःकरणाच्या नाजूक, कोमल, गुंतागुंतीच्या भावना व्यक्त करण्याला संस्कृत शब्दच अधिक उपयोगी पडतात. निव्वळ मराठीचें भांडवल फारच तुटपुंजें आहे. पण संस्कृत हें मराठीचें पितृधन असल्यामुळें त्याचा उपयोग भरपूर करूनहि स्वतःचें व्यवहारचातुर्य किंवा समयज्ञता दाखविण्याला मराठीला पुष्कळ वाव उरतो. विद्यापीठांत मराठीचा अधिक प्रवेश करवूं इच्छिणाऱ्यांनीं संस्कृताच्या अभ्यासाला कमीपणा यावा अशी इच्छा धरण्याचें कारण नाहीं. युनिव्हर्सिटींत जोंपर्यंत वाङ्मयशिक्षण ही मुख्य बाब राहील, तोंपर्यंत संस्कृत हा एक अवश्य विषय राहिलाच पाहिजे. मराठीच्या प्रसाराला विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत जो अधिक प्रांत पाहिजे तो इंग्रजी भाषेच्या राज्यांतून घ्यावा एवढेंच कोणाचेंहि म्हणणें असणार. ऐच्छिक भाषा विषयांत सर्वत्र मराठीचा समावेश केल्यानें, परीक्षेतील प्रश्नोत्तरें शक्य तेथवर मराठींतून देण्याची सवलत ठेवल्यानें आणि कॉलेजांतील अनेक विषयांचें शिक्षण मराठी भाषेंतून देण्याचा प्रघात पाडल्यानें काम भागेल. त्याकरितां संस्कृत किंवा इंग्रजी भाषा देखील विषयांच्या यादींतून वगळण्याचें कारण नाहीं. स्वतंत्र मराठी विद्यापीठच होणें ही मराठीच्या उत्कर्षाची परम सीमा होय व तेंहि पुढें मागें झाल्याशिवाय राहील असें वाटत नाहीं.

भाषावार प्रांत रचनेनें देशी भाषांस उत्तेजन मिळूं लागल्याचीं चिन्हें यापूर्वींच दिसूं लागलीं आहेत. निव्वळ मराठी विद्यापीठ होण्याला ही भाषावार प्रांतरचना स्फूर्तिदायक होईल. निरनिराळ्या भाषा बोलणारे लोक

एकत्र आल्यामुळें सामान्य व्यवहाराकरितां पूर्वी इंग्रजीला शरण जाण्याची जी पाळी येत असे ती हल्लीं या नवीन प्रांतरचनेमुळें टळून, कामकाजाचीं दप्तरें प्रांतिक देशी भाषेंत ठेवण्याला सुरवातहि झाली आहे. तसेंच परस्पर पत्रें लिहिणें व मतप्रसारार्थ हस्तपत्रकें व पुस्तकें काढणें हें सर्व देशी भाषेंतून होऊं लागलें आहे. दुसरी एक गोष्ट या बाबतींत नमूद करावीशी वाटते. ती ही कीं, प्रत्येक देशभाषेला स्वातंत्र्य लाभल्यानें श्रेष्ठ—कनिष्ठ हें नातें व परावलंबित्वाची भावना नाहींशी होऊन सहकारितेस घातक अशी जी मनाची जळजळ व जाचक स्पर्धा ती नष्ट झाली. कर्नाटकांत अलीकडे या स्पर्धेचे दुष्परिणाम दिसूं लागले होते. पण भाषावार प्रांतरचना झाल्याबरोबर मराठी व कानडी हें द्वैत लोपून राष्ट्रीय भावनेचें विशिष्ट द्वैत तेथें प्रत्ययास येऊं लागलें. खालसा राज्यव्यवस्थेप्रमाणें राष्ट्रीय सभेच्या राज्यव्यवस्थेंतहि दक्षिण महाराष्ट्र, वऱ्हाड व नागपूर प्रांत हीं महाराष्ट्राचीं तीन दळें अजून वेगळीं आहेत; परंतु हे तीनही प्रांत मिळून एकच महाराष्ट्र होतो ही भावना तीनही प्रांतांतील लोकांच्या मनांत दृढ असून या तीन प्रांतांचा मिळून एक प्रांत निदान मराठी भाषेच्या कार्यापुरता तरी होईल, अशी मला आशा वाटते.

गेल्या बारा वर्षांत मराठी वाङ्मयाची हानि करणारी अशी एक गोष्ट घडली, ती मात्र येथें नमूद करणें अयोग्य होणार नाहीं. ती गोष्ट म्हटली म्हणजे प्रेस ॲक्टामुळें कांहीं चांगलें मराठी वाङ्मय विशिष्ट राजकारणाच्या संसर्गामुळें नाहींसें करण्यांत आलें. आपली ही निव्वळ साहित्यविषयक सभा असल्यानें या मुद्याचें मी अधिक विवेचन करूं इच्छित नाहीं. सुदैवानें प्रेस ॲक्ट आतां रद्द होणार आहे म्हणून यापुढें ही हानि होण्याचें बहुधा टळेल. पण वाङ्मयाची उत्कृष्ट लज्जत असलेले कांहीं ग्रंथ नष्ट झाले याबद्दल हुरहुर वाटते असें म्हटल्याशिवाय मला राहवत नाहीं. मृतांना सजीव करण्याची इच्छा सहृदयपणाची असली तरी ती व्यवहार्य नाहीं हें मीं जाणतों. पण श्रीकृष्णानें आपल्या गुरुपत्नीचीं मेलेलीं मुलें तिला जिवंत करून दाखविलीं तशीं हीं मराठी पुस्तकेंहि फिरून मधून मधून दृष्टीस पडतील तर कोणाला आनंद होणार नाहीं ?

इंदूरच्या साहित्यसंमेलनापासून आजच्या संमेलनापर्यंत जे नवीन

मराठी ग्रंथ निर्माण झाले ते लक्षांत घेतले असतां मराठी वाङ्मयाच्या प्रगतीविषयीं निराश होण्याचें बिलकुल कारण नाहीं. 'गीतारहस्य' हें इंदूर-संमेलनाच्या आधीं जन्मलें असलें तरी वरील विधानास तें पुष्टिदायकच आहे. गीतेच्याच विषयावर शंकरराव राजवाडे यांचा 'गीताभाष्य' हा ग्रंथ लक्षांत घेण्यासारखा आहे. एका अर्थानें, म्हणजे विसाव्या शतकांतील पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांचा परामर्शपूर्वक विचार त्यांत आहे म्हणून गीतारहस्याची ती एक पुरवणीच म्हणतां येईल. तत्त्वज्ञानविषयक दुसरा चांगला ग्रंथ म्हटला म्हणजे वामनराव जोशी यांचा 'नीतिशास्त्रप्रवेश' हा होय. इतक्या कठिण विषयावर इतका सुबोध व मनोरंजक ग्रंथ हा पहिलाच होय. पांगारकरांचें 'तुकारामचरित्र' हें याच कालांतील आहे. पांगारकरांनीं भक्तिप्रेम व चिकित्सकबुद्धि या दोहोंचाहि मेळ परिश्रमपूर्वक त्यांत घातलेला असून, छोटे डॉ. भांडारकर यांनीं जरी त्यांतील कांहीं दोष सप्रमाण सिद्ध केले आहेत, तरी हा चरित्रग्रंथ वाखाणण्यासारखा आहे. खुद्द मराठी भाषे-संबंधानें दोन ग्रंथ नमूद करितां येतील. विनायकराव भावे यांचें 'महा-राष्ट्रसारस्वत' व रामभाऊ जोशी यांची 'मराठी भाषेची घटना'. भावे यांचा हा ग्रंथ अनेक वर्षांपूर्वी केवळ बीजरूपानें प्रसिद्ध झाला होता; पण फल व पुष्प या दोहोंचाहि तात्त्विक अंतर्भाव बीजांत असला तरी त्यांचा प्रत्यक्ष यथार्थ आस्वाद घेण्याला बीजाचा वृक्षच बनावा लागतो. उलट त्यांच्या आजच्या विस्तृत ग्रंथाचें स्वारस्य पूर्वीच्या ग्रंथवाचकांस लाभणें अशक्य होतें. या 'खाडीकांठच्या भिक्षुका'ची अभिरुचि चिखलांत कितीहि मळली किंवा मिठाच्या राशींत घोळली, तरी तिच्यांतून आम्रमंजरी-प्रमाणें मधुर व मादक रसबिंदु स्रवूं शकतात हें आश्चर्यच होय. पण मन मूळचें वाङ्मयप्रेमी असेल तर परीक्षेला कोणी सायन्स हा विषय घेतला, किंवा मुंबईसारख्या बकाली वस्तीच्या बाजारपेठेंत रुपये आणे पैचा नित्य व्यवहार केला, तरी वाङ्मयाचा खेळ खेळण्याची जित्याची खोड जाणार कशी? जोशी यांच्या ग्रंथांत 'मराठी भाषेची घटना' पुष्कळशी व्या-करणदृष्ट्या केली आहे, तथापि मराठी वाङ्मयाचा इतिहास या दृष्टीनें त्याचे शेवटचे भाग भाव्यांच्या पुस्तकाला पुरवणीसारखेच होतात. इति-हासाच्या प्रांतांत सरदेसाई यांचे मराठी रियासतीच्या मध्यविभागाचे दोन

खंड प्रथमच लक्षांत येतात. तितक्याच विवेचकबुद्धीनें लिहिलेलें पुस्तक दत्तोपंत आपटे यांचें 'श्रीरंगपट्टणची मोहीम' हें होय. एकच लहानसा विषय घेऊन त्यावर प्रसिद्ध—अप्रसिद्ध अशी सर्व माहिती एकत्र करून लिहिलेल्या या ऐतिहासिक ग्रंथानें एक नवीन अनुकरणीय नमुना निर्माण केल्याबद्दल आपटे यांचें अभिनंदन करावें तितकें थोडेंच आहे. सरदेसाई यांच्या पुस्तकांनीं इतिहासाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांचें तर फारच मोठें काम केलें; पण सर्वत्र विखुरलेल्या ऐतिहासिक माहितींत सूत्र गोवून तिचें सुसंगत एकीकरण केलें हें विशेष होय. याच स्थळीं बडोदें येथील कर्नल नानासाहेब शिंदे यांनीं लिहिलेल्या 'लष्करांचा इतिहास' या ग्रंथांचा उल्लेख केला पाहिजे. निव्वळ लष्करी विषयावर मराठी भाषेंत तज्ज्ञ लेखकानें लिहिलेलें हें पहिलेंच पुस्तक होय; व आनंदाची गोष्ट ही कीं, नुकतेंच बंदुकीच्या गोळीबारासंबंधानेंहि असेंच तज्ज्ञानें लिहिलेलें पुस्तक निघालें आहे. इतिहास व पुराण या जोडविषयावर चिंतामणराव वैद्य यांचीं 'महाभारताचा उपसंहार' व 'मध्ययुगीन भारत' हीं पुस्तकें नामांकित होत. 'उपसंहार' हा जितका मनोरंजक तितकाच बोधप्रद आहे, व मध्ययुगीन भारतानें तर निव्वळ मराठी वाचकांना एक अदृष्टपूर्व अद्भुत ऐतिहासिक प्रदेशाचें प्रथमदर्शनच करविलें आहे. सर्वसाधारण वाङ्मयाच्या दृष्टीनें 'विविधज्ञानविस्तारा'च्या पन्नासाव्या वाढदिवसानिमित्त प्रसिद्ध होणाऱ्या निबंधसंग्रहाचा अवश्य उल्लेख केला पाहिजे. त्यांतील प्रत्येक निबंध माहितीनें व विवेचनकौशल्यानें भरलेला आहे. डॉ. केतकर यांच्या प्रस्तावना खंडांतील 'हिंदुस्थान आणि जग' हा ग्रंथहि जुन्या इतिहासाच्या दृष्टीनें वाखाणण्यासारखा आहे. केतकर यांचा ज्ञानकोश प्रसिद्ध झालेल्या योजनेप्रमाणें संपूर्ण झाल्यास मराठी भाषेची ती बिनमोल सेवा घडून येणार आहे. इतिहास संशोधनाच्या दिशेनें भारतइतिहाससंशोधक मंडळ व धुळयाची सत्कार्योत्तेजक सभा या दोन संस्था किती उत्कृष्ट काम करीत आहेत हें प्रसिद्ध असल्यामुळें त्यांच्या निरनिराळ्या ग्रंथांचा स्वतंत्र उल्लेख करण्याचें कारण नाहीं. प्रसिद्ध इतिहाससंशोधक वि. का. राजवाडे यांचें 'संस्कृत भाषेचा उलगडा' व 'महाराष्ट्राचा वसाहतकाल' हे निबंध वाचणारास, इतिहाससंशोधनाच्या

विस्ताराप्रमाणें त्याची खोलीहि किती वाढली आहे हें कळून येईल. खरे-शास्त्री यांचा ऐतिहासिक लेखसंग्रहाचा पटवर्धनी कारखाना सुरू असून गेल्या पांच वर्षांत त्यांनीं चार वाचनीय ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. शिवाय 'शहाजी व मालोजी' या त्यांच्या स्वतंत्र निबंधानें एका मोठ्या वादग्रस्त मुद्यावर नवीन प्रकाश पडला आहे. केळुसकर यांचें 'शिवचरित्र' पुनर्मुद्रित झालें असून त्यांत उपयुक्ततेची पुष्कळ नवीन भर पडलेली आहे. शिवाजीमहाराजांचीं अनेक चरित्रें डॉ. सिक्वाप्रमाणें येणार येणार म्हणून गाजत आहेत तीं केव्हांहि येवोत, तूर्त केळुसकर यांनीं निवळ निर्व्याज मराठी वाचकांच्या ऐतिहासिक क्षुधेला पूर्ण शांत करील असें चरित्र त्यांच्यापुढें ठेविलें आहे ही अभिनंदनीय गोष्ट होय. भावे यांना इतिहासांतील पराक्रमी पुरुष तेवढे प्रिय दिसतात. त्यांचें नेपोलियनचें चरित्र जितकें अद्‌भुतरसवर्णनपर, तितकाच अफजुलखानाच्या वधाचा निबंध विवेचनपर आहे.

ललित वाङ्मयांत कोल्हटकर, खाडिलकर, गडकरी, खरेशास्त्री, टिपणीस, वरेरकर, दीक्षित, जोशी वगैरे नाटककारांचीं नाटकें नुसतीं वाचण्यांतच नव्हे तर प्रत्यहीं पाहण्यांतहि येत असल्यामुळें त्यांचा तपशीलवार उल्लेख करण्याचें कारण नाहीं. कादंबऱ्यांच्या बाबतींत मात्र, मराठी लेखकांच्या प्रतिभेला थोडी शिथिलता आलेली दिसते. नाथमाधव, परांजपे कुळकर्णी, गोखले, आपटे, बेहरे, हडप, निफाडकर, चिपळूणकर इत्यादिकांच्या कादंबऱ्यांतून कांहीं बऱ्या साधल्या आहेत. परंतु जोशांच्या रागिणी-सारखें उच्च ध्येय किंवा हरिभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्यांसारखी कथानकसमर्पकता त्यांत आढळून येत नाहीं. किंबहुना, खुद्द जोशी यांनीं लिहिलेली 'नलिनी' ही कादंबरी देखील त्यांच्या पहिल्या कादंबरीच्या मानानें बरीच नीरस वठली आहे. एका उकाराच्या भेदानें ज्या दोन ग्रंथमाला आज बरेच दिवस बुभुक्षित वाचकांकरितां, इस्पितळांतील रोग्यांना ठराविक तासांनीं कांजी दिल्याप्रमाणें कादंबरी ग्रंथांचा पुरवठा उत्पन्न करीत आहेत, त्यांचें काम मागणी व पुरवठा यांच्या समीकरणास योग्य असेंच आहे. यासंबंधानें वाईट एवढेंच वाटतें कीं, कांहीं होतकरू पण गरजू लेखकांना स्वतंत्र प्रसिद्धीनेंहि जें यश लाभलें असतें, तें या

सख्यांत सांपडल्यामुळें संशयित होतें व वाईटाबरोबर, चांगलेंही जनतेच्या अनादराच्या रुळाखालीं चेंगरून जातें. पण 'माला' हा शब्द केवळ निंदाव्यंजक असा ठरत नाहीं, हें सुदैव होय. कारण भारतगौरवग्रंथ-मालेसारखे कांहीं चांगले प्रयत्न चालू आहेत व ते टिकाऊ व्हावेत अशी कोणीहि इच्छा करील. शेवटीं विनोदी वाङ्मय एवढें खातेंच तपासावयाचें उरतें. त्यांत गडकरी यांचा 'रिकामपणचा उद्योग' व कोल्हटकर यांचे कांहीं त्रुटित लेख याशिवाय नजरेंत भरण्यासारखें कांहीं आढळत नाहीं. मासिक पुस्तकांत अनेक तरुण विनोदी लेखक डोकावूं लागले आहेत; परंतु त्यांना यश लाभण्याच्या आशीर्वादापेक्षां अधिक कांहीं आज म्हणवत नाहीं. कोल्हटकरांचे सर्व विनोदी लेख एकत्र छापून निघतील तर तो एक संग्रहणीय ग्रंथ होईल. विनोदी लेखांचें खातें कोल्हटकर यांनींच प्रथम उघडलें व सदरील ग्रंथ या नवीन लेखनसांप्रदायाच्या आचार्यस्थानीं विराजमान होऊन राहील. गडकऱ्यांची 'रिकामपणची काम-गिरी' इतकी सरस आहे कीं, ती हातीं घेणारा वाचक भरकामांत आकंठ बुडला गेला असला तरी रिकामपणा असल्याप्रमाणें पुरी केल्याशिवाय तो ती खालीं ठेवणार नाहीं. वरील सिंहावलोकनांत नजरचुकीनें अनेक ग्रंथ अगर ग्रंथकार उल्लेखावयाचे राहिले असतील, पण केवळ स्मरणानें विवे-चन केलें असल्यामुळें असला प्रमाद होणें स्वाभाविक आहे, हें लक्षांत घेऊन कोणीं स्वतःकरितां अगर दुसऱ्याकरितां रागावणार नाहीं अशी आशा आहे. यांत कोणाकडे दुर्लक्ष झालें असलें तरी तें बुद्धिपुरःसर नव्हे. शिवाय मनुष्यदृष्टींत क्वचित् असा दोष असतो कीं, एखादें फार दूरचें दिसावें, पण अगदीं जवळचेंहि दिसूं नये. कॅमेऱ्याइतकी निःपक्षपाती दृष्टि कोणाची असणार ? पण तोहि कित्येकवेळां कशा गमतीदार चुका करतो हें फोटोग्राफांतून दिसतेंच ?

वरील विवेचन प्रायः स्वतंत्र ग्रंथांसंबंधानें केलें आहे. निवळ भाषां-तरित असेहि कांहीं ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. अशा ग्रंथांसंबंधानें एवढेंच सांगावयाचें कीं, व्यक्तिविषयक कीर्तीच्या किंवा अभिमानाच्या दृष्टीनें स्वतंत्र बुद्धीचा ग्रंथ हा अधिक श्रेयस्कर असला तरी सामुदायिक दृष्टीनें भाषांतराचा उपयोग पुष्कळच आहे. जगांत सोळा आणे स्वयंस्फूर्त असें

वाङ्मय फारसें मिळणार नाहीं. आज इंग्रजी वाङ्मय खूप श्रीमान् व समृद्ध असें दिसेंत. पण त्यांतील पुष्कळसा भाग भाषांतरांनीं व्यापलेला आहे. विशेषत: Classics किंवा मूर्धाभिषिक्त असे जे ग्रंथ कोणत्याहि भाषेंत असतील ते सर्व जगाची जिंदगीच होत; व ज्यांची अव्वल दर्जाची प्रतिभा सांडून वहावत नाहीं, त्यांनीं उत्कृष्ट ग्रीक, रोमन, जर्मन, फ्रेंच, इंग्लिश ग्रंथांचीं भाषांतरें केल्यास मराठी भाषेवर तो उपकारच होईल. शिवाय भाषांतर करण्याचेहि इतके चांगले प्रकार आढळतात कीं, स्वतंत्र पण वाईट विचारांपेक्षां भाषांतरित पण सुंदर विचारांचा ग्रंथ सामुदायिक दृष्टीनें अधिक चांगला. प्लेटोच्या संवादाचें भाषांतर करणारा जॉवेट याला स्वतंत्र ग्रंथ लिहिण्याची योग्यता खचित होती. पोपनें जरी होमरच्या इलियडचें भाषांतर केलें तरी त्यामुळें तो स्वतंत्र कवि नव्हता असें कोणीही म्हणत नाहीं. संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें करणारे रसिक पंडित कृष्णशास्त्री चिपळूणकर व परशुरामपंत तात्या गोडबोले यांना स्वतंत्र ग्रंथकार होतां आलें नसतें असें कोण म्हणेल ? देवल व हरिभाऊ आपटे या दोघांनीं भाषांतरें केलीं आहेत व स्वतंत्र ग्रंथरचनाही केली आहे. प्रोफेसर भाटे यांनीं एकाच पुस्तकांत 'सार्टर रिसॉर्टर'चें थोडें भाषांतर व स्वतंत्र विवेचन केलें आहे. दुसऱ्याची कृति आपल्या नांवावर विकून लेखक म्हणून मिरवूं नये हें ठीक आहे. पण स्वतंत्र बाण्याचे लेखकही पुष्कळ वेळां उच्छिष्ट विचार बेधडक घेतात व त्यांची रूपांतराची शैली सफाईदार म्हणून तें उच्छिष्टभक्षण होत नाहीं असें नव्हे. केवळ नैतिक दृष्ट्या यशस्वी चोरापेक्षां प्रामाणिक भिकारी बरा. मातृभाषेच्या पोषणाकरितां जरूर तर भारवाहकाचें काम करण्यांत कमीपणा नाहीं. ग्रंथकार म्हणून मिरविण्याची इच्छा नसेल, तर भाषांतराचें काम करितांनाहि वाङ्मय चोखाळण्याचा शुद्ध आनंद मनुष्याला लाभूं शकेल. उदाहरणार्थ, माधवराव मोडक यांचें 'सुख आणि शांति' किंवा दाजी नागेश आपटे यांचें 'सुधारणा व प्रगति' हीं उत्कृष्ट रूपांतरें वाचणाराला तर आनंद देतातच, पण तीं करितांना स्वत: ग्रंथकर्त्यांनीं तोच आस्वाद घेतला असेल याविषयीं शंका नाहीं. बँक किंवा पेढी यशस्वी होण्याला मूळ भागीदारांचें थोडें भांडवल हवेंच; पण योग्य

व्याज देऊन इतरांच्या ठेवी व्यवहारांत वापरणें हें अवश्य असतें व तें रास्तही आहे.

इंदूराच्या संमेलनापासून गेल्या चार वर्षांत अनेक प्रकारची पुष्कळ आधुनिक कविता बाहेर पडली आहे. या चार वर्षांत जितकी आधुनिक कविता प्रसिद्ध झाली असेल तितकी पूर्वी क्वचितच झाली असेल. किंबहुना असेंही म्हटलें असतां चालेल कीं, सांप्रतचा काळ हा आधुनिक उत्कर्षाचा व अभिवृद्धीचा काळ आहे. आधुनिक कवितेविषयीं एका काळीं समाजांत असलेली अनादरमिश्रित उदासीनता हळुहळू कमी होत चालली असून तिच्याविषयीं एक प्रकारची अभिरुचिहि सुशिक्षितांत उत्पन्न झाल्याचें स्पष्ट दिसून येतें. केशवसुत, टिळक, विनायक, गोविंदाग्रज, मोगरेप्रभृति मृत कवींची समग्र कविता ग्रंथरूपानें एकत्र झाली असून तांबे, अनंततनय, टेकाडे, पांगारकर, माधव, तिवारी वगैरे विद्यमान कवींच्या काव्याचे छोटे मोठे संग्रह तर अगणित प्रसिद्ध झाले आहेत. सारांश गेल्या पन्नास वर्षांत जे चांगले कवि उदयास आले, त्यांपैकीं बऱ्याच श्रेष्ठ कवींच्या कृति आतां संकलित स्वरूपानें आपल्यापुढें आहेत असें म्हणावयाला हरकत नाहीं. या सर्व काव्यग्रंथांचा परामर्श घेणें म्हणजे पर्यायानें एकंदर आधुनिक कवितेचें थोडक्यांत समालोचन करण्यासारखें आहे; आणि म्हणूनच प्रत्येक कवीच्या कृतीचा पृथक् निर्देश न करितां सर्वसाधारणरीत्या आधुनिक कवितेविषयीं चार शब्द सांगण्याचें येथें योजिलें आहे.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत इंग्रजी अंमल महाराष्ट्रांत दृढ झाल्यावर येथील समाजांत विलक्षण क्रांति घडून येऊन नानातऱ्हेचे स्थितिभेद, मतभेद व रुचिभेद अस्तित्वांत आले. या बहुविध परिवर्तनाचें पूर्ण निदर्शक असेंच आधुनिक कवितेचें स्वरूप आहे. केवळ संस्कृत काव्यरत्नाकराचेंच ज्यांनीं आलोडन केलें होतें आणि इंग्रजी कवितेचा ज्यांच्यावर संस्कार झाला नव्हता, अशा कवींची अभिरुचि व कविता जुन्याच धर्तीची राहिली. निवळ इंग्रजी व संस्कृत काव्याचें ज्यांनीं उत्तम अध्ययन केलें होतें, परंतु मराठी भाषेवर ज्यांचें फारसें प्रभुत्व नव्हतें अशा विद्वानांनीं साध्या भाषेंतील कवितेची एक नवीनच टूम काढिली. कांहीं इंग्रजी व संस्कृत कवितेच्या रसज्ञांनीं भाषांतराचा व रूपांतराचा प्रयत्नहि करून

पाहिला. हा प्रयत्न बराच फलद्रूप झाला यांत शंका नाहीं. या सर्व कारणांमुळें भाषा, रचना व विषय यांचें वैचित्र्य आधुनिक कवितेंत अतिशय दिसून येतें. आधुनिक कवितेचे नुसते विषयच घेतले, तर त्यांत इसवी सनाच्या बाराव्या शतकापासून तों विसाव्या शतकापर्यंत सर्व शतकांत शोभणारे प्रकार आढळतात ! पुराणकथांचें प्रवचन किंवा अध्यात्मग्रंथांचें निरूपण तर पूर्वीप्रमाणें महाराष्ट्रशारदा करितेच, पण अलीकडे ती आगगाडींतून प्रवास करितांना किंवा हवेंतून उडणाऱ्या म्हातारीला पाहून मुलांबरोबर खिदळतांनाहि दृष्टीस पडते ! देहाच्या विनाशित्वावर उभारलेला पूर्वीचा वैराग्यवाद ती अद्यापि चित्तावर ठसवितेच, पण त्याबरोबरच मृत्यूच्या भयानक स्वरूपाचें चिंतन किंवा महामारीनें शरीर निपचित पडलें असतां येणाऱ्या भीषण अनुभवांचें वर्णनहि ती आतां करूं लागली आहे ! करुंदवाडकर, लेंभे व दासगणू यांची कविता वाचतांना जशी मोरोपंत, वामन व महिपति यांची आठवण होते, तशीच मोगरे, टिळक व केशवसुत यांची कविता वाचतांना पोप, वर्डस्वर्थ किंवा ब्राउनिंग यांची आठवण होते. मुजुमदार, भिडे, लेले, पांगारकर, आगाशे, व अनंततनय यांच्या रचनेचें मोरोपंती वळण; मोगरे, चंद्रशेखर व लेंभे यांची कांहींशी संस्कृतप्रचुर, परंतु डौलदार व रमणीय श्लोकपद्धति; माधवानुज, सुमंत, साधुदास, नागेश व माधव यांची सफाईदार, प्रसन्न व शुद्ध रचना; चिपळूणकर आणि विनायक यांची सहजमधुर साकी; तुकारामी व श्रीधरी घाटाचे टिळकांचे ओंवी–अभंग; केशवसुत व ठोमरे यांची विषयानुरूप तुटक, ओजस्वी व परिणामकारक नवीन वृत्तयोजना; तांबे व दत्त यांचीं लावणी–पदांच्या धर्तीवरील हृदयंगम कवनें; गोविंदाग्रज–रेंदाळकरांची ललित, नादमधुर पण कृत्रिम भाषा; आणि टेकाडे व बेहेरे यांच्या वाणींतील तडफ हे सर्व विशेष आधुनिक कवितेला शोभादायकच आहेत. आधुनिक कवितेचें हें वैचित्र्य जसें चमत्कृतिजनक तसेंच तें आनंददायकहि आहे.

आधुनिक कवितेचें हें वैचित्र्य, तिच्यावर घडलेल्या इंग्रजी व संस्कृत वाङ्मयाच्या प्रबळ परिणामांचें द्योतक आहे. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत निपजलेली बहुतेक कविता भाषांतरित अगर रूपांतरित आहे. अजूनही हा भाषांतराचा पांगुळगाडा पूर्णपणें सुटला आहे अशांतला भाग

बिलकूल नाहीं. केशवसुत, टिळक, तांबे, मोगरे, माधवानुज, रेंदाळकर, अनंततनय, माधवप्रभृति जे आधुनिक कवि उत्तम रचना करूं शकतात त्यांचीहि बरीच कविता भाषांतरित अगर रूपांतरित आहे. केवळ स्वतंत्र अशी कविता फक्त लेंभे, खरे, चंद्रशेखर, विनायक, कोल्हटकर, गोविंदाग्रज आणि ठोमरे यांचीच म्हणतां येईल. पूर्वींच्या व हल्लींच्या भाषांतरांत फरक इतकाच आढळून येतो कीं, पूर्वी फक्त संस्कृत–इंग्रजींतूनच तर्जुमे होत असत; पण आतां बंगाली, उर्दू आणि क्वचित् गुजराथी व फ्रेंचमधूनहि होऊं लागले आहेत. बंगाली सारस्वताचा जगांत बोलबाला झाल्यापासून मराठी साहित्यसेवकांचें त्या सारस्वताकडे लक्ष वेधलें; आणि बऱ्याच कवींनीं व लेखकांनीं त्या भाषेंत प्राविण्य संपादून त्यांतील काव्यमय गद्य–पद्य प्रबंधांचीं मराठींत रूपांतरें करावयास सुरवात केली. बंगाली काव्य बहुतेक नवीन व अद्भुतरम्य कल्पनांनीं नटलेलें असून त्याची गणना जगांतील उत्कृष्ट सारस्वतांत होते. अशा काव्याचा मराठींत तर्जुमा होणें अवश्य आहे यांत शंका नाहीं. परंतु होतकरू कवींनीं आपली प्रतिभा केवळ भाषांतराच्या व्यवसायांत गुंतवूं नये. कारण त्यामुळें स्वतंत्र कृति प्रसवावयाला समर्थ असलेली त्यांची प्रतिभा, परावलंबनाची दुष्ट संवय जडल्यामुळें, पुष्कळदां शिथिल किंबहुना नष्ट झाल्याचें आढळून येतें. माधवानुज, आनंदीरमण व रेंदाळकर हे उज्वल प्रतिभेचे कवि होते व आरंभीं प्रकाशित झालेल्या यांच्या कांहीं स्वतंत्र कृति फार चांगल्या आहेत. बंगाली सारस्वताचा परिचय झाल्यावर या कवींनीं पुढें रूपांतर करण्यांतच आपल्या प्रतिभेची सर्व शक्ति वेंचिली, त्यामुळें त्यांच्याकडून नंतर चांगली स्वतंत्र कविता निर्माण झाली नाहीं. मराठींत जारीनें चालू असलेला हा भाषांतराचा प्रघात पाहिला म्हणजे प्राचीन कवींप्रमाणें अर्वाचीन कवीहि, कोणत्या ना कोणत्या तरी सारस्वताचे भक्त बनून, नेहमीं परभृतच राहणार कीं काय असें भय वाटतें.

आधुनिक कवितेच्या वैचित्र्याप्रमाणें तिच्या विशेषांचा उगमहि इंग्रजी व संस्कृत काव्यांत सांपडतो. जुन्या मराठी कवितेचें अनुकरणहि कांहीं कमी होत असतें असें नाहीं. संस्कृतांतील वैषयिक शृंगार आणि इंग्रजी धर्तीचें प्रियाराधन; प्राचीन मराठी कवितेंतील सृष्टि व वस्तु यांचें

यादीवजा केलेलें वर्णन आणि इंग्रजी धर्तीवरील निसर्गाचीं व इतर वस्तूंचीं हुबेहुब रेखाटलेलीं अलिकडील शब्दचित्रें; मराठींतील जुना अध्यात्मवाद आणि नवीन पद्धतीचें तत्त्वचिंतन; जुनीं पौराणिक आख्यानें आणि अलीकडील ऐतिहासिक कथा; पूर्वीचीं प्रदीर्घ महाकाव्यें आणि हल्लींचीं त्रुटित वीणाकाव्यें—या सर्व जुन्या नव्या विशेषांचा आधुनिक काव्यांतील विरोध व विलास पाहिला म्हणजे मौज वाटून आनंद होतो.

वीणाकाव्य (Lyric) हा आधुनिक कवितेचा एक अत्यंत महत्त्वाचा विशेष आहे. कै. कवि केशवसुत यांनीं ही वीणागीतांची अभिनव पद्धति मराठींत प्रथम सुरू केली असें म्हणावयाला हरकत नाहीं. किंबहुना हा व अशाच तऱ्हेचे इतर वृत्तांचे व विषयांचे नवीन विशेष मराठी कवितेंत प्रचलित करून केशवसुतांनीं तिला निराळेंच स्वतंत्र वळण लाविलें असें म्हणतां येईल. गेल्या वीस पंचवीस वर्षांत जी मराठी कविता लिहिली गेली, ती बहुतेक या केशवसुती वळणाची आहे. टिळक, विनायक, माधवानुज, तांबे, गोविंदाग्रज, दत्त, ठोमरे, प्रभृति अनेक सत्कवींनीं या वळणाची कविता लिहून आधुनिक मराठी कवितेला हल्लींचें स्वतंत्र व सुंदर स्वरूप आणिलें आहे. आणि म्हणूनच या कवींची कविता ज्या काळांत निर्माण झाली त्या चालू वीस पंचवीस वर्षांच्या काळाला सामान्यत: 'केशवसुतांचें युग' अशी यथार्थ संज्ञा देण्यांत येते. या काळांतील बरीच कविता त्रुटित, स्फुट गीतात्मक अशी आहे. कवितेचा मुख्य गुण किंबहुना गुणसर्वस्व जी हृदयंगमता तीच या वीणागीतांना केवळ प्राणभूत असते. एकच भावना किंवा एकच रस या एकतारींतून आळविला जातो. मनाला गुंगविणारें नादमाधुर्य अशा गीतांत जितकें अधिक असेल तितकें चांगलें; कारण भावनांचें अद्वैत साधावयाला त्यामुळें फार मदत होते. अशा तऱ्हेचीं नादमधुर वीणागीतें इंग्रजींत मूर, शेले, कीट्स, टेनिसन यांचीं असून संस्कृतांत जयदेव कवींचीं आहेत. मराठी-अभंगांना व भक्तिपर पदांनाहि वीणागीतें म्हणतां येईल. मात्र यांत नादमाधुर्य बरेंच कमी आहे. आधुनिक मराठी वीणागीतें बहुतेक सर्व हृदयाला चटका लावणारीं अशीं परंतु जरा कमी नादमधुर आहेत. तांबे, दत्त, गोविंदाग्रज व विशेषत: ठोमरे यांचीं गीतें फार मधुर व मंजुळ आहेत. केशव-

सुत, टिळक व विनायक यांचीं गीतें त्या मानानें कमी श्रुतिसुभग, परंतु अधिक भावनोद्दीपक आहेत. विचारांचा व भावनांचा खोलपणाहि केशवसुत, तांबे, गोविंदाग्रज व ठोमरे यांत जास्त दिसून येतो. अलीकडे या वीणा-काव्यांचें बरेंच चुकीचें अनुकरण होत असून त्यामुळें मराठी काव्यांत असंख्य प्रेमपर, देशभक्तिपर लहान सहान पदांची दरसाल भर पडत आहे. काळाच्या अभिजात अभिरुचीपुढें ही थिल्लर रचना टिकणार नाहीं हें उघडच आहे. पण येथें इतकें सुचविणें योग्य वाटतें कीं, ज्यांना उत्तम देशभक्तिपर व प्रेमपर गीतें लिहावयाचीं असतील त्यांनीं मूर, शेले व कीट्स यांचीं वीणागीतें नमुना म्हणून अवश्य दृष्टीपुढें ठेवावीं. केशवसुतांनींच रूढ केलेली दुसरी महत्वाची रचना चतुर्दशक किंवा Sonnet ही होय. केशवसुत, तांबे, गोविंदाग्रज व ठोमरे यांचीं चतुर्दशकें फार चांगलीं साधलीं आहेत. पण हा चतुर्दशकाचा नवीन प्रकार मराठी वाचकांना फारसा रुचलेला अगर कवींना साधलेला असा दिसत नाहीं. सयमक—निर्यमकांचा वाद आतां बराच थंडावला आहे. निर्यमक कविता लिहिण्याचें श्रेय कांहीं ठिकाणीं केशवसुतांस दिल्याचें आढळतें, पण तें बरोबर नाहीं. निर्यमक कविता केशवसुतांनीं मुळींच लिहिलेली नाहीं.

मराठी कवितेंत केशवसुतांनीं जें हें स्थित्यंतर घडवून आणिलें तें अगदीं निर्दोष आहे असें नव्हे, आणि एका अर्थी तें बरोबरहि आहे. नव्याजुन्याची घडामोड होतांना थोडीबहुत मोडतोड होणें अगदीं साह-जिक असतें. मात्र हे दोष वेळींच सुधारण्याची खबरदारी घेतली पाहिजे व याच दृष्टीनें आधुनिक कवितेंतील कांहीं दोषांचा येथें थोडा विचार करावयाचा आहे. भाषेच्या व रचनेच्या बाबतींत कवींनीं अलीकडे आपला जन्मसिद्ध हक्क जो निरंकुशपणा तो गाजविण्यास सुरवात केली आहे. या निरंकुशपणाची जबाबदारी बरीचशी केशवसुतांकडे जाते. केशवसुतांचें मराठी भाषेवर प्रभुत्व नसल्यामुळें म्हणा किंवा भाषासौन्दर्याचें महत्त्व त्यांना विशेष न वाटल्यामुळें म्हणा, त्यांची कविता भाषेच्या व रचने-च्या दृष्टीनें ओबडधोबड झाली आहे. त्यांतहि विषयानुरूपतेच्या हेतूनें त्यांनीं जीं नवीं वृत्तें उपयोगांत आणिलीं तीं रचनेच्या दृष्टीनें कांहींशीं शिथिल व अनियमित आहेत. 'प्रीति' व 'हरपलें श्रेय' हीं त्यांचीं

दोन गाणीं या वृत्तशैथिल्याच्या बाबतींत नमुनेदार आहेत. त्याचप्रमाणें समर्पक शब्द योजण्याच्या भरांत कित्येक वेळां गांवढळ शब्द त्यांच्या हातून पडल्याचें आढळून येतें. हे प्रमाद त्यांनीं मुद्दाम खचित केलेले नाहींत. पण त्यांच्या मागें त्यांच्या गुणांबरोबर या अवगुणांचेंहि अनुकरण होत असून मराठी भाषेंत ही सदोष व शिथिल रचना रूढ होण्याचें भय वाटूं लागलें आहे. केशवसुतांच्या कृतींतील हे दोष दाखवून इतर साधारण कवींना आपल्या वाईट भाषेचें समर्थन करितां येतें. केशवसुतांच्या रचनेंतील दोष त्यांच्या अनेक काव्यगुणांपुढें व असामान्य प्रतिभातेजापुढें लोपून जातात; पण सामान्य कवींचें तसें न होऊन, त्यामुळें होतकरू कवींना भाषासौन्दर्याची व रचनेच्या ठाकठिकीची परवा मात्र वाटेनाशी झाली आहे. केशवसुतानंतर गोविंदाग्रजांनीं शाहीर पंथाचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें चालू भाषेंत बऱ्याच चांगल्या शब्दांची भर पडली हें खरें; पण त्याबरोबरच रचनेचे व विचारांचे ग्राम्य प्रकार आणि अर्थशून्य शब्दयोजनाहि अलीकडे कवितेंत बरीच दिसूं लागली आहे. एखादा प्रतिभावान् कवि किंवा लेखक वाङ्मयांत अगदीं अभिनव अशी लेखनशैली सुरू करून जातो; व त्याच्यामागें त्याच्या या शैलीचें अनुकरण बहुधा अतोनात होतें. तसेंच या दोघांहि श्रेष्ठ कवींच्या बाबतींत झालें आहे. मात्र मराठी भाषेला हें अनुकरण कितपत श्रेयस्कर होईल हें आज कांहींच सांगतां येत नाहीं.

आधुनिक कवितेच्या या दोषांची छाननी रसिक टीकाकारांकडून अवश्य झाली पाहिजे. आधुनिक कवितेला केवळ ती 'आधुनिक' म्हणूनच वाईट म्हणणारे अगर समजणारे लोक दिवसेंदिवस कमी होत चालले आहेत आणि शिक्षणाचा प्रसार होऊन सामान्य जनतेंत जसजशी साक्षरता वाढूं लागेल तसतशी आधुनिक कवितेची लोकांत अधिक चहा होत जाईल यांत संशय नाहीं. अशा वेळीं आधुनिक कवितेच्या गुणदोषांची मीमांसा होऊन तिची वास्तविक योग्यता सिद्ध होणें फार जरूर आहे. आतांपर्यंत आधुनिक कवितेवर स्वतंत्र असें टीकात्मक वाङ्मय मुळींच प्रसिद्ध झालेलें नाहीं असें म्हटलें तरी चालेल. मोगरे, विनायक, तांबे, केशवसुत, अनंततनय, सुमंत, टेकाडेप्रभृति कवींच्या काव्यसंग्रहांना जोडलेल्या प्रस्तावनालेखांचा या दृष्टीनें थोडा उपयोग होण्यासारखा आहे. प्रस्तावना ही

बहुधा त्या त्या कवीच्या काव्यगुणांचा वाचकांना परिचय करून देण्याच्या हेतूनें लिहिलेली असते. कवीविषयीं वाचकांचा शक्य तितका अनुकूल ग्रह करावयाचा असल्यामुळें प्रस्तावनेंत टीकारूप दोषचिकित्सा शक्य व इष्ट नसते. अर्थातच सामान्यतः गुणगौरवाच्या हेतूनें लिहिलेल्या या प्रस्तावना कवींच्या काव्यांचें यथार्थ स्वरूप कळावयाला तितक्या उपयोगी पडत नाहींत; आणि म्हणून रसग्रहणाच्या बुद्धीनें परंतु निःपक्षपातानें लिहिलेल्या टीकात्मक वाङ्मयाची विशेष आवश्यकता वाटते. कवि आणि रसिक टीकाकार यांचें नातें परस्परानुबंधी आहे. कवि हा आपल्या काव्यांतील माधुरीनें रसिक टीकाकाराला आनंद देतो. कवीचें हें 'देणें' त्याच्या भावी कृति उत्तरोत्तर निर्दोष उतराव्यात म्हणून त्याच्या काव्यांतील दोष प्रेमळ हितबुद्धीनें परंतु स्पष्ट शब्दांनीं दाखवून, टीकाकाराला फेडावयाचें असतें. सुदैवानें बहुतेक प्रमुख आधुनिक कवींच्या कृति आतां ग्रंथरूपानें प्रकाशित झाल्या असून टीकाकारांचें कार्य फार सुकर झालें आहे. येथें अगदीं अलीकडे बाहेर पडलेल्या आधुनिक कवींवरील दोन टीकाग्रंथांचा उल्लेख करणें अगत्याचें आहे. न शं. रहाळकर यांचा 'केशव सुत आणि त्यांची कविता' हा विस्तृत निबंध व. ग. त्र्यं. माडखोलकर यांचें ' आधुनिक कविपंचक ' हे दोन टीकाग्रंथ आधुनिक कवितेवर चांगला व्यासंग करून लिहिलेले आहेत. रहाळकर यांचा निबंध जरी एक प्रकारच्या भक्तिभावानें लिहिलेला असला, तरी केशवसुतांच्या चरित्राचा व काव्यगुणांचा परिचय व्हावयाला त्याचा निःसंशय चांगला उपयोग होईल. माडखोलकर यांचें ' कविपंचक ' एकंदर आधुनिक कवितेचें रहस्य कळण्याच्या दृष्टीनें अधिक उपयुक्त आहे. हे निबंध निःपक्षपातानें लिहिलेले असून यांतील गुणदोषविवेचन मार्मिक आहे. आधुनिकांतील पांच श्रेष्ठ कवींच्या कृतीचें सर्वांगांनीं केलेलें सुसंगत समालोचन या ग्रंथांत आलेलें असल्यामुळें आधुनिक कवितेची योग्यता कळावयाला त्याची अतिशय मदत होईल.

निसर्गवर्णन किंवा प्रणयालाप यांच्याप्रमाणें विनोदालाहि आधुनिक कवितेंत व्यापक स्थान मिळालें आहे. वस्तुतः पद्याच्या मर्यादित रंगणापेक्षां गद्याच्या मैदानांतच विनोदाचा वावर अधिक इष्ट असतो; व तेथेंच तो चांगला खुलतोहि. वस्तुविकारदर्शनाची आवड कवित्वाला फारशी

पोषक आहे असें नाहीं. खरें पाहूं जातां विनोद हा वस्तूंतील साम्य वैषम्याच्या बाजू हुडकून काढून त्यांतील विरोध हास्यास्पद रीतीनें दर्शविणाऱ्या, मार्मिक व चतुर मनुष्याचा बुद्धीचा विलास आहे. अंत:करणाशीं त्याचा विशेष संबंध नाहीं. असें असतांहि संस्कृत व विशेषत: इंग्रजी काव्यांत विनोदाचे सर्व प्रकार पुष्कळच आढळतात. जुन्या मराठी काव्यांत मात्र विनोदाला स्वतंत्र असें स्थान मुळींच नाहीं. आधुनिक कवींत मोगरे, कोल्हटकर, गोविंदाग्रज व अनंततनय यांची कविता विनोदी व बरीच उंच दर्जाची आहे. मोगरे यांची 'पदवीचा पाडवा' 'मेथाजीची मजलस' 'अभिनव धर्मसंस्थापना' हीं काव्यें हास्यरसप्रचुर आहेत. यांतील विनोद उत्कट असून मनाला लागेल असें त्यांत कांहींही नाहीं. 'पदवीचा पाडवा' हें काव्य मात्र लांबट असल्यामुळें जरा कंटाळवाणें होतें. कोल्हटकरांच्या 'छत्रीचे उपकार' 'स्थित्यंतर' व 'सुखकर जागृति' या कवितांतील विनोद जरा निराळ्या तऱ्हेचा आणि कांहींसा सूक्ष्म आहे. 'सुखकर जागृति' या काव्यांतील विनोदाच्या छटा अतिशय मनोहर आहेत. कोल्हटकरांच्या कवितांतील विनोदानें हास्याच्या उकळ्या फुटत नाहींत, मनाला गुदगुल्या होतात. गोविंदाग्रजांच्या 'एक समस्या' 'हुकमेहुकूम' 'विहिणींचा कलकलाट' या कविताहि चांगल्या आहेत. 'परतंत्र कोण' 'वरची वाट' 'स्वर्गाच्या द्वारांत' या अनंततनयांच्या विनोदी काव्यांत उपहास आणि उपरोध हे विनोदगुण प्रमुख आहेत. यांपैकीं 'स्वर्गाच्या द्वारांत' हें काव्य अपूर्ण आहे. तें पूर्ण झाल्यास मराठींत एका उत्तम उपहासात्मक काव्याची भर पडेल. अनंततनय आणि तांबे यांच्या लहान मुलांविषयींच्या कवितांत चांगला घरगुती विनोद साधला आहे. अनंततनयांच्या 'लक्के पथे लक्के आंबे' व 'हट्टी मुलांची दिवाळी' या कविता आणि तांब्यांच्या 'वारा' व 'आतां गडी फू दादाशीं' या कविता त्या दृष्टीनें फार बहारीच्या उतरल्या आहेत.

राष्ट्रीय किंवा ऐतिहासिक कवनें हाहि आधुनिक कवितेचा एक केवळ अपूर्वच विशेष आहे. जुन्या महाराष्ट्रसारस्वतांत ऐतिहासिक म्हणतां येईल असें कवित्व अतिशय थोडें सांपडतें. समर्थांचीं कांहीं जोरदार स्फुट प्रकरणें, अनंतफंदीचें माधवकाव्य व नारायणराव पेशव्यांच्या वधावरील

इतिहाससंग्रहांत–छापलेलें एक काव्य हीच काय ती महाराष्ट्राची प्राचीन ऐतिहासिक कविता. यापैकीं शेवटीं उल्लेखिलेलीं दोन काव्यें अपुरींच आहेत. महिपतीच्या संतचरित्राची गणनाहि एका अर्थानें ऐतिहासिक काव्यांत करतां येईल. पण हीं चरित्रें वर्णन करण्यांत महिपतीचा हेतु, इतिहासकथन नसून ' वाटे चरित्र त्यांचें आपण कांहीं तरावया गावें, हा होता. पेशवाईच्या अगदीं ऐन भरभराटींत वागलेल्या मोरोपंता-सारख्या भाषाप्रभूनें आपलें वाग्वैभव अष्टशत रामायणाच्या रचनेंत वेचिलें आहे. शिवशाहींत किंवा पेशवाईत घडलेल्या अनेक अद्‌भुतरम्य वीरचरित्रां-पैकीं एकहि गाण्याची स्फूर्ति पंतांना झाली नाहीं. नाहीं म्हण,याला तीर्थ-यात्राप्रसंगीं गंगेपुढें आपल्या आप्तेष्टांची व गांवकऱ्यांची ' वकिली 'करतांना त्यांच्याबरोबर तत्कालीन राष्ट्रपुरुषांचेंहि स्मरण त्यांना झाल्याचें आढळतें ! विद्वान मराठी कवि याप्रमाणें रामायणभारतांच्या आवृत्त्या काढण्यांत गुंतले असतां त्यांच्या मानानें पुष्कळच कमी व्युत्पन्न, पण अधिक चतुर असलेल्या प्रतिभावान शाहिरांनीं मात्र आपल्या डफतुणतुण्याचा आधार देऊन इतिहासांतील उदात्त प्रसंगांना व पराक्रमी व्यक्तींना हा काळपर्यंत जिवंत राखिलें. शाहिरांच्या लावण्या, पोवाडे हेंच महाराष्ट्राचें खरेंखुरें राष्ट्रीय काव्य आहे. पण एकंदर महाराष्ट्रसारस्वताच्या मानानें हें फारच थोडें आहे यांत शंका नाहीं. महाराष्ट्राच्या इतिहासांत असे अनेक उज्ज्वल व अद्‌भुत प्रसंग आहेत कीं, ज्यांचें वर्णन करितांना कवींचीहि कल्पनाशक्ति क्षणभर गुंग व्हावी. पण प्राचीन कवींनीं तर या विषया-कडे मुळींच लक्ष दिल्याचें दिसत नाहीं, व अर्वाचीनांपैकींहि फारच थोड्यांनीं ऐतिहासिक किंवा राष्ट्रीय कविता लिहिण्याचा प्रयत्न केला आहे.

अर्वाचीनांत ऐतिहासिक महाकाव्यें लिहिण्याचा अग्रमान कुरुंदवाड-कर, गणेशशास्त्री लेले व माधवराव कुंटे यांच्याकडे जातो असें मला वाटतें. लेले व कुंटे या दोनहि कवींनीं शिवचरित्रावरच रचना केली असून त्यांपैकीं कुंट्यांचें काव्य चांगलें साधलें आहे. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या पूर्वग्रहदूषित प्रतिकूल टीकेमुळें हें काव्य चांगलें असूनहि जें एकदां मागें पडलें, तें कायमचेंच मागें पडल्यासारखें दिसतें. चंद्रशेखर, श्री. ना. मुजुमदार, राधारमण, अनंततनय वगैरे कांहीं कवींनींहि ऐतिहासिक महाकाव्यें लिहिलीं आहेत; पण तीं अद्यापि प्रसिद्ध झालेलीं नाहींत.

महाकाव्यें, मग तीं वास्तविक असोत अगर काल्पनिक असोत, या काळांत लोकप्रिय होतील असें वाटत नाहीं. कवींची जशी अलीकडे त्रुटित रचनेकडेच प्रवृत्ति असल्याचें प्रायः दृष्टीस पडतें, तशीच रसिकवर्गाची अभिरुचिहि असल्या रचनेला अनुकूल असल्याचें आढळून येतें. अशीं ऐतिहासिक किंवा राष्ट्रीय स्फुट कवनें बऱ्याच आधुनिक कवींचीं आहेत. केशवसुतांचें 'तुतारी' हें जोरदार कवन राष्ट्रीय कवितेचा उगम धरावयाला हरकत नाहीं. हें कवन विशेषतः सामाजिक स्थितीवर असून यांतील विचार नवीन व बाणेदार आहेत. 'दोन बाजी' हा केशवसुतांचा लहानसा पोवाडाहि असाच जोरकस भाषेंत लिहिलेला आहे. 'तुतारी' या कवनाचें अनुकरण गेल्या वीस वर्षांत फार झालें. या अनुकृत कवितांत ठोमरे यांचें 'धर्मवीर' हें कवनच काय तें चांगलें आहे. याहून थोड्या निराळ्या प्रकारची राष्ट्रीय कविता विनायक, टेकाडे व बेहेरे या कवींनीं लिहिली आहे. या सर्वांत विनायकांची कविता अत्यंत सरस आहे. 'हतभागिनी' 'महाराष्ट्रलक्ष्मी', 'यापुढें' वगैरे त्यांचीं सर्वच कवनें अंतःकरणाला अगदीं चटका लावतात. टेकाडे व बेहेरे यांच्या कवितेंत ओजोगुण बराच आहे; पण रचनेच्या व विचाराच्या दृष्टीनें विनायकांच्या कवितेपेक्षां ती कांहींशी कमी दर्जाची ठरेल. नांवाजण्यासारखी ऐतिहासिक स्फुट कविता माधव, अनंततनय व तिवारी यांची आहे. ऐतिहासिक कवितेंत ऐतिहासिक सत्याला किती महत्त्व द्यावयाचें याबद्दल मतभेद असूं शकेल. वस्तुतः ऐतिहासिक नसतांहि दंतकथेच्या आधारानें इतिहासांतील व्यक्तींचा संबंध दर्शवून लिहिलेलें एकादें कथनकाव्य ऐतिहासिक आहे असें भासवितां येतें, व अशा काव्याचीं ऐतिहासिक काव्यांत गणना करावयाला हरकतहि नाहीं. कारण निवळ इतिहास यथातथ्य सांगणें हें कांहीं ऐतिहासिक कवितेचें साध्य नव्हे. तत्कालीन परिस्थितीचें किंवा समाजाचें हुबेहुब शब्दचित्र सुंदर रीतीनें दाखविणें हेंच तशा काव्याचें साध्य आहे असें मला वाटतें. Bee कवीची 'कमळा' ही कविता हें एक अशा तऱ्हेचें उत्तम ऐतिहासिक काव्य आहे. या काव्याची भाषा क्वचित बोजड असून कल्पनाहि किंचित क्लिष्ट वाटतात. मराठ्यांच्या इतिहासांतील कांहीं निवडक प्रसंगावर माधव कवींनीं कविता केल्या आहेत. या त्यांच्या सर्वच कविता चांगल्या उतरल्या आहेत. पण त्यांतल्या त्यांत

' गोखलखां ' ' शिवकालीन रायगड ' ' शाहूचें दक्षिणेंत आगमन ' वगैरे कांहीं कविता अतिशय स्फूर्तिदायक व रसाळ आहेत. ऐतिहासिक प्रसंगावर नवीन धर्तीची स्फुट कविता लिहिण्याचा प्रघात प्रथम यांनींच पाडला असें म्हणावयाला हरकत नाहीं. याशिवाय भालचंद्रांची ' हिरकणी ' व अनंततनयाची ' कल्याणची कल्याणी ' या दोन कविताहि चटकदार आहेत. गेल्या दोन तीन वर्षांत ऐतिहासिक व राष्ट्रीय कविता नियतकालिकांतून व स्वतंत्र रीतीनें बऱ्याच प्रसिद्ध झाल्या असून अलीकडील नवीन कवींचा अशी कविता लिहिण्यावरच बराच भर दिसतो. राष्ट्रीय भावनांचा परिपोष होण्याच्या दृष्टीनें त्यांची ही प्रवृत्ति निःसंशय अभिनंदनीय आहे.

गेल्या दोनतीन वर्षांपासून आधुनिक कविता अधिकाधिक लोकप्रिय होत असल्याचें दिसून येतें. समाजांत शिक्षण वाढल्यामुळें आणि जुन्याचा अभिमान कालांतरानें शिथिल झाल्यामुळें नवीन कवितेला अनुकूल अशी परिस्थिति अलिकडे आपोआप उत्पन्न झाली आहे. आधुनिक कवितेच्या लोकप्रियतेला हा जसा बदललेला काल कारणीभूत झाला, तसाच लोकांचा कल व कवींचें कर्तृत्वहि कारणीभूत झालें. समाजांत पसरलेले व त्याला प्रिय झालेले राजकीय आणि सामाजिक विचार कवींनीं आपल्या काव्यांत जोरकसपणानें गोविल्यामुळें त्या काव्यांविषयीं साहजिकच सुशिक्षितांत आपलेपणा उत्पन्न झाला. जुन्या काव्यांत समाजाच्या राष्ट्रीय आकांक्षांना प्रोत्साहन देईल असें कांहींच नव्हतें. नवीन राष्ट्रीय कविता सामान्य लोकांनाहि आवडावयाला हें एक प्रमुख कारण झालें आहे. काव्य हें कांहीं नुसतें विद्वज्जनांच्या विनोदनाचें किंवा परमेश्वराला प्रसन्न करण्याचें साधन नाहीं. बहुजनसमाजाच्या सुखदुःखांचा त्याच्याशीं जिव्हाळयाचा संबंध आहे, हें लक्षांत घेऊन आधुनिक कवींनीं आपली वाणी राष्ट्राच्या सुखदुःखाचें वर्णन करण्याकडे लाविली. देशाच्या दुःस्थितीचें किंवा पूर्वजांच्या प्रतापाचें ज्यांत वर्णन आहे अशी कविता लोकांनाहि आवडूं लागली.. त्यांतहि नागपूरचे प्रसिद्ध कवि टेकाडे यांनीं आपलीं ओजस्वी कवनें जाहीर सभांतून वगैरे म्हणावयास सुरवात केल्यामुळें आधुनिक कवितेचें हें राष्ट्रीयत्व लोकांच्या चित्तांत विशेष ठसून त्या मानानें तिची लोकप्रियताहि वाढली. राष्ट्रीय दृष्टीनें आधुनिक कवितेची उपयुक्तता लोकांना

आतां पटली आहे; आणि त्यामुळें लौकिक पठणाचें अधिष्ठानहि मिळून जनतेच्या अंत:करणांत तिची वाढ होईल अशी उमेद वाटते. पुणें येथें १९०७ सालीं भरलेल्या ग्रंथकारांच्या संमेलनास याच शहराचे विख्यात नागरिक कविवर्य चंद्रशेखर यांनीं एक हृदयद्रावक परंतु मार्मिक कविसंदेश पाठविला होता. आधुनिक कवींच्या दु:स्थितीला आणि त्यांच्या निंदकांना उद्देशून:—

संप्रति अवर्षणानें, तापानें कोळपून जे गेले ।
त्या पारिजातकांवरि फुलतिल वर्षाऋतूंत हो झेले ॥
जाया करूं नका हो ! हिमकालीं खुंट हे प्रहारांनीं ।
लवतिल हेच वसंतीं द्राक्षांच्या गोड गोड भारांनीं ॥

असे अर्थपूर्ण उद्गार त्या संदेशांत त्यांनीं काढिले होते. ते उद्गार अशा रीतीनें सफल होण्याचा योग इतक्या लवकर आल्याबद्दल आज कोणाहि रसिकाला आनंदच वाटेल.

मराठी भाषेतील वाङ्मयवृद्धीविषयीं निराशा बोलून दाखविणाऱ्या लोकांपैकीं पुष्कळांच्या अंगीं असा एक दोष असतो कीं, त्यांना विद्यमान लेखकांविषयीं अंधत्व किंवा निदान बेसुमार अनादर असतो. हा दोष केवळ आपल्याच लोकांत आहे असें नाहीं, तर तो मनुष्यस्वभावांतच असल्यामुळें इतर देशांतहि आढळून येतो. रुचिभेदामुळें एका लेखकाला दुसरा लेखक पसंत न पडणें शक्य आहे. पण हा रुचिभेद जुन्या काळच्या ग्रंथकारांचा परामर्ष घेतांना नडत नाहीं, तर समकालीन लेखकांपुरता तेवढा नडतो अर्नाल्ड बेनेट म्हणतो:—

In every age there have been people to sigh " Ah yes. Fifty years ago we had a few great writers, but hey are all dead, and no young ones are arising to take their place. " This attitude of mind is deplorable if not silly and is a certain proof of narrow taste. It is not until an age has receded into history, that we can see it as it is as a group of men of genius. The total amount of fine literature created in a given period of time differs from epoch to epoch but it does not differ much. And we may be perfectly sure that our own age

will make a favourable impression upon that excellent judge, posterity. Therefore, beware of disparaging the present in your own age.

बरें, समकालीन लेखकांविषयीं एखाद्याची न्याय्य किंवा उदार बुद्धि असली तरी ती फार तर परदेशी लेखकांच्या वांट्याला येते. समकालीन असूनही त्यांतल्या त्यांत बुद्धिमान लेखक स्वदेशी किंवा स्वजातीय असला तर त्याला मात्र ती हटकून लाभावयाची नाहीं. या नैसर्गिक–दोषांत राजसत्तेमुळें निर्माण होणाऱ्या विषमतेची भर पडली म्हणजे मग बोलावयासच नको. या निराशावादी गृहस्थांशीं आपण बोलूं लागलों तर असें दिसून येईल कीं, वाङ्मयगुणोत्कर्षाचा मान ते आधुनिक मराठी ग्रंथकारांना मुळींच देणार नाहींत. मराठींतच पण कोणी चांगले लेखक असतील तर ते सर्व चिपळूणकरांच्या वेळचे किंवा त्यांच्या पूर्वीचे; पण स्वतः चिपळूणकरांचेंहि घर नारायण पेठेंत उभें दाखवितां येतें, यामुळें ज्यांचा ठावठिकाणा समजत नाहीं ते परशरामपंत तात्या गोडबोले त्याहून श्रेष्ठ. परशरामपंततात्या झाले तरी आधुनिकच. यांच्याहून पेशवाईअखेरची कोणी संतुबाई, रामराय, माधवेंद्र, हरिराज, शेंडे, शंकरदास, गोपीनाथ ही कवि मंडळी चांगली. कारण ती पेशवाईअखेर होती असें महाराष्ट्रसारस्वतकार म्हणतात. मग त्यांची एकादीच कविता कां उपलब्ध असेना किंवा उपलब्ध असेल ती टाकाऊ कां असेना ! याच क्रमानें वरील कवींपेक्षां रामदास श्रेष्ठ व रामदासांपेक्षां मुकुंदराय श्रेष्ठ ! तारखांची जंत्री ही गुणोत्कर्षाची कसोटी केली म्हणजे हें असेंच होणार. सामुदायिक रीतीन मराठी व संस्कृत कवींची तुलना केली म्हणजे संस्कृत कवीच मराठीपेक्षां श्रेष्ठ ठरवावयाचे.कारण ते यांच्या आधीं होऊन गेले. तसेंच आमचे कवि व पाश्चात्य कवि यांची तुलना केली म्हणजे पाश्चात्य कवीच श्रेष्ठ हे ठरलेले ! Distance lends enchantment to the view ही म्हण सर्वतः सत्य मानली तर पाश्चात्यांनाहि आम्ही ‘ हिंदी ग्रंथकार ’ मोठे वाटावे; पण तसें मात्र वाटत नाहीं. इंग्रजी ग्रंथकार समजण्याकरितां आम्ही इंग्रजी शिकतों, पण मराठींत कोण ग्रंथकार झाले याची चौकशी कोणा इंग्रज ग्रंथकारानें केली आहे ? हा राजकीय परिस्थितीचा परिणाम. पण मौज ही कीं, परकीय नाहींत तर नाहींत, पण स्वदेशी मराठी लोकही समकालीन मराठी

ग्रंथकारांचें चीज करावें तसें करीत नाहींत. मॉमसन, नेभर, अक्टन, फ्रूड यांचीं नांवें घेतलीं म्हणजे हे केवढे जाडे इतिहाससंशोधक होते असें आपण म्हणतों. पण राजवाडे, खरेप्रभृतींची किंमत मुळींच न ओळखणारे असे कितीतरी मराठी लोक सांपडतील. डिकन्स हा कादंबरीकार मोठा आहे खरा; पण हरिभाऊ आपटे हे त्याच्या पासंगालाहि लागणार नाहींत असें कोणी म्हणतात तेव्हां त्यांचें आश्चर्य वाटतें. जर्मन नाटककार शिलर याचीं नाटकें आवेशयुक्त म्हणून प्रसिद्ध आहेत. पण या गुणांत खाडिलकरांचीं नाटकें कमी भरतील असें नाहीं. शेक्सपीयर हा नाटककार कालिदासापेक्षांहि मोठा ही गोष्ट कबूल करणें न्यायाचें होईल. पण विच-रलेसारखे अश्लील पण विनोदी प्रहसनकार मराठींत मिळणार नाहींत असें नाहीं. विनोदी लेखक या नात्यानें मार्कट्वेन हूड, स्टर्न, पोप यांच्या जोडीला आमच्यांतील कोल्हटकर, गडकरी, मोगरे हे खचित खऱ्या मानानें बसूं शकतील. व्हॉल्टेअर, स्विफ्ट, ज्युनियस, हे लेखक चावा घेणारे ( Satirical ) लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत, पण आगरकर, शिवरामपंत परांजपे, कोल्हटकरद्वय, गडकरी वगैरे मंडळी तोंडभर चावा कसा घेतात हें त्यांच्या लेखांनीं ज्यांना जखमा झाल्या ते यथार्थ सांगतील. तात्पर्य स्वतंत्र बुद्धीनें विचार करूं गेल्यास आधुनिक मराठी लेखकांत नामांकित परदेशी लेखकांच्या बरोबरीचे लेखक सांपडणार नाहींत असें नाहीं. इकडे तिकडे थोडें बहुत अंतर असावयाचेंच, पण स्वाभिमान बुद्धि सोडली तरी निव्वळ न्यायबुद्धिहि आपणांत असावी तितकी नाहीं, म्हणूनच हें अंतर अधिक दिसतें.

आधुनिक मराठी कविता व जुनी मराठी कविता यांची तुलना करतांनाहि हेंच दिसून येईल कीं, कित्येक आधुनिक कवि जुन्या मराठी कवींच्या दर्जाचे असतां ते केवळ आधुनिक म्हणून त्यांचें चीज होत नाहीं व जुन्यांना ' जुनें ' एवढ्यामुळेंच विशेष मान मिळतो. प्रसाद गुणांत टिळक हे श्रीधरापेक्षां खचित कमी नाहींत. मुक्तेश्वराइतकी रसाळ वाणी व अलंकारचातुर्य ज्यांच्यांत आहे, असे दोनचार तरी आधुनिक कवि खास निघतील. वामन पंडित हा चांगला खरा, तथापि विद्याधरपंत भिडे त्यांच्याशीं टक्कर देऊं शकतील; आणि लेंभे व चंद्रशेखर यांच्या कवितेंत प्रौढपणा तितकाच असून सफाईदारपणा खचित अधिक आहे. उभयतां

मोडक बंधु हे एकनाथापेक्षां कवित्वांत खालच्या दर्जाचे आहेत असें सिद्ध करणें कठीण जाईल. नामदेवाचे अभंग टिळकांच्या कांहीं अभंगापेक्षां विशेष चांगले नाहींत. मोरोपंतांची आर्या सरस तर खरीच; पण विनायक, चंद्रशेखर, माधवानुज यांच्या बऱ्याच आर्या मोरोपंतांच्या म्हणून घुसडून दिल्या तर त्या कोणाच्या हें ओळखणें कठीण जाईल; व ओळखल्या तर त्यांनीं यमकाला बळी पडून कृत्रिमपणा पदरीं घेतला नाहीं या खुणेवरूनच ओळखतां येतील. परमार्थ व व्यवहार यांचा मेळ घालण्याच्या रामदासांच्या हातोटीच्या बाबतींत त्यांची बरोबरी करणारा कवि आज अमुक असा नेमका दाखवितां येणार नाहीं. पण रामदासांच्या कवितेंतील शब्दांचा ओबडधोबडपणा सामान्यत: हल्लींच्या कवींत फारच थोडा आढळेल. महिपती व दासगणू यांची तुलना केली तर दासगणू हे कमी भरणार नाहींत. शिवाय दासगणूंच्या काव्यांत लोकव्यवहाराचें ज्ञान व चतुरस्रपणा हे गुण माझ्या मतें अधिक आहेत. कवि गोविंदाची भूपाळी होनाजी बाळाच्या भूपाळीची खचित बरोबरी करील व सावरकरांचे स्फूर्तिदायक पोवाडे तर प्रसिद्धच आहेत. माझें हें लिहिणें कोणास धाडसाचें वाटेल; पण कालांतरानें तें मान्य होईल. आतां कांहीं जुने कवी संतपदवीला पोहोंचले होते ही गोष्ट खरी आहे, पण माझें बोलणें काव्यगुणांच्या तुलनेपुरतें आहे, म्हणून नसत्या हेतूचा मजवर आरोप करून कोणी राग मानूं नये. भावे, आजगांवकर व इतर कांहीं इतिहास-संशोधक मंडळींनीं कित्येक असे कांहीं अप्रसिद्ध कवि प्रसिद्धीस आणले आहेत कीं त्यांची बरोबरी सामान्य आधुनिक कवि खचित करूं शकतील.

भावे यांनीं समर्थांच्या सांप्रदायांतील बयाबाई, बहिणाबाई, अंबाबाई, या कवयित्रींकरितां आपल्या महाराष्ट्र सारस्वतांत एक स्वतंत्र भाग खर्ची घातला आहे; आधुनिक काळांत वरील कवयित्रींच्याहून अधिक सरस कविता केलेल्या–चार पांच तरी कवयित्री खास सांपडतील. लक्ष्मीबाई टिळक, लक्ष्मीबाई अभ्यंकर, सिंधुसुता, लक्ष्मीबाई बेहेरे, हिराबाई पेडणेकर, मनोरमाबाई रानडे, वेणुबाई दाणी, शारदाबाई परांजपे यांच्या कविता वाचल्या असतां वरील विधानाची सत्यता पटेल.

लेखनविस्ताराच्या दृष्टीनें पाहिलें असतां जुना व नवा लेखकवर्ग कवि व इतरहि, यांची तुलना करितां असें आढळेल कीं, हल्लीं लेखन

व्यवसाय पूर्वीपेक्षां पुष्कळच वाढला असून विविधहि झाला आहे. जुन्या कवितेंत, भक्तीचा प्रेमळपणा विशेष असून तिला व्यवहाराची बाधा फारशी नव्हती, व कविताविषयांतील मुख्य ज्ञान म्हणजे प्राय: अद्वैत सिद्धांतांचें ज्ञान एवढेंच होऊन बसलें होतें. आधुनिक लेखांत व काव्यांत अध्यात्मज्ञानाची भूमिका अगदींच सुटलेली नाहीं. शिवाय त्यांत भौतिक विज्ञान, ऐतिहासिक अनुभव, सृष्टिदर्शनकुतूहल, जगाचें वाढतें दळणवळण नवीन प्रकारचें सामाजिक तत्त्वज्ञान वगैरे गोष्टींच्या योगानें प्रतिभेस मदतच झालेली आहे.

आधुनिक काळांतील लेखनव्यवसायाचा विस्तार लक्षांत घेतां निवळ ग्रंथसंग्रह असा आणखी किती तरी निर्माण झाला असता, परंतु या लेखनव्यवहाराला अनेक तोंडें फुटलेलीं असल्यामुळें केवळ ग्रंथरचनेवर लेखकांच्या प्रतिभेचें जितकें एकीकरण व्हावें तितकें होत नाहीं. वास्तविक सामान्य वर्तमानपत्रकार व सामान्य ग्रंथकर्ता यांची योग्यता ज्ञानाच्या दृष्टीनें सारखीच असते. लेस्ली स्टीफन यानें Journalism ची व्याख्या अशी केली आहे कीं " By journalism we mean writing for pay upon matters of which you are ignorant " उलट अहेर म्हणून डिझरायलचें खालील मत ग्रंथकारास नजर करण्यासारखें आहे. ' When I want to learn a subject I sit down to write a book adout it. " वर्तमानपत्रांच्या नित्य व्यवहारांत घाई आणि ठराविक मतें ठराविक रीतीनें प्रतिपादन करण्याची जरूरी ही एक मोठी नड आहे. आधुनिक राजकीय परिस्थितीच्या दृष्टीनें लेखनव्यवसायाला Propagandism किंवा मतप्रसार याचें स्वरूप येणें इष्टच आहे. परंतु आधुनिक लेखकांच्या वाङ्मय निर्माण करण्याच्या पात्रतेसंबंधानें कोणी शंका घेतल्यास त्याला रोकडा जबाब द्यावयाचा तर असें म्हणतां येईल कीं, टिळक, आगरकर, वासुदेवराव केळकर, शिवरामपंत परांजपे, पाध्ये, खाडिलकर, वासुदेवराव पटवर्धन, अच्युतराव कोल्हटकर, सीतारामपंत दामले, वगैरे मंडळी वर्तमानपत्राच्या धंद्यांत पडल्यामुळें त्यांच्या हातून स्वतंत्र ग्रंथनिष्पत्ति एरवीं झाली असती तितकी झाली नाहीं. उलट विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं केलेला लेखनव्यवसाय बहुतेक निबंधलेखनाचा असल्यामुळें त्यांची कृति

वाङ्मयात्मकच बनली आहे. विलायतेंत याच्या उलट प्रकार प्रायः आढळतो. डिकन्स, थॅकरे, जॉन मोर्ले वगैरे ग्रंथकारांवर वर्तमानपत्रांतले लेखक म्हणून छाप बसला होता. परंतु तो फार थोड्या वेळेपुरता. ज्यांनीं वर्तमानपत्रांत कधीं एकहि ओळ लिहिली नाहीं असेच ग्रंथकार पुष्कळ; तथापि एक गोष्ट कबूल करणें प्राप्त आहे. ती ही कीं, ग्रंथलेखनाची अभिरुचि व ती सफल करण्यास लागणारा उद्योग हीं इकडच्या पेक्षां इंग्लंड वगैरे देशांत निःसंशय अधिक आढळतात. ग्रंथलेखनांतही Propagandism किंवा मतप्रसाराची बुद्धि कमी असते असें नाहीं. पण मतस्वातंत्र्य थोडें अधिक स्वीकारलें जातें व तसें करण्यास त्याला लोकांकडून सवलतहि मिळते. जें मत संपादकाच्या खुर्चीवर बसून लिहिणें अप्रशस्त मानलें जाईल, तेंच ग्रंथांत आल्यास त्याला माफी मिळेल. कारण ग्रंथलेखनाची भूमिकाच मतस्वातंत्र्याची म्हणून गणली जाते.

वर्तमानपत्रें, सार्वजनिक चळवळी, धार्मिक मतप्रसार वगैरेमध्यें गुंतलेल्या लोकांकडून ग्रंथनिष्पत्ति थोडी कां होते याचें कारण वर दिलेंच आहे. पण जी थोडी होते तिजवरून एकच गोष्ट सिद्ध होते. ती ही कीं, वाङ्मय निर्माण करण्याचा आनंद इतर सर्व व्यवसायांनीं मिळणाऱ्या आनंदाहून अगदीं वेगळा व अधिक सरस आहे. वाङ्मय लिहिण्याची पात्रता अंगीं असतां ज्यानें तें लिहिलें नाहीं असा मनुष्य सहसा मिळणारच नाहीं. फावल्या वेळीं तर त्याचा हात तिकडे वळेलच, पण उद्योगाच्या धांदलींतहि वेळांत वेळ काढून तो कांहीं लिहिल्याशिवाय राहणार नाहीं. लो. टिळकांशीं ज्यांचा निकट परिचय होता अशांना हें माहीत आहे कीं, वाटेल त्या दगदगीचा किंवा धांदलीचा प्रसंग असला, तरी पण त्यांतच फुकट जाण्यासारखा थोडा वेळ मिळाला, तर त्यांना प्रिय असणाऱ्या वाङ्मयासंबंधानें किंवा त्यांनीं मनांत योजलेल्या वाङ्मयात्मक लेखासंबंधानें उपयुक्त असें पुस्तक घेऊन घटका दोन घटका ते वाचीत पडत. बाहेर सार्वजनिक चळवळीचा सर्व व्यवहार चालू असतां मेंदूच्या आंतल्या कप्प्यांत वाङ्मयात्मक असा कांहीं तरी गुप्त ठेवा त्यांचा नेहमीं ठेवलेला असे. व एकांतांत तो ठेवा उघडून पाहून त्यांत थोडी भर घालावयास मिळाली असतां त्यांना विशेष समाधान वाटे. लखनौस कॉंग्रेस जिंकण्याच्या पराक्रमाचा अभिमान त्यांना अधिक वाटला असेल किंवा गीता-

रहस्य ग्रंथाची ' बाइंडिंग ' होऊन हातीं आलेली पहिली प्रत पाहून ग्रंथकर्तृत्वाच्या पराक्रमाचा अभिमान अधिक वाटला असेल हा एक वादग्रस्त प्रश्नच आहे. सीझरचें लष्करी पराक्रमांतच आनंदसर्वस्व असतें तर त्यानें आपलें 'कामेंटरी' चें पुस्तक लिहिलें नसतें. लॉर्ड रोजबरी हा त्याच्या मुत्सद्देगिरीपेक्षां नेपोलियन व पिट यांच्या चरित्रग्रंथांबद्दलच लोकांच्या अधिक स्मरणांत राहील. निवडणुकींत किंवा पार्लमेंटांत आपल्या पक्षाचें बहुमत स्थापणें हीच ग्लॅडस्टननें इतिकर्तव्यता मानली असती, तर तो ग्रीक शब्दांचा कीस काढून विद्वानांशीं झगडला नसता. रोमन बादशहा मार्कस ओरेलियस व ज्युलियन हे सुराज्यव्यवस्थेपेक्षां आपल्या नैतिक ग्रंथांबद्दलच अधिक प्रसिद्ध आहेत. शुद्ध भौतिक ज्ञानांत वाङ्मयाचा हात शिरण्याचें कारण काय ? पण प्रो. हक्सले यांच्या भौतिक शोधांनीं जर एक मनुष्य मोहित केला असेल तर त्यांच्या वाङ्मयात्मक व्याख्यानांनीं हजारों माणसें मोहित झालेलीं आढळतील. हीं सर्व लौकिक माणसांचीं उदाहरणें झालीं. पण परमार्थप्रवण महात्मेहि वाङ्मयसंमोहापासून मुक्त नसतात. तसें नसतें तर तोंडांत घोळघोळून म्हणतांना खडीसाखरेच्या खड्यांसारखीं गोड व लोण्यासारखीं मृदुललितपदपूर्ण अशीं स्तोत्रें शंकराचार्यांनीं कां लिहिलीं असतीं? तसेंच आमच्या मराठी संतकवींना जर नुसतें अध्यात्मज्ञानच लोकांस शिकवावयाचें होतें तर त्यांना वृत्त, मात्रा, यमक, उपमा, दृष्टांत इत्यादिकांचा चाळा कां सुचला असता ? एका कविचरित्रकारानें असें लिहिलें आहे कीं, जुन्या कवींनीं अर्थबोधापलीकडे कविता सजविण्याचा प्रयत्न केला नाहीं; पण हें विधान माझ्या मतें बिलकूल खरें नाहीं. वास्तविक अध्यात्म ही फारच थोड्या व सोप्या शब्दांनीं सांगण्याची गोष्ट आहे. असें असतां अध्यात्मवर्णनाच्या आधीं त्यांनीं वाङ्मयवर्णनच किती तरी केलें आहे. ' कोहं, सोहं ' हे दोन शब्द समजून देण्याला वाङ्मयाची किती विचित्र रचना त्यांनीं फैलावली. ज्ञानेश्वरांनीं शब्दस्तुतिमिषानें वाङ्मयाचें वर्णन केलें आहे. ते लिहितात:—

**सहाय आत्मविद्येचें । करावया आपण वेचें ।।**
**गोमटें काय शब्दाचें । एक एक वानूं ।।**

रामदासांनीं तर वाङ्मयाचें वर्णन अशा उदात्त शब्दांनीं केलें आहे कीं,

कीं हा ईश्वराचा पवाड । पाहतां गगनाहून वाड ॥
ब्रह्मांडरचनेहून जाड । कविप्रबंध-रचना ॥

हें वर्णन वाचून, दासबोध लिहितांना भावी वाचकाला मिळणाऱ्या ज्ञानानंदाच्या कल्पनेंत समर्थ गुंग होते, कीं वाङ्मयजन्य आनंदाचे ते स्वतःच घुटके घेत होते हें कोणीहि सांगावें. दांत न फुटलेल्या मुलाला ऊंसाचा करवा चावणार नाहीं, म्हणून आपणच तो तोंडांत चावून मुलाला रस देण्याचें मिष करणाऱ्या मातेचा प्रेमळपणा जरी संतकवींच्या ग्रंथांत दिसला तरी तिचें जिव्हालौल्यहि त्यांत झांकत नाहीं हें लक्षांत ठेवावें.

असो. वर वर्णन केल्याप्रमाणें सांसारिकांना व पारमार्थिकांना, बद्धांना व मुक्तांना, राजसांना व सात्त्विकांना सारखेंच पाशबद्ध करणारी वाङ्मय ही चीज तरी तत्त्वत: काय आहे याविषयीं थोडें विवेचन करूं.

'वाङ्मय' या शब्दाची व्याख्या आजवर अनेकांनीं अनेक रीतींनीं केली आहे. पण त्यापासून स्वत: व्याख्या करणारांनाच जें समाधान लाभलें नाहीं तें इतरांना कोठून लाभणार ? व्याख्या करण्याला निश्चित अर्थाच्या शब्दांनीं बोलावें लागतें, पण केवळ वाच्यार्थानें बोलूं असें म्हटल्यास वाङ्मयाच्या व्याख्येची मजल गांठतां येणेंच शक्य नाहीं. वाच्यार्थाच्या रुक्ष मार्गानें किंचित प्रवास करतांच थकून शेजारीं पसरलेल्या अलंकारिक भाषेच्या ताटव्यांत शिरून तेथील छायासुख अनुभविण्याचा व करमणूक करण्याचा मोह प्रवाशाला अनावर होतो. व त्याहून मौज ही कीं, जें त्याला हमरस्त्यावर मिळालें नाहीं तें आडमार्गांत लाभतें. अमेरिकन प्रोफेसर डन ( Dr. Waldo H. Dunns M. A. LLD.) लिहितो कीं, "The word Literature is not only difficult, it is well nigh impossible to define. There is a distinct border land where 'expression' of thought merges into the pure gold of literature" याचा अर्थ, "विचार व्यक्त करण्याच्या वाटेनें जात असतां मध्येंच अशी एक यक्षभूमि लागते कीं तेथें एकदम शब्दार्थाचें सुवर्ण बनतें." अर्थात् प्रतिभासंपन्न अशा प्रवाश्याच्या वांट्यालाच हा दिव्य अनुभव यावयाचा ! इतर लोक या मार्गावरून नित्य येरझारा घालीत असले तरी त्यांना ही यक्षभूमि आढळावयाची नाहीं, व त्यांच्या मनांतील अर्थाला सुवर्णाचें स्वरूप कधीं यावयाचें नाहीं.

अल्पसंतुष्ट किंवा घाईत असणाऱ्या मनुष्याला वाङ्मयाची कल्पना अवघ्या दोन शब्दांत देतां येईल. पण खणपटीस बसणाऱ्या संशयखोर पृच्छकाचें समाधान करावयाचें तर दोनशें शब्दहि त्या कामाला पुरणार नाहींत. सांगणारा ऐकणारा भेटेल तसा वेदांत श्लोकार्धांत सांगतां येतो; किंवा हजारों ग्रंथ लिहिले तरी पुरे पडत नाहींत. तीच गोष्ट वाङ्मयाचीहि आहे. एका इंग्रज ग्रंथकारानें तर वाङ्मयाची व्याख्या memorable word अशी केली आहे. मीं पाहिलेली सर्वांत लहान व्याख्या हीच होय.

तर्कशास्त्रांतील व्याख्येच्या पद्धतीप्रमाणें अव्याप्ति अतिव्याप्ति यांचा घोळ आपण घालीत बसलों तर या व्याख्येची टर तेव्हांच उडवितां येईल. कारण संसारी मनुष्याला वाङ्मयव्यतिरिक्त लक्षांत राहणारे शब्द इतर पुष्कळ असतात. पण मार्मिक मनुष्याला या दोन शब्दांनीं पुरेशी कल्पना येईल. दुसऱ्या एका इंग्रज ग्रंथकारानें ही व्याख्येची अडचण खालील नाट्यानें व्यक्त केली आहे.

I will tell you what literature is. No. I only wish I could, but I cann't. No one can. Gleams can be thrown on the secret inklings given, but no more.

इतकें बोलून हताश होऊन तो नाद सोडून दिल्याचा आविर्भावच त्यानें केला आहे.

वाङ्मय हें शब्दात्मक असलें तरी त्याला अनेक प्रकारची कसोटी लावितां येते. त्याला वजन, माप, प्रमाण, शरीर, स्वरूप, रंग, तेज, मन, आत्मा, इतिहास, यशापयश, ईश्वरी कृपा, इत्यादि अनेक अंगें व गुण असतात. प्रथम वाङ्मयाचा शरीरदृष्ट्या विचार करूं. वाङ्मय याचा वाच्यार्थ ' यच्चयावत जें वाचेनें वदलें गेलें तें ' असाच करावा लागेल. पण हा जगडव्याळ अर्थ कोणासहि अभिप्रेत नसणार हें उघड आहे. वेडा बोलतो तोहि वाङ्मयव्यवहार म्हणूं लागलों, तर स्वतःलाच वेडें म्हणवून घ्यावें लागेल. पण प्रतिभावान् नाटककार नाटकांत वेड्याचें पात्र घालून त्याजकडून असें बोलून दाखवितो कीं, तें वाङ्मय होऊं शकेल. वाङ्मयाची व्याप्ति संकुचित करितांना हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, पुस्तकांतून त्यांतल्या त्यांत रक्षणीय अशाच विचारांचा संग्रह होत असला तरी सर्वच्या सर्व पुस्तकें हें कांहीं खरें वाङ्मय नव्हे; त्यांतहि निवड करणें प्राप्त आहे. छाप-

ण्याची कला निघाली यामुळें टाकाऊ अशीं पुष्कळ पुस्तकें छापून बाहेर पडतात हें खरें; तथापि हातानें पुस्तकें लिहावीं लागत, तेव्हांहि टाकाऊ पुस्तकें लिहिलीं जात नसत असें नाहीं. छापलेला म्हणून कोणताहि मजकूर जसा खरा असतोच असें नाहीं, तसाच तो संग्राह्य किंवा संस्मरणीय असतोच असेंहि नाहीं. प्रत्येक पिढीची अभिरुचि व स्मरणशक्ति या दोन चाळणीच होत. या जोडचाळणींतून प्रत्येक पिढींत कांहीं कांहीं लेख सरस्वतीच्या गंगाजळींत पडतात व हे सर्व गाळीव लेख मिळून जो संग्रह होतो त्याचेंच नांव वाङ्मय. अखिल पुस्तकसंग्रह हा जसा वाङ्मय होऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें एखादद्दुसरा शब्द अत्यंत सुंदर असला तरी त्याला वाङ्मय मानतां येत नाहीं. पण असे जितके अधिक शब्द एकत्र सूत्रबद्ध होतील, तितकी त्यांची किंमत श्रेढीनें वाढत जाईल. बावनकशी सोनें झालें म्हणून एका कणाची किंमत एका चिपेच्या किंवा लगडीच्या किंमतीबरोबर होऊं शकत नाहीं. तेजाच्या दृष्टीनें दोन मोत्यांची बरोबरी झाली तरी त्यांतल्या त्यांत जें मोती वजनानें अधिक चव भरेल तें किंमतीलाहि अधिक भरणार. कोहिनूरच्या तोंडांत मारील अशा तेजाची एखादी हिरकणी असूं शकेल. पण तुझें वजन किती भरेल व कोहिनूरचें किती असें विचारल्यास हिरकणीच्या गालावर लाजेची गुलाबी चमकलीच पाहिजे. शुक्राच्या चांदणीचें आपण कौतुक करितों, त्या मानानें सूर्यचंद्राचेंहि करीत नाहीं. पण एकादा पाणीदार लहान मुलगा पाहिला म्हणजे त्याचें आपण कौतुक करितों त्यांतलाच हा प्रकार आहे. शुक्राची टिकली व हाताच्या तळव्याएवढा तळपणारा पौर्णिमेचा चंद्र हे दोन डोळ्यापुढें आणून त्यांची तुलना केल्यास चंद्रालाच कोणीहि अधिक किंमत देईल. तुटक सुभाषितें वाङ्मयाच्या जातीचीं खरीं, पण समग्र ग्रंथ किंवा काव्य किंवा महाकाव्य यांच्या मानानें त्यांची किंमत क्षुद्रच ठरणार !

वाङ्मय या नांवाला पात्र होणारा शब्दसमूह शरीरानें भव्य नसला तरी निदान भरदार तरी असला पाहिजे. त्याला एखाद्या ग्रंथाचें स्वरूप नसलें तरी त्यांत कांहीं तरी विषय प्रतिपाद्य असला पाहिजे. यालाहि अपवाद असूं शकतो. उदाहरणार्थ, Autocrat of the Breakfast Table या Oliver Wendell Holmes च्या ग्रंथांत किंवा माधवराव मोडकांच्या ' खडे तात्विक बोल ' या ग्रंथांत एकच विषय प्रति-

पाद्य नसून अनेक फुटकळ विषयांचें तुटक प्रतिपादन आहे. पण ग्रंथ-कराची तात्त्विक विचारसरणी हें त्या सर्वांतून गोवलेलें एकच सूत्र असून भाषापद्धतीनेंहि त्यांत एकीकरण साधलें आहे.

वाङ्मय हें शब्द व अर्थ मिळून होतें, यामुळें तें साभिप्राय, गुण-मंडित व दोषरहित असावें लागतें. काव्य व वाङ्मय हे क्षणभर समानार्थक मानिले तर शब्द व अर्थ यांच्या गुणदोषांविषयीं मम्मटप्रभृति साहित्य-शास्त्रकारांनीं जी चर्चा केली आहे ती सर्व वाङ्मयाला ग्राह्य धरण्यास हरकत नाहीं. पण शब्द व अर्थ हे स्वत: सगुण व दोषरहित असले तरी त्यांच्या संबंधांत युक्तायुक्तता म्हणून पाहण्याची एक वेगळी बाब असते. त्याला औचित्य हें नांव आहे. 'औचित्यविचारचर्चा' नामक आपल्या अवघ्या एकोणचाळीस कारिकांच्या सूत्रग्रंथांत क्षेमेंद्रानें या औचित्याचा पूर्ण विचार केला आहे. औचित्य नसेल तर अलंकार व गुण हे केवळ निरर्थक गुण ठरतात. पण औचित्य हेंच काव्याचें जीवित किंवा आत्मा होय, असें क्षेमेंद्राचें म्हणणें आहे.

त्याच्या मतें काव्यांत किंवा वाङ्मयांत औचित्य हें निरनिराळ्या पंचवीस तीस बाबतींत सांभाळावें लागतें. पद, वाक्य, प्रबंध, अर्थ, गुण, अलंकार, रस, क्रिया, कारक, लिंग, वचन, विशेषण, उपसर्ग, निपात, काल, देश, कुल, व्रत, तत्त्व, सत्त्व, अभिप्राय, स्वभाव, सारसंग्रह, प्रतिभा, अवस्था, विचार, न्याय आणि आशीर्वाद. इतक्या बाबींत औचित्य तावून सुलाखून घेतलें पाहिजे. ही परीक्षा फारच कडक असल्यामुळें तींत कोणाहि कवीला किंवा वाङ्मय–लेखकाला उत्तीर्ण होणें बहुधा कठीण, व यापैकीं एकाना एका गोष्टीविषयीं ज्यांत प्रमाद घडला नाहीं असें वाङ्मय मिळणें बहुधा अशक्य. तथापि वरील औचित्यप्रपंच सांगण्याचें कारण इतकेंच कीं, आपल्या इकडील साहित्याचार्यांनीं वाङ्मयाच्या स्वरूपांत किती सूक्ष्म-पणें लक्ष घातलें आहे हें कळावें. वाङ्मयाला रस व अलंकार यांचा काय उपयोग आहे याची कल्पना पुढें सांगणारच आहें. पण हे दोनहि वाङ्मयास अवश्य आहेत एवढेंच येथें सांगून पुढें जातों.

यानंतर विचारांत घेण्याचा मुद्दा हा कीं, वाङ्मयाचा हेतु काय असावा ? कोणत्या हेतूनें लिहिलें गेलेलें वाङ्मय तें खरें वाङ्मय ? या बाबतींत थोडा मतभेद होऊं शकतो. कित्येकांची मजल मनोरंजनापलीकडे जात नाहीं,

तर कित्येक नैतिक शिक्षण हाच वाङ्मयाचा हेतु असा आग्रह धरून बसतात. जातां जातां केवळ शाब्दिक कोट्या करणारे किंवा विनोदाकरितां विनोद लिहिणारे किंवा पांडित्यप्रदर्शनाकरितां कविता वगैरे करणारे लोक कृतीनें पहिल्या हेतूचें समर्थन करतात. उलट जॉन मोर्ले यांनीं वाङ्मयाची व्याख्या केली आहे तींत त्यांनीं नैतिक सत्यही वाङ्मयाचा आत्मा मानलेला असून लिहिणें चित्ताकर्षक असावें ही एक अट पण ती गौण बाब म्हणून दिली आहे. पण या व्याख्येनें वाङ्मयाचा फारच संकोच होतो. ज्याअर्थीं वाङ्मय हें मनुष्यांच्या सद्भावनांनाच अलंकारिक स्वरूप देण्यानें निर्माण होतें, त्याअर्थीं नीतिबोध हा वाङ्मयाचा अप्रत्यक्ष परिणाम होऊं शकेल. परंतु जें नीतिबोध करण्याच्या प्रत्यक्ष हेतूनें लिहिलें नाहीं, तें वाङ्मयच नव्हे असा जर आग्रह कोणी धरला, तर अनवस्थाप्रसंग होईल असें वाटतें.

Great art ignores the frailties of men, while mediocre art focuses its attention upon them. A great Italian critic gave this famous advice to a young poet, anxious to know how he could best serve the higher morals in poetry, "Don't think about morals, that is the best way of serving them in art," Creative Criticism by Spingaon. P. 83,

शेक्सपीयर किंवा कालिदास यांचा आपलें प्रत्येक नाटक लिहिण्यांत नीतिबोध करण्याचा हेतु होता कीं, प्रतिभेचा उच्च दर्जाचा खेळ खेळण्याचा हेतु होता ? शाकुंतल नाटक हें नीतिबोधाच्या दृष्टीनेंच पाहिलें तर कालिदासानें शाकुंतल प्रौढ विवाहाचें खंडन करण्याकरितां लिहिलें कां मंडन करण्याकरितां लिहिलें म्हणावें !उत्तर रामचरित्र लिहिण्याचा हेतु तेजस्वी सीतेची स्तुति करण्याचा, कां आत्मविश्वासशून्य रामचंद्राची निंदा करण्याचा मानावा ? उत्कृष्ट वाङ्मयात्मक शेंकडों ग्रंथांसंबंधानें असेच प्रश्न विचारता येतील, व एकावरहि एकमत होणार नाहीं. कलाविलासाच्या मागें हेतुसंशोधनाचा गुप्त पोलीस लावून दिला, तर अनर्थकारक परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहींत. वाङ्मयाला नेतिक प्रबंध म्हणणें आणि साखरभाताला नुसत्या साखरेचा भात म्हणणें हीं दोनहि सारख्याच समंजसपणाचीं होत. शिल्पशास्त्रांत कलेच्या दृष्टीनें निरनिराळे आकार बनविणें

यांत प्रतिभाकौशल्य दिसून येतें. पण देवळाचें उंच शिखरच सुंदर कां तर तें आकाशांत ईश्वर आहे असें उंच बोट करून दाखवितें म्हणून, अथवा तीन तीन कमानींची जोडीच कां शोभते तर तिजवरून त्रिमूर्ति ब्रह्माविष्णुमहेश्वराची आठवण होते म्हणून असें म्हणणें बरोबर होईल काय? ताजमहालाच्या पांढऱ्या शुभ्र दगडांत जी रंगीबेरंगी कुसर बसविली आहे तिचा नैतिक हेतु शोधून काढणारानें ताजमहाल पाहण्यास जाण्याचे श्रम न घेतलेलेच बरे. चित्रकार पौराणिक किंवा ऐतिहासिक चित्रें रंगवितो तेव्हां त्याचा हेतु कलेच्या दृष्टीनें सुंदर चित्रें रंगविण्याचा असतो कीं नीतिबोध करावयाचा असतो? पोहावयास पडणारा मनुष्य जलक्रीडा करतो ती स्नानाच्या हेतूनें नव्हे. शिकारी क्षत्रिय अरण्यांत मृगयाविलास करितो तो एक दिवस चांगलें मांस खावयास मिळावें म्हणून करीत नाहीं! गवई दीपराग आळवितो तो अर्थशास्त्रदृष्ट्या मशालजीचा खर्च वांचविण्याकरितां नव्हे. तात्पर्य, 'अधिकस्याधिकं फलं' या न्यायानें, कलेच्या दृष्टीनें वाङ्मय सुंदर असून त्यांतूनच नीतिबोध निघण्यासारखा असल्यास दुधांत साखर पडेल; पण ज्याचा मूळ हेतु नीतिबोध नाहीं तें वाङ्मयच नव्हे हें म्हणणें यथार्थ नाहीं. अशीं कांहीं स्थलें असलींच पाहिजेत कीं, त्या पलीकडे जाऊन हेतूची पृच्छा करितांच येत नाहीं. हा रस्ता कोठें जातो तर अमुक गांवाला असें सांगतां येतें; पण थेट गांवाशीं गेल्यावर हा गांव कोठें जातो असें विचारणाराला काय सांगावें? अध्यात्मज्ञानाचा किंवा ईश्वरभजनाचा हेतु काय तर मोक्ष मिळविणें असें म्हणतां येईल. पण मोक्षाचा हेतु काय असें विचारल्यावर त्याला काय सांगावें! उलट वाङ्मय-कला ही देखील अशी गोष्ट आहे कीं, प्राय: तिचा हेतु व तिचें फल हीं एकच असतात, दोन नसतात.

वाङ्मयालाही सत्याची चाड आहे; पण कलाविलासाच्या द्वारानें जें सत्य प्रतीत होण्यास कबूल होईल त्या सत्याचीच. अडेल तट्टू सत्याकरितां वाङ्मय थांबून रहाणार नाहीं, तर स्वतःचें सत्य निर्माण करून कार्यभाग करून घेईल. यजमान विद्वान् असला तरी रीतीप्रमाणें यथासांग धर्मविधि करण्यास तो प्राय: उपाध्यायाला बोलावून त्याला नमस्कार करील. पण उपाध्याय जर लहरी भेटला, तर सुशिक्षित यजमान स्वतःच्या हातांत पोथी घेऊन ते धर्मविधि स्वतःच यथासांग करूं शकतो! वाङ्मयकलेच्या मद-

तीचा धिक्कार करून सत्य हें जर स्वतःच कारभार करूं म्हणेल तर तें निभणार नाहीं. शास्त्रज्ञान नुसतें समजावून द्यावयाला अलंकारादिकांची गरज नसते. पण नुसतें समजावून देणें वेगळें व मनावर बिंबविणें वेगळें. तें मनावर बिंबण्यास नुसत्या बुद्धींत प्रवेश करून चालत नाहीं, तर कल्पना-शक्तीचीहि मदत घ्यावी लागते. वाङ्मयाचा जन्म भौतिक शास्त्राच्या आधीं झाला असून सर्व शास्त्रांना पुरून अखेरहि उरणारें तेंच आहे. शास्त्राचें वाङ्मयाच्या मदतीशिवाय चालणार नाहीं. वाङ्मयाचें मात्र शास्त्राच्या मद-तीशिवाय निभूं शकतें. ज्या वेळीं भौतिक शास्त्र जन्माला आलें नव्हतें त्या वेळींहि कवि काव्यें लिहीत होते. बरें, पुढें शास्त्रें जन्माला आलीं म्हणून काव्य कांहीं थांबलें नाहीं. उलट शास्त्रांची मदत घेऊन काव्य वाढीसच लागलें. कित्येक लोकांची अशी समजूत आहे कीं, भौतिक ज्ञानाची वाढ ही काव्यकल्पनेला विघातक होते. मेकॉले यानें Poetry declines as civilisation advances हा सिद्धांत ठोकून दिला आहे, व विष्णुशास्त्री चिपळुणकरांनींहि त्याचा अनुवाद केलेला आहे. माझ्या अल्पमतीला असें वाटतें कीं हा सिद्धांत खरा नाहीं. अज्ञान आणि प्रतिभा ही समानार्थक होते, ही समजूतच बहुधा या सिद्धांताच्या मुळाशीं असावी; पण ती खरी नाहीं. उदाहरणार्थ, मनुष्यजातीच्या अज्ञान स्थितींत त्याला पंचमहाभूतें हीं जिवंत भूतें किंवा राक्षस अशीं वाटत असल्यामुळें त्यांची पूजा—अर्चा व त्यांना नवस तो करी; पण त्यांना उद्देशून तो ज्या प्रार्थना करी त्या हल्लीं आपणांस काव्यमय वाटत असल्या तरी त्या तेव्हां खऱ्याखुऱ्याच सरळ मनाच्या प्रार्थना होत्या. त्यांत लाक्षणिक किंवा रूपकगर्भ असें कांहींच नव्हतें. पुढें भौतिक ज्ञानाची प्रगति होऊन या पंचमहाभूतांविषयींची कल्पना बदलली, व त्यांत देवतांश किंवा मनुष्यांश नाहीं असें त्याच्या प्रतीतीस आलें, पण त्यामुळें प्रतिभेची हानि झाली नाहीं. जुन्या पांचव्या मराठी पुस्तकांत तीन राक्षसांच्या गोष्टींच्या रूपानें ज्यानें सुंदर वाङ्मय लिहिलें, त्याला पाणी, वारा व वाफ यांचें यथार्थ ज्ञान नव्हतें असें म्हणतां येणार नाहीं. पण त्या ज्ञानानें त्याच्या प्रतिभेचा बिघाड न होतां उलट त्या ज्ञानाचा फायदा घेऊन त्यानें एक नवीन कल्पनालंकार बनविला. जुन्या कवींना जें भौतिक ज्ञान होतें त्याचा उपयोग त्यांना आपली प्रतिभा चालविण्यांत

जसा करतां येत होता तसाच आजच्या कवींनाहि वाढलेल्या ज्ञानाचा उपयोग करून घेतां येतो. ही पात्रता पूर्वी अधिक व हल्लीं कमी असण्याचें कांहीं कारण नाहीं. टेनिसननें आपल्या प्रतिभापाशांत दैविक कल्पना जशा ओढल्या तशा भौतिक शास्त्राच्या अगदीं ताज्या कल्पनाहि ओढल्या आहेत. अरेबियन नाइट्सवर लिहितांना कल्पनेनें जुन्या बगदादी बादशहांचा दरबारी थाट जसा त्यानें वर्णन केला, तसाच Princess काव्याच्या आरंभीं एका शास्त्रीय प्रदर्शनाचें वर्णनहि त्यानें काव्यमय केलें आहे. तसेंच भूगर्भशास्त्रानें सुचविलेलीं उदात्त प्रमेयें या सर्वांचा उपयोग त्यानें वाङ्मयरीत्या केला आहे. आज कालिदास किंवा ज्ञानेश्वर यांच्या प्रतिभेचा मनुष्य असूं शकणार नाहीं असें म्हणून हा वाद मुळांतच कोणी खुंटविला तर गोष्ट वेगळी; पण ते हल्लींच्या युगांत असते तर त्यांच्याहि काव्यांत आधुनिक शास्त्रज्ञानाचा उपयोग, उपमा, दृष्टांत, उत्प्रेक्षा, रूपक वगैरेकरतां केला गेला असता हें सांगावयास कशाला पाहिजे ? इंद्रियांपेक्षां मन हें केव्हांहि मोठें असणार म्हणून वाङ्मय हें भौतिक शास्त्रापेक्षांहि श्रेष्ठ ठरेल. एका हिंदी दोहऱ्यांत मनाची श्रेष्ठता खालीलप्रमाणें वर्णिली आहे.

पृथ्वी काहे की बडी । वो तो शेष माथेपर खडी ॥
शेष काहे कां बडा । वो तो शंकर हातका कला ॥

वगैरे. याचा अर्थ असा कीं पृथ्वी सर्वांत मोठी म्हणतात, पण तिला शेषाचा आधार म्हणून शेष मोठा. शेष मोठा म्हणावा, तर श्रीशंकरानें त्याचें वळें करून आपल्या हातांत घातला. शंकर तरी कसला मोठा, कारण तो बसतो कैलासाच्या माथ्यावर; पण कैलास हा कांहीं मोठा नाहीं, कारण रावणानें सगळा हिमालय तीन वेळां बाहुबलानें गदगदां हलविला. पण कायहो, याच रावणाला वालीनें एक वेळ खाकेंत धरून चिरडला म्हणतात ! तथापि वाली श्रेष्ठ असें कांहीं ठरत नाहीं; कारण श्रीरामचंद्रानें एका बाणानें त्याचा वध केला. तेव्हां राम सर्वांत श्रेष्ठ असें ठरतें. पण कवि लगेच म्हणतो, अहो, तेंहि खोटें; कारण एवढा मोठा पराक्रमी रामचंद्र भक्तजनांच्या अणुमात्र मनांत सबंध सांठविला जातोना ? मनाचा मोठेपणा ठरविण्याची ही प्रमाणमालिका विचित्र दिसली तरी त्यांतील प्रमेय मात्र अगदीं सत्य आहे. कारण असें कोणतेंहि ज्ञान जगांत नाहीं कीं ज्याचें

मनाला आकलन होत नाहीं, व तें आपल्या प्रतिभेच्या कुंचल्यानें त्याला हवें तसें रंगवूं शकत नाहीं, किंवा त्याला कल्पनेचीं हवीं तशीं वस्त्रें नेसवूं शकत नाहीं.

असो. मन कोणत्याहि विषयाला वाङ्मयाचं रूप देतें तें मुख्यत: प्रतिभेच्या म्हणजे कल्पनेच्या मदतीनें. कल्पनाशक्ति ही मुख्यतः रस व अलंकार यांच्या द्वारांनीं प्रगट होते; बहुधा वाङ्मय या नांवास शोभणारा असा कोणताहि शब्दसमूह सांपडणार नाहीं कीं, ज्यांत रस किंवा अलंकार यांचा विलास नाहीं. पण याहूनहि पुढचा असा एक प्रश्न सुचतो व त्याचें उत्तर देण्याचा प्रयत्न करून मी हा निबंध पुरा करितों.

प्रश्न किंचित् तात्त्विक स्वरूपाचा आहे. तो असा कीं, वाङ्मय हें उचित रसालंकारात्मक मानलें तरी तें वाचल्यापासून मनाला आनंद होतो तो कां व कसा होतो ? त्याला माझें उत्तर खालीलप्रमाणें आहे. जीवात्मा व परमात्मा हीं अंतिम स्थितींत एक असोत वा दोन असोत, आत्म्याला सर्व जगाशीं एकरूप व्हावें, एकाच क्षणीं सर्व जगाचें आकलन करावें अशी महत्त्वाकांक्षा असते. यामुळें ती जितक्या प्रमाणानें सफल होईल तितक्या प्रमाणानें त्याचा आनंदहि वाढतो. इंद्रियांचें बंधन नसतें तर जगत्स्वरूप होण्याची आत्म्याची आकांक्षा अर्थात् सफल होऊं शकती. पण हीं बंधनें असतांहि तो अतींद्रिय अशा प्रतिभामायेच्या साहाय्यानें जगभर पसरण्याचा प्रयत्न करितो. आपली तर भूमिका सोडावयाची नाहीं, पण बसल्या बैठकींत इतर भूमिकांचाहि अनुभवानंद सेवावयाचा, ही गोष्ट प्रतिभाच घडवूं शकते. आपण नवरसांचेंच उदाहरण घेऊं. रसपूर्ण असें काव्य वाचतांना जो आनंद होतो तो आत्मापम्य बुद्धीमुळेंच. कोणत्याहि रसाचा स्थायिभाव क्षणभर दुसऱ्याचा घेऊन आपलासा केल्याशिवाय रसप्रतीति होत नाहीं. प्रत्यक्ष आपली मुलगी सासरीं चालली असतां डोळ्यांतून पाणी गाळीत जे शब्द आपण बोलतों तें आपणाला काव्य नव्हे. तो आत्मभूमिकेवरचा एकेरी अनुभव. पण तेंच शाकुंतलाच्या चौथ्या अंकांतील कण्वावरचा कन्याविरहप्रसंग वाचीत असतां डोळ्यांतून पाणी गाळीत जे शब्द आपण वाचतों तें मात्र आपणाला काव्य किंवा वाङ्मयकारण. येथें एकाऐवजीं दोन भूमिका होतात. वाचक आपली भूमिका न सोडतां मनाप्रमाणें दुसऱ्या भूमिकेवर संक्रमण करितो व प्रतिभेनें अनुभव घेतो, म्हणून तें दुःख

नसून रसास्वादाचा आनंदच होय. यापुढें जाऊन अशी कल्पना केली कीं, दुसऱ्या एकाच भूमिकेचा अनुभव प्रतीत करण्याऐवजीं एकदम दोन किंवा तीन भूमिकांचा अनुभव जर प्रतीत करतां आला, तर तो आनंद द्विगुणित किंवा त्रिगुणित झाला पाहिजे. उचित रससंकरानें ही गोष्ट प्रत्ययासहि येते. उदाहरणार्थ वीर व शृंगार यांचा संकर उचित मानला जातो. रघुवंशाच्या अकराव्या सर्गांत ताडकावधाचा खालील श्लोक आहे—

रामन्मथशरेण ताडिता । दुःसहेन हृदये निशाचरी ॥
गंधवद्रुधिरचंदनोक्षिता । जीवितेशवसतिं जगाम सा ॥

यांत रामाचा ताडकावधाचा वीररसोत्पादक भीषण प्रसंग व मदनविव्हल अभिसारिकेचें अभिसारवेशानें दयितगृहीं गमन हे दोन अनुभव एकाच श्लिष्ट शब्दप्रबंधाच्या साह्यानें आणून दिले आहेत. सकृद्दर्शनीं असें वाटतें कीं, हा कल्पनांचा गोंधळ होतो, पण तें खरें नाहीं. किंबहुना तीन–तीन चार–चार अर्थ असणारे श्लेषात्मक शब्द सुसंगत जळवितां येतील तर तीन–तीन चार–चार काल्पनिक प्रसंगांचा अनुभव एकदम घेतां येणें शक्य आहे. मुक्तेश्वराच्या भारतीय रणवर्णनांतील

पांडवप्रताप पुरुष तरणा । नववधू कौरवसेना ॥
शृंगारिली परि संघट्टना । युद्ध सुरता न थारवे ॥
..................................
ते गदा घेऊनि मांडीवरी । रणमंचकीं निद्रा करी ॥
प्राणपारिखें दवडुनि दुरी । मग एकांतीं पहुडिलों ॥

या वर्णनांत अश्लीलपणाचा दोष आहे; व रघुवंशांतील

सदयं बुभुजे महाभुजः

वगैरे जें अजराजाच्या सुराज्यव्यवस्थेचें वर्णन शृंगारिक भाषेंत केलें आहे तेंहि थोडें सदोषच आहे, तथापि औचित्यदृष्टि क्षणभर बाजूला ठेविल्यास अनेक भूमिकांचा अनुभव मनाला एकसमयावच्छेदेंकरून कसा घेतां येतो हें त्यावरून दिसून येईल.

अलंकाराची गोष्ट घेतली तरी हाच सिद्धांत सिध्द होतो. बहुतेक अलंकार हे उपमा व रूपक यांच्या निरनिराळ्या परीच आहेत. उपमा व रूपक या दोहोंत पूर्ण किंवा ईषत् तादात्म्य असा फरक असला तरी एक-

रूपताप्रतिपादन हाच दोहोंचा मुख्य उपयोग आहे. या तादात्म्यानें तरी आनंद कां होतो असें विचारलें तर त्याचेंहि उत्तर रसाविषयीं दिलें तेंच होय. रस व अलंकार यांच्या स्वरूपांत वास्तविक इतकाच फरक कीं, रसाचे स्थायिभाव जीवसृष्टीच्या भावनांवर अधिष्ठित असतात व अलंकाराचे स्थायिभाव अचेतन सृष्टीवरहि अधिष्ठित होऊं शकतात. स्त्रीला लतेची उपमा दिली असतां आनंद होण्याचें कारण हेंच कीं, समगुण अशा दोन पदार्थांचा अनुभव मनाला एकदम घेतां येतो, व हीच गोष्ट समगुण अशा जितक्या अधिक पदार्थांविषयीं एकदम घडेल तितका आनंद वाढेल. या आनंदानें एक प्रकारची तल्लीनता येते, व तो आनंद फारच उत्कट झाला तर त्यापासून समाधान लाभं शकेल. या दृष्टीनें पाहतां ' खरी सविकल्प समाधि उत्पन्न करूं शकतें तें वाङ्मय ' अशी नवीन व्याख्या मी बसविली आहे. वाङ्मयाची कोणतीच व्याख्या समर्पक होऊं शकत नाहीं हें मी जाणतों; तरी ही माझी व्याख्या आपल्या विचाराकरितां मी सादर करीत आहें. लक्षांत घेण्याचा मुद्दा हा कीं, नेहमीं समाधि असा शब्द आपण उच्चारितों, तेव्हां ती योगशास्त्रांतील ' निर्विकल्प ' समाधि हाच अर्थ मनांत येतो. पण मी म्हणतों ही समाधि 'सविकल्प' म्हणून या दुसऱ्या समाधीच्या अगदीं उलट आहे. निर्विकल्प समाधींत बाहेरच्या जगाची किंबहुना आपल्या देहाचीहि कांहीं एक जाणीव शिल्लक उरत नाहीं व उरतां कामाहि नये; पण वाङ्मयसेवनानें निर्माण होणाऱ्या समाधींत स्वतःच्या मनोभूमिकेची जाणीव तर उरतेच, पण वर दर्शविलेल्या रीतीनें इतर भूमिकाहि तींत समाविष्ट होऊं शकतात; एवढेंच नव्हे तर तेंच वाङ्मय अधिक उत्कृष्ट कीं ज्याच्या सेवनानें अधिकांत अधिक कल्पना मनांत एकदम उठतील व अधिकांत अधिक भूमिकांचा मनाला अनुभव घडेल. या दृष्टीनें पाहतां सुंदर कल्पनाकल्लोळही वाङ्मयप्रेमी मनुष्याला इष्टापत्तिच होय. निवांत पाण्यांत खडा टाकला असतां एकाच मध्यबिंदूपासून एकामागून एक व एकाहून एक मोठीं अशीं तरंगवर्तुलें निघतात हें आपण पाहतों. उत्कृष्ट प्रतिभेच्या धक्क्यानेंहि मनःसरोवरांत अशाच प्रकारचीं तरंगवर्तुलें उठतात; पण तीं इतकीं जलद उठतात कीं, त्यांतील अंतर मनश्चक्षूंना दिसूं शकत नाहीं व त्या वर्तुलांच्या कक्षा विश्वव्यापीहि असतात. साहित्यदर्पणकारांनीं रसाला ' ब्रह्मास्वादसहोदर ' असें विशेषण दिलें आहे तें यथार्थच आहे.

असो. माझें हें वाङ्मयपुराण अदमासाबाहेर लांबलें आहे; पण आपण सर्व वाङ्मयप्रेमी असल्यामुळें त्याचा कंटाळा मानला नसेल. स्वतः वाङ्मयाप्रमाणेंच वाङ्मयवर्णनाचीहि गोडी अवीट आहे. वाङ्मय-देवतेचा भक्तसांप्रदाय सर्वकाळ सर्वदेशांच्या समाजांतून पसरलेला असतो. देशाभिमानाला येथें नमावें लागतें. येथें जातगोत कांहीं नाहीं. जात असली तर ती वाङ्मयप्रेमी लोकांची मिळून बनते. वाङ्मयग्रंथकार हे तर स्वतः स्वयंभूच असतात. एका ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं,

Literary men have neither ancestors nor posterity, they alone compose their whole race.

वाङ्मयग्रंथांना कुलपरंपरा किंवा वतन नसलें तरी निःस्वार्थ बुद्धीनें परोपकारच त्यांच्या हातून घडत असतो. त्यांनीं मुद्दाम वाङ्मयाची उपासना नित्य चालू ठेविली पाहिजे. साहित्यसंमेलन हें या उपासनेंतील एक वार्षिक वृत्त आहे. गेल्या सोळा वर्षांत निदान दहा संमेलनें तरी आपण भरविलीं; व यापुढें या व्रतानुष्ठानांत एक वेळहि खंड न पडूं देण्याचा आपला निश्चय असल्यास तो फारसा धाडसी नसल्यानें तडीस जाणें कठीण नाहीं. बरें, तो तसा असला तरी समर्थांनीं श्रीशारदेचें वर्णन ' जे धारिष्टाची कृतबुद्धी' असें केलें आहे, व ' कर्तृत्व जितुकें झालें तें शारदा-गुणें' असें आश्वासन दिलें आहे म्हणून त्या शारदेची प्रार्थना केल्यास सर्व मनोरथ सिद्धीस जातील असें विनवून पुरें करितों.

---

## २ मध्यभारतीय कवि संमेलन

### ( उज्जयिनी, ता. २५ डिसेंबर १९३१ )

आज या उज्जयिनी नगरींत मध्यभारतीय कविसंमेलनाचा हा दुसरा समारंभ आपण करीत आहां. सरस्वतीच्या उपासनेप्रीत्यर्थ मुद्दाम योजून घडवून आणलेला असा हा एक नैमित्तिक प्रसंग होय. त्यांतलेंच एक कार्य करण्याकरितां आपण मला बोलावलें. त्याप्रमाणें मी आलों आहें. तेव्हां आतां आपण व मी सर्व मिळून हा समारंभ आनंदानें साजरा करूं या.

या प्रसंगीं अध्यक्षस्थानीं बसण्याचा बहुमान आपण मला दिला, पण त्याबरोबरच मजवर एक मोठा उपकारहि केला आहे. आणि त्या मानांत गर्क होऊन राहण्यापेक्षां त्या उपकाराची जाणीवच माझ्या मनांत याक्षणीं अधिक प्रभावी होऊन राहिली आहे. तो उपकार हा कीं, ही सुप्रसिद्ध नगरी पाहण्याची इच्छा पुष्कळ दिवस मनांत असतांहि दुर्दैवानें आजवर जी कृतीनें सफळ झाली नव्हती, ती आपल्या या निमंत्रणानें सहजासहजीं सफळ झाली. पण या नगरींत पाय ठेवल्यावर विद्वत्व किंवा कवित्व याविषयीं कोणाचा अहंकार समूळ नष्ट होणार नाहीं ? व उलट त्याची स्वतःविषयींची क्षुद्र भावनाच प्रबळ ठरणार नाहीं ? मीं स्वतःला विद्वान किंवा कवि समजत नसल्यानें, येथें आल्यामुळें नष्ट होण्याइतका अहंकार मजजवळ आधीं नव्हताच. आपलें निमंत्रण आल्यापासून, केवळ या नगरीविषयींच्या अनेक गोड कल्पना आठ आठवून घोळविण्यांतच, माझें मन आजवर गुंग झालें होतें. मला मिळालेल्या बहुमानाची आठवण होण्याला त्यांत अवसरच नव्हता. म्हणून आपण दिलेल्या अध्यक्षपदापेक्षां उज्जयिनी नगरी पहाण्याची संधि आपण दिली या उपकाराबद्दल मी आपले अधिक आभार मानतों.

कोणत्याहि वस्तूच्या कल्पनेपेक्षां तिचें प्रत्यक्ष दर्शन हें केव्हांहि कमी सरस ठरतें असें म्हणतात. माझ्याहि मतें हा सिद्धांत पुष्कळसा खरा आहे. पण आज या ठिकाणीं मला जुनी भोज-विक्रमादिकांची अवंती पहावयास सांपडेल ही खोटी आशा मनांत धरून मी आलोंच नाहीं. तर केवळ अवंतिविषयक माझ्या कल्पनांना आधारभूत अशा प्राचीन वास्तु-देवतेचें दर्शन घेण्याकरितांच मी आलों आहें. काळाचा अगाध महिमा व त्याची प्रचंड संहारशक्ति यांची यथार्थ जाणीव मला आहे. म्हणून वर सांगितलेला सिद्धांत (म्हणजे वस्तुकल्पना व वस्तुदर्शन यांच्यांतील फरकाविषयींचा सिद्धांत) मला बाधा करूं शकत नाहीं. उलट मीं काळाला हेंच उत्तर देईन कीं, " हे विध्वंस-प्रिय दैत्या, तूं जुनी उज्जयिनी आपल्या ' सर्वभक्षक ' उदरांत गडप केलीस, तरी तिच्या वैभवाची माझी स्मृति नष्ट करण्याला तूं समर्थ झाला नाहींस. म्हणून 'कालाय तस्मै नमः' असें करुण वाणीनें न म्हणतां, तुझ्या पंडुरोगी असदभिरुचीचा मी धिक्कार करितोंच ! पण तूं नष्ट केलेल्या उज्जयिनीच्या वैभव स्मरणानें

होणाऱ्या नित्य ताज्या व स्फुरणशील आनंदानें तुला हेंच सांगतों कीं, तुझा पराक्रम व्यर्थ आहे! त्या वैभवाच्या कल्पनारचित चित्राची एक-रेघहि तुला पुसून टाकतां येणार नाहीं, किंवा त्याच्या उज्ज्वल रंगाची एकहि छटा तुला फिकी पाडतां येणार नाहीं. कर्तुमकर्तुं समर्थ अशा तुझ्या दुष्टलीलाप्रियत्वाचें विडंबन करण्याला नश्वर समजल्या जाणाऱ्या मनुष्याचेंहि मन पूर्ण समर्थ आहे. तूं नष्ट केलेल्या उज्जयिनीला मी मनोमंदिरांत असें अढळ व अक्षय्य स्थान दिलें आहे कीं तें पाहून तुझेंहि गर्वहरणच व्हावें."

आणि खरोखरच उज्जयिनी नगराचें जुनें 'अवंति' हें नांव उच्चारतांच, अद्‌भुतरम्य अशा भावनांच्या गुंफेमध्यें किंवा भुलभुलाईमध्यें प्रवेश करणारें कोणाचेंहि मन तींतून बाहेर पडूं इच्छितच नाहीं. त्या गुंफेंतून वळणावळणांनीं हिंडून मनुष्य पुनः पूर्वपदावर आला तरी, त्याला त्याचा खेद न वाटतां, फिरून त्याच वळणांची दुसरी फेरी मारण्याचा मोह त्याला होतो. याचें कारण हेंच कीं या परिभ्रमणामध्यें त्याला जुन्या वैभवाचे अनेक उदात्त देखावे दिसतात. स्कंदपुराणांत या नगरीला 'प्रतिकल्पा' हें नांव दिलें तें सार्थ आहे. कारण ती प्रत्येक कल्पाच्या प्रारंभीं प्रादुर्भूत होते या अर्थानें काय; किंवा तिच्याविषयींच्या वैभवाची करावी ती प्रत्येक कल्पना खरी ठरते या अर्थानें काय, अवंती ही 'प्रति-कल्पाच' होय! याच नगरींत श्रीकृष्णानें शिष्याची विनयवृत्ति ठेवून सांदीपनीच्या गुरुगृहीं विद्या संपादन केली, व गुरुपत्नीला तिच्या मृतपुत्रांची भेट करून देण्याची अलौकिक गुरुदक्षिणा दिली! याच नगरींत प्रद्योत, शूद्रक, भर्तृहरि, विक्रमादित्य, भोज इत्यादि राजांनीं वैभवपूर्ण राज्यें उपभोगिलीं. यौगंधरायणासारखा महान कर्ता मुत्सद्दी येथेंच झाला. स्वप्नवासवदत्ता, प्रतिज्ञायौगंधरायण या भास कवीच्या नाटकांतील कथांचा संबंध अवंतीनगरीशींच जोडला जातो. वसंतसेनेसारखी निःस्वार्थी प्रेमळ गणिका, व चारुदत्तासारखा दानशूर व अभिजात संभावित प्रणयी ही जोडी याच नगरींत होऊन गेली! गायनवादनकलेंत निष्णात असे राजे म्हणजे उदयन व बाजबहादूर, आणि त्यांच्या गायन मोहित प्रियकरणी वासवदत्ता व रूपमती यांचा संबंध दुरून किंवा जवळून या नगरीशींच पोहोंचतो. प्राचीन कालिदासापासून आधुनिक वासुदेवशास्त्री खऱ्यांपर्यंत,

दोन हजार वर्षांतील कवींना या नगरीच्या वैभवसौन्दर्यानें जितकें मोहित केलें तितकें दुसऱ्या एखाद्या नगरानें क्वचितच केलें असेल. आधुनिक काळांत उंची प्रतीच्या व्यापारी वस्तूंची देवघेव व प्रसिद्धी परदेशापर्यंत याच नगरींतील शकवंशीय राजांच्या राज्यांत झाली. ज्योतिष्शास्त्राच्या संशोधनाचें एक मोठें केंद्र याच नगरींत प्राचीन काळापासून, हल्लींच्या ग्रीनविचप्रमाणें रेखांशांचें उगमस्थान भरतखंडभर मानलें जाण्याचा मान याच नगरीला मिळाला. आणि बुद्धानंतरच्या काळांत आद्य श्री. शंकराचार्यांनीं याच नगरींत पाशुपत मतसांप्रदायी योध्यांशीं वाद करून, सभायुद्धांत विजय मिळवून, वैदिकधर्म प्रस्थापनेचें एक कार्य केलें. अलीकडील इतिहासांत अवंतीचें म्हणजे उज्जयनीचें कोणतें स्थान होतें किंवा आहे या रुक्ष विषयांत मी शिरत नाहीं. तथापि मराठ्यांनीं स्वातंत्र्य मिळविल्यानंतर जो उत्तरेकडे राज्यविस्तार केला त्याला माळवाप्रांत व उज्जयिनी शहर यांचें बरेंच सहाय्य झालेलें आहे.

पण आज या नगरींत, कविसंमेलन भरत असतां, त्याच्या काव्योत्पादककीर्तीला जें महत्त्व येतें तें इतर कोणच्याहि दृष्टीनें येत नाहीं. भर्तृहरि, भोज, विक्रम हे सर्व राजे मोठे विद्वान व रसिक होऊन गेले यांत शंका नाहीं. त्यांच्या रसिकतेच्या कीर्तीनें त्यांच्या क्षात्रपराक्रमाच्या कीर्तीला फार मागें टाकलें आहे. विक्रम व भोज यांच्या दरबारांतील विद्वन्मंडळाच्या ज्या दंतकथा प्रचलित आहेत, त्यांतील एकशतांश खरा असेल तरी तो पुष्कळच आहे. तीच गोष्ट भोजराजानें कविवर्गाला दिलेल्या देणग्यांची व उदार आश्रयाची होय. बगदादचा बादशहा हरून–अल–रशीद याच्या रसिक कारस्थानांच्या कथांप्रमाणेंच, विक्रमराजाच्या गुणवर्णनपर कथाहि अत्यंत मनोरंजक वाटतात. आणि भोजराजाच्या वेळीं काव्यरचना इतकी सुलभ व समृद्ध झालेली दिसते कीं, त्या काळीं जो कविता न करील तो पापी असें म्हणतां येत असावें. घरचे यजमानभूत स्त्री–पुरुषच काय, पण तत्कालीन दासदासीहि शीघ्र कवित्व करीत ही अर्थात् अतिशयोक्ति होय. परंतु समस्यापूरण करून त्यांतल्यात्यांत चतुरपणाचीं पद्यें रचणें, या गोष्टीचा नाद हल्लींच्या ‘ क्रॉसवर्ड पझलस् ’ सोडविण्याच्या नादाइतका सर्व लहानथोरांत तेव्हां फैलावला होता असें वाटतें.

हें सर्व मुद्दाम सांगण्याचें कारण इतकेंच कीं आज येथील कविसंमे-

लनांत जमलेल्या कवि म्हणविणारांना अहंकाराची बाधा न व्हावी, व त्यांच्या मनांत विनयबुद्धीचा उदय व्हावा. निदान ती विनयबुद्धि मला तरी असें सांगते कीं, मी स्वत:ला कवि म्हणवितों असा लोकांचा गैरसमज न होऊं देण्याची खबरदारी मीं अवश्य घ्यावी. कविसंमेलनाचा अध्यक्ष म्हणजे, काव्यसिंहासनावर, क्षणभर कां होईना पण मान्यतापूर्वक बसविला जाणारा राजा. म्हणून त्या पदाला स्पर्श करतांना, विक्रमाच्या खांद्यावर बसणारा चाणाक्ष वेताळ ‘ संभाळ बरें ’ अशी इशारत देत आहे, असा भास मला होतो! किंवा असेंहि वाटतें कीं, राजा भोज हा विक्रमाच्या सिंहासनावर बसूं लागला असतां, सिंहासनाला शोभेसाठीं लावलेल्या बत्तीस पुतळ्या सजीव होऊन प्रत्येकीनें भोजाला हटकलें, “ विक्रमासारखे गुण तुझ्या अंगीं आहेत काय ? ” असा प्रश्न केला, व शेवटीं भोजाला स्वत:ची अपात्रता पटून त्यानें तें सिंहासन पूर्वीप्रमाणें जमिनींत गाडून टाकलें, त्यावर बसण्याचा हट्ट चालविला नाहीं. त्याचप्रमाणें प्रस्तुत प्रसंगीं मलाहि असा भास होतो कीं, काव्यसिंहासनाला ज्या बत्तीस पुतळ्या जोडलेल्या असतात, ते काव्याचे औचित्यादि बत्तीस गुणच होत. त्यांतली प्रत्येक पुतळी त्या एकेक गुणाचें नांव घेऊन ‘ अहो अध्यक्षमहाराज ! तुमच्या अंगीं कवीचा हा एक गुण आहे काय ? तो दुसरा गुण आहे काय ? तो तिसरा गुण आहे काय ? ’ असें मला विचारीत आहे. आणि प्रत्येकीला मी हेंच उत्तर देत आहें कीं, “ बाई, यांपैकीं कोणताच कविगुण मजमध्यें नाहीं. कविसंमेलनाच्या अध्यक्षपदाचा जुलूमच मजवर झाला आहे. म्हणजे एखाद्या राज्यांत प्रबळ दरबारी सरदार लोक आपल्या मनांतील विशिष्ट हेतु साधण्याकरितां वाटेल त्याला राज्यपदावर बसवितात, त्याप्रमाणें येथेंहि घडलें आहे. तेव्हां माझ्यामध्यें कोणते कविगुण आहेत हें तुम्ही मला कां विचारतां ? या पदावर माझी नेमणूक निवडणूक करणारांनाच तो प्रश्न तुम्ही केलेला बरा ! ” असें उत्तर या कविसिंहासनाच्या पुतळ्यांना मी देत आहें. खरोखर असाच भास याक्षणीं मला होतो. पण विक्रमसिंहासनाची ही बोधबीज गोष्ट मलाच काय तर खरोखर स्वत:ला कवि म्हणविणाऱ्या व लोकांकडून कवि म्हटल्या जाणाऱ्या बहुतेक कवींना लागू होण्यासारखी आहे. कारण खऱ्या कविसम्राटाचें सिंहासन जमिनींत पुरल्याप्रमाणें नेहमीं गुप्तच असतें. त्यावर बसण्याची कोणाहि कवीची महत्त्वाकांक्षा

सफल होऊं शकणार नाहीं व ती महत्त्वाकांक्षा धरणाराला स्वतःच्या पात्रतेविषयीं आधीं अशा बत्तीस सवालांचे जबाब द्यावे लागतील.

कविमंडळांतला एक साधा कवि म्हणून बसण्यालाहि माझी तितकीशी पात्रता नाहीं याची जाणीव आपणाला नसली तरी ती मला आहे. लहर आली म्हणून, किंवा वाङ्मयाच्या क्रीडांगणांतला एक करमणुकीचा खेळ म्हणून, मीं थोडीबहुत कविता केव्हां केव्हां लिहिली आहे. तसेंच माझ्या दोन तीन नाटकांकरितां, आणि गायनाचें मराठीकरण व्हावें म्हणून, कांहीं पदें मीं केलीं आहेत. पण जन्मभर माझा मुख्य व्यवसाय गद्य लेखनाचाच होऊन राहिला आहे; आणि कोणाहि लेखकानें लिहिलें त्यांत पुष्कळसें गद्य लिहिलें किंवा कविता लिहिली यावरूनच त्याला योग्य तें विशेषण लावलें पाहिजे.

समजा, एखाद्या मोठ्या व्यापाऱ्याच्या घरीं थोडाबहुत शेतमळाहि आहे; व तो वर्षांतून एखादे वेळीं सत्तेनें घरचा हुरडा खाण्याला किंवा गुऱ्हाळावर रस पिण्याला जात असतो. म्हणून तेवढयावरून त्याला शेतकरी किंवा बागाईतदार असें न म्हणतां व्यापारीच म्हटलें पाहिजे. उलट एखादा बागाईतदार किंवा शेतकरी घरच्या फळझाडांचीं फळें किंवा गुऱ्हाळावर काढलेला गूळ विकावयाला घेऊन बाजारांत जातो व त्याचा सौदा करितो, म्हणून कांहीं तेंवढयावरून त्याला व्यापारी म्हणतां येत नाहीं. माझीहि गोष्ट तशीच आहे.

गद्य व पद्य यांत भेद आहे व नाहीं या दोनहि गोष्टी खऱ्या आहेत. आणि त्या कशा हें दर्शविण्याकरितां मीं स्वतःच एका पद्यांत त्यांचें विवेचन केलें आहे तें देतों.

**गद्य व पद्य.**

एक अर्थ दोन ठायीं । गद्यपद्या भेद नाहीं ॥ १ ॥
गद्य शिव पद्य शक्ति । दोन मार्गें एकच भक्ति ॥ २ ॥
एका जनकजननीचीं । गद्यपद्य बाळें साचीं ॥ ३ ॥
परि करणी ईश्वर करी । भेद स्वभावा अंतरीं ॥ ४ ॥
मंद जड गद्य दादा । पद्य ताई चंचळ सदा ॥ ५ ॥
गद्य स्तिमित दूर बसे । पद्य गळां पडुनी हंसे ॥ ६ ॥

गद्य मानी, मनीं कुढे । पद्य निर्भीड ओरडे ॥ ७ ॥
गद्य धरी दुरुनी आस । पद्य हातें घेई घास ॥ ८ ॥
गद्य पल्लव विस्तृत । पद्य पुष्प सुगंधित ॥ ९ ॥
गद्य मेघांचें डंबर । पद्य वीज झळके वर ॥ १० ॥
गद्य पाथरवटी घडण । पद्य रंगीत रोगण ॥ ११ ॥
गद्य आखिव रेखिव भाषा । पद्य मुक्तहस्त रेषा ॥ १२ ॥
गद्य तर्कग्रस्त भाष्य । पद्य स्फूर्तीचें हविष्य ॥ १३ ॥
गद्य जैवीं दगडी शिळा । पद्य जलवीचि–लीला ॥ १४ ॥
गद्य उद्योगाचा सांठा । पद्य दैवाचा झपाटा ॥ १५ ॥
गद्य विद्वत्तेचें सोंग । पद्य तुकयाचा अभंग ॥ १६ ॥

दोन जुळ्या भावंडांतील भेद दाखविण्यासारखेंच गद्य व पद्य यांतील भेद दाखविणें सोपें किंवा अवघड म्हणाल तसें आहे. गद्य व पद्य या जुळ्या भावंडांचें शब्दरूपी गोत्र तेंच. एकाच वाङ्मयरूपी कुळांत तीं जन्मलेलीं असतात. एकाच रसरूप आईबापांचे रक्तपिंड त्यांच्या अंगांत असतात. पण त्यांचे चेहरे, विशेषतः त्यांचे स्वभाव व गुण, हे सारखेच असतात असें नाहीं. आणि त्यांचे पेहराव व नांवें तर वेगळीं असावींच लागतात. तसेंच गद्य व पद्य यांचेंहि आहे. या जुळ्या भावंडांपैकीं गद्य हा मुलगा आहे व पद्य ही मुलगी आहे असें मी वरील वर्णनांत म्हटलेंच आहे. आणि तें बहुधा बरोबर ठरेल असें मला वाटतें. पण कित्येक लेखक गद्यच इतकें सरस लिहितात, किंवा कित्येक लेखक पद्यच इतक नीरस लिहितात कीं, संसारांत अनेक वेळां अनुभवाला येतें त्याप्रमाणें दादाला अक्का व अक्काला दादा म्हटलें तर तें शोभेलहि. बाणभट्टाची कादंबरी गद्यरूप असली तरी तें काव्यच होय, व राजतरंगिणी पद्यमय असली तरी तें गद्यच होय. तसेंच इंग्रजींतहि कार्लाइल व इमरसन यांचे लेख गद्यरूप असले तरी ते काव्यच होय, व वर्ड्‌सवर्थ याची कविता पद्यरूप असली तरी तें गद्यच होय. तथापि शब्दसंकेत हा दुस्तर आहे व तो पाळलाच पाहिजे. म्हणून गद्यलेखक तो गद्यलेखक, व पद्यलेखक तो कवि असा उल्लेख व असें वर्गीकरण करावेंच लागतें.

आतां बाणभट्ट, कार्लाइल व इमरसन यांचीं उदाहरणें दिलीं तीं देऊन, मीं स्वतःला त्यांच्यासारखाच एक सरस गद्य लेखक, आणि म्हणून

कवींचे, असें ध्वनित करून, हळूच सरकत सरकत कवींच्या पंक्तीला येऊन बसण्याचा गुप्त प्रयत्न करीत आहें असें मात्र कृपा करून आपण समजूं नका ! कारण मी एखादे वेळीं गद्य लिहितों तें रस किंवा उपमादृष्टांतादिकांनीं अलंकृत असतें असें कोणी क्वचित म्हटलें तरी, काव्याला जें भावनाप्राधान्य लागतें तें माझ्या स्वभावांत नाहीं. माझें लेखन मुख्यतः विवेचनात्मक व तर्कनिष्ठ असतें असें मला वाटतें. म्हणून मी गद्यलेखक या सदरांतच केव्हांहि झालें तरी पडेन. मात्र त्यांत कांहीं कमीपणा आहे असें मला खचित वाटत नाहीं. शिवाय, ' कविसंमेलन ' म्हणजे एकाच बंदरांत जुळलेला बिनसुकाणू तिर्कटी तारवांचा काफिला, किंवा एकाच राशींत उगवणाऱ्या शेंडे नक्षत्रांची झुंड, हें विनोदी वर्णन जर खरें मानलें तर मीं कवि नसून बिचारा गद्य लेखक आहें हेंच बरें असेंहि वाटतें. कारण तिर्कटी तारवासारखें उगीच वाऱ्यावर वाटेल तिकडे भटकत जाणें, किंवा आपल्या उदयानें लोकांना अपशकुन करणें हें मला आवडत नाहीं.

पद्य, कविता, काव्य हे शब्द समानार्थक भासतात आणि अविचारानें सरमिसळ वापरले जातात. पण त्यांच्यांतला भेद उघड आहे. पहिल्या दोन शब्दांचा बाह्यस्वरूपाशीं व तिसऱ्याचा अंतरंगाशीं संबंध आहे. कित्येक गद्याचे प्रबंध इतके सरस व काव्यपूर्ण असतात कीं, ते काव्याचे खरे सहोदर असे वाटतात. पण सारख्या भावाभावांतल्यापेक्षां केवळ स्नेह्यास्नेह्यांतच एखादे वेळीं अधिक प्रेम नांदतें. तसाच कांहींसा हा प्रकार आहे. पण भावाच्या नात्याचे वारसाईचे अधिकार जसे स्नेह्याला सांगतां येत नाहींत, तसेच ज्याला पद्य किंवा कविता याचें बाह्यस्वरूप नाहीं त्याला काव्य हा शब्द लावितां येत नाहीं. कोणी सहजच म्हणेल कीं, आंत जर खरा काव्यरस भरपूर असेल तर त्या शब्दप्रबंधाचें बाह्य स्वरूप गद्याचें असलें तरी काय बिघडलें ? पण बिघडतें हें मात्र कांहीं खोटें नाहीं. कारण खरा काव्यरस हा भावनेच्या उत्कर्षाशिवाय निर्माण होत नाहीं. आणि भावनेला अनुकूल असें ( म्हणजे छंदोबद्ध, तालबद्ध, मर्यादित, मोजक्या गतीचें, शक्य तर सयमक, अनुप्रासयुक्त असें ) वाहन न मिळालें तर तिच्या उद्गाराच्या परिमाणाला कमीपणा येतो.

आपण साध्या भाषाव्यवहारांतहि हेंच पाहतों. जेथें साधे निर्विकार मनाचे बोल बोलावयाचे असतात, तेथें भाषेच्या उच्चारांत कांहींच विलक्षण-

पणा असत नाहीं. पण वाक्य नुसतें प्रश्नार्थी किंवा उद्गारचिन्ह देण्यास योग्य असें बोललें जातें तेथें, मनांत विकार उत्पन्न झालेला असतो. म्हणून त्याच्या उच्चारांतहि थोडासा विलक्षणपणा येतो. मग जेथें वाक्यें रागानें भांडल्यासारखीं, किंवा प्रेम करुणा व्यक्त करण्यासारखीं, असतात तेथें त्यांच्या उच्चारांत फारच विलक्षणपणा येतो. अशा वाक्यांची ठेवण गद्य वाक्यांसारखी लांबलचक किंवा अनियमित असत नाहीं. तीं वाक्यें प्रायः लहान, सुटसुटीत, ठसकेदार, तालबद्ध, अशीं असतात. अशा वाक्यांना गायनशास्त्रांतील स्वरलेखनाची पद्धति लाविली तर, कदाचित् त्यांतून कोणत्या तरी निश्चित तालांतला, निश्चित रागांतला, स्वरसंवादित्व संभाळणारा, असा कांहीं गायनप्रबंध निघूं शकेल असा माझा तर्क आहे. कोणाचें रुदन किंवा करुणस्वर किंवा दुःखविलाप हे कोणत्या रागांत किंवा तालांत आहेत अशी चिकित्सा अर्थात् कोणी करीत नाहीं. पण कोणी केवळ शास्त्रीय बुद्धीनें, दृष्टिआड राहून, ती केलीच तर तींतून काय निघूं शकेल याचा तर्क मी सांगितला. पण मींच हें सांगावयाला कशाला पाहिजे ? सर्व संगीतशास्त्रज्ञ एकमतानें असें मानतात कीं, कांहीं कांहीं भावनांना कांहीं कांहीं राग व ताल अनुकूल आणि कांहीं कांहीं राग व ताल प्रतिकूल असतात. पुणें येथील जॉन स्मॉल मेमोरिअल हॉलमध्यें कै. कृष्णराव देवल यांनीं एकदां अशाविषयीं केलेला प्रयोग स्वतः मीं पाहिलेला आहे. म्हणजे हिंदीपद्धतीचे निरनिराळे राग वाजविले असतां त्यांतून भावना प्रगट झाली, ती नवरसांपैकीं कोणत्या रसांत पडण्यासारखी होती हें युरोपियन श्रोत्यांनीं जवळ जवळ बिनचूक सांगितलें. भावना तीव्र असल्यास सभ्य व गंभीर मनुष्याचाहि उद्गार विकृत असा निघतो. म्हणजे बोलाचा सूर ओढला जातो, किंवा हेल काढले जातात, किंवा शब्दांवर कमजास्त जोर लक्षांत भरण्यासारखा दिला जातो. मग भावना तीव्र असून, शिवाय उद्गार काढणारा मनुष्य असंस्कृत, ग्राम्य किंवा असदभिरुचीचा असेल तर त्याच्या उद्गाराचें लेखन कसें होईल याची सहज कल्पना करितां येईल. ' रडगाणें ' या एका शब्दांत मीं वर सांगितलेल्या गोष्टींचें सर्व मर्म सांपडेल. Extremes meet या म्हणीप्रमाणें अत्यानंद किंवा अतिशयित दुःख यांचे स्वर व ताल जवळ जवळ एकासारखे एक असतात. हंसण्याचे मजले व दुःखाचे हुंदके यांत एक प्रकारची ताल-

बद्धता असते. वाहवा वाहवा, शाबास शाबास हे मन:समाधानाचे उद्गार, किंवा अरे अरे अरे, हाय हाय हे खेदाचे उद्गार हे तालबद्धच उच्चारले जातात. तसेंच केवळ कल्पनाविलास पाहूनहि आश्चर्याचा जो धक्का मनाला बसतो त्याचा उद्गार साध्या बोलण्यासारखा नसतो.

कल्पनाविलास व भावनांचा उत्कर्ष हे ज्याचे मुख्य गुण आहेत तें काव्य निर्माण करणें ही एक स्वतंत्र कला आहे. आणि कला म्हटली कीं, तिचीं म्हणून कांहीं ठराविक विशिष्ट साधनें असणारच. त्याचप्रमाणें काव्याचें साधन छंदोबद्ध व तालबद्ध रचना हें आहे. म्हणून ज्याला या कलेच्या विलासाचें सुख किंवा आनंद भोगावयाचा असेल त्यानें छंद व ताल हीं बंधनें मानावींच लागतात. हट्टानें बंडखोरीच्या बुद्धीनें कोणी तीं न जुमानितां अनिर्बंध अशा गद्यांतच काव्य लिहिलें तर त्यानें तसें खुशाल करावें. त्याचा हात कोण धरणार ? पण हा हट्ट तडीस जाण्याला निसर्गाला लाथाडून कृत्रिमपणाचा जाणून बुजून स्वीकार करावा लागतो. भावना व तिच्या प्रगटीकरणाचें साधन यांचा हा संबंध असा दुर्निवार असून जगांतल्या शेंकडा पंचाण्णव लोकांनीं तो स्वीकारला आहे. विषय कोणताहि असो, तो मांडण्याची रीति भावनाप्रधान आहे कीं बुद्धिप्रधान आहे हें ठरल्यावर तो पद्य किंवा कविता यांच्या द्वारें प्रगट करावा, कीं गद्याच्या द्वारें प्रगट करावा याविषयीं प्रश्नच उरत नाहीं.

गद्य व पद्य हे दोन वाङ्मय प्रकार वेगळे आहेत; पण ते अगदीं तुटक नसून त्यांना जोडणारे असेहि कांहीं प्रकार असतात. त्यांना धड गद्य म्हणणें कठीण, धड पद्य म्हणणें कठीण. सांगलीचे कवि साधुदास म्हणजे रा. मुजुमदार यांनीं आपल्या 'मराठीची सजावट' या पुस्तकांत गद्य व पद्य यांच्या भेदासंबंधीं बरीच मार्मिक चर्चा केली आहे. त्यांच्या मतें गद्य वाचण्याचा स्वर बोलण्याच्या स्वराहून किंचित् ओढलेला व विकृत असला तरी तो एकच असतो व तो संगीतोपयोगी स्वराच्या कक्षेंत येत नाहीं. पद्य हें गाइल्याशिवाय म्हणजे गाण्याच्या सुराशिवाय म्हणतां येत नाहीं. गद्यांत वर्णांना प्राधान्य असतें व पद्यांत तें स्वरांना असतें. पद्याचे सूर एकाहून अधिक, ते मोजक्या मापांत बसविलेले, मर्यादित व तालबद्ध असल्यामुळें, आणि ते म्हणतांना स्वराचा चढउतार होत असल्या कारणानें त्याच्या स्वरांना संगीत स्वरांचें रूप येतें. कोणी करावयास बसला तर

गद्याचेंहि स्वरलेखन होऊं शकेल; पण पद्याच्या स्वरलेखनांत गद्यापेक्षां अधिक संगीत स्वर उमटतील. आपल्या इकडे जो स्वरालाप कोणत्या तरी रागांत बसत नाहीं त्याला संगीत म्हणत नाहींत. म्हणून रागाला कमींत कमी लागणाऱ्या स्वरांहून कमी स्वर जर पद्य म्हणण्यांत उमटतील तर ते संगीत याच्या व्याख्येंत पडणार नाहीं. परंतु गद्यापेक्षां पद्यांत अधिक सुस्वर किंवा गायनस्वर उमटतात यांत शंका नाहीं. कांहीं साधीं पद्यें तर इतकीं तालबद्ध असतात कीं तीं, त्यांत कांहीं एक फरक न करतां, संगीताच्या चीजांप्रमाणें सहज गातां येतात. पण या दोहोंच्या मध्यें असून दोघांचेहि गुणधर्म निम्मे शिम्मे स्वीकारणारे असे कांहीं शब्दप्रबंध असतात. उदाहरणार्थ, पुराणिकांच्या प्रवचनाचे किंवा हरिदासाच्या कीर्तनाचे कांहीं भाग पुराणिक व हरिदास हे अर्धवट गाइल्यासारखे म्हणतात. त्यांचें स्वरूप त्यांतील संगीत स्वरांमुळें पद्यासारखें वाटतें. पण त्यांतील शब्दांना ताल नाहीं व मोजमापाची मर्यादा नाहीं, यामुळें त्यांना पद्य म्हणतां येत नाहीं. पण उलट त्यांत संगीताचे स्वर स्पष्ट उमटत असल्यामुळें, व गद्याप्रमाणें त्यांची ठेवण अनियमित, अमर्याद व कोणचाहि ताल न लागणारी अशी नसल्यामुळें त्यांना गद्यहि म्हणतां येत नाहीं. मोटेच्या, नांगराच्या किंवा गाडीच्या बैलांना उद्देशून शेतकरी स्वर ओढून गायल्यासारखे कांहीं शब्द म्हणत असतात; पण तेहि गद्य किंवा पद्य यांच्या व्याख्येंत बरोबर बसत नाहींत. गज्जल वगैरे म्हणतांना कांहीं भाग तालसुरांत गाण्याचा झाल्यावर मध्यंतरी ठेका बंद करून कांहीं मजकूर म्हणजे त्या पद्यांतील भाग गद्याप्रमाणें पण वेगळा सूर लावून म्हणतात. या सर्व प्रकारांना रा. मुजुमदार यांनीं ‘ उपसंगीत ’ हें नांव दिलें आहे, व अशा रीतीनें उपसंगीत हा त्यांच्या मतें गद्य व पद्य यांना जोडणारा सांधा होय. कदाचित कांहीं प्रकारचे कटाव हेहि या उपसंगीताच्या सदरांत पडूं शकतील असें मला वाटतें. कारण त्यांना साधा ठेका तालाचा असतो. परंतु कटावांचे तुकडे म्हणजे चरण हे सारख्या लांबीचे मापाचे असतातच असें नाहीं.

गद्याला चरण असे नसतात, पद्याला ठराविक संख्येचे चरण असतात. गद्याला ताल नसतो, पद्याला ताल असतो. गद्याला चरण नसून शिवाय त्याची एकेरी सांखळी किती लांबीची असावी याला कांहीं नियम नसतो. पद्याचीहि सांखळी असली तरी ती अनेक पदरी सांखळी असते, व त्या

सांखळीचे सर्व पदर जरी सारख्या लांबीचे नसले तरी, कमी लांबीचे व जास्ती लांबीचे पदर मोजक्या मात्रांच्या मापाचे असतात; व एकामागून एक येणारे पदर कोणत्या लांबीचे असावे याचा कांहीं क्रम ठरलेला असतो. गद्यांत स्वराचा आरोह अवरोह फारसा नसतो. स्वराच्या आरोह अवरोहा-शिवाय पद्य होत नाहीं, व ते आरोह व अवरोहहि कांहीं नियमानें व क्रमानें होत असतात. अर्थात् गद्य व पद्य यांच्या शरीरलक्षणाचे हे भेद झाले. पण याहून दुसरेहि भेद आहेत व ते मनुष्याच्या मनाशीं किंवा आत्म्याशीं संलग्न असल्यामुळें तेच अधिक महत्त्वाचे ठरतात.

असो; गद्य व कविता या दोहोंचा हेतु एकच असतो; पण तो एकच हेतु साधण्याचे ते दोन भिन्न मार्ग होत. मग प्रश्न असा कीं, जर हे दोन मार्ग एकाच मुक्कामाला नेऊन पोचविणारे, तर ते मुळांत वेगळे वेगळे बनले कां व कसे ? व एकानें एक व दुसऱ्यानें दुसरा मार्ग स्वीकारावा हें कां घडतें ? बरें, सारे गद्यलेखक नुसतें गद्यच लिहितात व सारे पद्यलेखक नुसतें पद्यच लिहितात, असें जगांत आढळलें असतें तर वरील प्रश्नाचें उत्तर एका प्रकारचें झालें असतें. पण वस्तुतः असा कोणताहि गद्यलेखक किंवा पद्यलेखक आढळणार नाहीं कीं ज्यानें एकजात नुसतें गद्यच किंवा एकजात नुसतें पद्यच लिहिलें. म्हणून त्या प्रश्नाचें उत्तर वेगळ्या प्रकारचें द्यावें लागेल.

प्रत्येक राष्ट्राच्या भाषेच्या इतिहासांत एक काळ असा होतासें दिसतें कीं, तेव्हां लेखकवर्गच नव्हता, कारण लेखनकलाच जन्मली नव्हती. तेव्हां, आणि पुढें लेखनकला जन्माला आल्यावरहि कांहीं काळपावेतों, वाङ्मयाच्या सदरांत पडणारें सर्व कांहीं पद्यात्मकच असे. पण पुढें गद्य जन्माला आलें तरी पद्य मागें पडलें नाहीं. दोन्हीहि बरोबरीनें चालूच राहिलीं. पद्याची सर्व जागा गद्यानें केव्हांहि काबीज केली नाहीं, तर दोन्हीहि खेळीमेळीनें व बरोबरीनें नांदूं लागलीं. आईबापांना प्रथम एक अपत्य जन्मतें, पण त्याच्या पाठीमागून दुसरें जन्मलें तरी त्यामुळें आईबापांचें प्रेम पाहिल्यावरून उडून जाऊन तें सर्व दुसऱ्यावर जडतें असें होत नाहीं. आणि दुसरें मूल जन्मलें म्हणून लगेच राहतें घर नांदणुकीला पुरेनासें झालें असेंहि होत नाहीं. आईबापांचें प्रेम तर असेंच कांहीं असतें कीं, त्या प्रेमाला नवीन विषय लाभल्यानें त्याचा भागाकार

न होतां उलट गुणाकारच होतो. तसेंच एकटें भावंड असतां त्याला खेळण्याला कोणी जोडीदार नसतो त्याऐवजीं भावंड जन्मल्यानें तो जोडीदार त्याला मिळतो व त्यांचा खेळ रंगून आईबापांचा आनंद वाढतो.

ही दिव्य कौटुंबिक प्रेमाची उपमा सोडून देऊन साध्या व्यावहारिक सुखसोयीची गोष्ट घेतली तरी असेंच आढळतें कीं, देवघरांत प्रथम तेलवातीचा नंदादीप घरीं असतां विजेची बत्ती आली तरी कोणीहि भाविक उपासक नंदादीप मालवीत नाहीं. घरीं प्रथम घोड्यांची गाडी असतां पुढें मोटार विकत घेतली तरी, खानदानीचे श्रीमान लोक घोडागाडी काढून टाकीत नाहींत. फार काय, रस्ता अरुंद म्हणून त्याला लागून चांगला फूटपाथ बांधला तरी फूटपाथ सोडून रस्त्यावरून गाड्याघोड्यांच्या गर्दींतून चालणारे लोक अनेक दिसतात. तात्पर्य, कोणत्याहि नवीन भौतिक साधनानें जुन्याला सर्वस्वीं मोडून काढलेलें नाहीं. इतकेंच काय पण आगगाड्या आगबोटी, विमानें झालीं तरी, आपल्या पायांच्या खंबिरांची परीक्षा घेण्याकरितां, किंवा आपली श्रम करण्यासोसण्याची पात्रता अजमावण्याकरितां, किंवा निवळ हौस व गंमत याकरितांहि पायानें पृथ्वीप्रदक्षिणा करणारे, अथवा नुसतें शीड लावलेल्या होड्यांत बसून महासागर पर्यटण करण्यास निघणारे हरीचे लाल आजहि पहावयास सांपडतात! पण वरील दाखल्यांत दर्शविल्याप्रमाणें किंवा तितकाहि, गद्याच्या मानानें पद्याचा वाङ्मयप्रकार, बाजूस टाकण्यासारखा किंवा उपेक्षणीय झालेला नाहीं कीं, फक्त विक्षिप्त मनुष्यानेंच त्याचा लहरीखातर उपयोग करावा.

पूर्वी पद्यानें गद्याशीं जें प्रमाण पडे त्याच्या सहस्रपट, दशसहस्रपट म्हणाना, आज उलट गद्याचें पद्यलेखनाशीं प्रमाण पडत आहे. पण गद्यानेंच ज्याचा निर्वाह भागेल, पद्यानें भागणार नाहीं, असा आधुनिक समाजाचा व्यवहार अनेक प्रकारांनीं अनेक पटींनीं नवा निर्माण झाला किंवा जुना वाढला असला तरी, अशीहि कांहीं जागा अजून शिल्लक आहे कीं, ती काव्यानें म्हणजे पद्यानेंच भरून येईल, गद्यानें भरून येणार नाहीं. लेखनकला मुद्रणकला या निघाल्यापासून भाषणव्यवहाराची जागा लेखनानें घेतली असेल, पण त्याचें कारण समाजांतील वाहतुकीचीं साधनें, दळणवळण हीं पुष्कळ वाढून, मतप्रसाराच्या क्षेत्रांत पूर्वीहून पुष्कळच अधिक लोकसंख्या येऊं लागली. ग्रीसच्या पहिल्या काळांत

एकेक नगर हेंच एकेक राष्ट्र होतें, तेव्हां मनुष्याचा आवाज पोचेल इतक्या लहान टापूंत उपदेशाचें, मतप्रसाराचें, अनुनयाचें, न्यायदानाचें किंवा राज्यकारभारांत जय मिळविण्याचें काम होत असे व संपत असे. अशा वेळीं छापखान्यांचें किंवा लेखनाचें काय काम ? पाहाडी आवाज, सरस वक्तृत्व, व चित्ताकर्षक अंगविक्षेप येवढ्यानेंच कार्य होई. मात्र अशा वेळीं गद्याला जागा नसून पद्यालाच असला तर अवसर असे. डेमॉस्थेनिस्, पेरिक्लिस हे गद्य लेखक म्हणून प्रसिद्ध नाहींत तर वक्ते म्हणून. पण त्यांचें वक्तृत्व गद्यापेक्षां काव्यालाच अधिक जवळ असे. कारण त्यांत भावना पुष्कळ. जुन्या काळीं भाट, चारण, शाहीर हेच वाङ्मयाचे आधारस्तंभ असत. परंतु आज विद्या, शिक्षण, राजकारण, व्यापार, उदीम, शास्त्र-संशोधन, या सर्वांत शुद्ध तर्कबुद्धि विवेचकता हिशेबीपणा यांजवर पुष्कळशी भिस्त येऊन पडली असून, भाषाव्यवहार रेखीव, कातीव, सुटसुटीत स्पष्टार्थबोधक असा व्हावा लागतो. त्यामुळें गद्य प्रकारच अधिक उपयोगी पडतो आणि त्यामुळें लेखन व त्यामुळें छपाई हीं वाढलीं आहेत.

तथापि आजहि वाङ्मयांपैकीं ललितवाङ्मय हा प्रकार बुडाला नाहीं इतकेंच नाहीं तर, काव्याचें प्राचीन महत्त्व आजहि शिल्लक असून पद्याबरोबर इतर अनेक प्रकारांनीहि तें वाङ्मयक्षेत्रांत अवतरलें आहे. जें ग्रीस वगैरे तिकडच्या राष्ट्रांत झालें, तेंच भरतवर्षांतहि झालें. प्राचीन वैदिक वाङ्मय प्रायः पद्यमयच होतें. तेव्हां समाजांतील दळणवळण, राजकारण फार थोडें असे. पण नंतर मध्ययुगीन कालांत साम्राज्यें झालीं व विस्तारलीं, तेव्हां संस्कृत गद्य पुढें सरसावलें. मराठी भाषेच्या पहिल्या काळांत लोकव्यवहाराची व्याप्ती मर्यादित क्षेत्रापुरती असे तेव्हां पहिलें वाङ्मय पद्यरूपानें अवतरलें. महाराष्ट्राच्या उत्तरकालांत ती व्याप्ती वाढली तेव्हां गद्याला प्रारंभ झाला; व गेल्या शतकांत महाराष्ट्राचा हिंदुस्थानच्या इतर भागाशीं, व पुढें तर सर्व जगाशीं संबंध येऊं लागला तेव्हां गद्य वाढीला लागून त्यानें आज प्रचंड स्वरूप धारण केलें आहे. तरीहिपण पद्यमय वाङ्मय उपेक्षिलें जात नाहीं, त्याची अनास्था होत नाहीं, तर त्याला योग्य तें गौरवाचें स्थान कोठेंहि दिलें जात आहे.

आतां प्राचीन काळ हा काव्यप्रधान कां व अर्वाचीन हा गद्यप्रधान कां याचा इतर रीतीनेंहि खुलासा करितां येतो. मेकॉलेप्रभृती कांहीं लेखक असें

म्हणणें असें आहे कीं, प्राचीन काळीं मनुष्य समाज हा मनानेंच अधिक अद्‌भुतरसप्रेमी व सहृदय होता म्हणून त्या वेळीं त्याच्या हातून अर्वाचीन काळापेक्षां अधिक सरस काव्य निर्माण झालें. पण मेकॉलेचें हें मत चुकीचें आहे. तो जर असें म्हणता कीं, " प्राचीन काळीं विचारांच्या व भावनेच्या उद्गारांना स्वाभाविकपणेंच गद्यापेक्षां पद्याचें रूप अधिक येई," तर त्याचें विधान मार्मिक व वस्तुदर्शक ठरलें असतें. पण केवळ विरोधाभास साधण्याच्या भरांत त्यानें Poetry declines as Civilisation advances असें वाक्य लिहिलें. वास्तविकपणें जुन्या काळाचें काव्य झालें म्हणून तें सर्वच आधुनिक काव्यापेक्षां अधिक सरस होतें असें म्हणतां येत नाहीं. तसेंच, आधुनिक काव्य जुन्यापेक्षां कमी कमी सरस होत होत नसून, अधिकाधिक सरसच निर्माण होत आहे. फरक इतकाच कीं पूर्वीं एकंदर वाङ्मयाशीं काव्याचें प्रमाण पुष्कळच अधिक पडे, तर हल्लीं तें प्रमाण पुष्कळच कमी झालें आहे. पूर्वीं जर पद्य हा नियम व गद्य हा अपवाद होता असें म्हटलें, तर आज त्याच्या उलट गद्य हा नियम व पद्य हा अपवाद असें त्यांचें प्रमाण बसतें. मेकॉलेला खरोखर जें म्हणावयाचें होतें तें हें कीं, पूर्वीं समाजाची संस्कृती आधिदैविक असून, शिवाय भाषेची वाढ प्राथमिक स्थितींत असल्यामुळें, रूपकाच्याद्वारें लोकांना आपल्या कल्पना मांडाव्या लागत; म्हणजे संग्रहीं असलेल्या थोड्याशा शब्दांवर पुष्कळ शब्दांचें काम त्यांना भागवून घ्यावें लागे. असें करण्यांत लक्षणेचा उपयोग अवश्य असतो, व लाक्षणिक भाषेला अलंकारिक पद्याचें स्वरूप सहजच येतें.

मानवसंस्कृतीचे तीन मुख्य प्रकार—१ अध्यात्मिक २ आधिदैविक ३ आधिभौतिक. पैकीं ऐतिहासिक दृष्ट्या पाहिलें तर या तिहीं पैकीं दुसरी, म्हणजे आधिदैविक संस्कृति हीच प्रथम उत्कर्षाला पोंचली, व आतां ती जवळ जवळ नष्ट होण्याच्या बेताला आली आहे. संस्कृति म्हणजे संस्कारपात्रता. मानवी समाज अनेक देशांतून पसरलेला असला तरी, त्याची मानसिक परिणति एकाच पद्धतीनें झालेली आहे. म्हणजे प्रथम तो साधाभोळा, श्रद्धाळु, एकमार्गी, अल्पसंतुष्ट, अज्ञानी असून, कालांतरानें हळुहळु वरच्या उलट सर्व गुण किंवा दुर्गुण त्याच्या ठिकाणीं आले. प्रस्तुत आपल्याला त्याच्या वाङ्मय-जनकत्वापुरतें पाहावयाचें आहे.

आणि त्या बाबतींत आपणाला असें स्पष्ट दिसून येतें कीं, त्याचें अज्ञान व भोळेपणा यांच्या योगानें त्याच्या अंगीं आश्चर्यशीलता व भीति ही विशेष होतीं. यामुळें जगाचें आदिकारण किंवा सृष्टिस्वरूप किंवा जीवात्म-स्वरूप यांविषयीं त्याला योग्य कल्पना नसून, सर्वच गोष्टींकडे तो आश्चर्यानें पाहात असे. प्रत्येक सृष्टचमत्कार करणारी कोणी तरी दैवी शक्ति असून तिचा राग न व्हावा किंवा आपणावर तिची कृपा व्हावी, अल्प-संतुष्टेंतलाच पण जास्तींत जास्त असा आपला स्वार्थ असेल तो तिनें साधून द्यावा, आणि आपल्या शत्रूंना प्रतिबंध व पारिपत्य करावें, या हेतूनें देवतासंतोषार्थ सुचतील ते उपाय मनुष्य करी. हाच त्याचा तेव्हां धर्म होता. हाच त्याचा अभ्युदय, हेंच त्याचें निःश्रेयस्, आणि त्याचें वाङ्मयहि त्याच प्रकारचें असावें यांत आश्चर्य नाहीं.

अज्ञानानें आश्चर्य वाटतें, व आश्चर्यानें प्रतिभा स्फुरण पावून आश्चर्य-दर्शक उद्गार मुखावाटे बाहेर पडतात. पण यावेळची मनुष्याची प्रतिभा नेणती असते. जाणती नसते! हल्लींच्या काळींहि प्रतिभा नष्ट झालेली नाहीं. पण ती जाणती झालेली आहे. आणि तिची बहीण जी प्रज्ञा, म्हणजे ग्राहक विवेचन बुद्धि, ती प्रौढ झालेली असून, दोघीजणी एक विचारानें खेळीमेळीनें वागतात. अंधाऱ्या विहीरीच्या तळाशीं बसून वर आभाळाकडे पाहणाराला तळहाताएवढेंच आभाळ दिसणार. उलट दुर्बिणींतून आभाळाकडे पाहणारा हा देखील तसेंच करितो असें म्हणतां येईल, कारण दुर्बीण ही तरी एक अंधारी नळीच असून फक्त तिच्या तोंडाशींच प्रकाश येण्यास लहानशी जागा असते. पण फरक हा कीं अंधाऱ्या विहिरींत पडलेला मनुष्य जागा बदलूं शकत नाहीं. मैदानावर दुर्बिणीनें पाहणारा ती आज या भागावर, उद्यां त्या भागावर, अशा क्रमानें ती आकाशाच्या सर्व भागांवर रोखूं शकतो. यामुळें आभाळाविषयीं त्याची कल्पना व्यापक होऊं शकते. असो. सृष्टिनिरीक्षणाच्या व प्रज्ञेच्या बैठकीवर फिरणारी प्रतिभा असेंच सर्व जग धुंडाळते. प्राचीन अर्वाचीन काळामध्यें मुख्य फरक हा नेणत्या व जाणत्या प्रतिभेचाच आहे. आश्चर्यग्रस्त नेणत्या प्रतिभेचा उद्गार हा नाइलाजानें काव्यस्वरूपाचाच असणार. जाणती प्रतिभाहि आश्चर्यांत आनंद मानणारीच आहे. पण तिला वाटणारें आश्चर्य हें ती आपल्या आवडीप्रमाणें व ऐच्छिक स्वरूपांत उत्पन्न करून घेते.

समाजाच्या प्राथमिक स्थितींत मनुष्यें अज्ञानी होतीं म्हणून तीं काव्य-शील होतीं, हें मेकॉले याचें म्हणणें आज सुधारलेला म्हणविणाऱ्या काळां-तहि मनुष्यसमाजाला लागू पडतेंच. कारण इतकी भौतिक सुधारणा झाली तरी मनुष्याचें अज्ञान कोठें संपलें आहे ! अज्ञान संपलें नाहीं याचा अर्थ ज्ञान होण्याचा प्रसंग शिल्लक उरलाच; ज्ञानाचा जन्म हा सदैव आश्चर्य-कारक असतो; आश्चर्य हा अद्भुतरसाचा स्थायिभाव आहे; व अद्भुत-रस ही काव्याच्या रूपानें प्रगट करण्यासारखी वस्तु आहे—अशी युक्ति-वादाची सरळ सांखळी मांडली म्हणजे, मेकॉले म्हणतो त्याप्रमाणें, आजच्या काळांतहि समाज काव्यशील राहूं शकतो. आणि ती गोष्ट प्रत्यक्ष अनु-भवालाहि येत आहे. फरक असलाच तरी तो इतकाच कीं, प्राचीन काळीं कार्यकारण संबंधाचें मनुष्याचें ज्ञान फारच कमी असल्यामुळें त्याचें तत्त्वज्ञान आधिदैविक स्वरूपाचें होतें; आणि हल्लीं भौतिक शास्त्राची प्रगति पुष्कळ झाली असल्याकारणानें, कार्यकारणभावाची कसोटी आम्ही अधिक बिनचूक रीतीनें लावूं शकतों, म्हणून आमचें तत्त्वज्ञान आधि-भौतिक स्वरूपाचें आहे. पण त्यामुळें प्राचीन मनुष्याच्या आश्चर्यापेक्षां आमचें आजचें आश्चर्य कमअस्सल ठरत नाहीं. मेघांचा गडगडाट ऐकून प्राचीन काळचा मनुष्य "इंद्र रथांत बसून निघाला म्हणून त्या रथचक्रांचा खणखणाट होत आहे. असें म्हणत असेल." उलट आज आभाळांत ढग कसे बनतात, विद्युत्पात व गडगडाट कसे होतात, याचें किंचित् अधिक यथार्थ ज्ञान आम्हाला होऊं लागल्यामुळें, आम्ही या गडगडाटासंबंधानें कांहीं वेगळीच उपपत्ति सांगूं. पूर्वीची उपपत्ति आधि-दैविक होती तर आजची आधिभौतिक असेल. पण मेघांचा गडगडाट ऐकून किंवा वीज चमकलेली पाहून अद्भुतरसाचें तेज प्राचीन मनु-ष्याच्या डोळ्यांत जसें प्रगट झालें तसेंच तें आज आमच्याहि डोळ्यांत प्रगट होत नाहीं काय ?

पद्यप्रबंध हा मनुष्याची भावना व्यक्त करण्याला उपयोगी असतो हें खरें असलें तरी, इतर कांहीं कार्यांनाहि तो उपयोगी असतो. आणि हीं कार्यें म्हणजे भावनाविलासाप्रमाणें, कल्पनाविलास व बौद्धिक विचार-विलास हीं देखील होत. जेव्हां पद्याच्या द्वारें उत्कट भावना प्रगट होते तेव्हां तर पद्य हें काव्याच्या उच्च पदवीला पोचतेंच; परंतु भावनाविलास

नसून, म्हणजे प्रमुख मानलेल्या रसांचा उत्कर्ष नसून, कल्पनाप्रतिभेचा विलासच नुसता त्यांत असेल, तरी त्याला काव्य म्हणतां येईल. काव्याची व्याख्या ' रसात्मकं काव्यं ' अशी मांडली तरी, रसोत्कर्ष होण्याला नुसती स्वभावोक्ति नेहमींच पुरी पडते असें नाहीं; तर रसोत्कर्षाला अलंकार, व्यंग्योक्ति, वक्रोक्ति इत्यादिकांची मदत घ्यावी लागते. ज्या पद्यांत बिलकुल अलंकार नाहीं किंवा बक्रोक्ति नाहीं तीं पद्यें केवळ साध्या शब्दांच्या जोरावर रसोत्कर्षाला पोंचलेलीं अशीं कितीशीं आढळतील ?

पण या अडचणीचा परिहार रसामध्यें अद्‌भुतरसाची गणना असल्यामुळें सहजच होतो. मनाला आश्चर्य वाटण्याची स्थिति हा एक प्राथमिक म्हणजे महत्त्वाचा असा स्थायीभाव आहे. आणि शृंगार, वीर, करुण, इत्यादि रसांतील स्थायीभावांना जिव्हाळ्याचा स्पर्श झाल्यानें आत्म्याला जी दैवी स्थिति प्राप्त होते तीच आश्चर्यानेंहि होते. म्हणजे आश्चर्याचा संबंध बुद्धीशीं असला तरी, तें बुद्धीला पराभूत करून त्या पलीकडे गेलें म्हणजे त्याला भावनेचेंच स्वरूप येतें. म्हणून आश्चर्योत्पादक अलंकार, व्यंग्योक्ति, वक्रोक्ति इत्यादिकांनीं उत्पन्न होणाऱ्या विकाराला पद्याचा उपयोग करून घेण्याचा हक्क नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. आत्म्यासारखी अपूर्व वस्तु दुसरी कोणती ? आणि गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत, आत्म्याकडे पहाणारांच्या, आत्म्याचें वर्णन करणारांच्या, व आत्म्याविषयीं गोष्टी ऐकणारांच्या, मनांत जो अत्यंत उदात्त असा विकार उत्पन्न होतो त्याला आश्चर्य हाच शब्द लावलेला आहे. ' आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनं ' हा श्लोक प्रसिद्धच आहे. म्हणून अलंकार, वक्रोक्ति, व्यंग्योक्ति हाहि काव्याचा आत्मा नव्हे असें म्हणणारे लोक संकुचित दृष्टीचे आहेत असें म्हणतां येईल.

भावना म्हणजे स्थायीभावापैकीं कोणताहि उत्कट भाव. कोणताहि स्थायीभाव हा कोणत्या ना कोणत्या तरी रसाला आधारभूत असतो. म्हणून कोणताहि स्थायीभाव प्रगट करण्याला काव्याची मदत घेणें अयुक्त ठरत नाहीं. शिवाय अलंकारांच्या मदतीशिवाय, म्हणजे नुसत्या स्वभावोक्तीनें रस परिपाक करणें ही फार अवघड गोष्ट असते. आणि सालंकार भाषा ही पद्यांत जितकी शोभते तितकी गद्यामध्यें शोभत नाहीं. अनलंकृत शब्दांनीं रस उत्पन्न होऊं शकतो, पण तो फार वेळ टिकवून धरतां येत नाहीं. उदाहरणार्थ, रघुवंशांतील अजविलापांतील कांहीं श्लोक, रामानें त्याग केल्या-

नंतर सीतेनें त्याला उद्देशून केलेल्या भाषणाचें कांहीं श्लोक, तसेंच शाकुंतलांतील चवथ्या अंकांतले कण्वाचें व सहाव्या अंकांतले दुष्यंताचे कांहीं श्लोक हे अनलंकृत असतांहि रसोत्पादक होतात ते केवळ हृदयांतून सरळ बाहेर पडलेल्या उद्गारांमुळें रसोत्पादक होतात ही गोष्ट खरी. पण सगळा रघुवंश किंवा सगळें शाकुंतल हीं येथून तेथून रसभरित असतां, त्यांत केवळ साधी स्पष्टोक्ति, साधी स्वभावोक्ति, यांनीं सरपरिपोष झालेला कितीसा आढळेल ? व ती गोष्ट शक्य नाहीं म्हणूनच अलंकारांचें साहाय्य कालिदासानें पदोपदीं घेतल्याचें आढळून येतें.

पद्यांत प्रत्यक्ष भावना नसतांहि पद्य अप्रत्यक्षरीतीनें भावनेला उपकारक होतें. म्हणून दिसण्यांत निर्भावन अशा पद्यांनाहि काव्यांतच गणिलें पाहिजे. ही गोष्ट नाटकांतील पद्यांमध्यें नेहमीं आढळते. विस्तारभयास्तव मी या मुद्याचें विस्तृत विवेचन करीत नाहीं. परंतु गोष्ट लक्षांत यावी म्हणून मी एकच उदाहरण देतों. शाकुंतल नाटकांत दुष्यंत हा शकुंतलेविषयीं आठवणी काढून शोक करितो. त्यांत एक श्लोक खालीं दिल्याप्रमाणें आहे—

कार्या सैकतलीन हंसमिथुना स्रोतोवहा मालिनी ।
पादास्तामभितो निषण्णहरिणा गौरीगुरोः पावनाः ॥
शाखालंबितवल्कलस्य च तरोः निर्मातुमिछाम्यधः ।
शृंगे कृष्णमृगस्य वामनयनं कंडूयमानां मृगीं ॥

हा श्लोक नुसताच घेतला तर त्यांत भावना अशी कांहींच नाहीं. दुष्यंताऐवजीं, एकादा चितारी आपण योजिलेलें एक चित्र कोणतें कसें काढणार आहों हें आपल्या एका स्नेह्याला सांगत आहे, किंवा एकादा चित्रकलाप्रेमी धनिक अमुक एक असें चित्र मला काढून दे असें सांगत आहे, अशी कल्पना त्या श्लोकासंबंधानें केली तरीहि ती चालण्यासारखी आहे; आणि ती केली तर हा श्लोक बिनभावनेंचा बिनअलंकाराचा असाहि वाटेल. पण कालिदासानें तो असा कांहीं बनविला आहे कीं, केवळ कलाविलासाच्या दृष्टीनें ही त्या श्लोकाला काव्य म्हणावेंच लागेल. पण त्यांत भावनाहि अप्रत्यक्षरीतीनें प्रगट होत आहे. कारण दुष्यंताला शकुंतलेची आठवण ज्या अनेक प्रसंगांनीं व स्थळांनीं झाल्यामुळें करुणरस उत्पन्न होतो. त्यांपैकीं या श्लोकांत वर्णिलेलें तपोवन हें एक स्थळ आहे. श्लोक इतका

सुंदर साधला आहे कीं, त्यांतील एकेक शब्द वांचीत असतां, तपोवनांतील एकेक भागाची स्पष्ट कल्पना रंगून डोळ्यांपुढें उभी राहते. आणि सर्व श्लोक म्हणून झाला म्हणजे असा परिणाम होतो कीं, एखाद्या चित्राचे बरोबर चौकोनी अनेक तुकडे केलेले असून ते नुसते एकत्र जोडले कीं अखंड चित्रांतील देखावा डोळ्यांपुढें उभा ! पण त्या नुसत्या तपोवनाच्या चित्रांत थोडी उणीव आहे. म्हणून मालिनी नदीचें वाळवंट सांगितलें, पण तें कसें? तर हंस व हंसी यांचें जोडपें त्यावर उभें आहे असें. आणि वृक्षाच्या शाखांवर वल्कलें वाळत घातलीं असलीं तरी त्याखालीं काय आहे तर कृष्णहरीण म्हणजे काळवीट उभा असून त्याच्या उजव्या हाताला मृगी उभी आहे, व ती आपला डावा डोळा त्याच्या शिंगावर घासून खाजवीत आहे ! अर्थात् हंसयुग्म व मृगयुग्म हें त्या चित्रांतील मुख्य मर्म असून, विरहि दुष्यंताला, शकुंतला नाहीं म्हणून आपण कसे एकटे पडलों, याची आठवण होऊन तो करुणरसांत वाहवत होता. त्यामुळें या श्लोकाला काव्यात्मक म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं. भावना ढोबळ व स्पष्ट उमटली तर तें पद्य अर्थात् काव्य ठरतेंच. पण भावना अस्पष्ट उमटल्या तरी, किंबहुना भावना अस्पष्ट उमटण्यामध्येंच, एक प्रकारची विशेष लज्जत आहे. तीच ध्वनि. कारण तेथें कल्पना करण्याला कांहीं तरी शिल्लक उरतें, सगळेंच शब्दांनीं सांगून संपविलेलें नसतें. गाण्यामध्यें खुद्द सप्तसूर लावावयाचे तेव्हां ते ठळक व स्पष्ट लागावे लागतात. तथापि त्यांशिवाय कोमलच काय पण अर्ध कोमल व अर्ध तीव्र हे स्वरहि कांहीं कांहीं रागांना अवश्य असतात, व त्यांच्यायोगानें गाण्याला नाजूकपणा येतो. तसेंच अस्पष्टदर्शक भावना व्यक्त करणाऱ्या पद्यांचें समजावें.

सौंदर्यप्रतीति ही अप्रत्यक्ष भावनेंतच येते. ती स्वतंत्र आहे. श्रृंगार वीर, करुण या मुख्य मानलेल्या रसांशीं तिचा प्रत्यक्ष संबंध येत नाहीं. श्रृंगार रसाशीं मनुष्यसौंदर्याचा संबंध आहे, पण त्याला सौंदर्य म्हणण्यापेक्षां चित्ताकर्षकता हें नांव अधिक शोभेल. सौंदर्यप्रतीति ही अद्‌भुत रसाला पोषक आहे असें म्हणतां येईल पण सौंदर्यप्रतीतीनें उत्पन्न होणाऱ्या रसाला अद्‌भुत असें नांव देणें थोडेसें चमत्कारिक वाटतें. रम्यदर्शनापासून होणाऱ्या सुखसंवेदनात्मक रसाला अद्‌भुताहून अधिक सौम्य असें एखादें नांव

कोणी देईल तर हवें आहे. कालिदासानें " रम्याणिवीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान् पर्युत्सुकी भवतियत् सुखितोपि जंतुः " या श्लोकांत जन-न्मांतर सौहृदांचें स्मरण असें कारण दिलें आहे. पण तें सर्व प्रकारच्या रम्यपदार्थ–दर्शनाला लागू पडत नाहीं. तसेंच भावना हाच काव्याचा आधार म्हटला तर महा–काव्यांना सामग्र्यानें कोणती भावना लागते ?

बरें, रसपरिपोषाला जशी अलंकारांची आवश्यकता असते, तशीच बौद्धिक व्यवहारालाहि म्हणजे विचार युक्तिवाद हे प्रगट करण्यालाहि अलंकारांचा उपयोग फार होतो. अर्थात अलंकार म्हणजे अगदीं सूक्ष्म भेदानें अलंकार–शास्त्रकारांनीं केलेले सगळेच्या सगळे शेंसवाशें अलं-कार असा अर्थ नाहीं, तर त्यांतले मुख्य म्हणजे उपमा–रूपक–दृष्टान्तादि अलंकार हेच होत. कित्येकांच्या मतें विचार व युक्तिवाद प्रगट कर-ण्याच्या कामीं अलंकारिक भाषेचा उपयोग करणें हें गैर आहे. कारण अलंकारांत शब्दार्थाची ओढाताण होऊन तो स्पष्ट व निश्चित होण्या-ऐवजीं संदिग्ध होऊं लागतो. आणि भाषेचा संदिग्धपणा हा शुद्धज्ञानाचा मोठा वैरी होय. नैय्यायिक, मीमांसक, वैय्याकरण इत्यादि लोकांना शब्दांचे अर्थ शक्य तितके असंदिग्ध असावेसे वाटतात. अर्थ निश्चित नसेल तर नैय्यायिकाला आपली युक्तिवादाची सांखळी संकस बनवितां येणार नाहीं. तसेंच मीमांसाशास्त्रहि असंदिग्धतेमुळें डळमळूं लागेल. कारण त्या शास्त्रांत शब्दप्रामाण्यावर फार रोंख आहे. हें सर्व खरें. तथापि कडकडीत व रुक्ष अशा शास्त्र्यांनाहि अलंकाराची मदत घेतल्याशि-वाय आपले सिद्धांत लोकांच्या गळीं उतरविणें कठीण होतें. वक्तृत्वाच्या पोटीं विकारवशता किंवा एक प्रकारची फसवणूक असली तरी शास्त्री लोकांनाहि वक्तृत्वाचा मोह सुटलेला नसतो. याचें एक गमतीचें उदाहरण म्हणून असलाच एक रुक्ष तर्कशास्त्री इंग्रज लॉक् याचें देतां येईल. त्यानें 'Human Understanding' नामक आपल्या पुस्तकांत ( तृतीय विभाग, अध्याय १० ) अलंकारिक भाषेवर अतिशय कोरडे ओढले आहेत. पण एके ठिकाणीं अशी मौज झालेली आहे कीं, " कांहीं तरी ज्ञान लोकांस करून द्यावयाचें एवढेंच प्रयोजन आहे त्या ठिकाणीं शब्दांचा अलंकारिक उपयोग करणें, सदोष अतएव वर्ज्य मानावें. हेंहि म्हणणें धाडसाचें आहे. परंतु मला म्हटल्याशिवाय राहवत नाहीं " – हें वाक्य

लिहून लगेच पुढचें वाक्य त्यानें असें लिहिलें आहे—" कारण वक्तृत्व हें स्त्रियांच्या सौंदर्यासारखें आहे. त्याचा पगडा मनुष्यमात्राच्या मनावर इतका बसलेला असतो कीं, त्याच्याविरुद्ध ब्र काढण्याचीहि कोणाची छाती होऊं शकत नाहीं. बोलून चालून आपली फसवणूक करून घेण्यांतच मनुष्याला सुख वाटतें; आणि ही फसवणूक करण्यास ज्याच्या योगानें ललितकलेचें स्वरूप व महत्त्व प्राप्त होतें त्या अलंकारशास्त्राला नांवें ठेवण्यांत फारसा फायदा नाहीं. " (Eloquence, like the fair sex, has too prevailing beauties in it to suffer itself ever to be spoken against; and it is in vain to find fault with those arts of deceiving wherein men find pleasure to be deceived. ) प्रत्यक्ष, शाब्द, अनुमिति व उपमिति हीं चार प्रामाण्यें घेतलीं तरी, त्यांत उपमिति हें प्रामाण्य सर्वांत अधिक बलवान व सर्वांत अधिक उपयोगांत आणलेलें असतें असें आढळून येईल. उपमिति म्हणजे उपमा किंवा दृष्टांत देणें किंवा रूपक बनविणें; व या प्रामाण्याचा उपयोग अगदीं नैय्यायिक किंवा मीमांसक पद्धतीनें लिहिणाऱ्या बोलणाऱ्या शास्त्री लोकांनाहि पदोपदीं करावा लागतो. रस हा काव्याचा आत्मा असेल, पण अलंकृत भाषा हा त्या रसरूपी आत्म्याचा निदान देह होय. आणि देहाव्यतिरिक्त आत्मा जसा सहसा पाहावयास मिळत नाहीं, तसा अलंकृत भाषेव्यतिरिक्त रसहि फारसा पहावयास मिळत नाहीं.

भावनेंतहि स्पष्ट भावना व अस्पष्ट भावना असा फरक करतां येतो हें वर दर्शविलेंच आहे; व या दोहोंत अस्पष्ट भावनेचेंच प्रमाण मनुष्याच्या वाक्व्यवहारांत एकंदरीनें अधिक आढळून येईल. अस्पष्ट भावना प्रगट करण्याला आडपडद्यानें बोलणाऱ्या अलंकृत भाषेचें फार साहाय्य होतें. आणि अलंकृत भाषा ही कवितेंत जशी शोभते तशी गद्यांत शोभत नाहीं हें वर सांगितलेंच आहे. तात्पर्य, कविता ही केवळ उत्कट भावनांकरितांच राखून ठेविली पाहिजे, किंवा इतर कामीं तिचा उपयोग केला तर तो दुरुपयोग होय असें म्हणण्याचें कारण नाहीं. त्यांतल्या त्यांत ठराविक नऊ रस घेतले तर श्रृंगार, वीर, करुण हे सामान्य व्यवहारांत फार थोडे येऊं शकतात. हास्य व अद्भुत ( आश्चर्य ) या रसां-

नींच मनुष्यव्यवहाराचें पुष्कळसें क्षेत्र अडविलेलें आढळतें. अर्थात् पुष्कळसा मनुष्यव्यवहार काव्याच्या द्वारें वर्णन करण्याला सत्पात्र ठरतो.

नवीन ज्ञान होण्याचा प्रत्येक प्रसंग हा आश्चर्याचाच प्रसंग होय. इंग्रजींत I wonder याचा मूळ अर्थ I want to know असा आहे. यावरून नवीन ज्ञान व आश्चर्यगर्भ अद्भुतरस यांची जोडी अखंड कशी पडते हें लक्षांत येईल. भौतिकशास्त्राच्या मतें एक Atom म्हणजे परिमाणू हा जर फोडतां आला तर त्यांतून फार प्रचंड शक्ति निर्माण होऊं शकते. तोच दाखला घेऊन असें म्हणतां येईल कीं, मनुष्याच्या अज्ञानाचा कोणताहि कण जेव्हां फुटतो तेव्हां त्या ठिकाणीं आश्चर्याची अद्भुत शक्ति प्रगट होते. हा ज्ञानजन्म–महोत्सवाचा क्रम जगाच्या प्रारंभापासून सुरू असून जगाच्या अंतापर्यंत चालणारा आहे. कारण ज्ञान हें अनंत व अमर्याद आहे. म्हणून आश्चर्याला, अद्भुतरसाला, व तदनुषंगानें हास्यरसालाहि जगाच्या अंतापर्यंत वाव राहणार. आणि हास्य व अद्भुतरस हे जर काव्याचे आधार होऊं शकतात, तर काव्याला जगाच्या अंतापर्यंत जगण्याची आणि सामान्य व्यवहारांतहि भाग घेण्याची सनद आपोआपच प्राप्त होते असें कां म्हणूं नये ?

पद्यावर सकृद्दर्शनीं गद्यापेक्षां अधिक बंधनें असतात म्हणून पद्यरचना विशेष अवघड होते असें दिसतें व तें कांहीं अंशीं खरेंहि आहे. परंतु या प्रश्नाला दुसरीहि एक बाजू आहे. ती अशी कीं, एकदां हीं थोडीशीं बंधनें पत्करलीं कीं, उलट इतक्या सवलती पद्यकाराला मिळूं शकतात कीं कांहीं दृष्टींनीं गद्य लिहिण्यापेक्षां पद्य लिहिणेंच पुरविलें असेंहि सिद्ध करतां येईल. हरबर्ट स्पेन्सर यानें असें म्हटलें आहे कीं, " वाङ्मय-सेवकानें अगदीं नाइलाज झाला तरच पद्य लिहावें, कविता लिहावी, नाहींतर गद्यच लिहावें. " हरबर्ट स्पेन्सर हा शास्त्राभ्यासी, शास्त्रविवेचक अगदीं काटेकोर विचार करणारा, व अगदीं मोजकें लिहिणारा असल्यामुळें, त्याला पूर्वीं उल्लेखिलेला तत्त्ववेत्ता लॉक याच्याप्रमाणें कवित्वाची भीति वाटावी किंबहुना सत्यावर तें एक संकट किंवा गंडांतर वाटावें, आणि कविता लिहिणें हा केवळ आपद्धर्म वाटावा हें ठीकच आहे. पण त्याप्रमाणें कार्लाइल हा स्वतः पुष्कळसें काव्यमयच गद्य लिहीत असतां त्यानेंहि

म्हटलें आहे कीं, ' अन्तःकरणांतून न थांबवितां येण्यासारखा उमाळा व तांतडीचा संदेश येईल तेव्हांच कविता लिहावी.'

स्पेन्सरपेक्षां कार्लाइलच्या या विधानाचें कोणासहि विशेष आश्चर्य वाटेल. या दोनहि विधानांत सत्य नाहीं असें नाहीं. पण त्याबरोबर हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे कीं, जेथें अगदीं स्पष्ट, शुद्ध, कातीव, रेखीव, अनलंकृत, निःसंदेह भाषा एखाद्या कायदेमंडळाच्या कायद्यांतल्याप्रमाणें वापरावी लागते, किंवा गणितबद्ध वा गणितप्राय शास्त्राच्या सिद्धांतांतल्याप्रमाणें वापरावी लागते, असे प्रसंग लेखनव्यवहारांत थोडे किंवा मोजकेच असतात. पुष्कळसा लेखनव्यवहार स्वतःचा आनंद, विनोद, किंवा माणसामाणसांतील साधा सोपा युक्तिवाद व मनाचा अनुनय यांनींच व्यापलेला असतो. म्हणून तिकडले स्पेन्सर किंवा मिल्, अथवा इकडले तार्किक किंवा मीमांसक यांच्याप्रमाणें, सर्वस्वीं रुक्ष अशी रेखीव अनलंकृत भाषा लिहिण्याची आवश्यकता नसते. सामान्य भाषाव्यवहार पाहिला तरी त्यांत सर्वस्वी मर्यादित, हिशेबी, गंभीर व विचारपूर्ण भाषण किती असतें आणि चालचलाऊ, तुटक, स्फुट, लंगडें, मोडकेंतोडकें पण हास्यविनोद व व्यवहारक्षमता यांनीं भरलेलें भाषण किती असतें याचें प्रमाण लक्षांत घेतलें असतां, काव्याचा व्यवहार हा लौकिक भाषाव्यवहारांतच समाविष्ट होईल. मला तर पुष्कळ वेळां असें वाटतें कीं, स्पेन्सरनें इषारा दिल्याप्रमाणें अंतःकरणांतील दुर्दम क्षोभाच्या कपिलाषष्ठीच्या वेळींच कविता लिहिणें हें तर अनवश्यकच, पण हल्लीं लोक लिहितात याहून अधिक कविता कां लिहीत नाहींत याचेंच नवल वाटतें.

भाषण व लेखन यांचे उदात्त, गंभीर, प्रचंड शब्दावगुंठित, जड, वजनदार, असे प्राचीन नमुने आतां वहिवाटींतून निघून जाऊन, त्यांचे जागीं लिखाण व भाषण हीं लहान, सुटसुटीत, सोप्या शब्दांचीं व हास्यविनोद यांनीं भरलेलीं अशींच दिवसेंदिवस अधिकाधिक लोकप्रिय होत चाललीं आहेत. सीसरो व डेमॉस्थेनिस, किंवा बर्क व शेरिडन, यांचें यार्डांनीं मोजण्याचें वक्तृत्व नाहींसें होऊन, हल्लीं विलायतेंतील मजूर पक्षाच्या तोंडीं आढळणारें, म्हणजे इंचांनीं व तसूंनीं मोजण्यामापण्यासारखें वक्तृत्व प्रभावी होऊं लागलें आहे. हल्लीं संस्कृत ग्रंथ कोणी लिहित नाहींच, पण जरी लिहिला तरी बाणभट्टपद्धतीचा लिहीत नाहींत, तर कै.

वे. शा. सं. राशिवडेकरशास्त्र्यांनीं काढलेल्या संस्कृत वर्तमानपत्राच्या धर्तीवर लिहितात. फार काय पण पन्नास वर्षांपूर्वींची कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांची प्रगल्भ संस्कृतप्रचुर व धीरोदात्त लेखनपद्धति जाऊन, तिच्या जागीं अगदीं सोपी भाषा येऊन बसूं लागली आहे. याचा अर्थ गद्यानें जरी आपली जागा पद्याच्या स्वाधीन केली नाहीं, तरी त्यानें असें एक नवीन स्वरूप धारण करण्याचा उपक्रम केला आहे कीं, कोणी करावयास बसला तर त्या गद्याचें पद्य करण्याला त्याला फारसे श्रम पडणार नाहींत.

प्रो. माधव त्रिंबक पटवर्धन यांनीं ' छंदोरचना ' नामक आपल्या वाङ्मयचिकित्सा ग्रंथांत असें म्हटलें आहे कीं, " पद्याची भाषा गद्यास जितकी जुळणारी अधिक तितकी पद्यकाराची कुशलता अधिक दिसून येते. " गद्याची भाषा व पद्याची भाषा या जवळ जवळ येऊं लागल्या आहेत, आणि पद्यकाराला ज्या विशेष सवलती म्हणून असतात त्यांचा फायदा पद्यकारानें होईल तितका कमी घेतला तर गद्य व पद्य यांची भाषा हल्लींहूनहि एकमेकांच्या अधिक जवळ येण्यास हरकत पडणार नाहीं. बोगदा खोदावयाचा तर तो दोनहि तोंडांनीं खोदावा म्हणतात त्याप्रमाणें गद्यलेखक व पद्य लेखक या दोघांहिकडून प्रयत्न झाल्यास, गद्य व पद्य यांची सांधजोड होऊन त्यांत दोहोंच्या तोंडून प्रकाश खेळत राहील. रा. विनायकराव भावे यांनीं ' महाराष्ट्र सारस्वत ' या पुस्तकांत हेमाद्रीकृत लेखनकल्पतरु या नांवाच्या एका ग्रंथाच्या एका भागांतील प्रगट, गुप्त, प्रगल्भ वगैरे लेखन प्रकारांचा उल्लेख केलेला आहे. त्यांत चित्ररचना म्हणून एक प्रकार आहे. तो असा कीं, त्यांत लिहिलेला मजकूर नीट ग्रंथांत लिहिलेला असला तरी योग्य ठिकाणीं यति दिला असतां व भाग पाडिले असतां, तोच मजकूर अभंग आर्या गीति वगैरे वृत्तांत वाचतां यावा. मजकूर गद्यात्मक असतां तो अभंग गीति व निरनिराळे छंद यांच्यासारखे हेल काढून वाचतां किंवा गातां येण्याचीं कांहीं उदाहरणें त्यांनीं दिलीं आहेत तीं गमतीचीं आहेत. त्यांत हा चमत्कार आहे कीं कांहीं ठराविक जागीं यमक साधण्यासारखीं अक्षरें आणलेलीं आहेत. यामुळें यतिदर्शक चिन्हें काढून टाकलीं कीं, तें गद्य होतें. व जेथल्या तेथें तीं दिलीं कीं पद्य होतें. गद्य व पद्य यांची भाषा शक्य तितकी जवळ जवळ

यावी व एकासारखी एक असावी असें जें प्रो. माधवराव पटवर्धन म्हणतात त्याचा अर्थ मात्र असा घ्यावयाचा नाहीं कीं वरील प्रकारचें क्लिष्ट, कूटात्मक गद्य किंवा पद्य लेखकांनीं लिहावें. कारण तो चित्रकाव्याप्रमाणें एक प्रकारचा पोरखेळ आहे. म्हणजे त्यानें करमणूक होत असली तरी ती अगदीं ग्राम्य प्रकारची करमणूक होय. प्रो. पटवर्धन यांचें म्हणणें मुळींच तसें नाहीं. त्यांचें म्हणणें इतकेंच कीं कवीनें पद्य लिहिलें आणि भाषा सर्वस्वी रसगर्भ रसपूर्ण असली तरी, ती साधी सोपी अकृत्रिम असावी; आणि कवींना सवलती घेतां आल्या तरी त्यांनीं त्यांचा फाजील उपयोग करून आपल्या भाषेला फारसें विकृत करूं नये. तिला कोने, कोपरे, टेंगळें आणूं नयेत, व तिजमध्यें तऱ्हेवाईकपणा (Mannerism) फारसा दिसूं नये. पण अशी भाषा वापरली तरी गद्याच्या व पद्याच्या शरीररचनेंत व विशेषत: स्वभावरचनेंत असा कांहीं मूलग्राही फरक आहे कीं, एकाचें रूपांतर दुसऱ्यांत सहसा होऊं शकत नाहीं. आणि गद्य लिहावयाचें तर गद्याचेंच धोरण ठेवून व पद्य लिहावयाचें तर पद्याचेंच धोरण ठेवून लिहावें लागतें. आणि हें धोरण न संभाळलें गेलें तर क्वचित हास्यास्पदताहि उत्पन्न होते.

एकीकडे कविता सोपी व प्रासादिक करण्याकडे कांहीं लोकांचा इतका कटाक्ष असतां, दुसरीकडे याच्या अगदीं उलट अशी प्रवृत्ति दिसून येत आहे. म्हणून त्यासंबंधीं दोन शब्द लिहावेसे वाटतात. ही प्रवृत्ति अमेरिकेंतील कांहीं कवींमध्यें दिसून येत आहे व तिचा सांप्रदायहि बनत चालला आहे. ही प्रवृत्ति दुर्बोध कविता किंबहुना अशक्यबोध अशी कविता लिहिण्याची. काव्य हें इतरांपेक्षां तें निर्माण करणारालाच आधीं गुंगविण्याला समर्थ झालें पाहिजे हें खरें. कारण जो कवि स्वतःच गुंगत नाहीं तो दुसऱ्याला कसा गुंगविणार ? काव्याचा खरा धर्म प्रथम स्वतः कवीला व नंतर जगाला गुंगवून सोडण्याचा आहे. पण अलीकडे कित्येक कवींना शून्यसंशोधनाप्रमाणें आत्मगुंजनाचा असा कांहीं अकल्पित चाळा लागलेला आढळतो कीं, त्यांच्या कवित्वाची सर्व शक्ति स्वत: कवीच्या आत्मगुंजनांतच खर्च होऊन जाते, व इतरांना त्या काव्याचा कांहींच बोध होऊं शकत नसल्यानें त्यांचें गुंजन त्या काव्यापासून होत नाहीं. मुद्राराक्षस नाटकाच्या कथानकांत गुप्त हेरासंबंधानें एक श्लोक मोठा

चांगला घातला आहे. त्याचें मराठी भाषांतर असें—

पीऊनि निरवशेषा कुसुमरसा आपुल्या कुशलतेनें ।
गुंजन भृंग करी तें इतरांचें कार्य सफलतेतेनें ॥

हा श्लोक सांकेतिक आहे. पण लक्षणेनें त्याचा अर्थविस्तार केला असत काव्याच्या हेतूवरहि त्यापासून योग्य प्रकाश पडूं शकतो. तो असा कीं, खऱ्या काव्यामध्यें भावनेची स्फुटता व अस्फुटता यांचें मिश्रण कांहीं एका योग्य प्रमाणांत होणें हाच काव्याचा उत्तम गुण होय. म्हणून एके पक्षीं सर्वस्वी उत्तानार्थ असें काव्य वाचकाला रंजवीत नाहीं; कारण त्यांत वक्रोक्तीला किंचितहि जागा राहात नाहीं; व त्यांतून ध्वनीचें अनुकरण होऊं शकत नाहीं. आणि प्रसाद हा जरी काव्याचा एक गुण मानिला तरी प्रसाद म्हणजे उत्तानत्व नव्हे. शब्द सोपे असावे. शब्दार्थ समजण्याला फार अडचण पडूं नये. पण काव्यप्रबंध हा केवळ वाच्यार्थ-प्रधानच असावा असें नाहीं. त्यांत वाचकाच्या कल्पनेच्या लीलेला थोडीबहुत तरी कूस किंवा जागा उरावी. दुसरे पक्षीं याच्या अगदीं उलट प्रकारचा दोष म्हटला म्हणजे वाचकांना मुळींच अर्थ न कळेल अशी नितांत गूढ काव्यरचना करणें हा होय. पण पुष्कळ वेळां दोषांनाच गुणांचें स्वरूप येऊन त्यांचें शास्त्र बनून त्याची अनुयायीपरंपराहि निर्माण झाल्याचें आपण इतर कित्येक गोष्टींत पाहतों. त्याप्रमाणें काव्याच्या बाबतींतहि तें घडून येत आहे.

कवीचें गुंजन हें तीन प्रकारचें असूं शकतें. (१) फक्त स्वतःला ऐकूं येणारें (२) मुद्दाम दुसऱ्याला ऐकविलेलें (३) दुसऱ्यांना मुद्दाम ऐकविलेलें नव्हे परंतु सहज ऐकूं आलेलें. यांपैकीं कवि हा दुसऱ्यांना ऐकूं यावें म्हणून मुद्दाम गुंजन करतो ही कल्पना थोडीशी निरस वाटते. याच्या उलट दुसऱ्यांना मुळींच ऐकूं न जावें अशा प्रकारचें गुंजन कवीनें केलें तर जगाला तें केलें व न केलें सारखेंच! पण गुंजनाचा जो तिसरा प्रकार तो श्रेष्ठ व सरस होय. म्हणजे कवि गुंजन करतो तें लोकांना मुद्दाम ऐकूं जावें म्हणून करीत नाहीं; तें मुख्यतः आपल्या आनंदाकरितांच करतो, पण लोकांना ऐकूं जाईल इतकें तें स्पष्ट व मोठें असतें. यामुळें त्या गुंजनाचा स्वतः त्याच्याप्रमाणें इतरांनाहि आनंद सेवन करतां येतो. हा तिसरा प्रकार काव्यासंबंधाचें कौतुक व Romance वाढविणारा

आहे. वस्तुतः आपलें काव्यगुंजन दुसऱ्यांना कळूं नये अशी कवीची इच्छा सहसा नसते. किंबहुना दुसऱ्यांनीं तें ऐकलें व तें ऐकून त्यांना आनंद झाला असें कवीला कळल्यानें त्याला बरेंच वाटतें. किंचित् कुचेष्टा करून मी असें म्हणेन कीं, हल्लीं आपली कविता गाऊन लोकांना म्हणून दाखविण्याचा जो परिपाठ पडून वाढत आहे तो वरील गोष्टीचाच पुरावा निःसंशय होय. या दोहों प्रकारांतील एक दुसऱ्याहून अधिक सरस म्हटला तरी दोनही प्रकार आपणांस समजूं तरी शकतात. पण जो तिसरा प्रकार शिल्लक उरतो तो मात्र समजणें कठीण आहे. या प्रकारच्या कवींचा अमेरिकेंत एक नवा सांप्रदायच बनूं पहात आहे. यांना मॉडर्निस्टस् असें नांव आहे, व त्यांच्या संप्रदायाला The cult of the unintelligible असें नांव कांहींनीं दिलें आहे. त्यांचा उद्योगच असा कीं कविता लिहावयाची ती दुसऱ्या कोणास बहुधा समजणार नाहीं अशीच लिहावयाची ! या कवींना अशी इच्छा असते कीं आपली कविता लोकांनीं वाचावी, पण त्याबरोबर अशीहि अपेक्षा असते कीं, ती त्यांना समजावयाची नाहीं. म्हणजे न समजतां त्यांनीं वाचावी, व त्या न समजण्याच्या कारणानें त्यांनीं आनंद मग्न व्हावें असें त्यांचें तत्त्व असतें. मग या कवितेला नांव तरी काय द्यावयाचें ? अशा कवित्वाची मीमांसा तरी कशी करावयाची ? ही मीमांसा त्यांचे कांहीं पक्षपाती टीकाकार कशी करतात हें पहा. एक म्हणतो, त्यांचें कवित्व हा अंतरंगाच्या गिरिकुहरांत पेटलेल्या ज्वालामुखींतील रस असतो म्हणून तें लोकांना कळण्यासारखें नाहीं. दुसरा म्हणतो, या कवींचें मन विचार करूं लागण्यापूर्वींच त्यांच्या तोंडून उद्‌गारांची वाफ निघून जाते, मग त्यांचा अर्थ कोण कसा लावणार ? कोणी म्हणतो, अर्थ समजण्याला तर्काची कांहीं तरी मदत लागते; पण तर्क हा काव्याचा विध्वंसक म्हणून हे कवि आपल्या काव्यांत तर्काचा मागमूसहि ठेवूं देत नाहींत. एक म्हणतो, स्थल व काल यांचीं बंधनें मानणारा तो कवि कसला ? व दुसरा म्हणतो कीं, अतिरिक्त मद्यप्राशन केलें असतां मनुष्याची जी स्थिति होते ती ज्याची होईल तोच खरा कवि.

पण ही मीमांसा सोडून दिली असतां, आत्मगुंजन किंवा अश्रुतगुंजन करणाऱ्या या कवींच्या काव्याची दुसऱ्याहि एक प्रकारची मीमांसा देणारे कांहीं टीकाकार आहेत. मानसशास्त्रांतील प्रयोगांचा आधार घेऊन ते

म्हणतात कीं, हे कवि म्हणजे अगदीं बाल्यावस्थेंतील मुलें होत. लहान मुलांचा धर्म असा कीं, तीं आपल्याशींच बोलत असतात. त्यांचें बोलणें हें अर्थातच कांहीं तरी शब्दांनीं उमटतें. मात्र त्या शब्दांना अर्थ असतोच असें नाहीं; व ते शब्द सार्थ असले तरी त्यांच्यामध्यें परस्पर इतकी असंगति असते कीं त्यांच्या समुदायांतून कांहींच अर्थ निघत नाहीं. इतकें असूनहि मुलें आपल्या बरोबरीच्या दुसऱ्या मुलांना उद्देशूनच जणुं कांहीं बोलत आहेत अशीं बोलतात. आणि उलट तींहि बिचारीं स्वत: असेंच बोलत असतात. पण वस्तुत: एकाचा तो प्रश्न नसतो, किंवा दुसऱ्याचें तें उत्तर नसतें. अशा रीतीनें परस्परांत शब्दव्यवहार चालू असतो. तिऱ्हाइताला मात्र हीं मुलें एकमेकांला उद्देशून बोलतात व त्यांचें एकमेकांचें बोलणें एकमेकांला समजतें असा समज होतो, पण तो वस्तुत: खरा नसतो.

आपल्या इकडे हल्लीं अशा प्रकारचे आत्मगुंजक कवि थोडे आहेत. कदाचित् रवींद्रनाथ टागोरांसारख्या कांहीं कवींना हें नांव कांहींसें देतां येईल. परंतु आपलें कवन कवित्व दुसऱ्याला हरप्रयत्नानें ऐकवावें व त्यांनीं तें ऐकण्यांत आनंद मानावा अशाच इच्छेचे व प्रवृत्तीचे पुष्कळ कवि आढळतात. आणि विनोदी लेख व नाटकें यांतून अशा कवींची थट्टा केलेलीहि आपणाला दिसते. म्हणून या दोन टोकांचे कवि वगळून म्हणजे दुसऱ्यापासून अर्थ चोरून नुसते त्यांना पद्यात्मक शब्द देणारे कवि, आणि स्वत:च्या काव्याचा अर्थ स्वत: समजावून सांगणारे, आपल्या कवनांचा अर्थ लोकांना स्पष्ट होण्याकरितां त्यांना तीं आवेशयुक्त किंवा हावभाव करून किंवा गोड गळ्याची मदत घेऊन म्हणून दाखविणारे, व श्रोत्यांवर एक प्रकारें जुलूम करणारे कवि, हे दोनहि त्याज्य समजावेत; आणि खरे कवि तेच म्हणावे कीं जे स्वत: गुंजन करून त्यांत रमतात, आपण होऊन आपलें गुंजन मुद्दाम लोकांना ऐकवीत नाहींत, पण ज्यांचीं कवनें हातीं घेऊन सहृदय वाचक स्वतंत्र रीतीनें तीं वाचं शकतात, समजूं शकतात, व त्यांच्या अर्थाचा आनंद लुटूं शकतात.

कवितेला छंद, वृत्त व ताल यांचीं बंधनें असतील पण तीं फारशीं जाचक नाहींत. ताल आणि आरोह व अवरोह यांच्यामुळें शब्द सुचण्याला थोडीशी मदत होते, यामुळें बंधनाचा थोडासा मोबदला मिळतो असें म्हणतां येईल. यमकाचेंहि बंधनसें वाटतें, पण यमकानें नुसते शब्दच नव्हे

तर कल्पनाहि सुचतात. आपल्या पहिल्या कविसंमेलनाचे अध्यक्ष कविवर्य तांबे यांनीं निर्यमक कवितेची थोडीबहुत स्तुति आपल्या भाषणांत केली आहे. पण तिचा अर्थ इतकाच कीं, यमक नसले म्हणून कविता त्याज्य ठरत नाहीं. कारण स्वत: तांबे हे निर्यमक कवितेला अनुकूल असे दिसले तरी, स्वत: त्यांनीं तशा कविता किती लिहिल्या आहेत हें पाहिलें म्हणजे त्यांना निर्यमक कविता व सयमक कविता यांपैकीं कोणती अधिक आवडते हें आपोआप कळून येईल. गायनामध्यें ज्याप्रमाणें रागाला मुख्य वादीस्वर मधून मधून लावीत गेल्यानें व तो घोळविल्यानें गोडी उत्पन्न होतें व रागाचें स्वरूप स्पष्ट प्रगट होतें, त्याप्रमाणें कवितेंत यमक साधल्यानें, म्हणजे ठराविक अक्षरांची ठराविक वेळानें पुनरावृत्ति झाल्यानें, तेथेंहि गायनानंदाचा आभास होतो. कविता सयमक आहे असें एकदां समजल्यावर, ठराविक क्रमानें अक्षरांची पुनरावृत्ति होण्याची अपेक्षा आपोआपच उत्पन्न होते. आणि त्यामुळें दुहेरी लाभ होतो तो असा कीं, अपेक्षा सफळ होणें हा एक आनंद व अपेक्षा अनपेक्षित म्हणजे चमत्कारिक रीतीन सफळ होणें हा दुसरा आनंद. गायन ऐकणारे मार्मिक लोक ज्याप्रमाणें समेच्या टाळीकरितां टपून बसतात, तसेच कवितेचे वाचक व श्रोते यमकगर्भशब्द पुढें कोणता येईल हें पाहण्याकरितां टपून बसतात. आणि आपणाला न सुचलेल्या अशा रीतीनें कवीनें तो शब्द घालून ती अपेक्षा पूर्ण केली म्हणजे त्यांना सहजच आनंद वाटतो. पण श्रोत्यांच्या या लाभापेक्षां स्वत: कवीला लाभ असा कीं, यमकानें मोठ्या चमत्कारिक कल्पना सुचतात, व नुसती चमत्कृतीदेखील आश्चर्य उत्पन्न करूं शकते. सयमक कविता लिहिण्यापेक्षां निर्यमक कविता लिहिणें हें निःसंशय अवघड आहे, म्हणजे त्यांत यमकापासून कल्पनेला मिळणाऱ्या मदतीला कवी आंचवतो. मी म्हणतों तें खरें कीं खोटें हें येथें जमलेल्या कवींनीं स्वत:शीं प्रत्यक्ष प्रयोग करून पाहावें. आतां यमकाच्या नादीं लागून भलती सलती कल्पना सुचली तरी ती यमक साधण्याकरितां दडपून देणें हें अर्थात् वाईटच; व अशीं उदाहरणें कवि मोरोपंतांच्या कवितेंत पुष्कळ दाखवून देतां येतील. परंतु अनेकाक्षरी यमकें साधण्याची हौस त्या कवीनें बाळगली म्हणून त्याजवर तो प्रसंग आला. खरें यमक एखाद दुसऱ्या अक्षरानेंहि साधतें. मात्र व्याकरणदृष्ट्या शब्दाचीहि अक्षराप्रमाणें पुनरावृत्ती न व्हावी. एकाक्षरी

यमकानें संतोष मानल्यास यमकापासून तोटा न होतां त्याचे सर्व फायदे कवीला घेतां येतील.

असो. आतां काव्याच्या विषयाकडे थोडेसें वळूं. काव्याचें वर्गीकरण अनेक रीतीनें करण्यांत येतें. पण माझ्या मतें काव्य लिहितांना कवि हा अंतर्मुख आहे कीं बहिर्मुख आहे यावरून ठरणारें वर्गीकरण हेंच मुख्य होय. आणि मग तें महाकाव्य आहे, कीं लधुकाव्य आहे, कीं खंड काव्य आहे, कीं लिरिक आहे, कीं सुनीत आहे, कीं पोवाडा आहे, कीं नाटयात्मक काव्य आहे हे भेद गौण होत. कवि अंतर्मुख आहे कीं बहिर्मुख आहे या गोष्टीमुळेंच काव्याच्या कोणत्याहि प्रकारावर काव्याची खरी छटा उमटेल. आणि वरीलपैकीं काव्याचा कोणताहि प्रकार अंतर्मुख किंवा बहिर्मुख कवि लिहूं शकेल. हे व इतर अनेक काव्य प्रकार या दोनहि वृत्तींशीं सुसंगत असेच आहेत. यापैकीं कोणत्याहि प्रकारानें काव्य लिहिलें तरी त्यांत एक मुख्य गोष्ट साधावयाची असते ती ही कीं, हें जग किंवा विश्व किंवा त्यांतील जीवचरित किंवा वस्तुसौंदर्य हीं पाहून कवीला काय कल्पना सुचतात किंवा कोणत्या भावना उत्पन्न होतात हें काव्याच्या द्वारें त्याला स्वतःला व तद्द्वारा जगाला सांगावयाचें असतें. या दृष्टीनें पाहातां कवितेला अध्यात्मिक किंवा आधिदैविक किंवा आधिभौतिक यांपैकीं कोणतेंहि स्वरूप असलें तरी त्यांत कांहींहि बिघडत नाहीं. कित्येकांना कविता ही नुसती अध्यात्मिक ( Metaphysical ) असावी असें वाटतें. पण तें बरोबर नाहीं. कारण सृष्टि ही कांहीं नुसती अध्यात्मिक नाहीं. ती आधिभौतिकहि आहे. किंबहुना अध्यात्मिक दृष्टि ही तत्त्वदृष्टया महत्त्वाची असली तरी, तिचें कार्यक्षेत्र संकुचित असतें. निदान आधिभौतिक सृष्टीची मदत घेतल्याशिवाय अध्यात्मिक विषय पुरा रंगवितांहि येत नाहीं. गीतेंत सांगितल्याप्रमाणें विश्वाची उभारणी व संहारणी या दोनहि गोष्टी परस्परपूरकच आहेत. ज्ञान म्हणजे अध्यात्मिक ज्ञान, याच्याच बरोबरीनें विज्ञान म्हणजे भौतिक अथवा सृष्टिज्ञान याचीहि महती गीतेंत सांगितली आहे. अनेकत्वांतून एकत्व कसें सिद्ध करावें हें ज्ञानानें कळतें. उलट विज्ञानानें मूळच्या एकत्वांतून अनेकत्व कसें सिद्ध झालें हें कळतें. म्हणून ज्ञानाइतकेंच विज्ञानहि सत्य आहे, आणि आत्म्याइतकीच भौतिक सृष्टिहि खरी आहे.

ही सृष्टि मायेनें मूळ प्रकृतीपासून उत्पन्न केली म्हटलें किंवा इतर कांहीं म्हटलें, तरी ती जोंपर्यंत उत्पन्न होऊन राहिलेली असते तोंपर्यंत ती खरीच असते. म्हणजे आत्मा सृष्टि व मनुष्यजीवित या तीनहि कल्पना कवीनें सत्य धरून चालण्यास हरकत नाहीं. या तीनहि विषयांचें सत्य हें काव्यसत्य असून काव्याला आधार होऊं शकेल. हीं तीनहि प्रत्येक मनुष्याला त्याच्या शक्तीप्रमाणें थोडींबहुत प्रतीत असतातच. पण कवीचें कवित्व हेंच कीं, तो इतरांपेक्षां या तिहींचा अन्वय व अर्थ अधिक सहृदयतेनें, अधिक मार्मिकतेनें व अधिक आनंददायक रीतीनें सांगतो. अध्यात्माला महत्त्व असलें तरी केवळ एतद्विषयक कविता किती सांपडतील ? व त्या मानानें सृष्टि व मानव जीवित यासंबंधाच्या कविता किती सांपडतील ? याची तुलना केल्यास हें दिसून येईल कीं, कवीच्या कारखान्यांतील मुख्य द्रव्य म्हणजे मानवजीवित व सृष्टि हेंच होय.

एखादें मौल्यवान औषध किंवा रसायन हें एखाद्या कारखान्यांतील कारागिरीचा जिन्नस तयार होण्याला उपयोगांत आणलें तरी त्याचें प्रमाण मुख्य घटक द्रव्याशीं थोडेंच पडतें. त्याप्रमाणें काव्यनिर्मितीमध्येंहि अध्यात्माचें प्रमाण थोडेंच असतें, थोडेंच खपतें, व थोडेंच चालतें. या दृष्टीनें पाहातां धर्माचा काव्याशीं जितका संबंध तितका किंवा त्याहूनहि अधिक भौतिकशास्त्राचा संबंध काव्याशीं येणार हें उघड आहे. धार्मिक तत्त्वज्ञान कळल्याशिवायच मनुष्य अनेक प्रकारचे धार्मिक व्यवहार करीत असतो. त्याच व्यवहाराचें धर्मशास्त्राच्या दृष्टीचें स्वरूप त्याला कळलें म्हणजे त्याला अधिक आनंद होतो. आणि शेवटीं धर्मशास्त्राचाहि हेतु काय हें समजलें म्हणजे आपल्या त्याच व्यवहाराचा त्याला परमानंद होतो. दारांत भिकारी आला असतां हातानें उचलून चार दाणे त्याच्या पदरांत टाकणें हा व्यवहार दिवसानुदिवस मनुष्य केवळ संवयीनें करतो. धर्मदृष्टीनें या गोष्टीला दान म्हणतात हें कळल्यानें त्याला आपण धार्मिक कृत्य केलें असें वाटतें. आणि हें दान सात्विक केल्याची जाणीव उत्पन्न झाल्यास आपण आत्मज्ञान व मोक्षप्राप्ति यांचें एक साधन जोडलें हें कळून त्याला परमानंद होतो. त्याचप्रमाणें मनुष्य हा नित्यव्यवहारांत सृष्ट पदार्थ उपभोगितच असतो. त्या पदार्थांचें शास्त्रीय ज्ञान त्याला झालें तर उपभोगाच्या आनंदांत कमीपणा न येऊन भौतिक ज्ञानाच्या आनंदाची त्यांत भरच पडते. आणि

याहि ज्ञानापलीकडे जाऊन सर्व ज्ञानाचें जें उगमस्थान त्याची आठवण या भौतिकशास्त्रज्ञानांतून झाल्यास त्यांत तिसऱ्या व सर्वोत्तम अशा अध्यात्म-ज्ञानाच्या आनंदाची भर पडते, आणि या तिन्हींचा परामर्ष कवीला वाटेल तसा वाटेल तितका घेतां येतो. तात्पर्य सृष्ट पदार्थांचा उपभोग व आनंद हा काव्याचा विषय होऊं शकतो. भौतिकशास्त्रज्ञान हें काव्याला विरोधक होत नाहीं; उलट खरा कवि तेंच ज्ञान रुक्ष शास्त्रीय भाषेच्या ऐवजीं काव्यमय भाषेंत लोकांना पटवूं शकेल. आणि यानंतर कवि भौतिक तत्त्वज्ञानाच्या द्वारें अध्यात्मिक तत्त्वज्ञानांत शिरला म्हणजे मग काव्याच्या वातावरणांत त्याला हवें तितकें उंच व दूरवर हिंडतां फिरतां येतें. भौतिकशास्त्र हें धर्माशीं विरोधी आहे अशी जुनी समजूत होती ती आतां नष्ट झाली आहे. त्याचप्रमाणें भौतिकशास्त्र हें काव्याशीं विरोधी आहे असें अजून कांहीं थोड्या असंस्कृत मनांना वाटतें, पण ती समजूतहि लवकरच निघून जाईल.

शास्त्रीय सत्य व काव्यसत्य हीं दोन नाहींत. मूळ भांडें सोन्या-चांदीचेंच पण त्याला जिल्हई दिल्यानें, उजळा दिल्यानें त्याचें खरें तेज चमकूं लागतें. त्याप्रमाणें शास्त्रीय सत्याचें तेज त्याला काव्याचें तेज मिळाल्यानें अधिक चमकूं लागतें. शास्त्रीय ज्ञानाच्या दुधांत काव्यबुद्धीची भर ही साखरेप्रमाणें आहे. यामुळें सहृदय भौतिकशास्त्रज्ञदेखील काव्यदृष्टीची अपेक्षा करतात व तिची मदत घेतात. उलट खोल बुद्धीचे व विशाल शक्तीचे कवी हे देखील शास्त्रीय ज्ञानाचा अव्हेर करीत नाहींत, किंबहुना ते कवी नसते तर तत्त्व-ज्ञानी झाले असते. शास्त्रीय सत्य तेंच. पण तें केवळ वाच्यार्थदर्शक शब्दांनीं शास्त्रीय गद्य भाषेंत मांडणें वेगळें, व तेंच सत्य काव्याच्या अलंकारिक व भावनायुक्त शब्दांत मांडणें वेगळें. या दोहोंत रसिकतेच्या दृष्टीनें पुष्कळच अंतर आहे. याचें एक उदाहरण देतों म्हणजे लक्षांत येईल. हल्लीं मीटिरिऑ-लॉजिकल म्हणजे हवाखात्याचे अधिकारी रोजची स्थिति वर्णन करणारें एक पत्रक रोज प्रसिद्ध करीत असतात. त्यांतील शब्द ठराविक व अर्थात नीरस असेच असतात. कारण बोलूनचालून हवामानाचा रिपोर्ट. थर्मामीटर अमुक अंशावर व बॅरॉमिटर अमुक अंशावर. वाऱ्याचा वेग अमुक मैल व त्याची गति अमुक दिशेला. तसेंच कोठें आभाळ स्वच्छ तर कोठें पाऊस पडला किंवा ढग आले. अशा तऱ्हेचीं, म्हणजे पंचांग सांगावयाला आलेल्या भटाच्या तोंडून निघणाऱ्यासारखीं, वाक्यें त्यांत असावयाचीं. पण

एखादे दिवशीं हवेंत बिघाड झाला व वादळाचें स्वरूप आलें तर त्याची माहिती देतांना रिपोर्ट लिहिणाराच्या मनांत भावनेचा आविर्भाव होण्याचा संभव असतो ! आणि खरोखरच गेल्या नोव्हेंबरच्या दुसऱ्या आठवड्यांत आमच्या इकडील या खात्याच्या मुख्य अधिकाऱ्यानें प्रसिद्ध केलेल्या रिपोर्टांत, अनपेक्षित रीतीनें उठलेल्या वादळाचें वर्णन, जशी कांहीं ती योद्ध्यांची झुंज किंवा लढाई असावी असें दिलेलें वाचून मला मौज वाटली. आणि मीं मनाशीं म्हटलें कीं आज या नीरस रिपोर्टराच्या मनांत काव्यबुद्धि प्रगटली खरी ! कर्मधर्मसंयोगानें हल्लींचें हें भाषण लिहिण्याचे सुमारास मी William Henry Hudson यांचें An Introduction to the study of literature हें पुस्तक चाळीत असतां असाच एक उल्लेख सांपडला. आणि एकच प्रसंग हवामानखात्याचा नीरस अधिकारी कसा सांगेल व त्याचेंच वर्णन कवि कसें करील यांतील भेद दाखविण्याकरितां त्या रिपोर्टाचा म्हणून एक भाग व त्याच वर्णनाची एक कविता त्या पुस्तकांत दिलेली आढळली. ती खालीं दिली आहे. त्यावरून हें सिद्ध होतें कीं कांहीं व्यवहारांत नीरस गद्य लिहिण्याचा प्रघात असतो व असावा हें खरें. तरी तीच खरी हकीकत काव्यमय भाषेनेंहि सांगतां येते. मग तीहि कोणी तशी कां न सांगावी ?

वरील उतारे असे—

The east wind gathered all un known
A thick sea-cloud his Course before;
He left by night the frozen zone.
And smote the cliffs of Labradore;
He lashed the Coast on either hand
And betwixt the Cape and Newfoundland',
Into the bay his armies pour.

या चमत्काराचें वर्णन हवामानखात्याचा रिपोर्ट असें करील—

An area of extreme low pressure is rapidly moving up the Atlantic Coast, with wind and rain. Storm centre now off Charleston S. C. wind N. E. Velocity 54. Barometre 29. 6. The disturbance will reach New York on Wednesday and proceed eastward to the Banks and Bay of St. Lawrence.' Danger signals ordered for all North-Atlantic ports.

तत्वज्ञान व काव्य यांचा संबंध विरोधाचा नाहीं हेंहि वरील विवेचनावरून आपोआपच कळून येईल. कारण तत्त्वज्ञानाची अगदीं सोपी व्याख्या करावयाची तर असें म्हणतां येईल कीं, तत्त्वज्ञान म्हणजे सर्व शास्त्रांचें शास्त्र. एकेकटें शास्त्र हें फक्त एकेरी कारणपरंपरा हुडकून काढतें. तेंच तत्त्वज्ञान अनेक शास्त्रांनीं निर्माण केलेल्या कारणपरंपरांची सांखळी बनवून त्यांचा समन्वय करतें. मग त्याचा व काव्यबुद्धीचा म्हणजे प्रतिभेचा विरोध कोठें आला ? उलट त्या दोघांचें परस्पर उपकारित्वच सिद्ध होतें.

प्रत्यक्ष शास्त्राचें सत्यसंशोधनाचें कार्य चालू असतां त्याला त्या वेळापुरती भावना कशी तरी दूर ठेवावी लागते; पण तें संशोधनाचें कार्य संपल्याबरोबर त्या शास्त्राला बाहेर मिरवावयाचें तर त्या सत्याला भावनेच्याच स्वाधीन करावें लागतें. प्रयोगशाळेंत एखाद्या प्रयोगाचे वेळीं वारा नको म्हणून सर्व खिडक्या बंद कराव्या लागतात, किंवा प्रकाश नको म्हणून सर्व खिडक्यांवर काळे पडदे ओढून घ्यावे लागतात, त्याप्रमाणें शास्त्रसंशोधन सुरू असेपर्यंत भावनाहि दूर ठेवावी लागते. पण प्रयोगाचें काम संपलें म्हणजे भावनेचा वारा व उजेड यांची मदत शास्त्रकाराला घ्यावीच लागते. जी गोष्ट भौतिक शास्त्राची तीच मनुष्यजीविताची. या जीविताचा पसारा एवढा मोठा आहे व त्याला इतकीं अंगें व उपांगें आहेत कीं, कवीला तीं केव्हांहि पुरूनच उरतील. जितके अधिक पैलू पाडावे तितकें हिऱ्याचें तेज अधिक; त्याचप्रमाणें जितक्या अनेक अंगांनीं संसारचरिताचें काव्यमय वर्णन करावें तितकें तें अधिकच खुलेल. तात्पर्य, बहिर्मुख काव्य किंवा Objective Poetry इच्यासंबंधीं हल्लीं एक प्रकारचा दूषित ग्रह कोठें कोठें आढळतो तो बरोबर नाहीं, इतकेंच मला सांगावयाचें आहे.

असो. येथवर मीं पद्य, कविता, काव्य या विषयांवर केवळ कांहीं स्फुट विचार आपल्यापुढें मांडले. कोणत्याहि एका दृष्टीनें तो साग्र किंवा सुसंगत असा निबंध म्हणून लिहिलेला नाहीं. आपणाशीं खाजगी संभाषण किंवा विचारविनिमय करीत बसलों असतां, आपल्या संमेलनाच्या विषयासंबंधानें, जे कांहीं स्फुट विचार सहज सुचतील, तेच या भाषणाच्या रूपानें आपणांपुढें मांडले आहेत. हल्लीं वाङ्मयासंबंधीं बरीच चर्चा सर्व ठिकाणीं

सुरू आहे. व केवळ काव्य हा एकच विषय त्यांत नेहमीं नसला तरी, जी चर्चा सामान्यतः वाङ्मयाला उपयोगी पडते तीच काव्याच्याहि चर्चेला उपयोगी पडते. कारण वाङ्मय या शब्दाचा अर्थ विस्तृत व अधिक व्यापक असला तरी, तत्त्वतः काव्य व वाङ्मय यामध्यें अभेद आहे. अलीकडे प्रो. माधवराव पटवर्धन यांची 'छंदोरचना', रा. दत्तात्रय केशव केळकर यांचें 'काव्यालोचन' व प्रो. नारायण सीताराम फडके यांचें 'प्रतिभासाधन' व प्रो. जोग यांचें "अभिनव काव्यप्रकाश" हीं चार उत्कृष्ट पुस्तकें वाङ्मयचर्चेसंबंधीं प्रसिद्ध झालीं आहेत. या ग्रंथांतील विवेचन सोपपत्तिक, मार्मिक व खऱ्या संशोधक बुद्धीचें असल्यामुळें, त्या ग्रंथांचा मी आज या ठिकाणीं मुद्दाम उल्लेख करतों. आणि मला अशी आशा आहे कीं, एकीकडे मराठी भाषेंत आधुनिक स्वरूपाच्या काव्याची निर्मिती अधिकाधिक होत जाईल व त्याबरोबरच वरील प्रकारचे चर्चात्मक ग्रंथहि निमार्ण होतील. कोणत्याहि कारखान्याला लहानमोठी रसायनशाळा हटकून जोडलेली असते. तिचा उद्देश हाच असतो कीं, कारखान्यांत नवीन पदार्थ जसजसा बनत जाईल तसतसे त्याचे नमुने घेऊन त्यांचें रासायनिक पृथक्करण करीत रहावयाचें. हेतु हा कीं, नवीन बनणाऱ्या पदार्थाचे गुणधर्म योग्यायोग्य कसे काय उतरत आहेत हें ताबडतोब लक्षांत यावें. म्हणजे मग त्यांतील गुण कसे वाढतील व दोष कसे कमी होतील याविषयीं कारखानदार आपली कल्पना चालवील. मी प्रथमच आपणाला सांगितलें कीं, मी कोणी कवि आहें या बुद्धीनें येथें आलेला नाहीं. पण काव्याचें महत्त्व व त्याचा उपयोग हीं दोन्हीं मला पटतात, आणि आपल्या काव्यानें तुम्हाला आनंद उत्पन्न करण्याची पात्रता माझ्यामध्यें नसली तरी, इतर कवींच्या काव्यांतील सौंदर्याचा आनंद सेवन करण्याची थोडीशी पात्रता माझ्यामध्यें आहे इतकें मात्र मी म्हणूं शकतों. आणि त्यामुळेंच मी ही वरील चर्चा केली आहे.

असो. आपण या संमेलनाला 'कविसंमेलन' हें नांव दिलें म्हणून त्याला अनुसरून मीं पद्य व काव्य यासंबंधानें चर्चा केली. तथापि संमेलनाचें नांव जुनेंच असलें तरी, त्याच्या कार्याची व्याप्ति अगदींच एकदेशीय न ठेवितां आपण येथें इतर विषयांचीहि चर्चा करणार असल्याचें

समजतें. माझ्या मतें कार्य विस्ताराचें हें धोरण बरोबर असून कदाचित् पुढेंमागें कविसंमेलन हें नांव बदलून आपण दुसरें एखादें अनुरूप नांव त्याला द्याल असाहि संभव आहे. आणि तसें झालें असतां हल्लीं मराठी साहित्यसंमेलन या नांवानें काम करीत असलेल्या संस्थेला कोणत्याहि तऱ्हेनें विघात होईल असें मला वाटत नाहीं. किंवा असेंहि म्हणतां येईल कीं, मराठी साहित्यचर्चेचें कार्य इतकें महत्त्वाचें आहे कीं ती चर्चा वर्षांतून एक वेळ भरणाऱ्या एकट्या एक साहित्यसंमेलनावर न सोंपवितां, ती प्रांतानिहाय व जिल्हानिहाय आतां वांटून घेतली पाहिजे. त्याशिवाय भागणार नाहीं. राजकारणामध्यें जशी प्रांतांनिहाय स्वराज्य वांटून तोडून देण्याची व्यवस्था करण्याची जरूरी उत्पन्न झाली आहे, तशीच मराठीभाषेंतील राज्यकारभाराची अधिकारविभागणी करण्याची, म्हणजे भाऊबंदकीची वांटणी किंवा फारकत नव्हे तर सोईकरितां अधिकार तोडून सोंपवून देण्याची, ती एक प्रशस्त युक्ति आहे. आणि कार्यसिद्धीच्या दृष्टीनें ती सफलहि होते. वऱ्हाड प्रांतानें आपलें साहित्यसंमेलन वेगळें भरविण्याचा उपक्रम अलीकडे सुरू केला आहे. वऱ्हाडाकडील भाषा अधिकाधिक प्रचारांत येईल व या दृष्टीनें प्रांतिक वैशिष्ट्य सिद्ध होईल तर पहावें, म्हणून वऱ्हाडांतील साहित्यसेवकांनीं आपणाकडून प्रयत्न चालविला आहे. आणि अशा प्रयत्नाला पुण्याकडील महाराष्ट्र अवमानीत नाहीं, किंवा त्याबद्दल आपला गैरसमज करून घेत नाहीं, हें व्यक्त करण्याची संधि त्यांनीं यवतमाळ येथें भरलेल्या एका संमेलनाचा अध्यक्ष मला करून दिली. वऱ्हाडकरांचा हा प्रयत्न मला अभिनंदनीय वाटतो. याचें कारण वऱ्हाड प्रांत हा आद्यमहाराष्ट्र होय. आणि मराठी भाषावृक्षाचीं मुळें त्या जमिनींत जितकीं खोल गेलेलीं सांपडतात तितकीं पुण्याकडील नवमहाराष्ट्राच्या भूमींत सापडत नाहींत. वऱ्हाडी भाषा पुढें सरसावली तर पुणेरी मराठीला ती गोष्ट अहितकारक न वाटतां उपकारकच वाटेल. कारण वऱ्हाडी भाषेच्या द्वारें नवीन शब्दांचा भरणा वाङ्मयांत प्रविष्ट होईल व मराठीची शब्दसंपत्ति वाढेल. आणि वऱ्हाडच्या साहित्यसंमेलनाच्या योगानें मराठीच्या एका अंगाचें कार्य जसें होतें, तसेंच बृहन्महाराष्ट्रांत उपसाहित्यसंमेलनें भरल्यानें, व कविसंमेलनें भरल्यानें, उत्तर-

दक्षिणेकडील भाषांशीं संबंध आल्यानें तिकडूनहि मराठी भाषेंत नव्या शब्दांची भर पडून वाङ्मयाला अनेक रंगीपणा येईल. या दृष्टीनेंच साहित्यसंमेलनाच्या चालकांनीं मडगांव येथें कोंकणी भाषेच्या मुलुखांत, बेळगांव येथें कानडी भाषेच्या मुलुखांत, बडोदा येथें गुजराथी भाषेच्या मुलुखांत, आणि इंदूर ग्वाल्हेर येथें हिंदी गुजराथी भाषेच्या मुलुखांत, साहित्यसंमेलनाच्या बैठकी भरविल्या. अखिल महाराष्ट्राचें एकीकरण म्हणजे एकराष्ट्र होणें कठिण आहे. यामुळें महाराष्ट्राच्या सरहद्दीशीं सरहद्द न भिडणाऱ्या अशा ज्या दूरदूरच्या प्रांतांत मराठी भाषा बोलणारे लोक कायम वस्ती करून राहिले आहेत, ते महाराष्ट्राचे भाग समजून, स्थलाच्या एकीकरणाची वाण आपण इतर रीतीनें भरून काढली पाहिजे. मराठी भाषा व इतिहास यांच्यावर, महाराष्ट्रीय लोक कोठेंहि असले तरी त्यांचें जें प्रेम आहे त्याच्या भावनेनें ही उणीव भरून निघणारी आहे. प्रांतानिहाय भरणाऱ्या संमेलनांची आवश्यकता आहेच, पण त्याखालींहि कोणी गेलें तरी तें बरेंच असें मला वाटतें. आमच्या इकडे नाशिक–नगर जिल्ह्यांनीं आपलें छोटें संमेलन भरविण्यास सुरवात केली आहे. खुद्द पुण्यासहि मधून मधून एखादें स्थानिक उपसंमेलन भरतें. या आठवड्यांत उज्जयनीस येण्यापूर्वीं अशाच एका उपसंमेलनाला बडोदें येथील मित्रमंडळांनीं मला बोलाविलें होतें, व तेथें दोन दिवस चाललेलें काम मीं पाहिलें. तात्पर्य, मध्यभारतीय साहित्य-संमेलन भरूं लागलें तर तें इष्टच आहे. इंदूर येथें भरलेल्या आपल्या प्रथम कविसंमेलनाचे स्वागताध्यक्ष यांनीं आपल्या भाषणांत इकडील मराठी साहित्यसेवेचा जो आढावा काढला तो बोधप्रद आहे. त्यावरून बृहन्महाराष्ट्र हें वाङ्मयाच्या दृष्टीनें एक राष्ट्र कसें आहे हें दिसून येतें. शिवाय इकडील आग्रा अलाहाबाद युनिव्हर्सिटीसारख्या विद्यापीठांनीं ऐच्छिक शिक्षणक्रमांत मराठी भाषेला स्थान देण्याचा उदारपणा दाखविला आहे असें मी ऐकिलें आहे, व तें खरें असेल तर इकडे अशीं उपसंमेलनें भरवून वाङ्मयचर्चा होईल तिनें विद्यार्थ्यांना विशेष फायदा होण्याचा संभव आहे. म्हणून माझी आपणाला अशी सूचना आहे कीं इकडे इंदूर, धार देवास, ग्वाल्हेर, उज्जयिनी, झांशी, बनारस वगैरे जीं शहरें आहेत तितक्यांनीं मिळून दरवर्षी कोठेंना कोठें मराठी

भाषेप्रीत्यर्थ उपसंमेलन भरविलें तर फार चांगलें होईल. पुणेंमुंबईकडे ग्रंथसंपत्ति निर्माण होण्याचीं साधनें विपुल आहेत. तथापि तेवढयामुळें केवळ पुणेरीच छापानें बृहन्महाराष्ट्रांतलें मराठी वाङ्मय अधिकृत ठरावें, किंवा त्याची गोडी व सौंदर्य हीं केवळ पुणेरी मापानें मोजलीं जावीं, अशी पुण्याकडील म्हणजे मध्यमहाराष्ट्रांतील मराठी साहित्यसेवकांची इच्छा मुळींच नाहीं. कुळांतील कोणत्याहि पुरुषानें कोठेंहि पराक्रम केला तरी तो कुलाचाच मानला जावा अशी व्यापक दृष्टि ठेवणें हेंच खऱ्या राष्ट्रप्रेमाचें लक्षण आहे. आणि ती दृष्टि दिवसेंदिवस अधिक प्रसादयुक्त होवो अशी इच्छा प्रगट करून मी हें भाषण संपवितों.

---

## ३ यवतमाळ येथील विदर्भ साहित्य-संमेलन १९२६

### ( अध्यक्षीय भाषण )

या साहित्य-संमेलनाचें अध्यक्षस्थान मला दिलें याबद्दल मी आपला फार आभारी आहें. ज्या प्रांतांत संमेलन त्या प्रांताबाहेरचा म्हणचे एका अर्थानें परका गृहस्थ अध्यक्ष असावा असा एक शिष्टसंकेतच होऊन राहिलेला आहे, यामुळें कदाचित् हा मान आपण मला दिला असेल. एरवीं स्वतः आपल्या प्रांतांतच या स्थानीं बसण्याला योग्य असे अनेक गृहस्थ आहेत. श्रीमंत दादासाहेब खापर्डे यांच्यासारखे ज्ञानवृद्ध व वयोवृद्ध गृहस्थ आपणाला लाभण्यासारखे होते. दादासाहेबांचें स्वाभाविक प्रसादपूर्ण वक्तृत्व, त्यांचें प्रशस्त पाठांतर, आश्चर्यजनक उपस्थिति, रसिकता व मार्मिकता यांची सर महाराष्ट्रांत थोडयांनाच येईल, श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्यासारखे पहिल्या प्रतीचे नाटककार, कवि, टीकालेखक, वाङ्मयचिकित्सक व विनोदमूर्ति गृहस्थ वऱ्हाडचेच आहेत. श्री. बापूजी अणे हे जर स्वतः स्वागताध्यक्ष नसते तर त्यांची विद्वत्ता, कुशाग्रबुद्धि व सदभिरुचि नुसत्या येवढयाहि गुणांनीं ते या मानास सहज पात्र झाले असते. तसेंच टेकाडे व छोटे खापर्डे यांसारखे कवी, यादवराव काळे यांचेसारखे इतिहासकार, यशवंतराव देशपांडे यांचेसारखे संशोधक व चिकित्सक वगैरे वाङ्मयप्रेमी व वाङ्मयव्यवसायी गृहस्थहि आपलेच आहेत. तात्पर्य,

आपण आपला प्रांत सोडून बाहेर धांव घेतली तिला योग्य कारण वरील संकेताशिवाय दुसरें फारसें नसावें.

अध्यक्षस्थान देऊन आपण मला वऱ्हाडी तर बनविलेंच. पण लग्न-समारंभांतील वऱ्हाडी जें काम करतो त्याहून अधिक काम माझे हातून येथें होईलसें दिसत नाहीं. हें काम म्हणजे मिष्टान्नभोजन. कै. वासुदेवशास्त्री खरे यांनीं आपल्या एका नाटकांत साहित्यसंमेलन या शब्दाची कुचेष्टा केली आहे ती मला या प्रसंगीं आठवते. तूप, गुळ, साखर, सांजा वगैरे पदार्थांच्या जमावाला त्यांनीं साहित्यसंमेलन हें नांव एका पात्राकडून देव-विलें आहे, व अशा साहित्यसंमेलनाचा जो परामर्श लग्नसमारंभांतला वऱ्हाडी घेतो तोच बहुधा, आपल्या या साहित्यसंमेलनाचाहि मारूनमुटकून बनविलेला, मी वऱ्हाडी घेणार आहें.

पण मी परकी म्हणून बोलावला गेलों असें जर खरेंच असेल तर त्या-विषयीं माझी थोडीशी तक्रार आहे. कारण “ब्रह्मदेव जो स्वयें घडवितो, कोण बिघडवी त्याला ” या कविवचनावर विश्वास ठेवणारा मी आहें; म्हणून, महाराष्ट्राचे तुकडे पडतात आणि फक्त त्या एका तुकड्यांपैकीं मी महाराष्ट्रीय आहें हें मी मान्य करीत नाहीं. बृहत् म्हटला किंवा संयुक्त म्हटला तरी महाराष्ट्र हा एक व अविभाज्य आहे असें मी मानतों. किंबहुना उत्तर व दक्षिण–हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतून जीं महाराष्ट्रीय कुटुंबें कित्येक शतकें जाऊन कायमचीं किंवा तात्पुरतीं वस्ती करून राहिलीं आहेत त्या सर्वांचा समावेश मनाप्रमाणें उल्लेखानेंहि एकत्र व्हावा अशी एकादी योजना करण्याची कल्पना कानपुरास परवां निघाली व तिजविषयीं थोडीशी खटपट करून तिला काय स्वरूप येऊं शकतें हें मी यंदा पाहणार आहें. सजातीयत्वाची भावना ही रक्तसंबंध, भाषा, आचारविचार, पोषाख, व जुनी इतिहासपरंपरा यांवर अवलंबून असते व तिचे प्रेमपाश जितके दूरवर टाकून स्वकीयांचें क्षेत्र वाढवितां येईल तितकें तें वाढविणें सर्वथा न्याय्य आहे. या भावनेला पर्वत किंवा नद्या प्रतिबंध करूं शकत नाहींत. यामुळें एका बाजूस काबूल शहरीं जे कांहीं थोडे जुने महारा-ष्ट्रीय आहेत म्हणून सांगतात ते आणि दुसऱ्या टोंकास रामेश्वर, मद्रास, तंजावर, कुंभकोणम् या ठिकाणीं असणारे महाराष्ट्रीय हे जोंपर्यंत स्वतःची

ओळख विसरले नाहींत व महाराष्ट्रीय म्हणवून घेण्यांत भूषण मानतात तोंपर्यंत त्यांना दूर लोटण्याचा अधिकार कोणाला आहे ?

यांच्या अपेक्षेनें तरी मी व वऱ्हाडांतील आपण महाराष्ट्रीय अधिक एकजीव असे खास आहों. सह्याद्रीखालचें कोंकण व घाटमाथा हा प्रांत आह्माला वडिलांची जन्मभूमि असा वाटतो, तर गोदाकांठच्या जुन्या महाराष्ट्राचा प्रांत हा आम्हाला आजोबांच्या घरासारखा किंवा आजोळा-सारखा वाटतो. विदर्भ हें आपल्या प्रांताचें इतिहासप्रसिद्ध व पुरातन नाम खरें. परंतु त्याचा अभिमान धरावा किंवा आधुनिक काळीं धर्म-रक्षण व स्वराज्यसंस्थापना हीं ज्यांत घडून आलीं त्या महाराष्ट्र प्रांताच्या नांवाचा अभिमान धरावा याविषयीं आपणास मोठें कोडेंच पडलें अस-ल्यास नवल नाहीं. कारण व्यवहारांत जुन्या दाखल्याइतकेंच नव्या सत्तेला महत्त्व असतें; याकरितां शिवाजीमहाराज व त्यांचा वंश, त्यानंतर पेशवे व त्यानंतर गेल्या दोन पिढ्यांतील रानडे टिळक यांसारखे राज-कारणी पुढारी लक्षांत घेतां जुन्या विदर्भाच्या नांवाइतकेंच नव्या महा-राष्ट्राचें नांवहि आपणास प्रिय वाटेल यांत संदेह नाहीं.

वऱ्हाडाला मी आजोळ किंवा आजोबांचें घर म्हटलें तें तोंडदेखले नसून सर्वस्वी यथार्थ आहे. महाराष्ट्रीय लोक ज्या आर्यकुलांत समाविष्ट आहेत ते उ. हिंदुस्थानांत विंध्याद्रि उजवा घालून प्रथम जुन्या महारा-ष्ट्राच्या विस्तीर्ण मैदानावर उतरले. त्या वेळीं गोदावरीच्या दक्षिणतीराला दंडक नांवाचें अरण्यच निम्मेंशिम्में होतें व हें अरण्य पुढें नाहींसें होऊन विदर्भाकडील आर्यवसति इकडे फैलावली हें इतिहासच सांगतो. विदर्भ हेंच पहिलें महाराष्ट्र व आधुनिक इतिहासांतील राजकीय घडामोडीमुळें, हा नागपुरी मराठी प्रांत हा वऱ्हाड प्रांत हें दक्षिणमहाराष्ट्र व हा निजामशाहीं-तील महाराष्ट्र, असे अनेक भाग पडलेले असले तरी वर दिलेलीं राष्ट्रीयत्वाचीं जीं चार लक्षणें तीं लक्षांत घेतां हे चार अवयव एकाच शरीराचे आहेत याविषयीं शंका तरी कोण घेईल ? पौराणिक कालांतील अगस्त्य, जमदग्नि, मार्कंडेय इत्यादि पुण्यपुरुष आणि लोपामुद्रा, इंदुमती, रुक्मिणी, दम-यंती, अशा पुण्यस्त्रिया विदर्भाच्या म्हणून महाराष्ट्राच्याच आहेत. श्रीकृ-ष्णाची सासुरवाडी व श्रीरामचंद्राचा मातृवंश विदर्भातला म्हणजे पर्या-यानें महाराष्ट्रांतला या गोष्टीला कल्पनेइतका इतिहासाचाहि आधार अस-

त्यास कोणा महाराष्ट्रीयाला त्याबद्दल अभिमान वाटणार नाहीं ? तसेंच पौराणिक कथा सोडून दिल्या तरी प्रत्यक्ष ऐतिहासिक काळांत महाराष्ट्रीय इतिहासाच्या व वाङ्मयाच्या धाग्यादोऱ्यांचें मूळ जुन्या विदर्भ देशांत म्हणजे हल्लींच्या वऱ्हाडांतच सांपडतें ही गोष्ट तर निर्णयात्मकच ठरते. आधुनिक काळांतहि श्रीनृसिंहसरस्वतीस्वामी, जनार्दनस्वामी यांसारखे साधु, मुकुंदराय व एकनाथ यांसारखे संतकवी, अमृतराय, देवनाथ, दयाळनाथ, गोसावीनंदन, विठ्ठल, अनंत, शिवदिनकेसरी, शिवकल्याण, मोरेश्वर, उत्तमश्लोक यांसारखे प्रासादिक पद्यकार, भवभूतीसारखे श्रेष्ठ संस्कृत पंडित कवी, भोजासारखे राजकवी, हेमाद्रि बोपदेव यांच्यासारखे निबंधकार, आणि भट्ट भास्कर, त्रिविक्रम यांसारखे ज्योतिषी पूर्वी वऱ्हाडांत झाले. नाथसंप्रदाय वऱ्हाडांतच मूळ फैलावला. ज्ञानेश्वरीचा उगम वऱ्हाडांतच लावितां येतो. महानुभाव पंथाचें आद्य मराठी वाङ्मय वऱ्हाडांतच जन्मलें. तसेंच चालुक्य व देवगिरीचे यादव आणि ब्राह्मणी मुसलमानी राज्यें यांच्या आश्रयानें विद्येच्याच काय पण कर्तृत्व व राजकारण यांच्या नभोमंडळांत महाराष्ट्रानें अभिमान बाळगण्यासारखे अनेक पुरुष वऱ्हाडांतच होऊन गेले. शिवाजीमहाराजांचें आजोळ वऱ्हाडांतच आहे. वऱ्हाडांतील लहानसान रजपूतघराण्यांचीहि कीर्ति इतिहास सांगतो; मग मराठ्यांशीं त्यांचा प्रत्यक्ष संबंध किती असेल तें माहीत नाहीं. तसेंच लष्करी निशाणाला चोळी बांधून आपल्या पराक्रमानें शिवाजीमहाराजांस कुंठित करून त्यांजकडून धर्मकन्या म्हणून घेतलेली रायबागीण वऱ्हाडांतच झाली. अशा रीतीनें विदर्भ किंवा वऱ्हाड यांची परंपरा इतकी उज्वल आहे कीं कोणाहि इतर प्रांतानें त्याचें कौतुकच करावें.

राष्ट्रीयत्वाचीं जीं लक्षणें म्हणून वर सांगितलीं तीं आज वऱ्हाड व दक्षिण–महाराष्ट्र यांतील लोकांना बहुधा सारखींच लागतात. क्वचित् भेद निर्माण झाले आहेत, पण ते सूक्ष्म आहेत. वऱ्हाडच्या मराठी भाषेंत पुणेरी मराठीच्या दृष्टीनें कांहीं वेगळे प्रकार दिसले तरी ते सर्व अशुद्धच आहेत असें नाहीं. भाषा शुद्ध व अशुद्ध हा सगळा मानावा तसा प्रकार आहे. कोल्हटकरांच्या एका नाटकांत दोन शूद्र पात्रें बोलत असतां एक आपल्या अशुद्ध भाषेविषयीं खंती दाखवितें, तेव्हां दुसरें त्याला म्हणतें

कीं, अरे ' आपल्या भाषेचें व्याकरण लिहिलें म्हणजे ती शुद्धच ठरली.' पण हा निवळ विनोद नसून त्यांत सर्वस्वी सत्य असाच सिद्धान्त आहे. पुणेरी मराठीहून वेगळे असे शब्द दिसले पण तेच शब्द जुन्या मराठी अभिजात वाङ्मयांत आढळून आले तर तें दूषण कीं भूषण मानाव-याचें ? माझ्या मतें तर जुन्या मराठी वाङ्मयांतील सुबक सुंदर अर्थ-पूर्ण असे शेंकडों शब्द प्रचारांतून निघून गेले आहेत, ही प्रचलित मराठी वाङ्मयाची फार मोठी हानि होय. अनेक विषयांवर लिहितांना योग्य चौरस शब्द न सांपडल्यानें आम्ही लेखक लोक गरजेच्या जाचा-मुळें कसे तरी वेडगुजरी, हेंगाडे, अवजड शब्द नवे बनवून काम उर-कून घेत असतों. पण तेंच कार्य सुलभ रीतीनें करतील असे शेंकडों मराठी शब्द केवळ अज्ञानामुळें बाजूस पडले आहेत हें अवचित एकाद्या उदाहरणावरून लक्षांत आलें म्हणजे फार वाईट वाटतें. केवळ अशा चांगल्या शब्दांचाच एकादा कोश छापावा अशी एक कल्पना माझ्या मनांत असून सवड सांपडल्यास कधीं तरी ती फलद्रूप होईल. आणि प्रो. पटवर्धन यांनीं नुकताच प्रसिद्ध केलेला उर्दू भाषेचा कोश चाळला असतां हें जसें आढळून येतें कीं, आम्ही भाषागृहांत घरचे म्हणून ज्या परक्यांना देवघरापर्यंत खुशाल वावरूं देतों त्यांपैकीं पुष्कळसेलोक विधर्मी आहेत; त्याप्रमाणें मी म्हणतों तसा एकादा कोश प्रसिद्ध झाल्यास उलट असें आढळून येईल कीं, तोंड पाहिलें असतां जे आज अनोळखी परकेसे वाटतात त्यांचें स्थान महाराष्ट्रभाषेच्या वंशवृक्षांतच सरळ किंवा तेढ्या शाखांवर कोठें तरी असेल.

पुणेरी मराठीनें शुद्धतेचें मानपत्र मिळवून वऱ्हाडावरहि आपली छाप बसविली याचें खरें कारण हुडकून काढणें कठीण नाहीं. घरीं नातू रोजगारी झाला म्हणजे तो देईल तें वस्त्रप्रावरण आजोबा हौसेनें वापरतात. शिवाजीमहाराजांच्या वेळेपासून महाराष्ट्राच्या महत्त्वाचा मध्यबिंदू गोदावरी-च्या कांठावरून निघून कृष्णेच्या कांठाकडे झुकत चालला होता हें इतिहासच सांगतो. नागपूर—वऱ्हाड प्रांत इंग्रजांच्या हातीं गेल्यानंतर पहिल्या काळांत शिक्षक, वकील, वगैरे पुढारीपणाचे धंदे करणाऱ्या लोकांच्या दोन पिढ्यांच्या स्वाऱ्या पुण्याकडून तिकडे झाल्या. त्यामुळें वऱ्हाड—नागपुरांत पुणेरी लोकांचा प्रसार होऊन शाळाखात्याच्या द्वारें

पुणेरी मराठी भाषा तिकडे पसरली. वऱ्हाडींतील मराठींत जसे जुने संस्कृत व प्राकृत अपभ्रष्ट शब्द तसेच उर्दू शब्द बरेच आढळतात, त्याप्रमाणें पुण्याकडील मराठींत कोंकणी व कानडी शब्दांची व शब्दप्रयोगांची मिसळ झालेली आहे. तथापि भाषेची शुद्धता व नदीच्या पाण्याची शुद्धता हीं एकाच मापानें मोजून व समाधान मानून उपयोगावरच मुख्य दृष्टि द्यावयाची असते. आणि जी गोष्ट भाषेची तीच आचार व चालीरीती यांची झालेली आहे. तात्पर्य, सूक्ष्म भेद वगळले असतां—व असे भेद कांहींहि केले तरी दर–दहावीस कोसांवर उत्पन्न होतच असतात–उत्तरेस बैतुलापासून दक्षिणेस मिरज–कोल्हापूरपर्यंत आणि पूर्वेस भंडारा व चंद्र-पूरपासून पश्चिमेस बडोदा व गोवा येथपर्यंत एक व अविभाज्य असाच महाराष्ट्र सर्व व्यवहाराकरितां आज मानल्यास तें योग्यच होईल. आणि या मर्यादेच्या चारहि टोंकांस शेंपन्नास वर्षांपूर्वी मराठीच राजे किंबहुना एका वंशांतीलच राजे होते त्यावरून इतिहासपरंपरेनेंहि वरील कल्पनेस बळकटीच येते. वरील सिद्धान्ताचा उपसिद्धान्त मानूनच मी म्हणतों कीं, यापुढें तरी बृहन्महाराष्ट्रानें मराठी भाषेची उपासना एकाच संकल्पानें, एकाच मंत्रानें व एकाच विधानानें करावी हें उचित आहे. महाराष्ट्राचें म्हणून एक साहित्य–संमेलन आजवर पांच–सहा वेळां भरलें व त्याचें एक अधिवेशन इंदुरास एक बडोद्यास व एक अकोल्यास झालें यावरून अशी एकतंत्री उपासना करण्याला बृहन्महाराष्ट्र मनानें सिद्ध आहे हें उघड दिसतें. नागपुरासहि या संमेलनाचें अधिवेशन होणार होतें. परंतु कित्येक अकल्पित विघ्नांमुळें तें झालें नाहीं. पण तें व्हावयाचें होतें येवढया गोष्टीनेंहि मी वर म्हटलें तें आणखी सिद्ध होत आहे. अशी स्थिति अस-ल्यामुळें वऱ्हाडचें म्हणून वेगळें पोटसाहित्यसंमेलन आपण भरविलें तरी त्यामुळें या मध्यवर्ती कल्पनेची कांहीं हानि होत नाहीं. किंबहुना कोणतेंहि कार्य सिद्ध होण्याला त्याचे भेद व पोटभेद सोयीप्रमाणें पाडावेच लागतात; व ते पाडल्यानें अभिमानाला एक सुटसुटीत असें स्थानिक अधिष्ठान लाभतें. वऱ्हाडचे लोक वेगळें साहित्यसंमेलन भरवितात, त्यांनीं आपली वेगळी विदर्भ–साहित्यमाला सुरू केली यांत कित्येकांस तुटकपणा दिसून येतो, पण मी तसें मानीत नाहीं. समाईक कुटुंबांतील प्रत्येकानें वेगवेगळा धंदा करून संपत्ति मिळविली तर सर्व कुटुंबच्या कुटुंबच अखेरीस त्याचें

अंशाधिकारी होतें, अशांतलाच हाहि प्रकार आहे. वऱ्हाडचा एकनाथ व अमृतराय यांना इकडील महाराष्ट्र आपले मानतें. त्याचप्रमाणें तिकडील महाराष्ट्रहि रामदासांचा अभिमानी आहे. आतां हें खरें कीं, वऱ्हाडी कवींचीं काव्यें प्रसिद्ध करण्याचा जसा उपक्रम वऱ्हाडांत सुरू झाला आहे तसाच आमचे मित्र शंकरराव देव यांनीं रामदासांचे ग्रंथच प्रसिद्ध करण्याचा उपक्रम धुळयास केला आहे. परंतु याच्या उलट नागपूर-वऱ्हाडांत ज्याची कल्पना मूळ प्रगट झाली तो ज्ञानकोश सर्व महाराष्ट्राकरितां मिळून आहे, आणि पुण्यास मूळ निघून चालू असलेलें इतिहाससंशोधक मंडळ हेंहि सर्व महाराष्ट्राकरितांच आहे. तात्पर्य, तुटकपणाचा उद्योग क्वचित् कोठें दिसून आला तरी तो खेळांत गडी वांटून घेण्याइतकाच निरपवाद व खरोखरच सोयीचा असा असतो; किंबहुना खेळांतल्याप्रमाणें कार्यसिद्धीची स्पर्धा महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांतील लोकांत दिसून आली तर ती आनंदाचीच गोष्ट होय. श्री. बापूजी अणे यांनीं आनंदगीताच्या पहिल्या भागाच्या प्रस्तावनेंत मुकुंदराजापासून आनंदकवीपर्यंत परंपरा जोडून एक सुरेल तार वाङ्मय वीण्यावर चढविली, अशाच तारा महाराष्ट्रांत इतरत्रहि चढविण्यांत येत आहेत. परंतु या तारांचा आवाज विसंवादी नसून संवादीच असल्यामुळें त्यांच्या स्फुरणानें व अनुरणनानें समग्र महाराष्ट्र वाङ्मय अनेक तर्फांच्या तारा असलेल्या रुद्रवीण्याप्रमाणें एकमुखानें सुरेल व जोरदार वाजूं लागेल.

राष्ट्रीयत्वाचीं लक्षणें म्हणून जीं वर सांगितलीं त्यांत भाषेला सहजच प्रधान स्थान येतें. कारण कोणत्याहि समाजांत सुधारणेच्या एका प्राथमिक स्थितीनंतर सर्व व्यवहार शब्दबंध भाषेनेंच होतो. " विचित्रो यस्य विन्यासः विदधाति जगत्पटम् " असें जें वाक्तंतूंचें वर्णन कवीनें केलें आहे तें यथार्थ होय. वस्त्राला जसे आडवे-उभे धागे तसेच भाषेला अर्थबोधक शब्द होत; व ईश्वराच्या करणीची अशी मौज आहे कीं, सुमारें पन्नास मूळ वर्णांनींच जगांतील सर्व भाषा बनविल्या गेल्या आहेत. पण आपणाला प्रस्तुत या सर्व भाषांचा तर नाहींच पण समग्र मराठी भाषेचाहि विचार करावयाचा नाहीं. कारण एकंदर भाषेपैकीं वाङ्मय हा एक अल्प व परिमित असाच भाग असतो. पण तोच असा असतो कीं, भाषेचें खरें मूल्य व महत्त्व त्यावरच अवलंबून राहतें. ह्या साररूपी भाषांशालाच

वाङ्मय असें म्हणतात. रेशमी किंवा लोंकरी वस्त्राची किंमत केवळ त्याच्या आडव्या-उभ्या धाग्यांत नसून त्यावर जें मृदु व सूक्ष्म असें फूल असतें त्यावरूनच ठरते; व हें फूल झडून गेलें असतां तें वस्त्र मनुष्य टाकून देतो. निदान शोभेप्रमाणें त्याचा उपयोगहि संपुष्टांत येतो. आजच्या-सारख्या साहित्यसंमेलनांत मराठी भाषेचा जो विचार व्हावयाचा तो नित्य व्यवहारोपयोगी भाषेचा नसून नैमित्तिक उपयोगासंबंधाचाच आहे. सामान्य भाषा व वाङ्मय यांचें प्रमाण सांगावयाचें झालें तर " मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये। यततामपि सिद्धानां कश्चितन्मां वेत्ति तत्त्वतः॥ " या गीतेंतल्या श्लोकानेंच दर्शवितां येईल. आणि शुद्ध वाङ्मयानंदाला या परमात्मज्ञानाच्या आनंदाची उपमा दिली तर कोणी नाराज होईल असें वाटत नाहीं. ईश्वरानें जग निर्माण केलें त्याचें पहिलें स्वरूप शब्द हेंच होतें. त्याच शब्दांतून भाषा निघाली व पुढें त्याच भाषेंतून वाङ्मय निघतें. आणि सोन्याच्या चिपेंतील केवळ एक कण काढला तरी त्यांत जसे सोन्याचे सर्व गुण आढळतात त्याचप्रमाणें वाङ्मयरूपी ईश्वरकलेंत सत्ता, चैतन्य, व आनंद हे तीनहि परमात्मगुण आढळतात. मनुष्याचा सर्व व्यवहार भाषेवर चालतो हें पूर्वी सांगितलें. त्यांत वाङ्मयाच्या सत्ता-प्रकाराचें वर्णन झालेंच. पण चैतन्य व आनंद या दोन गुणांविषयीं किंचित् लिहिलें पाहिजे. चेतना म्हणजे चलनवलनात्मक व प्रेरक शक्ति. कोणताहि समाज जिवंत म्हणण्यासारखा चळवळ करीत असलेला आढळला तर त्याच्या मुळाशीं वाङ्मयाचें चैतन्य हेंच कारण सांपडेल. ही उपयुक्तता सिद्ध करणारें वाङ्मय प्रायः बुद्धिगम्य किंवा बुद्ध्युद्बोधक असेंच असतें. गणित, भूमिति, भौतिक शास्त्र, ज्योतिषशास्त्र, इतिहास, निबंध, तर्कशास्त्र, तत्त्वज्ञान वगैरे सर्व प्रकारचें वाङ्मय या सदराखालीं येतें. या वाङ्मयाचा उद्देश व अधिकार शुद्ध ज्ञान, सत्यप्रतीति, समजूत, उपदेश वगैरे करून देणें हा असतो. काव्यकथा-नाटकादि वाङ्मयहि अंशतः या सदराखालीं येऊं शकतें. कारण त्यांचा प्रत्यक्ष हेतूच नसला तरी कित्येक वेळीं अप्रत्यक्ष परि-णाम कांहीं अंशीं तसाच होतो. परंतु वाङ्मयाचा तिसरा गुण म्हणजे आनंद-दायकता हा अगदीं स्वतंत्र आहे व तो गुण येवढा मोठा आहे कीं, बुद्धिगम्य ज्ञानाचेंहि कार्य या आनंद गुणाची थोडीबहुत मदत घेतल्याशिवाय पुरें पडत नाहीं. शिवाय बुद्धिगम्य ज्ञानानें मनुष्याला सत्यनिर्णय करतां येत

असला तरी, मनुष्य प्रत्यक्ष कार्यप्रवण होण्याला भावनेची मदत अवश्य असते, व ही भावना उत्पन्न करण्याची खरी शक्ति आनंददायी श्रेष्ठ प्रकारच्या वाङ्मयांतच असते. शुद्ध ज्ञान हें कृतीला निर्णायक ठरत नाहीं, "जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः । जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः" या वचनांत धर्म शब्दाऐवजीं ज्ञान किंवा सत्य असा पर्यायशब्द घातला तरी वचन यथार्थ होइल. पण वाङ्मयाच्या आनंदाला उपयोगाचें हें एक स्वरूप असलें तरी, ज्यांत कर्म परिसमाप्त झालें असें ज्ञान उरूं शकतें तसाच ज्यांत उपयुक्तता परिसमाप्त झाली असा शुद्ध आनंदहि वेगळा उरतो.

असो. प्रथम उपयुक्त वाङ्मयासंबंधानें दोन शब्द सांगतों. सत्यज्ञान, अनुभव, बोध, वगैरे गोष्टी सामाजिक व राष्ट्रीय व्यवहारांत प्राथमिक व आधारभूत असल्यानें हें वाङ्मय मराठी भाषेंत हल्लीं वाढण्याची अत्यंत आवश्यकता आहे. परंतु शिक्षणखातें अद्यापि परतंत्र असून विद्यापीठांतूनहि परभाषेचें वर्चस्व म्हणण्यासारखें हटलें गेलें नसल्यामुळें, व्यवहारोपयोगी शास्त्रीय, ऐतिहासिक, किंवा तात्विक वाङ्मय निर्माण होण्यास असावें तितकें उत्तेजन व साहाय्य मिळत नाहीं. आतां हें खरें कीं, सुमारें शंभर वर्षांपूर्वी म्हणजे स्वराज्य होतें तेव्हांहि अशा प्रकारचें वाङ्मय फार होतें असा अर्थ नाहीं, परंतु तेव्हां भौतिक ज्ञानच थोडें व त्याचें शिक्षण पण त्याहून थोडें अशी स्थिति होती आणि देशांतील व्यवहारच मर्यादित होता. परंतु हल्लीं एका नवीन संस्कृतीशीं संबंध जडला आणि त्यामुळें बुद्धिज्ञानाचे विषय वाढले इतकेंच नव्हे, तर त्यांना अनुसरून असणारा समाजांतील प्रत्यक्ष व्यवहारहि वाढला. यामुळें या वाङ्मयाची उणीव भासूं लागली. हल्लीं विद्यापीठांतून मराठी भाषेचा प्रवेश ओझरता झाला आहे. परंतु मुख्याधिकाराचें स्थान इंग्रजी भाषेकडेच असल्यामुळें उपयुक्त शास्त्रीय वगैरे बुद्धिगम्य ज्ञानाच्या पुस्तकांची निपज व्हावी तितकी होत नाहीं. पण हेंच स्थान मराठीला जर कां एकदां मिळालें तर, उंच प्रदेशावर तलाव किंवा 'वॉटर गॅलरी' बनविल्यास खालच्या प्रदेशांत शेंकडों ठिकाणीं जसे आपोआप झरे उमळून येतात, त्याचप्रमाणें उपयुक्त मराठी वाङ्मयाची वृद्धि आपोआप होईल. सरकारी मुंबई-विद्यापीठांत मराठी भाषेचा शिरकाव किंचित् झाला आहे, पण केव्हांहि तो मर्यादितच राहाणार. फक्त युनिव्हर्सिटी कमिटीच्या सूचनेप्रमाणें जर पुण्यास स्वतंत्र विद्या-

पीठ स्थापलें गेलें तर कदाचित् मराठी भाषेला प्राधान्य येऊन वाङ्मय उत्पन्न होण्याला मदत मिळेल. आपल्या वऱ्हाड-नागपूर प्रांताला नुकतेंच नवीन विद्यापीठ मिळालें आहे. तथापि आपण एव्हांपासूनच देशी भाषेच्या चळवळीचा संघटित प्रयत्न केला तर आमच्यापेक्षां थोड्या काळांत आपली कार्यसिद्धि घडेल.

आतां उपयुक्ततेच्या दृष्टीनेंहि वाङ्मयाच्या आनंदाचा फायदा कसा होऊं शकतो हें आपण पाहूं. मनुष्याला कर्मप्रवृत्त करण्याला जशी भावना ही उपयोगी पडते तशीच कल्पना म्हणून जी एक शक्ति आहे ती ज्ञानदानाच्या कामीं बुद्धीला उपयोगी पडत असते. एकादी गोष्ट शुद्ध बुद्धीला पटली तर तिजपासून आनंद होत नाहीं असें नाहीं. तथापि आनंदाआनंदांत फरक असतो. आणि कारण कांहींहि असो, कल्पनेचा आनंद मनुष्यामध्यें अधिक भिनतो याविषयीं शंका नाहीं. कोणतेंहि प्रमेय बुद्धीला पटविण्याचीं चार प्रमाणें मानलीं जातात; प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व शाब्द. प्रमाणांची ही विभागणी तात्त्विक रीत्या शुद्ध आहे असें नाहीं. कारण खरोखर पाहूं गेलों असतां अनुमान व उपमान हींच दोन प्रमाणें स्पष्ट वेगवेगळीं अशीं उरतात व शाब्द व प्रत्यक्ष यांचा संग्रह एकप्रकारें अनुमानांतच करतां येतो. प्रत्यक्ष वस्तु पाहिली तरी त्यानें एक ज्ञानकण निर्माण होतो. पण इतर ज्ञानकणांचें साह्य घेऊन त्यांची व याची सांखळी एकाद्या विशेष नियमानें बांधल्याशिवाय किंवा एका सांखळीस दुसरी सांखळी जोडल्याशिवाय त्या एकट्या ज्ञानकणाचा कांहीं उपयोग होत नाहीं. शाब्द प्रमाणांतहि पूर्वानुभव--परंपरेनें कांहीं अनुमानें दृढ झालेलीं असतात म्हणूनच शाब्द प्रमाणावर आपण विश्वास ठेवतों. पण बुद्धि त्याला जो रुकार देते तो अनुमानाच्या मदतीनेंच. या अनुमान प्रमाणाच्या बरोबरीनें किंवा त्याहून अधिक उपयोग उपमान प्रमाणाचा होतो. उपमान म्हणजे दाखला, उदाहरण, प्रत्यंतर. अर्थात् हें प्रमाण साम्यविरोधदर्शनावर अवलंबून आहे. रानटी हत्ती पकडावयाचा असतां पाळलेला हत्ती त्याजकडे पाठवावयाचा म्हणजे मग ते दोघेहि मिळून परत येतात त्याप्रमाणें साम्यात्मक किंवा साम्यनिष्ठ असा दाखला, उदाहरण किंवा प्रत्यंतर अनुमानाकडे धाडलें म्हणजे उपमान हें अनुमानाला बुद्धीच्या तबेल्यांत आणून ठाणबंद करतें. कल्पनानिर्मित सर्व वाङ्मय प्राय: साम्य व विरोध यांच्या लीलेवर अव-

लंबून असल्यामुळें उपयुक्त वाङ्मय व आनंददायक वाङ्मय यांची सरहद्द उपमान प्रमाणावर येऊन भिडते; आणि सरहद्दीवरची प्रजा जशी इकडून तिकडे तिकडून इकडे येते जाते त्याप्रमाणें वाङ्मयाच्या आनंदाचा प्रवेश उपयुक्ततेच्या राज्यांत व उपयुक्ततेचा प्रवेश आनंदाच्या राज्यांत होत असतो.

शुद्ध ज्ञान केवळ अनुमानानेंच मिळवून घ्यावयाचें त्याला प्रथम निर्भेळ तुटक एकेरी अर्थाचे शब्द पाहिजेत. पण असे शब्दच मुळीं थोडे असतात म्हणून ते कार्याला पुरे पडत नाहींत. यामुळें प्रतिक्षणीं व्यक्तीला व समाजाला नवे नवे शब्द बनवावे लागतात. तसेंच स्थिर अर्थाच्या शब्दांच्याहि पायाखालची वाळू रूढीच्या प्रवाहानें एकसारखी घसरत जात असल्यामुळें लवकरच एकच शब्द अनेक लोक अनेक अर्थानें समजूं लागतात. अशा रीतीनें चंचलार्थ असे हे शब्द व नवीन बनविलेले शब्द या दोहोंतहि कल्पना व मिथ्याभास यांचें मिश्रण झालेलें असतें आणि या मिश्रणाला अलंकारिक किंवा श्लिष्ट स्वरूप येतें. या दृष्टीनें पाहतां, एकादें समग्र काव्य किंवा एकटा अलंकारगर्भ श्लिष्ट शब्द यांत पुष्कळच साम्य असतें. हीच आद्यकाव्यशक्ति, व तिचा उपयोग करणारा अडाणी रानवट माणूस आणि प्रतिभासंपन्न सुशिक्षित कवि हे दोनहि एकाच सदरांत पडतील. असो. ही आद्यकाव्यशक्ति इतकी व्यापक आहे कीं, अगदीं सोप्यांत सोपें असें जें आपण बोलतों किंवा लिहितों त्यांतहि लाक्षणिक, श्लिष्ट, काव्यमय, उपमानभूत, साम्यदर्शक अशा शब्दांचा प्रवेश नकळत झालेला असतो व कळला तरी तो टाळूं म्हटल्यानें टळत नाहीं. अगदीं लहान मुलांच्या हातीं प्राथमिक शिक्षणांत जीं क्रमिक पुस्तकें देण्यांत येतात त्यांतहि हे काव्यगर्भ शब्द आढळतात, मग कोणतेंहि कठिण प्रमेय समजून सांगावयाचें असल्यास अशा नुसत्या शब्दांचाच नव्हे तर सबंधच्या सबंध काव्यकल्पनांचा उपयोग करावा लागतो यांत काय आश्चर्य? अगदीं मी मी म्हणविणारे रुक्ष तत्त्वज्ञानी उपमान प्रमाणाचा उपयोग करतात. त्याशिवाय त्यांचें चालत नाहीं. इंग्रज तत्त्ववेत्ता लॉक यानें एका निबंधांत अलंकारिक भाषेचा अत्यंत निकरानें निषेध केला आहे. पण हा निषेध पटवून देण्याला त्याला स्वतःलाच उपमालंकाराचा उपयोग करावा लागला हें पाहून मला हंसूं आलें. अलंकाराचा निषेध करतां करतां तो लिहितो कीं, " अलंकाराचा उपयोग करण्याची हौस ही एक दिव्य अप्सरा आहे,

व तिचा मोह भल्याभल्यांनाहि सुटत नाहीं." वदतो व्याघाताचें हें उत्कृष्ट उदाहरण होय! आणि त्यावरून काय बोध घ्यावयाचा हें मी सांगावयास पाहिजे असें नाहीं.

या उपमानपद्धतीचा उपयोग तुटक शब्दांच्या द्वारें तर होतोच, पण वाङ्मयामध्यें सबंध ग्रंथच्या ग्रंथहि या पद्धतीचा अवलंब केलेले आढळतात. उदाहरणार्थ, बनियनचें 'पिलग्रिम्स प्रोग्रेस' किंवा श्रीएकनाथाचें 'भजनी संतगारूड' या दोनहि ग्रंथांत परमार्थ हा दृष्टांत किंवा रूपक यांच्या रूपानें वर्णिला व उपदेशिला आहे. किंबहुना कादंबरी व नाटक या वाङ्मय प्रकारांतहि प्रस्तुत हें लपवून उपमानभूत अप्रस्तुतच वर्णिलेलें असतें. सामान्य चर्चात्मक ग्रंथांतहि 'मिया मूठभर व दाढी हातभर' या म्हणीप्रमाणेंच तत्त्व व तत्त्वावरील लाक्षणिक किंवा अलंकारिक विवेचन किंवा भाष्य यांचें प्रमाण आढळून येईल. ज्ञानेश्वरी घेतली तर तींत काय दिसून येतें? या ग्रंथांतील शुद्ध सरळ शब्दांनीं सांगितलेलें तत्त्व किंवा सत्य हें लिहिण्यास दहा–पांच पानें पुरतील. परंतु तें खुलवून दाखविण्यासच म्हणजे उपमादृष्टान्त देऊन विवेचन रंगविण्यांतच इतर सर्व ग्रंथ खर्ची पडला आहे. 'श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः' हें अगदीं खरें आहे; व या कोटिग्रंथांत उपमानपद्धतीचा अंगिकार सर्वस्वी अगर पुष्कळसा केला नाहीं असा एकादा तरी ग्रंथ सांपडेल कीं नाहीं यांची शंकाच आहे.

वरील विवेचनावरून हें ध्यानांत येईल कीं, ज्याला आपण वाङ्मय म्हणतों तें शुद्ध ज्ञान किंवा सिद्धान्तिक सत्य यांवर जितकें अवलंबून असतें त्यापेक्षां तें पटवून देण्याकरितां कल्पनेचा आश्रय करून जो विवेचनसंभार रचलेला असतो त्यावरच अधिक अवलंबून असतें. लो. टिळकांनीं गीतारहस्याच्या विषयप्रवेशांत 'अर्थवाद' या मीमांसाशास्त्रांतील पारिभाषिक शब्दाचें जें विवेचन केलें आहे तें या संबंधांत वाचून पाहावें. ते लिहितात—"कोणता मुद्दा सिद्ध करावयाचा हें ठरलेलें असतांहि उपपादनाच्या ओघांत दाखल्यासाठीं, तुलना करून एकवाक्यता करण्यास, साम्य व भेद दाखविण्यास, अलंकारार्थ, अतिशयोक्तीनें ग्रंथकार पुष्कळ गोष्टींचीं वर्णनें करीत असतो तीं... ... अक्षरशः नेहमींच खरीं असतात असा नियम नाहीं." यावरून सत्याला असत्याची म्हणजे बुद्धीला कल्प-

नेची किती मदत घ्यावी लागते हें दिसून येईल. अर्थात् उपयुक्ततासापेक्ष असा आनंद वाङ्मयापासून निष्पन्न कसा होतो हें दिसून येईल. पण ही गोष्ट विशिष्ट हेतुपूर्वक लिहिलेल्या व सिद्धान्तानुसंबंधी वाङ्मयाची झाली. पण उपयुक्तता—निरपेक्ष असाहि वाङ्मयजन्य आनंद म्हणून असतोच; व पूर्वी वाङ्मयाला ईश्वराचें रूप कल्पून तें सच्चिदानंद आहे असें जें मी पूर्वी म्हटलें त्यांतील आनंद हा निरपेक्ष आनंदच होय. खरा एकांतिक आनंद निरपेक्षच असतो; व तो इतर कलांच्या विलासाप्रमाणें वाङ्मयाच्याहि स्वैर व निरपेक्ष अशा विलासांतच लाभतो. या ठिकाणीं बडोदें येथील साहित्यसंमेलनाच्या प्रसंगीं केलेल्या भाषणांतील दहावीस ओळी मी आपणाला वाचून दाखवितों. कारण अशा विषयांत निरनिराळे दृष्टान्त प्रत्येक वेळीं नवे सुचणें शक्य नाहीं.

"कलाविलासाच्या मागें हेतुसंशोधनाचा गुप्त पोलीस लावून दिला तर अनर्थकारक परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहींत. वाङ्मयाला नैतिक प्रबंध म्हणणें आणि साखरभाताला नुसत्या साखरेचा केलेला भात म्हणणें हीं दोनहि सारख्याच समंजसपणाचीं होत. शिल्पशास्त्रांत कलेच्या दृष्टीनें निरनिराळे आकार बनविणें यांत प्रतिभाकौशल्य दिसून येतें. पण देवळाचें उंच शिखरच सुंदर कां तर तें आकाशांत ईश्वर आहे असें उंच बोट करून दाखवितें म्हणून; अथवा तीन—तीन कमानींची जोडीच कां शोभते तर तिजवरून त्रिमूर्ति ब्रह्माविष्णुमहेश्वराची आठवण होते म्हणून असें म्हणणें बरोबर होईल काय ? ताजमहालाच्या पांढऱ्या शुभ्र दगडांत जी रंगीबेरंगी कुसर बसविली आहे तिचा नैतिक हेतु शोधून काढणारानें ताजमहाल पाहण्यास जाण्याचे श्रम न घेतलेलेच बरे. चित्रकार पौराणिक किंवा ऐतिहासिक चित्रें रंगवितो तेव्हां त्याचा हेतु कलेच्या दृष्टीनें सुंदर चित्रें रंगविण्याचा असतो कीं नीतिबोध करण्याचा असतो ? पोहावयास पडणारा मनुष्य जलक्रीडा करतो ती स्नानाच्या हेतूनें नव्हे. शिकारी क्षत्रिय अरण्यांत मृगयाविलास करतो ती एक दिवस चांगलें मांस खावयाला मिळावें म्हणून करीत नाहीं ! गवई दीप राग आळवितो तो अर्थशास्त्रदृष्ट्या मशालजीचा खर्च वांचविण्याकरतां नव्हे. तात्पर्य, 'अधिकस्याधिकं फलं ' या न्यायानें, कलेच्या दृष्टीनें वाङ्मय सुंदर असून त्यांतूनच नीतिबोध निघण्यासारखा असल्यास दुधांत साखर पडेल; पण ज्याचा

मूळ हेतु नीतिबोध नाहीं तें वाङ्मयच नव्हे हें म्हणणें यथार्थ नाहीं. अशीं कांहीं स्थळें असलींच पाहिजेत कीं, त्यापलीकडे जाऊन हेतूची पृच्छा करतांच येत नाहीं. हा रस्ता कोठें जातो तर अमुक गांवाला असें सांगतां येतें; पण थेट गांवाशीं गेल्यावर हा गांव कोठें जातो असें विचारणाराला काय सांगावें ? अध्यात्मज्ञानाचा किंवा ईश्वरभजनाचा हेतु काय तर मोक्ष मिळविणें असें म्हणतां येईल. पण फिरून मोक्षाचा हेतु काय असें विचारल्यावर त्याला काय सांगावें ? उलट वाङ्मय कला ही देखील अशी गोष्ट आहे कीं, प्रायः तिचा हेतु व तिचें फल हीं एकच असतात, दोन नसतात. " शुद्ध निरपेक्ष आनंद हाच कलेचा हेतु व तेंच तिचें फल होय.

असो. सामान्यतः वाङ्मय कशांतून उत्पन्न होतें व वाङ्मय म्हणजे काय याचें विवेचन हें झालें. आतां तदनुषंगिक इतर कांहीं गोष्टींचा विचार करूं. वाङ्मय हा शब्द उच्चारला म्हणजे त्याचें ग्रंथरूपी शरीरच आपल्या डोळ्यापुढें येतें. ग्रंथांत नसलेलें असेंहि वाङ्मय कांहीं असतें. पण त्याचा विचार करावयाचा तो इतकाच कीं त्याला ग्रंथाचें स्वरूप कसें येईल ? ग्रंथ म्हणजे केवळ छापील ग्रंथ असें नव्हे, हस्त-लिखित ग्रंथांचाहि यांत समावेश होतो. परिश्रमानेंहि ग्रंथांत संग्रहित न होईल असें वाङ्मय लोकांच्या तोंडीं कांहीं थोडें असतें परंतु तें जमेस धरतां येत नाहीं. शेतांत धान्य पुष्कळ पिकलें तरी पोतीं भरून किंवा मुढे बांधून जितकें आपणास घरीं आणतां येतें तितकेंच पिकलें हेंच खरें.

मराठी वाङ्मयासंबंधानें पाहतां आमची खेती जशी व्हावयास पाहिजे तशी होत नाहीं असें कष्टानें म्हणावें लागतें. कारण पुष्कळ हस्तलिखित ग्रंथ अद्याप प्रसिद्धी पावलेले नाहींत हें तर झालेंच. परंतु ग्रंथ निपजतील अशी कित्येक बुद्धिक्षेत्रें अजून बिननांगरलेलीं ओसाडच पडलेलीं आहेत. वाङ्मयाची अभिरुचि सुशिक्षित लोकांनाहि जितकी लागावी तितकी अद्याप लागलेली नाहीं. एका इंग्रज ग्रंथकाराचें असें वचन आहे कीं, प्रत्येक मनुष्य तो निश्चय करील तर सर्व जन्मांत मिळून एक चांगला ग्रंथ खचित निर्माण करील. पुष्कळ प्रतिभासंपन्न गृहस्थांना ग्रंथरचनेच्या कामीं आत्मप्रत्यय नसतो. पण तो खरोखर पात्रता नाहीं म्हणून नव्हे तर

उद्योगशीलता नाहीं म्हणून. वाङ्मयकलाविलासाची स्फूर्ति जर मनांत होईल तर ती मनुष्याच्या हातून दहा ग्रंथ न लिहवले तर एक तरी खचित लिहवील. वृक्षबीज हें जसें अंकुरित झालें असतां टणक भूमि किंवा खडक फोडूनहि वर येतें त्याचप्रमाणें खरें वाङ्मयप्रेम हें कृतिरूपानें आपला मार्ग काढल्याशिवाय राहणार नाहीं. आज मराठींत सर्वांगीण नवें वाङ्मय निर्माण करण्याची व जुन्याचा संग्रह व संवर्धन करण्याची आवश्यकता उत्पन्न झालेली आहे. या बाबतींत अशिक्षितांचा उपयोग इतकाच कीं, त्यांच्या संग्रहीं किंवा तोंडीं जें वाङ्मय असेल तें त्यांजकडून मिळवावयाचें. हल्लींचा काळ मराठी वाङ्मयाच्या दृष्टीनें पुनर्जागृतीचा आहे-इंग्रजींत याला ‘ Renaissance ’ असें म्हणतात व जें वाङ्मय एकदां उच्च पदवीला जाऊन मागें पडलें त्याचीच जागृति होऊं शकते. ज्या देवाची शेजारती झाली त्याचीच काकडआरती व्हावयाची. पण पुनर्जागृतींत जुन्यापैकीं उत्तमांतलें उत्तम असेल तें घेण्याबरोबर त्याच्या जोडीला नव्यांतील चांगलें असेल तेंहि घेतां येतें व घेतलेंहि पाहिजे. नव्याचा स्वीकार करण्यांत जुन्यांचा विरोध नसतो. कारण नवे महाराष्ट्र ग्रंथकार व वाङ्मयनिर्माते हा जुन्याचाच वंश व जुन्याचीच पुढची प्रजा होय. अर्थात् जुन्या पिढीला आपला वंशक्षय व्हावा असें कसें वाटेल ? ‘ Literary men have neither ancestors nor posterity, they alone compose their whole race ’ हें वचन व्यक्तिविषयक वाङ्मयग्रंथ किंवा ग्रंथकार यांनाच लागू पडतें. पण स्वयंस्फूर्तिजन्य ग्रंथ व ग्रंथकार या सर्वांचा मिळून एक वंश असतो व त्या सामुदायिक वंशाची परंपरा चालू राहिली तरच राष्ट्र जगतें. नुकतेंच विविधवृत्तकारांनीं शेंपन्नास लोकांचीं मतें मागवून कोणत्या ग्रंथाला लोक आज अधिक मानतात हें अजमावण्याचा प्रयत्न केला त्यांत जीं पांच–सात नांवें आलीं त्यांत जुन्यानव्या मराठी ग्रंथकारांचा असा बेमालूम मेळ पडलेला आहे कीं मीं वर म्हटल्याप्रमाणें नव्याजुन्या वाङ्मयाची अखंड सांखळी व अत्रुटित वंशविस्तार सिद्ध होतो.

वरील दृष्टीनें म्हणजे जुन्यानव्यांचा मेळ घालून मराठी वाङ्मयाची वृद्धि व संघटना कशी करावी, ग्रंथ व ग्रंथसंग्रहालयें यांचें महत्त्व काय, परंपरागत वाङ्मयाचें संशोधन कसें करावें, फोक–लोअर म्हणजे जनता वाङ्मय, उदाहरणार्थ मुलांच्या खेळांतील गाणीं व संवाद, स्त्रियांचीं गाणीं, धनगर

गवळी पारधी अशांचीं गाणीं यांच्या संग्रहाची आवश्यकता, काव्य व संगीत यांचा नवा मेळ इत्यादिकांविषयीं आणखी पुष्कळ बोलण्यासारखें आहे. परंतु एकदां अशा विषयाला प्रारंभ केला म्हणजे कोठें थांबावें हेंच कळत नाहीं. झाला हाच विस्तार एका भाषणाला पुरे याहून अधिकच झाला. म्हणून हें प्रास्ताविक भाषण येथेंच थांबवून दोन दिवस संमेलन झालें म्हणजे समारोपाच्या वेळीं आणखी कांहीं थोडें बोलतां येईल तें बोलेन असें सांगून, व हें अध्यक्षस्थान मला दिल्याबद्दल फिरून एकवार आपले आभार मानून हें भाषण पुरें करतों.

---

## ४ आधुनिक मराठी वाङ्मय

### ( 'अर्वाचीन मराठी साहित्य' या ग्रंथाचा उपसंहार )

प्रस्तुत ग्रंथाच्या सोळा विभागांत, अनेक तज्ज्ञ व विद्वान गृहस्थांनीं आधुनिक मराठी वाङ्मयाचें मार्मिक व सुंदर समालोचन केलें आहे. या वाङ्मयांतील एकेक खातें घेऊन त्यांत, १८७५–१९३५ या काळामध्यें निर्माण झालेले ग्रंथ व ग्रंथकार यांचा परामर्ष त्यांनीं कालानुक्रमानें, ज्याच्या त्याच्या योग्यतानुरूप, निःपक्षपातीपणानें घेतला आहे. हा परामर्ष घेतांना त्यांनीं त्या त्या खात्याच्या अनुरोधानें पण व्यक्तिनिरपेक्ष, म्हणजे सर्वसाधारण अशी विधानें मधून मधून केलीं आहेत. त्यांत उपसंहारोपयोगी अशी सामग्री मला बरीच आढळली. तथापि या प्रसंगानें, आधुनिक मराठी वाङ्मयासंबंधानें मलाहि ह्मणावेंसें वाटतें तें कांहीं थोडें लिहितों.

मराठी वाङ्मयाचा इतिहास सातआठशें वर्षांचा आहे. त्याचे दोन विषम भाग पडतात. पहिला भाग बारा तेराव्या शतकापासून थेट पेशवाई अखेरच्या कालापर्यंत; आणि दुसरा त्यानंतर आजपर्यंत सुमारें सवाशें वर्षांचा. पहिल्या सहाशें वर्षांतलें मराठी वाङ्मय मुख्यतः धार्मिक, पद्यात्मक, आणि जवळजवळ एकाच छापाचें होतें. पेशवाईनंतर इंग्रजी शिक्षणाला प्रारंभ झाल्यापासून हा छाप बदलूं लागला. त्यांतला धार्मिकपणा गेला. पद्याच्या मानानें गद्य पुष्कळच वाढलें व त्याला फार महत्त्व आलें. शिवाय या

दुसऱ्या शंभर सवाशें वर्षांतच पांचसहा युगांतरें झालीं. त्यांचा क्रम सामान्यतः खालीलप्रमाणें सांगतां येईल.

प्रथम संस्कृत पंडितांनीं मराठीचा पुरस्कार केला, पण मराठी हें अजून त्यांच्या अंगवळणीं पडलें नव्हतें. नवें मद्य किंवा आसव जुन्या बरण्यांतून घालावें म्हणतात तसा प्रकार झाला. हे शास्त्रीपंडित जुलमानें मराठी लिहीत. त्यांचें मराठी कसें असे हें तत्कालीन मराठी कोश काढून पाहावें म्हणजे कळून येईल. त्यांचीं कांहीं उदाहरणें आजच्या महाराष्ट्र शब्दकोशाशीं तुलना करून खालीं दिलीं आहेत.

| महाराष्ट्र भाषेचा कोश (१८२९) | महाराष्ट्र शब्दकोश (१९३२) |
|---|---|
| **अंतर्याम**—न० व्यवहारामध्यें कार्यानुरोधानें स्वीकृत जो साधुत्वादि भाव त्याहून इतर जे स्वाभाविक साधुत्वासाधुत्वादि भाव तदधिकरणभूत एक अंतःकरणाचा वृत्तिविशेष आहे तें. | **अंतर्याम**—न. १ आत्मा; जीव. २ (ल.) मन; अंतःकरण; चित्त. ३ अंतरंग; आंतील गोष्ट. (याखालीं वाक्प्रयोग आहेत.) |
| **कलगी**—स्त्री० लावण्यामध्यें स्त्रीनें पुरुषाचे आर्जवांत असून पुरुषाचें आर्जव करिती असा जो श्रृंगाररसाचा प्रकार वर्णितात ती. | **कलगी**—स्त्री. शृंगारिक लावणीचा प्रकार; यांत प्रकृति ही पुरुषापेक्षां श्रेष्ठ मानतात व ती पुरुषाचें आर्जव करिते असें वर्णन असतें. |
| **गाय**—स्त्री० शिंगें असून जिचे गळ्याखालची कातडी लोंबत असत्ये अशी एक पशुजाति आहे त्यांतील जी स्त्री ती. | **गाय**—स्त्री. धेनु; दुध देणारा एक माणसाळलेला चार पायांचा सस्तन प्राणी. |
| **दंग**—३ लि० इष्टविषयलाभजन्य जो संतोष किं० चमत्कारादि दर्शनजन्य जो विस्मय त्याच्या ठायीं जाची अंतःकरणवृत्ति निमग्न झाली आहे तो. | **दंग**—वि. १ आश्चर्यभरित; चकित; दिङ्मूढ; विस्मित; सर्द. २ (निंदाव्यंजक) संतुष्ट; खूष; समाधानी. ३ निमग्न; चूर; गर्क; गुंग. |

**पडतपोशी**—स्त्री० पडदा, भिंत इ० कांचे आश्रयामुळें स्थलावर उघडेपणाचा प्रतिपक्षी आवृत्तरूप जो धर्मविशेष येतो जाचे योगानें त्या स्थलावर जाणारा येणाराची दृष्टि, किं० वायु इ० सहज येऊं शकत नाहीं ती.

**पडद (त) पोशी**—स्त्री. १ पडदा; गौप्य; छपवणूक. २ पडदा, भिंत इ० नीं निर्माण केलेला आडोसा; एकांताचें स्थळ; विश्रांति, विसावा घेण्याची जागा; अंतर्गृह. ३ पडद्याची चाल; पडदानशीपणा.

यानंतरच्या शास्त्रीपंडितांनीं संस्कृत ग्रंथांचीं मराठी भाषांतरें करून मराठी भाषेवर बराच उपकार केला. यामुळें त्यांची मराठी भाषा अधिक सफाईदार झाली,व संस्कृत विद्येची छापहि तिजवर चांगल्या प्रकारची राहिली. या पुढच्या पिढींत मात्र शास्त्रीपंडित मागें पडूं लागले व इंग्रजी शिकलेले पण संस्कृत फारसें न शिकलेले असे विद्वान् लोक पुढें येऊं लागले. त्यांची स्थिति थोडीशी शोचनीयच झाली. कारण त्यांचें इंग्रजीचें ज्ञान बरें असलें तरी सामान्य जनतेला निरुपयोगी होतें. या लोकांनीं मराठींत ग्रंथनिर्मिति केली नाहीं, व त्यांचें बोलण्याचें मराठीहि हास्यास्पद होऊं लागलें. कारण धड संस्कृत नाहीं, धड इंग्रजी नाहीं, धड मराठी नाहीं. त्यांनीं भाषांतरें केलीं तीं प्राय: इंग्रजी ग्रंथांचीं. पण तीं बोजड झालीं. यानंतरच्या पिढींत मात्र संस्कृत, इंग्रजी व मराठी यांचें ज्ञान समभाग झालें असें म्हणतां येईल; व यांचें एक नमुनेदार उदाहरण म्हणून विष्णुशास्त्री चिपळूणकरांचें देतां येईल. तथापि, त्यांतल्या त्यांत मराठीवरील त्यांचें प्रेम विशेष असून, त्यांनीं इंग्रजी व संस्कृत या दोनहि भाषांच्या ज्ञानाचा उपयोग मराठी तेजस्वी करण्याकडे केला. पण तेजस्वी मराठी झालें तरी तें फक्त साधन, व देशाभिमानजागृति हें साध्य, अशी त्यांची विचारसरणी होती. विष्णुशास्त्री यांचें मराठी झोंकदार असलें तरी त्यावर कृत्रिमपणाची झांक थोडीशी होती. पण त्यांनींच आधुनिक वाङ्मयाच्या युगास खरा प्रारंभ केला असें म्हणतां येईल. शास्त्रीबुवा बत्तिसाव्या वर्षीच वारले. त्यांनीं लिहिलें तें सर्व ग्रंथोपयोगी पद्धतीनें. पण त्यांच्या पुढच्या पिढीच्या लोकांनीं त्यांच्याप्रमाणेंच इंग्रजी, संस्कृत, मराठी यांचें ज्ञान चांगलें संपादून, ग्रंथकर्तृत्वापेक्षांहि वर्तमानपत्रद्वारां जनतेला शिक्षण देण्याचें काम आरंभिलें. यामुळें शास्त्रीबुवांच्यापेक्षां त्यांची मराठी भाषा सामान्य-

जनतेला कळण्यासारखी सुलभ झाली. त्यानंतरच्या आजच्या पिढींत मात्र संस्कृताचें ज्ञान कमी होत चाललें, इंग्रजीचें वाढत चाललें, आणि मराठी वाङ्मय हें ज्ञानाच्या भरतीनें समृद्ध, विषयवैचित्र्यानें मनोरंजक, भाषेच्या सोपेपणामुळें जनतेच्या मनांत भिनणारें असें होऊं लागलें आहे. संस्कृताचें ज्ञान कमी झालें तरी गेल्या चाळीस वर्षांत संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें पुष्कळच झालीं. यामुळें प्रत्यक्ष संस्कृत भाषेचा परिचय तुटला तरी त्यांतील सत्त्व हातीं सुरक्षित राहिलें आहे. कांहीं वेद, निरुक्त, उपनिषदें, गीता, स्मृति, भारत, भागवत, सूत्रग्रंथ, कांहीं भाष्यें इत्यादिकांचीं भाषांतरें झालीं असून, अनेक शास्त्रांच्या आधारानें व स्वतंत्र असेहि विवेचक शास्त्रग्रंथ मराठींत झाले आहेत. अजून मराठींत आलीं नाहींत अशीं शास्त्रें म्हणजे व्याकरण, मीमांसा, न्याय इत्यादि कांहीं आहेत व तीं गहन म्हणून. पण हळूहळू त्यांचाहि सारांश देणारे ग्रंथ मराठींत होतील अशी आशा वाटते. इतकें झाल्यावर मग प्रत्यक्ष संस्कृत भाषा मागें पडली तरी, ‘ संस्कृत ’ संस्कृति मागें पडली अशी तक्रार करण्यास फारशी जागा उरत नाहीं. मराठी भाषेच्या पाठीशीं असलेली ही ‘ संस्कृति ’ मराठी वाङ्मयाच्या परिणतीला पुष्कळच उपयोगी पडणारी आहे. कारण, प्रक्रिया, पारिभाषिक शब्द, न्याय, व प्रत्यक्ष शब्दसंग्रह हे जितके जुने उपयुक्त वाटतील तितके घेऊन मराठी वाङ्मय लिहिल्यास, जुनी सरणी न सोडतां नवे विचार प्रगट करणें सुलभ होतें. संस्कृताचा यापुढें सर्वांस उपयोग होणें शक्य नसलें तरी त्याचा संबंध सर्वस्वीं तुटूं देणें योग्य नाहीं. जुनी परंपरा सांभाळून नव्याचा संग्रह करतां येणें शक्य आहे. तथापि नवें ज्ञान, नवे विचार, नव्या भावना, यांचा आधींच इतका पूर आलेला आहे, व आणखी इतका पूर येणारा आहे कीं, मराठीला नवा पोषाख—पेहेराव, नवी शब्दसंपत्ति, यांचा स्वीकार केल्याशिवाय गत्यंतर राहणार नाहीं, तो तिनें आनंदानें करावाहि. यापुढें इंग्रजीच काय पण इतर अनेक परकी भाषा महाराष्ट्रानें शिकल्या पाहिजेत. राजकारण व समाजकारण या दोहोंच्याहि दृष्टीनें तें इष्टच आहे. वाङ्मयाचा हेतु कलाविलास किंवा बोध हा मानला तरी, त्या दृष्टीनें अनेक भाषांच्या द्वारें महाराष्ट्राला जागतिक संस्कृतीच्या समुद्रांत शिरणें हितावह होईल. कारण जीवनाच्या बरोबरीनें वाङ्मयाचा प्रवास व प्रगति झाली तरच उपयोग.

मराठीचा स्वीकार धैर्यानें करून ज्ञानेश्वरांनीं जो उपकार महाराष्ट्रीय जनतेवर केला तोच, नव्या पिढींतील महाराष्ट्रीय विद्वान् लोकांनीं निराळ्या रीतीनें पुढें चालविला पाहिजे. तो पुढें चालविण्याचें मुख्य साधन म्हटलें म्हणजे, सर्व प्रकारच्या नव्या विचारांचें प्रगटीकरण करण्याला मराठी पात्र व समर्थ करणें हें होय. ही पात्रता येण्याला मराठी गद्य वाङ्मयाची परिणति हाच मुख्य उपाय आहे; व ती परिणति होण्याचा मार्ग कोणत्याहि भाषेंतून मिळण्यासारखें ज्ञान आत्मसात् करून, तें पचवून, मराठींतून राष्ट्रशरीरांत भिनविणें हाच होय.

ज्ञानेश्वरांनीं क्रांति करण्याचें जें धैर्य दाखविलें तशाच प्रकारचें धैर्य नवीन पिढीच्या मराठी वाङ्मयसेवकांनीं दाखविलें पाहिजे. मात्र ज्ञानेश्वरांनीं धैर्य व आत्मविश्वास प्रगट करतांना कांहीं विनय, कांहीं गोडवेपणा, अंगीं आणून समाजाची सहानुभूति आपल्या नियोजित क्रांतीला मिळविण्याकरितां त्याला परोपरीनें कसें आळविलें व लोभविलें आहे तें पाहाः—

माझा मराठाचि बोलु कौतुकें । परि अमृतातेंहि पैजां जिंके ।
ऐशीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥
जिये कोंवळिकेचेनिपाडें । दिसती नादींचे रंग थोडे ।
वेधें परिमळाचें बीक मोडे । जयाचेनि ॥ ( अ. ६, ओं. १४--१५ )
हें असो शब्दब्रह्म जिये बाजे । शब्द मावळलिया निवांतु निजे ।
तो गीतार्थु मऱ्हाटिया बोलिजे । हा पाडु काई ॥ (अ. ९, ओं. २२)
देशियेचेनि नागरपणें । शांतु शृंगारातें जिणें ।
तरी ओंविया होती लेणें । साहित्यासी ॥
मूळ ग्रंथांचिया संस्कृता-- । वरि मऱ्हाटी नीट पढतां ।
अभिप्राय मानलिया उचिता । कवण भूमि हें न चोजवे ॥
जैसें अंगाचेनि सुंदरपणें । लेणियासी अंगचि होय लेणें ।
तेथ अलंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥
तैसी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं ।
शोभती आयणी । चोखट आइका ॥
उठाविलिया भावा रूप । करितां रसवृत्तीचें लागे वडप ।
चातुर्य म्हणे पडप । जोडलें आम्हां ॥

तैसें देशियेचें लावण्य । हिरोनि रसां आणिलें तारुण्य ।
मग रचिलें अगण्य । गीता-तत्त्व ॥ ( अ० १०, ओं० ४२–४७ )

अहो वधुवरांचिये मिळणीं । जैशी वराडियांही लुगडीं लेणीं ।
तैसें देशियेच्या सुखासनीं । मिरविले रस ॥
तीरें संस्कृताचीं गहनें । तोडोनि मऱ्हाठिया शब्द-सोपानें ।
रचिलीं धर्मनिधानें । श्रीनिवृत्तिदेवें ॥
म्हणोनि भलतेणें एथ सद्भावें नहावें । प्रयाग माधव विश्वरूप पाहावें ।
येतुलेनी संसारासी द्यावें । तिळोदक ॥ ( अ. ११, ओं. ९।१० )

एथ अर्जुनचि काय म्हणों पातला।आजि आवडतयाही सुकाळु जाहला।
जे गीतार्थु आला, मऱ्हाटिये ॥ ( अ. ११, ओं, १४ )

साहित्यसोनियाचिया खाणी । उघडवी देशियेचिया अक्षौणी ।
विवेकवल्लीची लावणी । हों देईं सैंघ ॥
ये मऱ्हाठियाचिया नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळु करी ।
घेणेंदेणें सुखचि वरी । हों देईं या जगा ॥ (अ. १२, ओं. १२ व १६)

तो कृष्णार्जुनसंवादु । नागरी बोलीं विशदु ।
सांगोनि दाऊं प्रबंधु । वोंवियेचा ॥
दाऊं वेल्हाळ देशी नवी । जे साहित्यातें वोजावी ।
अमृतातें चुकी ठेवी । गोडसपणें ॥ (अ. १३, ओ. ११५४-११५६)
आणि तोचि हा मी आतां । श्रीव्यासाचीं पदें पहातां पहातां ।
आणिला श्रवणपथा । मऱ्हाठिया ॥ ( अ. १८, ओं. १७०८ )

संस्कृत भाषा सोडून मराठीचा स्वीकार करावयाचा तर ती मराठी नियमबद्ध, समृद्ध, चित्ताकर्षक, व बोधप्रद झाली पाहिजे. आणि आपण ती तशी करूं असें आश्वासन आत्मविश्वासपूर्वक, ज्ञानेश्वरांनीं वाचकांना दिलें तशाच प्रकारचें आश्वासन नव्या पिढीच्या साहित्यिकांनीं, जुनी संस्कृति सोडून नवीचा स्वीकार करावयाचा तर, राष्ट्रांतील जनतेला देण्याची उमेद बाळगिली पाहिजे.

संस्कृत भाषेंतून संस्कृतज्ञांकरितां लिहिण्याची प्रथा ज्ञानेश्वरांनीं मोडली, पण ती फक्त पद्य-वाङ्मयापुरती. त्यांच्यासारख्या भाषाप्रभूला गद्य लिहिणें

अवघड कां गेलें असतें ? पण संस्कृतपंडितांची जी दृष्टि प्राकृताविषयीं, तीच ज्ञानेश्वरांची मराठी गद्याविषयीं असण्याचा संभव वाटतो ! जगांतील सर्व वाङ्मयांचा जुना इतिहास हेंच सांगतो. म्हणजे पद्याविषयीं अगत्य तें गद्याविषयीं नाहीं. एखादा वाङ्मयसेवक नवी प्रथा स्वीकारण्याचें धाडस करतो तें त्या काळीं त्रासदायक, बोचक, किंवा कंटाळवाण्या ठरलेल्या विशिष्ट संप्रदायाविरुद्ध करतो. पण सर्व ' पुढीलांच्या ' सर्व आकांक्षा सफल करणें हें त्याच्या हातून घडत नाहीं. वाङ्मयाच्या परिणतींत फरक पडतो तो पुष्कळसा रस किंवा भावना यांच्या दृष्टीनें पडत नसून, विषय, पद्धति व तंत्र यांच्या दृष्टीनेंच पडतो; परिवर्तन होतें तें मनुष्याच्या मूलभूत स्वभावाचें होत नसून, त्याच्या अनुभवानें उत्पन्न केलेले नवीन विषय, व नव्या आवडीनावडी, यांचेंच होतें. या परिवर्तनाचीं प्रभावी कारणें त्रिकालाबाधित व नित्य स्वरूपाचीं नसून, बरींचशीं तात्कालिक व प्रासंगिक असतात. यामुळें कोणी वाङ्मयसेवक कितीहि प्रतिभाशाली, धाडसी, किंवा रोमँटिक असला तरी त्याचा वाङ्मय-पराक्रम हा पुढील कोणच्याहि काळांतील सर्व प्रश्नांना उत्तर देणारी शकुनवंती होऊं शकत नाहीं. एकेका काळीं कोणा एकाचें प्रस्थ मोडलें तर त्या जागीं दुसऱ्याचें पण एकेरी असेंच प्रस्थ चालू होतें. एकाच सुधारकाला अनेक सुधारणा एकदम करतां येत नाहींत. सुधारक म्हटला तरी तो त्या काळापुरताच असतो. कारण "सुधारणा याचा अर्थ तत्कालीन विकृतीविरुद्ध योग्य ती प्रतिक्रिया" इतकाच असतो. म्हणून ज्ञानेश्वरांनीं संस्कृत वाङ्मयरचनेचें बंड मोडलें तें, नुसतें पद्यापुरतें न ठेवतां, गद्योपकारी असेंहि कां केलें नाहीं, हें विचारण्यांत फारसें स्वारस्य नाहीं. ज्ञानेश्वरांनीं प्राकृतांत लिहिलें तें ' वाटेल त्या सामान्य ' ( भलतेया ) माणसाकरितां असें म्हटलें असलें तरी, तें विधान वाच्यार्थानें घेतां येत नाहीं. आज ज्ञानेश्वरींत जुने न समजण्यासारखे शब्द आहेत म्हणून ज्ञानेश्वरी समजण्याला कठीण जाते हें तर विशेष कारण आहेच. पण स्वतः त्यांच्या काळीं यांतील पुष्कळसे शब्द भर प्रचारांत होते असें असतांहि ज्ञानेश्वरीचें सर्व रहस्य सामान्य माणसाला समजणें शक्य नव्हतें असें मला वाटतें. काव्यांचें केव्हांहि असेंच आहे. ज्या कारणांनीं त्याचें रूप मोहक होतें, त्याच कारणांनीं त्याचा अर्थ कठीण होतो. काव्य हा गूढ व प्रगट यांचा खेळ असतो. चित्रांतील छाया

( गूढ ) व प्रकाश ( प्रगट ) यांच्या मिश्रणानें चित्रविषय समजण्याला मदत होते, पण त्याच्या उलट प्रकार काव्यांतील स्फुट व अस्फुट यांच्या मिश्रणानें होत असतो. शब्दांची अडचण नसतांहि कांहीं कांहीं आधुनिक मराठी काव्य सामान्य माणसांना समजत नाहीं ! तात्पर्य, ज्ञानेश्वरांनीं संस्कृताचें बंड मोडून प्राकृतांत लिहिलें तथापि तें पंडितानें पंडिताकरितां लिहिलेलें मराठी वाङ्मय असें म्हणावें लागतें. आणि हा क्रम पुढें कमी होत चालला होता तरी एकोणिसाव्या शतकापर्यंत थोडथोडा चालूच होता.

ज्ञानेश्वरांचें मराठी सामान्य माणसाला कठीण जाणारें असलें तरी तें प्रगट व प्रसिद्ध होतें. यामुळें त्यांच्या ज्ञानाच्या मराठीकरणाचा थोडा तरी उपयोग झाला असें म्हणतां येईल. पण महानुभाव ग्रंथकारांनीं मराठींतच लिहिलें असतां त्यांनीं तें शक्य तितकें गूढ व अप्रसिद्ध स्थितींत ठेवलें. यामुळें त्या मराठीकरणाचा बरेच दिवस उपयोग झाला नाहीं. या पंथाच्या लोकांनीं आपले मराठी ग्रंथ गुप्त सांकेतिक लिपींत लिहिण्याचें खरें कारण काय, हें चांगलेंसें लक्षांत येत नाहीं. कारण कोणताहि मतप्रसारक सांप्रदायिक पंथ आपले ग्रंथ लोकांनीं वाचावे अशीच इच्छा करणारा असणार, अशी कल्पना सकृद्दर्शनीं होते. तें कसेंहि असो, पण या लहानशा पंथामध्यें कमींत कमी दहावीस सांकेतिक भाषा होत्या, यामुळें कोणत्याहि महानुभाव ग्रंथाचे वाचक किती थोडे असतील याची कल्पना सहजच करतां येते. यामुळें ज्ञानेश्वरांच्याच काळांत, त्यांच्या जोडीनें, मराठीचा प्रचार महानुभावांनीं सुरू केला, पण तो आजवर फुकटच गेला, असें म्हणावें लागतें. कारण अलीकडेच ते भाषासंकेत उकलण्यांत येऊं लागले असून, महानुभावी वाङ्मय छापून प्रसिद्ध होऊं लागलें आहे.

एकोणिसाव्या शतकांत मराठी गद्यरचनेला सर्रास सुरुवात झाली, हें खरें. तथापि त्यापूर्वी मराठी गद्य मुळींच लिहिलें जात नव्हतें असें मात्र नाहीं. मराठी ताम्रपट प्रायः गद्यांत लिहिले जात. मानभावी वाङ्मयांत पद्यावरोबर कांहीं गद्य-प्रबंध आहेत. यापुढील काळांत एकनाथी 'भारूडा' पैकीं कांहीं भाग गद्यात्मक आहे. मात्र तो म्हणण्याची धाटणी थोडीशी पद्यासारखी असते इतकेंच. त्यानंतर सतराव्या

शतकापासून गद्यांत लिहिलेल्या सनदा, निवाडपत्रें, करीणे, कैफियती, खासगी पत्रव्यवहार, बातमीदारांचीं पत्रें, बखरी इत्यादि बरेच प्रकार आढळतात. व्यवहार वाढला त्याबरोबर गद्याचें लिहिणें वाढलें. परंतु तें लिहिणाराला आपण वाङ्मय म्हणून कांहीं लिहितों अशी जाणीव नव्हती! कारण धर्मविचारपर नाहीं तें वाङ्मय नव्हे, जें जें धर्मविचारपर असेल तें पद्यांतच पाहिजे, व तेंच काय तें वाङ्मय, अशी समजूत होती. वरील गद्य प्रकार लिहिणारांना आपण 'वाङ्मय' लिहितों ही भावना नसावी ही मौज होय. पण अशाहि गोष्टी घडतच असतात. याचें एक थट्टेवाईक उदाहरण फ्रेंच प्रहसनकार मोलिअर याच्या एका नाटकांत आढळतें. 'दी शॉपकीपर टर्न्ड जंटलमन' या प्रहसनांत जोरडेन व प्रोफेसर यांमध्यें झालेल्या खालील संवादांत जोरडेन म्हणतो:— "Upon my word, I have been speaking Prose these forty years without being aware of it! And I am under the greatest obligation to you for informing me of it." आपण वाङ्मय लिहीत आहों ही जाणीव नसलेल्या-च्याहि हातून अजाणतां उत्कृष्ट प्रतीचें वाङ्मय लिहिलें जाणें अशक्य नाहीं. कारण वाङ्मय म्हणजे आत्मप्रगटीकरण होय, आणि वर सांगितलेल्या अनेक गद्य प्रकारांत ते लेखक कमीजास्त प्रमाणानें आत्मप्रगटीकरणच करीत नव्हते काय? त्यांत अर्थात् निवडानिवड करावीच लागते. पण आधुनिक काळच्या, मुद्दाम वाङ्मय म्हणून लिहिल्या जाणाऱ्या वाङ्मयांत, सामावून शोभून जाण्यासारखे असेहि त्या प्रकारांतले नमुने देतां येण्यासारखे आहेत. म्हणून दोन तीन मुद्दाम खालीं देतों.

(१)

दारूकामाचें मजेदार वर्णन असलेलें एक बातमीपत्र लखनौच्या वकीलानें नानाफडणविसास पाठविलें तें खालीं दिलें आहे:—

*"करार नामें इंग्रज आतशबाज विलायतेहून कलकत्त्यास येऊन, आतशबाजीच्या हुन्नरांत आपले हाताचें कौशल्य कलकत्तेकर साहेबाला कस दाखवून दोन वेळ मातबर इनामें कडोन सरफराज झाला होता. ही गोष्ट चहूंकडे बाजद (?) व दुनियांत महसूर झाली. मिस्तर इडोर व अलपूसाहेब,

* इतिहाससंग्रह पु. १, अं. ६—ऐतिहासिक टिपणें.

बहादर लखनौकर यांनीं त्याची उत्तम विद्या पाहून, कीं ते या मुलूखच्या सरदारांस अपूर्वतर आहे; सबब आतशबाज पाठवून देण्याकरितां कलकत्त्यास लिहिलें. सहा महिने झाले कीं, कलकत्तेकराच्या बमोजीब आतशबाज मजकर लखनौंत येऊन आतशबाजी तयार करीत होते. त्यास आतशबाजी तयार झाल्यावर, इडोर व अलपूसाहेब यांनीं चंद्र १९ मोहरमीं— हरकाराच्या जमातदाराच्या हातीं, मिर्झा आमानी यांस सांगून पाठविलें. संध्याकाळीं ऐन तयारीच्या समयीं आभाळाचा तुकडा आकाशीं प्रगट झाला; म्हणजे ढग आला. सबब, ते दिवशीं महकूफ ठेऊन, चंद्र २० विसावीचे रात्रीं तमाशा पाहावयाचे ठरावांत आलें. ते दिवशीं मिर्जा आमानी वाटेंतून फिरून आपल्या घरीं दाखल झाले. आज चंद्र २० विसावीच्या रात्रीं आभाळ स्वच्छ होतें. दुसऱ्यानें तयारी झाली. मिर्जा आमानी हसनरजखां व हैदरबेगखां व राजे मंगतराव व सर्व कारभाऱ्यांच्या सहित मिस्तर इडोर व अलपूसाहेब यांच्या मकानीं बिबिपुरास गेले. करार अतीशबाज यानें प्रथम आतशबाजी...तयार केली, व एका चौकोन्या खांबावर पुतळा [ उभा केला ]. निश्चय केला होता कीं, बंदूक लागतांच हाच पुतळा आतशबाजीस सुरू होईल. त्यास किती एक इंग्रजांनीं बंदुका मारिल्या, निशाण लागलें नाहीं. राजे जवानसिंग यांनींहि बरकंदाजी चांगली केली. गोळी निशाणास न लागली. शेवटीं मिर्जा आमानी यांनीं खाशी बंदूक घेऊन आपल्या स्वहस्तें सोडिली, तत्रापि निशाण चुकलें. या घालमेलींत रात्र प्रहराहून अधिक गेली. करार मजकूर यानें पुतळ्याचा तमाशा महकूफ ठेऊन, आपल्या हातानें एका आतशबाजीच्या झाडास बत्ती दिली. त्या झाडांतून अपूर्व फुलें निघालीं, कीं कधींहि कोणीं पाहिलीं नसावीं. एका नळाच्या कुलाऱ्यांतून भडका निघाला. त्यांतून हें दृष्टीस येत होतें कीं, दाऊदीचीं फुलें व केशराच्या कपाऱ्या व हिरवीं फुलें लबलबीत व सुरूचीं झाडें प्रफुल्लित व लसलशीत—जशीं बागांत उत्पन्न होतात तशीं प्रगट झालीं. हा तमाशा एक घटकापर्यंत राहिला. तों प्रकाएकीं दुसऱ्या नळांतून भडका निघोन आसमानांत गेला. त्यांतून सितारे आकाशांत उंच जाऊन, फिरतेसमयीं रंग दुसरा म्हणजे सहस्त्रावधि सर्प फणा काढुन पृथ्वीवर पडत होते. त्याचप्रमाणें आणखी आतशबाजींतून शतावधि मासे मोठे आतशबाजीच्या रोशनींतून निघोन, सिताऱ्याप्रमाणें आकाशांतून पृथ्वी-

वर येत होते, त्यानंतर एका क्षणांत आतशबाजींतून पर्जन्याचा मोसम पैदा झाला. पर्जन्याची वृष्टि झिरमिर नजरेस पडूं लागली, व दुसऱ्या आतशबाजीच्या झाडांतून अपूर्व नक्षा दृष्टीस आला. म्हणजे एक मशीद ती गजांची, बहुतच अपूर्वतर प्रगट झाली. कांहीं एक वेळ हाच नक्षा कायम राहिला. तों त्यांतून एकाएकीं बंदुकीच्या व तोफेच्या शलकेचे आवाज सुरू झाले. आवाज येथवर उंच होऊं लागले कीं, बिबिपुराहून लखनौच्या लोकांनीं ऐकिले. हा तमाशा समाप्त झाला कीं, एका आतशबाजीच्या नळाच्या भडक्यांतून सूर्य बाहेर येऊन आकाशीं चालला, व आपल्या प्रकाशेंकडोन त्या मैदानास प्रकाशित केलें. असाच चंद्राचाहि तमाशा नजरेस आला. शेवटीं एका आतशबाजींतून सूर्यमुखीच्या फुलाप्रमाणें फूल भ्रमण करीत निघालें, व अपूर्व कारागिरी केली होती कीं त्या फुलाच्या फिरण्यांत ही बौत स्वच्छ अक्षरें काढोन सर्व लोक तमाशा पाहाणाऱ्यांच्या दृष्टीस आलीं. करारानें असफदौला बहादूर यांच्या एकबळें कडोन आपली कारागिरी नादर केली. सारांश, अशी आतशबाजी होती कीं, मागेंहि कधीं कोणें ऐकिली नाहीं व पाहिली नसावी. सर्व लोकांनीं इंग्रजांस बहुत शाबासकी दिधली."

(२)

* "लष्करांत फिरावयाची मोठी मुष्कील. जागा जागा चाकी पहारे वाजपूस होते. आदवानीस मोर्चे सोमवारी एकादशीस लागले. पहिले दिवशीं बाहेरील पेठ लुटून शहपन्ह्यास मोर्चे लाविले. चार तोफा सुरू केल्या होत्या व वरील चार सुरू होत्या. खासा टिपू किल्ल्याचे पश्चिमेकडील आंगें खासे निशाणसुद्धां. मध्यें व डावे बाजूस सेदाची फौज व उजवे बाजूस पाईचे गाडदी वगैरे सरदार. मोर्चे एक बाजूनें पश्चिम व दक्षिण असे बसले आहेत. पूर्व उत्तरेकडे घोड्याचे राऊत फौजा पांचसात हजार उभी राहाते कीं, मराठी फौज तिकडून कुमकेस येईल, म्हणोन तोंडावर उभे राहतात. टिपू खासा फौजेंत आहे. मी आपले दृष्टीनें चाळीस पन्नास हाताचे तफावतीनें पाहिला. रंग गोरा मध्यम आहे. डेऱ्याहून मोर्चांत सोमवारीं आले. तेव्हां निळ्या घोड्यावर बसला होता. पागोटें चक्रीदार छिटी बैंदरी आंगरखा पिवळा ताफ्त्या व जुबा मोठ्या पटीचे

* इतिहाससंग्रह पु. ३ अं. ७–९–ऐतिहासिक टिपणें.

मश्रूचा व पिवळी शालजोडी. येणेंप्रमाणें पोषाख होता. मिशा मध्यम गालां-वर, कानाल्या केंसाच्या, येणेंप्रमाणें पाहिला. लष्करांत आपले फौजेंची दक्षत भारी आहे. आवाई खातात. लोक बेदील आहेत. ”

( ३ )

ऽ“ चि. रा. नाना (पुरंदरे) प्रति बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक आशी-र्वाद उपरी. या प्रांतीं प्राचीन हिंदू राजे सर्व संस्कृतप्रवीण, वेश्यामद्यादिकांचा अति अनादर. सातां पिढयांचे श्रीमत्. सातां नृत्यगीतवाद्यत्पत्तिप्रवीण. स्वजातीय अनेक स्त्रिया प्रवीण त्यांशी रत; किंचित् जितेंद्रियही आहेत. नर्माची रीत, देव-ब्राम्हणांची विशेष मर्यादा व शोभा; जिचे अवलोकनमात्रें अधर्मिष्ठास धर्मरति उत्पन्न होणार. गाणार कम्पतम स्वर; वर्ज्यावर्ज्यादिक शास्त्रप्रमाणरीतीनें गाणार; वेदशास्त्र किंचित् जाणतात, त्यांत जे मुख्य ते तों पाहिलेच नाहींत; जे मुख्य ते निरापेक्ष, सर्वद्धिसमृद्धि; त्यांचे शिष्यवर्ग अनेक; प्रयत्नें आणून विद्यादृष्टीनें पाहतां अतिश्रेष्ठ स्वदेशज; स्थूल दृष्टीनें पाहतां मात्र अरमणीय. बाग, फुलें, कमळें इत्यादि शोभा जे महाप्रयत्नें लहानशी करावी त्याची तों गणना नाहीं. ज्यांचें तेज पाहतांना असें वाटेंत कीं, यांची प्रार्थना करून स्वदेशास न्यावें. परंतु ते विदेशभूमि जाणून, प्रार्थना केली असतां न येत. इकडील नद्या अमृतो-पम, बहुतजनास स्वजलप्रदानें समृद्धिवंत करितात; व पांथांस आनंद व राज्यास द्रव्यवृद्धि करितात. ज्यांचे सहचारें ओढ्याची उपमाहि आमच्या राक्षसस्वभाव नद्यांस नये. उत्तर प्रांतांतील सर्व मनुष्य शुभ्र, व त्यांत एक रामचंद्र व कृष्णाजी श्याम त्यांचें वर्णन करितात. देशीं एक ईश्वर श्रम-युक्त झाले, इकडील सर्वही नीलांबुदसंभ्रम; परंतु धर्मरूपें पाहतां जे हंसो-पम; सर्वही मर्यादशील; आयापेक्षां व्यय थोडा; अधर्मापेक्षां धर्म फार; शैव—मध्व—लिंगधर्ते सर्वही स्वमताभिमानित. शौर्यधर्माविषयीं, नायमारा-व्यतिरिक्त, सर्वही युक्तियोद्धे. हें सर्व तुम्हांसहवर्तमान पाहावें, उचित असतां अनेक शोभा टाकून, एक स्वल्पशोभा अंगीकारून गेलां, हें उत्तम न केलें ! पुढें तरी स्वकीयागमनें करून या प्रांताचें अवलोकन करणें उचित असें. तुम्हांसहवर्तमान इकडे येणें झालिया, उर्वरित शृंगारसाधनें

ऽ मराठी रियासत—मध्यविभाग २ प्रकरण १६ वें. नानासाहेबाच्या उत्तरे-कडील स्वाऱ्या, पृष्ठ ५८, ५९, ६०.

प्रयत्नपूर्वक पाहण्यात येईल. राज्यकार्य प्रसंग विचार करितां भगीरथ-समान कैलासवासीयांनीं उत्तरेहून दक्षण पावेतों सुवर्णनदीप्रवाह चोवीस वर्षें वाहविला. त्यांचे आशीर्वादें अलीकडेही निरंतर वर्धमान वाहत असतां, देशाधिकारी सेनामुख्य व अकृत्रिमास पूर्ण त्या नदीनें संतुष्ट केलें. एक तृष्णामात्र त्या सुवर्णबोधानें वर्धमान केली. दक्षण देशांतून सुवर्णनदी मागें ( स. १७२५–२६ ) रघूजी फत्तेसिंग बावांनीं आणिली, परंतु जागां जागां जिरली. मध्यें बहुत दिवस दक्षिण नदी न वाहिली. श्रीइच्छेनें या वर्षींही कालानुरूप द्रव्यनदी उत्तमच या सैन्यांत आहे, परंतु पुण्याकडे जातां रुक्ष देश फार आहे. याजमुळें सर्व जिरून जाईल. एकदां उत्तरेकडील सुवर्णनदी व दक्षिणेची नदी दोहींचा संगम सागरकूपसमान पुणें या स्थळीं, मध्यें न जिरतां, पूरयुक्त योग घडणें, तेव्हां ऋणोद्धार श्रमसार्थक इहलोक परलोकीं उत्तम होईल. भागीरथी सागरासाठीं उत्पन्न, परंतु विश्वातें उद्धार करिते; तशी या काळीं हे उत्तरदक्षण-नदी वाहते, बहुत जनांस उपकारक होते. सर्वही नद्या जलौघें समुद्रास जातात, एक कावेरी मात्र बहुत लोकांनीं आपले उपयोगास आणिली. तशी हे द्रव्यनदी मुख्य कार्य थोडें, व गौणजनकार्य मात्र बहुत करते. हा न्याय अन्याय, हा विचार साक्षी दृष्टिवंत असतील त्यांनीं विचारून पुण्यांतील रुक्षता दूर होय, व मध्यें कार्याकारण जिरे ऐसें करणें हे योग्य असे. बहुत काय लिहिणें ? हे आशीर्वाद."

असो. आतां आधुनिक मराठी वाङ्मयाकडे पाहूं. एकाच नांवानें संबोधल्या जाणाऱ्या कोणत्याहि समाजांत जुन्या नव्या सर्व प्रकारच्या संस्कृतीचे नमुने एकाच वेळीं पाहावयास सांपडतात. अजबखान्यांतून असे नमुने मुद्दाम गोळा करून ठेवतात, समाजांत ते स्वाभाविक यदृच्छेनें असतात, इतकाच फरक. अजबखान्यांतील एकाच दालनांत हजारों वर्षांपूर्वींची इजिप्शियन ममी ( मसाला भरून कापडांत गुंडाळून ठेवलेला मृत मनुष्य ), आणि धाडसी कुशल शस्त्रवैद्यानें कालपरवांच गर्भिणी स्त्रीचें उदरविदारण करून स्पिरिटच्या बरणींत भरून ठेवलेलें अर्भक, हीं प्रत्येकाला पाहावयास मिळतील. त्याप्रमाणें अगदीं आजच्या हिंदु समाजांत खालील नमुने पाहावयास मिळतील: ( १ ) बाणांनीं शिकार मारून कच्च्या मांसावर उपजीविका करणारा भिल्ल; आणि 'हात

न लावतां तयार केलेले ' ( untouched by hand ) पदार्थ टेंबलाशीं बसून हातमोजे घालून चमच्या-काट्यांनीं खाणारा श्रीमंत. (२) हिमालयांत हिंवाळ्यांत तळ्यांतील बर्फाचा थर हातानें बाजूला सारून पाण्यांत बुडी मारून नग्न स्नान करणारा तापसी किंवा यात्रेकरू; आणि विजेनें तापविलेल्या 'गेशर' नामक गरम झऱ्याच्या पाण्यानें, बंद संगमरवरी खोलींत टबांत बसून सुगंधी साबण लावून नग्न स्नान करणारा संस्थानिक. ( ३ ) जवळचें द्रव्य नगदी रुपयांच्या रूपानें गाडग्या-मडक्यांत भरून भिंतींत किंवा बैठकीच्या खळग्यांत पुरून सांभाळणारा पाटील; आणि परचुटणाशिवाय नाण्याला न शिवतां केवळ 'चेक' नीं व्यवहार करणारा व्यापारी. ( ४ ) नित्य दोन वेळां स्नान करून 'समीध' शेकणारा अग्निहोत्री; आणि जागतेपणीं अष्टौप्रहर तोंडांत पेटलेला चिरूट धारण करणारा मिजाशी. ( ५ ) अजाणत्या बालकांचीं लग्नें लावणारे आईबाप; आणि युरोपांत जाऊन विजातीय कन्यकांशीं रजिस्टर पद्धतीनें प्रेमविवाह नोंदणारे तरुण व तरुणी, ( ६ ) केवळ एकतारी घेऊन भजन करणारा किंवा लावण्या म्हणणारा कुणबी; व रेडिओवर अमेरिकेंतील 'हॉलीवुड स्टार' च्या नाचाचीं गाणीं ऐकणारा फक्कड. ( ७ ) एकाच वेळीं पांच नवऱ्यांशीं नांदणाऱ्या द्रौपदीचें नांव निघतांच आदरार्थीं नमस्काराला हात उचलणारी, पण चुकून सुनेनें नवऱ्याशीं केलेलें चोरटें भाषण ऐकतांच अविनयाच्या अपराधाकरितां तिजवर हात उचलणारी, म्हाळसाबाई; आणि लग्नाचा एक व मनाचा एक अशा दोन पुरुषांशीं 'समाजस्वास्थ्या' च्या नांवाखालीं संबंध ठेवून तो मिरविणारी व 'रानटी' म्हाळसाबाईला नांवें ठेवणारी एखादी मृणालिनी. (८) संस्कृतप्रचुर मराठी बोलणारा लिहिणारा शास्त्रीपंडित; आणि एका वाक्यांत निम्मेपाऊण इंग्रजी शब्द, सहजासहजीं किंवा ज्याला 'इंग्रजींत अमुक म्हणतात असें म्हणून, भाषादारिद्र्याच्या नाइलाजानें घालणारा घेडगुजरी आर्यांग्ल पंडित. ( ९ ) गाढवाच्या पाठीवर बसून झ्या झ्या करणारा बेलदार; आणि रेस-कोर्सवर पाणीदार अरबी घोडा फेरणारा चाबुकस्वार. जी गोष्ट आजच्या हिंदुसमाजाची तीच आजच्या मराठी वाङ्मयाची आहे. त्यांत आज अभंग-ओंवींपासून गझल सुनीतें व मुक्तछंद लिहिणारे कवी आढळतात, जुने मराठी शब्द प्रयत्नानें हुडकून वापरणारे भेटतात, तसेंच ज्यांचा अर्थ समजत नाहीं असे इंग्रजीचे प्रतिशब्द वापरणारेहि दिसतात.

धुरकटत पेटणाऱ्या आगट्यां सारखीं बुवाबाजींतील श्रद्धाळू संतगुरु—चरित्रें आणि ठिणग्यां सारखे चमकून जाणारे नवमतवादी चिकित्सक खडे तात्त्विक बोल. चारचारशें पानांच्या कादंबऱ्या, आणि चार चार ओळींच्या लघुकथा. जुन्या शाहिरी थाटाचे चवदा चौकी वीररसात्मक पवाडे, आणि लावणी वजा उत्तान श्रृंगारात्मक छोटीं भावना गीतें. दोन हजार वर्षांपूर्वीच्या समाजजीविताचें संशोधन करून लिहिलेले सत्यवादी प्रबंध, आणि दोन हजार वर्षांनंतर येणाऱ्या नव्या सामाजिक जीवनाचीं कल्पनामय वर्णनें. जुन्या कवींच्या प्रेमानें केलेलीं संस्कृत काव्याचीं समश्लोकी भाषांतरें, आणि परदेशी कवी हेच अधिक सरस कवि अशा कल्पनेच्या उनाड आवडीनें सादी हफीज किंवा बायरन कीट्स् यांच्या काव्यांचीं भाषांतरें, इत्यादि प्रकार आढळतात. तथापि 'चालता काळ' नव वाङ्मयाचाच असणार हें उघड आहे.

नवें वाङ्मय व वाङ्मयप्रकार निर्माण होण्याला तीन कारणें प्रायः घडतातः १ नवी सृष्टि, २ नवी दृष्टि, व ३ नवी हृष्टि—तुष्टि, म्हणजे सुखाची आनंदाची कल्पना. नवी सृष्टि कालांतरानें निर्माण होतच असते. हा क्रम अनादि असून पुढेंहि अव्याहत चालणारा आहे. मात्र नवी सृष्टि याचा अर्थ ऐनजिनसी नवे पदार्थ किंवा पूर्वसृष्ट पदार्थांत 'नवे गुणधर्म' निर्माण होणें असा नाहीं; तर जुनेच पदार्थ व जुने गुण पण मनुष्याला मात्र नव्यानें अनुभवाला येणें. ही गोष्ट अकल्पित योगायोगानें घडते, किंवा मनुष्य कांहीं अनुमानें करून उपपत्ति बांधून प्रयोग करून पाहतो त्यांत घडते. सृष्टि जी एकदां उत्पन्न झाली ती सर्व गुणसमुच्चय बरोबर घेऊनच उत्पन्न झाली. ऐनजिनसी नवें किंवा अपूर्व असें कांहींच नाहीं. पण प्रथमच अनुभवाला आलें त्याला नवें असें मनुष्य म्हणतो, व त्याच्यापुरतें तें खरोखर नवेंच असतें. असो. अनुभव हा वाच्यता पावल्याशिवाय कधींच स्वस्थ राहत नाहीं. यामुळें नव्या गोष्टीचें वर्णन तो करूं लागतो; आणि हें वर्णन करतांनाच तो नवें वाङ्मय निर्माण करतो.

नवी सृष्टि हा शब्द अपरिचिताप्रमाणें परिचितालाहि लावितां येतो. अगदीं दररोज घडणाऱ्या गोष्टीला नवी सृष्टि कोणी म्हणत नाहीं. सूर्य बारा तास अदृश्य होऊन पुन्हां दिसला, चंद्र ठराविक क्रमानें उशिरां-उशिरां किंवा कमीजास्त कला असलेला असा नजरेस पडला, तरी ती

नवी सृष्टि असें वाटत नाहीं. पण याहून अधिक काल मध्यें जाऊन त्याच त्या वस्तु पुन्हां दिसल्या तरी ती क्षणभर नवी सृष्टीशी वाटते. वर्षांतून एक दोन ऋतूंतच पडणारा पाऊस, पावसाळ्यांत एखाद्याच वेळीं येणारा पूर, उन्हाळ्यांत मधूनमधूनच होणारा मेघांचा गडगडाट, विजांचा चकचकाट, झंझावात, जोराची वृष्टि किंवा गारांचा वर्षाव, या गोष्टी म्हटल्या तर परिचितच आहेत; परंतु त्यांच्या पुनरुक्तीमध्यें क्षणभर नवीनपणाचा भास होतो. विशिष्ट ऋतूंत फुलणाऱ्या फुलांचें प्रथम दर्शन झालें म्हणजे तीहि क्षणभर नवी सृष्टीशी भासते. लहान मुलें हीं बाहेरच काय पण आपल्या घरींहि पाहिलेलीं असतात. पण आपल्या घरीं जन्मास आलेलें नवें बालक पाहणाराला नवी सृष्टि पाहिल्याचा भास व आनंद होतो. फार वर्षांनीं परिचित मनुष्याची गांठ पडली असतां त्याचा वेष, चेहरा वगैरेमध्यें बदल झालेला असल्यास तो नवीनपणाहि आश्चर्यकारक वाटतो.

परिचित पदार्थ पाहूनहि जर याप्रमाणें नवी सृष्टि पाहिल्याचा भास व आनंद होतो तर अपरिचित असे पदार्थ पाहिले तर आश्चर्य वाटावें, आनंद व्हावा, व भावना जागृत होऊन तद्वाचक उद्गार निघावे, हें स्वाभाविकच आहे. आपण प्रवासाला निघालों असतां सर्वच दिसतें तें नवें असतें. पण त्यांतूनहि अपरिचित, इतकेंच नव्हे, तर कल्पनातीत अशा नव्या गोष्टी पाहिल्या म्हणजे प्रबळ भावना उत्पन्न व्हाव्या यांत काय आश्चर्य ? ज्या खेडवळानें ओढयाहून मोठा प्रवाह पाहिला नाहीं, त्याला मुखाजवळील कृष्णा-गोदेचीं पात्रें किंवा गंगा नदी पाहून किती आश्चर्य वाटेल ? पण सुशिक्षितालाहि आश्चर्यकारक वाटतील अशा गोष्टींचीं उदाहरणें म्हटलीं म्हणजे बर्फाच्छादित पर्वतशिखरें, अंतरिक्षांतील देखावे, पदार्थसंग्रहालयांत टेवलेल्या पुराणसंस्कृतिदर्शक वस्तु, प्राचीन शिलालेख व भूर्जपत्रावरील ग्रंथ, जुनीं नाणीं, रसायनशाळेंत निर्माण झालेले नवीन पदार्थ किंवा प्रयोग, भौतिक विद्येंतील सर्व चमत्कार व सुखसोयी, परदेशांतील समाजांची संस्कृति व रीतभात, इत्यादि होत. वरील किंवा तशाच प्रकारच्या इतर गोष्टी पाहून वर्णनात्मक किंवा चर्चात्मक गद्यपद्य ग्रंथ निर्माण होऊन वाङ्मयांत नवी भर पडत असते.

आतां नवी दृष्टि म्हणजे काय तें पाहूं. याचेहि दोन प्रकार होतात. नवी सृष्टि पाहून नवी दृष्टि येऊं शकते, ही गोष्ट उघड आहे. परंतु जुन्या परिचित वस्तुकडे-

हि पाहण्याची आपली दृष्टि बदलूं शकते वंही बदललेली दृष्टि नवी दृष्टि होय. परिचितच मनुष्य पण तो मित्र झाला म्हणजे त्याच्याकडे आपण नव्या दृष्टीनें पाहतों. तसेंच एखाद्या स्त्री–पुरुषासंबंधानें आपलें एखादें नवें नातें निर्माण झालें म्हणजे त्यांच्याकडे आपण एका नव्या दृष्टीनें पाहत नाहीं काय ? 'प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत्' या नीति-वचनाप्रमाणें मुलगा प्रौढ व बरोबरीचा झाला असतां आपण त्याच्या-बरोबर मित्राच्या नात्यानें वागूं लागतों. येथें मुलगा तोच, बाप तोच, दोहोंतील नातें तेंच; पण मुलग्याकडे मित्राच्या नव्या नात्यानें पाहणें हें नव्या दृष्टीचें उदाहरण म्हणून देतां येईल. नव्या जिव्हाळ्यानें नवी दृष्टि येते. आणि जी गोष्ट नवीन जिव्हाळा जडून होते ती केव्हां केव्हां जुना जिव्हाळा तुटूनहि होऊं शकते. शत्रूचा कांहीं कारणानें मित्र व मित्राचा कांहीं कारणानें शत्रु झाला तर त्याकडे पाहण्याच्या दोन्ही दृष्टि नवीनच कीं नाहीं ? तीच गोष्ट परिचित पदार्थांचे नवीन गुणधर्म कळल्यानें घडते. रानांत हिंडतांना आपण किती तरी वृक्ष व वनस्पति पाहत जातों. त्यांना चांगला वास किंवा त्यांवर चांगलीं खाण्यासारखीं फळें असतील तरच तीं झाडें आपल्याला आवडतात व त्यांचें अगत्य आपण बाळगतों. पण ज्यांना सुवास नाहीं किंवा रुचकरपणा नाहीं त्या झाडपाल्याकडे किंवा वनस्पतिकडे आपलें लक्ष मुळींच जात नाहीं. त्याकडे आपण पाहत असलों तरी शून्य दृष्टीनें पाहतों असें म्हणतां येईल. पण आपल्या जागीं एखादा तज्ज्ञ वनस्पतिशास्त्रज्ञ असला तर तो सुवास व रुचकरपणा यांच्या पलीकडे जाऊन त्यांच्या अंगीं असणारे औषधी गुण ओळखून त्यांच्या-कडे वेगळयाच दृष्टीनें पाहील; व त्या गुणांचें ज्ञान त्यानें आपणाला करून दिलें तर आपण शास्त्रज्ञ नसतांहि त्यांच्याकडे नव्या दृष्टीनें पाहूं. साध्या दगडांत वर्डस्वर्थ कवीला धार्मिक किंवा आध्यात्मिक नीति-बोध लिहिलेला दिसे तो एका नव्या दृष्टीनें त्याकडे पाही म्हणूनच. कवी तत्त्ववेत्ते हे चराचर सृष्टीकडे नव्या म्हणजे अलौकिक दृष्टीनें पाहूं शक-तात. पण सामान्य मनुष्यालाहि भौतिक शास्त्रानें आतां इतक्या गोष्टी नवीन शिकविल्या आहेत कीं, त्यालाहि त्याकडे, व तशाच अभ्यासानें इतरांकडे, नव्या दृष्टीनें पाहतां येतें.

तिसरी गोष्ट म्हणजे नवी हृष्टि किंवा तुष्टि. सृष्टि दृष्टि यांच्या जोडीचा हृष्टि हा शब्द अनुप्रासात्मक आहे. परंतु त्यापेक्षां तुष्टि हा शब्द अधिक समजण्यासारखा होय. तुष्टि म्हणजे मनाच्या संतोषाची स्थिति. संतोष हा आनंद व सुख यांच्या अनुभवाचा परिणाम आहे किंवा उद्गार आहे. पण संतोष हा नवा कसा असूं शकेल, असा प्रश्न कोणी करील तर त्याचें उत्तर हें कीं, मनाची वृत्ति अनुकूल झाल्यास पूर्वी ज्यापासून संतोष वाटत नव्हता, म्हणजे सुख व आनंद यांची भावना होत नव्हती, त्यापासून ती भावना नवी निर्माण होऊं शकते. या कामीं मनोवृत्तीला परिस्थितीची मदत होऊं शकते. सुखाच्या कल्पना सर्वांच्या एकच असत नाहींत. सृष्टि ही सर्वांना सारखीच, असें असतां सुखदु:खाच्या कल्पना कांहीं निमित्तानें बदलूं शकतात. यासंबंधीं एक संस्कृत सुभाषित सांगण्यासारखें आहे, तें असें:—

> सविता विधवति विधुरपि सवितरति तथा दिनन्ति यामिन्य: ।
> यामिनियन्ति दिनानि सुखदु:खवशीकृते जन्तौ ॥

कवि म्हणतो:—सूर्य उष्ण असतां तो चंद्रासारखा शीतल वाटणें, चंद्र शीतल असतां तो सूर्याप्रमाणें तापद वाटणें, रात्रीचा दिवस होणें व दिवसाची रात्र होणें या सर्व गोष्टी मनुष्य सुखवश किंवा दु:खवश अशा मनोवृत्तींत असल्यास घडून येऊं शकतात. वर्डस्वर्थला दगड पाहून तो ईश्वराचा धर्मविषयक संदेश वाटला, ही नवी दृष्टी होय. पण त्यांत सुखदु:खाचा संबंध नव्हता. म्हणून पदार्थाकडे नव्या दृष्टीनें पाहून जसा आपण बोध घेऊं शकतों त्याप्रमाणें नव्या दृष्टीनें पदार्थाकडे पाहिलें असतां सुखदु:खाच्या कल्पनाहि बदलूं शकतात.

अशा रीतीनें नवी सृष्टि, नवी दृष्टि, व नवी हृष्टि किंवा तुष्टि, या तीनहि गोष्टींच्या योगानें भावना प्रदीप्त होतात. आतां अशिक्षित माणसाच्या भावना प्रदीप्त झाल्या तरी त्याचें ज्ञान त्याला इतरांना देतां येत नाहीं. परंतु सुशिक्षित व त्यांतूनहि ज्यांची प्रतिभा प्रसन्न असते त्यांच्या भावना गुप्त न राहतां प्रगट होतात, व त्या प्रगट व्हावयाच्या म्हणजे निरनिराळ्या प्रकारचें वाङ्मय निर्माण व्हावयाचें. मग त्याचा दर्जा वक्त्याच्या किंवा लेखकाच्या पात्रतेप्रमाणें हलका किंवा उंची असूं शकेल. आणि कोणत्याहि देशांत वाङ्मयाच्या इतिहासांत युगपरिवर्तन झालेलें आढ-

ळतें तें या तीन कारणांमुळेंच होय. नवीन परिस्थिति स्पष्ट व्यापक व परिणामकारक अशी निर्माण झाली म्हणजे, प्राय: आत्मस्फूर्तीनें किंवा अनुकरणलालसेनेंहि वाङ्मयाचें नवें युग अवतरतें. ही गोष्ट इतर देशांतून आजवर घडली, तशीच हिंदुस्थानांतहि घडत आहे व पुढें घडणार आहे. म्हणजे वर दर्शविल्याप्रमाणें महाराष्ट्रामध्यें नवी सृष्टि निर्माण होईल. महाराष्ट्रीयांना नवी दृष्टि लाभेल, व तुष्टीची–हृष्टीची त्यांची कल्पना बदलेल त्याप्रमाणें महाराष्ट्रांत नवें नवें वाङ्मय निर्माण होत जाईल. नव्या वाङ्मयांत नवीन विषय येतील, इतकेंच नव्हे, तर नवीन पद्धतीहि येत जातील, असें भविष्य करण्यास हरकत नाहीं.

पण भविष्य हें झालें तरी पूर्वानुभवावर बनविलेलें एक प्रकारचें अनुमानच होय. कारण इंग्लंड, फ्रान्स, इटली, जर्मनी व रशिया या देशांतील वाङ्मयाच्या इतिहासांतहि जीं युगपरिवर्तनें झालेलीं दिसतात तीं नवी सृष्टि, नवी दृष्टि, व नवी हृष्टि यांच्या योगानें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष घडलीं आहेत. पैकीं संक्षेपाकरितां अमेरिका व रशिया हीं दोनच उदाहरणें घेऊन पाहूं.

अमेरिका ही १७७६ सालीं इंग्लंडविरुद्ध बंड करून स्वतंत्र झाली, तरी पुढें एक शतकपर्यंत ती युरोपच्या व विशेषत: इंग्लंडच्या संस्कृतीचा आदर्श डोळ्यापुढें ठेवून गुलामी वृत्तीनें त्या संस्कृतीचें अनुकरण करीत होती. स्वत: एमर्सन हा या गुलामांपैकींच एक होता. तथापि अखेर त्यानेंच पुढें येऊन ही गुलामगिरी टाकून दिली पाहिजे असें तरुण पिढीला कंठरवानें सांगितलें. कारण या शंभर वर्षांत खुद्द अमेरिकेंतल्या अनुभवानें वाङ्मयलेखनाला योग्य असे किती तरी नवे विषय निर्माण झाले होते ! सुप्रसिद्ध कवि लाँगफेलो व सुंदर गद्यलेखक वॉशिंगटन आयरविंग यांनीं नवे अमेरिकन विषय घेऊन वाङ्मय लिहिलें तरी त्यांची संस्कृति युरोपियन, यामुळें या नव्या विषयांचीहि चर्चा त्यांनीं जुन्या पद्धतीनें केली, असें टीकाकारांचें म्हणणें आहे. उलट अमेरिकन संस्कृतीनेंच विषयपरामर्ष घेणारा ग्रंथकार व्हिटमन यानें विषय जुनेच घेऊन नवें वाङ्मय रंगविलें ! प्रख्यात विनोदी ग्रंथकार मार्कट्वेन हा मात्र प्रथमच असा झाला कीं, त्याचे विषयहि नवे व लिहिण्याची पद्धतीहि नवी. युरोपियन संस्कृ-

तीची थट्टा करण्याचा जसा कांहीं त्यानें विडाच उचलला होता. अमेरिकेंत नववाङ्मयाच्या प्रवर्तकत्वाचा मान व्हिटमन याला देतात. त्यानंतर एमिली डिकिनसन ( कवयित्री ) व मार्कट्वेन हे झाले. मार्कट्वेन यानें अमेरिकन बोली व ग्राम्य भाषा यांचा भरपूर उपयोग केला. मिलर व आर्टेमस वार्ड हे मार्कट्वेनच्याच जातीचे लेखक होते. ट्वेनच्या विनोदाला कित्येकांनीं " कांचेच्या दुकानांत उच्छृंखलपणानें धिंगाणा घालणारा गेंडा " असें नांव दिलें आहे. व्हिटमन, डिकिनसन व ट्वेन तिघेहि क्रांतिकारक लेखक ठरले. नवें जग कसें असावें या दृष्टीनें त्यांनीं जुनी परंपरा टाकून दिली, व स्वतःचे असे नवे वाङ्मयप्रयोग क्रांति करण्याच्या हेतूनें केले. संस्कृतीला कालांतरानें कायम ठशाचें वळण येतें म्हणून तिच्यापेक्षां निसर्गालाच अधिक महत्त्व दिलें पाहिजे, असें त्याचें मत होतें. पण या धांगडधिंग्याविरुद्ध पुन्हां एक प्रतिक्रिया झाली. ती हॉवेल व हेन्री जेम्स यांनीं केली. या परिवर्तनाच्या काळांत अमेरिकन रंगभूमीचा जन्म झाला. पण तिला फारसें यश व कीर्ति लाभली नाहीं. समाजांतले व मानसशास्त्रांतले कूट प्रश्न सोडविण्याकरितां नाटकें लिहिण्याची पद्धति त्यांनीं स्वीकारली; पण नाटकाच्या गुणांपेक्षां या प्रश्नांनाच नाटककारांनीं अधिक महत्त्व दिल्यामुळें प्रश्न तर सुटले नाहींतच, पण नाटकेंहि चांगलीं रंगलीं नाहींत.

गेल्या शतकाच्या अखेरीस अमेरिकेंतील संपत्तिमत्ता बेसुमार वाढली. ती वाढण्याला सर्वच बाजूंनीं मदत झाली. पण त्याबरोबर एक नवेंच जग अमेरिकेंत निर्माण झालें. तें असें कीं, जुन्या परंपरागत अमेरिकन पद्धतीचें वाङ्मय त्याचा परामर्ष घेण्याला अपुरें पडूं लागलें. याचें वर्णन एकानें असें केलें आहे. " आजवर अमेरिकन हे शेतकरी, व्यापारी, पेढीवाले, कारखानदार, वर्तमानपत्रकार, शिक्षक इत्यादि कांहीं असले तरी ते प्रथम ' मनुष्य ' होते. पण यापुढें ते श्रमोपजीवीपणाचे गुलाम बनले. ' जीवनाकरितां श्रम ' हा न्याय जाऊन ' श्रम करण्याकरितां जीवन ' हा न्याय पुढें आला. संपत्तिरूपी असा एक नवा राक्षस जन्माला आला कीं, त्यानें आपणाला खाऊन फुसकरून टाकूं नये याला एकच उपाय, म्हणजे तो अहर्निश कष्ट करणें हा होय. या राक्षसाचें रक्त हाडें व श्वास:निश्वास हे सर्व संपत्तिरूपी होते. " या विकृतीविरुद्ध गवगवा व चळवळ करण्याकडे

गेल्या पन्नास वर्षांतील वाङ्मय लेखकांचा एक सबंध वर्ग खर्ची पडला आहे. त्यांतला पहिला ग्रंथकार फ्रँक नॉरिस हा होय; व त्यानंतर अपटन सिंकलेअर. नॉरिस याचे कादंबरीग्रंथ 'ऑक्टोपस', 'पिट' 'व्हीट' हे प्रसिद्ध असून, सिंकलेअरचे कादंबरीग्रंथ 'जंगल', 'बोस्टन' वगैरे तसेच प्रसिद्ध आहेत. परंतु या दोघांच्याहि ग्रंथांत कला फारच कमी असून मतप्रसाराचें ओजच विशेष आहे. शिवाय अमेरिकेंत अनेक संस्कृतींची बेसुमार भेसळ झालेली असून आतां कोणत्याच बाबतींत एक-जिनसीपणा किंवा एकराष्ट्रीयत्वाची भावना राहिलेली नाहीं. ए. सी. वॉर्ड म्हणतोः—

"What is the voice of America ? It is the multiple voice of missionaries, drunkards, traphers, miners, farmers, planters, savages, slaves, gamblers, roustabouts, millionaires, prostitutes, lovers, presidents ; English, Swedes, Germans, French, Irish, Hungarians, Czechs, Italians, Poles, Methodists, Catholics, Mennonites, Quakers, &c."

याशिवाय हॉलीवुडमधील सिनेमा टॉकी वगैरेचा प्रचंड जगद्व्यापी उद्योग, व स्वतंत्रता लाभलेला काळा नीग्रो समाज यांचा संसर्ग, यांच्या योगानें अमेरिकन संस्कृतीची नुसती चिरफाड चाललेली आहे. तथापि इंग्रजी भाषेच्या दृष्टीनें पाहतां उद्यां इंग्लंडांतलें इंग्रजी मागें पडून अमेरिकन इंग्र-जीच जगभर प्रभावी होईल असा अदमास दिसतो !

आतां आपण रशियन वाङ्मयाचें उदाहरण घेऊं. एकोणिसाव्या शत-कापर्यंत रशियाचा राजकीय इतिहास आहे, पण रशियन वाङ्मयाचा असा इतिहास नाहीं. बाराव्या शतकांत Story of the Raid of Igor नांवाचें एक महाकाव्य रशियांत निर्माण झाल्याचें नमूद आहे. सतराव्या शतकापासून रशिया व बाहेरचें जग यांच्यामध्यें खुलें दळणवळण सुरू झालें. अठराव्या शतकांत लोमॉन सॉफ नांवाचा एक साहित्यिक झाला. त्याला रशियन वाङ्मयाचा पीटर धी ग्रेट असें म्हणतात. १७५५ सालीं रशियन युनिव्हर्सिटीची स्थापना झाली. तिच्या द्वारें फ्रेंच संस्कृतीचा प्रसार रशि-यांत झाला. त्यापूर्वी जर्मनी व पोलंड यांतून रशियांत ज्ञानकिरण प्रवेश करीत. १७९० सालीं पोलिसांच्या परवानगीनें एक प्रवासवर्णनात्मक नव-

मतवादी ग्रंथ प्रसिद्ध झाला ! पण खरें राष्ट्रीय वाङ्मय आणखी कैक वर्षे निर्माण झालें नाहीं.

रशियन भाषेचे अभिमानी असा हक्क सांगतात कीं, तिच्यामध्यें फ्रेंचचा जीवंतपणा व चलाखी, जर्मनचा खंबीरपणा, ग्रीक व लॅटिनची संक्षेपक्षमता, आणि इटालियनची मृदुता आहे. पण १८ व्या शतकांत झालें तरी प्रतिष्ठित वाङ्मयसेवकांची भाषा फ्रेंचच होती.

'१२ व्या शतकापासून १९ व्या शतकापर्यंतचें बहुतेक रशियन वाङ्मय जळून गेलें तरी त्यापासून जगाची फारशी हानि होणार नाहीं,' असें एका तज्ज्ञाचें मत आहे. झार पहिला अलेक्झांडर याच्या अंमलापासून या वाङ्मयाचा सूर्योदय झाला. मात्र त्याला कारण राजकीय व सामाजिक चळवळी. १८१२ सालीं बोनापार्टनें रशियावर स्वारी केली, तींत रशियानें त्याला हार खावयाला लावून त्याचा फार नाश केला. या गोष्टीनें रशियन वाङ्मयाला एकदम जोर चढला. झारनें प्रथम नवी लोकमतानुवर्ती राज्यघटना बहाल करण्याचें कबूल करून नंतर माघार खाल्ली या गोष्टीचाहि परिणाम वाङ्मयावर झाला. कारामझिन हा पहिला खरा नामांकित रशियन गद्य–लेखक ( १७२६–१८२६ ). त्याचे विचार लोकशाहीला अनुकूल होते. ज्याप्रमाणें कोलंबसानें अमेरिका शोधून काढून जगाला दाखविली त्याप्रमाणें कारामझिन यानें रशियाचें खरें अंतरंग रशियन लोकांना दाखविलें, असें म्हणतात. त्यानंतरचा साहित्यिक कवि क्रिलॉफ (१७६९– १८४४) यानें काव्याप्रमाणेंच बालकथाहि लिहिल्या. १८१५ नंतर 'सोसायटी ऑफ वेलफेर' नांवाची सार्वजनिक सभा रशियांत स्थापन झाली. तिचा हेतु सर्व प्रकारची चळवळ करण्याचा होता. पण झारच्या हुकुमानें ती संस्था बंद होऊन बंडवाले म्हणून पांच पुढारी फाशीं देण्यांत आले. या चळवळीचा वाङ्मयावर फार परिणाम झाला. झुकोव्हास्की या कवीनें इंग्लंड व जर्मनी या देशांतील वाङ्मयाचा परिचय रशियनांना करून दिला.

पुष्किन यानें जुने साहित्यिक संप्रदाय मोडून टाकून मंत्र व तंत्र या दोन्ही दृष्टींनीं साहित्यांतील नवमतवादाचा पुरस्कार केला. त्यानें सर्व प्रकारची प्रचंड ग्रंथनिर्मिति केली. स्वतः हद्दपारीची शिक्षा भोगून त्यानें साहित्यिकांच्या पुढील पिढीला धैर्याचें शिक्षण दिलें. आधुनिक

रशियन वाङ्मयाचें खरें युग त्याच्यापासून सुरू होतें. " The inspired priest of Appolo and the most frivolous of all the frivolous children of the world " असें त्याचें वर्णन करण्यांत येतें. त्यानें साहित्यिकाचा एक नवा पंथच निर्माण केला. त्यानंतरचा राष्ट्रीय शाहीर लरमॉनटॉव्ह हा झाला. १८४८ च्या सुमारास पहिलें आधुनिक रशियन साहित्यिकयुग संपून दुसरें सुरू झालें. या दुसऱ्या युगांतील प्रमुख साहित्यिक खालील होत. टर्जीनीव्ह, टॉलस्टॉय, डॉसटोयाव्हस्की, गॉर्की, इत्यादि. यांच्या युगाला ' रशियन सुधारणेचें युग ' असें नांव आहे. या लेखकांनीं रशियाचें खरें अंतरंग जगाला शिकविलें. तेथून पुढें रूसोजपानी युद्ध होईपर्यंत रशियानें योगनिद्रा घेतली. पण त्या युद्धाच्या धक्क्यानें ती कायमची मोडली. कारण त्यानंतर १९०५ सालीं रशियन क्रांतिकारक चळवळीला सौम्य स्वरूपाचा पण निश्चित प्रारंभ झाला. आणि १९१४–१९१८ च्या महायुद्धानंतर ती क्रांति पूर्ण झाली. रशियन वाङ्मयाचें वर्णन खालील शब्दांत उत्कृष्ट रीतीनें होऊं शकतें: Old in grief and very wise in tears. रशियन वाङ्मयावर कारुण्याचा जितका छाप पडलेला दिसतो तितका, कदाचित् आयरिश सोडून, इतर कोणत्याहि वाङ्मयावर पडलेला दिसत नाहीं. रशियन वाङ्मयांत एकंदरीनें अद्भुतापेक्षां वास्तवाकडेच भर अधिक आहे.

सोव्हिएटांच्या कारकीर्दींत रशियन वाङ्मय बरेंच सरसावलें आहे. युद्धाच्या काळांत रशियन लोकांना विविध प्रकारचे अद्भुत अनुभव आले. त्यांतच राज्यक्रांतीच्या अगदींच अपूर्व अशा अनुभवांची भर पडली. यामुळें नववाङ्मयनिर्मिति करण्याकरितां प्रतिभासंपन्न लेखकांची लेखणी चुरूचुरू लिहूं लागली. पण सोव्हिएटच्या सर्वंकष नियंत्रणानें तिला लगाम पडूं लागला. प्रश्न नवे उत्पन्न झाले, उत्तरें नवीं सुचूं लागलीं. पण तीं उत्तरें जुलमी सोव्हिएटच्या धोरणाला सांभाळून देणें प्राप्त झालें. याविषयीं मॅक्स इस्टमन नामक ग्रंथकारानें Artists in Uniform या नांवाचें एक पुस्तकच लिहिलें आहे. आर्टिस्ट ( कलावंत ) हा मूर्तिमंत स्वातंत्र्यवादी; आणि त्याचा यूनिफॉर्म ( गणवेष ) अंगांत घालणारानें त्या वेषाशीं संबंध असलेल्या पेषाची शिस्त व कदर सांभाळली पाहिजे. अर्थात् स्वातंत्र्य व शिस्त यांचें गोत्र कसें जुळावें ? पण या विरोधांतूनहि अखेर कलावंतांनीं

डोकें वर काढून यश मिळविलें आहे, असें कित्येकांचें म्हणणें आहे. परंतु हें समर्थन बेतानेंच स्वीकारलें पाहिजे. वाङ्मय व राजकारण यांची समव्याप्ति असल्याप्रमाणें आज रशियांत झालें आहे. सोव्हिएट अधिकाऱ्यांनाहि आपण वाङ्मयलेखकांवर जुलूम करीत आहों असें जाणवत असतें. म्हणून हा त्यांचा अपमान सुसह्य करण्याकरितां ते अधिकारी या लेखकांना चुचकारून शाबासकी देऊन, संतोषवून, वश ठेवण्याचा वाजवीहून फाजील प्रयत्न करीत असतात. "ग्रंथकार हे मानवी आत्म्यांचे इंजिनिअर होत" हें स्टालिनचें सुप्रसिद्ध वाक्य वरील सहेतुक अर्थवादात्मक स्तुतीपैकींच आहे. सोव्हिएटनें ग्रंथकारांवरचा लगाम किंचित् ढिला ठेवला त्या काळांत रशियन कादंबरीचें पुनरुज्जीवन झालें. पण पुढें पंचवार्षिक योजनेचा उपक्रम झाला तेव्हां हा लगाम पुन्हां खेचण्यांत आला, व "ही योजना लोकांना समजावून सांगावी, इतकेंच नव्हे, तर सजवून सांगावी, तिचें गुणवर्णन रंगवावें, सामुदायिक शेतकी पद्धतीची स्तुति करावी सामुदायिक कारखानदारीची स्तुति करावी" असा स्पष्ट इषारा ग्रंथकारांना देण्यांत येऊं लागला. पण अशा जुलमी उसन्या स्फूर्तीनें कोण कितपत चांगलें लिहिणार ? जें लिहिलें जाई तें लिहिणाराच्या किंवा सोव्हिएट अधिकाऱ्यांच्या मनाजोगें वठेना. कला निस्तेज झाली. विषयवैचित्र्य संपुष्टांत आलें. तेव्हां १९३२ सालीं खास सोव्हिएट वाङ्मयलेखकांचें असें एक मंडळच नेमण्यांत आलें ! या मंडळाच्या बाहेर असलेल्या ग्रंथकारांना ग्रंथ लिहिण्याची मोकळीक नाहीं असें नाहीं. परंतु आपले विषय व आपली विवेचनपद्धति ही सोव्हिएटच्या धोरणाला कितपत सोडून आहे, हें पाहून त्यांना खबरदारी घ्यावी लागते.

या नव्या रशियनयुगांत काव्य नाटक यांची पीछेहाट झालेली असून कादंबऱ्यांना ऊर्जित दशा आलेली आहे. कम्युनिस्ट कादंबरीकार पुढें आले, पण कम्युनिस्ट महाकवि अजून निपजावयाचा आहे. रशियांत नाट्यप्रयोगांना उत्पन्न पुष्कळ होतें; व सीन सीनरी व इतर रंगोपकरणें समृद्ध आहेत. पण खरें कम्युनिस्ट छापाचें नाटक अद्यापि रंगभूमीवर आलेलें नाहीं. काव्य व नाटक यांना थोडक्यांत पुष्कळ सांगण्याचा गुण अवश्य असतो तो रशियन वाङ्मयांत आलेला नाहीं. गद्य कादंबऱ्यांतून

देखील विनाकारण फापटपसारा बराच असतो. त्यांत ग्राम्यपणाहि बराच असतो. पण मनोविश्लेषण चांगल्या प्रकारचें असतें. मुख्य भर व्यक्तिस्वातंत्र्य व समाजसत्ता यांच्या विरोधावर असतो. Romantic Idealist व Realistic Materialist यांच्या मधील विरोध हाहि एक विषय कादंबऱ्यांना उठावदारपणा देत असतो. सोव्हिएटनें नेमलेल्या ग्रंथकार-मंडळांतहि खरा मनुष्यस्वभाव व कम्यूनिस्ट तत्त्वज्ञान यांचा सुंदर मेळ घालून दाखविणारा लेखक अजून निर्माण झाला नाहीं.

आतां याच विचारसरणीनें गेल्या साठ वर्षांत आमच्या इकडे जें वाङ्मय निर्माण झालें त्यासंबंधानें, याच ग्रंथांत त्याचें खातेवार समालोचन करणारे समीक्षक, काय म्हणतात हें पाहा:—कवितांच्या समालोचनांत रा. माडखोलकर म्हणतात:–" मराठी कवितेला सर्व आधार संस्कृताचा. यामुळें सातशें वर्षांत तिचें स्वरूप पालटलें नाहीं. मुसलमानी संस्कृति व वाङ्मय अधिक श्रेष्ठ नसल्यामुळें जुलमी राजसत्तेचा पाठिंबा असूनसुद्धां त्या अमदानींत नवीन मराठी वाङ्मय निर्माण झालें नाहीं. मराठी कविता अविकृत राहिली. पण मुसलमानांच्या तीनशें वर्षांच्या राज्यांत जें घडलें नाहीं तें इंग्रजी अमदानीच्या पहिल्या पन्नास वषातच घडून आलें. याचें कारण इंग्रजी संस्कृति व वाङ्मय कांहीं कांहीं बाबतींत अधिक श्रेष्ठ व अनुकरणयोग्य असें वाटलें. नव्या कवितेंत समाजांतील सर्व वर्गांच्या काळजास हात घालण्याचा गुण अवतरला नाहीं, याचें कारण त्यांत सर्व समाजाला समान असा जो हिंदुधर्म त्याचा ओलावा नव्हता. तथापि नवें वाङ्मय निर्माण झालें. मात्र तें एका विशिष्ट म्हणजे सुशिक्षित वर्गाला रिझवील असेंच झालें हें वेगळें. दुसरे पक्षीं गद्यांत धार्मिक भावनेपेक्षां व्यवहाराचा व्यापच जास्त असल्यामुळें इंग्रजी संस्कृतीनें नवें वाङ्मय निर्माण होऊन त्याचें ऐश्वर्य व विस्तार दोन्ही वाढली. स्वातंत्र्याच्या ध्येयाला पोषक वाङ्मय नव्या पद्यापेक्षां नव्या गद्यांतच अधिक निर्माण होत आहे. फक्त त्याला फक्त कायद्याच्या कचाटीमुळेंच थोडेंबहुत बंधन पडत आहे."

मराठी लघुकथा या विषयावर लिहितांना रा. दौन्डकर म्हणतात:—"इंग्रजीचा सहवास नसता तर लघुकथा हा स्वतंत्र प्रकार मराठींत आणखी कित्येक वर्षें रूढ झाला नसता. महायुद्धानंतरच्या कालांत जगाच्या अंत-

बाह्य स्वरूपांत फार फरक पडला. अर्थात् मराठी वाङ्मयसेवकांच्या डोळ्यापुढें नवी सृष्टि निर्माण झाली. यामुळें वाङ्मयाचे अनेक नवे प्रकार उदयास आले. हल्लीं मराठी लघुकथांमध्यें दहा पांच तरी परकी भाषेंतील लघुकथांचे अनुवाद आढळतात. मराठी लघुकथा आतां कलेच्या मार्गानें चालूं लागली आहे. ”

मराठी कादंबऱ्यांचें समालोचन करणारे रा. विठ्ठलराव कुलकर्णी म्हणतात:— “ मराठी कादंबरीचा जन्म गेल्या साठ वर्षांतच झाला. म्हणजे इंग्रजी वाङ्मयाचा व संस्कृतिचाच हा परिणाम म्हटला पाहिजे. संस्कृत काव्य नाटकांचें भाषांतर मराठींत होऊं लागलें. यालाहि कारण इंग्रजी वाङ्मयाचें भाषांतर करण्याची लागलेली नवी संवय. समाजांत विचार-क्रांति होऊं लागल्यामुळें कथावाङ्मयाच्या स्वरूपांत इष्ट व अवश्य तो बदल झाला. विचार–विलासात्मक कादंबऱ्यांची स्फूर्ति सामाजिक सुधारणा व मतस्वातंत्र्य यांमुळें झाली. कादंबऱ्यांतून प्रथम राष्ट्रीय भावना, व त्यानंतर स्त्रीशिक्षण, स्त्रीपुरुषसहवास वगैरे विषय येऊं लागले. रूढींचें उल्लंघन करणारें वाङ्मय लिहिलें जाऊं लागलें. तथापि महाराष्ट्राचें कार्यक्षेत्रच संकुचित. यामुळें कादंबरींतील विषयहि संकुचित व एकांगी असतात. काल्पनिक नवमतवादांतच जो कांहीं कल्पनेला भराऱ्या मारण्याला वाव मिळेल तेवढाच. खालच्या वर्गांतील सुखदुःखें तेव्हांच कादंबऱ्यांतून रंगविलीं जातील कीं, त्या वर्गाच्या सहवासानें लेखकांना नवी सृष्टि व नवी दृष्टि लाभेल. ”

नाटकांचे समालोचनकार रा. खांडेकर यांच्या मतें “ इतिहास कला व वाङ्मय हीं नव्या स्वरूपाचीं, म्हणजे परकीय, अशीं दृष्टिपंथांत आल्यामुळें दर दहादहा वर्षांनीं नाट्यवाङ्मयांत फरक पडत गेला. कालिदासापेक्षां शेक्सपिअर, मोलिअर व इबसेन यांच्या नाटकांचाच परिणाम महाराष्ट्रीय नाटककारांवर अधिक झाला. ऊर्दू रंगभूमि विशेष समृद्ध किंवा प्रतिष्ठित नसतांहि केवळ नवेपणामुळें तिचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. उलट कायद्याच्या बंधनामुळें राजकीय विषय नवीन असतांहि त्याजवर नाटकें लिहिलीं जात नाहींत. ”

विनोदी वाङ्मयावर लिहितांना रा. हर्षे म्हणतात:– “ आज रूढ असलेली खास विनोदमिश्रित लेखनपद्धति ही सर्वस्वी नवी आहे. आधु-

निक विनोदी लेखकांना आपल्या समाजांतील जुन्या गमतीदार गोष्टी, आख्यायिका, सुभाषितें, चुटके यांपेक्षां नवीन इंग्रजी वाङ्मय अधिक उपयोगी व अनुकरणीय असें वाटतें. इंग्रजी संस्कृतीच्या स्पर्शानें जुन्या चालीरीति, रूढी, हास्यास्पद वाटूं लागल्या. तसेंच नवशिक्षितांचें स्वैरवर्तन व अंधानुकरणहि हास्यास्पद होऊं लागलें. म्हणजे अशा रीतीनें विनोदी वाङ्मयाचा दुहेरी फायदा झाला. विनोदी वाङ्मयाकडे लक्ष दिलें तर हें दिसतें कीं, गेलें सबंध शतकभर आमच्यापुढें इंग्रजी वाङ्मयाचा आदर्श होता अर्थात् इंग्रजी भाषेच्या आवश्यक व आस्थेवायिक अभ्यासाचा हा परिणाम होय. वाङ्मय आंतरराष्ट्रीय होणें म्हणजे राष्ट्रीयत्वाच्याहि पलीकडे जाणें, ही गोष्ट नवी दृष्टि व नवी सृष्टि लाभल्याशिवाय कशी होईल ? ”

बालवाङ्मय सर्वस्वीं केवळ अनुकरणानें निर्माण होत आहे, असें रा. तळवलकर यांचें मत आहे. चरित्रवाङ्मयाचा तोच प्रकार. रा. बनहट्टी म्हणतातः— “ चरित्रवाङ्मय हें १८७१ नंतरच खरें होऊं लागलें. कारण चरित्र म्हणजे गारूड या जुन्या परंपरेंतून तें मुक्त झालें. साधुसंत, धार्मिक पुरुष यांचींहि चरित्रें चांगल्या ग्रंथकारांकडून लिहिलीं जातात, तेव्हां तीं नव्या पद्धतीनें लिहिलीं जातात. आधुनिक काळांत स्वकीयाप्रमाणें परकीयहि चरित्रविषय लेखकांनीं उपयोगांत आणले आहेत. स्वदेशाभिमानबुद्धीनें स्वकीयांचीं चरित्रें लिहिलीं जातातच, पण पाश्चात्य देशभक्तांचींहि चरित्रें, शौर्य, धैर्य इत्यादि गुणांच्या लोभामुळें लिहिलीं जातात. ”

आधुनिक ऐतिहासिक वाङ्मयांत पुष्कळसें वाङ्मय महाराष्ट्रासंबंधाचेंच आहे. तथापि प्रो. पोतदार यांनीं ही गोष्ट कबूल केली आहे कीं, “ ज्ञान व संशोधन यांचा उगम अगदीं स्थूलपणें आमच्या इकडे प्राचीन काळीं असला तरी हल्लींच्या युगांतील त्याचें जें विकसित स्वरूप दृष्टीस पडत आहे त्या स्वरूपांत त्याचा अवतार पाश्चात्य लोकांच्या संशोधनानेंच हिंदुस्थानांत झाला. मोठ्या उद्वेगानें व लज्जेनें असें कबूल केलें पाहिजे कीं, जरी मराठी भाषेंत पांचशें वर्षें ग्रंथ होत होते, तरी हिंदुस्थानच्या पलीकडील देशांविषयीं एक ओळसुद्धां ब्रिटिश अमलापूर्वीच्या मराठी वाङ्मयांत सांपडत नाहीं. ”

तसेंच साहित्यसमीक्षण किंवा टीकावाङ्मय याविषयीं लिहितांना

प्रो. जोग म्हणतातः—" मराठीमधील साहित्यशास्त्राचा उद्गम व विकास गेल्या साठपाऊणशें वर्षांतीलच आहे, ही एक सर्वप्रसिद्ध गोष्ट आहे. जुन्या मराठींत टीकावाङ्मय दोनतीन पुस्तकें वजा केल्यास मुळींच नव्हतें. इंग्रजी वाङ्मयाच्या संपर्कानें स्वतंत्र ग्रंथांचें समीक्षण करून, शास्त्रांतील आचार व्यवहारांत कसा आणावयाचा हें मराठी साहित्यशास्त्राच्या जवळजवळ जन्माबरोबरच आम्ही करावयास शिकलों. अर्वाचीन मराठींत साहित्यशास्त्रास चालना इंग्रजी वाङ्मयाच्या संबंधानें मिळाली हें लक्षांत घेण्याजोगें आहे. "

कोशवाङ्मयाचें समालोचन करतांना रा. कर्वे लिहितातः—" एकोणिसावें शतक उजाडतें न उजाडतें तोंच सर्वच वाङ्मयक्षेत्रांतून नाविन्य खेळूं लागलें. नवे विचार, नवीन मांडणी, नवीन भाषासरणी, नवीन शास्त्रीय परिभाषा, नव्या प्रचारकल्पना वगैरे सर्वच अभिनव. कांहीं जुनीं साहित्यक्षेत्रें ओसाड पडून दुसरीं नवीनच पुढें आलीं. शास्त्रीय पद्धतीचा अवलंब न केल्यास असंस्कृत म्हणून मागें पडण्याची भीति सर्व विचारवंतांना वाटूं लागली, तेव्हां समाजाला नवीन ज्ञानदृष्टि देण्याचीं सर्व साधनें संशोधित होऊन त्यांना शक्य तितकें कार्यक्षम करण्याचे प्रयत्न सुरू झाले. त्यामुळें साहजिकच कोशरचनेकडेहि कांहींचें लक्ष ती सुधारण्याच्या उद्देशानें वेधलें, व त्याचें परिणत फळ म्हणजे जर्मनींतील ग्रिम बंधूंचा शब्दकोश व इंग्लंडमधील नवीन ऑक्सफोर्ड कोश. कोश—वाङ्मयापुरतें पाहिलें तर खिस्ती मिशनऱ्यांची ज्ञानदृष्टि व इंग्रज सरकारची उपयुक्ततेची दृष्टि यांचीच मदत स्वतंत्र स्फूर्तिपेक्षां अधिक झाली आहे."

वरील सर्व अभिप्रायांवरून हें उघड होत आहे कीं, आधुनिक मराठी वाङ्मयाकडे कोणच्याहि खात्याच्या दृष्टीनें पाहिलें तरी त्याचा उगम नवी सृष्टि, नवी दृष्टि व नवी तुष्टि यांतच मुख्यतः झालेला आहे. तथापि जुन्या परंपरागत संस्कृतीचाहि उपयोग बुद्धिमान् लेखकांनीं करून घेतला आहे. अदृश्याला दृश्यापेक्षां मान व महत्त्व अधिक द्यावें, असा एक प्रकारचा मनुष्यस्वभाव असतो. त्या अदृश्यांतहि फिरून दोन दर्जे असतात. पहिला दर्जा प्राचीन युगाचा. सर्व कांहीं अद्भुत तें त्या युगांत घडावयाचें. दुसरा दर्जा अर्वाचीन किंवा ऐतिहासिक युगाचा. या युगांत अद्भुत चमत्कार घडत नाहींत. पण अलौकिक गोष्टी तरी घडतात. तिसरा दर्जा आधुनिक

युगाचा. त्याच्याकरितां सर्व कांहीं लौकिक तें राखून ठेवलेलें असतें. अर्थात् रसाचा परमोत्कर्ष प्राचीन गोष्टींच्या संबंधांत, त्यांहून कमी प्रतीचा रसोत्कर्ष अर्वाचीन ऐतिहासिक गोष्टींच्या संबंधांत, आणि आधुनिक गोष्टींत रसोत्कर्ष जवळ जवळ अशक्य, अशी कांहीं माणसांची समजूत असते. सत्य (म्हणजे आधुनिक लौकिक सत्य) हें केव्हां केव्हां कपोलकल्पित अद्भुतांवरहि ताण करितें. 'ट्रुथ इझ समटाइम्स स्ट्रेंजर दॅन फिक्शन', अशी एक म्हण आहे. पण ती अर्थातच अपवादभूत गोष्टीला किंवा प्रसंगाला लागू पडते. म्हणून, ' अपवादानें नियमच सिद्ध होतो ' ( एक्सेप्शन प्रूव्हज् धी रूल ) या दुसऱ्या एका म्हणीप्रमाणें दृश्य हें अदृश्यापेक्षां कमी आश्चर्यकारक असावयाचें, हाच नियम सिद्ध होतो. दृश्य हें पंचेंद्रियांनीं ग्राह्य म्हणून तें परिमित आणि अदृश्य हें मनानें म्हणजे कल्पनेनें ग्राह्य म्हणून तें अपरिमित. इंद्रियांच्या ग्रहणशक्तीला मर्यादा असतात; मनाच्या किंवा कल्पनेच्या ग्रहणशक्तीला मर्यादा नसतात. तर्कशास्त्र व सत्यज्ञानशास्त्र यांच्या बंधनापासून मन मुक्त असतें. मन हें त्याला जो विषय भेटेल त्याच्या इतकें मोठें होऊं शकतें. इंद्रियांचें तसें नाहीं. रसपरिपोषाला सहृदयतेइतकी कल्पनेची आवश्यकता नसल्यानें, लौकिक सृष्टींतूनहि रसोत्पत्ति होऊं शकते, व तें काम साध्या मूलभूत भावनाहि करूं शकतात. पण या एकाच्या जोडीला त्या दुसऱ्याची मदत झाली असतां ' अधिकस्य अधिकं फलं ' या न्यायानें रसोत्पत्ति अधिक सुकर किंवा प्रबळ होते. आपण एक उदाहरणच घेऊं. वचनपरिपालनाला लौकिक व्यवहारी जगांतहि मान आहे. त्याच्या सात्त्विक दर्शनानें भावना प्रदीप्त होऊं शकते. पण लौकिकांत वचनपरिपालनाची मजल आस्तींत जास्त किती जाईल? फेडीच्या बोलीनें घेतलेलें कर्ज मुदतीबाहेर गेलें तरीहि तें एका गृहस्थानें फेडलें, असें आपण ऐकलें तर सामान्य प्रतीचें आश्चर्य वाटेल. किंवा बाबू चित्तरंजन दास यांच्यासारख्या गृहस्थानें आपल्या मेल्या गेल्या बापाचें सर्व कर्ज फेडलें असें ऐकलें तर आपणाला विशेष आश्चर्य वाटेल. लौकिक इमानदारीची मजल प्राय: येथें संपेल. पण स्वप्नांत एखाद्या याचकाच्या हातावर राज्याचें उदक सोडलें तें खरें करणारा हरिश्चंद्र लौकिक युगांत कोठें भेटणार? त्याकरितां अदृश्य अलौकिक काल्पनिक जगाकडेच गेलें पाहिजे. हरिश्चंद्राच्या या उदाहरणावरून भावना जितकी प्रदीप्त होते, व

जितका रसोत्कर्ष होतो तितका लौकिकांतलें वचन-परिपालन पाहून होणें शक्य नाहीं. अतिथिसत्कार लौकिक जगांत होत असतोच, पण श्रियाळ व चांगुणा यांनीं स्वतःचा मुलगा मारून व रांधून अतिथीला वाढला तशी गोष्ट लौकिक जगांत कोठून आढळणार ? अर्थात् अतिथिधर्माचें जर परमोच्च स्वरूप रंगवावयाचें तर पुराणाकडेच वळलें पाहिजे. आपली बायको विकणारे नवरे लौकिक जगांतल्या रानटी टोळयांत आढळतील, पण धर्मराजानें द्यूतांत आपली बायको पणाला लाविली, ती हरल्यावर प्रतिपक्षाच्या स्वाधीन केली, तिला भरसभेंत ओढून आणून तिच्या पांच नवऱ्यांदेखतां नग्न करण्याचा प्रयत्न झाला, व हें सर्व त्यांनीं द्यूतधर्मरक्षणार्थ(!) डोळयांनीं पाहत असतां सोसलें! असलें उदाहरण लौकिक जगांत कोठून पाहावयास मिळणार ? त्याकरितां पुराणाकडेच धांव घेतली पाहिजे. एकानें दुसऱ्याची बायको पळविल्यावरून एखादा खून झालेला लौकिक जगांत आढळेल, पण सीतेचें हरण झाल्यामुळें चौदा चौकड्यांचें राज्य करणारा रावण मारला गेला व लंका जळाली, असलें उदाहरण रामायणासारख्या पुराणांतच आढळणार. हेलेनच्या हरणामुळें ट्रॉयच्या राज्याचा नाश झाला, व देवांनीं उलटसुलट पक्ष घेऊन मानवांत मिसळून युद्ध केलें, हें ग्रीक पुराणांतहि आढळतें. तात्पर्य शृंगार-वीरादि रस तेच व त्यांचा आस्वाद घेणारें मानव-मन तेंच; पण पुराणांचा आश्रय केल्यानें ते रस जसे रंगूं शकतील तसे लौकिक जगांतील चरित्रें व प्रसंग वर्णन केल्यानें रंगणार नाहींत. आतां पुराणाचा उपयोग करावा याचा अर्थ पुराणकालीन सर्वच समाजस्थितीचा अंगीकार करावयाचा असें नव्हे. आज उपयोगी न पडणारें असें पुराणांतील सामान्य स्वरूपाचें उदाहरण घ्यावयाचें नाहीं; पण आजहि उपयोगी पडणारें असें विशेष तेवढेंच घ्यावयाचें. रामायणांतल्या सीताहरणाचा उपयोग करावयाचा, व तो परदाराहरणाचें पाप व त्याचे भयंकर परिणाम मनावर ठसविण्याकरितां. पण रामायणांतल्या दोन चाकांचा रथ या आगगाडीच्या मोटारीच्या युगांत वर्णन करण्याकरितां घेऊन काय उपयोग ? रामायणांतलें विमान वाटेल तर घ्यावें. कारण त्याला पेट्रोलहि लागत नव्हतें !

अद्भुताकडून वास्तवाकडे झुकत जाणें हा चिकित्सक संस्कृतीचा स्वाभाविक परिणाम होय, व त्याला अनुसरून मराठी वाङ्मयाची परिणति होत आहे तें ठीकच आहे. परंतु वाङ्मयामध्यें कलेला नीतिबोधाच्या व

ध्येयवादाच्या बरोबरीचें मानाचें स्थान आहे असें कबूल केलें तरी, वास्तव साधतांना अद्‌भुताचा हटकून त्यागच केला पाहिजे असें मात्र ठरत नाहीं. अद्‌भुताचाहि उपयोग करून समाजाच्या वास्तव सृष्टींत उपयोगी पडणारा किंवा समाजाचें भावी ध्येय पटविणारा कलाप्रबंध रचणें शक्य आहे असें मला वाटतें. अगदीं ताज्या पिढीच्या वंशाजाला आपलें व्यक्तित्व राखून शिवाय दहा पांच पिढ्या मागील पूर्वजाची कीर्ति व मिळकत यांचा फायदा अभिमानपूर्वक करून घेण्याला काय हरकत ? मनुष्यस्वभावाचे आद्य घटक व गुण—परमाणु यांचें चित्ताकर्षक रम्य प्रगटीकरण साधणें हा जर कलेचा आत्मा किंवा कसोटी मानली, तर तिच्या कार्यांत समाजाच्या विद्यमान स्थिती प्रमाणें त्याच्या प्राचीन स्थितीचाहि उपयोग करून घेतां येण्यासारखा आहे. उदाहरणार्थ, राजकीयदृष्ट्या लोकराज्य, सामाजिकदृष्ट्या समतावाद, व आर्थिकदृष्ट्या समाजसत्तावाद, हीं उद्यांचीं म्हणून मानलेलीं जीं ध्येयें, ती पौराणिक किंवा ऐतिहासिक बीजभूत दाखले घेऊन रंगवून समाजाला पटवितां आल्यास तो फायदाच होय. वास्तवाचा पाठलाग करण्यांत पाश्चात्य वाङ्मयसेवकांनीं आपली कला रोडकी नीरस करून टाकली आहे. ती अधिकाधिक एकेरी होत असून तिच्यांतील भरदारपणा जात चालला आहे. या भविष्यकालीन ध्येयांचेंहि अधिष्ठान मनुष्यस्वभाव व मूलभूत नीतितत्त्वें हेंच आहे व असलें पाहिजे. मग हा सनातन मनुष्यस्वभाव व हीं सनातन नीतितत्त्वें ज्या पौराणिक व ऐतिहासिक अशा अद्‌भुतरम्य कथानकांतून घेतां येतील त्यांचाहि उपयोग आपण कां करूं नये ? अद्‌भुत रंगवितांना जसा वास्तविकाचा थोडाबहुत उपयोग करून घेतल्याशिवाय भागत नाहीं, त्याप्रमाणें अगदीं वास्तवदर्शन रंगवावयाचें असतां थोडाबहुत अद्‌भुताचा, आकस्मिकाचा उपयोग करून घ्यावा लागतो.

मनुष्याच्या अन्तःकरणांतील मूलभूत अशा भावना रंगवावयाच्या तर लौकिकापेक्षां अलौकिक असें चरित्र किंवा कथानक घेतलें असतां त्या पार्श्वभूमीवर त्या भावनांचा रंग अधिक खुलून दिसतोहि, ही गोष्ट बर्ट्रंड रसेल यानें मान्य केली आहे. 'कॉंक्वेस्ट ऑफ हॅपिनेस' या त्याच्या पुस्तकांत ट्रॅजिडी म्हणजे शोकपर्यवसायी किंवा करुणरसात्मक कथानकाविषयीं लिहितांना त्यानें असें म्हटलें आहे कीं, "शेक्सपि-

अरनें करुणरसात्मक नाटकें लिहिलीं आणि इबसेननेंहि तीं लिहिलीं, पण शेक्सपिअरच्या ‘ किंग लिअर ’ नाटकाचा जो परिणाम वाचकाच्या मनावर होतो तो इबसेनच्या ‘ घोस्टस् ’ या नाटकानें होत नाहीं. ” याचें कारण म्हणून तो असें देतो कीं, शेक्सपिअरचा नायक हा राजा आहे व इबसेनचा नायक हा एक सामान्य समाजांतला मनुष्य आहे. वास्तविक राजा व सामान्य मनुष्य हे, मनुष्य या नात्यानें एकच नव्हेत काय ? पण आम्हां प्रेक्षका-वाचकांची मनें अशीं कांहीं परंपरेच्या प्रेमाच्या शृंखलेंत बद्ध झालेलीं असतात कीं, राजा हा सामान्य माणसांहून मोठा म्हणून राजाचें दुःख सर्व दुःखाहून अधिक मोठें असें आपणाला वाटतें. त्यानें तसेंच दुसरें एक उदाहरण दिलें आहे. तो म्हणतो, ‘शेक्सपिअरच्या ज्युलिअस् सीझर या नाटकांत, सीझरचा खून पडला तसाच ‘सिना’ नामक कवीचा खून पडला. सीझर विरुद्ध झालेल्या कटांत ‘ सिना ’ नांवाचा एक कटवाला होता, हें लोकांस माहित झालें होतें. म्हणून रस्त्यांत दंगेखोरांचे हातीं हा दुर्दैवी कवि सांपडला असतां सिना या नांवाचा उच्चार होण्याबरोबर लोकांनीं त्याला मारला. तरी तो ओरडन सांगत होता कीं, ‘ अहो ! मी सिना आहें पण कटवाला सिना नाहीं; कवि सिना आहें. ’ पण लोक कशाला ऐकताहेत ! ते म्हणाले ‘ आम्हांला सिना हवा होता; तो सिना मिळाला. काम झालें. मग तो कवि असला तरी काय झालें ?’ असें म्हणतांना दंगा करणारे लोक मोठ्यानें खदखदां हंसले कीं नाहीं माहित नाहीं. परंतु सिनाच्या खुला-शानंतर झाला हा प्रकार हास्यास्पद वाटतो व हंसू येतेंहि. पण तोच आपला खून होतांना ब्रूटसनें उगारलेला खंजीर पाहून जेव्हां सीझर म्हणतो, ‘ अरे ब्रूटस ! तूं सुद्धां यांत सामील आहेस कां ?’ तेव्हां लोकांना हंसू येत नाहीं तर त्यांची करुणवृत्ति गहन होते. मग हा फरक कशानें पडला ? तर अर्थातच सीझर हा मनुष्य असला तरी मोठ्या दर्जाचा मनुष्य, व सिना हा यःकश्चित् मनुष्य. अर्थात् खून हा करुणरस पोषक असला तरी त्या रसाचा परिपोष आधाररूप विषयाच्या लहानमोठेपणा-प्रमाणें लहानमोठा होतो. याचें कारण मनुष्य समाजांतील उच्चनीच भाव हा आपल्या मनांतून अद्यापि गेलेला नाहीं. आपल्या इकडे कादंबऱ्याच काय पण लहान मुलांच्या गोष्टी कहाण्या या घेतल्या तरीसुद्धां

"एक होता राजा" येथपासून त्यांचा प्रारंभ व्हावयाचा ! याचा अर्थच हा कीं, मनुष्य समाजांतील मुख्य विभूति म्हणजे राजा ही समजूत ! परमोच्च कोटीचें दुःख किंवा सुख वर्णन करावयाचें असेल तर तें राजा राणी हेच विषय घेऊन करण्यांत येईल. सामान्य मनुष्याचें सुखदुःख गणतींत कोण घेतो ? दिवा तोच असतां, त्याचा प्रकाश अधिक पडावा म्हणून, आपण त्याच्यामागें आरसा लावतों. त्याप्रमाणें भावनावर्णनानें रसपरिपोष करावयाचा तर त्याला आधारभूत म्हणून सामान्य मनुष्यापेक्षां विभूतिमान मनुष्य घेतला असतां रसोत्पत्ति अधिक झालीच पाहिजे, अशा प्रकारची ही विचारसरणी आहे. आणि खरें बोलावयाचें तर पुढें एखाद्या सुवर्ण युगांत (!) काय होईल तें होवो; पण माणसामाणसांतील उच्चनीच सरसनिरस हा भेदभाव केव्हांहि सर्वस्वी नष्ट होईल किंवा नाहीं हा प्रश्न वादग्रस्तच होय. निदान स्वत: मी तरी या मताचा आहें कीं, भेदभाव नाहींसा होणें शक्य नाहीं. राजकारणाच्या यंत्रांत सांपडल्यानें सर्व मनुष्यें कांहीं कार्यापुरतीं एका छापाचीं व सारख्या वजनामापाचीं असें मानितां येईल. म्हणजे कायद्याचा किंवा राजकारणाचा व्यवहार अशा कृत्रिम समजुतीवर बसविला जावो; परंतु ऐनजिनसी मनुष्यप्राणी घेतला असतां, त्याच्या हक्कांत फरक न पडूं दिला तरी, त्याच्या व्यक्तिगत शरीररचनेंत, मनोरचनेंत, स्वभावरचनेंत, चरित्ररचनेंत, ध्येयरचनेंत फरक पडलाच पाहिजे. लहानमोठेपणा राहिलाच पाहिजे. आणि हा फरक पडूं शकेल तेथवर वाङ्मयांतील रसपरिपोषाच्या कार्यांतहि विषयभूत मनुष्याच्या लहानमोठेपणानें फरक पडला पाहिजे, हें ओघानें प्राप्त होतें. म्हणून अदृश्य व अद्भुत सृष्टि ही नव्या वाङ्मयांत वर्ज्य मानण्याचें कारण नाहीं. डोळ्यापुढें दिसणारा अनुभव हा जसा वाङ्मयाला उपयोगी तसाच डोळ्याआडचा अनुभवहि उपयोगी पडलाच पाहिजे. एक नुसतें महाभारत किंवा रामायण घेतलें तरी त्यांत मनुष्यस्वभावाचे इतके नमुने व कथानकाच्या घडणीचे इतके अनेक प्रकार आढळतात कीं, ही जुनी अनुभवसृष्टि तुच्छ किंवा निंद्य मानणें हें सयुक्तिक नाहीं.

आतां यापुढील काळांतील वाङ्मयावर नवमतवादाची छाप पडणें हें अर्थातच अपरिहार्य आहे. प्रत्येक वाङ्मययुगांत त्या काळचें म्हणून

नवमत डोकावत असतेंच. पण पूर्वी त्याची गति जी मंद होती ती यापुढें जलद होणार. लेखक व वाचकवर्ग हा झपाट्यानें वाढत आहे व हा वाढता वर्ग तरुण आहे. यामुळें नवमतवादाला प्राधान्य मिळणें यांत अस्वाभाविक असें कांहीं नाहीं. पण कोणतेंहि मत विशेष जोरानें पुढें आलें म्हणजे लगेच त्याची छाननीहि सुरू होते. म्हणजे प्रतिक्रिया सुरू होऊन तें मत बेताल होऊं नये अशाविषयीं प्रयत्न सुरू होतो. आणि लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही कीं, तो प्रयत्न नव्या पिढींतील लोकांकडूनहि होतो. विवेक हा सर्वस्वी झोपीं जाऊं शकत नाहीं. आणि नवमतवाद्यांपैकींच कांहींना अतिशयोक्तीची भीति वाटून, वाळलेल्याबरोबर ओलेंहि जाळलें जाऊं नये म्हणून, ते नवमतवादाचे खरे विषय कोणते, खोटे कोणते, याच्या योग्य मर्यादा कोणत्या, अयोग्य कोणत्या, याचें संशोधन करूं लागतात. अशाविषयीं दोन तीन पुरावे दिले असतां अस्थानीं होणार नाहींत. उदाहरणार्थ, यंदा बडोदें येथें महाराष्ट्र शारदामंडळाचें वार्षिक संमेलन झालें त्याचे अध्यक्ष रा. अनंत काणेकर यांनीं आधुनिक म्हणविणारांची भूमिका तपासण्याचा प्रयत्न केला आहे. ते म्हणतात—"आधुनिकपणा हा केवळ कालगणनेनेंच ठरत नाहीं. जुन्या कांहीं लेखकांत जशी नवी दृष्टि आढळते, तशीच काळाच्या दृष्टीनें आधुनिक म्हणजे आजच्या कांहीं लेखकांतहि जुनी किंवा पुराण दृष्टि असूं शकेल. एकाच काळीं लिहिणाऱ्या म्हणजे समकालीन लेखकांमध्यें पौराणिक दृष्टीचे व आधुनिक दृष्टीचे असे दोन्ही प्रकारचे लेखक आढळतात." काणेकरांच्या मतें "खऱ्या आधुनिक दृष्टीचा लेखक क्रांतिकारकच भासला पाहिजे; त्यानें उत्क्रांतीपेक्षां क्रांतीलाच अधिक महत्त्व दिलेलें दिसलें पाहिजे. परंतु आधुनिकांतहि असा एक वर्ग असतो कीं, कोणतेंहि नवीन हें केवळ नवीन आहे म्हणून त्याचा पुरस्कार तो करितो. जगावेगळें कांहीं तरी केलें कीं, लोक आश्चर्यचकित होऊन टाळ्या पिटतात म्हणून तो आधुनिकतेचा पुरस्कार करितो! पण तो वर्ग म्हणजे केवळ आधुनिकांतले विदूषक होत. लैंगिक विषयावरील क्रांतिकारक मतें प्रतिपादन करतांना, लिंगविषयक अज्ञानामुळें, किंवा लैंगिक कोंडमाऱ्यामुळें मानवी सुधारणेची पिछेहाट होते म्हणून, तशा विषयावर निर्लज्जपणें कांहींहि बोललें कीं, मानवी स्वभावांत चावटपणाची जी अधम आवड आहे ती अधम प्रवृत्ति जागृत होऊन लोकांना धक्के

बसतात, व मजा पाहावयाला मिळते; या हेतूनें हे लोक नाविन्याचा पुरस्कार करितात. लैंगिक विषयांवर कॉलेजांत व्याख्यान देणाऱ्या विद्वान् अध्यापकाचा हेतु, व अश्लील चित्रें चोरून विकून पोट भरणाऱ्या दुकानदाराचा हेतु यांत जितका फरक आहे, तितकाच फरक उपरोक्त नाविन्यवादी आधुनिक व क्रांतिवादी आधुनिक यांत आहे." काणेकरांच्या मतें, सदभिरुचि सांभाळून व खरोखर सुधारणा घडवून आणण्याच्याच इच्छेनें, अगदीं क्रांतिकारक वाटणारें कोणीं लिहिलें तरी तें नव्याच काय पण जुन्याहि दृष्टीच्या लोकांना निरपवाद वाटेल. म्हणजे तेहि ह्याविषयीं तक्रार करणार नाहींत, तर त्यांतील विचारांनीं मिळणाऱ्या चालनांचा स्वीकार करतील. ते विचार ते एकदम स्वीकारणार नाहींत, पण आपल्या मनांत त्यांची प्रामाणिकपणें चिकित्सा तरी खास करतील.

याहीपेक्षां अलीकडचा पुरावा या सप्टेंबर महिन्यांतच प्रसिद्ध झालेल्या 'नवमत' नामक नवीन मासिक पुस्तकाच्या पहिल्याच अंकांत आढळतो. नांवावरूनच हें मासिक नवमतवादी आहे हें दिसून येतें. तथापि 'नवमत' या नांवाखालीं प्रसृत होणाऱ्या विचारांपैकीं खरें किंवा योग्य नवमत कोणतें याचा विवेक करण्याची वेळ इतक्यांतच आली आहे, असें त्यानें म्हटलें आहे! तो विवेक सांभाळून निर्भेळ व सोलीव सत्य समाजापुढें ठेविण्याकरितां हें मासिक अवतरलें आहे, असें संपादकानें प्रथम निवेदनांतच सांगितलें आहे. याविषयीं खुद्द संपादकाचे शब्द आम्ही याखालीं देतों.

"नवमताच्या पवित्र नांवाखालीं कांहीं उपद्व्यापी प्राण्यांचा चालणारा हल्लींचा नंगा नाच डोळ्यांआड करून चालणार नाहीं. लैंगिक स्वातंत्र्य म्हणजेच नवमतवाद, अशी चुकीची समजूत करून घेऊन कांहीं अर्ध्यकच्च्या गुरूच्या चेल्यांनीं समाजाचा धडधडीत बुद्धिभेदच चालविलेला आहे, असें म्हटल्यास मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. नवमतवाद म्हणजे स्वैरसंचार, असाच नवमतवादाचा प्रांजळ अर्थ सर्रास रूढ होत असल्यामुळें, बऱ्याच विचारवंत माणसांना 'नवमतवादी' म्हणजे प्लेगचा उंदीर अशी भीति वाटल्यास त्यांत त्यांचा तरी दोष काय? आज तरी नवमतवादी याचा असाच चमत्कारिक अर्थ केला जातो कीं, जो शेजेची राणी सोडून शेजारणीवर डोळा ठेवण्यांत कांहीं चूक आहे

असें मानीत नाहीं, किंवा जो पितृत्व तर्कसिद्ध असल्याचा सिद्धांत गळ्यांत बांधून प्रत्यक्ष स्वतःच्या आईबद्दलहि संशय घ्यायला कमी करीत नाहीं, तो नवमतवादी ! अर्थात् अशी समजूत झालेल्यांनीं स्वतःस नवमतवादी म्हणवून घेण्यांत कमीपणा मानला, किंवा नवमतवादी ही एक शिवी आहे असा ग्रह करून घेतल्यास त्यांत त्यांची कांहीं चूक आहे असें आम्हांस मुळींच वाटत नाहीं. जोंपर्यंत नवमताच्या नांवाखालीं वाटेल तसलीं नासकीं कुजकीं मतें समाजाच्या माथीं मारून त्याची नाहक दिशाभूल करण्याचा प्रयत्न, कांहीं कोत्या विचारांनीं फुरफुरलेल्या लोकांकडून होत आहे तोंपर्यंत नवमतवादी म्हणजे एक शिवीच आहे, असें कोणी म्हट-ल्यास प्रत्यक्ष अस्सल नवमतवाद्यासहि राग यायचें कारण नाहीं. अशीच 'नवमत' या गोंडस नव्या नांवामागून चालणारी बौद्धिक सुलतान-शाही थांबविण्यासाठीं, तिचा बींमोड करून समाजाच्या सर्वांगीण उन्नतीचा मार्ग मोकळा करण्याच्या खडतर पुण्यकार्यासाठीं 'नवमत' मासिकाचा जन्म आहे, हें सांगायला आम्हांस आनंद होत आहे ! नवमतवादाचा नाजुक बुरखा घेऊन धुडगूस घालणाऱ्या झब्बूंना पायबंद घालणें हेंच 'नवमत' मासिकाचें ध्येय आहे. समाजाच्या उत्कर्षासाठीं, व्यक्तिगत सुप्त शक्तीच्या विकासासाठीं जें जें कांहीं करावें लागेल त्या सर्व गोष्टींचा समावेश 'नवमत' च्या कर्तव्यांत होतो. मग तें नवें असो किंवा जुनें असो ! निर्भेळ आणि सोलीव सत्य समाजापुढें ठेवून त्याचा प्रगति-मार्ग बिनधोक करणें 'नवमत'चें जीवनध्येय आहे. थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास—

ठराविकाला लाथ मारुनि । नभासहि उल्लंघू ॥

ह्या गडकऱ्यांच्या एकाच वाक्यांत 'नवमत'चें ध्येय सांठविलें आहे, असें म्हटल्यास चुकीचें होणार नाहीं.

" नवमत, योग्य त्या वेळीं नव्या नव्या विषयांबरोबरच योग्य अशा जुन्याचाहि पुरस्कार करायला कमी करणार नाहीं. केवळ जुनें म्हणून तें वाईट, असें आम्हांस मुळींच वाटत नाहीं. 'जुनें तें सोनें' ह्याच वाक् प्रचाराला चिकटून रहाण्याची जरी आमची इच्छा नसली, तरी जुन्यांत सोनें नसतेंच असें म्हणणें धाष्टर्याचें नव्हे काय ? अर्थात् समाजाच्या

सर्वांगीण विकासाला आवश्यक अशा कोणत्याहि गोष्टीला 'नवमत' प्रामुख्यानें पाठिंबा देईल."

याच अंकांत 'त्रिकोणांतील नवमतवाद' या मथळ्याखालीं कादंबरीकार रा. हडप यांनींहि तोतया नवमतवाद्यांवर तीक्ष्ण तलवार चालविली आहे! ते म्हणतात कीं, "देवादिकांची पालखी निघाली असतां भक्तांच्या मेळ्यांत कांहीं उचले किंवा खिसेकापूहि शिरतात; व हे करंटे स्वतः त्या मेळ्यांतील पवित्र वातावरणांत पुनीत न होतां उलट आपल्या भामटेगिरीच्या पापाचरणाला ती एक नामी पर्वणी आली असें समजून भोळ्याभाबड्या भाविकांचे खिसे कापून आपला तळीराम गार करीत असतात. महाराष्ट्रांत सध्यां सर्वत्र बोकाळूं घातलेल्या नवमतवादाचें स्वरूप या वर्णन केलेल्या भक्तिभावाच्या सोहळ्याप्रमाणें आहे. जुन्यांनीं नव्यांना नांवें ठेवीत बसणें हें अविचाराचें होय. पण नव्यांनींहि आपण नवें म्हणून करतों तें काय व कसें याचाहि विचार केला पाहिजे. महाराष्ट्रांतील आजकालच्या तरुणांचा नवमतवाद हें एका परीनें खऱ्या नवमतवादाचें विडंबन आहे. या साऱ्या नवमतवादाची उभारणी कामनापूर्ति, कनक, कांता या त्रिकोणांत झाली आहे! या त्रिकोणाबाहेरचा नवमतवाद त्यांना सुचत नाहीं व रुचत नाहीं. म्हणून खऱ्या नवमतवादीच्छूंनीं, प्रगतिप्रियांनीं, त्यापासून सावध रहावें व नरकांतल्या किड्यांना खुशाल नरकांत लोळूं द्यावें!" हीच गोष्ट वाचकांच्या मनावर बिंबविण्याकरितां रा. हडप यांनीं पुढें आणखी दहावीस वाक्यें स्पष्टोक्तीचीं म्हणून लिहिलीं आहेत. पण आम्हीं तीं उतरूनहि घेऊं इच्छित नाहीं!! ज्यांची इच्छा असेल त्यांनीं तीं मुळांतच वाचावीं!

नवें वाङ्मय म्हटलें म्हणजे त्याचा चेहेरा व मोहरा दोन्ही नव्या थाटाचीं असणार हें उघड आहे. त्याचें एक मुख्य कारण असें कीं, लेखकाच्या डोळ्यापुढें असणाऱ्या वाचकवर्गाच्या संख्येंतच मुळीं पूर्वीपेक्षां पुष्कळ फरक झाला आहे. ही संख्या दिवसानुदिवस इतकी वाढत आहे कीं, ह्या सर्वांना उद्देशून सर्वांचें मन आकर्षण करण्याची आकांक्षा धरणें कोणा नामांकित अधिकारी लेखकालाहि कठिण झालें आहे. डोळ्यांसमोर कोण आहे यावरून चेहरा व मोहरा बदलण्याची गोष्ट वक्ता व लेखक या दोघांच्या गोष्टींत सारखीच आहे. ज्यांना सार्वजनिक भाषणांचे प्रसंग येतात,

त्यांना हा अनुभव असतो कीं, श्रोतृसमाज बेसुमार किंवा अफाट असला म्हणजे वक्ता सर्वांना ऐकूं जाण्याच्या इच्छेनें आपला आवाज उंच करतो. तथापि त्या सर्वांना भाषण ऐकूं आलें तरी, सर्वांना पटेल असें बोलण्याची उमेद त्याला सहसा नसते. वक्तृत्वाचा हेतु श्रोत्यांच्या मनाचा अनुनय करणें म्हणजे मन आपलेसें करणें हा असतो; आणि श्रोत्यांचें मन वळतें न वळतें हें त्यांचे चेहेरे व त्यांजवरील चर्या हीं दिसल्याशिवाय वक्त्याला समजूं शकत नाहीं. बोलतांना स्वत:चे डोळे मिटून बोलणारा वक्ता असेल तर त्याच्या-पुढें चार किंवा चार हजार श्रोते असले तरी सारखेच. पण डोळे उघडे ठेवून, रोखून बोलणाऱ्या वक्त्याला आपलें तारामैत्रक श्रोत्यांतील कांहीं थोड्या लोकांशीं तरी मिळवावें लागतें; आणि हें तारामैत्रक जुळलें म्हणजे तेवढ्यालाच उद्देशून जणूं कांहीं आपण बोलत आहों अशा भावनेनें वक्ता बोलत जातो व तारामैत्रकानें बद्ध झालेल्या श्रोतृवर्गाच्या तोंडावर कसकसे परिणाम होतात हें पाहत पाहत तो आपलें वक्तृत्व चालवितो. तीच गोष्ट आज लेखकांचीहि झाली आहे. साक्षरता इतकी वाढली आहे कीं, एखादी प्रांतीय भाषा घेतली तरी तींत लिहिलेला मजकूर वाचणारे वाचक पूर्वीच्या काळाहून पुष्कळ; आणि पुष्कळ म्हणूनच वेगवेगळया ज्ञानश्रेणीचे व अभिरुचीचे असतात. पूर्वी वाचकवर्ग थोडा आणि लेखन-पद्धति व प्रकार हीं बांधलेलीं अशीं असत. परंतु आतां वाचक वर्ग फार विस्तृत झाल्यामुळें एकच पद्धति किंवा नमुना पुरत नाहीं. मनांत आणलें तरी उपलब्ध असलेल्या एकंदर वाचक वर्गाच्या हातीं आपलें लिखाण पडेल व वाचलें जाईल याविषयीं निराशा झाल्यामुळें, वर वक्त्यासंबंधानें सांगितलें ह्या रीतीनें आपलें तारामैत्रक ज्याच्याशीं बहुधा जुळेल असा एखादा वर्ग डोळ्यांपुढें आणून त्याकरितां तो लिहिण्याचा प्रयत्न करतो. यामुळें हळूहळू बहिर्मुख राहण्यापेक्षां अंतर्मुख होण्याची त्याची प्रवृत्ति वाढते. वाचकवर्ग अशा रीतीनें मनानें आंखून घेतला म्हणजे डोळे मिटून बोलल्याप्रमाणें लिहिणारा अंतर्मुख होऊन लिहूं लागतो. आणि शेवटीं कदाचित् लेखकाच्या ठिकाणीं एक प्रकारची बेडरवृत्ति उत्पन्न होऊन, कोण वाचील तर वाचील, आपण तर आपलें लिहूं ! अशी बेफिकीर वृत्ति त्याच्या ठिकाणीं निर्माण होते. भवभूतीनें " उत्पत्स्यतेऽस्ति मम कोऽपि समानधर्मा " असें जें म्हटलें तशीच वृत्ति, तशीच बेदरकार वृत्ति

लेखकाची होते; आणि याचे परिणाम लेखनावर होतात. लेखकवर्गाला आतां असेंहि आढळून येऊं लागलें आहे कीं, नियमबद्ध आंखीव रेखीव वाङ्मय वाचकांना पसंत पडत नाहीं. त्यांच्या अभिरुचीला जसे फांटे फुटले आहेत, तसेंच "सत्यं शिवं सुंदरं" या त्रयींतील प्रत्येकाविषयींचा व्यापार आतां घाऊक व आखबंद असा उरलेला नसून, तो किरकोळीच्या स्वरूपावर आला आहे. पूर्वी वाङ्मय–व्यवहाराच्या दुकानांत पांच चार पेट्या ठेवून, काम भागत होतें. त्याऐवजीं आतां माल पुष्कळ झाल्यानें, गिऱ्हाईक वाढल्यानें दहा वीस पेट्या लागतात. पूर्वी मालाच्या नांवानें माल खपे. पण आतां त्याला माल निर्माण करणारा किंवा विकणारा याच्या नांवाचीं लेबलें चिकटूं लागलीं आहेत व संवयीनें लेबल पाहून माल घेण्याची इच्छा गिऱ्हाइकांत वाढत आहे. स्थूलांतून सूक्ष्मांत शिरण्याची प्रवृत्ति वाढत चालली असून, सामुदायिक घाऊक अनुभवापेक्षां व्यक्तिगत, फुटकळ अनुभवाला चित्ताकर्षकता येऊं लागली आहे. याचा एक परिणाम असा होतोच कीं, अशा प्रकारचें नवें वाङ्मय सर्वांना सारखेंच समजत नाहीं. संकीर्ण सामुदायिक अनुभव हा कळतो, समजतो तसा विशेष व्यक्तिगत व कदाचित् अपवादात्मक ठरणारा अनुभव कळत नाहीं. यामुळें नवीन वाङ्मयाचा चेहरा व मोहरा हीं दोन्हीं सहजच बदलतात. हॅरोल्ड निकल्सन नामक एका साहित्य-समीक्षकानें हा आशय खालील शब्दांत मांडला आहे:—

"He does not state, he alludes. He does not teach, he indicates. He does not integrate, he disintegrates. He does not attempt to solve, he merely dissolves. Such is the effect on the modern writers of the emergence of the public, which is too diffused and too sceptical to be convinced by any general formula. The modern writer is driven away from the general towards the particular. And the reader who does not always possess the clue to his experience is often disconcerted and sometimes definitely at a loss. The writer's sole preoccupation is to convey for his own pleasure and for the pleasure of those who share his conception of life, such forms as seem to him significant. Modern writers are inspired by the egoistic impulse.

He cannot deal in token currency. He is forced to deal in kind. His medium of exchange is his own experience. The system thereby established is uncertain, clumsy and subject to fluctuation. "

परंतु ही गोष्ट अर्थातच कलेच्या दृष्टीनें लिहिणाऱ्या लेखकांची होय. पण मतप्रसाराकरितां म्हणून लिहिणें हें कांहीं असतेंच व तें मात्र अशा एकांडे शिलेदारी पद्धतीनें लिहून चालत नाहीं. त्याला लोकांना समजेल, पटेल असेंच लिहावें लागतें. दाखले द्यावयाचे ते प्रायः लोकांचे म्हणजे सामुदायिक अनुभवाचे द्यावे लागतात. व अशा रीतीनें वाचकांचा विश्वास पटवून घेतल्यानंतर मग आपल्या स्वतःच्या मनोविश्लेषणाचे अनुभव किंवा सिद्धांत त्यांच्यापुढें ठेवावे लागतात.

असो. नव्या युगांत नव्या विचारांचे व नव्या सिद्धांतांचे पाहुणे नुसत्या आपल्या भेटीलाच नव्हे तर आपल्या घरीं कायमची वस्ती करून राहण्यालाहि येणार. आगगाड्या, मोटारी झाल्यानें आपल्या घरची पाहुण्यांची गर्दी वाढत आहे त्याचप्रमाणें जगांतील एकंदर भौतिक परिस्थिति व ज्ञान हीं वाढत असल्यामुळें आपल्या मनोमंदिरांत उतरून मुक्काम करणारे, पाहुणचार घेणारे, विचार विकार यांच्या पाहुण्यांचीहि गर्दी वाढणार. हे पाहुणे जसे निरनिराळ्या जातीचे, तशींच त्यांचीं वाहनेंहि निरनिराळ्या प्रकारचींच असणार. म्हणून आपल्या मनोमंदिरांतील वाहनगृहें व तबेले हे पुष्कळ व निरनिराळ्या प्रकारचे बांधले पाहिजेत. एखादा कोणी पाहुणा विमानांतून आला तर देवदूत किंवा एखादा कोणी खेचराच्या गाडींतून आला तर तो राक्षस असें मानून चालणार नाहीं. सर्व प्रकारच्या पाहुण्यांचा सत्कार करणें हेंच दाक्षिण्य व हीच दानत. मात्र पाहुणचार करावयाचा म्हणजे घरच पाहुण्यांच्या ताब्यांत द्यावयाचें, असें नाहीं. या नव्या पाहुण्यांची आवड निवड पाहून, त्याप्रमाणें त्यांच्याकडे लक्ष द्यावें व त्यांची अभिरुची व त्यांचा निरोप समजून घेण्याचा प्रयत्न करावा. उलट पाहुण्यांनींहि लक्षांत ठेवण्यासारख्या कांहीं गोष्टी आहेत. या नवमताच्या पाहुण्यांच्या अभिरुचीचा तऱ्हेवाईकपणा खपून जाईल, कदाचित् त्याचें कौतुकहि होईल. परंतु यजमानाच्या मनाला बेधडक धक्का देणारें, त्याचा अपमान करणारें, त्याला विषाद उत्पन्न करणारें असें वर्तन पाहुण्यानें ठेवितां कामा

नये. विशेषत: पाहुण्यानें लक्षांत ठेवण्याची नाजूक गोष्ट म्हटली म्हणजे यजमानाच्या घरच्यां पडतपोशीला त्यानें होईल तितकें सांभाळलें पाहिजे. मग तो ओसरीवर कितीहि बाष्कळपणानें बोलला किंवा आपली गहिरीलोभी दृष्टि त्यानें सभोंवार फिरविली तरी हरकत नाहीं. एकाच शब्दांत सांगावयाचें तर नवमताच्या पाहुण्यांनीं सदभिरुचि सांभाळली पाहिजे. विजेनें दिलेला लहानसा धक्का दुःखकारक न वाटतां आनंदकारकच वाटतो. किंबहुना शरिरांतील स्नायूंना व ज्ञानवाहक तंतूंना असे लहान लहान विजेचे धक्के देऊन सामान्य शरीरविकृति किंवा कांहीं रोगहि बरे करतां येतात. पण तापलेल्या पदार्थानें दिलेला डाग हा कितीहि लहान असला तरी दुःखदच होणार. तीच गोष्ट नवमत प्रगट करण्याच्या पद्धतीची समजावी.

असो. चालता काळ व पुढें येणारा काळ लेखकवर्गांतील तरुण पिढीचा आहे. त्याच्या हातून पूर्वींच्या लेखकवर्गाच्या पिढीपेक्षांहि अधिक उज्ज्वल व अधिक श्रेयस्कर, राष्ट्रहितकारक असें वाङ्मय निर्माण होवो अशी प्रार्थना करून, व तें होईल अशी आशा प्रगट करून हा उपसंहार संपवितों.

---

## ५ वाङ्मयाची व्याप्ति व महत्त्व

### ( शारदोपासक मंडळाचें संमेलन १९३५ )

( ता. ५ जून १९३५ रोजीं पुणें येथें ' शारदोपासक मंडळाचे सम्मेलन प्रसंगीं संम्मेलनाचें उद्घाटन करतांना केलेलें भाषण. )

आजच्या संमेलनाला क्रमांक पडला तरी तें पुष्कळसें अनौपचारिकच आहे. त्याचा हेतु, बाहेर गांवांहून आलेल्या साहित्यभक्तांचा परिचय करून घेणें, हा आहे असें म्हटलें तरी चालेल. हा परिचय अध्यक्ष पुढें करून देतीलच. संमेलनाचें उद्घाटन वास्तविक झालेंच आहे. तथापि दोन शब्द बोलणें अवश्य म्हणून मी बोलणार आहें. चर्चेकरितां एकदोन विषय नेमण्यांत आले आहेत; पण त्यांवर मी बोलूं इच्छित नाहीं. परंतु आजच्या सारख्या संमेलनावर, व एकंदरीनें साहित्यिक वर्गावर, कोठें कोठें जो एक आक्षेप घेण्यांत येतो, त्याला मी थोडेसें उत्तर देणार आहें.

## साहित्यावरील आक्षेप

साहित्य संमेलन या शब्दाची थट्टा, स्वतः एक मोठे साहित्यभक्त असणाऱ्या अशा, वासुदेवशास्त्री खरे सारख्यांनीं आपल्या एका नाटकांत केली आहे. "साहित्य म्हणजे भोजन–साहित्य; आणि साहित्याचे आचार्य म्हणजे त्याचा स्वयंपाक करणारे आचारी!" अशी थट्टा विनोदबुद्धीनें त्यांनीं केली आहे. थट्टेला उत्तर कोणीच देत नसतो. पण तसलाच आक्षेप गंभीरपणानें खोल विचाराचा म्हणून कोणी घेतात, त्याचा मात्र परिहार केला पाहिजे. या आक्षेपकांच्या मतें हल्लीची सर्व शिक्षणपद्धति वाईट, व त्या पद्धतीचें सर्वांत वाईट फळ म्हणजे वाङ्मय व वाङ्मयाभिरुचि हें होय!! त्यांच्या मतें वाङ्मय हें अनुत्पादक! देशाला आज खरी गरज आहे ती 'फक्त' औद्योगिक, शास्त्रीय, व्यापारी, यांत्रिक अशा शिक्षणाची आहे! हा आक्षेप कांहीं अंशानें खरा आहे. हल्लींचें शिक्षण तात्त्विक किंवा पुस्तकी आहे, व्यावहारिक नाहीं. त्यामुळें बेकारी वाढत आहे ही गोष्ट आक्षेपकांप्रमाणें मलाहि मान्य आहे. आणि शिक्षणाची ही दिशा बदलण्याचा प्रयत्न युनिव्हर्सिटी व आर्टस् कॉलेजें देखील आतां करूं लागलीं आहेत. परंतु शिक्षणाची ही दिशा उद्यां बदलली तरी, वाङ्मयाच्या उपासनेचें महत्त्व कमी होणार नाहीं.

दुसरे एक आक्षेपक असे आहेत कीं, त्यांना संस्कृतिसंबंधीं सर्वच गोष्टींचें वावडें वाटतें. उदाहरणार्थ आमच्या इतिहासाचें संशोधन करणें म्हणजे उगीच कुजलेलीं मढीं उकरून काढणें होय असें ते म्हणतात. पुण्यांतील चित्रमयजगत् इतिहाससंशोधकांना नांवें ठेवीत असतें. पण मौज ही कीं, आजच सकाळीं हातीं पडलेल्या त्याच्या ताज्या अंकांत विलायती स्टर्लींग नाण्याचा तेराव्या शतकापासूनचा इतिहास संशोधून एकानें दिला आहे! हें संशोधन मात्र त्याला खपतें, आणि मराठ्यांच्या इतिहासाचें संशोधन मात्र त्याला, 'मुडदे फरासाचें' काम वाटतें! पण नव्या संस्कृतीप्रमाणेंच जुन्या संस्कृतीच्या पुनरुज्जीवनाला देखील मी महत्व देतों. जुन्या संस्कृतीच्या पायांवर उभें राहून नवी संस्कृती जोडिली तरच ती फायदेशीर होते. सर्वच्या सर्व जुनी संस्कृती टाकून सर्वच्या सर्व नवी संस्कृति कोणासहि घेतां येत नाहीं. सबंध मुलगाच्या मुलगा नवा दत्तक घेतां येतो, तशी संस्कृति घेतां येत नाहीं. एस्पेरँटो ही भाषा नवी,

पण तिची वर्णमालिका जुनीच आहे. तरीहि ती फैलावली नाहीं. जुनी संस्कृति हें राजकीय सत्तेचा हक्क सांगण्यालाहि एक सबळ कारण होऊं शकतें. १९१६ सालच्या लखनौच्या राष्ट्रीय सभेंत, स्वराज्याच्या मागणीचा ठराव, कॉंग्रेसच्या इतिहासांत प्रथमच, करण्यांत आला. याची प्रस्तावनाच अशी केली होती कीं, " ज्या अर्थी आम्हा हिंदुस्थानांतील लोकांची संस्कृति अत्यंत प्राचीन आहे, त्या अर्थी स्वराज्य मागण्याचा व मिळण्याचा हक्क आम्हाला आहे. " संस्कृतीचें पुनरुज्जीवन ( रेनेसन्स ) ही युरोपियन राष्ट्राच्या आधुनिक प्रगतीची प्रस्तावनाच होती.

## वाङ्मयाची व्याप्ति.

असो. संस्कृतीच्या उपासनेविरुद्ध जे आक्षेप तेच वाङ्मयाच्या उपासनेविरुद्ध आहेत. या आक्षेपकांच्या मतें साहित्यिक लोक, संमेलनाच्या नांवाखालीं, उगीच लुडबुड करून आपली प्रतिष्ठा आपणच मिरवीत असतात. कोणी त्याला ' सॉलेम ट्रायफिंलग ' हा इंग्रजी शब्द लावतात. त्याचा अर्थ " उगीच गंभीरपणाचा आव आणून क्षुद्र गोष्टींचा कारभार करणें " पण या आक्षेपकांना अनेक प्रकारचीं उत्तरें देतां येतील. पहिलें हें कीं, त्यांना स्वतःला वाङ्मय लिहिण्याची पात्रता नसते ! म्हणून ते वाङ्मयाची टवाळी करतात ! दुसरें उत्तर असें कीं, वाङ्मयाची आमची कल्पना फार संकुचित आहे अशी ते आपली भलतीच समजूत करून घेतात. जसें कांहीं आमच्या मतें लघुकथा, सुनीतें व फार तर नाटकें कादंबऱ्या, म्हणजेच काय तें सर्व वाङ्मय ! पण ही गोष्ट निखालस खोटी आहे. मी तर वाङ्मयाची अशी व्याख्या करतों कीं, " एकंदर ज्ञानविज्ञानाचा सांगोपांग व खोल असा परामर्ष योग्य शब्दांनीं घेणारें तें सर्वच वाङ्मय. " वाङ्मय म्हणजे नुसतें ललित वाङ्मय नव्हे.

## वाङ्मयाची उपयुक्तता

विज्ञानाचे उपासक आपले विषय लक्ष घालून मराठींत लिहीत नाहींत, किंवा ते लोकप्रिय करूं शकत नाहींत, हा त्यांचा दोष आहे, वाङ्मयाचा दोष नाहीं. आपणाला लिहितां येणार नाहीं असें उगीचच कित्येकांना वाटत असतें. राजाराम कॉलेजांतील माझे एक प्रोफेसर मुलांना म्हणत " बेटयांनो, Have something to say and it will be well and easily

said ” भौतिकशास्त्रें व विज्ञान यांच्या उपासकांना हीच गोष्ट सांगून, त्यांनीं आपले विषय लिहून मराठी वाङ्मय अधिक समृद्ध करावें असें मी सुचवितों. वास्तविक वाङ्मय हें सर्व प्रकारच्या ज्ञानाचें तोंड आहे. शिवाय चित्रकला, शिल्पकला, यांपेक्षां वाङ्मयकला ही अधिक उपयुक्त व कार्यक्षम ठरते. शिल्प व चित्र या कला मनुष्याच्या भावनेला तोंड फोडतात खऱ्या; पण त्या कलांची निर्मिति परिस्थितीमुळें परिणामीं मर्यादित ठरते. उदाहरणार्थ उत्कृष्ट पुतळा किंवा चित्र हें प्रायः स्थानबद्धच असतें. त्या जागीं किती लोक जाऊन तें पहाणार ? किती त्याचा आनंद सेवणार ? किती बोध घेणार ? चित्रें किंवा पुतळे याच्या हुबेहुब नकला करतां येत नाहींत; व करतां आल्या तरी त्यांना अस्सलीचा मान कोणी देत नाहीं. चांगल्या चित्राची छापील प्रत केव्हां केव्हां चार आण्यालाहि मिळूं शकते, पण मूळ अस्सल चित्राला लोक हजारों रुपये देतात. वाङ्मय कलानिर्मितीचें तसें नाहीं. त्या कलेचा आत्मा भौतिक साधनांवर अवलंबून नसून, केवळ स्वयंसिद्ध बुद्धि व भावना यांजवर अवलंबून असतो. यामुळें वाङ्मयग्रंथाच्या हजारों लाखों प्रती छापल्या तरी त्यांत ‘ अस्सल नक्कल ’ हा भेद उरत नाहीं. शिवाय वाङ्मय हें प्रत्येक साक्षरापर्यंत जाऊन पोहोचूं शकतें. फार मोठ्या कार्यक्षेत्रांत त्याला आपले हात पसरतां येतात. कोणच्याहि राष्ट्रांतील प्रगति, सुधारणा, ज्ञानविज्ञानाची वृद्धि हीं इतर कोणत्याहि कलेपेक्षां वाङ्मयकलेनेंच अधिक घडवून आणलेलीं आहेत.

## मतप्रसाराकरितां वाङ्मयाचा उपयोग

असो. वाङ्मयासंबंधानें आणखी एक आक्षेप असा कीं, त्या कलेचे कलावंत शब्दांच्या बाहेरच्या सजावटीवरच अधिक लक्ष देतात. आंतील बोध व शिक्षण यावर ते फारसें लक्ष देत नाहींत. कलेकरितां कला एवढेंच वाङ्मयाचें ध्येय असेल तर हा आक्षेप बरोबर ठरेल. पण एकंदर वाङ्मयाचा विचार करितां असें दिसेल कीं, कांहीं वाङ्मय कलेच्या शुद्ध आनंदाकरितां म्हणून लिहिलें जात असलें तरी, पुष्कळसें वाङ्मय मतप्रसाराकरितांच लिहिलें जातें; व तसें तें लिहिलें जावें हें योग्यहि आहे. सुप्रसिद्ध इंग्रजी लेखक जी. के. चेस्टरटन हा अतिशयोक्ति आणि विरोधाभास या कलेंत अग्रगण्य आहे. तो म्हणतो कीं, “ वाङ्मय हें खुल्या

दिलानें वाटेल तसें गौरवून किंवा अलंकारिक करून लिहिण्याबोलण्याचाच विषय आहे. आणि ती मनाची हौस पुरविण्याच्या मार्गांत येणारीं सर्व बंधनें कृत्रिम समजावीं. मनुष्यांनीं तीं मानूं नये. " या थट्टेखोरानें याविषयीं गमतीचीं दिलेलीं कांहीं उदाहरणें, मराठींत त्यांचें स्वारस्य कळणार नाहीं म्हणून, देत नाहीं. पण खालील विधानांवरून त्याचा आशय कळेल. तो म्हणतो, " वाङ्मय—कलावंत किंवा साधा मनुष्यहि कलेचा आनंद भोगण्याला जर खरा स्वतंत्र असेल तर तो गद्य न बोलतां पद्यांतहि बोलूं शकेल. तो सयमक बोलेल किंवा ठेक्याच्या तालांतहि बोलेल. पोस्ट कार्ड लिहावयाचें तर तें चौदा ओळीचें सुनीतच करून त्यानें कां लिहूं नये ? टेलिफोनमधून बोलावयाचें तर ' हॅलो ' हे शब्द सुरेल उच्चारून पुढें तो संदेशवजा एखाद्या गाण्याची लकेरहि फेकील. थोडा वेळ बोलावयाचें असेल तर तें भावगीत होईल, व पुष्कळ वेळ बोलावयाचें तर तें महाकाव्य होईल ! आणि टेलिफोनचा सांधा जोडणारी बाई तो लवकरच जोडून देईना म्हणून याचें तिचें भांडण झालें तर, त्यांतून कलगीतुऱ्याचा एखादा झगडाहि निर्माण होईल ! " अर्थात् हें लिहिणें थट्टेबाजपणाचें होय. परंतु गंभीरपणानें बोलावयाचें तरी, केवळ कलेच्या आनंदाकरितां कांहीं वाङ्मय लिहिलें जातें, आणि कलेच्या शुद्ध आनंदाकरितां म्हणूनच मनुष्य थोडेंबहुत वाङ्मय लिहितोहि.

### वाङ्मय हें साधन आहे, साध्य नव्हे

शुद्धानंदाकरितां निर्माण केलेल्या अशा वाङ्मयांत नीतिबोध हुडकून काढण्याचा प्रयत्न करणें अप्रयोजकपणाचेंच ठरेल. कारण त्या निर्मितीचा हेतु कलेचा आनंद उपभोगण्यांतच संपतो. त्या पलीकडे तो जात नाहीं. केवळ अशा दृष्टीनें लिहिलेले वाङ्मयप्रकार अनेक दाखवितां येतील. परंतु अशा प्रकारांत सर्व वाङ्मय समाप्त होत नाहीं, तर नीति किंवा बोध किंवा शहाणपण किंवा विशिष्ट ज्ञान हें शिकविण्याच्या हेतूनें लिहिलें गेलेलें व जात असलेलें वाङ्मय पुष्कळच अधिक आहे. आणि तें असणारच. वाङ्मय हें एक साधन आहे, स्वतंत्र साध्य नाहीं. फक्त, कोणी मनुष्य आपल्या लहरीप्रमाणें किंवा हौसेप्रमाणें, त्या साधनांचा उपयोग केवळ कलेचा शुद्धानंद भोगण्याकरितां, तर कोणी जनतेला बोध देण्याकडे करील. हा दुसऱ्या प्रकारचा उपयोग अर्थातच पहिल्यापेक्षां पुष्कळ अधिक होईल हें सांगा-

वयास नकोच. टीका, निबंध वगैरे प्रकार केवळ बोधाच्या हेतूनेंच लिहिलेलें वाङ्मय असूं शकतें. नाटक, कादंबरी–लघुकथा इत्यादि प्रकार हे ' केवळ कलेकरितां कला ' या हेतूनें लिहिलेले कांहीं आढळतील. आणि ' कलेकरितां म्हणून कला ' ही गोष्ट कांहीं खरी आहे व असूं शकेल. ती तशी असावी असें म्हणणेंहि अयुक्त नाहीं. परंतु एकंदरीनें " वाङ्मय ही जगत् व जीवन यांवरील टीका होय "–ही व्याख्या स्वीकारण्यास फारसा प्रत्यवाय नाहीं. सौंदर्योपासना ही वाङ्मयांत थोडीबहुत असलीच पाहिजे. परंतु जगत् व जीवन यांचा परामर्ष घेणें, वस्तुस्थिति काय आहे हें यथार्थ रीतीनें लोकांच्या निदर्शनास आणणें, व ती वाईट असेल तेथें ती सुधारावी याविषयीं मतप्रसार करून लोकांना संदेश सांगणें, हेंच वाङ्मयाचें खरें कार्य समजलें पाहिजे.

## ॲप्टन सिंक्लेअरचें एकतर्फी मत

सुप्रसिद्ध अमेरिकन सोशालिस्ट अप्टन सिंक्लेअर यानें ' मॅमन–आर्ट ' नांवाचा एक ग्रंथ अलीकडे प्रसिद्ध केला आहे. त्यांत त्यानें जगांतील वाङ्मयाचें समालोचन करून असा सिद्धांत काढण्याचा प्रयत्न केला आहे कीं, वाङ्मयाचा उपयोग जाणुनबुजून, व क्वचित् अजाणतां, पण मतप्रसाराकरतांच सर्व लेखकांनीं केला आहे. तो कांहींसा आपल्या स्फूर्तीनें असला तर पुष्कळसा पैसे मिळविण्याकरितां केला आहे. आणि धनिक आश्रयदात्यांनींहि कांहीं त्यांजकडून करविला आहे. ॲप्टन सिंक्लेअरच्या पुस्तकांतील केवळ ' कलेकरितां कला ' असूं शकते या विचाराला मुळींच थारा दिलेला नाहीं. अर्थात् तेथें त्याचा व माझा मतभेद आहे. तो निर्विकार बुद्धीनें लिहिणारा लेखक नाहीं, व सर्वस्वी एकतर्फी लिहिणारा आहे, असें उघड दिसतें. वाङ्मयाकडे एकाच व विकारी दृष्टीनें पाहाणारा कोणीहि असेंच करणार. पण त्या पुस्तकांतील हा दोष व उणीव वगळली असतां, त्यानें केलेलें वाङ्मयसमालोचन फार चांगलें व मार्मिक आहे. त्याचीं खालील वाक्यें उध्दृत करण्यासारखीं आहेत—

" Let the artist, in the labour of his spirit and by the stern discipline of hard thinking, find a real path of progress for the race. Let him reveal new impulses for them to thrill to, new perils for them to overcome, new sacrifices for them to make,

new joys for them to experience. Let him make himself master of the technique of any one of the arts and put that propaganda adequately and vitally before his fellows—and so, and so alone—he may produce real and enduring works of art."

वाङ्मयासंबंधीं जुन्या समजुतींचे कांहीं अपसिद्धांत म्हणून त्यानें मांडले आहेत व ते सामान्यत: खरे आहेत. ते असे—

१ 'कलेकरितां कला आहे किंवा असावी हें म्हणणें खोटें आहे.' (पण यासंबंधानें त्याच्याशीं माझा मतभेद कसा आहे हें मी वर दर्शविलेंच आहे.)

२ 'कला ही अंतरंगांतील फार थोड्या लोकांकरितां आहे, अखिल जनतेनें तिची हांव धरूं नये. पण हें म्हणणें खोटें.' ("पंडितांनीं केवळ पंडितांकरितां पंडितगिरीनें लिहिलेलें तें वाङ्मय" ही गोष्ट मलाहि मान्य नाहीं; व याचा निषेध सक्रिय करून दाखविल्याचें उदाहरण, गीताभाष्य मराठींत म्हणजे लोकांच्या मातृभाषेंत लिहिणाऱ्या ज्ञानेश्वरांचेंच मी देईन. सगळ्या जनतेवर जिची छाप पडेल तीच खरी कला होय.)

३ 'कला ही नवी असूं शकत नाहीं. जुन्यापासूनच ती शिकली पाहिजे. पण हेंहि म्हणणें खोटें.' (या बाबतींत क्लासिकल म्हणजे रूढ किंवा स्थिरपद वाङ्मय, आणि रोमांटिक म्हणजे स्वतंत्र बुद्धीचें व चलितपद वाङ्मय यांच्या विरोधाचा वाद प्रसिद्ध आहे. मी स्वत: क्लासिकल वाङ्मयांतील आनंद घेऊं शकतों. परंतु जुनेच तेवढे नमुने ग्राह्य असें मानणारा मी नाहीं. जीवन बदलतें त्याबरोबर वाङ्मयहि बदलणारच.)

४ 'वाङ्मय हा रिकामपणचा खेळ व करमणूक आहे. त्याचा खरा उपयोग वस्तुसृष्टीचें विस्मरण पडावें व निरुपाधिक आनंद मिळावा हा आहे. पण हें म्हणणें खोटें. उलट वस्तुसृष्टीचें यथार्थ ज्ञान करून देणें व ती बदलणें इष्ट असल्यास त्याविषयीं उपाय सांगणें हें वाङ्मयाचें ध्येय असलें पाहिजे.' (हें मला मान्य आहे. पण वाङ्मय व कला यांचा नीतीशीं कांहीं संबंध नाहीं. हें म्हणणें खोटें. कलेकरितां कला असूं शकेल. परंतु आत्मपर्याप्त कलेचा आनंद हा अनीति प्रवर्तक असतां कामा नये हें बंधन कलेनेंहि मान्य केलें पाहिजे. जगाचें हित कशानें होईल याची शिकवण देणारी ती नीति असा 'नीति' या शब्दाचा सामान्य अर्थ करण्यास

हरकत नाहीं; व निदान या व्यापक अर्थानें तरी वाङ्मयकला व नीति यांचा अवश्य संबंध मानला पाहिजे. )

शेवटीं संस्कृत साहित्याचार्यानीहि वाङ्मय किंवा सारस्वत यांचें स्वरूप कसें उदात्त कल्पिलेलें आहे, हें सांगून मी आपलें भाषण पुरें करतों. शारदोपासक म्हणविणाऱ्या संमेलनापुढें शारदास्तुतीच्या वचनांनींच ती उदात्त कल्पना मांडतां येण्यासारखी आहे. एक शारदोपासक म्हणतो:—

" सूक्ष्माय शुचये तस्मै नमो वाक्तत्त्व–तंतवे ।
विचित्रो यस्य विन्यासो विदधाति जगत्पटम् " ॥

सर्व जगत् हें एक विचित्र व उत्कृष्ट विणकरीचें वस्त्र आहे; तें वाङ्मय-तत्त्वरूपी धाग्यांनीं विणलें जातें. तो तंतु अत्यंत सूक्ष्म असून अत्यंत शुद्धहि असतो. त्याला आपण नमस्कार करावा.

दुसरा एक शारदोपासक म्हणतो—

" करबदरसदृशमखिलं
भुवनतलं यत् प्रसादत: कवय: ॥
पश्यंति सूक्ष्ममतय:
सा जयति सरस्वती–देवी " ॥ १ ॥

सरस्वती देवीच्या कृपेनें सर्व जगत् व जीवन हें सूक्ष्म बुद्धीचे लोक तळहातावरील बोराप्रमाणें पाहूं शकतात.

वाङ्मय किंवा सारस्वत हें केवळ तात्त्विक किंवा अध्यात्मिक नाहीं. त्याचा विज्ञानाशीं संबंध आहे; व वाङ्मय लिहिणाऱ्यानें जगत् व जीवन यांचें सूक्ष्म निरीक्षण करण्याची पात्रता सिद्ध करून तिचा उपयोग केला पाहिजे. हेंच आधुनिक तत्त्व वरील श्लोकांत सांगितलें नाहीं काय ?

तिसरा एक शारदोपासक म्हणतो—

" तद्दिव्यमव्ययं धाम
सारस्वतमुपास्महे ।
यत्प्रसादात् प्रलीयन्ते
मोहान्धतमसश्छटा: " ॥ १ ॥

या ठिकाणीं ' सारस्वत ' या शब्दाचाच प्रत्यक्ष उपयोग केला आहे. कवि म्हणतो, " वाङ्मयाचें धाम म्ह० (गृह) हें दिव्य व अव्यय–अविनाशी–असें आहे. सारस्वताच्या प्रसादानें मोह, अज्ञानांधकार व तामस

गुण हे नष्ट होतात. " मनुष्य अज्ञानानें स्वत:चें अहित करतो तसेंच ज्ञान असतांहि अनिष्ट गोष्टींच्या मोहांत सांपडूनहि तें करतो. अज्ञान हा तर मूर्तिमंत तमोगुणच होय. शिवाय ज्ञानी लोकांतहि तो अवगुण वेगळा दृष्टीस पडतो. या सर्व कारणांनीं जगत् व जीवन यांचें होणारें अनहित टाळण्याला, थांबविण्याला, सारस्वत म्हणजे वाङ्मय हेंच उत्तम कार्यक्षम साधन आहे. यांत वाङ्मयसाधनाचा उपयोग चांगल्या ' मतांच्या पसारा '-करितां करावा हेंच सुचविलें जात नाहीं काय ?

असो. अशा रीतीनें साहित्यसंमेलनावर, व पर्यायानें साहित्य, वाङ्मय, सारस्वत यांच्या उपासनेवर, जे कांहीं लोक कृपण बुद्धीनें आक्षेप घेतात त्यांना हें थोडक्यांत उत्तर देऊन मी आपलें भाषण संपवितों.

---

## ६ आजचें वाङ्मय व उद्याचें वाङ्मय

### ( बडोदें येथील भाषण )

मी आज जो हा विषय व्याख्यानाकरितां घेतला त्याची चर्चा होणें हल्लीं फार इष्ट आहे असें मला वाटतें. म्हणून वाङ्मयाच्या दृष्टीनें हल्लींचा काळ हा पुनरुज्जीवनाचा वसंतऋतु असें म्हणतां येईल. इंग्रजींत त्याला ' रिनेसन्स ' हा शब्द रुढ आहे. जगांत कोठेंहि अशा 'रिनेसन्स-च्या ' पूर्वी ' डार्क एजेस् ' 'मिडिल् एजेस्' म्हणजे अज्ञानयुग, तमोयुग येतें व या रिनेसन्सच्यापुढें ' रेफरमेशनचें ' म्हणजे कृतिमय सुधारणेचें रूप येतें. वसंतऋतूच्या पूर्वी वर्षांतील शेवटला शिशिरऋतु म्हणजे हिंवाळा असतो. या ऋतूंत वृक्षलतादिकांचीं पानें गळून जाऊन त्यांचे कुरूप खराटे बनतात. या काळांत ते जीव एक प्रकारच्या योगनिद्रेंतील विश्रांती घेतात. या विश्रांतीमुळेंच पुढील वर्षाच्या नवजीवनाचें कार्य करण्याला त्यांना नवचैतन्य लाभतें. तें नव चैतन्य, प्रथम वसंतऋतूंत नवे कोवळे अंकूर, पुष्पें व फार तर मोहोर यांनीं प्रगट होतें व पुढें ग्रीष्मऋतूंत त्या जीवनाला परिणतदशा येऊन फलसंभार तयार होतो.

आपल्या मराठी वाङ्मयजीवनाला हें रूपक लावलें असतां चांगलें लागू पडेल. सुमारें शंभर वर्षांपूर्वी ज्ञानाच्या दृष्टीनें महाराष्ट्रांतील तमोयुगाची परमावधी झाली होती. तम म्हणजे अज्ञान. भौतिक शास्त्रांचें आमचें अज्ञान पूर्वापार होतें तें इतकें कीं सृष्टिधर्मालाहि आम्हीं आधिदैविक स्वरूप देत होतों. दृश्य पृथ्वीसंबंधानें आमचें अज्ञान इतकें होतें कीं ज्याला महाराष्ट्रांतील अग्रगण्य मुत्सद्दी म्हणतात त्या नाना फडणविसाला वर सिंधुनदीपलीकडे खालीं रामेश्वरापलीकडे, पश्चिमेस अरबी समुद्रापलीकडे व पूर्वेस कलकत्त्यापलीकडे काय जग होतें याची मुळीच कल्पना नव्हती. नाना फडणविसाजवळ असलेला जगाचा नकाशा ज्यांना उपलब्ध झाला होता ते सांगतात कीं आज तो पाहून कोणालाहि हंसूच येईल. पण आजची गोष्ट कशाला ? खुद्द नाना फडणीसांच्यापूर्वी शंभर वर्षें इंग्रज, पोर्तुगीज, डच सहा सहा हजार मैलांचा जलप्रवास करून, हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर येऊन त्यांनीं वखारी घातल्या होत्या व सैन्याची जुळवाजुळव करून मुलखांत पाय रोवण्यास प्रारंभ केला होता. या धाडसी लोकांचा एक प्रकारचा आद्यपूर्वज कोलंबस याला हिंदुस्थान पूर्वेकडे आहे कीं पश्चिमेकडे आहे हेंहि माहीत नव्हतें. असें असलें तरी त्यानें नकाशाचीहि वाट न पाहतां गलबतांत बसून महासागरपर्यटनाच्या अचाट कृत्याला प्रारंभहि केला. (Uncharted sea and unchartered ship) पण इकडे आम्हाला सृष्टिज्ञान तर नव्हतेंच पण ज्ञानाची जागा, महत्त्वाकांक्षा भरून काढणारें, जें धाडस तेंहि महाराष्ट्रीयांमध्यें नव्हतें. आमचें त्या वेळचें ज्ञान म्हणजे संस्कृत वाङ्मयांतून परंपरेनें प्राप्त झालेलें व तेंहि बहुतेक ठराविक सिद्धांतिक अध्यात्मज्ञान. या ज्ञानाचीहि महती आहे, नाहीं असें नाहीं, तथापि व्यवहाराला तर त्याचा मुळींच उपयोग नव्हता. शिवाय या परंपरागत ज्ञानाचीहि वाढ खुंटून वर सांगितल्याप्रमाणें हिंवाळ्यांत वनस्पतीची जी दशा होते तशी आमच्या ज्ञानाची झाली होती. संस्कृतविद्येच्याहि पल्लवांचा पाचोळा झाला होता. मग फुलें व फळें यांची गोष्ट कशाला ? पण सृष्टिक्रम हा चक्रनेमिक्रमाप्रमाणें चालत असतो हा सिद्धांत सर्वस्वी अनुभवसिद्धच आहे. व महाराष्ट्राला एका शतकापूर्वी जी योगनिद्रा आली तींत त्याला विश्रांति मिळून ज्ञानाच्या नवचैतन्याला अंकुर फुटूं लागला. वसंतऋतूचें हें कार्य उष्णतेमुळें होतें हें प्रसिद्ध आहे.

महाराष्ट्रांतील ज्ञानजीवनाला ही उष्णता परसंस्कृतीच्या स्पर्शानें मिळाली ही गोष्ट महाराष्ट्राभिमानी लोकांनाहि मान्य करावीच लागेल.

इंग्रज प्रथम हिंदुस्थानांत येऊं लागले तेव्हां त्यांच्या देशाबद्दल कांहींहि माहिती नसल्यामुळें " शिंचे हे इंग्रज येतात तरी कोठून ? " असे उद्गार आश्चर्यहत महाराष्ट्रीय मुत्सद्दी काढीत, असें वासुदेवशास्त्री खरे यांनीं लिहिलें आहे. पण पुढें इंग्रज हे इकडे स्थिरपद झाल्यावर त्यांच्या उगमापेक्षां त्यांचें कर्तृत्व हेंच आश्चर्यविषय होऊन बसलें. इंग्रजांनीं इकडे ज्या आश्चर्यकारक गोष्टी केल्या त्यांत हिंदी सैन्य पदरीं ठेऊन, क्रवाईत शिकवून तें देशी राज्यांवरच उठवितां येतें. हिंदी द्वीपकल्पाच्या तीन टोंकाच्या बंदरांत वखारी ठेऊन त्यांच्या बळावर सर्व देशभर धुमा-कूळ घालून देश हस्तगत करतां येतो, व लोकांना आपली प्रजा बनवितां येतें हें आश्चर्य तर होतेंच; परंतु या राजकारणी गुणांबरोबर इंग्रजांचें सृष्टिज्ञान व संस्कृति या गोष्टीहि तितक्याच आश्चर्यकारक ठरल्या असल्यास नवल नाहीं. सन १७५७ ते १८५७ पर्यंत एक शतकभर इंग्रजांनीं हिंदुस्थानांत आपल्या या आश्चर्यकारक गुणांचीं प्रदर्शनें सतत उघडून ठेविलीं होतीं. १८५७ च्या सुमारास त्यांनीं जेव्हां हिंदुस्थानांत युनिव्हर्सि-टीज् किंवा विद्यापीठें उघडून लोकांना शिक्षण देण्याचा क्रम आरंभिला तेव्हां त्यांची संस्कृति ही परकीय संस्कृति म्हणून कशी स्वीकारावी अशी महाराष्ट्रांतील लोकांना मुळींच शंका आली नाहीं ! त्यांचें कर्तव्य, त्यांची शिस्त, त्यांची कर्तव्यदक्षता, त्यांची टापटीप, त्यांची बोलण्याचालण्याची मोहक पद्धति व शिष्टाचारप्रियता आणि विद्वत्ता हे सर्व गुण या संस्कृतीं-तूनच निघालेले आहेत अशी खात्री झाल्यामुळें १९ व्या शतकांतील महाराष्ट्रानें ती संस्कृति स्वीकारली व तिचा परिणाम म्हणून जुन्या वाङ्मयाची दिशा टाकून त्यानें नवीन वाङ्मय लिहिण्यास सुरवात केली. इंग्रजी संस्कृतीनें महाराष्ट्रीयांना नवी दृष्टी, नवी सृष्टि व नवी तुष्टि प्राप्त करून दिली. हीं तीन कारणें कोणत्याहि देशांत नवें वाङ्मय निर्माण करण्यास कारणीभूत होतात हें जगभरच्या वाङ्मयाचे इतिहास आपणास सांगतातच. ज्याला मी आजचें वाङ्मय असें म्हणेन तें अलीकडच्या ६०–७० वर्षांतलें असून त्याचीं लक्षणें त्या पूर्वींच्या मराठी वाङ्मयाच्या लक्षणांहून अगदीं भिन्न आहेत यांत मुळींच शंका नाहीं. संस्कृत भाषेचें

अध्ययन अद्यापि महाराष्ट्रांतून लुप्त झालेलें नाहीं आणि त्या वाङ्मयांतील शब्दसंपत्ति, अलंकार, न्याय, वाक्प्रचार, म्हणी इत्यादि गोष्टी मराठी भाषा रसभरित, चित्ताकर्षकरीतीनें लिहिण्याला सहजच उपयोगीं पडतात. आतां वाङ्मयांत ज्या मनःसंस्कृतीचा अंतर्भाव होतो ती हजारों वर्षांची परंपरागत जुनी वैदिक अशीच अजूनहि अंशरूपानें आमच्यांत उरली आहे. या दोन गोष्टींमुळें आजच्या मराठी वाङ्मयाचा संबंध जुन्या वाङ्मयाशीं थोडाबहूत जोडतां येऊन हें वाङ्मय त्या जुन्या वाङ्मयाचे वंशजच होय असें म्हणतां येतें ही गोष्ट खरी. तथापि गेल्या ६०–७० वर्षांत मराठी वाङ्मयाला अनेक बाजूंनीं नवें वळण लागलें आहे. म्हणजे ज्ञानाचे विषय तर बहुतेक सर्व इंग्रजी वाङ्मयांतूनच उचलले जातात, शिकले व लिहिले जातात. इतकेंच नव्हे तर विचारांची मानसिक क्रिया सुशिक्षितांची तरी इंग्रजींत होऊं लागली आहे. संदर्भ, दाखले, म्हणी या गोष्टी, किंचित उजळा देऊन पण इंग्रजीच स्वीकारल्या जात आहेत; आणि अनेक इंग्रजी शब्दांनीं तर मराठींत इतकें स्थिरपद मिळविलें आहे कीं त्याविरुद्ध प्रतिक्रिया होण्यापर्यंत मजल गेली आहे.

बडोदें शहरांतल्याच एका संस्थेनें नुकताच जो एक मोठा वाङ्मय-विषयक ग्रंथ प्रसिद्ध केला त्याच्या उपसंहारांत मीं हा विषय थोडाबहुत लिहिला आहे. त्यांत या ग्रंथांतील अनेक विद्वान लेखकांनीं या आधुनिक मराठी वाङ्मयासंबंधानें मांडलेले सिद्धांत संक्षेपानें मी एकत्र केले आहेत. तो भाग आपण वाचल्यास असें दिसून येईल कीं कादंबरी, नाटक, विनोदी वाङ्मय, बालवाङ्मय, साहित्यसमीक्षण, टीकावाङ्मय, कोशवाङ्मय, ऐतिहासिकवाङ्मय, निबंधवाङ्मय, तात्पर्य सर्व प्रकारच्या वाङ्मयाला नव्या परकीय संस्कृतीचा परिचय हेंच कारणीभूत झालें असल्याचा उल्लेख आढळेल. पण ही गोष्ट आमच्या इकडेच आढळते असें नाहीं तर युरोपियन राष्ट्रांच्या वाङ्मयाचा इतिहास चाळणाराच्या लक्षांत तीच गोष्ट तिकडेहि घडून आल्याचें दिसून येईल. इंग्लंडांत आपल्या इकडल्याप्रमाणें ' रिनेसन्स ' ' रेफरमेशन ' ' रेव्होल्यूशन ' या गोष्टी घडल्या. धर्मांतील विचारक्रांतीप्रमाणें देशांतील राज्यक्रांतीनेंहि इंग्रजी वाङ्मयावर आपली छाप पाडून त्याचीं निरनिराळीं युगें अवतरविलीं. फ्रांसच्या राज्यक्रांतीला फ्रांस देशांतील दुःस्थितिपेक्षांहि इंग्लंडच्या राज्य-

घटनेचा अभ्यास व अमेरिकेमध्यें घडून आलेल्या स्वतंत्रतेच्या अवताराचें कौतुक हीं कारणीभूत झालीं. आणि खुद्द फ्रांसमध्यें राज्यक्रांति झाल्यावर तेथील वाङ्मयाचें स्वरूप सर्वस्वी पालटलें. रशियामध्यें महाराष्ट्रप्रमाणेंच बाराव्या शतकापासून एकोणीसाव्या शतकापर्यंतचें वाङ्मय एकाच ठराविक छापाचें व त्यानंतरच्या शतकांतील वाङ्मय अगदीं दुसऱ्या प्रकारच्या छापाचें झालें असें दिसून येईल. सन १८१८ सालीं इंग्रजांनीं पेशव्यांना पदच्युत केल्यामुळें विचारक्रांति इकडे झाली तशीच रशियामध्यें १८१२ सालीं नेपोलियन बोनापार्टनें केलेल्या स्वारीनें झाली. मात्र एक फरक असा कीं, रशियानें नेपोलियनची स्वारी परतविली. अठराशेंच्या साठी सत्तरींत ॲडमिरल पेरीच्या तोफांच्या मारगिरीनें जपानहि असाच योग निद्रेंतून जागा झाला. राजकीय उत्पात उलट किंवा सुलट दोनहि प्रकारचे झाले तरी ते विचारक्रांतीला कोठेंहि पोषकच होतात. रशियांत राजे जुलमी व सर्वाधिकारसंपन्न परंतु स्वदेशीच होते. यामुळें स्वराज्याच्या चळवळीचा निम्मा हप्ता त्यांच्या पदरांत आधींच पडलेला होता. म्हणून १९ व्या शतकांतील वाङ्मयाचा सर्व भर प्रजास्वातंत्र्यावर पडण्याला अवसर मिळाला. तीच गोष्ट हिंदुस्थानांत व मराठी वाङ्मयांत होण्याला १८१८ पासून १९१८ पर्यंत एक शतक लागलें.

आतां राजकारण हा एकच विषय कांहीं राष्ट्रांतील, विचारवंत लोकांच्या मनाला व्यग्र करण्याला व गुंतवून टाकण्याला पुरेसा असत नाहीं. राजकारणाशिवाय धर्म, तत्त्वज्ञान, सृष्टिज्ञान, समाजशास्त्रज्ञान, हे विषय वाङ्मयाचा उपयोग करून घेणारे असतात व केवळ संस्कृतिच्या दृष्टीनें पहातां राजकीय वाङ्मयाच्यापेक्षांहि या इतर विषयांतील वाङ्मयाला विद्वान् लोक अधिक महत्त्व देतात. या दृष्टीनें पाहतां युरोपांतील राजकीय चळवळीचा इतिहास कंटाळवाणा होत असला तरी वरील इतर विषयांच्या वाङ्मयाचा इतिहास तसा कंटाळवाणा होत नाहीं. कारण त्यांतील ज्ञानांत पुनरुक्ति व क्रियाप्रतिक्रिया ही फारशी न होतां प्रगति बरीचशी अखंड व सुसंगत चालू राहते. महाराष्ट्रांत आज राजकीय ध्येय निश्चित झालेलें असून तें पदरांत पाडून घेण्याच्या साधनमार्गांची चर्चाहि तात्त्विकदृष्ट्या बरीच होऊन गेली आहे. आतां

त्या साधनांचा प्रत्यक्ष उपयोग करून साध्य हस्तगत करणें ही गोष्ट उरली आहे. अर्थात ती होण्याला बराच काळ लागेल व ती होण्याच्या मार्गांत ज्या झटापटी चालतील त्याला बरेंच वाङ्मय खर्ची पाडावें लागेल हें उघड आहे. तथापि माझा आजचा विषय राजकीय नसल्यामुळें, मी इतर प्रकारच्याच वाङ्मयावर विशेष दृष्टी ठेवून बोलणार आहें व त्या दृष्टीनें मी असें म्हणतों कीं गेल्या ६०–७० वर्षांत नवें वाङ्मय निर्माण झालें पण त्याहीपेक्षां अधिक निराळ्या प्रकारचें वाङ्मय यापुढें निर्माण होणार आहे. वसंतऋतूंत झाडावर कळी दिसूं लागली तरी ती बाहेरून एक रंगीच असते पण ती कळी उमलून तिच्या सर्व पाकळ्या प्रगट झाल्या म्हणजे त्यांतील रंगीबेरंगीपणा खरा प्रगट होतो. मराठी वाङ्मयांत आज फक्त नवमतवादाची कळी दिसूं लागली आहे पण तिचें फूल पूर्णपणें उमलेल तेव्हां त्या नवमतवदांतील रंगीबेरंगीपणा म्हणजे वैचित्र्य खरें प्रगट होईल. मी वर उल्लेखिलेल्या उपसंहारांत नवमतवादाविरुद्ध खुद्द नवमतवादी लोकांकडूनच प्रतिक्रिया आजच कशी सुरू झाली आहे हें दर्शविलें आहे. तथापि नवमतवादांतील दूषणास्पद भागावर टीका करण्याचा आजचा माझा विषय नाहीं. मी व्यापक दृष्टीनें इतकेंच सांगूं इच्छितों कीं या नवमतवादांतहि पुष्कळ गोष्टी चांगल्या म्हणजे इष्ट व स्वीकारण्यासारख्या असून त्यासंबंधीं जें वाङ्मय मुक्त हस्तानें लिहिलें जाईल त्यानें समाजरचनेवर पुष्कळच परिणाम होईल.

शंभर वर्षांपूर्वीच्या व आजच्या वाङ्मयांत जितका फरक आहे त्याहून अधिक फरक आतांच्या व या पुढील शंभर वर्षांच्या वाङ्मयांत पडेल असें वाटतें. यांपैकीं पण इष्ट वाङ्मयांत मीं पहिलें स्थान सृष्टिज्ञानविषयक वाङ्मयाला देईन. कारण आम्ही महाराष्ट्रीय लोक इंग्रजांपेक्षां बुद्धीनें कमी आहोंत असें मला वाटत नाहीं. पण एका युरोपियन सत्तेशीं झगडतांना लागणारा दारुगोळा व शस्त्रास्त्र सामुग्री मिळविण्याकरितां आम्हांला दुसऱ्या युरोपियन राष्ट्राची कास धरावी लागली यांतच महाराष्ट्राच्या पराभवाचें मर्म होतें. सृष्टिज्ञानाच्या बाबतींत महाराष्ट्र हा ३०० वर्षें इंग्लंडच्या मागें आहे व त्याच्या आमच्यांतील हें अंतर दिवसेंदिवस कमी न होतांना भूमितिश्रेढीनें वाढत आहे. तथापि निराश न होतां उद्धाराचे प्रयत्न करावयाचे तर ते शास्त्रीयज्ञान मिळविण्याविषयींच

प्रथम व अधिक केले पाहिजेत असें मला वाटतें. या दृष्टीनें ललित-वाङ्मय लिहिणारापेक्षां मी सृष्टिज्ञानविषयक वाङ्मय लिहिणाऱ्याला मनांतून अधिक मान देतों. कारण जागतिक परिस्थितींत निभाव लागण्याला आम्हाला तें ज्ञानच ललितवाङ्मयापेक्षां अधिक उपयोगीं पडेल. सामाजिक व राजकीय बाबतींत नवमतवादाविषयीं मतभेद होण्याला जागा असली तरी सृष्टिज्ञानाच्या बाबतींतील नवमतवाद हा शेंकडा शंभर टक्के स्वीकारणीय ठरतो व त्याविषयीं समाजांत एकमतच आढळून येतें. दुमत होणें शक्य नसतें. सृष्टिविषयक ज्ञानाची गोष्ट निघाली तर त्यांतील कोणतीहि नवी बाब अनिष्ट आहे असें आपण म्हणत नाहीं. फार तर त्या ज्ञानाचा अंतर्दृष्टीनें आमच्या पूर्वजांनीं कानोसा घेतला होता इतकाच अभिमान आम्हीं मिरवितों. पण लौकरच आपणाला हेंहि कळतें कीं आज प्रत्यक्ष डोक्यावर चालतें बोलतें विमान घिरट्या घालीत आहे व आम्हाला आंत बसवून जगाची प्रदक्षिणा करवीत आहे. अशा वेळीं ती विमानविद्या प्रत्यक्ष हस्तगत करण्याचें सोडून जर आम्हीं रामकृष्णाच्या वेळच्या पुष्पक विमानाच्या पुराणांतल्या गोष्टी सांगून पूर्वजांची खरी खोटीं कीर्ति मिरवूं लागलों तर आपणासारखे मूर्ख आपणच ठरूं! गोष्ट अशी सांगतात कीं इतिहासाचार्य राजवाडे यांनीं एकवेळ इतिहास-संशोधनाचा उद्योग टाकून देऊन महाराष्ट्रांत सृष्टिज्ञानाच्या शाळा व लॅबोरेटरीज म्हणजे प्रयोगशाळा स्थापण्याकडे आपलें सर्वस्व खर्चावें व तोच एक जन्माचा उद्योग करून घ्यावा अशी इच्छा प्रगट केली होती. या गोष्टीवरून इतिहास संशोधनादि संस्कृतिविषय आपापल्यापरीनें उत्तम असले तरी सृष्टिज्ञान हें सर्वोत्तम आहे. या सिद्धांताला बळकटीच मिळते. या सृष्टिज्ञानाखालोखाल अर्थशास्त्र व समाजशास्त्र यांचें परिशीलन व संशोधन महाराष्ट्राला उपकारक होण्यासारखें आहे. त्यानंतरचें स्थान मी ललितवाङ्मयाला देईन. कारण ललितवाङ्मय हा आनंदोत्पादक विषय असला तरी एका जुन्या सुभाषितांत म्हटल्याप्रमाणें, व्याकरणानें मनुष्याची क्षुधा निवारण होत नाहीं व काव्यरसानें त्याची तहान भागत नाहीं. ललितवाङ्मयाचा आनंद मोकळ्या मनानें भोगण्याला अगदीं प्रथम स्वतंत्रता व त्याबरोबर स्वाभिमानपूर्वक संसार निभावून नेण्याची पात्रता या गोष्टी मूलभूत व अनिर्वाह्य होत असें मला वाटतें. ललितवाङ्मय हा

मनःस्वातंत्र्याचा आनंदी उद्गार असेल तरच तो कला निर्मितीच्या सदरांत पडूं शकेल. पण पराधीन, परतंत्र, दुःखी, आपदग्रस्त, सांप्रदायिक धर्म व आचार व विघातक अशा परंपरागत रूढी यांच्या जुलमांत शरीरानें सांपडलेल्या साहित्यिकांच्या उद्गाराचें कौतुक आपण केलें तरी तें फक्त अनुकंपा व सहानुभूति यांच्या स्वरूपाचेंच असतें. तें वाचल्यानें आपण त्या साहित्यिकाबरोबर समदुःखी होऊं शकूं. तथापि त्या वाङ्मयाचा जसा त्याला खरा आनंद होईल तसा आम्हाला होणार नाहीं.

आमचें आजचें वाङ्मय हें इंग्रजी वाङ्मयाचें अनुकरण आहे. विचार, उच्चार, आचार, ध्येय हीं सगळीं इंग्रजी गोष्टींचीं आपापल्यापरीनें अनुकरणें आहेत. अर्थात् आपलें तें बरें किंवा वाईट म्हणण्याला इंग्रजीचें बरें किंवा वाईट हें पहाणें आवश्यक आहे.

इंग्लंडच्या हल्लींच्या वाङ्मयासंबंधानें एक ग्रंथकार म्हणतो कीं दोन टोकाला अगदीं दोन तऱ्हेचीं वाङ्मयें असून दोनहि जवळ जवळ सारखींच वाईट आहेत. तो म्हणतोः—

"Modern literature and art is becoming more and more difficult and obscure; more and more the intellectual preserve of a leisured minority and is thus losing touch with the life of Society as a whole. It has tended to arrogate to itself a more or less disembodied existence in a distinctly high class sphere called culture or minority culture as distinct from mass civilisation. At the other end of the scale is the mass civilisation with its appalling and slimy sea of mass produced reading matter that helps to keep the public so conveniently stupid. For should people begin to think for themselves and begin to feel a bit different from the spirit blinded radio deafened, sport-doped mass they might become inconveniently critical of a state of society that calls itself civilised, yet deliberately condemns the greater number of its members to intellectual and economic degradation."

अनुकरणानें बनलेल्या या नव्या मराठी वाङ्मयांत जशी कांहीं नवी नीति आहे तशी कांहीं नवी रीतीहि आहे. नवी नीति काय आहे हें मी सविस्तर

सांगत बसत नाहीं. त्यांत मुख्य भर व्यक्तिस्वातंत्र्यावर आहे. स्थूलमानानें नवनीति म्हणजे सर्व प्रकारचे नवे विचार. हे विचार नवे होण्याला शुद्ध ज्ञान हें देखील आपल्यापरीनें कारणीभूत झालेलें आहे. तसेंच नवइतिहास विशेषतः युद्धोत्तरकालीन; हाहि त्या गोष्टीला कारणीभूत झालेला आहे. पूर्वी इंग्लंडांत अशी समजूत असे कीं मनुष्यप्राणी हा सद्गुणी आहे, नीतिमान आहे व पूर्णावस्थेला पोचलेला आहे. परंतु हे सर्व विचार हल्लीं बदलले आहेत. मनुष्याच्या विचारस्वातंत्र्याला नव्या मानसशास्त्रानें धक्का दिला तो असा कीं, " मनुष्यप्राणी जें जें करतो तें त्याच्या पूर्ववासनांच्या जोरानें पराधीनतेनें करतो स्वाधीनतेनें करीत नाहीं. " मनुष्य पराधीन म्हटला म्हणजे मग त्याला सद्गुणी म्हणण्यांत तरी काय स्वारस्य ! कारण सद्गुण हा ऐच्छिक व जाणता असला तरच त्याची महति. बरें. नीति, सद्गुण सोडले व साधी मुत्सद्दीगिरी वगैरे लौकिक व्यावहारिक गुण घेतले तरी, महायुद्ध झाल्यापासून लोक म्हणूं लागले कीं " आहे ठाऊक, मुत्सद्यांची मुत्सद्दीगिरी ! " खरी मुत्सद्दीगिरी नाहीं. तर हातांत खेळणाऱ्या तात्पुरत्या सत्तेचा सर्व खेळ सुरू आहे. शुद्ध ज्ञानाचीहि तीच गोष्ट. कारण आइन्स्टाइन्नें सापेक्षता सिद्धांत मांडल्यापासून, शेषानें टाळू हलविल्या मुळें पृथ्वी जशी गदागदा हलावी तशी, भौतिक शास्त्रज्ञानाची स्थिति झाली आहे. या सर्व अनिश्चिततेचा परिणाम वाङ्मयावर झाला. कोणचीहि उपपत्ति निश्चित मांडली जात नाहीं. भावनेंत स्वारस्य नाहीं असें वाटूं लागलें आहे व सद्गुण हें थोतांड असें लोक प्रतिपादूं लागले आहेत. स्थूल परामर्षी सर्व वाङ्मय केरकचऱ्यांत जाण्याची वेळ आली आहे. वाचकांना व म्हणून लेखकांना आतां ध्येयवाद किंवा कल्पनावाद रंगविलेला आवडत नाहीं. त्यांना सूक्ष्मस्पर्शी, वस्तुवादी, सत्यवर्णनपर वाङ्मय आवडूं लागलें आहे. हॅरल्ड निकलसन् म्हणतो,

" The modern writer regards all general ideas, all synthetic formulas, as suspect: he has learnt that they slide only too readily into emotions or deliberate forms of belief. Abandoning deductive methods, he falls back upon methods of induction; he wishes to proceed not from the general to the particular, but from the particular to the general: he adopts towards the problems a ' scientific ' rather than a ' religious ' attitude: he

prefers facts to theories, illustrations to formulas, experience to revelation, analysis to synthesis: he aims at accumulating evidence rather than at expounding doctrine. "
थोडक्यांत सांगावयाचें झालें तर युक्तिवादानें श्रद्धा नष्ट केली, शास्त्रानें धर्म बुडविला, उदाहरणांनीं उपपत्ति मागें टाकली आणि पृथःक्करणानें समन्वय नावडता केला. नुकतेंच महाराजांनीं एका व्याख्यानांत, " धर्म-विचारांत सहिष्णुताच नव्हे तर सहकारिताहि पाहिजे. " असें सांगितलें, हें आपणांस आठवत असेल. परंतु खरी स्थिति अशी कीं जुनी सहिष्णु-ताहि आज उरलेली नसून पदोपदीं विरोध सुरु आहे. मग सहकारितेची गोष्ट कशाला ?

या सर्व विचारांचें प्रतिबिंब अनुकरणानें मराठी वाङ्मयांत पडत चाललें आहे. नव्या नीतिबरोबर नव्या रीतीचीहि आवड सुरू आहे. नीति व रीति यांचा वास्तविक कांहींच संबंध नाहीं. पण रीति म्हणजे कलेचे प्रकार. यांतहि कांहीं विशेष किंवा विचित्र असावें असें वाटू लागलें आहे. उदाहरणार्थ, कादंबऱ्या मागें पडून लघुकथा पुढें आल्या. सयमक, समचरण कविता, तालबद्ध कविता मागें पडून 'फ्री व्हर्स ' मुक्तबंध कविता पुढें आल्या. या मुक्तबंध कवितेंतहि यमक किंवा ताल मुळींच नाहीं असें नाहीं पण फक्त तो जुन्या रीतीचा नाहीं. ताल व यमक हे अनपेक्षित ठिकाणीं दिले जातात व ते हुडकून काढणें हा एक खेळ होतो. मनोविश्लेषण हा वाङ्मयांत एक नवा प्रकार सुरु झाला आहे; व तो इतक्यांतच इतक्या थराला पोंचला आहे कीं कादंबरी आत्मवृत्ताच्या स्वरूपाची असेल तर चरित्रपर एक वाक्य उच्चारल्याबरोबर लगेच दहा ओळी त्याच्या हेतूचें पृथःकरण, मनोविश्लेषणाच्या म्हणजे पृथक्करणाच्या पद्धतीनें केलें जातें. सरळ सुसंगत गोष्टच कोणी लिहीत नाहीं. या मनोविश्लेषणावर पदोपदीं वाचकाला अडखळावें लागतें. सुनीतें वगैरे नवे प्रकारहि येत आहेत. यांत इष्ट कोणतें अनिष्ट कोणतें हें ठरविणें थोडें कठिण. तथापि अनिष्ट असेल तेवढ्यापुरता तरी वाङ्मयाचा ऱ्हास होय. इंग्लंडांत हल्लीं नाट्यवाङ्मयाची कला मागें पडली. नाटकाला जाणें तें नाट्यकला पाहण्याला जाणें नव्हे तर जेवणानंतर चार मित्रमैत्री घेऊन झकास कपडे घालून गप्पागोष्टी व ख्याली-

खुशाली करण्याकरतां नाटकगृहासारख्या सार्वजनिक जागीं जाणें असा अर्थ झाला आहे. चांगलें इंग्रजी नाटक आयरिश थिएटरांत कदाचित् पहावयास मिळतें. फिलिप हेंडर्सन् म्हणतो, " वरच्या लोकांची ही गत! मग खालच्या लोकांना नाटक हें एक " an opportunity for wallowing in beery and sexy fantasies, or witnessing over and over again the monotonous subject of adultery among their "betters". असें वाटल्यास काय आश्चर्य ? " In the book-market and the theatre to-day there is the largest provision for the lowest common multiple of bad taste. " यानंतर वर्तमानपत्रें या विषयीं हा लेखक म्हणतो " The function of newspaper is determined by Hollywood. It is to provide its readers with as many " sensations " a day as possible and the sensations of which the great British public apparently never tires are provided by crime, royal weddings, divorce and sport news." वर्तमानपत्राखालोखाल लोकांना गुप्त पोलीसांच्या कादंबऱ्या आवडतात. कारण त्यांत गुन्ह्यांची चिकित्सा असते व त्याच्या खालोखाल कादंबरींत लोकांना "clean, gripping love story" आवडते.

जसा गुरु तसा शिष्य या नात्यानें मराठी वाङ्मय असेंच बनत चाललें आहे. मग आपण काय करावें ? माझें उत्तर असें कीं या उद्यांच्या वाङ्मयासंबंधानें आपण अनिष्ट वाङ्मयाकडे लक्ष देण्यापेक्षां इष्ट वाङ्मयाची निष्पत्ति कशी होईल याकडे पहावें. अनिष्ट वाङ्मयाला जनतेचा दुर्दैवानें उदार आश्रय आहे. त्याला आपण हातभार लावण्याचें कारण नाहीं. पण मग आपण कशाची काळजी घ्यावयाची ? तर ती इष्ट वाङ्मयाची. हें इष्ट वाङ्मय वाढविणें हें तीन लोकांच्या हातीं आहे. १ सरकार. २ विद्यापीठें. व ३ सुसंकृत जनता व सुखवस्तु लोक. पैकीं नव्या सुधारणा झाल्या म्हणजे शिक्षणविषयक धोरण प्रभावी करणारे प्रधान कसे मिळतील हें लौकरच दिसून येईल. विद्यापीठासंबंधानें माझें निश्चित मत असें कीं भाषावार विद्यापीठें निर्माण झाल्याशिवाय इष्ट वाङ्मयाची वृद्धि होणार नाहीं. अशी विद्यापीठें निर्माण झालीं म्हणजे वरच्या बाजूला विद्यापीठाच्या आश्रयानें जें इष्ट वाङ्मय निर्माण होईल

तें मातृभाषेंतूनच समाजांतील कनिष्ट वर्गापर्यंत पोहोंचूं शकेल. हल्लीं विद्यापीठांतून इंग्रजीवरच भर असल्यामुळें इष्ट वाङ्मय देशी भाषेंतून निर्माण होत नाहीं म्हणून खालच्या थरापर्यंत तें पोहोंचतच नाहीं. शेवटीं सुखवस्तु वर्ग हा राहिला. हल्लीं सुखवस्तु लोकांवर समाजसत्तावादी लोकांनीं हल्ला चढविला आहे. त्यांच्या मतें सुखवस्तु वर्ग म्हणून समाजांत उरतांच कामा नये. पण निर्व्याज, निःस्वार्थी, निरपेक्ष कलोपासन व्हावयाचें तर तें सुखवस्तु लोकच थोडें बहूत करूं शकतील. आपद्ग्रस्त, मनुष्य कला निर्माण करणारच नाहीं असें नाहीं, पण कलानिर्मितीमध्यें जो आनंद लागतो तो असुखी लोकांत मर्यादितच असतो. परिस्थितीची प्रसन्नता ही मनाच्या प्रसन्नतेला उपकारक नाहीं असें कसें म्हणावयाचें ?

तात्पर्य, जुनें वाङ्मय कसें होतें, आतांचें कसें आहे व उद्यांचें कसें होईल याविषयीं मी नेमून दिलेल्या थोड्या वेळांत, आपले विचार सांगितले.

---

## ७ अश्लील वाङ्मयाचा वाद

### ( १९३२ सालीं, पुणें वसंत व्याख्यानमालेंत केलेलें भाषण )

पुणें येथें, पांच वर्षांपूर्वीं भरलेल्या मराठी साहित्यसंमेलनप्रसंगीं, नागपूरचे कवि रा. रा. उपाध्ये यांनीं कवींची थट्टा करणारी एक विनोदी कविता वाचून दाखविली. त्यांत उठल्यासुटल्या मासिकांतून प्रसिद्धीस येणाऱ्या कवींची प्रतिभा ' मासिक स्राव ' करते अशी उपमा दिलेली होती. ती पुष्कळ लोकांना अश्लील वाटली, व त्या निमित्तानें अश्लीलतेची चर्चा त्या संमेलनांत बरीच जोराची झाली. त्यानंतर कै. प्रो. शिवरामपंत परांजपे यांनीं रत्नाकरांतील एका बंगाली ' प्रणयिनीचा मनोभंग ' च्या चित्राचा अर्थ समजावून सांगण्याकरितां लेख लिहिला. त्यांत शृंगारिक भाषेची व अश्लीलतेची कमाल केली होती. त्याविषयींहि बराच गवगवा झाला. तसेंच ' ओलेती ' या चित्रासंबंधानेंहि सडकून टीका झाली. तो लेख नव्हता, तें चित्र होतें. तथापि अश्लीलतेच्या दृष्टीनें शब्दचित्रकार, रेखाचित्रकार, रंगचित्रकार हे सर्व एकच असें मानून टीकाकारांनीं अश्लीलतेच्या दोषाची चर्चा केली. तोच विषय पुनः गेल्या

वसंत–व्याख्यानमालेंत प्रो. माधवराव आळतेकर यांनीं व्याख्यानाकरितां घेतला. त्याहि वेळीं त्या विषयावर पुरे दोन दिवस चर्चा झाली, व या चर्चेला जितके श्रोते लाभले तितके मालेंतील इतर कोणत्याहि व्याख्यानाला कदाचित् लाभले नसतील. तात्पर्य, आधुनिक वाङ्मयांतील व चित्रांतील अश्लीलता हा विषय बराच वादग्रस्त होऊन बसलेला आहे. म्हणून त्या विषयावरील विचार स्थूलपणें व थोडक्यांत खालीं देण्यांत येत आहेत्.

## अश्लीलता या शब्दाची व्याख्या

'अश्लीलता' या शब्दाची व्याख्या करतां आली नाहीं, किंवा त्याचा मूळ शब्दार्थ बसवितां आला नाहीं, तरी फारशी अडचण नाहीं. कारण आतां अश्लील हा शब्दच पूर्णपणें रूढ झालेला आहे; व तो उच्चारला असतां कोणता अर्थ घ्यावयाचा हें कोणालाहि न सांगतां समजतें. अडचण काय ती उदाहरणें देऊन, किंवा एरवीं, अश्लीलतेची मर्यादा ठरविण्यासंबंधानें असते. अमुक शब्द अश्लील कां मानावा किंवा कां मानूं नये हें ठरविण्याला कांहीं गमकें आहेत; व कोणत्याहि उदाहरणांत त्यांतील कोणतीं गमकें लागू पडतात, कोणतीं पडत नाहींत हें ठरवितांनाच जो काय मतभेद होतो तो होतो. अश्लील हा शब्द संस्कृत असल्याबद्दल वाद नाहीं. याची शब्दसिद्धि करतांना कित्येकांनीं ती 'अश्रीर' असा मूळ सामासिक शब्द घेऊन केली आहे. श्री म्हणजे शोभा ती ज्यांत नाहीं ते अश्रीर. 'र' हा एक प्रकारचा शब्दसाधक व्याकरण प्रत्यय समजावा. आणि रचा अपभ्रंश ल हा होतो. मिळून अश्लील, म्हणजे अश्रीर, म्हणजे ज्यांत कांहीं शोभादायक उज्ज्वल म्हणजे अर्थात् काव्यश्रीयुक्त अर्थ किंवा अभिप्राय नाहीं असा शब्दसमूह. पण हा अर्थ थोडा अतिव्याप्त असा होतो. कारण तो शब्दशः घेतला तर कोणताहि 'नीरस' शब्दप्रबंध हा अश्लील या शब्दाखालीं येईल. पण अश्लील म्हणजे निर्गुण असा अर्थ अभिप्रेत नसून गुणसंपन्न असला तरीहि कांहीं विशिष्ट कारणांमुळें अपवादास्पद असा त्याचा अर्थ अभिप्रेत आहे. आणि सामान्यतः ही अपवादास्पदता शब्दांतून विशेष प्रकारची शृंगारसूचक भावना प्रगट किंवा सूचित केल्यानें येते, असा सर्वसामान्य नियम घेऊन चालण्यास हरकत नाहीं.

## अश्लीलत्व हा काव्यदोष आहे

अश्लीलत्व हा एक काव्यदोष होय. हल्लीं त्याची चर्चा होते ती मात्र काव्यदोष या अर्थानें म्हणजे काव्य शास्त्रांतील एक कूट प्रश्न, या अर्थानें होत नाहीं तर सामाजिक वाङ्मयांतील एक दोष व प्रमादकारण या अर्थानें ती चर्चा होत असते. तथापि ऐतिहासिक दृष्टीनें पहातां अश्लीलतेचा हा दोष केवळ आधुनिक काळांतच व उच्छृंखल लेखकांनींच निर्माण केलेला आहे असें नाहीं. त्याची परंपरा खुद्द काव्याच्या परंपरेइतकी जुनी आहे. आणि त्याबरोबरच असेंहि म्हणतां येईल कीं, बहुधा असा एकहि अभिजात म्हणजे 'क्लासिकल' कवि दाखवितां येणार नाहीं कीं, ज्याच्या काव्यांत अश्लीलतेचीं कांहीं तरी उदाहरणें सांपडणार नाहींत. असें असल्यामुळें अश्लीलतेची सोपपत्तिक सोदाहरण अशी चर्चा संस्कृत साहित्यशास्त्रांच्या ग्रंथांतूनहि केलेली आढळते. वर जी अश्लीलतेची शब्दसिद्धि किंवा व्याख्या सांगितली ती वामन या साहित्य ग्रंथकारानें स्वीकारलेली आहे. अश्रीर हा शब्द संस्कृत आहे, इतकेंच नव्हे तर तो वैदिकहि आहे. काव्यप्रदीपकार गोविंद यानें अश्लील याची व्याप्ति अश्रीर अशीच स्वीकारली आहे. पाणिनीच्या नियमाप्रमाणें र ल हा प्रत्यय येथें लागतो कीं नाहीं असा प्रश्न कदाचित् उत्पन्न होऊं शकेल. पण त्यांत आपणाला शिरण्याचें कारण नाहीं. केशवमिश्र यानें अश्लील याचा अर्थ उज्ज्वलतेचा अभाव असणारा असा दिला आहे. तो अश्रीर या शब्दसिद्धीलाच धरून आहे असें दिसतें. कसेंहि असो, वामन यानें अश्लील याची व्याख्या खालीलप्रमाणें दिली आहे—

"असभ्य–अर्थान्तरम् असभ्यस्मृतिहेतुःच अश्लीलम्"

अश्लील म्हणजे असभ्य. मग अर्थांतरामुळें असभ्य गोष्टींची आठवण सहज होवो किंवा असभ्य गोष्टींची आठवण मुद्दाम करून देण्याचा लेखकाचा हेतुच असो. असभ्य शब्द म्हणजे सभेंत न उच्चारण्यासारखे, उच्चारूं नयेत, असे. आतां सभा म्हणजे कोणती हा प्रश्न सहजच उत्पन्न होतो. पण सभा याचा अर्थ आपण सामान्यपणें समजतों तसा घेऊन चालावयाचें नाहीं. त्याला जवळचा शब्द इंग्रजींत फार चांगला आहे. तो 'प्रेझेंट कंपनी' हा होय. म्हणजे "शब्दप्रयोग चालू असतां जी मंडळी तो ऐकण्याला हजर असतील ती," हा अर्थच सभ्य या शब्दांत गर्भित आहे.

म्हणून या सभेचे प्रकार पांचपंचवीस होतील. उदाहरणार्थ (१) वाचक हा आपला आपणच मनाशीं वाचीत असेल; (२) वाचक एकट्या-दुकट्या कोणाला वाचून दाखवीत असेल; (३) समवयस्क मुलें, प्रौढ-वृद्ध, स्त्री-पुरुष सुसंस्कृत असंस्कृत तरुण, यांच्या निरनिराळ्या जोड्या; (४) गुरु व शिष्य यांजमधील शिक्षणाचा प्रसंग; (५) कोर्ट-कचेरीचा प्रसंग; (६) वाङ्मयविषयक किंवा शास्त्रीय चर्चेचा प्रसंग इ. या प्रत्येक प्रसंगीं एकत्र असणारी मंडळी ही 'सभा'च मानली पाहिजे. त्या प्रत्येक प्रसंगाची औचित्य मर्यादा वेगवेगळी असणार. यामुळें सभ्य कोणतें, असभ्य कोणतें, अर्थात् कोणतें अश्लील व कोणतें अश्लील नव्हे, हें त्या त्या परिस्थितीप्रमाणें तारतम्यानें ठरवावयाचें असतें. अश्लील शब्दप्रयोग हा तरी एक इतर रीतीनें सदोष खरा; तथापि तो मनुष्याच्या तोंडाला कां येतो, याचा विचार केला तर असें दिसून येईल कीं, त्यांत स्पष्टोक्ति किंवा अर्थाची समर्पकता हा तरी एक गुण असतो. म्हणून बोलणारा तो शब्दप्रयोग करण्याच्या मोहांत सांपडतो. स्वतः बोलणाराला, लिहिणारालाहि, अश्लील म्हणजे काय हें कळत नाहीं असें नाहीं. आणि अश्लील बोलावयाचेंच म्हणून, किंवा त्यांतच गोडी वाटते म्हणून, बोलणारा लिहिणारा विरळा. ज्यांच्या तोंडीं ग्राम्य व अश्लील शब्द स्वभावतःच बसलेले असतात, त्यांना ते शब्द उच्चारतांना त्यांतील वाईट अर्थाचें भानच असत नाहीं. आणि ज्यांच्या तोंडीं असले शब्द स्वाभाविकपणें येत नाहींत, म्हणजे जे तसले शब्द जाणूनबुजून वापरतात, त्यांचा हेतु, वर सांगितल्याप्रमाणें आपल्या बोलण्यालिहिण्याला स्पष्टोक्ति, ठसकेदारपणा, समर्पकता, मार्मिकता इत्यादि प्राप्त व्हावी असाच प्रायः असतो. तथापि त्या हेतूमुळें तसल्या शब्दांचा उपयोग करण्याचा दोष टळतो असें मात्र नाहीं.

## गालबोट लावण्याची चाल

जें वाईट, तें जातिस्वभाव म्हणून केलें किंवा मुद्दाम होऊन केलें, तरी तें वाईटच. प्रस्तुत वाङ्मयापुरतें बोलावयाचें तरी त्यांतहि अश्लील शब्दप्रयोग स्वाभाविक किंवा बुद्धिपुरस्सर असेच येतात, आणि तें वाङ्मय म्हणूनच त्यांत आलेल्या अश्लील शब्दप्रयोगाचा अधिक गवगवा होतो हें उघड आहे. वाङ्मय निर्माण करणाऱ्या मोठमोठ्या लेखकांनाहि हा दोष जर पूर्णपणें टाळतां येत नाहीं, तर लहानसान लुंग्यासुंग्या किंवा असल्या

शब्दप्रयोगांमुळें मिळणाऱ्या चटकदारपणावर ज्यांची द्रव्यप्राप्ति अवलंबून असते अशा लेखकांच्या हातून तो दोष सर्रास घडत असेल तर त्यांत काय नवल ? असल्या लेखकांच्या वाङ्मयांत इतर गुण म्हणण्यासारखा नसेल तर अश्लीलत्व ही दोषांच्या भरींत भरच होते. पण इतर गुणांनीं संपन्न असलेल्या वाङ्मयांतहि तो दोषच म्हणावा लागतो. त्या गुणांना हें गालबोट म्हटलें तरी त्याचा काळेपणा नाहींसा होत नाहीं. गालबोट लावण्याच्या चालींत देखील काजळाला काळेंच मानतात, व दृष्ट लागूं नये म्हणून तें मुद्दाम लावतात. कोणतीहि वाईट गोष्ट अपरिहार्य असली म्हणजे तिला समर्थनाच्या समाधानाकरितां अळेंबळेंच चांगलेपणा देण्याची रीत असते. उदाहरणार्थ, चंद्रावरचा कलंक पुसून काढतां येणें शक्य असेल तर तो कोण काढून टाकणार नाहीं ? पण निघत नाहीं म्हणून, ‘ Making a virtue of neccessity ’ या इंग्रजी म्हणीप्रमाणें, त्याची कशी तरी संपादणी करतात. एरवीं सर्वच्या सर्व चंद्र, निरपवाद रीतीनें शुभ्र तेजोमय असा दिसला तर तो कोणाला नको ? कालिदासानेंहि याविषयीं लिहितांना “ एको हि दोषो गुणसंन्निपाते निमज्जति इंदोः किरणेषु इव अंकः । ” म्हणजे चंद्रावरील ‘काळा डाग’ त्याच्या किरणांत ‘झाकून जातो’ असेंच म्हटलें आहे. तो त्याची शोभा वाढवितो असें म्हटलें नाहीं. आणि गालबोट याचाहि अर्थ तसाच आहे. म्हणून मोठमोठ्या ग्रंथकारांकडून व कवींकडून अश्लीलत्वाचा दोष घडला तर तो घडलाच नाहीं असें म्हणणें बरोबर नाहीं. फार तर त्याची कमजास्त संपादणी करावी.

## कालिदासाची प्रवृत्ति

स्वतः कालिदासानें असे किती तरी दोष केलेले आहेत. त्याची प्रवृत्तिच शृंगारिक लिहिण्याकडे होती. यामुळें त्यानें ते दोष टाळण्याचा प्रयत्नच केला नाहीं. तीच गोष्ट शेक्सपिअरची. याविषयीं उदाहरणें देणें म्हणजे लिहिणारानें स्वतःच अश्लीलत्वाचा दोष जाणूनबुजून करणें असा अर्थ होतो. म्हणून त्या भानगडींत आम्ही पडत नाहीं. कालिदास व शेक्सपिअर वाचणारांना हे दोष कोठें कोठें कसे कसे घडले आहेत हें ठाऊकच आहे. कोणी या दोषांचें समर्थन असें करूं पाहतात कीं, अश्लील शब्दप्रयोगानें मुख्यार्थाची हानि न झाली तर त्याला दोष म्हणतां येत नाहीं. पण हा युक्तिवाद बरोबर नाहीं. कारण मुख्यार्थ हाच

अश्लील असेल तर मुख्यार्थाची हानि होत नाहीं म्हणून अश्लील नव्हे हें समर्थन योग्य ठरत नाहीं. कवि मोरोपंत यांच्याहि हातून असले दोष पुष्कळ घडले. आणि आधुनिक मराठी कविता ही पुष्कळशी भावनाप्रधान, स्पष्टोक्तिप्रिय, व शृंगारप्रवण असल्यामुळें तींत अश्लीलत्वाचे दोष सांपडल्यास नवल नाहीं. पण मुद्दा हा कीं, ग्रंथकार लहान किंवा थोर हा भेद जसा यांत होऊं शकत नाहीं, तसाच प्राचीन अर्वाचीन हा भेदहि होऊं शकत नाहीं.

असो. पण ही चर्चा पुढें करण्यापूर्वी प्रथम अश्लीलत्व कोठें घडूंच शकत नाहीं, किंवा एकाच्या दृष्टीनें तें घडलें नाहीं पण दुसऱ्याच्या दृष्टीनें तें घडलें तरी तें क्षम्य अपवादात्मक कां मानतां येतें, कसें मानतां येतें याविषयीं कांहीं उदाहरणें देऊन तो मुद्दा बाजूस काढला पाहिजे. ( १ ) शब्दप्रयोग अश्लील असतील, पण ते इतके रूढ झाले असतील कीं त्यांच्या उच्चारानें कसल्याच प्रकारची वाईट ऊर्मि म्हणजे लाजलज्जेची छटा ऐकणाराच्या मनांत उठणार नाहीं. ( २ ) विशिष्ट मातृभाषा असणाऱ्या समाजापुढें, एखादी इतर भाषा ही मातृभाषा असणारा मनुष्य बोलत असला तर या दुसऱ्याच्या तोंडून असे शब्द स्वतः त्याच्या भाषेंतले निघू शकतील कीं ते या पहिल्याच्या कानाला अश्लील भासतील. पण येथें अश्लीलतेचा दोष उत्पन्न होणार नाहीं. म्हणजे तो बोलणारानें जाणूनबुजून केलेला नाहीं. किंवा तो देहस्वभावानें झाला असेंहि म्हणतां येत नाहीं. अशा प्रसंगीं ऐकणारा जर हंसेल तर बोलणारापेक्षां स्वतः ऐकणाराच अश्लीलतेचा दोष आपल्या पदरीं बांधून घेईल. उ. गुजराथी व हिंदी भाषेंत असे कांहीं शब्द आहेत कीं ते मराठींत उच्चारले असतां अश्लील वाटतात. ( ३ ) शास्त्रीय प्रतिपादनांत अश्लील शब्द आले तरी तो दोष मानतां येत नाहीं. उ. अशा शब्दप्रयोगांशिवाय वैद्यकशास्त्र शिकवितांच येणार नाहीं. ( ४ ) शब्दकोशकाराला भाषेंतला प्रत्येक शब्द कोशांत समाविष्ट करावा लागतो. तें त्याचें कर्तव्यच ठरतें. म्हणून ती अश्लीलता नाहीं. ( ५ ) साहित्यशास्त्रावरील ग्रंथांत अश्लीलत्व हा काव्य–दोष मानल्यामुळें तो कसा घडतो, हें ग्रंथकाराला उदाहरणें देऊन समजवावें लागतें. म्हणून तेथेंहि तो दोष नाहीं. उदाहरणार्थ, मम्मटानें,

क्षेमेंद्रानें, विश्वनाथानें या काव्यदोषाचीं उदाहरणें हुडकून हुडकून मोठ-मोठ्या ग्रंथकारांच्या ग्रंथांतूनहि काढून दिलीं आहेत. ( ६ ) उपदेशाचा जोर चालू असतां उपदेशक देहभान विसरून जाऊन बोलत असतां त्या उन्मनस्थितींत त्याच्या हातून अश्लील शब्दप्रयोग होऊं शकेल. पण तेथें उपदेशाची पवित्रता व उपदेशकाची पवित्रता हीं इतकीं प्रबल असतात कीं तीं अश्लीलत्वाच्या भावनेला मारक होतात. मात्र बोलणाराची योग्यता जितकी मोठी असेल त्या मानानेंच त्याला ही माफी मिळूं शकेल. सामान्य माणसाला ती मिळणार नाहीं. तुकारामाचे अभंग, कबिराचे दोहरे, कांहीं कांहीं फारच अश्लील आहेत. अर्थात् त्यांचा उपयोग सामान्य माणसापुढें करूं नये म्हणजे झालें. मग ते शब्द मूळ अभंगांत किंवा दोहऱ्यांत राहिलेले मुद्दाम हुडकून काढून त्यांना कोण नांवें ठेवणार ?

( ७ ) अश्लीलत्वाला मारक अशी भावना उत्पन्न करणाऱ्या प्रतिभावनेचें किंवा गांभीर्याचें उदाहरण म्हणून केव्हां केव्हां न्यायकोर्टांतून होणाऱ्या अश्लील शब्दोच्चारांचें देतां येईल. समजा, एखाद्या स्त्रीवर बलात्कार झालेला आहे. त्यासंबंधी खटला कोर्टांत चालू असतां त्या बिचाऱ्या स्त्रीला स्वतःच कोर्टांत येऊन साक्ष देण्याचा प्रसंग आहे. अशा ठिकाणीं रडत रडत कां होईना पण न्यायकोर्टांचें कार्य सिद्धीस जाण्याकरितां तिला आपल्या तोंडानें अश्लील शिव्या किंवा कृत्यें यांचें वर्णन करावें लागेल. येथें न्यायकोर्टांचें गंभीर वातावरण व त्या स्त्रीविषयीं दया अनुकंपा या भावना अश्लीलत्वाला मारक होतील. म्हणून तेथें अशा शब्दप्रयोगांचा दोष मानतां येत नाहीं.

## अश्लीलत्वाचा दोष कोठें मानावा ?

इतकीं उदाहरणें दिलीं म्हणजे अश्लीलत्वाचा दोष कोठें मानावा कोठें मानूं नये याचें स्थूल तारतम्य सांगितलें असें होईल; व खरा वाद किंवा खरी चर्चा जी व्हावयाची ती वरील अपवादस्थळें सोडूनच करावयाची असते. या विषयासंबंधानें इंग्रजी किंवा युरोपियन वाङ्मयापेक्षां संस्कृत शास्त्रीय वाङ्मयांत पुष्कळच व्यापक व खोल चर्चा केलेली आढळून येते. या नाजूक चर्चेंत आमच्या इकडील साहित्यशास्त्रकार इतर देशांतील

शास्त्रकारांना हार जाणार नाहींत असें यथार्थ गर्वानें म्हणतां येईल. मम्मट वगैरे साहित्यशास्त्रकारांनीं अश्लीलता तीन प्रकारची मानली आहे. ती ( १ ) व्रीडा ( २ ) जुगुप्सा व ( ३ ) अमंगलत्व. या तिहींपैकीं व्रीडा हें गमक सर्वस्पर्शी आहे. जुगुप्सा व अमंगलत्व हीं गमकें कमी व्यापक आहेत. क्षेमेंद्र पंडितानें ' औचित्यविचारचर्चा ' म्हणून एक ग्रंथ लिहिला आहे. त्यांत अनौचित्याचे चौसष्ट प्रकार वर्णिलेले आहेत. ते पाहिले म्हणजे, कित्येक वेळां मलखांबाचा खेळ करून दाखविणारा निष्णात मनुष्य आपलें कौशल्य दाखविण्याकरितां तरवारी व सुन्या बांधलेल्या ज्या चौकटींतून उडी मारतो तिचीच आठवण होते. आणि असें म्हणावेंसें वाटतें कीं, या चौसष्ट दोषांपैकीं आपल्या हातून एकहि न घडतां जो काव्य व फिरून तें सरस काव्य निर्माण करील तो खरोखर भाग्यवानच असला पाहिजे. अनौचित्य व अश्लीलत्व हीं मोजण्याचा संस्कृत साहित्यशास्त्रकारांचा ताजवा किंवा कांटा इतका सूक्ष्म व नाजूक आहे कीं त्याला केसाइतकेंहि अलीकडे पलीकडे खपत नाहीं. आणि तोच खरा धर्मकांटा ! कारण केसाच्या फरकानें धर्माचा अधर्म होऊं शकेल. अर्थात् हें तात्त्विक चर्चेचें अंतिम स्वरूप होय. इतकी मोठी कसोटी काव्यव्यवहारांत किंवा भाषाव्यवहारांत लागूंच शकत नाहीं व तशी ती कोणी लावीतहि नाहीं. पण असें उंची ध्येयवादित्व ठेवणें हें संस्कृतीला मोठें भूषण होय असें तरी खास म्हणतां येईल.

## संस्कृत नाट्यशास्त्र

सभ्य या शब्दाचा अर्थ वर सांगितलाच आहे. पण विशेष सांगावयाचें तें असें कीं त्या त्या अर्थानें सभा जितकी अधिक मोठी किंवा मिश्र, तितकी अश्लीलत्वाविरुद्ध खबरदारी घेण्याची जबाबदारी कोणावरहि अधिक पडते. मिश्र किंवा मोठ्या सभांतून पुष्कळ लोक ग्राम्य अभिरुचीचे व कांहीं लोक संस्कृत अभिरुचीचे असले, तर अशाठिकाणीं राजकारणाप्रमाणें बहुमतानें निर्णय करावयाचा नाहीं. कारण सभेचा नियम असा असतो कीं, सभेंत जास्तींत जास्ती संस्कृत अभिरुचीचा मनुष्य असेल त्याला उद्वेग विद्वेष न वाटेल असेंच कोणींहि बोललें पाहिजे. तें इतर पुष्कळांना चालतें ही सबब टिकत नाहीं. अपकृत्य किंवा फौजदारी गुन्ह्याचें कृत्य याविषयीं

निर्णय करावयाचा असतां कोर्टाला प्रतिवादीचें कृत्य योग्य खबरदारीनें व काळजीनें (With due care and caution) केलें आहे कीं नाहीं हें पाहावें लागतें. संस्कृत नाट्यशास्त्रांतहि असेंच सांगितलें आहे कीं, नाटक कसें असावें ? तर घरचीं लहानथोर सर्व पिढीचीं माणसें एकत्र बसून तें पाहत असतां त्यांतील कोणालाहि लज्जा उत्पन्न होऊं नये. म्हणजे जितक्या निरनिराळ्या अधिक पिढ्यांचे लोक एकत्रित असतील त्या मानानें लज्जा उत्पन्न करणाऱ्या गोष्टी टाळाव्या असा त्यांचा अभिप्राय आहे. आणि जशा निरनिराळ्या पिढ्या तसेच एकत्रित बसलेले निरनिराळ्या संस्कृतीचे लोक असें समजावें.

कोणीं असें म्हणतात कीं, आतां जुना प्रतिष्ठितपणा उरला नाहीं. तर डिमॉक्रसीचे म्हणजे लोकसमाजसत्तेचे दिवस आहेत. कोणचीहि गोष्ट पूर्वी जेथें एका दोघांकरितां होत असेल तेथें ती आतां शेंकडों लोकांकरितां होत आहे व झाली पाहिजे. पण या युक्तिवादानें अश्लीलतेचें समर्थन न होतां उलट संकोचच होणार. कारण वर सांगितल्याप्रमाणें लोकसमाजाचें राज्य झालें याचा अर्थ लोकसमाज पूर्वीहून अधिक मोठा व अधिक संमिश्र झाला असाच होतो. पूर्वी वाङ्मय ही गोष्ट फार थोड्या लोकांनीं सेवन करण्याची होती. वाङ्मय हा पंडितगिरीचा मामला होता. म्हणजे तें थोड्यांनीं थोड्यांकरितां लिहावें व थोड्यांनीं वाचावें असा प्रकार होता. आतां ती स्थिति पालटली आहे. जुनीं संस्कृत नाटकें व काव्यें तरुण विद्यार्थ्यांनीं भरलेल्या वर्गांतून प्रोफेसर किंवा शास्त्री यांना शिकवावयाचीं असतां कशी अडचण उत्पन्न होते याचा अनुभव शाळा व कॉलेजें यांतील विद्यार्थ्यांना व शिक्षकांना हल्लीं येतोच. तसेंच आतां मुद्रणकला फैलावली असल्यामुळें नाटकें व कादंबऱ्या हजारांनीं छापल्या जातात व त्या वाटेल त्या लोकांच्या हातीं पडतात. यामुळें लिहिणाराची जबाबदारी ' योग्य काळजी व खबरदारी घेण्याची पूर्वीपेक्षां वाढलीच पाहिजे. लोकसत्तेचें पर्यवसान लोकांवर अधिकाधिक बंधनें घालण्यांतच झालेलें आपण राजकारणांत पाहात नाहीं काय ? त्याचप्रमाणें साहित्यकारणांतहि लोकसत्तेचें पर्वयसान लोकांची संस्कृति व अभिरुचि संभाळली जाण्याविषयीं अधिकाधिक बंधनें घालण्यांतच होणार हें उघड आहे.

## स्पष्टोक्ति व स्वैरोक्ति

लोकसत्तेंत स्पष्टोक्तीच्या हक्काचा अंतर्भाव होतो पण स्पष्टोक्ति म्हणजे स्वैर उक्ति असें नव्हे. गूढ विषयांसंबंधानें मनांतील विचार स्पष्टपणें प्रगट करण्याची स्वतंत्रता असावी हें ठीक आहे. आणि अशा प्रकारचे गूढ सामाजिक विषय नव्या युगांत अधिकाधिक उत्पन्न होणार हेंहि खरें आहे. तथापि प्रश्न आहे तो हाच कीं, 'अश्लील' शब्दप्रयोग केल्या-शिवाय गूढ विषयांवरील स्पष्ट विचार प्रगट करतां येतात कीं नाहीं? 'सामाजिक कादंबऱ्यांतून आम्हांला सामाजिक स्थितीचे कूट प्रश्न सोड-वावयाचे असतात' असें कित्येकांकडून म्हणण्यांत येतें. पण हल्लींच्या स्थितींत अगदीं मोठ्यांत मोठे कूट प्रश्न घेतले तरी प्रौढविवाह, मिश्र-विवाह, सहवासोत्तर विवाह, पुनर्विवाह, घटस्फोट, संततिनियमन यांहून अधिक कूट व कठीण असे प्रश्न कोणते असणार? पण नाटकें किंवा कादंबऱ्या यांतून असल्या प्रश्नांचा परामर्ष घेण्याला अश्लील भाषा अपरिहार्य आहे असें म्हणवत नाहीं. उलट असेंहि म्हणतां येईल कीं, असल्या बिकट प्रश्नांसंबंधीं लोकमत आपल्या बाजूचें करावयाचें असेल तर भाषा सभ्य व गोड अशी लिहिण्यानेंच या कार्यांत यश येण्याला अधिक मदत होईल.

योग्य भाषेची खबरदारी न घेतली तर विरोधी लोकांना तीच एक सबब विरोधाला पुरते, व वड्याचें तेल वांग्यावर काढावें त्याप्रमाणें नुसत्या अश्लील भाषेकडे बोट दाखवूनच सुधारणेचे विरोधक म्हणूं लाग-तात कीं, 'हे पाहा तुमचे समाजसुधारक. असे बाष्कळ आहेत!' समाजसुधारणा करूं इच्छिणारानें सुधारणेचा प्रश्नच तेवढा वादग्रस्त अशा स्थितींत पुढें मांडावा. इतर कोणत्याहि रीतीनें टीकाकारांना व विरो-धकांना आपल्यावर हल्ला चढविण्याला त्यानें जागा देऊं नये. इंग्रजींत याला ( Isolation of the Phenomenon ) 'आयसोलेशन ऑफ दी फिनॉमेनन' असें म्हणतात. सूक्ष्मदर्शक यंत्रांत एखादा पदार्थ पहावयाचा तर त्यांतील अगदीं लहानांतला लहान भाग त्या यंत्राखालीं घालून पाहतात. बाकीचा भाग अदृश्य ठेवतात. त्या प्रमाणें नेमका वादग्रस्त असेल तेवढाच मुद्दा सामाजिक सुधारणेच्या वादांत लेखकानें पुढें

मांडावा. फालतू वादग्रस्त किंवा अप्रिय गोष्टी विनाकारण पुढें आणून नसती टीका आपणांवर ओढून घेऊं नये.

दिवसेंदिवस समाजाचा किंबहुना जगाचा कल आचारविचारांच्या स्वातंत्र्याकडे झुकत आहे ही गोष्ट खरी. पण त्याविषयीं स्पष्टोक्ति म्हणजे स्वैर उक्ति नव्हे. मतस्वातंत्र्याच्या गोष्टीहि बिनमुरवतखोरपणानेंच मांडल्या पाहिजेत असें नाहीं. वाङ्मय या पदवीला पोंचूं इच्छिणारें सर्व कांहीं शक्य तितकें सुंदर व नाजुक असावें. त्यांत दिल खुला दिसावा, पण जिभेचा अत्याचार नसावा. अश्लीलतेवर आक्षेप घेणारे लोक स्वतःला लब्धप्रतिष्ठित समजतात असें नाहीं. अश्लीलता हें धर्मदृष्ट्या पाप नव्हे. अश्लील बोलेल तो नरकांत जाईल असें कोणी म्हणत नाहीं. तसेंच अश्लील शब्दांचा संबंध अनीतीशींच जोडला जातो असें नाहीं. नीतिमान मनुष्याच्या तोंडीं किंवा नैतिक विषयांच्या चर्चेत अश्लील शब्द येऊं शकतील. उलट अनीतिमान मनुष्य अश्लील भाषेपासून अलिप्त असूं शकेल व अनीतिदर्शक विषयांची चर्चा अश्लील शब्द वापरल्याशिवाय करूं शकेल. अशीं उलटसुलट दोनहि प्रकारचीं उदाहरणें सांपडतील.

## मृच्छकटिक नाटक

शूद्रकानें मृच्छकटिक नाटक लिहिलें त्यांत मूळ कथा गणिकेसंबंधाची घेतली आहे. पण औदार्यामुळें दारिद्र्य प्राप्त झालेला सद्गुणी नायक आणि निर्लोभी गणिका ही नायिका, अशी ' अलौकिक ' जोडी त्यानें वर्णन केल्यामुळें, आणि अश्लील ठरण्यासारखी शृंगारिक भाषा कोठेंहि न वापरल्यामुळें, वाचक व प्रेक्षक मूळच्या कथानकांतील रूढ अनीतीचा प्रश्न विसरून जातात. उलट नैतिक व धर्म्य लग्नसंबंधांतील पिता, माता व मुलगा असे तीन प्राणी घेतले तरी मुलाला ' तुझे वडील दाखीव ' असें न म्हणतां ' तुझ्या आईचा नवरा दाखीव ' असें म्हणण्यांत अश्लीलता आपोआप प्रगट होते ! संबंध नैतिक पण शब्दांच्या वरील दोन जोड्यांपैकीं एक शिष्ट कां व दुसरी अशिष्ट किंवा अश्लील कां हें कोणासहि न सांगतां समजण्यासारखेंच आहे. तात्पर्य, अश्लीलतेचा प्रश्न हा अनीतीचा प्रश्न नव्हे तर केवळ सदभिरुचि व सुसंस्कृति ( Good taste and refinement ) यांचा प्रश्न आहे. प्रत्येक कालांतील सदभिरुचि व सुसंस्कृति यांची मर्यादा एकाच ठराविक रेषेवर पडेल असें नाहीं. त्या मर्यादा

बदलणें शक्य आहे. पण त्या मर्यादांचें अतिक्रमण ज्या शब्दांनीं होईल त्यांना त्या त्या काळांत अश्लील हें नांव मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. फाजील लब्धप्रतिष्ठितपणाचा टेंभा मिरविणें हें जितकें वाईट तितकेंच, स्पष्टोक्तीच्या व मतस्वातंत्र्याच्या नांवाखालीं चावटपणाच्या सनदेचा दिमाख मिरविणें हेंहि वाईटच नव्हे काय ?

---

## ८ कला, वाङ्मय व जीवन

क्रिया व प्रतिक्रिया यांवरच सर्व जीवन अवलंबून असतें, जशी श्वासोच्छ्वासाची क्रिया व प्रतिक्रिया.

ज्ञानाच्या बाबतींत देखील घेण्याच्या क्रियेबरोबर देण्याची क्रिया सुरू असते.

इंद्रियें ज्ञान घेतात तें लगेच बुद्धीला देतात. बुद्धि जें ज्ञान घेते त्यावर ती विवेकाचा संस्कार करून तें परत मनाला देते आणि इंद्रियांना कार्यप्रवृत्त करते.

घेण्यादेण्याच्या वस्तूंत प्राणी पहिली निवड आपल्या प्राथमिक गरजा भागविण्याच्या दृष्टीनें करतो.

प्राथमिक गरजा भागल्यानें प्राप्त झालेल्या सुखासीन स्थितींत मग दुय्यम गरजा जाणवूं लागतात.

या भागविण्याकरितां प्राणी बाहेरून जें घेतो त्यांत मात्र तो आवडनिवड चालवितो. ही आवडनिवड म्हणजे अभिरुचि.

प्राथमिक स्थितींतील अभिरुचि जन्मसिद्ध ( म्हणजे कदाचित् पूर्वजन्मार्जित ! ) असते. दुय्यम ( सुखासीन ) स्थितींतील अभिरुचि ही स्वतअर्जन केलेली, मिळविलेली, तयार केलेली असते.

देण्याघेण्याच्या कांहीं क्रिया अनिच्छेनें होत असतात. पण कांहीं ऐच्छिक घेण्याप्रमाणें कांहीं देणेंहि ऐच्छिक असूं शकतें. हें देणें तो आपल्या अभिरुचीप्रमाणें करतो. देणें, बाहेर टाकणें याला दान किंवा उद्गार असें आपण म्हणूं.

ऐच्छिक उद्गाराच्या गोष्टींतच कलानिर्मितीहि येते.

कलाकृति हा मनुष्याच्या अभिरुचीचा प्रासंगिक उद्गार असतो.

मात्र तो त्याच्या वासनेचा उद्गार असतोच असें नाहीं.

अभिरुचि ही बुद्धि, प्रतिभा, संस्कृति यांनीं बनते व त्यांच्या द्वारेंच प्रगट होते.

अभिरुचीच्या उद्गाराला म्हणजे कलानिर्मितीला कांहीं तरी भौतिक साधन अवश्य लागतें.

अशा निरनिराळ्या साधनांनी चित्र काव्य गायन शिल्प इत्यादि कला निर्माण करण्यांत येतात.

ज्ञानविज्ञानसंपन्न बुद्धि म्हणजे प्रज्ञा.

ज्ञान व विज्ञान यांचा अिच्छेप्रमाणें चित्ताकर्षक उपयोग करण्याची शक्ति म्हणजे प्रतिभा.

प्रज्ञा व प्रतिभा यांच्या संयुक्त साहाय्याविना कलाकृति निर्माण होऊं शकत नाहीं.

वाङ्मयलेखक सत्य व शिव यांपेक्षां प्रायः सौंदर्यनिर्मितीवरच अधिक भर देतो.

नैतिक कल्पनांचा अंतर्भाव संस्कृतींत होतो. पण प्रचलित असेल तीच नीति मनुष्य मानील असें नाहीं. तो आपली बुद्धि चालवून नीति-सिद्धांत स्वतंत्र बनवूं शकेल.

बुद्धि म्हणजे नुसती ज्ञानग्राहकच नव्हे तर विवेचक व चिकित्सक शक्ति.

कांहीं जें जसें नाहीं तें तसें असावें, कांहीं जें जसें आहे तें तसें नसावें असें प्रतिपादन करणारें वाङ्मय याला ध्येयवादी वाङ्मय म्हणावें.

जें आहे तेंच सुंदर चित्ताकर्षक व परिणामकारक होय असें रंगविणारें तें वास्तववादी वाङ्मय म्हणावें.

साहित्यिकाची अभिरुचि ही स्वभावसिद्ध असली तरी ती लहरी असूं शकते. लहरीचें कारण sub-conscious ( अंतः ) मनांत असतें.

हलत्या लोलकांतून प्रकाशकिरणाचें पृथःकरण होत असेल तर आतां एक रंग तर नंतर दुसरा असें तो दाखवील.

त्याप्रमाणें सृष्टिनिरीक्षण, जीवननिरीक्षण मनश्चक्षूंकडून होत असतां साहित्यिकाची अभिरुचि मध्येंच कोठें तरी थांबेल, व त्या निरीक्षणानें

मनांत आलेले विचार विकार यांचा उद्गार काढल्याशिवाय त्याला समाधान वाटणार नाहीं.

ज्यानें प्रथम आत्मरंजन न होईल असें कांहींहि साहित्यिक कोणीहि लिहीत नाहीं.

पण लेखक हा लिहितांना स्वतःच वाचक व टीकाकारहि असतो.

समाजजीवनांत दुःखद व सुखद अशीं दोनहि प्रकारचीं दृश्यें आढळतात. त्यांतील ज्यानें आत्मरुचिरंजन होईल तेंच दृश्य तो साहित्यविषय म्हणून घेतो.

त्याच्या नीतिविषयक कल्पना त्या विषयांत गांभीर्य उत्पन्न करण्याला त्याला उपयोगी पडतात; तसेंच ओजादि गुण तो परिणामकारक करण्याला उपयोगी पडतात.

कलेच्या द्वारें मनुष्य आत्मप्रगटीकरण करतो, तें कित्येक वेळां सहेतुक व कित्येक वेळां अहेतुक असतें. अहेतुक आत्मप्रगटीकरणामध्यें कला ही मुख्यतः सौंदर्यनिष्ठ असते. पण सहेतुक आत्मप्रगटीकरणामध्यें बुद्धि ही सेव्य व प्रतिभा ही सेवक असते. या सहेतुकतेमध्येंहि नीतिबोध करण्याचीच इच्छा असेल असें नाहीं. अहेतुकतेमध्यें तर तो हेतु नाहींच नाहीं.

तोंडांतून पाण्याची चूळ थुंकली म्हणजे कांहीं तरी आकृति उमटतेच. त्याप्रमाणें अहेतुकपणें निर्माण केलेल्या कलेमध्येंहि श्रोता किंवा द्रष्टा आपल्या प्रतिभेप्रमाणें कांहीं बोध घेऊं शकेल. पण तो बोध करणें कला निर्मात्याला अपेक्षित असेल असें नाहीं.

कदाचित् एकाच निर्मितींतून एकाला प्रतीत झालेला बोध व दुसऱ्याच्या मनांत प्रतीत झालेला बोध हे अगदीं वेगवेगळे असूं शकतील. एखाद्या विद्यमान ग्रंथकाराचा अहेतुक कलाविलासात्मक ग्रंथ घ्यावा व तो चार निरनिराळ्या लोकांना वाचावयास द्यावा. आणि यांत विवक्षित बोध कोणता, या प्रश्नाच्या उत्तररूपानें ग्रंथकर्त्यासुद्धां सर्वांचीं मतें घ्यावीं. म्हणजे उत्तरें इतकीं निरनिराळीं येतील कीं त्यांच्या योगानें कला व नीतिबोध यांचा संबंध अवश्य असतो या भ्रमाचा फुगा किंवा भोपळा सहज फुटून जाईल.

मतप्रसाराकरितां लिहिलेलें वाङ्मय कलात्मक असलें तरी सहेतुक असतें. म्हणून त्यांतील नीतिबोधाचा सिद्धांत कोणता याविषयीं निरनि-

गळीं उत्तरें मिळणार नाहींत. सहेतुक कलाकृति निर्माण करणारा मत-प्रतिपादनाकरितां वाङ्मय निर्माण करील तेव्हां तो सौंदर्यापेक्षां शिव हेंच ध्येय आपल्या डोळ्यांपुढें ठेवील. आणि त्याला मुख्यत: सत्याचा आधार घेईल. व तें सत्य गळीं उतरविण्याकरितां म्हणजे चित्ताकर्षक करण्याकरितां सौंदर्याचें सहाय्य घेईल.

कलोपासक वाङ्मय—लेखकानें आपल्या सभोंवार असलेल्या जीवनाला धरूनच लिहिलें पाहिजे असें म्हणतां येणार नाहीं. कदाचित् तो यक्षनगरींतील कारभार किंवा नवलपुरींतील संसार यांचें चित्र रेखाटून कलाप्राविण्याबद्दल प्रशंसापत्र मिळवील.

दुधांत साखर या नात्यानें कोणी एखादा आपलें कलात्मक वाङ्मय हें मनुष्यजीवन किंवा संसार अधिक सुखी—आनंदी निर्दोष करण्याच्या उच्च ध्येयानें लिहीलहि व अधिक मार्क व वरचा क्लास मिळवील. पण त्यानें हें उच्च ध्येय न ठेवलें व केवळ कलाविलासाकरितां लिहिलें तरी साधा कलावंत म्हणवून घेण्याचा त्याचा हक्क अबाधितच राहील.

पण प्राय: कला अमूर्त असूं शकत नाहीं. ती निर्माण करण्याला भौतिक आधार किंवा द्रव्य कांहीं लागतेंच. नुसत्या कल्पनेनें कला निर्माण होत नाहीं. हें द्रव्य तो स्वतःला इंद्रियगोचर झालेल्या परिचित सृष्टींतून व संसारांतूनच घेणार. किंबहुना असा प्रश्न विचारतां येईल कीं कलावंताच्या भोंवतालच्या सृष्टीच्या किंवा संसाराच्या या नाहीं तर त्या अंगाचें प्रतिबिंब ज्यांत उमटलें नाहीं असा, वाङ्मय या नांवाखालीं पडणारा, एक तरी ग्रंथ दाखवितां येईल काय ?

पण यापलीकडे जाऊन प्रतिबिंबित होणारें हें अंग अमूकच असावें असा आग्रह धरणें हा शुद्ध दुराग्रह होय. सिद्धांत प्रतिसिद्धांत किंवा समन्वय यांपैकीं कोणताहि एक विषय घेऊन तो कुशल रीतीनें मांडून त्याला कलाकृति निर्माण करतां येईल.

आज कम्यूनिझमचा वाद घेतला तरी गरिबांचीं दुःखें श्रीमंतांना दूषण देण्याच्या दृष्टीनें जशीं वाङ्मय ग्रंथांत, काव्यांत किंवा चित्रपटांत रंगवितां येतील, तशीं तींच दुःखें एखाद्या श्रीमंताच्या परोपकारबुद्धीचें उदात्त वर्णन ( Sublimation ) करून रंगवितां येतीलच कीं नाहीं ? यांत

फरक पडेल तो फक्त कलावंताच्या प्रवृत्तींतच पडेल आणि ही प्रवृत्ति म्हणजेच त्याची अभिरुचि.

आज कम्यूनिझमचा सिद्धांत डोळयापुढें आहे, म्हणून गरिबांचें दारिद्य सामुदायिक मालकी व व्यवहार यांनाच कलानिर्मितीभूत विषयांचा मक्ता द्यावयाचा कीं काय ? कलावंत हा सभोंवतालच्या अनेकांगीं जीवनाला पारखा असतो ही समजूत चुकीची आहे.

आतां सुस्थितींत वाढलेला व राहिलेला कलावंत हा बहुधा सुखवस्तु समाजांतील मनुष्यस्वभाव रंगवील, तर उलट अगदीं विपन्नस्थितींत वाढलेला व राहिलेला मनुष्य त्या स्थितींतील मनुष्यस्वभाव रंगवील. याचें कारण कलानिर्मितीला सहज हाताशीं मिळणारें भौतिक द्रव्य घेऊन सुखवस्तूंनीं सुखवस्तु समाजाचे गुणदोष व गरिबांनीं गरीब समाजाचे गुणदोष रंगविले तर तीच कला अस्सल ( Native or genuine ) ठरेल. एरवीं फॅशनला बळी पडून उसनें अवसान आणून लिहिलेलें वाङ्मय हें खोटें नाणें ठरतें.

वाङ्मय व समाजजीवन यांचा वास्तविक आहे याहून अधिक संबंध जोडूं पाहणारे लोक हे या फॅशनला बळी पडणारेच होत. मतप्रतिपादन करावयाचें तर तें खुशाल करावें, आणि खऱ्या मनानें केलेल्या ओजस्वी मतप्रतिपादनाला कलेचें स्वरूप येईलहि; कां येऊं नये ? पण विद्यमानच समाजजीवन, त्यांतील विशेषच भाग व त्या भागाविषयीं ठराविकच प्रचलित मतें हीं ज्यांत नाहींत तें वाङ्मय म्हणण्यालाच पात्र नाहीं हा अपसिद्धांत होय.

ज्या कलानिर्मितींतील सौंदर्य त्यांतल्या त्यांत अधिक परिस्थितिनिरपेक्ष, व ज्यांतील स्वारस्य जास्तींत जास्त कालक्रमानें अबाधित, तेंच अधिक श्रेष्ठ यांत शंका कसली ?

शेवटीं कलानिर्मितीला पडणाऱ्या कांहीं स्वाभाविक मर्यादांचा उल्लेख करून हा विषय संपवितों. सुदैवानें या कामीं मला अकल्पित मदत झाली आहे. ती अशी कीं कांहीं महिन्यांपूर्वी टिळक स्मारक मंदिरांत नवमतवाद्यांची म्हणून "कला" या विषयावर चर्चा झाली. त्या प्रसंगीं मी अध्यक्ष होतों.

समारोपाचें भाषण करण्याच्या हेतूनें बसल्या बसल्या मी टिपणें लिहून घेतलीं. तीं आज मजजवळ आहेत. हीं टिपणें रा. पटवर्धन,

रा. सोहनी, रा. महाजनी, रा. डांगे व कु. पानवलकर यांच्या भाषणाच्या वेळीं घेतलेलीं आहेत. त्या टिपणांत वरीलपैकीं कांहीं वक्त्यांनीं कलेच्या मर्यादा स्वयंस्फूर्तीनें सांगितल्या.

त्या दिवशीं अध्यक्ष या नात्यानें समारोपाचें भाषण करण्याला मला वेळ मिळाला नाहीं. पण येथें त्याच मर्यादांचा उल्लेख मी करतों.

माझ्या टिपणांवरून शब्दशः लिहितों. पदरचें कांहीं घालीत नाहीं. त्या मर्यादा खालीलप्रमाणें:—

( १ ) कलेमध्यें हीनत्वाचा दोष नसावा.

( २ ) कलेचा उद्गार हा क्षोभकारक नसावा.

( ३ ) नीतीला उगीच निष्कारण नाक खाजविणारी कला नसावी. ( या ठिकाणीं वक्त्यानें श्री. ना. सी. फडके यांच्या वाङ्मयाचें एक उदाहरण दिलें. )

( ४ ) कलानिर्मितीमध्यें वर्णन—विषयांत प्रसंगासंबंधीं अनौचित्य नसावें.

( ५ ) जिचा सामाजिक दुरुपयोग होण्याचा संभव आहे अशी कलानिर्मिति नसावी. ( येथें वक्त्यानें ओलेतीच्या चित्राचें उदाहरण दिलें होतें. )

( ६ ) तत्कालीन उत्कृष्ट ध्येयवादी भावनांना कलेनें फारसें सोडून दूर असूं नये.

( ७ ) कलेच्या मुळाशीं ध्येयवाद असेल तर तो वाद सफल करणारी अशीच कलाकृति असावी. ( वक्त्याचें म्हणणें असें कीं मोठ्या चांगल्या ध्येयाचा खूप आव आणला किंवा संकल्प सोडला, पण प्रत्यक्ष कलाकृतींत भलतेंच भारूड रचलें, असें होऊं नये. )

( ८ ) कलानिर्मितींत आत्मौपम्य सहसा सुटूं नये. ( चित्र काढणाऱ्या स्त्रीपुरुषानें कला म्हणून नग्न आकृतीचें चित्र काढावयाचें तर मग लोकांचें कां ? त्यांत आपल्या स्वतःच्या व्यक्तीची ओळख लोकांना पडेल असें काढावें ! )

नवमतवादी तरुण वक्त्यांनीं या ज्या मर्यादा कलेला घालण्याकरिता सुचविल्या त्याच मी स्वीकारतों. तेवढ्यानें माझें काम होणार आहे. त्यापलीकडे मी जाऊं इच्छीत नाहीं. स्वातंत्र्य हा कलेचा आत्मा आहे असें म्हणणाऱ्यांपैकींच मीहि एक आहें. पण स्वातंत्र्याला शोभेल असा

कपडा त्याच्या अंगावर बेतावयाचा झाल्यास प्रफुल्ल चित्ताचा नवमतवादी तरुण शिंपी काय व माझ्यासारखा अभ्यासजड सनातनबुद्धीचा जरठ शिंपी काय, दोघांचीं मोजमापें अखेर जवळ जवळ एकच येणार याविषयीं मला खात्री वाटते.

---

# ९ मराठी कविता व यमक

( विविधज्ञानविस्तार नोव्हेंबर १९०९ )

मराठी कवितेसंबंधानें जर विशेष लक्षांत येण्यासारखी कोणती एखादी गोष्ट असेल, तर ती माझ्या मतें 'यमक' ही होय. यमक म्हणजे अर्थात् अंत्याक्षरयमक. कवितेंत रस असो वा नसो, अलंकार असो वा नसो, ती निर्दोष असो वा नसो, यांपैकीं कांहींहि असलें नसलें तरी चालेल; परंतु अंत्याक्षरयमकाशिवाय मराठी कविता ही प्रायः कोणी कधीं न पाहिलेली अगर न ऐकलेली अशी गोष्ट आहे. यमकाचा व मराठी कवितेचा इतका दृढ संबंध कसा व केव्हां जमला, अंत्याक्षरयमकाची वास्तविक योग्यता किती आहे, त्याचे गुणदोष व त्यापासून फायदेतोटे काय आहेत, व उत्तमप्रकारचें यमक कसें असावें, यासंबंधानें जे थोडेसे विचार मला सुचतात, ते साहित्यपरिषदेपुढें मांडावे या हेतूनें हा अल्पप्रमाण निबंध लिहिला आहे. व त्यांतील वादग्रस्त मुद्यांची चर्चा परिषदेच्या बैठकींत अगर अन्यत्र होईल अशी मला उमेद आहे.

वास्तविक, यमक हा एक नुसता गौण प्रतीचा शब्दालंकार आहे, व काव्यास त्याची जरूरी मुळींच नाहीं. आतां काव्यांतहि 'गद्यकाव्य' व 'पद्यकाव्य' असे दोन प्रकार होऊं शकतात. पैकीं पद्यकाव्य हें नियमबद्ध असतें, व अंत्याक्षरयमक असणें हा एक मराठी पद्यकाव्यांचा नियमच होऊन बसलेला आहे. संस्कृतांत यमक हें केवळ अलंकारस्वरूप, म्हणून पद्यांत त्याचा उपयोग ऐच्छिक आहे; मराठींत मात्र त्याचें ऐच्छिकपणाचें स्वरूप जाऊन तें आवश्यक झालें आहे. संस्कृतांत पद्यास आवश्यक असें फक्त वृत्त किंवा छंद हें होय. मराठी पद्यास ज्याप्रमाणें छंद अगर वृत्त, त्याप्रमाणेंच यमकहि अवश्य होऊन बसलें आहे. अनुप्रास हा मात्र संस्कृता-

प्रमाणेंच मराठी कवितेंतहि केवळ शब्दालंकारात्मक व ऐच्छिक असा मानला जातो. शिवाय हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, संस्कृतांत यमक याचा अर्थ केवळ 'अंत्य वर्णाचा पुनरुच्चार' असा नसतां, मराठींत मात्र तो विशिष्ट अर्थ त्या शब्दास चिकटून बसलेला आहे.

'अनुप्रास' म्हणजे वर्णसाम्य. (१) अनुप्रासास स्वरसाम्य नसलें तरी चालतें; फक्त व्यंजनसाम्य पाहिजे. कोणकोणत्या चरणांत, कोणत्या अनुक्रमानें, कोणत्या प्रकारच्या--म्हणजे कोमल किंवा कठोर--व्यंजनाचें साम्य साधलेलें आहे, या अनेकविध विचारांमुळें अनुप्रासाचे पुष्कळ प्रकार होऊं शकतात. भिन्नार्थक अक्षरें (व्यंजन व स्वर यांचा समूह) त्याचे अनुक्रमानें येणें याला 'यमक' म्हणतात. अनुप्रासाप्रमाणेंच वरील कारणांवरून यमक हेंहि अनेकविध होतें. दंडीनें काव्यादर्शांत यमकाच्या अगणित उदाहरणांपैकीं अगदीं थोडीं म्हणून ७७ उदाहरणें दिलीं आहेत. या अनेक प्रकारांपैकीं अंत्याक्षरयमक हा फक्त एक प्रकार आहे.

अनुप्रास काय किंवा यमक काय, संस्कृतांत हे दोन्ही केवळ

---

(१) 'वर्णसाम्यं अनुप्रासः-'— 'अर्थे सत्यर्थभिन्नानां वर्णानां सा पुनः श्रुतिःयमकं'— (काव्यप्रकाश).

'अनुप्रासः शब्दसाम्यं वैषम्येऽपि स्वरस्य यत्'
'सत्यर्थे पृथगर्थायाः स्वरव्यंजनसंहतेः'
'क्रमेण तेनैवावृत्तिर्यमकं विनिगद्यते' (काव्यदीपिका).
'वर्णावृत्तिरनुप्रासः पादेषु च पदेषु च'
'आवृत्तिं वर्णसंघातगोचरां **यमकं** विदुः—
'अव्यपेतव्यपेतात्मा व्यावृत्तिर्वर्णसंहतेः'
'यमकं तस्य पादानां आदिमध्यांतगोचरं'
* 'एकद्वित्रिचतुष्पादयमकानां विकल्पना'
'आदिमध्यांतमध्यांतमध्याद्याद्यंतसर्वतः'
'अत्यंतबहवः तेषां भेदाः संभेदयोनयः'
'सुकरा दुष्कराश्चैव' (काव्यादर्श.)
'तुल्यश्रुतिक्रमाणां अन्यार्थानां मिथस्तु वर्णानां
'पुनरावृत्तिर्यमकं (काव्यालंकार) अ. ३.

शब्दालंकार व म्हणून ऐच्छिक आहेत असें वर सांगितलेंच आहे. परंतु अर्थालंकारहि ऐच्छिकच आहेत. असें असूनहि अर्थालंकार जसे बहुधा काव्यांत सर्वत्र आढळतात तसे अनुप्रास व यमक हीं आढळत नाहींत. त्यांचा उपयोग करणें न करणें हें ग्रंथकर्त्यास प्रिय असलेल्या अगर त्याच्या अंगीं मुरलेल्या रीति (२) (Style) वर अवलंबून राहतें. वैदर्भी, पांचाली, गौडी, लाटी, आवंतिका व मागधी अशा निरनिराळ्या सहा प्रकारच्या रीति म्हणून सांगितलेल्या आहेत. व त्यांपैकीं अनुप्रासप्रियता व यमक-प्रियता या गौडी रीतींत पडतात. गौडी-रीति-विशिष्ट काव्यांत शब्दांचें अवडंबर असावयाचें. अनुप्रास व यमक मिळून या अवडंबराचें एक अंगच होय. गौड प्रांत म्हणजे बंगाल व बुंदेलखंड यांच्या दरम्यानचा, व अयोध्या मिथिला यांच्या दक्षिणेचा प्रांत होय. जुन्या बंगाली कवितेंत यमक नियमतः आढळतें. यावरून गौडी कवितेंत यमक-प्राचुर्य बहुधा असावें असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. आतां मराठी कवितेवरहि याच गौडी रीतीचा परिणाम होऊन यमकाविषयींचा निर्बंध उत्पन्न झाला, अगर त्यास दुसरें कांहीं कारण असावें हा मात्र थोडा संशय-ग्रस्त मुद्दा असून, त्या संबंधाची चर्चा पुढें करण्यांत येईल.

अनुप्रास व यमक यांचे गुण व फायदे उघड आहेत. नीरस काव्याला बचावण्याला जरी तीं असमर्थ असलीं, तरी सरस काव्याला तीं अधिक

(२) 'श्लेषः प्रसादः समता माधुर्यं सुकुमारता
'अर्थव्यक्तिरुदारत्वं ओजः कांतिसमाधयः'
'इति **वैदर्भमार्गस्य** प्राणा दशगुणाः स्मृताः
'एषां विपर्ययः प्रायः दृश्यते **गौडवर्त्मनि**-(काव्यादर्श.)
'ओजः प्रकाशकैर्वर्णैः बंध आडंबरः पुनः'
'समासबहुला **गौडी**'—(काव्यदीपिका.)
'रीतिरात्मा काव्यस्य'-'विशिष्टा पदरचना रीतिः'
'समस्तामुत्कटपदामोजःकांतिगुणान्वितां'
'गौडीयामिति गायंति रीतिं रीतिविशारदाः'
'विदर्भगौडपांचालदेशेषु तत्रत्यैः कविभिः यथा स्वरूपं उपलब्धत्वात् तत्समाख्याः न पुनः देशैः किंचित् उपक्रियते काव्यानां (वा० सू०)

खुलवितात यांत शंका नाहीं. समानवर्णांचा पुनः पुनः उच्चार होण्यापासून एक प्रकारची ' एकतानता ' उत्पन्न होते. संवादित्व हें सर्वत्र ग्राह्यच होय. गाण्यामध्यें ज्याप्रमाणें रागांतील वादी संवादी स्वर पुनः पुनः उच्चारले गेल्यानें गाण्यास सुरेलपणा व स्निग्धता येते, त्याचप्रमाणें अनुप्रास व यमक यांच्या योगानें कवितेस सुरेलपणा येतो. कविता ही सरस्वती देवीची नृत्यभूमि आहे; व या भूमीवरील तिच्या क्रीडेस ज्याप्रमाणें छंद व वृत्तें यांचा ताल, त्याचप्रमाणें अनुप्रासयमकादिकांमुळें मिळणारा सुराचा भरणाहि तिला फार उपकारक होतो. अंत्याक्षरयमकाचा उपयोग एका दृष्टीनें अनुप्रासापेक्षांहि अधिक आहे. प्रवासी ज्याप्रमाणें मधून मधून विश्रांतिगृहामध्यें विश्रांति घेतो, त्याप्रमाणें कविता म्हणणारा हा प्रत्येक चरणाचे अखेरीस विराम पावतो. व जावें त्या धर्मशाळेंत ओळखीचींच माणसें भेटतात असें झाल्यास ज्याप्रमाणें प्रवाशाचा प्रवासखेद नाहींसा होऊन त्यास उत्तेजन येईल, त्याचप्रमाणें कवितेंत पूर्वीच्या चरणाच्या विरामस्थानीं जो वर्णसंघ ( व्यंजन व स्वर ) होता तोच पुढच्याहि चरणाच्या अखेर विरामस्थळीं पुनः आढळल्यास कानाला व कानाच्या द्वारें मनाला आनंद होणें हें स्वाभाविक आहे. आधींच सरस कल्पना; ती सालंकार; ती पुनः छंदोबद्ध; व छन्दाच्या प्रत्येक चरणाच्या शेवटीं सुन्दर यमक साधलेलें—असें असेल तर मग या उत्कर्षपरंपरेला जोडच मिळणार नाहीं. प्रतिभासंपन्न व प्रसादवाणीयुक्त अशा कवींच्या काव्यांत मधून मधून या उत्कर्षपरंपरेचीं उदाहरणें कोणत्याहि भाषेंत सांपडतात.

मासलेवाईक उत्कृष्ट यमक जरी थोडें असतें, तरी यमक हा एक शब्दालंकार आहे, व शरीरालंकारांप्रमाणेंच शब्दालंकाराचीहि गोष्ट आहे. म्हणजे पहिल्या प्रतीचे उत्कृष्ट व उंची अलंकार अंगावर घालण्याचें जरी फार थोड्यांच्या नशीबीं येतें, तरी असा एकहि मनुष्य सांपडणार नाहीं कीं, जो आपल्या ऐपतीप्रमाणें बरावाईट मिळेल तो अलंकार घालीत नाहीं. अलंकारप्रियतेच्या दृष्टीनें, डोक्यावर मुगुट घालणारा सिंहासनस्थ राजा आणि फुटक्या मण्यांची माळ वाकाचे दोरींत ओवून गळ्यांत बांधून रस्त्यानें फिरणारी भिकारीण, हीं दोघेंहि सारखींच होत. शब्दालंकारासंबंधानेंहि तीच गोष्ट प्रत्ययास येते. या अलंकारांवर तत्त्ववेत्त्यांची

दृष्टि कमी असते म्हणून त्यांना शब्दालंकार प्रियच नसतात असें मात्र नाहीं. अर्थहानि न करतां जमल्यास शब्दलालित्य व अनुप्रास साधण्याची हौस अगदीं पहिल्या प्रतीच्या गंभीर ग्रंथकारांमध्येंहि आढळून येते. व असें जर आहे तर ज्यांच्या मनाची संस्कृति कमी आहे अशांना अनुप्रास व यमक यांचा लोभ उत्पन्न झाल्यास नवल मानण्याचें कांहींच कारण नाहीं. यामुळें यमकाचा सर्वत्र प्रसार आपण पाहतों. मराठी कविता बहुधा निर्यमक नाहीं, असेंच म्हटलें तरी चालेल. संस्कृतांत जरी यमक नाहीं तरी अनुप्रासानें ती हानि भरून काढलेली आहे. इंग्रजीमध्यें निर्यमक कविता आहे; तरी यमकी कवितेच्या मानानें ती बरीच कमी. शेक्सपिअरच्या नाटकांतील कविता नियमतः निर्यमक आहे. परंतु मधून मधून, म्हणजे प्रवेशाचा अगर अंकाचा शेवट होण्याची वेळ आली असतां, शेवटच्या दोन ओळी तरी सयमक करून यमक साधण्याची आपली तलफ भागविल्याशिवाय त्यास राहतां येत नाहीं, हें पाहून कौतुक वाटतें व हंसू येतें. ऑथेल्लो नाटकांतील दुसऱ्या अंकाच्या पहिल्या प्रवेशांतील भाषणांतहि थोडथोडें यमक साधलेलें आढळून येईल. जी गोष्ट इंग्रजीची तीच इतर भाषांची. जगांतील प्रत्येक देशांतील काव्याचा बराच भाग; तसेंच प्रत्येक भाषेंतील म्हणी वगैरे अर्धवट कवितेच्या स्वरूपाचे शब्दप्रबंध, या सर्वांमध्यें यमकाचें प्राधान्यच आढळून येईल. यमकानें कविता काय किंवा म्हण काय खुसखुशीत व सुटसुटीत होऊन कानास गोड लागते. यमकापासून दुसराहि एक फायदा असा आहे, कीं तें साधण्याच्या गरजेमुळें एरव्हीं न सुचतील अशा कल्पना सुचतात, व त्यामुळें कल्पनावैचित्र्य उत्पन्न होतें. निर्यमक कवितेपेक्षां सयमक कवितेमध्यें कल्पनावैचित्र्य अधिक असतें. हें या दोन प्रकारच्या कवितांचे मासले पाहिले असतां दिसून येण्यासारखें आहे. यमकामुळें कविता मनुष्याच्या स्मरणांत राहण्यास अधिक पात्र होते हा फायदा अर्थात् गौण आहे तरी विषयपूर्ततेप्रीत्यर्थ तोहि नमूद करणें जरूर आहे.

परंतु या प्रश्नास दुसरीहि एक बाजू आहे. यमकापासून सांगण्यासारखा फक्त एकच तोटा आहे; व तोहि यमकाकडे फाजील लक्ष दिल्यानें होणारा आहे. परंतु यमकाच्या राज्यांत शिरून त्याची सत्ता कवीनें एकदां कां

कबूल केली म्हणजे मग तो त्याच्या दास्यबंधांत इतका जखडून जातो कीं, त्याचा स्वाभिमान राहत नाहीं; टीकाकारांकडून हंसें करून घेण्यासारख्या कृति त्याच्या हातून पावलोपावलीं घडून येतात. व त्यानें स्वाभिमान बाळगलाच तर, यमकाच्या नियमाविरुद्ध बंड करून वाईट यमक साधल्याबद्दल, किंवा त्याजकडे दुर्लक्ष्य व त्याचें उल्लंघन केल्याबद्दल त्यास अपवादाची शिक्षा भोगावी लागते. यमकाच्या राज्यांत या दोहों प्रकारची प्रजा सांपडते.

यमकाच्या फायद्यांवर खूष होऊन व त्याच्या कर्णमधुरतेवर लंपट होऊन ज्यांनीं त्याचें सर्वस्वी दास्य पत्करलें, आणि चांगलें यमक साधण्याचें यश मिळविण्याच्या खटाटोपांत कवित्वाचें स्वारस्य गमावून त्याचा ओघ निरुद्ध करण्यासहि जे तयार झाले, अशांपैकीं मराठी भाषेतील ठळक म्हटले म्हणजे वामन व मोरोपंत हे कवि आहेत. आणि यमकाच्या राज्यांत राहूनहि त्याचें वर्चस्व न मानणारे, व प्रसंगविशेषीं त्याची अवहेलनाहि करणारे, जे थोडे दांडगे कवि मराठी भाषेत आहेत त्यांत माझ्या मतें तुकारामास अग्रस्थान दिलें पाहिजे.

वामन पंडित हा कवीपेक्षां ‘ पंडित ’ या नांवासच अधिक पात्र आहे. त्याच्या कवितेंत प्रतिभेपेक्षां विद्वत्ताच अधिक दिसून येते. परंतु केवळ विद्वत्तेच्या प्राधान्यानें कवितेस रुक्षपणा येतो. वामनपंडिताच्या विद्वत्तेप्रमाणेंच यमकप्रियतेमुळेंहि त्याच्या कवितेस एक प्रकारचा कमीपणा आलेला आहे. वामनपंडितास ‘ यमक्या ’ वामन म्हणतात हें प्रसिद्धच आहे. व यमक साधण्याच्या त्याच्या हौसेमुळें त्याच्या काव्यांत कोठें कोठें क्लिष्टपणा आढळून येईल. तथापि, मोरोपंताची या बाबतींत सर्वांवर ताण आहे, व ‘पोप’ कवीच्या खालील ओळी सर्वांपेक्षां मोरोपंतासच अधिक लागू पडतील.

" While they ring round the same unvaried chimes,
With sure returns of still recurring rhymes,
Wherever you find the ‘ cooling western breeze, ’
In the next line it ‘ whispers through the trees; ’
If ‘ crystal streams with pleasing murmers creep, ’
The reader's threatened not in vain with sleep "

*Essay on Criticism*

मोरोपंत हा जरी लोकोत्तर कवि होऊन गेला, तरी यमकलोलुपतेचें दूषण त्याच्या कवितेस लागलेलें वारंवार आढळून येतें. मोरोपंताइतकें— म्हणजे लाखों ओळी-काव्य लिहिणारास यमकाची नित्य अडचण पडल्यास नवल नाहीं. परंतु ही अडचण असूनहि, दुसरेपक्षीं, भाषा करतलामलकवत् असल्यामुळें या कवीनें मुद्दाम चमत्कारिक यमकेंहि साधण्याची उमेद बाळगली होती; असें दिसतें. या दोन गोष्टींमुळें मोरोपंताच्या कवितेंत यमकाच्या पायीं पावलोपावलीं रसभंग झालेला आढळून येतो. मोरोपंताविषयीं असें सांगतात कीं, फावल्यावेळीं चमत्कारिक यमकाच्या जोडया तो तयार करून भिंतीवर लिहून ठेवी; व मग कविता करण्यास बसला असतां त्या जोडयांचा मधूनमधून उपयोग करी. लक्ष कविता लिहिण्याचा संकल्पच केल्यास अशा प्रकारची तयारी हें एक दूरदर्शीपणाचें लक्षण होय, असें कबूल करण्यास हरकत नाहीं. परंतु या दूरदर्शीपणाच्या गुणानें काव्यांतील रसभंगाचा दोष मात्र टाळतां येत नाहीं इतकेंच नव्हे, तर तो दृढ होतो. कवि यमकाच्या भरीस पडला म्हणजे तें यमक समंधासारखें मागें लागतें, व त्याची क्षुधा तृप्त करण्याकरितां कवीस काव्यगुणांचा बळी पावलोपावलीं द्यावा लागतो; आणि सॅम्युअल बटलर नामक थट्टेखोर इंग्रजीकवीनें म्हटल्याप्रमाणें:—

'One line for rhyme and one for sense.' (Hudibrass) म्हणजे अर्थाकरितां एक ओळ किंवा चरण, व यमकाकरितां दुसरा चरण, अशी कवितेची स्थिति होते. अर्थात् यमकाप्रीत्यर्थ साधलेल्या सर्व ओळी जर काव्यांतून काढल्या तर बाकीच्या काव्याची हानि होत नाहीं, इतकेंच नव्हे तर उलट त्यांतील कल्पनांचा विस्कळितपणा जाऊन काव्यास सुसंबद्धताहि येण्याचा संभव असतो.

असो; वरील आक्षेप मोरोपंताच्या कवितेस कितपत लागतो, हें मोरोपंताचा ग्रंथ चाळतांना अगदीं सहज नजरेला पडणारीं अशीं पांच चार उदाहरणें घेऊन पाहूं. दोन--फार तर तीन--अक्षरांचें यमक साधण्याचा प्रयत्न असतो तोंपर्यंत कसें तरी निभतें. परंतु त्याहून अधिक अक्षरांचें यमक साधण्याचा प्रयत्न कितपत यशस्वी होतो पहा:—

ते गुरुपुत्रादि म्हणति ऊठ त्यागुनि सुयोधना डोहा

धर्मासीं युद्ध करीं होऊत परासु योध नाडा हा.
( गदापर्व, अ. १, आ. ४ )

या ठिकाणीं ' सु यो ध ना डो हा ' हें पंचाक्षरी यमक साधण्याकरितां जवळ जवळ असंबद्ध असा एक चरण दुसऱ्या ओळींत घुसडून द्यावा लागला आहे. या ठिकाणीं ' नाडो ' या शब्दांत कांहींच स्वारस्य नाहीं. व ' होऊत परासु योध ' हें वाक्यहि कल्पनेच्या ओघास विघातक आहे.

साधुसिहि सुखविति कथुनि
परघाताची कथा पिशुन कानीं ।
सुचवुनि तस्कर द्यावी
तुष्टि न द्यावी तथापि शुनकांनीं.
( ग. प. अ. १ आ. १४ )

या ठिकाणीं सहा अक्षरांचें यमक साधण्याच्या खटपटीनें सर्व आर्या किती क्लिष्ट झाली आहे हें वाचकांनीं अर्थ लावण्याचा प्रयत्न करून पाहावें. बहुधा हें यमक भिंतीवर लिहून ठेवलेल्यांपैकीं असावें !

बसला वृषभ कधींहि आपण न म्हणेचि जेंवि मूठ कसा
तैसा सुयोधना तूं आतां होवूं नकोचि ऊठ कसा !
सदर–( आ. ४९ )

यांतील पहिल्या ओळींतील दुसरा चरण, व—

टोप कवच घाल बरें बांध विखुरले सुयोधना केश
घे जें व्हावें तें तूं, सत्वें होतो सुयोध नाकेश.

यांतील चौथा चरण, केवळ यमकाकरितां घुसडून दिलेला आहे.

यें उत्तरा पहाया सांडुनि गाण्यास नाचण्यासहित
केंवि म्हणेल रसज्ञा सोडुनि शालीस नाचण्यास हित
( विराट प. अ. १. आ. १८२ )

यांत दुसऱ्या ओळींतील दृष्टांत केवळ यमकाकरितां दिलेला आहे. तो सहज सुचलेला नाहीं, व असंबद्धहि आहे.

बोल त्रिगर्त राजा ' प्रस्तुत पांडव दशा विराटा हो
प्राप्ताहि त्यजुनि म्हणे न शिखंडीचा परां विरा टाहो.
सदर–( अ. २, आ. २९ )

कोण हा द्राविडीप्राणायाम !

भवदाज्ञेनें बैसो हे दुष्टरथीं वृकोदर गदासी
न हरि प्रसाद कविची आपन्ना खळ वृकोदरगदासी
( वनपर्व अ. ९ आ. १८ )

यमकाचे पायीं ही आर्या क्लिष्ट झाली आहे.

तूं जैंवि देवकीला भेटसि तैसाच भेट आतेला
आम्हांहुनि तूंचि अधिक घृत सोडुनि कोण करिल आ तेला
( उद्योगपर्व )

तूप तेल पिण्याचा दृष्टांत फारसा सरस नसतांहि यमकाचे पायीं पंतांस तो मान्य झाला !

जों जों हाणी खर शर रिपु यवस तारकोपाया
तों तों लागे हळुहळु कमलाधव-सदव तार-कोपाया
( भीष्मपर्व )

यमकाच्या पायीं कोण हा खटाटोप !

धर्माला गांठाया धांवे तो विप्र कटक विसकटुन
वाटे तदेक विशिखाहुनि सिंधुज-गरल-घटकविसकटुन
( द्रोणपर्व )

यमकाचे पायीं शब्दप्रबंधाची केवढी ही ओढाताण !

ज्याच्या श्रीपद दास्यें पावे तोखा सदा रमा जाया
हरितो मना नराचा होऊनि तो खासदार माजाया

हा प्रौढ भाषाप्रभूचा एक पोरखेळच होय !

आतां मोरोपंताचे अनेकाक्षरी यमक साधण्याचे प्रयत्न अनेक वेळां चांगलेहि साधले आहेत हें कबूल करणें भाग आहे; व त्याच्यासारखें भाषाप्रभुत्व फार थोड्या कवींच्या ठिकाणीं सापडेल. परंतु पंतांच्या काव्यांत क्लिष्टपणाचे, दूरान्वयतेचे, असंबद्ध दृष्टांताचे वगैरे जे दोष मधून मधून दृष्टीस पडतात त्यांपैकीं बरेच यमकाच्या लालसेनें घडून आले आहेत हें येथें नमूद करणें जरूर आहे.

दुसरे पक्षीं, तुकाराम, मुक्तेश्वर वगैरेंच्या कविता पहा. त्यांमध्यें बहुधा कोठेंहि यमकामुळें काव्यगुणहानि झालेली आढळून येणार नाहीं. हे कवि

बहुधा एकाक्षर यमक साधतात, व यामुळें यमक सहज साधलें जाऊन कवितेतील शब्दप्रबंधास कृत्रिमपणा मुळींच येत नाहीं. या कवींच्या काव्यांचा ओघ अस्खलित व शुद्ध वाहात असतो, व अशा काव्यांस जातां जातां सहज साधलेलें यमक फार शोभा देतें.

अगदीं निर्यमक अशीहि कविता करावयाची नाहीं व दुसरे पक्षीं यमकांच्या जाळ्यांत गुरफटून जाऊन वर दर्शविल्याप्रमाणें काव्याची कृत्रिमपणानें नासाडीहि करावयाची नाहीं, तर दोहोंमधून मार्ग काढून यमकाच्या दोषांची बाधा होऊं न देतां त्याचा फायदा तेवढा काढून घ्यावयाचा हाच मार्ग श्रेयस्कर दिसतो; व हा मार्ग एकाहून अधिक अक्षरांच्या यमकाची हांव न धरिल्यानें साधण्यासारखा आहे. निर्दोष यमक साधावयाचें तर एक किंवा दोन अक्षरांपेक्षां अधिक अक्षरांचें साधणें बहुधा अशक्यच, असें म्हणावयास हरकत नाहीं. यमक या शब्दाची संस्कृत व्याख्या मागें देतांना **वर्णानाम् पुनः श्रुतिः** असें त्याचें वर्णन आलेलें आहे. व या ठिकाणीं 'वर्णानाम्' असें अनेकवचनी पद जरी योजण्यांत आलेलें आहे, तरी यमक सिद्ध होण्यास 'अनेक' वर्णांचा पुनरुचार झालाच पाहिजे असें मात्र नाहीं. सूत्रभाषेमध्यें लिंगभेद, वचनभेद कडकडीत रीतीनें न पाळला गेला तरी चालतो, म्हणूनच 'वर्णानाम्' असें म्हटलें आहे. वास्तविक फक्त एका वर्णाचा जरी पुनरुच्चार झाला, तरी तें यमक होतें. वर्ण म्हणजे व्यंजन व स्वर यांनीं बनलेलें अक्षर असा अर्थ घ्यावयाचा. नुसतें व्यंजन हें अर्धाक्षर होय, व त्यांत स्वर मिळवून ते पूर्ण अक्षर होतें. मराठीमध्यें शुद्ध व्यंजनें म्हणजे अर्धाक्षरें, यांचा उपयोग फक्त जोडाक्षरांत होतो. स्वतंत्र रीतीनें असा त्यांचा उपयोग बहुधा होत नाहीं. 'विद्वान्' 'शक्तिमान्' वगैरे शब्दांमध्यें अंत्य न् हें शुद्ध व्यंजन व अपूर्णाक्षर असल्यामुळें, व हे शब्द संस्कृतांतून जशाचे तसेच घेतल्यामुळें वास्तविक न् हें अर्धाक्षरच लिहावयास पाहिजे. परंतु संस्कृतांतून येणारें अपूर्ण अक्षर पूर्णाक्षर करून मराठींत घ्यावयाचें असा नियम होऊन बसलेला आहे! यामुळें कवितेच्या अखेर केव्हांहि संपूर्ण अक्षरच येतें. नियमाप्रमाणें यमक सिद्ध होण्यास एका ओळीच्या शेवटल्या अक्षरांतील व्यंजन व स्वर या दोहोंचाहि पुनरुच्चार दुसऱ्या ओळीच्या शेवटीं झाला पाहिजे. आणि कवीनें

एकाक्षरी यमकावर संतुष्ट न राहतां आणखीहि जरी किती अक्षरांचें यमक साधलें तरी त्या अक्षरांतील व्यंजन व स्वर या दोहोंचाहि पुनरुच्चार झाला पाहिजे. कारण नुसत्या व्यंजनांचा पुनरुच्चार होणें यास अनुप्रास म्हणतात, व व्यंजन आणि स्वर म्हणजे पूर्णाक्षर याच्या पुनरुच्चारास यमक म्हणतात. ज्याप्रमाणें संपूर्ण अक्षराचा उच्चार झाला पाहिजे, त्याप्रमाणेंच खऱ्या यमकास दुसरीहि एक अट आहे; ती ही कीं, पहिलीं व पुनरुच्चारित अक्षरें दोन्ही एकच अर्थाचीं असूं नयेत. एकाक्षरी शब्द फार कमी, यामुळें कमींत कमी दोन अक्षरें साधल्यास यमक चांगलें होतें. निदान उपांत्य स्वर व अंत्याक्षर ( स्वर व व्यंजन ) यांची पुनरावृत्ति झाली पाहिजे. तसेंच यमकाचीं हीं पदें ' व्याकरणदृष्ट्या निरनिराळे पदार्थ ' अशा स्वरूपाचीं असावीं. म्हणजे उदाहरणार्थ, पहिल्या ओळींतील शेवटला शब्द जर क्रियापद असेल, तर दुसऱ्या ओळींतील शेवटला शब्द हा नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियाविशेषण यांपैकीं एकादा असावा; होतां होई तों क्रियापदच असूं नये. मूळ क्रियापद वेगळें असलें तरी प्रत्यय तोच असणार. तसेंच पहिल्या ओळीच्या शेवटीं विभक्ति लागून झालेलें नामाचें रूप आल्यास दुसऱ्या ओळींतहि तशाच प्रकारचें पद येणार. परंतु क्रियापद किंवा नाम यांच्या फक्त प्रत्ययांचा पुनरुचार फारसा स्वारस्यकारक होत नाहीं. व शेवटीं प्रत्यय येतील तर ते वगळून शिवाय निदान एक किंवा दोन उपांत्य अक्षरांचें यमक साधलें तरच प्रत्ययपुनरुच्चाराचा दोष नाहींसा होऊं शकतो. या संबंधानें खुलाशाकरितां एखादें उदाहरण घेऊं म्हणजे वरील विधानें स्पष्ट होतील:—

त्वां वधिला नागायुत बळ दुष्ट हिडिंब तद्विगुण **बक रे** ।
किर्मीर तच्चतुर्गुण खळ सकळहि तुज वृका जसें **बकरें** ॥

या आर्येंत पहिल्या ओळीमध्यें **रे** हा संबोधनात्मक एकाक्षरी शब्द आला असून दुसऱ्या ओळींत **बकरें** हें नाम आलेलें आहे, यामुळें हें यमक ग्राह्य होय. परंतु दुसऱ्या ओळींत समजा, ' सुबक रे ' असे दोन शब्द शेवटीं आले असते तर ' बक ' हें नाम व ' सुबक ' हें विशेषण असल्यामुळें यमकाचा चांगला योग आला असतांहि ' रे ' हाच संबोधनात्मक शब्द दोन वेळां आल्यामुळें तें यमक अग्राह्य होईल.

तोहि तुवां वधिला जो खळगणनीं प्रथम कीचक **लिहावा** ।
अंधज अंधक हर हो तूं पुण्यश्लोक नीच कलि **हा वा** ॥

या आर्येत पहिल्या ओळींत **लिहावा** हें क्रियापद व दुसऱ्या ओळींत **हा** हें सर्वनाम आणि **वा** हें उभयान्वयी अव्यय असल्यामुळें हें यमक असावें तसें आहे. परंतु तेंच '**हा**' '**वा**' याच्या ठिकाणीं 'पाहावा' हें क्रियापद असतें तर यमक साधलें असें म्हणतां आलें असतें, तरी तें तितकें ग्राह्य झालें नसतें. तसेंच पहिल्या ओळींत 'क्रूर' हा शब्द आला असून दुसऱ्या ओळींत 'किर्मीर' असा शब्द आला तर व्याकरणदृष्ट्या हे दोन पदार्थ वेगळे असतां व अंत्य 'र' चा पुनरुच्चार झाला असतांहि तें यमक तितकें ग्राह्य मानिलें जाणार नाहीं. कारण, चांगलें यमक होण्यास अंत्यवर्ण 'र' व उपांत्य स्वर 'ऊ' या दोहोंचाहि पुनरुच्चार होणें इष्ट आहे. पहिल्या ओळींत शेवटीं 'काय' हा प्रश्नार्थक शब्द आला असतां, दुसऱ्या ओळींत 'शरीर' ह्या अर्थी 'काय' हें नाम आलें असतां अक्षरें तींच असून त्यांचा अर्थ व त्यांचें व्याकरण वेगळें असल्यामुळें, हें उत्तम यमकाचें उदाहरण म्हणण्यास हरकत नाहीं. इंग्रजीमध्येंहि यमकाचे जवळ जवळ असेच नियम आहेत. इंग्रजींत वर्णसंयोग होत नाहीं. तर शब्दांतील सर्व वर्ण एकापुढें एक मांडले जातात. उदाहरणार्थ—करण हा शब्द इंग्रजींत लिहावयाचा असतां "क् अ र् अ ण् अ" इतकीं अपूर्णाक्षरें म्हणजे तद्दर्शक मूलवर्ण व स्वर लिहावे लागतात. या अक्षरसमुच्चयामध्यें विभाग पाडावयाचे ते स्वरामुळें पडतात आणि एक स्वर व एक किंवा अनेक व्यंजनें मिळून एक पद तयार होतें. या पदास Syllable (सिलेबल) असें म्हणतात. यमकासंबंधानें इंग्रजींतील नियम असा आहे कीं, ज्या Syllable वर उच्चाराचा जोर पडून शब्दाचा विभाग झालेला आहे अशा स्वरापासून पुढें ओळ संपेपर्यंत जितकीं अक्षरें येतील, त्या सर्वांचा त्याच क्रमानें पुनरुच्चार दुसऱ्या ओळींत झाला तरच यमक साधलें असें म्हणावयाचें. उदाहरणार्थ, 'लर्न, फर्न, डिसर्न' या शब्दांचें यमक साधतें. कारण, यांमध्यें 'अर्न' एवढा भाग साधारण असून त्यांत उपांत्य स्वर व अंत्याक्षर यांचा पुनरुच्चार मराठींतहि होतो. अर्थात् याच शब्दाचें यमक साधण्यास हरकत नाहीं. परंतु इंग्रजी यमकांचा आणखीहि एक विशेष असा

आहे कीं, उपांत्य स्वराच्या मागें कांहीं अंतरावर जर उच्चाराचा जोर पडत असेल तर ज्या व्यंजनावर तो जोर पडत असेल तेथपासून ओळीच्या अखेरपर्यंतच्या सर्व वर्णांचाहि पुनरुच्चार झाला पाहिजे. उदाहरणार्थ, 'पझेस' व 'रिसेस' हे दोन शब्द समानान्त आहेत. एवढेंच नव्हे तर उपांत्यस्वर ए याचाहि पुनरुच्चार होत आहे. परंतु 'रिसेस' व 'पझेस' या दोन शब्दांमध्यें उच्चाराचा जोर अनुक्रमें स व झ या व्यंजनांवर पडत असल्यामुळें, आणि स व झ हे वर्ण समान नसल्यामुळें हे दोन शब्द यमकास योग्य होत नाहींत.

इंग्रजींतहि यमक तीन तीन चार चार पदांपर्यंत जाऊं शकतें. परंतु जितकीं यमकित पदें पुष्कळ तितकें यमक साधणें अवघड होतें; व उच्चाराच्या जोराच्या शेवटच्या स्थलापासून अखेरपर्यंत यमक हवें असा इंग्रजींत नियम असल्यामुळें, कित्येक वेळीं तीन तीन चार चार अक्षरांचीं यमकें नियमाकरितां साधावीं लागतात. इंग्रजींत गंभीर विचारात्मक कवितेंत साधारणतः एक-वर्ण यमक असतें. पण केवळ यमकांकरितां वेडीवांकडी शब्दरचना करणें हें फक्त विनोदात्मक कवितेमध्यें चांगलें उपयोगीं पडतें. बटलरच्या 'ह्युडिब्रास' नामक काव्यांत व थामस हूडच्या कवितेंत अशा तऱ्हेचीं विनोदी यमकें बरींच आढळतात.

आतां शेवटीं मराठीमध्यें अंत्याक्षर यमक कसें आलें असेल याचा थोडासा विचार करूं. यमक हें मराठी भाषेच्या उत्पत्तीपासूनच भाषेंत स्वयंभू आहे, अगर या भाषेच्या इतिहासांत मध्येंच केव्हांतरी परभाषा-संसर्गामुळें तें आंत आलें, हा एक वादग्रस्त मुद्दा आहे. मराठी भाषेचें उत्पत्तिस्थान संस्कृत व प्राकृत भाषा या होत. पैकीं संस्कृत भाषेंत यमक रूढ नाहीं. साहित्यशास्त्रांत फक्त यमकपरामर्ष आहे; परंतु यमक हें केवळ गौणशब्दालंकारात्मक असून तें ऐच्छिक आहे. संस्कृत कवितेला जे नियम म्हणून आहेत ते फक्त छंद व वृत्त यासंबंधानें आहेत. अमुक छंदास अमुक गण असावे, अमुक गणांत अमुक इतक्या मात्रा असाव्या, व ऱ्हस्व-दीर्घ स्वर अमुक क्रमानें यावे, हे नियम पिंगलकृत छंदःशास्त्रांत व इतर कित्येक ग्रंथांत सांगितलेले आहेत. कविता छंदोबद्ध असावी, हा संस्कृतांतील नियम जवळ जवळ अनादि आहे. व वेदांतील ऋचाहि छंदोबद्धच आहेत. परंतु छंदःशास्त्रांत काय किंवा साहित्यशास्त्रांत काय, कवितेस यमक असलेंच

पाहिजे असा नियम कोठेंहि नाहीं. अगदीं लहानशा अनुष्टुप्वृत्तांत रच-लेल्या स्फुट श्लोकांपासून तों महाकाव्यापर्यंत कोठेंहि पहा, यमक नियमतः अनुसरलें गेलें आहे, असें कोठेंहि सांपडणार नाहीं. आतां महाकाव्यांत संस्कृतभाषाप्रभूंनीं आपलें भाषाप्रभुत्व सिद्ध करण्याकरितां मधून मधून केवळ लीलेखातर शब्दचित्रात्मक कविता एकाददुसऱ्या सर्गांत घातलेली आढळते. उदाहरणार्थ, कालिदासानें रघुवंशाचे नवव्या सर्गांत, तसेंच भारवीनें किरातार्जुनीय नांवाच्या महाकाव्याच्या पंधराव्या सर्गांत, शब्द-चमत्कार दाखविले आहेत तथापि हे श्लोक केवळ ' वाणगी ' दाखलच असतात. त्यांचा प्रचार सार्वत्रिक अगर नियमबद्ध असत नाहीं.

आतां कित्येक स्फुट संस्कृत कवितांतून अंत्ययमक साधल्याचीं उदाह-रणेंहि कोठें कोठें दिसून येतात. उदाहरणार्थ, श्रीशंकराचार्यकृत द्वादशपंज-रिका व चर्पटपंजरिका नांवाचीं दोन स्तोत्रें असून त्यांत अंत्याक्षरयमक साधलेलें आहे. परंतु कित्येक लोकांच्या मतें हीं स्तोत्रें खरोखर आद्य शंकराचार्यकृत नसून त्यांच्या गादीवर अधिष्ठित झालेल्या एकाद्या अर्वा-चीन आचार्याचीं असावीं. आम्हांस असें वाटतें कीं, हीं स्तोत्रें देशी भाषेंत यमक रूढ झाल्यानंतर संस्कृत कविता करणाऱ्या कोणा भाविक अगर हौशी पंडितानें रचलेलीं असावीं. तसेंच कित्येक संस्कृत कवितांमध्यें व स्तोत्रांमध्यें निरनिराळ्या शब्दांचीं एकाच विभक्तीचीं रूपें कवितेच्या प्रत्येक चरणाचे शेवटीं असल्यामुळें कवीनें तेथें यमक अनुसरलें आहे असा भास होतो. उदाहरणार्थ, शंकराचार्यांच्या नांवावर शिवपंचाक्षरपंचक नांवाचें स्तोत्र मोडतें, त्यांत चतुर्थी विभक्तीचा प्रत्यय ' य ' लावून शंकराचीं निरनिराळीं अनेक नांवें दर्शविणाऱ्या शब्दांचीं रूपें आलीं आहेत. परंतु त्यावरून ती यमकी कविता होत नाहीं.

प्राकृत व अपभ्रष्ट भाषांसंबंधानेंहि तीच गोष्ट आहे. पाली ही संस्कृत भाषेची शाखा मानिली, किंवा स्वतंत्र प्राकृत भाषा मानिली, तथापि तिजमध्यें अंत्य यमक नाहीं. या भाषेमध्यें बुद्धधर्मीय पुष्कळ कविता संग्रहित आहे, व तसेंच या भाषेंत एक दोन महाकाव्येंहि आहेत. परंतु त्यांत यमक कोठेंहि नाहीं. तसेंच जैनग्रंथकारांच्या कवितेमध्येंहि यमक नाहीं असें म्हणतात. प्राकृत भाषेंत ' गौडवध, ' ' सेतुबंध, ' ' गाथा सप्तशती, ' वगैरे काव्यांत व उपलब्ध प्राकृत नाटकांतील पद्यांमध्यें अंत्य

यमक आढळत नाहीं. कित्येक ठिकाणीं चरणाच्या अखेर नामाचीं एकाच विभक्तीचीं रूपें अगर क्रियापदाचीं एकाच लिंगवचनाचीं व काळाचीं रूपें असल्यामुळें यमक साधल्याचा भास होतो. उदाहरणार्थ, 'ओ' कार हा कित्येक प्राकृत भाषांमध्यें पुल्लिंगी प्रथमा विभक्तीचा प्रत्यय असतो, परंतु 'ओ' हा अशा ठिकाणीं फक्त संस्कृतांतील विसर्गादाखल असतो. व नुसता विसर्ग किंवा दुसरा कोणताहि एकेरी स्वर यांच्या पुनरावृत्तीनें यमक होत नाहीं.

कोणच्याहि संस्कृत नाटकांत आलेले प्राकृत श्लोक सयमक असलेले माझ्या पाहण्यांत नाहींत. नाहीं म्हणावयास फक्त विक्रमोर्वशीय नाटकाच्या कित्येक आवृत्त्यांमध्यें, चौथ्या अंकांत कांहीं प्राकृत श्लोक सयमक असलेले असे आढळतात. परंतु हा एकच अपवाद दिसून येत असून, ते श्लोक प्रक्षिप्त आहेत असा त्यांजबद्दल असलेला वादहि येथें ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. कै. शंकर पांडुरंग पंडित यांनीं संपादलेल्या विक्रमोर्वशीय नाटकांत हे श्लोक अग्राह्य मानून परिशिष्टांत त्यांचा नुसता उल्लेख केला आहे. व त्या नाटकाच्या प्रस्तावनेंत ते श्लोक अग्राह्य कां मानावयाचे याचीं सयुक्तिक कारणेंहि दिलेलीं आहेत. आतां प्रस्तुतच्या विषयाशीं हे श्लोक प्रक्षिप्त किंवा अप्रक्षिप्त या बादाचा प्रत्यक्ष कांहीं एक संबंध नाहीं; ते प्रक्षिप्त असले अगर नसले तरी ते प्राकृत भाषेंत असून सयमक आहेत एवढीच गोष्ट काय ती या ठिकाणीं मुद्याची आहे. परंतु त्यांचें प्रक्षिप्तत्व खरें नसल्यास त्या गोष्टीचा प्रस्तुत वादाशीं अप्रत्यक्ष संबंध येऊं शकतो, व तो असा. सदरहू श्लोक प्रक्षिप्त असले तर ते कोणच्या शतकांत लिहिले गेले असा प्रश्न उद्भवतो. व जर त्यांचा काळ महाराष्ट्री भाषेंत सयमक अशी कविता सुरू झाल्यावरचा असेल तर मग प्राकृतांत यमक आहे हें न ठरतां, फक्त एवढेंच ठरेल कीं मराठींतील सयमक कविता रूढ झाल्यानंतर ते प्राकृत श्लोक कोणी तरी रचल्यामुळें अर्थातच मराठींतील यमक त्यानें या प्राकृत श्लोकांसहि लाविलें. रा. ब. पंडितांनीं हे श्लोक अग्राह्य मानतांना चार पांच कारणें दिलीं आहेत. ते म्हणतात, (१) विक्रमोर्वशीयावरील मूळ टीकाकार 'काटवेम' याला हे प्राकृत श्लोक माहितहि असल्याचें दिसत नाहीं. त्यानें बाकी सर्व भाषणांची छाया दिलेली आहे. व हे श्लोक असते तर तो ते वगळताना. (२) पंडित यांनीं जमविलेल्य

आठांपैकीं ६ हस्तलिखित प्रतींत ते श्लोक नाहींत. ( ३ ) हे श्लोक राजानें म्हणण्याचे म्हणून दिलेले आहेत. परंतु राजानें म्हणण्याचे दुसरे संस्कृत श्लोक असतांना हे आणखी प्राकृत देण्याचें प्रयोजन नाहीं. शिवाय राजा हा ‘ उत्तम ’ पात्र असून ‘ अधम ’ पात्राप्रमाणें त्याचे तोंडीं प्राकृत श्लोक कालिदास कसा घालील ? ( ४ ) हे श्लोक बहुधा दुसऱ्या संस्कृत श्लोकांचे अनुवादक आहेत; व समानार्थक श्लोक प्राकृतांत निराळे कोणी घालणार नाहीं. ( ५ ) कित्येक श्लोकांतील रचना तृतीयपुरुषी आहे. पण प्रसंग सर्व श्लोक राजानें प्रथमपुरुषीं आत्मगत म्हणण्याचे आहेत. ( ६ ) हे सर्व श्लोक काढून टाकले तरी कोठें खंड पडला अगर असंबद्धता आली असें दिसत नाहीं, एवढेंच नव्हे तर ते राहूं दिल्यानें मात्र नाटकांतील राजाच्या भाषणाच्या ओघास पावलोपावलीं निरोध झाल्यासारखा वाटतो. हीं सर्व कारणें बलवत्तर आहेत व म्हणून हे प्राकृत श्लोक प्रक्षिप्त व अग्राह्य मानण्यास हरकत नाहीं. आतां हे जर प्रक्षिप्त तर ते केव्हां लिहिले गेले असावे हा प्रश्न राहतोच. व या संबंधानें आम्हांस असें वाटतें कीं, मराटी भाषेंत यमकी कविता रूढ झाल्यानंतर हे श्लोक लिहिले गेले असावे. निरानिराळ्या देशी भाषा रूढ झाल्यानंतरहि प्राकृत गद्य पद्य लिहिण्याचा प्रचार जीवंत होता. प्राकृत ही पूर्वीं केव्हांहि बोलण्याची भाषा असली अगर नसली तरी सहाव्या अगर सातव्या शतकाचे सुमारास ती मृतप्राय झाली होती. व यानंतर प्राकृतांत कोणीं कांहीं लिहिलें तर तें, आज मराठी ही बोलण्याची भाषा असूनहि ज्याप्रमाणें विद्वान् संस्कृतज्ञ लोक संस्कृत श्लोक रचतात त्याप्रमाणें, एखाद्या Classical भाषेंत लिहिण्याच्या केवळ हौसेमुळें हे प्रक्षिप्त श्लोक प्राकृतांत कोणीं तरी लिहिले असावे. रा. ब. पंडित यांनीं मिळविलेलीं विक्रमोर्वशीय नाटकाचीं हस्तलिखितें दोन तीनशें वर्षांपलीकडचीं नाहींत. ज्या हस्तलिखित प्रतींत हे प्रक्षिप्त श्लोक आहेत ती प्रत बनारसेकडील आहे. दक्षिणेकडील म्हणजे तेलगू प्रांताकडील हस्तलिखितांत हे प्रक्षिप्त श्लोक नाहींत. बनारसेकडील देशी भाषेंत ( हिंदींत ) यमक आहे, तेलगू तामील भाषेंत अंत्य यमक नाहीं. व यावरून असेंहि वाटतें कीं, हे ( रंगनाथ टीकाकार–पठित ) प्रक्षिप्त प्राकृत श्लोक महाराष्ट्र अगर उत्तरहिंदुस्थान, म्हणजे जेथें अंत्य यमकाचा प्रचार आज निदान सातआठशें वर्षांवर आहे अशा प्रांतांत,

मराठी अगर हिंदी भाषांचा सर्रास प्रचार झाल्यावर मग केव्हां तरी प्राकृतांत रचले गेले असावे. (*)

सर्वच संस्कृत नाटकें संस्कृत ही जीवंत भाषा असतांना लिहिलीं गेलीं आहेत असें नाहीं. त्यांपैकीं बरींच अशा वेळीं लिहिलीं गेलीं असलीं पाहिजेत कीं त्या वेळीं बोलण्याची व व्यवहाराची भाषा संस्कृत नसून प्राकृत असेल. अर्थात् संस्कृत व प्राकृत या दोन्ही भाषेंत अंत्य यमक नसल्यामुळें, संस्कृताचा व प्राकृताचा अंमल असलेल्या काळांत लिहिल्या गेलेल्या नाटकांत प्रत्यक्ष प्राकृत श्लोक कोठेंहि सयमक आढळले तर ते मराठी, हिंदी वगैरे भाषांचा अंमल झालेल्या काळांमध्यें व अशा देशांत लिहिले गेले असावे हेंच अनुमान दृढ होतें.

आसपासच्या देशी भाषांकडे पाहावें तरीहि तीच स्थिति दिसून येते. कानडी भाषेमध्यें कांहीं संस्कृत वृत्तें व कांहीं अस्सल कानडी वृत्तें आहेत. वृत्तांत तीन चार किंवा सहा ओळी असतात, व दोन्ही प्रकारच्या वृत्तांसंबंधानें यमकाचा नियम असा आहे कीं, कवितेच्या प्रत्येक ओळींतील दुसरें अक्षर यमकित असलें पाहिजे. हें फक्त एकाक्षरी यमक चालतें. कानडी यमकाला व्यंजन तेंच असावें लागतें. व स्वर यमकासंबंधानें असा नियम आहे कीं, ऱ्हस्वस्वर ऱ्हस्वस्वराशीं व दीर्घस्वर दीर्घस्वराशीं

---

* "The fourth ground of suspicion is that Prakrit continued to be written long after it had ceased to be vernacular. This is undeniable. And in assessing the value of any Prakrit work, we have to bear its age in mind as an important consideration. If to hazard a guess a prakrit work belongs to this side of the 6th or 7th century A. D. its value as a vernacular work is considerably less than if it comes from an earlier date. And the nearer we come to our own times, the more must a Prakrit composition be supposed to be written in a dead language like Sanskrit, indeed more dead, because after they ceased to be understood as vernaculars, the prakrits have been less studied and understood than Sanskrit."

रा. ब. शंकर पांडुरंग पंडित यांची गौडवध नामक काव्याच्या आवृत्तीची प्रस्तावना पहा. पान ९१.

यमकित होतो. उदाहरणार्थः—पहिल्या ओळींत ' अ ' हा स्वर आला असल्यास पुढील प्रत्येक चरणांत ' अ ' किंवा ऱ्हस्व ' इ ' ऱ्हस्व ' उ ' ' ए ' अगर ' ओ ' हे स्वर आले तरी चालतात, व त्यांचें यमक होतें. तसेंच पहिल्या चरणांत ' आ ' हा स्वर द्वितीय अक्षराच्या ठिकाणीं आला असतां पुढील ओळीमध्यें ' आ ' अथवा दीर्घ ' ई ' दीर्घ ' ऊ ', ' ऐ ' अगर ' औ ' यांपैकीं कोणचाहि स्वर आला तरी यमक साधतें. परंतु कानडी भाषेंत फक्त द्वितीय अक्षराबद्दलच नियम आहे, अंत्ययमक मुळींच नाहीं, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. उदाहरणार्थ—

रवि आकाशके भूषणं रजनिगं चंद्रं महाभूषणं ।
कुवरं वंशके भूषणं सरसिगं भोजातगळ भूषणं इ०

यांत पहिल्या ओळींतील ( वि ) व दुसऱ्या ओळींतील ( व ) यांचें यमक आहे. अथवा—

बंधु गळिल्लद बदुकुं । तंदुद तानुब्बल्लुडु मुगिस बदुकुं ।
हिंदनु मुंदनु तिळियदे । निंदगे गुर्यागु तिर्पे बदुकुं व्यर्थं ।

यांत ( बंधु ) व ( तंदु ) आणि ( हिंद ) व ( निंद ) हीं यमकें आहेत.

तामील भाषेमध्यें दोनपासून बत्तीस ओळींपर्यंत वृत्ताचे चरण असतात, व वृत्तें कांहीं संस्कृत व कांहीं तामील अशीं आहेत. परंतु कवितेंत यमक नसून अनुप्रासासंबंधीं मात्र कांहीं नियम आहेत. परंतु हा अनुप्रास साधण्यास बरोबर तेंच अक्षर म्हणजे व्यंजन व स्वर यावा लागत नाहीं. तर ' क ' वर्ग ' च ' वर्ग—याप्रमाणें वर्णमालेचे निरनिराळे गण ठरविलेले आहेत, व त्या गणांपैकीं कोणतेंहि अक्षर आलें तरी अनुप्रास साधतो. परंतु यमक किंवा अनुप्रास ही अंत्याक्षराचाच साधला पाहिजे असा तामील भाषेंत नियम नाहीं.

तेलगू भाषेंत जाति उपजाति व वृत्त असे छंदांचे निरनिराळे प्रकार आहेत. या प्रत्येक छंदाच्या प्रकारांत ज्यास आपण वृत्तें म्हणतों अशा शब्दप्रबंधरीती असतात. व या प्रत्येक रीतीसंबंधानें अनुप्रास व यमक हें प्रत्येक ओळींत अगर निरनिराळ्या ओळींत कितव्या अक्षरावर व कोणत्या प्रकारानें साधलें जावें, याबद्दल निरनिराळे नियम आहेत. उदाहरणार्थ, ' जाति ' मध्यें ' कंद ' नांवाचें उपवृत्त आहे. यांत असा नियम आहे कीं, पहिल्या ओळींतील पहिलें अक्षर व दुसऱ्या ओळीच्या तिसऱ्या गणां-

तील पहिलें अक्षर--म्हणजे व्यंजन अगर स्वर-हीं दोन्हीं एकच पाहिजेत. वृत्ताखालीं ' चंपक ' नांवाचें एक ' उपवृत्त ' आहे, त्याचा नियम असा आहे कीं, प्रत्येक चरणांतील पहिलें अक्षर त्याच ओळींतील अकराव्या अक्षराशीं मिळतें असलें पाहिजे. ' उपजातीय ' वृत्तांपैकीं ' तेटगीता ' नांवाच्या उपवृत्ताचा असा नियम आहे कीं, प्रत्येक चरणांतील पहिलें अक्षर तेंच व यमकाच्या लक्षणाचें पाहिजे. व प्रत्येक ओळींतील दुसरें अक्षर अनुप्रासाच्या स्वरूपाचें असलें पाहिजे; म्हणजे व्यंजन तेंच नसून त्याच्या गणापैकीं दुसरें एकादें असलें तरी चालतें.

आतां महाराष्ट्राच्या उत्तरेकडील प्रदेशांतील भाषा लक्षांत घेतल्या असतां असें दिसून येतें कीं, त्यांत मात्र बहुधा अंत्याक्षर यमक आहे. इंग्रजीचा अंमल होण्यापूर्वींच्या बंगाली कवितेंत अंत्याक्षर यमक होतें. परंतु अलीकडे नूतन बंगाली कवींनीं निर्यमक कविता करण्याचा प्रघात पाडलेला आहे. पन्नास वर्षांपूर्वी बंगाल्यामध्यें ' मायकेल मधुसूदन दत्त ' नांवाचा कवि होऊन गेला. त्यानें ' मेघनादवध ' नांवाचें एक महाकाव्य लिहिलें आहे. तें निर्यमक आहे. व तेव्हांपासून बंगाल्यामध्यें स्फुट कविता प्रायः सयमक, व मोठीं काव्यें प्रायः निर्यमक करण्याचा प्रघात आहे. तथापि बंगाली कवींनीं या बाबतींत आपणांस कोणत्याहि प्रकारचें नियमांचें बंधन म्हणून ठेवून घेतलेलें नाहीं. साधारणतः असें म्हणतां येईल कीं, बंगाली यमक इंग्रजी यमकांचे धर्तीवर आहे. स्फुट व ललितस्वरूपी कविता ( Lyric ) सयमक असते. व गंभीर वर्णात्मक काव्यें व महाकाव्यें निर्यमक ( अमित्राक्षर ) असतात.

हिंदी भाषेमध्यें अंत्याक्षरयमकाविषयीं नियमच आहे. व या भाषेंतील दोहऱ्यांपासून तुळसीदासकृत रामायण महाकाव्यापर्यंत सर्व तऱ्हेच्या कवितेमध्यें अंत्याक्षर यमक असलेलें आढळतें.

गुजराथींत बंगालीप्रमाणेंच नियमतः अंत्याक्षरयमक साधलेलें असतें, व अमित्राक्षर कविता ही बहुधा अपवादादाखल आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि आधुनिक गुजराथी कवींची प्रवृत्ति यमकापासून स्वतंत्र होण्याची दिसते.

उर्दूभाषेंत यमक नियमित असतें. व या नियमास बहुधा अपवाद

नसावा असें वाटतें. * पर्शियनमध्यें अनुप्रास व यमक यांतील भेदाप्रमाणेंच रदीफ व काफिया असा भेद आहे. रदीफ हा अनुप्रासात्मक असून काफिया हा यमकात्मक आहे. मराठीप्रमाणेंच पर्शियनमध्यें अंत्याक्षर व उपांत्यस्वर यांचा पुनरुच्चार झालाच पाहिजे.

वरील सर्व विवेचनावरून मराठींतील अंत्याक्षर यमकाच्या उत्पत्तीविषयीं मनाचा निर्णय करण्यास मदत होईल असें वाटतें. ज्याअर्थी संस्कृत व प्राकृत या भाषांमध्यें अंत्याक्षर यमकाचा नियम नाहीं व तें अत्यंत विरळ आहे, त्याअर्थी मराठींतील यमक संस्कृत व प्राकृत यांतून आलें नसावें असें दिसतें. तसेंच दक्षिण हिंदुस्थानांतील कित्येक भाषांतून अनुप्रास व यमक दोन्ही आहेत, परंतु अंत्याक्षर यमक नाहीं. संस्कृत व प्राकृतभाषांशीं संबंध नसलेला हा दक्षिणी भाषांचा वर्ग आहे, आणि कानडी व तेलगू या भाषांचा व मराठी भाषेचा संबंध फार पुरातन काळापासूनचा आहे. परंतु याही भाषांतून मराठीनें यमक घेतलेलें नाहीं असें उघड होतें. मराठीचें कानडी व तेलगू भाषांशीं सान्निध्य असल्यामुळें, आणि तेलगू व कानडी बऱ्याच जुन्या असून जुन्या काळीं त्यांच्यामध्यें कवितासंग्रह बराच असल्यामुळें, या कवितांमधून जर अंत्ययमक असतें, तर या द्वारानें तें मराठींत आलें, असें वाटणें कदाचित् सयुक्तिक झालें असतें. परंतु या कल्पनेस जो मूळाधार--म्हणजे अंत्ययमक--तेंच कानडी व तेलगू भाषांमध्यें नाहीं, यावरून तशा प्रकारची कल्पना निर्मूळ ठरते.

आतां दुसरे पक्षीं बंगाली, गुजराथी वगैरे भाषांमधून अंत्ययमक आढळतें, एवढ्यावरून काय अनुमान काढतां येण्यासारखें आहे, हें आपण पाहूं. मराठी ही जशी एक प्राकृतोद्भव भाषा आहे, त्याचप्रमाणें तिच्या सान्निध्यास असलेल्या गुजराथी, रांगडी, व्रज, बंगाली, हिंदी वगैरे तिच्या शेजारिणीहि प्राकृतोद्भवच आहेत. या सर्वच भाषांचा जन्म अलीकडील दीड हजार वर्षांत झालेला असून, त्या सख्या नाहींत, तरी बहुधा समवयस्क चुलत बहिणी आहेत, असें मानण्यास हरकत नाहीं. तथापि मराठीनें आपलें अंत्याक्षर यमक या आपल्या एखाद्या बहिणीकडून अनु-

* शेर म्हणून उर्दूमध्यें आर्यावृत्तासारखें वृत्त आहे. यांतील कवितेस मात्र यमक नाहीं असें म्हणतात.

छंदानें घेतलें असें एकदम म्हणवत नाहीं. व तें तसें जरी घेतलेलें असलें असें मानिलें, तरी त्या भाषांमध्यें तरी संस्कृतांत व प्राकृतांत नसलेलें अंत्याक्षर यमक कोठून आलें, हा प्रश्न शिल्लक राहतोच. तो हा-मराठी भाषेनें अंत्याक्षरयमक दुसऱ्या भाषेपासून घेतलें असणें शक्य आहे किंवा कसें? एका दृष्टीनें पाहतां हें असें असावें असें म्हणण्याकडे प्रथम प्रवृत्ति होते. याचें एक कारण असें आहे कीं, मराठीच्या बरोबरीनें किंवा त्याहूनहि जास्त असा अंत्याक्षरयमकाचा प्रसार पर्शियन भाषेंत आढळतो. सारस्वताची म्हणजे ग्रंथाची किंवा उच्चप्रतीच्या लोकांनीं बोलण्याची जी उर्दूभाषा तिजमध्यें अंत्याक्षरयमकाची नुस्ती रेलचेल आहे. व पर्शियन व अरबी भाषेंतील धर्मग्रंथकारहि या यमकाच्या लालसेपासून अलिप्त नाहींत. सहाव्या शतकांत रचल्या गेलेल्या कुराणांमध्यें गद्यांतहि अंत्याक्षरयमक आहे, व महाराष्ट्रांतील ललितकलांवर मुसलमानी संस्कृतीचा जो सर्वांगानीं परिणाम झालेला दिसतो, त्याच्या उपमान दृष्टीनें पाहतां मराठींतील अंत्याक्षरयमक पर्शियन वरून घेतलेलें असावें असें अनुमान काढणें सहजच सयुक्तिक झालें असतें. परंतु या विचारसरणीच्या मार्गांत मुख्य एक अडचण येते, ती ही कीं, उत्तर हिंदुस्थानांत मुसलमानांचा प्रवेश जरी अकराव्या शतकांत झालेला असला तरी मराठी भाषेस पर्शियनचा संसर्ग शके १२०० च्या पुढें होण्यास सुरुवात झाली. ज्ञानेश्वरी शके ही १२१२ मध्यें लिहिली गेली आहे. असें असतां ज्ञानेश्वरींतील कविता जर सयमक आहेत, तर ही यमकाची पद्धति तत्पूर्वी कित्येक वर्षेंपर्यंत प्रचारांत असावी, असें म्हणणें सयुक्तिक दिसतें. ज्ञानेश्वर हा पहिलाच कवि यमकी कविता करणारा झाला, व त्यानेंच यमकाचा प्रचार पाडला, असें सहसा म्हणतां येत नाहीं. त्याच्याहि पूर्वी यमकें करणारे कवि असावे. परंतु या कवींनीं अंत्ययमक, अर्थात् अंत्ययमकाबद्दलचा नियम, फारसीपासून घेतला म्हणावें तर हिंदुस्थानांत मुसलमानांचा प्रवेश होऊन तत्पूर्वी एक शतकहि लोटलेलें नव्हतें. दुसराहि एक असा विचार आहे कीं, यमकास इतकें नूतनत्व जर असतें व विशेषतः त्याचा उगम यवनी भाषेंत असता, तर ज्ञानेश्वरासारख्या कवीनें त्याचा उपयोग गीतेवरील टीकेसारख्या पवित्र काव्यग्रंथांत होतां होई तों केला नसता. शिवाय आणखी असें आहे कीं, रा. राजवाडे वगैरे शोधकांच्या मता-

प्रमाणें पाहातां ज्ञानेश्वरीमध्यें फारसीच्या वळणानें आलेले असे शब्द फारच थोडे आहेत; नाहींच म्हटलें तरी चालेल. व फारसी वळणाचे शब्द जर काव्यांत नाहींत, तर काव्याची यमकी रीती तेवढी फारसी वळणानें आली असावी असें कसें मानितां येईल ?

अशा रीतीनें मराठी भाषेनें जर अंत्य यमक दुसऱ्या कोणत्याहि भाषेपासून घेतलेलें नाहीं, तर तें मराठींतच स्वयंसिद्ध व स्वयंभू आहे कीं, काय काय, हा महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न होतो. परंतु त्याचें अस्तिपक्षीं उत्तर देण्यासहि कांहींशा अडचणी आहेत. रा. राजवाडे यांचे मताप्रमाणें महाराष्ट्री ( देशी ) भाषा ही शकोत्तर ४५० पर्यंत जीवंत होती, व शक ४०० पासून पुढें ९०० पर्यंत मराठी भाषा केवळ बोलण्यांत येत होती, तिच्यांत सारस्वत उत्पन्न झालें नव्हतें; व फिरून ९०० शकानंतर सारस्वताचा उदय झाला. तेव्हांपासून अंत्ययमक मराठींत आलें म्हणावें तर तें याचकाळीं एकदम स्वयंभू उत्पन्न कसें झालें असेल ? जर यमकाची पूर्वपरंपरा संस्कृतांत व प्राकृतांत व महाराष्ट्र भाषेच्या अगदीं अव्वल काळांत रूढ असती, तर राख फुंकून टाकलेल्या अग्नीप्रमाणें सारस्वताचा फिरून उदय होण्याचे वेळीं यमकाचें पुनरुज्जीवन झालें, असें म्हणणें सयुक्तिक झालें असतें. परंतु तो तसा संभव नाहीं हें मागें संस्कृत प्राकृत वाङ्मयाचा विचार करतांना आलेलेंच आहे. शिवाय दहाव्या शतकाच्या सुमारास मराठींत अंत्य यमक सर्रास रूढ होतें असें म्हणावें तर निर्यमक अशा जुन्या मराठी कवितेचे मासले उपलब्ध आहेत. मानभावपंथाचें मराठी वाङ्मय बरेंच जुनें असून त्यांतील कांहीं तर ज्ञानेश्वराच्या कवितेच्या समकालीन किंवा तत्पूर्वींचाहि आहे, असें कित्येकांचें मत आहे; व या वाङ्मयांत निर्यमक कविता आढळते, व मराठींतील यमकी कविता यानंतरची असावी असें म्हणावेंसें वाटतें. आतां इंग्रजी किंवा आधुनिक बंगालीप्रमाणें एकाच काळीं सयमक व निर्यमक कविता भाषेंत असूं शकणें संभवनीय आहे. परंतु संस्कृत व प्राकृत कवितेंत अंत्य यमकाचा एकजात अभाव, व अलीकडे ज्ञानेश्वरीपासून नंतरच्या पांचशें वर्षांच्या काळांत मराठी कवितेंतील यमकांचें एकजात अस्तित्व, या गोष्टी लक्षांत घेतल्या असतां, मराठींतील यमक—अर्थात् यमकाबद्दलचा अनुल्लंघनीय नियम, हा स्वयंसिद्ध म्हणजे मराठीच्या मराठींतच उत्पन्न झालेला नसून तो कोठून तरी

बाहेरून घेतलेला असावा, व प्राकृतानंतर, निर्यमक मराठी कवितेचा कांहीं काळ होऊन गेल्यावर, या नियमाचा प्रवेश मराठीमध्यें झालेला असावा, आणि तो ज्ञानेश्वरीच्या आधीं एखाद दुसरें शतक झालेला असावा असें वाटतें.

संस्कृतांत सयमक कविता नाहीं, असें मागें सांगण्यांत आलें आहे. तथापि यास एक लक्षांत ठेवण्यासारखा अपवाद असून तोही वरील काळाजवळचाच आहे. जयदेव कवि हा दहाव्या शतकांतला आहे असें मानतात. व जयदेवकवीच्या ' गीतगोविंद ' नामक काव्यांतील अष्टपद्यांमध्यें थेट मराठी प्रमाणें उत्कृष्ट यमक साधलेलें आहे. जयदेव हा कवि बंगाल प्रांताकडे होऊन गेला. व त्याची काव्यरीति गौडी आहे असें दिसतें. तेव्हां दहाव्या शतकांत अशा प्रकारें सयमक संस्कृतकाव्य आढळणें, व त्यानंतर एक दोन शतकांत मराठीभाषेमध्यें यमकाचा प्रकार सुरू झाला असावा असें दिसणें, या दोन गोष्टींत कितपत संबंध आहे असें मानितां येईल, याचा निर्णय करण्याचें काम मी वाचकांवरच सोंपवितों. मला स्वत:ला या बाबतींत सिद्धांतरूपानें निर्णय देण्यापेक्षां फक्त विचाराची दिशा दर्शवून स्वस्थ बसणें बरें दिसतें.

( १ ) महाराष्ट्रापासून वर उत्तर हिंदुस्थानांत अंत्ययमक रूढ आहे; व महाराष्ट्रापासून खालीं अंत्ययमक नाहीं, गुजराथी, बंगाली, हिंदी व मराठी, या सर्व भाषांत अंत्ययमक आहे; कानडी, तामिल, तेलगु वगैरे भाषांत अंत्य यमक नाहीं. ( २ ) संस्कृत व प्राकृत काव्यांत अंत्य यमक नाहीं. ' गीत-गोविंदा ' सारख्या आधुनिक संस्कृत काव्यांत व विक्रमोर्वशीयांतील प्रक्षिप्त प्राकृत श्लोकांमध्यें अंत्य यमक सांपडतें.—या दोन गोष्टींवरून अंत्य यम-काच्या रूढीचा, नियमाचा, प्रसाराचा जन्म महाराष्ट्राचे उत्तरेस कोठल्या तरी प्रांतांत व नवव्या अगर दहाव्या शतकाचे सुमारास झाला असावा असा तर्क वाटतो. वर ज्या चार प्रमुख देशी भाषा सांगितल्या, म्हणजे गुजराथी, हिंदी, बंगाली व मराठी, यांपैकीं गुजराथीवर हिंदीचा पुष्कळ परिणाम झालेला आहे. व गुजराथींत प्रथमत: यमक नसून पुढें तें गुजराथीनें हिंदुस्थानी भाषेपासून घेतलेलें आहे. * आधुनिक काळांतील

* गुजराथींत निर्यमक अशी कविता नाहीं. क्वचित् ठिकाणीं, म्हणजे 'सोरट' सारख्या वृत्तांत, यमक पहिल्या व दुसऱ्या, तिसऱ्या व चवथ्या, अशा चरणांत न येतां पहिल्या व तिसऱ्या आणि दुसऱ्या व चवथ्या, अशा चरणांत येतें. परंतु हेंहि अंत्य यमकच आहे.

गुजराथी सारस्वताचें पुनरुज्जीवन पंधराव्या शतकाचे सुमारास सुरू झालें. नरसिंह मेहेता संतकवि हा गुजराथीचा Chaucer म्हणण्यास हरकत नाहीं. नरसिंह मेहेत्यापूर्वीं कित्येक जैन कवि गुजराथेंत होऊन गेले. परंतु जैन-परंपरेच्या कवितेंत यमक नाहीं, हें मागें एके ठिकाणीं सांगण्यांत आलेंच आहे. तात्पर्य, मराठींतील यमकाच्या उत्पत्तीच्या दृष्टीनें गुजराथींतील यमक सोडून हिंदींतील यमकाकडेच आपणास जावयास पाहिजे. तसेंच बंगाल्यांतील संस्कृतींचें वळण पंजाबकडून आलेलें आहे; व बंगालीपेक्षां हिंदी ही जुनी भाषा असून, हिंदीचा परिणाम बंगालीवर झाला असावा असें वाटतें. राहतां राहतां हिंदी व मराठी या भाषा रहातात. आतां ज्या कारणाकरितां हिंदीचा परिणाम गुजराथीवर व बंगालीवर झाला असेल त्याच कारणांकरितां तिचा परिणाम मराठीवरही झाला असेल असें संभवतें. आर्य संस्कृतीचा ओघ उत्तरेकडून दक्षिणेकडे आलेला आहे असें मानण्यांत येतें, व मराठीनें अंत्य यमक हिंदीपासून घेतलें असावें असें वाटतें. तथापि एकाच उगमस्थानापासून निरनिराळ्या भाषा निघालेल्या असतांहि, पुढें त्यांचा इतिहास निरनिराळ्या प्रकारचा होतो. तसेंच एकाच उगमापासून निरनिराळ्या भाषा निघाल्या असतां, कालांतरानें त्यांतील एक भाषा, कित्येक विशेष गोष्टी, ज्या तिच्या उगमरूप भाषेंत नाहींत, अशा आपल्या बहिणीपासून घेते असें दिसून येतें. उदाहरणार्थ, या अंत्य यमकाचेच बाबतीसंबंधानें पाहतां असें आढळतें कीं, इंग्रजी Anglo-Saxon व Scandinavian या भाषा एकाच उगमस्थानापासून निघाल्या आहेत; या उगमस्थानरूप भाषेंत अंत्य यमक रूढ नसतां Scandinavian भाषेनें तें परभाषासंसर्गानें उचललें; इंग्रजीनें पुष्कळ काळपर्यंत तें आपल्यास जडूं दिलें नाहीं; व अखेर Scandinavian भाषेपासून इंग्रजीनें तें घेतलें. घेतलें. * तथापि वर सांगितल्याप्रमाणें या बाबतींत असावा तितका

* The Scandinavian prosody had influence on the later Anglo-Saxon Verse, especially in the famous rhyming poem, and from political and ethnological causes must have exercised a good deal of influence on at least the northern parts of England. Its basis had originally been identical with that of Anglo-Saxon, or very closely allied to it. But it had even earlier proved suscep-

भरपूर पुरावा अद्यापि मिळालेला नाहीं. मराठी भाषेंतील अंत्य यम-काच्या उत्पत्तीसंबंधाची चर्चा आज मीं सुरू केली हीच प्रथमची होय असें मला वाटतें; कारण या विषयावरील चर्चा इतरत्र कोठेंही माझ्या पहाण्यांत आलेली नाहीं. माझ्या थोडयाशा संशोधनाचा पहिला हप्ता म्हणून हा विषय साहित्यसंमेलनापुढें मांडण्याचें मी धाडस करीत आहें; सिद्धांताच्या रीतीनें ठाम बोलण्यास आणखी पुरावा हवा आहे. फक्त हल्लींच्या या चर्चेनें या विषयासंबंधीं मराठी भाषेच्या भक्तांस विचार करण्यास संधी मिळेल, आणि माझ्या विचारसरणींतले दोष संशोधनप्रिय विद्वान् गृहस्थांच्या हातून दुरुस्त होतील, अशी मला उमेद आहे.

---

## १० पंत व त्यांची कविता

मराठी भाषेमध्यें आजपर्यंत जे काव्यग्रंथकार होऊन गेले, त्यांमध्यें कविवर्य मोरोपंत यांचा दर्जा फार मोठा आहे. याचें कारण असें कीं, मोरोपंतांच्या कवितेंत निव्वळ एकेरी विद्वत्ता अगर निव्वळ एकेरी भाविकपणा नसून, खरें कवित्व आणि खरें भक्तिप्रेम यांचा उत्कृष्ट मेळ घालण्यास त्यांची विद्वत्ता समर्थ झालेली आहे. आबालवृद्धांच्या तोंडीं, शिष्टसंभाषणप्रसंगीं, व हरिकथासमयीं सर्वत्र जिचा आदरबुद्धीनें रसिक व भाविक लोक उपयोग करितात, अशी एक म्हटली म्हणजे श्रीमयूर-कवीचीच कविता होय, यांत अतिशयोक्ति नाहीं. मोरोपंतांची कविता ही एखाद्या समुद्राप्रमाणें विस्तारानें प्रचंड असतांहि, वर नमूद केलेल्या सर्व प्रसंगीं मिळून या कवितासमुद्राचा जो भाग लोकनिदर्शनास येतो तो त्या मानानें फारच अल्प आहे. बाकीची कविता कमी सरस आहे असें नव्हे; तर हरिदास, कथेकरी, पंडित, पुराणिक, वक्ते, व्याख्याते निबंध-कार वगैरे सर्व जमेस धरले तरी त्यांच्या हातून शिंपलीच्या सहाय्यानें

---

tible to the attraction of rhyme, which Anglo-Saxon resisted with such curious stoutness.

History of English Prosody, by Prof. Saintsbury.—Vol. I, p. 24.

समुद्र उपसण्याच्या यत्नाप्रमाणें, मयूरकवीच्या सखोल व विस्तीर्ण कविता–समुद्राचें कितीसें उपसणें अगर शिंपणें होणार ! ही व बाकीची कविता–तिच्या पोटीं असलेल्या अनेक रत्नांसह–अगाध भरून राहिलेली आहे; पण सर्व जन्मांत या कवितासमुद्राच्या पृष्ठभागावरून परतीरापर्यंत एकाद दुसरी सफर करणारे किंवा केलेले भाग्यवान वाचक कितीसे सांपडतील ?

पण वाचकवर्गानें तरी काय करावें ? परशुरामपंत तात्यांचें 'नवनीत' रसिकांना चोखावयास मिळेपर्यंत मोरोपंतांची कविता ही वेदपठनाप्रमाणें केवळ एका मुखापासून दुसऱ्या मुखापर्यंत व दुसऱ्यापासून तिसऱ्यापर्यंत अशा मंद गतीनें पसरत होती. या काळीं लोकसमुदायामध्यें या कवितेचा प्रसार होण्याचें मुख्य साधन म्हटलें म्हणजे हरिदास व कथेकरी हे होते. पण हेंहि आपापल्या सोयीप्रमाणें विशिष्ठ आख्यानें सजविण्याकरितां लागेल तेवढी–अर्थात् फारच थोडी–कविता निवडून घेत. व आपल्या इकडल्या परंपराप्रियतेस अनुसरून असेंहि घडून आलेलें आहे कीं, कथाकीर्तनाकरितां पहिल्यापहिल्या नामांकित हरिदासपंडितांनीं जे निवडक वेंचे काढले त्यांचींच बाडें आजपावेतों दर पिढीस पुढें चालत आलीं आहेत. वास्तविक पंतांच्या कवितांचा संग्रह त्यांच्या हातानें त्यांच्या हयातींतच झालेला होता. शिवाय, कोणतेंहि प्रकरण रचून झालें कीं लवकरच त्याची दुसरी शुद्ध प्रत पंतांचे स्नेही, पंढरपूरचे महंत व मठपती, विठोबादादा चातुर्मासे यांचेकडे होत असे. अशा रीतीनें खुद्द या कवीच्या हयातींतील त्याच्या सर्व काव्यांच्या दोन तेक अखंड अशा–तेव्हांपासून आजकालपर्यंत पंढरपुरीं उपलब्ध आहेत. असें असतांहि पंतांचे जे अत्युत्कट अभिमानी व चाहते भक्त महाराष्ट्रभर ठिकठिकाणीं होऊन गेले त्यांच्याहि संग्रहीं कवि मोरोपंत यांच्या सर्व कवितेची शुद्ध व विश्वसनीय प्रत एकत्र अशी क्वचितच सांपडेल !

असें घडून येण्याचीं, आमच्या मतें, दोन कारणें उघड आहेत. एक तर एवढ्या प्रचंड कवितासंग्रहाची समग्र प्रत करून घेण्यास अवश्य लागणारा वेळ व परिश्रम हीं दोन्ही ज्यांना अनुकूल, असे लोक फारच थोडे सांपडणार. प्रत्यहिं सुवाच्य व शुद्ध अशा दोनशें आर्या लिहिणारा खंदा लेखक मोरोपंतांचे ग्रंथ हातानें उतरून घ्यावयास बसला तर आपली मान

न हालवितां रोजच्या कामाचे भरपूर तास एक वर्षपर्यंत एकहि दिवस न चुकवितां त्याला खर्चीं घालावे लागतील, असा अंदाज करितां येतो. दुसरें असें कीं मोरोपंतांची कविता जरी विद्वत्तापूर्ण आहे तरी ती बहुतेक प्राकृतांत असल्यामुळें, जुन्या काळीं जुन्या परंपरेच्या शास्त्री पंडित लोकांत तिला संस्कृत कवितेइतका मान नव्हता. कथेकरी व हरिदास यांना प्राकृत जनसमाजापुढें कीर्तन रंगविण्यास, विशेषतः उत्तररंग खुलविण्यास, मोरोपंतांची आर्या हें एक सर्वोत्कृष्ट साधन झालें होतें ही गोष्ट खरी, तथापि हरिदासकथेकऱ्यांची किंमत त्यांच्या रसिकतेपेक्षां वेदांतज्ञानावर अधिक अवलंबून असे; आणि कथेच्या उत्तररंगापेक्षां पूर्वरंगाचें महत्त्व, केवळ त्यामध्यें विद्वत्तेचें प्रदर्शन अधिक म्हणून, अधिक मानण्याची परंपरा अद्यापिहि सर्वांशीं नष्ट झालेली नाहीं.

प्राकृत कवींचें मराठी भाषेंतील कवित्व हें त्यांच्या काळीं एक धाडसच होतें व या धाडसाचें खरें चीज होण्याची वेळ चालू पिढीपर्यंत महाराष्ट्रांत आली नव्हती, असें म्हणण्यास हरकत नाहीं. खरोखरच कथाकीर्तनाखेरीज प्राकृत कवितेचा पाठ घेणें, तिचें अध्ययन करणें, अगर तिच्या मार्मिक चर्चेमध्यें रंगून जाणें या गोष्टी महाराष्ट्रांत पूर्वीं बहुधा क्वचितच होत असतील असा तर्क आहे. महाराष्ट्रांत जीं विद्यापीठें अथवा पाठशाला होत्या त्यांनीं तर प्राकृत कवितेवर कडकडीत बहिष्कार घातलेला होता. या पाठशाळांतून प्रायः वेद आणि षट्शास्त्रें यांचें अध्ययन होई. त्या शास्त्रांपैकीं काव्य व अलंकार यांचें शास्त्र हें केवळ एक गौण दर्जाचें शास्त्र मानलें जात असे; व जरी अलंकार–शास्त्राचा अभ्यास कोणी केला तरी उदाहरणांदाखल आपली कविता निवडून घेतल्याचा मान ज्ञानेश्वरापासून मोरोपंतांपर्यंत एकाहि प्राकृत कवीच्या नशीबीं आला नाहीं, असें निश्चयानें म्हणतां येईल. अगदीं कालपरवांपर्यंतहि अलंकारशास्त्रयांचा सर्व भर जुन्या मूर्धाभिषिक्त संस्कृत काव्यग्रंथांवर असे. जितकें संस्कृत काव्य अधिक जुनें तितकें तें अध्ययनास अधिक योग्य अशीच समजूत पडलेली असून, तिचा अंमल गेल्या सहा शतकांत–म्हणजे श्रीज्ञानेश्वरासारखे कवि उदयास आल्यानंतरच्या काळांतहि–एकसारखा जारी होता. पाठशालांच्या या बहिष्कारामुळें सरस्वतीदेवीच्या क्रीडांगणामध्यें आमचे प्राकृत कवि अस्पृश्य वर्गाप्रमाणें दूर व अनुकंपनीय स्थितीमध्यें ऊन खात उभे होते.

लोकसमाजाच्या आश्रयाची व आदराची शीतल छायाहि त्यांना उपभोगा-क्यास सांपडली नाहीं मग त्यांच्या काव्यांच्या प्रती करणें, त्यांचें अध्ययन करणें आणि त्यांतील मर्में व सौंदर्यस्थलें प्रकट करणें हे कौतुकाचे व आदरातिथ्याचे उपचार त्यांना कोण करणार ?

परंतु प्राकृत कवींच्या सुदैवानें ही स्थिति हल्लीं पालटली आहे. म्हणजे संस्कृत भाषेच्या ठिकाणीं असलेलें आमचें प्रेम अगर कृतज्ञता रतिमात्र कमी झाली आहे असें नव्हे; तर संस्कृत भाषा ही रोज अंगावर घालून फाडण्याच्या कपडयाप्रमाणें न वागवितां तिचा आम्ही ठेवणीच्या शेल्या-प्रमाणें उपयोग करूं लागलों आहों; व त्याबरोबरच प्राकृत काव्यग्रंथांस जवळ ओढून त्यांचाहि योग्य तो बहुमान करण्यास आम्हीं प्रारंभ केला आहे. कालपरत्वें मुद्रणकला हीहि या कामास सहाय्यभूत झालेली आहे, व अगदीं अलीकडे तर पूर्वींच्या आमच्या शिक्षणाचें धोरण बदलून जाऊन आजच्या सर्वमान्य पाठशालांतून मराठी वाङ्मयाचा अभ्यास सुरू करण्यांत आला आहे. मुंबईच्या आर्ट्स् शाखेची सर्वांत श्रेष्ठ अशी जी एम. ए. ची परीक्षा तिला मराठी वाङ्मय हा एक ऐच्छिक विषय अलीकडे ठेविलेला असल्यामुळें तेथपर्यंत आमच्या मराठी कवींची सांप्रत प्रगति झाली आहे. नव्या दृष्टीनें ह्यांत विशेष असें कांहीं नसून तो केवळ मान्यांचा मानच आहे खरा; परंतु जुन्या दृष्टीनें मात्र वाङ्मयसमाजांतील अस्पृश्यांचा तो उद्धार आहे ! जीवंत राष्ट्राची मायभाषाहि जीवंत असावी, हीच मार्मिक व प्रशंसनीय बुद्धि वरील स्थित्यंतरास कारणीभूत आहे. पण कसेंहि असो; एवढ्या बाबतींत तरी झालेलें हें स्थित्यंतर अभिनंदनीय होय यांत शंका नाहीं. मराठी कवितेविषयीं महाराष्ट्रीयांचें प्रेम पूर्वी सांगि-तल्याप्रमाणें सुमारें ५०।५५ वर्षांपूर्वी प्रथम दिसून येऊं लागलें. त्या काळीं कायम ठशाची मुद्रणकला इकडे सर्रास सुरू झाली नव्हती; तथापि शिळाछापाचें साधन जितपत उपलब्ध झालें होतें तेवढयाचाच उपयोग प्राकृत कवितेच्या पुनरुज्जीवनाकडे करण्यांत येऊं लागला. मराठी भाषेंत अलंकारशास्त्रावर ग्रंथ लिहून व अलंकारांच्या उदाहरणांदाखल प्राकृत कवींचीं अवतरणें देऊन कै. कृष्णशास्त्री राजवाडे यांनीं प्राकृत काव्या-संबंधानें महाराष्ट्रीयांच्या मनोभावनेची जी नवीन दिशा दाखविली, तिचेंच प्रत्यंतर कै. माधव चंद्रोबा यांच्या ‘ सर्वसंग्रहा ’ नें आणून दिलें, व

तेव्हांपासूनच प्राकृत काव्यग्रंथांवर महाराष्ट्रीय समाजाचा कायमचा कृपा-कटाक्ष पडला, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

मोरोपंतांसंबंधानें पाहतां या कवींची कविता प्रसिद्ध करण्याचे प्रयत्न आज-पर्यंत तीन चार झाले. पहिला प्रयत्न वर सांगितलेला 'सर्वसंग्रह'कारांचा. 'सर्व-संग्रहां'तून केवळ पंतांचीच कविता प्रसिद्ध केली जात नव्हती; तर एकंदर प्राकृत कवि व त्यांची कविता यांच्या पुनरुज्जीवनाचा तो व्यापक प्रयत्न होता. पंतांची बहुतेक कविता—भारत, भागवत, हरिवंश, कृष्णविजय व प्रसिद्ध रामायणांतील बहुतेक रामायणें वगैरे 'सर्वसंग्रहा'नेंच प्रथम उदयास आणलीं. 'सर्वसंग्रहा'स प्रारंभीं सरकारानेंच आश्रय देऊन जगविलें होतें हें लक्षांत ठेविलें पाहिजे. परंतु पुढें आश्रयाभावीं सदर मासिक अर्थातच बंद पडलें. यानंतरचा दुसरा प्रयत्न इतिहाससंशोधक रा. सा. साने व कै. मोडक या उभय विद्वानांनीं 'काव्येतिहाससंग्रहां'तून केला. या मासिकांतील विषयाचे काव्य व इतिहास असे दोन भाग होते. 'काव्य' या भागामध्यें उपलब्ध होतील तीं संस्कृत—प्राकृत कवींचीं काव्यें छापलीं जात. या नियमाप्रमाणें, 'सर्व संग्रहांत' न छापलेली अशी उपलब्ध झाली तेवढी पंतकविता—बहुशः बरींच स्फुट काव्यें वगैरे—काव्येतिहाससंग्रहानें प्रथम लोकावलोकनांत आणलीं. काव्य व इतिहास यांची संस्मरणीय सेवा बजावून पुढें हेंहि मासिक बंद पडलें. अर्थातच त्याच्या चालकांचा हेतु अपूर्ण राहिला. यानंतर साधारणतः एकदमच दोन प्रयत्न सुरू झाले. पहिला रा. बाबाजी अनंत तेंडुलकर यांचा, व दुसरा सुप्रसिद्ध निर्णयसागर छापखान्याचे मालक शेट जावजी दादाजी यांचा. तेंडुलकरांनीं पूर्वी सर्वसंग्रहानें छापलेली पंतकविता शिळेवरची टाइपावर नेली. पुढें यांचेंहि 'मयूर कवि' मासिक पुस्तक, पंतांची समग्र कविता छापण्याचा मनोदय सिद्धीस न जातांच, थांबलें. तथापि तेंडुल-करांनींहि पंतांची बहुतेक कविता छापल्याचें श्रेय संपादिलें आहे. यानंतर मुंबई येथील उदार बुद्धीचे व धनिक गृहस्थ शेट जावजी दादाजी यांनीं आपल्या सल्लागार पंडितांच्या उपदेशाचें योग्य चीज करून प्राकृत काव्य प्रसिद्धीचें मोठ्या खर्चाचें व परिश्रमाचें बरेंच कार्य करून महाराष्ट्री-यांस आपलें सदैव ऋणी करून ठेविलें. जावजींच्या 'काव्यसंग्रह' मासिक पुस्तकांत मोरोपंतांची कविता 'अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या

टीपांसह ' प्रसिद्ध करण्याचें काम आरंभापासून अखेरपर्यंत म्हणजे सुमारें १५ वर्षें अव्याहत चाललें होतें; व आजमित्तीस निर्णयसागर छापखान्यांतील मोरोपंतांच्या कवितेची जी प्रत आहे तिच्यापेक्षां अधिक सुवाच्य, सुंदर व उपयुक्त अशी दुसरी प्रत उपलब्ध नाहीं असें म्हणण्यांत रतिमात्रहि अवास्तविक स्तुति होणार नाहीं, असें आम्हांला वाटतें. तथापि, निर्णयसागराची ही प्रत किंवा तत्पूर्वीच्या इतर प्रती या सर्वांना साधारण अशीं अनेक वैगुण्यें असून सर्वांत अलीकडच्या व सर्वांत उत्तम अशाहि निर्णयसागरच्या या प्रतीनें महाराष्ट्र वाचकवर्गाचें काम सर्वस्वी भागण्यासारखें नाहीं, हें सहज सिद्ध करितां येईल.

निर्णयसागरच्या प्रतींत आजपर्यंत सर्वांत अधिक असा झालेला मोरोपंतांच्या कवितेचा एकत्र संग्रह आहे. तथापि त्या प्रतींत समाविष्ट न झालेलीं अशींहि पंतांचीं कांहीं रामायणें व स्फुट प्रकरणें आहेत. शिवाय निर्णयसागरची ही प्रत बहुधा पूर्वी प्रसिद्ध झालेल्या अशा प्रतीवरूनच तयार केलेली असल्यामुळें पाठांच्या दृष्टीनें पूर्वीच्या प्रतींहून हिजमध्यें विशेष सुधारणा नाहीं. दुसरें असें कीं, निर्णयसागरचा हा मोरोपंती संग्रह आटपशीर केलेला नसून त्याचे अनेक खंड आहेत, व सर्व खंडांची मिळून किंमतहि पुष्कळ आहे. अर्थात् ही प्रत मध्यम स्थितींतील बहुतेक मराठी वाचकवर्गास सुलभ नसून संग्रहासहि अडचणीची आहे. मोरोपंताची कविता अशा रीतीनें प्रसिद्ध करण्यांत निर्णयसागरच्या मालकांनीं मराठी भाषेविषयीं उत्कट अभिमान व लोकोत्तर स्वार्थत्याग प्रगट केला, यांत शंकाच नाहीं. यांचेसारख्या धनिक व विद्याप्रिय छापखानेवाल्यानें हें काम हातीं घेतलें नसतें तर आज ही जी इतक्या किंमतीस तरी मोरोपंती कवितेची प्रत मिळते तीहि मिळणें कठीण झालें असतें. परंतु निर्णयसागरी प्रतीचा विस्तार व किंमत इतकी वाढण्याचें मुख्य कारण असें आहे कीं सदर प्रतींत नुसती मूळ कविता म्हणजे नुसता पदपाठच नसून त्याबरोबर काव्यसंग्रहाच्या सर्व विद्वान संपादकांनीं त्या पदपाठांवर दिलेल्या विपुल टीपाहि प्रत्येक पानावर छापलेल्या आहेत. कै. वामनराव ओकांसारख्या रसिक व विद्वान संपादकानें तयार केलेल्या या टीपा अत्यंत उपयुक्त आहेत किंवा नाहींत याबद्दल वादच नाहीं. तथापि त्या तयार करितांना वाचकांस अगदीं शिशुबोध व सर्वांगपूर्ण असें काव्यशिक्षण

देण्याचा आपला प्रचंड हेतु त्यांनीं निरंतर डोळ्यांपुढें वागविल्यानें टीपांचा विस्तार इतका झाला आहे कीं, निर्णयसागरी प्रतीच्या एकंदर पृष्ठ संख्येपैकीं बराच भाग टीपांच्या कामीं खर्च झाला असून त्यामुळें एकंदर प्रतीची किंमतहि पृष्ठसंख्येच्या मानानें जवळ जवळ दुप्पट वाढली आहे. वरील सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या असतां मोरोपंती कवितासंग्रहाची एखादी नवी आवृत्ति निघाल्यास ती मराठी वाचकवर्गास हवी आहे, असें दिसून येईल. व ही गरज भागविण्याकरितां अशी आवृत्ति काढावी अशी श्रीमयूरकवीच्या भक्तांस आमची सूचना आहे. महाराष्ट्रभाषेच्या पुरस्कर्त्यांकडून या योजनेच्या सिद्धीविषयीं प्रयत्नपूर्वक सहानुभूति व तिच्या धनिक अभिमान्यांकडून कार्याच्या महत्त्वाप्रमाणें उदार मनानें सहाय्य मिळेल असा आम्हांस भरंवसा आहे.

आजपर्यंत मोरोपंती कवितेच्या ज्या आवृत्या निघाल्या त्यांपैकीं एकहि आवृत्ति कवीच्या स्वलिखित प्रतीशीं ताडून पाहिलेली अगर रुजू घेतलेली नव्हती; याविषयीं शंकाच नको. कारण अगदीं प्रथम निघालेल्या सर्वसंग्रहाच्या आवृत्तींत जे शेंकड्यांनीं मोजतां येण्यासारखे अपपाठ, सदोषपाठ वगैरे घुसले आहेत ते बहुतेक सर्व त्यानंतरच्या दोन्ही प्रतींत तसेच कायम आहेत. निर्णयसागरची आवृत्ति तयार करण्याचे कामीं काव्यसंग्रहाच्या मुख्य संपादकांनीं व हितचिंतकांनीं इतर रीतीनें जरी अत्यंत परिश्रम घेतले आहेत, तरी मूळ प्रतीवरून सर्व पदपाठ तपासून घेण्यास लागणारा वेळ अगर साधनें त्यांस अनुकूल नव्हतीं असें दिसतें. एरवीं विस्तृत टीपा लिहिण्यांत जी त्यांची शक्ति खर्चीं पडली तीजमध्यें बरीच शक्ति, पदपाठ मूळ प्रतीला धरून शुद्ध असा देण्याकडे लावण्यास ते चुकले नसते. परंतु असा योगायोग जुळून न आल्यामुळें शेंकडों ठिकाणच्या मूळ शुद्ध व सरस पाठांबरोबरच मूळ ग्रंथांतील सुमारें २५०।३०० पद्येंहि छापील प्रतींतून गलित झालीं आहेत. ह. भ. प. पांगारकर हे सुमारें १२ वर्षांपूर्वीं पंढरपूर मुक्कामीं शिक्षक या नात्यानें असतां त्यांनीं आपल्या उज्ज्वल मयूरभक्तीस अनुसरून पंतकवितेच्या मूळ प्रतीपर्यंत प्रवेश करून घेऊन त्या दप्तराची प्रथम चालना केली. तथापि, पांगारकरांचा उद्देशच केवळ कविचरित्र लिहिण्याचा असल्यामुळें पंतकवितेच्या छापील प्रतींचें संशोधन त्यांच्या हातून झालें नाहीं, हें साहजिक आहे.

परंतु संशोधनाचें जें कार्य अवश्य व्हावयास पाहिजे असूनहि आजपर्यंत झालें नाहीं तें, त्यानंतर अलीकडे पंतवंशांतीलच एक पंतभक्त म्हणजे रा. रामकृष्ण दत्तात्रय पराडकर यांनीं मयूर कवितेची अस्सल, व तितकीच विश्वसनीय अशी चातुर्मासेबोवांची दुसरी एक, अशा ज्या दोन प्रती पंढरपूर क्षेत्रीं अद्यापि उपलब्ध आहेत त्यावरून पूर्ण केलें आहे. या गृहस्थांनीं ' पंत व त्यांची कविता ' या विषयासंबंधानें शोधपूर्वक जी माहिती मिळविली आहे, तिजवरून पाहतां हल्लींच्या छापील प्रतींतून इतके अपपाठ शिरले असल्याचें दिसून येतें कीं, त्यामुळें बऱ्याच पंतकवितेचें स्वारस्य कांहीं अंशीं कमी होण्यास असे अपपाठ विनाकारण कारण झाले आहेत; एवढेंच नव्हे तर अपपाठांमुळें तत्संबंधीं कविता दुर्बोधहि झाली आहे. अर्थात् सुदैवानें अद्यापि उपलब्ध असलेल्या पंतकवितेच्या मूळ प्रतीचा फायदा घेऊन शुद्ध व पूर्ण अशी नवी स्वतंत्र आवृत्ति काढणें ही मराठी वाङ्मयाची मोठीच सेवा होणार आहे.

असली आवृत्ति सर्व आवृत्त्यांहून अधिक पूर्णहि होईल. या आवृत्तीचें काम खुद्द पंतलिखित दप्तरावरून व्हावयाचें असल्यामुळें पंतांची जी कांहीं कविता काव्यसंग्रहांत प्रसिद्ध होऊं शकली नाहीं ती या नवीन योजलेल्या आवृत्तींत यथास्थलीं देतां येईल. पंतांच्या अष्टोत्तरशत रामायणांपैकीं उपलब्ध परंतु अप्रसिद्ध अशीं जीं १०।११ रामायणें आहेत, त्यांचा लाभ या आवृत्तीनें वाचकांना होणार आहे. याशिवाय कांहीं स्फुट प्रकरणेंहि नवीनच आहेत. एकंदरीनें नवीन आवृत्तीनें उपलब्ध अशी समग्र पंतकविता वाचकांचे संग्रहीं राहील; इतकेंच नव्हे तर ' पंत व त्यांची कविता ' याविषयासंबंधानें गेल्या अर्ध शतकांत जी माहिती पुढें आली. व तत्संबंधीं विद्वज्जनांमध्यें जो अनुकूल प्रतिकूल उहापोह झाला त्या सर्वांचा उपयोग नव्या आवृत्तींत परिशिष्टरूपानें करण्यांत आल्यास तिनें वाचकांची सर्व प्रकारें सोय होईल.

तथापि असली नवीन आवृत्ति पूर्वीच्या आवृत्तीहून पुष्कळ स्वस्त देतां आली पाहिजे; तरच तिचा उपयोग. ' मोरोपंतांची कविता ' या महाराष्ट्र वाङ्मयाच्या बहुमोल भागाचा साधारण ऐपतीच्या वाचकासहि लाभ घेण्यास अडचण पडूं नये इतक्या अल्प किंमतींत सर्व कविता उपलब्ध करून देणें, हाहि नवीन आवृत्ति काढण्याच्या मुख्य उद्देशांपैकीं एक धरून

ललें पाहिजे. आजवर छापलेल्या पंतकवितेच्या प्रतींतील अशुद्धें दुरुस्त
ून शुद्ध पदपाठांचें परिशिष्ट त्या प्रतीला जोडतां आलें नसतें, किंवा जी
वेता अद्याप अप्रसिद्ध राहिली आहे तिचाच तेवढा स्वतंत्र भाग काढून
ाचा समावेश त्या प्रतींत करितां आला नसता, असें नाहीं. तथापि,
रोपंतांची कविता समग्र संग्रहीं ठेवण्यास भारी किंमत पडते ही जी
डचण ती वरील दोन्ही गोष्टींनीं दूर न होतां थोडीफार वाढण्याचाच
मव! अर्थात् ही एक मुख्य अडचण दूर करतांना त्याच वेळीं शुद्ध
पाठ देणें व अप्रसिद्ध प्रकरणांचा जेथल्या तेथें समावेश करणें या
ष्टी सहज साधण्यासारख्या असल्यानें हाच विचार अधिक श्रेयस्कर
तो. अशुद्धत्व व अपूर्णत्व हे दोन्ही दोष जींतून नाहींसे झाले आहेत,
शा मोरोपंती कवितेचा संपूर्ण संग्रह वाचकांस सुमारें पांच सात रुपयां-
ंत मिळावा. कमी किमतीचा अदमास धरितांना टीपांनीं वगैरे होणारी
याची वाढ मर्यादित करण्याकडे लक्ष दिलें पाहिजे. साधारणतः मराठी
चकास कवितेचा शुद्ध पदपाठ हातीं असला म्हणजे चालतें. मोरो-
तांची कविता स्थलविशेषीं अवघड आहे; नाहीं असें नाहीं. तथापि केवळ
बोधत्व नाहींसें करण्यास लागणाऱ्या टीपा फार थोड्या असतात. परंतु
ाय, व्याकरण, अलंकार या शास्त्रांच्या दृष्टीनें कवितेची चर्चा करणाऱ्या
पा अद्यापि मिळतील तितक्या कोणासहि हव्याच असल्या तरी तें एक
तंत्रच कार्य आहे. त्याचा समावेश काव्यग्रंथाच्या आवृत्तींत होऊं शकत
ाहीं. निदान खर्चवेंच व सामान्य वाचकवर्गाची पात्रता या दृष्टीनें तरी
काची दुसऱ्याशीं सांगड घालणें म्हणजे दोहोंसहि कमकुवत करण्यासारखें
ाहे. पंतांचा एवढा प्रचंड कवितासंग्रह त्यांचेसंबंधीं सर्व माहितीसह
वघ्या पांचसात रुपयांस देणें हें एक धाडसच आहे. तथापि किंमत
तकी कमी केली असतां, सामान्य ऐपतीचा परंतु उत्साही असा वाचक-
र्ग मोठ्या तत्परतेनें भारत, भागवत व रामायण या राष्ट्रीय महाग्रंथां-
रील मोरोपंतांसारख्या विद्वान्, रसिक, मार्मिक व इतकेंहि असून भाविक
शा कवीनें केलेल्या आर्याबद्ध मराठी टीकेचा संग्रह करण्यास तयार
ोईल, असा आम्हांस भरंवसा आहे.

---

# ११ काव्यदृष्टि

## ( ता. १७ मे १९३३ रोजीं वसंत व्याख्यानमालेंत दिलेल्या व्याख्यानाचा सारांश )

परवां माधवराव आळतेकर यांनीं ‘ कालिदासाची काव्यसृष्टि ’ या विषयावर व्याख्यान दिलें त्यांत त्यांनीं चर्चा केली ती ठीकच होती. तथापि विषयाच्या नांवावरून जी अपेक्षा उत्पन्न झाली ती परिपूर्ण झाली नाहीं असें कित्येक उपवक्त्यांनीं बोलून दाखविलें. याचें कारण या काव्य-सृष्टीच्या पर्यालोचनांत एक विशिष्ट व तीहि गौण दृष्टि ठेवण्यांत आली. काव्यें वाचतांना त्यांत हुडकून काढण्यासच कोणी बसेल तर ऐतिहासिक माहिती, सामाजिक स्थितीचें ज्ञान, धर्म व नीति यांसंबंधीं कांहीं ध्येयें किंवा कांहीं सिद्धांत, यांचे कण हातीं लागतील हें खरें. पण काव्यसृष्टीच्या अवलोकनांत काव्यदृष्टि हीच सर्वांत अधिक महत्त्वाची आहे. मुंबईस बॅकबेचा देखावा पाहण्यास जाणाराला तेथें उसाच्या गंडेऱ्या विकत मिळ-तात ही तत्संबद्ध गोष्ट समजते. पण समुद्रशोभेचें वर्णन पुष्कळसें सांगि-तल्यावर मग गंडेऱ्याची माहितीहि केव्हां सांगितली तर चालेल. एखाद्या प्रसिद्ध नटाचें वेषांतर पाहून आल्यावर त्याच्या नाटयकौशल्याचें वर्णन हेंच मुख्य व त्याच्या वयाविषयीं अनुमान हें गौण ठरेल. काव्यसृष्टींत काव्यदृष्टीशिवाय प्रवेश करणें म्हणजे जेवावयास जाऊन तोंड विसरण्यासारखें आहे. गुजराथेंत गांव जेवणास जाणाऱ्या पाहुण्यानें आपणाबरोबर आपल्या घरचा पाट, पाणी, पापड, पत्रावळ हे घेऊन जावें व यजमानानें मुख्य पक्वान्न वाढावें अशी चाल आहे म्हणतात. पण पाहुणा आपले चार जिन्नस बरोबर नेतो व यजमान एकच देतो असें म्हटलें तरी मेजवानीच्या दृष्टीनें त्या एकाचीच किंमत त्या चारीहून अधिक ठरते. कवीच्या काव्यदृष्टीची किंमत, याच न्यायानें, वाचकानें बरोबर आणलेल्या इतर आगंतुक दृष्टी-पेक्षां अधीक आहे. स्वत: कवीला प्रवृत्त करणारी काव्यदृष्टीच वाचकानेंहि आपल्या अंगीं आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

कवींनीं सहेतुक लिहिलेलीं काव्यें थोडीं असतात. पोप कवीचें डनशि-यड, बटलरचें ह्यूडिब्रास, वगैरे काव्यें बोलून चालून विशिष्ट हेतूनें लिहिलेलीं

ा. पण सामान्यतः कवि काव्य लिहितो तें अहेतुक, म्हणजे काव्यस्फू-
्या समाधानाकरितांच लिहितो. एकादा चमत्कारिक प्रसंग किंवा सृष्टी-
; दृश्य किंवा मानवी स्वभावचित्र यांजवर प्रतिभेची दृष्टि पडल्याबरोबर
वे स्वत: रंगून जातो व इतरांनाहि त्यांत आपणासारखेंच रंगविण्या-
रेतां तो काव्य लिहितो. वीज यदृच्छेनें कोठें कशी चमकेल याचा जसा
यम नाहीं तसाच काव्यप्रतिभेचा प्रकाश कशावर केव्हां पडेल याचाहि
यम नाहीं. तोंडांतली पाण्याची चूळ आपण जमिनीवर थुंकतों तिनें
ादे वेळीं यदृच्छेनें एकाद्या उत्कृष्ट आकृतीची रूपरेखा स्पष्ट उमटते.
ा फिरून मुद्दाम चूळ भरून तशीच थुंकून तीच आकृति कोणी उम-
् म्हणेल तर तें होणार नाहीं. कवीची प्रतिभा ही डुकराच्या मुसंडी-
रखी एकदां निघाली कीं सरळ जाते. ती वाटेंत कांहींहि आल्यानें
बत नाहीं, किंवा वाट सोडून वितीवर असलेला पदार्थहि तिला दिसत
हीं.

प्रतिभाविलासांत रंगण्याकरितां कवीनें लिहिलेल्या काव्यांत ध्येया-
रख्या दिसणाऱ्या कांहीं भावना व समाजस्थितीचे किंवा ऐतिहासिक
हीं उल्लेख येऊं शकतात. पण ते पुष्कळ वेळां इच्छित नसून वर्णनाऱ्या
ाघांत अपरिहार्य असतात. अगदीं सद्यःस्थितीचें समाजचित्र दर्शविणारें
शारदा ' ' हाच मुलाचा बाप, ' असें एकादें नाटक कवि लिहील तर
ांत तो सहेतुक समाजस्थितिवर्णन करील. पण भारतरामायणकालीन
षयांवर काव्य नाटक लिहिणारा धड त्या काळची स्थिति बरोबर वर्णन
रूं शकत नाहीं, व स्वत: त्याच्या काळच्या लोकस्थितीचे जे उल्लेख
ाच्या लेखणींतून येतात ते त्याला लिहितांना टाळतां येत नाहींत म्हणू-
च येतात. तत्वें, ध्येयें, समाजस्थिति या दृष्टीनें, तीन चार हजार वर्षां-
ींचा शकुंतलेचा विषय घेऊन, पांचव्या—सहाव्या शतकांतल्या कालि-
ासानें लिहिलेलें नाटक विसाव्या शतकांतले वाचक आज आम्ही उक-
ीत असतां किती घोंटाळे किंवा घेडगुजरी प्रकार होतील हें कोणी
ांगावें ? द्रौपदी ही पांच पतींची स्त्री होती ही गोष्ट खरी; व तिज-
रून पांडव हे मूळ तिबेटियन वंशांतले होते असें अनुमान काढतात.
ग काव्यदृष्टीनें भारत लिहिणाऱ्या व्यासाला ही विशेष गोष्ट माहीत
ासली तरी काव्य रंगविण्याचे कामीं तिचा त्याला कोठें विशेष

उपयोग झाला नाहीं. या गोष्टीचें ज्ञान त्याच्या मनाला नुसतें स्पर्श करून गेलेलें आहे.

नैतिक ध्येयें व सिद्धांत यांची गोष्ट तर अधिकच अवघड. सर्व गायन-ब्रह्माला मूलाधार जरी सप्तस्वर तरी त्यांचीं निरनिराळीं मिश्रणें व आलटापालटी यांनींच गाण्याला रंग येतो. शुद्ध नीतितत्वें हीं अशींच पांचसात ठळक दिसतात, पण नुसत्या त्यांच्या शुद्ध स्वरूपानें जगाच्या व्यवहाराचें काम भागत नाहीं. सत्य अहिंसा अशा तत्वांचा अर्थ परिस्थितीनें इतका बदलूं शकतो कीं, परवां श्रीशंकराचार्यांनीं एका प्रवचनांत सिद्ध केल्याप्रमाणें, दर्शनीं असत्य हेंच केव्हां केव्हां वास्तविक सत्य ठरतें. औषधीप्रमाणें नीतितत्वाचा परिणाम किंवा श्रेय हें प्रमाण परिस्थिति व अनुपान यांवरच मुख्यतः अवलंबून असतें. नीतीचा अर्थ सत्कर्मस्वीकार व असत्कर्माचा त्याग असें म्हटलें तरी, चांगलें व वाईट हें झालें तरी त्रैगुण्याच्या पाशांत सांपडलेला मनुष्य आपापल्या मनोधर्माप्रमाणेंच ठरविणार. स्वभावाच्या द्वारानेंच नीतितत्त्वाचा प्रकाश घ्यावयाचा असतो. वागणाराच्या गुणधर्माप्रमाणें पाहणाराचे व बरेंवाईट म्हणणाराचे गुणधर्महि नीतीचें स्वरूप बदलूं शकतात. भीष्माच्या सत्यप्रतिज्ञत्वाचें कौतुक सनातन होय. पण तीं पुराणपवित्र नांवें बदलून आजचीं राव पंत साहेब अशीं नांवें घालून, भीष्म व शंतनु यांचेंच कथानक घेऊन कोणी असेंहि नाटक रंगवील कीं, म्हातारपणीं फिरून लग्न करण्याची इच्छा झालेल्या बापाची अखेर फजिती होते व सात्विक कपटाचरणानें मुलगा आपलेंच कार्य साधतो, आणि हेंच बरोबर झालें असें म्हणत प्रेक्षक घरोघर परत जातील. हुंड्याच्या चालीची निंदा करणाऱ्या वरेरकरांच्या नाटकांत, बापाचें डबोलें चोरून आपल्या बायकोचा हुंडा भरून द्रव्यलोभी बापाला फजीत करणाऱ्या मुलाला कितीसे लोक वाईट म्हणतात ? पण पितृभक्तीचीं हीं दोन चित्रें वेगळीं असतांहि काव्याच्या दृष्टीनें पितृभजक भीष्म-चरित्रांतर्गत भारत जसें रंगलेलें आहे तसेंच पितृवंचक मुलाचें चरित्र दाखविणारें हें सामाजिक नाटकहि रंगलेलें आहे. व्यासांना सत्याचें महत्त्व माहीत असतांहि द्रोणवधापूर्वी धर्माकडून झालेल्या असत्याचरणाचा कडक निषेध त्यांजकडून झालेला नाहीं. मोठ्या लोकांचा प्रमाद मोठा म्हणून त्यांना शिक्षा मोठी हीच गोष्ट जर खरी, तर या पापाबद्दल धर्माची नुसती

ांगुलि गळून न पडतां त्याला देहांत प्रायश्चित मिळावें असा आग्रह
रून एकादा कवि नाटक लिहील तर तेंहि रंगू शकेल.

द्रौपदी ही पतिव्रताहि आहे व तापट प्राणीदार पत्नीहि आहे. तिनें
ापल्या पतींच्या फाजील सात्विकपणाचा निषेध तीन चार प्रकारांनीं
लेला निरनिराळ्या काव्यांत आढळतो. अशा ठिकाणीं, सतीहि पतीवर
गावली असलें तत्त्व नुसतें सांगण्यापेक्षां, पतिव्रता स्त्रीनें केलेला पतीचा
षेध काव्यदृष्टीनें कोणत्या कवीनें कसा खुलविला आहे हें पाहण्यांतच
ारस्य आहे. हरिश्चंद्र व श्रियाळ–चांगुणा यांच्या चरित्रासंबंधानेंहि दुतर्फी;
णजे स्तुतीप्रमाणें निषेधपरहि, नाटकें लिहितां येण्यासारखीं आहेत. मात्र
पुराणप्रिय नांवें वगळून व्यावहारिक नांवें घेतलीं पाहिजेत. सांगण्याचा
ा हा कीं, झोपेंत दिलेलें वचन खरें करण्याच्या इरेस घालून, एकाद्याचें
ृय गिळंकृत करून, त्याचा छळ करण्यास कोणी दुष्ट मनुष्य तयार झाला,
वा इच्छाभोजन माग असें म्हटल्याबरोबर तुझा मुलगाच मारून शिज
ा खायला घाल अशी एकादी विपरीत मागणी कोणा अतिथीनें केली,
त्याची इच्छा तृप्त न करतां त्याची फटफजीति करणें हेंच अधिक
यस्कर ध्येय कसें होईल हें नांवें बदलून एखाद्या लाक्षणिक विनोदी
टकांत वर्णितां येण्यासारखें आहे. कृष्णचरित्र जर काव्यांत वर्णन करा-
ाचें तर, अंतिम न्यायाकरितां कां होईना पण पदोपदीं केलेल्या कपट-
रित्रांचेंच वर्णन करावें लागेल. पण साध्य चांगलें असलें तरी वाईट
धन उपयोगांत आणावें कीं नाहीं हा वादग्रस्त मुद्दा शिल्लकच उरतो;
कवि झाला म्हणून तो त्याचा अखेर निकाल लावूं शकत नाहीं. या
ी उदाहरणांवरून हेंच दिसतें कीं, कवीचें खरें काम उत्कर्षाला पोंच-
्या त्रिगुणात्मक मनुष्यस्वभावाचें रसपूर्ण व चमत्कृतिजनक वर्णन करणें
त्र मुख्यत: असून, त्याचा कलाविलास यांतच असतो. कलेच्या मागें
ऊन तिचा हेतु किंवा तिजवरून निघणारे पण वादग्रस्त अनेक तर्फी
तिक सिद्धान्त किंवा ध्येयें हुडकीत बसण्यांत अर्थ नाहीं.

चित्रकला शिल्पकला या कला म्हणूनच उपभोगण्याच्या असतात.
ांतून तात्पर्यें काढीत बसणें चूक होईल. ताजमहालाची इमारत बाद-
हानें आवडत्या राणीचें स्मारक या हेतूनें बांधली असेल. पण ताज-

महालाची सुंदर आकृति अमुक प्रकारची योजण्यांत कसला नैतिक हेतु असणार ? सुंदर वस्तूंचें वर्णन सुंदर एवढें म्हणण्यानेंच संपतें. ती सुन्दर कां व कशी हें सांगणें कठीण. निदान तें एकाद्या नैतिक सिद्धांताच्या आधारावरून सांगणें तरी कठीण. भक्तिसाधनाचा हेतु मोक्ष असें म्हणतां येतें. पण मोक्षाचा हेतु मोक्षच. तसेंच कलारंजनाचा हेतु रंजनच, त्यापलीकडे जातां येत नाहीं. कलाविलास हा सविकल्पक समाधीचा एक प्रकार असून त्या समाधीपर्यंत मजल गेली म्हणजे त्यापलीकडे जातां येत नाहीं. 'यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह' असेंच येथेंहि घडतें. कवीबरोबर आपणहि रंगण्याचा प्रयत्न करतों. समजा, द्रौपदीवस्त्रहरणाचें चित्र काढलेलें असतां चित्रकारानें दुःशासनाचा चेहरा पडका व नेभळट काढला तर दुःशासनाकडून होणारी वस्त्रहरणाची कृति आपण निंद्य मानीत असतांहि, चेहऱ्यांत यावी तितकी क्रूरता आली नाहीं म्हणून चित्रकाराला दोषच देऊं.

कालिदासाचीं काव्यें घेतलीं तर मेघदूतांत केवळ कल्पनाविलास आहे त्यांत ध्येय किंवा नैतिक सिद्धांत असा कांहीं नाहीं. ऋतुसंहाराची एकंदर भाषा पाहिली म्हणजे तींतून निघणारी परिस्थिति उपदेशिण्यासारखी नाहीं. तींत केवळ स्वैर वर्णन आहे. शाकुंतल, विक्रमोर्वशीय, मालविकाग्निमित्र या तीनही नाटकांत हिंदुसमाजांतील बहुपत्नीकत्वाच्या चालीचा उल्लेख आहे; पण या चालीचें समर्थन करण्याचा किंवा उलट निषेधहि करण्याचा कालिदासाचा हेतु आहे असें म्हणवत नाहीं. दुष्यन्ताहून विक्रम व विक्रमाहून अग्निमित्र वाईट दाखविले आहेत. शाकुंतल हें प्रौढविवाहाचें मंडन करतें कीं खंडन करतें हें सांगणें कठीण. विक्रम राणीच्या प्रत्यक्ष पायां पडतो, व असाध्य रोग्याला वाटेल तें खाण्यास देण्याला सांगून वैद्य त्याला सोडून जातो तशी विक्रमाची राणी त्याला झिडकारून जाते. मालविकाग्निमित्रांत आधींच्या एक सोडून दोन राण्या आहेत. हीं सर्व नाटकें आनंदपर्यवसायीहि दाखविलीं आहेत. यावरून कालिदासाला या राजांचा निषेध अभिप्रेत नाहीं. वडील पत्नीनें पतीचें दुसरें लग्न आपण होऊन आनंदानें करवून द्यावें, किंवा पतीनें घरीं आणलेल्या सवतीस प्रेमानें वागवावें, ही गोष्ट फक्त हिंदु-समाजांत आढळणें शक्य आहे. खरेशास्त्री यांच्या अगदीं अलीकडच्या नाटकांतहि ह

ार निरपवादबुद्धीनें दाखविलेला आहे. पाश्चात्य रंगभूमीवर असलें
टक पहावयास सांपडणार नाहीं. पहिली बायको नवऱ्याचा किंवा
ऱ्या बायकोचा खून करते असेंच कदाचित् पाहावयास सांपडेल. पण
शिष्ट सामाजिक चालीचा उल्लेख म्हणून कालिदासानें हा केलेला नाहीं.
कुंतलांतील धीवर, ' जगांतील सर्व धंदे चांगले केले तर सारखेच
मान्य होत; धंद्यानें माणुसकीला कमीपणा येत नाहीं, ' असें म्हणतो.
ा यावरून स्वतः कालिदास हा मनानें ' डेमोक्रॅट ' होता असें अनुमान
ढणें धाडसाचें होईल. याचें कारण हेंच कीं, कवि किंवा नाटककार
शंकराचार्यांप्रमाणें वाटेल त्या भूमिकेंत ऐच्छिक परकायाप्रवेश करून
चा उत्कर्षच रंगवितो. चांगली ती अतिशय चांगली दाखवितो, वाईट
अतिशय वाईट दाखवितो; पण इतकें वैचित्र्य स्वेच्छेनें निर्माण करतो
, त्यांत त्याची स्वतःची आवडनिवड कळणें कठीण होतें. स्वभावाचीं
चित्र चित्रें निर्माण करण्यांतच त्याचें मुख्य कलाकौशल्य आहे. तात्पर्य,
गुणाचा विश्वप्रपंच अवघ्या बावन्न वर्णांच्या उलटापालटीनें बनलेल्या
ब्दांत कवि वर्णन करूं शकतो, इतरांना तें साधत नाहीं, हेंच कवीचें
शेष्ट्य. सात रंगांचीं शेंकडों मिश्रणें चितारी बनवितो तीं आपल्या
व्यबुद्धिबळावर. I mix my colours with brains ( मीं चित्रांच्या
ांत माझा मेंदू कालवितों ) हें एका मोठ्या चितान्याचें उत्तर प्रसि-
च आहे.

शेक्स्पिअरचें उदाहरण घेतलें तरी हेंच दिसून येईल. त्यानेंहि शेंकडों
मिका रंगविल्या आहेत. पण त्यांतून त्याला कोणती स्तुत्य व कोणती
द्य वाटली हें सांगतां येणें कठीण. हॅम्लेट हा ज्ञानी मूर्ख, ऑथेल्लो हा
 मूर्ख ! गटे हा हॅम्लेटला उदार तरुणांचा उत्कृष्ट नमुना म्हणतो, पण
तरे त्याला ' अति शहाणा बैल रिकामा ' असें म्हणतात. ऑथेल्लो इतका
ळा माणूस काय कामाचा ? पण दोघेहि वृत्तीनें खरे वीरच होत. दोन
जे, लियर व मॅकबेथ. एकाच्या दुःखाचें कारण लहरीपणा तर दुसऱ्याचें
खकारण महत्त्वाकांक्षा. दोन उमराव, एक सीझर व दुसरा कोरिओले-
स. दोघेहि दुर्दम, पण एक अहंकारानें गेला व दुसरा जग तुच्छ
नण्यानें गेला. सिंबेलाईन हा प्रापंचिक सुखी; प्रॉस्पेरो हा तत्त्वज्ञानाच्या
ानंदानें सुखी. दुष्टांच्या जोडींत आयागो हा प्रतिकारदुष्ट व तिसरा

रिचर्ड हा उपजतदुष्ट. शायलॉकला दुष्ट असें म्हणण्यांत येतें, पण त्यांच्या भूमिकेचा अर्थ पुष्कळांनीं असा केला आहे कीं, खिस्ती लोकांनीं ज्यू लोकांचा जो अमानुष छळ केला त्यामुळें दुष्ट बनलेल्या ज्यूचें एक उदाहरण शायलॉक होय, व मर्चंट ऑफ व्हेनिस नाटकाला ' ए प्ली फॉर टॉलरेशन ' असें नांव एकानें दिलें आहे. जॅकिअस हा तत्त्वज्ञानी विदूषक, क्लाऊन हा आनंदी विदूषक, व फॉलस्टाफ हा पाजी विदूषक— अशा तीन विनोदमूर्ति शेक्स्पिअरनें रंगविल्या आहेत. चाणाक्ष स्त्रियांपैकीं पोर्शिया ही शहाणी, रोझॅलिन्ड ही प्रेमळ, व बिॲट्रिस ही अल्लड चिमखडा अशी दाखविली आहे. तसेंच दुःखी स्त्रियांत डेस्डेमोना ही पतिव्रता, ऑफेलिया ही भोळवट कुमारी दाखविली आहे.

तात्पर्य, या व इतर अनेक भूमिका लक्षांत घेतां वैचित्र्य रंगविणें हाच शेक्स्पिअरचा मुख्य व प्रत्यक्ष हेतु, ध्येय सांगणें हा हेतु नव्हे असें वाटतें. डॉ. जॉन्सन यानें तर असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, शेक्स्पियर हा आपल्या नाटकांत भूमिकावर्णनाची सोय पाहतो, मग त्यानें सद्गुणांची गैरसोय झाली तरी चालेल. वाचकाचें रंजन झालें किंवा नाहीं हें तो पाहतो, तो वाचनापासून काय बोध घेईल हें पाहत नाहीं. भाषणांत जेथें जेवढा संबद्ध युक्तिवाद होईल त्यांतून जेवढी नीति प्रकट होईल तेवढीच. पण कवि स्वत: होऊन सद्गुणी व दुर्गुणी पात्रांत सुखदुःखाची न्याय्य वांटणी करीत नाहीं. वाईटाला उघड वाईट किंवा चांगल्याला उघड चांगलें असेंहि त्यानें म्हटल्याचें दिसत नाहीं. भूमिकावर्णनाच्या भरांत जें ज्याला मिळेल तें मिळेल.

सामान्यतः चांगल्या ध्येयांची कल्पना सर्वांना सारखीच असते व तत्त्वज्ञानी ती स्वतंत्र रीतीनें सांगूं शकतो. पण समजून सांगणें व मनाला पटविणें या गोष्टींना काव्यदृष्टीच असली पाहिजे. ज्ञानाच्या चार प्रमाणांत उपमान-प्रमाणाचा जितका उपयोग जगांत होतो तितका दुसरा कशाचा होत नाहीं. सर्व ज्ञानाचा उगम साधर्म्य किंवा वैधर्म्य यांच्या दर्शनापासून आहे. सर्व अलंकारशास्त्र साधर्म्य व वैधर्म्य या तत्त्वावरच रचलें आहे. जेथें गोष्ट समजून सांगावयाची तेथें अलंकाराच्या मदतीशिवाय कोणाचें पाऊलहि पुढें पडणार नाहीं. जेथें नुसतें शुद्ध तत्त्वज्ञान सांगावयाचें तेथेंहि काव्यबुद्धीचा आश्रय करावा लागतो; मग जेथें बोलून चालून कला-

लासाच्या दृष्टीनेंच कवि काव्य-नाटक लिहिण्यास बसला तेथें काव्यदृष्टि च मुख्य ठरेल यांत काय संशय ? ज्ञानेश्वरींतील उपमा काढून टाकून कीचा नुसता ग्रंथ वाचला तर त्यांतील सत्य किंवा उपदेश आहे तोच रेल, पण ज्ञानेश्वर देखील उपमा-दृष्टांत देतात तेव्हां काव्यदृष्टीच पत्करून तः रंगतात म्हणूनच दुसऱ्यास रंगवूं शकतात. अमृतानुभवांत तर उपमा ष्टान्ताविषयींचें हें विधान मनावर ज्यास्त ठसतें. कारण त्यांतील विषय ति गहन व उपमा–दृष्टान्तांना क्षेत्र थोडें असतांहि मुख्य भर व स्वारस्य ांतच आढळेल.

कालिदासानें सर्व शास्त्रांतील हीं उपमानें घेऊन तीं आपल्या कामास ावलीं आहेत. प्रणव, प्राक्तन, स्वाहा, स्वधा, श्रुतिस्मृति, श्रद्धा, शब्द-क्ति, चतुर्थाग्नि, धर्मगति, उत्सर्ग--अपवाद वगैरे सर्व प्रकारच्या शास्त्रां-ल उपमानें त्यानें घेतलीं. पण या ठिकाणीं त्यांना शास्त्राच्या दृष्टीनें हत्त्व नसून त्यांच्या समर्पकतेमुळें कालिदासाच्या काव्यदृष्टीलाच महत्त्व धिक. श्रीमान यजमानाच्या देवडीवरच्या सशस्त्र अरबांनीं चोर पळवून ावले तर यजमानानें स्वतःच्या मिशीवर पीळ काय म्हणून द्यावा ?

---

# १२ नाट्यकला

## ( नाशिक येथें भरलेल्या दुसऱ्या नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष या नात्यानें केलेलें भाषण )

### ( रंगदेवतास्तवन )

दन तव चरणीं असो रंगदेवते । तेजस्वी भरतपुत्र तव कृपामृतें ।। धृ० ।।
क्ष्मीपति रक्षि पहा अन्ययुगीं सुरां । रूपा धरि मोहिनिच्या श्रीगुणाकरा ।।
हार्थी दावि उमावरहि व्यतिकरा । अवतरलें भूवरि या नाट्यतत्त्व तें ।।वंद०।।
रतमुनी काढि चतुर्वेद मंथुनी । पाठ्य गीत रस अभिनय यांसि वेंचुनी ।।
तिहास लोकचरित त्यांत गुंफुनी ।दशरूपक सिद्ध करी भुवनविजयि तें ।।वंद०।।
सृतिची रंगसभा भुवनिं थाटली । भूषाही नैसर्गिक रम्य दाटली ।।
रनारी बालक नेपथ्यि विनटलीं । वर्णावें किति कौतुककारि वेष ते ।।वंद०।।
ावसूत्रिं कलि गुंफी हृदयमोहका । नवरसमय त्रिगुणचित्र संविधानका ।।

त्यामाजीं विविधविषयभूतभूमिका। पाहुनि मनिं धन्य न हो चरित कोण तें
॥ वंद० ॥

सम्मेलनागत भारतपुत्र व सभ्यगृहस्थ हो,—आपल्या या द्वितीय संमेलनाचें अध्यक्षस्थान मला दिल्याबद्दल मी आपला फार आभारी आहें. हें संमेलन बोलून चालून 'नाटक्यांचें' व त्याचा अध्यक्ष होणें म्हणजे एक बडा नाटकी म्हणवून घेणें इतकीच किंमत कित्येकांचे मतें या मानाची भरेल. माझें स्वतःचें मत तसें नाहीं. मी तरी हा एक विशेष प्रकारचा मान समजतों; व नाट्यकलेसंबंधानें मला विशेष ज्ञान नसतां व त्यासंबंधीं मी विशेष परिश्रम केलेले नसतां आपण हा मान मला दिलात याबद्दल मी विशेष आभारी आहें. भरत-कुलासंबंधानें पाहतां, मी जरी नाट्यविषयासंबंधानें थोडेंबहुत लिहिलें असलें तरी मी त्यांचा कुटुंबीय किंवा अंशभागी नाहीं. फक्त ऋणानुबंधी आहें; व ज्या ऋणाचे अनुबंधानें माझें मन प्रस्तुत विषयाकडे ओढतें तें ऋण म्हटलें म्हणजे नाटक या संस्थेचे द्वारें समाजास उच्च प्रकारच्या व ज्ञानमिश्रित अशा करमणुकींची जी लयलूट मिळते हें होय. अर्थात् नाट्यविषयासंबंधानें माझी जी भावना आहे तिच्या मुळाशीं समाजांतील व्यक्ति या नात्यानें कृतज्ञतेचें बीज आहे; व प्रस्तुतचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें जें मीं कबूल केलें तें त्यामुळें मिळणाऱ्या बहुमानाकरितां नव्हे, तर ही कृतज्ञता अंशतः दाखवावी व नाट्यकलेसंबंधानें माझ्या मनांत जो बहुमान वास करीत आहे तो व्यक्त करावा म्हणून. नाटकांचाच धंदा करणारे लोक व इतर जनसमाज यांचेमध्यें परंपरागत असें जें एक प्रकारचें असांनिध्य, एक प्रकारचा परकेपणा, किंवा तुटकपणा उत्पन्न झाला आहे, त्याचा परिणाम नाट्यसंस्थेवर फारच अहितकारक झाला असून तो हरप्रयत्नानें दूर झाला पाहिजे. सुशिक्षित व म्हणून बहुमानास्पद मानल्या जाणाऱ्या वर्गाच्या निकट संश्रयाचें वळण किंवा परंपरा पाडली असतां हें असांनिध्य नाहींसें करतां येईल, व नाट्यसंस्थांचा जो अपमान तोच आपला अपमान असें समाजास वाटावयास लागल्यानें या संस्था कालांतरानें श्रेष्ठ दर्जास चढतील अशी माझी खात्री आहे. अर्थात् अशा तऱ्हेचें वळण पाडण्यास आपल्या या संमेलनाचें अध्यक्षस्थान पतकरणें हें उपकारक आहे असें वाटल्यानें तें पतकरण्यास मला हौस वाटली. नाट्यविषयक ज्ञान मला विशेष नाहीं हें मी पूर्वी

सांगितलें आहे. पण सदरहु ज्ञानाची वाण जर मानसिक उल्हासानें भरून काढतां येणारी असेल तर ती भरून काढण्यास मी तयार आहें.

अलीकडे संमेलनाची तऱ्हा निघाल्यापासून हरतऱ्हेच्या धंद्याचे लोक वर्षांतून एक वेळ एकत्र जमून आनंदोत्सव व करमणूक करतात, तोच मार्ग आपण नाट्यमंडळ्यांनीं पतकरिला हें योग्यच आहे. तथापि, अशा प्रसंगीं होणाऱ्या आनंदोत्सवापेक्षां अगर करमणुकीपेक्षां एकत्र जमलेल्या, परंतु बहुविध विचारांच्या, लोकांचे विचार परस्परांस कळल्यापासून जो उपयोग होतो तो अधिक मौल्यवान् आहे. मुंबईस भरलेल्या संमेलनाचे प्रसंगीं आपण सर्व नाटकमंडळ्यांचे हिताकरितां 'भारतनाट्यसमाज' या नांवाची संस्था स्थापन केली व यामुळें अशा संमेलनापासून होणाऱ्या फायद्याचा पाया घातला असें म्हणण्यास हरकत नाहीं. या समाजाचे सभासद गेल्या वर्षांत किती झाले अथवा अशा रीतीनें सभासद झालेल्या नाटकमंडळ्यांकडून कबूल केल्याप्रमाणें किती वर्गणी जमली, नाट्यविषयक संग्रहालयासंबंधानें काय काय योजना झाली, परीक्षेस नाट्यविषयक पुस्तकें आलीं किंवा कसें, व त्यांची संभावना करण्याची काय व्यवस्था केली, गांवोगांव फिरणाऱ्या नाटकमंडळ्यांस काय अडचणी आल्या, व भारत-नाट्यसमाजाचे संयुक्त सहानुभूतीमुळें त्यांचा अंशत: तरी परिहार करण्यास मदत झाली किंवा नाहीं, नाटकमंडळ्यांस लागणाऱ्या मालापैकीं कितीसा माल ठरावाप्रमाणें मुद्दाम स्वदेशी वापरण्यांत आला—अर्थात् गतवर्षी भरलेल्या संमेलनाचे वेळीं जे ठराव पास करण्यांत आले त्यांचा अंमल कितपत व कशा रीतीनें सरसालांत झाला, या विषयींची माहिती समाजाचे चिटणीस रा. रा. बरवे यांजकडून मिळणारी आहे. व त्याबद्दल यंदाहि चर्चा व्हावयाची असल्याकारणानें मी त्यासंबंधानें आज विशेष बोलत नाहीं. परंतु जो एक विशिष्ट विषय या समाजानें हातीं घेतला पाहिजे, व अशा संमेलनाचे वेळीं ज्याची वाटाघाट होणें माझ्या मतें इष्ट व जरूरीचें आहे, तो विषय म्हटला म्हणजे नाटकमंडळ्या व बहुजनसमाज यांमधील संबंध हा होय.

या विषयाचा विचार करतांना एक गोष्ट प्रमुखत्वानें नजरेस येते ती ही कीं, आजकाल नाटकमंडळ्यांसंबंधानें लोकांची अनादरबुद्धि आहे; किंबहुना 'नाटक,' 'नाटकी' वगैरे जे अनेक शब्द नट् या धातूपासून साधलेले

आहेत त्या सर्वांस सरसकट एक प्रकारें निंदाव्यंजकत्व आलेलें आहे. कोणासहि थिल्लरपणासंबंधानें, हलकटपणासंबंधानें, ग्राम्यपणासंबंधानें किंवा अनीतिमत्तासंबंधानें उपमा द्यावयाची असल्यास त्यास 'नाटकी' एवढा एकच शब्द उच्चारला असतां काम होतें! ही स्थिति नाट्यसंस्थेचा पूर्वेतिहास अगर तिच्या आंगचे गुण व तिजपासून होणारा भावी फायदा या दृष्टीनें पहातां अत्यंत अयुक्त व शोचनीय आहे असें म्हणावें लागतें. आतां ही स्थिति फक्त हिंदुस्थानांतच आहे असें नाहीं. नाट्यसंस्थेच्या इतिहासाकडे पाहिलें असतां पृथ्वीचे पाठीवरील बहुतेक सर्व देशांत केव्हांना केव्हां तरी अशा प्रकारची स्थिति नाट्यसंस्थेस आलेली आढळून येते. उदाहरणार्थ, इंग्लंडांत सतराव्या शतकांत, फ्रान्समध्यें त्याचे पूर्वी व कांहींशी या शतकांत, स्पेनमध्यें पंधराव्या शतकापासून अगदीं अलीकडेपर्यंत, जर्मनीमध्यें सतरावे शतकाचे पूर्वी, चीनमध्यें बहुधा नेहमींच, व जपानमध्यें सुमारें वीस वर्षांपूर्वीपर्यंत हीच स्थिति स्थूल मानानें असलेली आढळून येते. परंतु या सर्व देशांत व या सर्व कालांत असामान्य व्यक्ति अगर विशिष्टपणाच्या संस्था अस्तित्वांत आल्यानें नाट्यसंस्थेस मधून मधून उज्ज्वल स्वरूप येऊन चमकून गेलेलें आहे; व या स्थित्यंतराच्या इतिहासावरून नाट्यकलेपेक्षां नाट्यविषयक धंदा करणारे लोकच व्यक्तिशः ती कला सुस्थितीस अगर दुस्थितीस येण्यास कारणीभूत होतात असें दिसून येतें. खुद्द शेक्सिपीयरचे वेळेस व तो प्रसिद्धीस येईपर्यंत नाट्यकमंडळ्यांबद्दल बहुमान यथातथाच होता असें म्हणण्यास हरकत नाहीं; नाटकमंडळ्या या राजाचे पदरीं असणाऱ्या खुषमस्कऱ्याचे किंवा त्याहूनहि हलक्या प्रतीचे लोकांत गणल्या जात असत. व दरबारच्या नोकरास ज्याप्रमाणें ठराविक पोषाख देत त्याप्रमाणें ग्लोब आणि ब्लॅकफ्रायर्स या नाटकगृहांत प्रयोग करणाऱ्या नांवाजलेल्या नाटकमंडळ्यांसहि देत असत. परंतु शेक्सपीयरमुळें ही स्थिति बरीच पालटली. फ्रान्समध्यें रॅसिन वगैरे नाटककार झाल्यापासून, इटलीमध्यें अलफेरी, जर्मनीमध्यें शिलर, स्पेनमध्यें लोपडी व्हॅगा वगैरे नाटककर्त्यांनीं उदात्त विचार, रसभरित काव्य व स्वदेशाभिमानादि गुण वगैरेंनीं परिपूर्ण अशीं नाटकें रचल्यापासून नाट्यसंस्थेबद्दल अर्थात् नाटक मंडळ्यांबद्दलहि प्रतिकूल ग्रह हळुहळु कमी होत चालला. रोमन इतिहासांतहि हाच प्रकार दिसून येतो;

व नाटकमंडळ्यांतून गुलाम वगैरे हलक्या प्रतीचे लोकांचा उपयोग करीत असत, ती स्थिति पालटून नाट्यकलेच्या भाग्याचे ऐन उमेदीचें वेळीं रॉसियस सारख्या नटास नाइटहुड अगर सरदारी मिळाली व सीझ-रसारख्या श्रेष्ठ पुरुषास नाटकग्रंथकार व नाट्यकलेचा पुरस्कर्ता असें म्हणवून घेण्याचा अभिमान वाटूं लागला. जपानमध्यें सन १८८७ पर्यंत नाटकमंडळ्यांचा माथा केवळ दुराग्रहामुळें उजळ झालेला नव्हता. परंतु नाट्य संस्थेचा उपयोग व कलाभांडार या दृष्टीनें तिचें महत्व लक्षांत घेऊन, त्यावेळचे फॉरिन मिनिस्टर काउंट इनोये यांनीं मुद्दाम आपल्या बागेंत त्यावेळची प्रसिद्ध नटमंडळी गार्डनपार्टीस बोलावून त्या ठिकाणीं त्यास जपानी बादशहा मिक्याडो यांचे पायावर घालून राजाची व त्यांची धूळभेट करविली; व असें केल्यानें नटवर्गाचा मार्ग कायमचा खुला होऊन आंगच्या गुणांचे प्रमाणानें जनसमाजाकडून त्यांस आदर मिळण्यास आडकाठी राहिली नाहीं. १८८७ सालापर्यंत खानेसुमारींत नटवर्गाची मोजणी पशुपक्षी संज्ञक गणनापद्धतीनें होत असे! परंतु अलीकडे तो सर्व मनु पालटला आहे. तात्पर्य, नाट्यसंस्था ही जोंपर्यंत गुणानें कमी होत असे, व नाट्यप्रयोग हलक्या दर्जाचे, व उदात्त विचाराच्या अगर विद्वान पुरुषांच्या मनास रिझविण्यास असमर्थ असत, तोंपर्यंत समाजामध्यें त्यांचा दर्जा सामान्यतः कमी प्रकारचा ठरत असे. परंतु वर दिलेल्या सर्व उदाहरणांहून हिंदुस्थानांतील नाट्यकलेची स्थिति थोडीशी वेगळी आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणजे नाट्यकलेस जो कमीपणा हल्लीं चिकटून राहिला आहे तो संस्कृत विद्येच्या ऐन उमेदीचे दिवसांत कधींहि जडलेला दिसून येत नाहीं; व तो सर्वस्वी आधुनिक आहे असें मला माझ्या अल्पबुद्धीला तरी वाटतें. हिंदुस्थानांत नाट्यविद्या इतर कित्येक देशांतल्याप्रमाणें मूळ उत्पत्तिस्थानीं धर्म-संबद्धच होती; व जुन्या मताचे अभिमानी लोक ज्यास साधारणतः शास्त्र असें मानतात त्या शास्त्रावरून पाहतां नाट्यसंस्थेची परंपरा सर्वस्वी बहुमानास्पदच ठरते. परंतु इतर देशांतील नाट्यसंस्थेपेक्षां हिंदुस्थानांतील नाट्यसंस्थेसंबंधानें एक विशेष ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. प्रो. बॉर्ड यांनीं जगाच्या सर्व देशांतील नाट्यकलेच्या इतिहासाची तुलना करून व नाट्यकलेचें रूप सदैव शुद्ध राहण्याबद्दल तिच्या नियाम-

कानीं घालून दिलेल्या नियमांची तारीफ करून खालीलप्रमाणें विधान केलें आहेः—

" The ministers of an art practised under such conditions could not but be regarded with respect or share the contempt or wrose which except among one other great civilized people, the Greeks, has everywhere at one time or another been the actor's lot."

— म्हणजे हिंदुस्थानांतील नाट्याचार्यांनीं घालून दिलेल्या पद्धती-मुळें व नियमांमुळें नटवर्गास जनसमाजानें बहुमानास्पद मानण्याखेरीज गत्यंतरच नाहीं. एक हिंदुस्थान व ग्रीस या दोन अपवादांखेरीज करून जगांतील सुधारलेल्या कोणत्याहि देशांत नटवर्ग निंदा व तिरस्कार यांस केव्हांना केव्हां तरी पात्र झालेला होता. किंबहुना याहूनहि वाईट प्रकारची संभावना त्याची झालेली होती. अशी जर वस्तुस्थिति आहे तर पूर्वपरंपरेस बाधक अशी आज तरी हिंदुस्थानांतील नटवर्गाची स्थिति कां असावी ?

हल्लीं नाटकमंडळ्यांसंबंधानें जो लोकांचा प्रतिकूल ग्रह आहे त्यास नाट्यकला व नाटकमंडळ्या या दोहोंतून नाटकमंडळ्याच अधिक कारणीभूत आहेत असें मानण्यास हरकत नाहीं. कारण, नाट्य कलेसंबंधानें पाहतां ती सर्व काळीं वंद्य व बहुमानास्पद मानली गेली होती. याविषयींचीं प्रमाणें पाहतां प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं, नाट्य-कलेची उत्पत्ति आमच्या शास्त्राप्रमाणें प्रत्यक्ष ब्रह्मदेवापासून झालेली आहे. भरतनाट्यशास्त्र या ग्रंथावरून पाहतां नाट्यशास्त्र हें मूळ ब्रह्मदेवानें सांगितलें व तेंच पुढें भरतमुनीनें इतर मुनींना सांगितलें. सर्व विद्यांचा अधिपति जो शंकर त्यानें चौदा वेळ आपला डमरू वाजवून त्यांतून ज्या चौदा विद्यांचीं मूळ सूत्रें प्रगट केलीं त्यांपैकीं नाट्यशास्त्र हेंहि एक आहे असें लोक मानतात; व ही उपपत्ति गतवर्षींच्या संमेलनाचे अध्यक्ष रा. रा. खापरडे यांनीं आपणांस सांगितलीच आहे. भरत मुनींच्या ग्रंथांत जो इति-हास दिलेला आहे तो येथें मी सांगत बसत नाहीं. परंतु मला विशेष रीतीनें जी गोष्ट नजरेला आणावयाची आहे ती म्हटली म्हणजे या ग्रंथांत व इतरत्र नाट्यासंबंधीं जीं उपपदें व जे वर्णनात्मक शब्दप्रयोग योजले

गेले आहेत ती होय. नाट्य हें ' ब्रह्मनिर्मित ' आहे एवढेंच नव्हे, तर त्याचें शास्त्र म्हणजे तो एक वेदच मानला आहे. तें वेदसंमत आहे, व त्याचें प्रयोजन सर्व वर्णांना सारखा उपयोग व्हावा हें आहे.

नच वेदविहारोयं संश्राव्यः शूद्रजातिषु ।
तस्मात् सृजापरं वेदं पंचमं सार्ववर्णिकम् ।।

अशा प्रकारची विनंति ब्रह्मदेवास करण्यांत आल्यामुळें ' एवमस्तु ' असें म्हणून ब्रह्मदेवांनीं योगबलानें चतुर्वेदांचें स्मरण करून धर्म्य, अर्थ्य, प्रशस्य, सर्वकर्मानुदर्शक, सर्वशास्त्रार्थसंपन्न, सर्वशिष्यप्रवर्तक अशा प्रकारचा पंचम वेद निर्माण करण्याचा संकल्प करून चतुर्वेदांगसंभव असा नाट्यवेद उत्पन्न केला. त्यांतील पाठ्य हें ऋग्वेदापासून घेतलें, गीत सामवेदापासून, अभिनय यजुर्वेदापासून व रस अथर्ववेदापासून घेतला. नंतर या शास्त्रानुरोधानें स्वर्गात देवादिकांनीं नाट्यप्रयोग केला; व भाषित, भाव, रस, रूप, बल, सिद्धि, आभरण वगैरे नाट्यप्रयोगास लागणारीं जीं साधनें तीं सर्व देवांनीं अंशतः आपणांतून काढून दिलीं. पुढें प्रयोगप्रसंगीं दैत्यांकडून विघ्न झालें तेव्हां नाट्यगृहांत निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या देवता उभ्या राहून त्यांनीं त्याचें रक्षण केलें.

नायकं रक्षतींद्रस्तु नायिकां तु सरस्वती ।।
विदूषकमथोंकारः शेषास्तुप्रकृती हरः ।।

परंतु पुढें ब्रह्मदेवांनीं राक्षसांची समजूत घालून व नाट्यवेदाचा हेतु राक्षसांस व देवांस तो सारखाच प्रिय होईल असें केलें, व असें सांगितलें कीं,

नानाभावोपसंपन्नं नानावस्थान्तरात्मकम् ।
लोकवृत्तानुकरणं नाट्यमेतन्मया कृतम् ।।
उत्तमाधममध्यानां नराणां कर्मसंश्रयम् ।
हितोपदेशजननं धृतिक्रिडासुखादिकृत् ।।
दुःखार्तानां समर्थानां शोकार्तानां तपस्विनाम् ।
विश्रांतिजननं काले नाट्यमेतन्मया कृतम् ।।
धर्म्यं यशस्यमायुष्यं हितं बुद्धिविवर्धनम् ।
लोकोपदेशजननं नाट्यमेतद्भविष्यति ।।

व इतकें सांगून पुढें जो शेरा मारला तो तर फारच अन्वर्थक आहे. ते म्हणतातः—

न तच्छ्रुतं न तत् शिल्पं न सा विद्या न सा कला ।
नासौ योगो न तत्कर्म यन्नाट्येऽस्मिन्न दृश्यते ॥

व असें सांगितल्यावरून दैत्यांचें समाधान झालें. नाट्यप्रयोग करणें हा एक विशेष विधि असल्याकारणानें तत्पूर्वी यज्ञ, होम, बलिदान, भोज्य, भक्ष्य, पान, रंगसंश्रय, रंगदेवतापूजन वगैरे गोष्टी कराव्या असें सांगितलें आहे. हा सर्व दैविक अथवा अलौकिक रीतीनें विचार झाला. परंतु

वेदविद्येतिहासानामर्थानां परिकल्पनम् ।
विनोदकरणं लोके नाट्यमेतम्दविष्यति ॥

ही भरतमुनीची प्रतिज्ञा तरी आपल्या प्रत्ययास येईल यांत शंका नाहीं.

न तथा गंधमाल्येन देवा मुह्यंति पूजिताः ।
यथा नाट्यप्रयोगस्थैर्नित्यं तुष्यंति मंगलैः ॥

याची प्रतीति आपणास येणें कठीण आहे. तसेंच मालविकाग्निमित्रामध्यें गणदास नांवाच्या नाट्याचार्यानें

देवानामिदमामनंति मुनयः कान्तक्रतुं चाक्षुषम्

या वाक्यानें नाट्यास देवादिकांचा 'चाक्षुष यज्ञ' अशी जी बहुमानाची पदवी दिली आहे, तिची यथार्थता कळली नाहीं तरी त्यानेंच पुढें म्हटल्याप्रमाणें:—

त्रैगुण्योद्भवमत्र लोकचरितं नानारसं दृश्यते ।
नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम् ॥

हें विधान तरी आपणास खास पटेल यांत शंका नाहीं. नाट्यकलेस संस्कृतविद्याविशारद लोक संस्कृत भाषेच्या ऐन ऐश्वर्याचे वेळीं कशा प्रकारें मानीत होते याची साक्ष अन्य रीतीनेंहि पटण्यासारखी आहे. नाटकें प्रत्यक्ष कोण करीत व पहात यासंबंधानें संस्कृत नाटकांतून जे उल्लेख सांपडतात ते नाट्यकलेबद्दल आपल्या पूर्वजांचें मत काय होतें हें शाबित करण्यास उत्तम तऱ्हेचा पुरावा होत यांत शंका नाहीं. सदरहु नाटकांच्या प्रस्तावना किंवा उपोद्घात हे वाचले असतां साधारणतः नाटकग्रंथकार व नटवर्ग यांचेसंबंधानें लोकमत कसें असावें हें दिसून येण्यासारखें आहे.

'विद्धशालभंजिके' च्या प्रस्तावनेंत तर त्या वेळच्या एका प्रख्यात नटाचा उल्लेखहि केलेला आढळतो. प्रत्यक्ष प्रयोगासंबंधानें पाहतां उत्तर-रामचरित्राचें सातवे अंकांत हॅम्लेट नाटकांतल्याप्रमाणें जें नाटकांत नाटक करून दाखविलें आहे तो प्रसंग ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. या प्रसंगीं खुद्द रामचंद्र आपल्या पुत्रांसह प्रेक्षकस्थानीं बसलेला असून रंगसभाभूत अशा वाल्मिकीच्या आश्रमांत सर्व स्थावरजंगमात्मक सृष्टीला स्वतः वाल्मिकी मुनीनें रचलेला प्रयोग पहाण्यास निमंत्रण झालेलें होतें. रंग-सभेची रचना करण्याचें काम लक्ष्मणाकडे होतें. प्रयोग खुद्द रामचंद्र व त्याची साध्वी स्त्री यांचे संबंधाचा होता. कथाभागांत पृथ्वी व गंगा या देवता प्रगट होऊन त्यांचें व सीतादेवीचें संभाषण होतें. त्यांत रामचंद्राची निंदा व सीतेचें पातिव्रत्य वगैरे गोष्टींचें निदर्शन होऊन शोकविव्हल झालेल्या सीतेस पृथ्वी व गंगा अंतरिक्षांत घेऊन जातात; व हा सर्व प्रयोग इतका उत्कृष्ट वठतो कीं, 'आर्य नाटकमिदम्' असा इशारा लक्ष्मण वरचेवर देत असतांहि, रामचंद्र प्रयोग पाहून करुणरसभरित होऊन मूर्च्छित पडतो, व नाटकांतील सीतेचा वृत्तांत पाहून रामाला आलेल्या मूर्च्छेचा परिहार प्रत्यक्ष सीतेला प्रगट होऊन करावा लागतो.

'विक्रमोर्वशीय' नाटकाचे तिसऱ्या अंकांत भरतमुनीचे शिष्य गुरु-सहवर्तमान स्वर्गांतून परत आल्यानंतर इंद्रसभेमध्यें झालेल्या एका नाटकप्रयोगाची हकीकत सांगतात हें पुष्कळांस माहीत असेलच. सदरहू नाटक खुद्द सरस्वतीनें रचलेलें असून त्याचें नांव 'लक्ष्मीस्वयंवर' असें होतें. प्रयोगांत उर्वशीनें लक्ष्मीची व मेनकेनें वारुणीची भूमिका घेतलेली होती. स्वयंवरसंबंधीं कथाभाग ऐन रंगांत आला असतां वारुणीभूत मेनकेनें लक्ष्मीभूत उर्वशीस 'तुला जमलेल्या देवांपैकीं कोणता आवडतो' असें विचारलें असतां तिनें 'पुरुषोत्तम आवडतो' असें ठरीव उत्तर द्यावयाचें तें न देतां मनांतील भावप्रबलतेमुळें जिव्हा ताब्यांत न राहतां 'पुरुषोत्तमा' चे ऐवजीं 'पुरुरवा' असें म्हटलें. अर्थात् भरतमुनींस तें न खपून त्यांनीं तीस शाप दिला, वगैरे मनोरंजक गोष्टी आढळतात. 'मालविकाग्निमित्रा' मध्यें प्रत्यक्ष नाटक जरी नाहीं तरी गणदास व हरदत्त या दोन नाट्याचार्यांनीं मालविकेस नाट्य शिकवून युक्तीनें तिला राजाचे नजरेस घालण्याकरितां मिथ्या कलह केला, व नाट्यगुणांची

परीक्षा करून निकाल देण्याकरितां परिचारिका नांवाच्या प्रतिष्ठित व नाट्यकलाभिज्ञ अशा स्त्रीची योजना केली होती.

तात्पर्य, नाटक करणें अगर पाहणें या गोष्टीस पूर्वी कमीपणा दिला जात नव्हता हें यावरून दिसून येण्यासारखें आहे. तसेंच सूत्रधार म्हणजे सर्व नटवर्गाचा प्रमुख व प्रतिनिधि मानला जातो व त्याचे अंगीं जे गुण असावे म्हणून नाट्यशास्त्रांत सांगितलें आहे त्या गुणांवरून पहातां नट-वर्गास कमीपणा येईल असें वाटत नाहीं. आतां नाटक ही किती झाली तरी बोलून चालून करमणूकच. तेव्हां अर्थात् गंभीररसात्मक अशा जीवि-तव्यवसायांचे मानानें पाहिलें असतां त्याची योग्यता कमी वाटणें स्वाभाविक आहे. परंतु नाटकाची योग्यता मुळीं करमणूक या दृष्टीनेंच पहावयाची असते. अनेक पदार्थांनीं युक्त असें भोजनाकरितां ताट वाढलेलें असतें. त्यांत मीठ किंवा लोणचें हें इतर पदार्थांचे मानानें थोडें असतें खरें. तथापि, त्यास खरोखर गौण किंवा हलकें असें मानतां येणार नाहीं. त्याचप्रमाणें नाटक ही एक केवळ करमणूक असल्यानें त्याचें सेवन गंभीररसात्मक जीवित व्यवसायाचे मानानें क्वचित व अल्पप्रमाणानें कर-ण्याचें असतें. परंतु एवढ्यावरून त्यास हलकेपणा येतो असें म्हणणें चुकीचें होईल.

नाटकासंबंधानें दुसरी एक गोष्ट अशी कीं वेषांतर ही एक प्रकारची थट्टा वाटते. विशेषतः स्त्रीवेषधारी पुरुषासंबंधानें पहातां एक प्रकारें अना-दर वाटतो. परंतु नाटक जर आपले पूर्वजांस अभिमत होतें असें मानलें, तर सर्व प्रकारचें वेषांतरहि त्यांस संमत होतें असें मानलें पाहिजे. स्त्रियांच्या भूमिका पुरुषांनीं घ्यावयाच्या नाहींत असें म्हटलें तर त्या स्त्रीयांनींच घ्यावयास पाहिजेत, व यासंबंधानेंहि पहातां, होतां होई तों नाटकप्रयोगांत स्त्री पुरुष मिश्रित समाज नसावा असें मत जरी हल्लीं प्रचलित आहे तरी स्त्रियांनीं स्त्रियांची भूमिका घेणें ही गोष्ट पूर्वकालीन नाट्याचार्यांना सर्वस्वी असंमत होती असें दिसून येत नाहीं. कारण भरतनाट्यशास्त्राच्या २६ व्या अध्यायांत खालील प्रकारचें विधान आढळतें:—

युद्धोद्धता वेगकृता संरभं बहुलाश्च ये ।
न ते स्त्रीभिः प्रयोक्तव्याः प्रयोज्याः पुरुषैस्तु ते ॥
अनुद्धतमसंभ्रांतमनाविद्धांगचेष्टितम् ।

लयतालकलोपेतं प्रमाणनियताक्षरम् ॥
सुविभक्तपदालापमनिष्ठरसकाहलम् ।
यदीदृशं भवेन्नाट्यं नारीणां तु प्रयोजयेत् ॥

यावरून स्त्रिया या नाटक प्रयोगांत घेण्यास पात्र मानिल्या जात असें दिसतें. तसेंच वर विक्रमोर्वशीय नाटकामधील जें विधान दिलें आहे त्यांत ऊर्वशीनें लक्ष्मीची म्हणजे स्त्रीनेंच स्त्रीची भूमिका घेतली होती; व अशा रीतीनें स्त्रीपुरुषमिश्र असा समाज नाट्यप्रयोगासंबंधानें कालिदासाचे वेळीं केवळ कल्पनातीत नव्हता असें उघड सिद्ध होतें.

आतां प्रेक्षकवर्गासंबंधानेंहि एक गोष्ट सांगितली पाहिजे. प्राचीन काळीं जे नाट्यप्रयोग होत त्यांतील नटवर्गांत स्त्रीपुरुषमिश्र समाज असो वा नसो, परंतु प्रेक्षकसमाज मात्र अशा तऱ्हेनें मिश्र असे यांत तिळप्राय शंका नाहीं. कारण, भरतनाट्यशास्त्राचे बाविसावे अध्यायांत सामान्याभिनयासंबंधानें विचार करतांना प्रथम साधारणतः ' लज्जाकर ' अशा ज्या गोष्टी त्या नाट्यप्रयोगांत दाखवूं नयेत असा निषेध करून पुढें त्या निषेधाचा हेतु खालीलप्रमाणें सांगितला आहेः—

पितृपुत्रस्नुषाश्वश्रु दृश्यं यस्मात्तु नाटकम् ।
तस्मादेतानि सर्वाणि वर्जनीयानि यत्नतः ॥

म्हणजे नाट्यप्रयोग पाहण्यास पिता, पुत्र, सासु, सुना जातात, या करितां लज्जाकर अशा सर्व गोष्टी प्रयोगांत वर्ज कराव्या. तसेंच मनुस्मृतींत परस्त्रीसंभाषणाचा निषेध करतांना प्रथम—

न संभाषा परस्त्रीभिः प्रतिषिद्धः समाचरेत् ।
निषिद्धो भाषमाणस्तु सुवर्णं दण्डमर्हति ॥

असें सांगून पुढें अपवादादाखल

नैष चारणदारेषु विधिः

असें सांगितलें आहे. व टीकाकार कुल्लूकभट्ट यानें ' चारणदारा ' या शब्दानें ' नाट्यगायकादिदारा ' असा अर्थ घेतला आहे, हें प्रस्तुतसंबंधानें ध्यानांत ठेवण्याचें आहे.

आतां शास्त्रवचनें किंवा नाटकग्रंथांतील उल्लेख वगैरे बाजूस ठेवले तरी नाट्यविषय हा हलका मानण्याचें कारण नाहीं असें सारासार विचारानेंहि दाखवितां येईल. पैकीं पहिली गोष्ट अशी कीं नाटकें हीं जगांतील उच्च-

मोत्तम काव्यांचें भांडार होत. साधारणतः प्रत्येक देशांतील कवी पाहिले असतां त्यांनीं रचलेलें काव्य बहुधा त्यांचे नाटकांतून सांपडतें; व जरी एखाद्या पहिल्या प्रतीच्या कवीनें नाटकें लिहिलीं नाहींत असें आढळतें, तरी त्यावरून त्या विवक्षित कवीचे अंगीं नाटयानुकूल अशी कल्पनासामग्री नव्हती एवढेंच फार तर अनुमान निघेल. परंतु उत्तम काव्य व नाटक-ग्रंथ यांचें नियमतः साहचर्य जें वर सांगितलें त्यास कोणत्याहि रीतीनें बाध येऊं शकत नाहीं. इंग्रजी भाषेंतील शेक्सपीयर, ड्रायडन, बेनजॉन्सन, गोल्डस्मिथ वगैरे कवी त्यांचे नाटकग्रंथांवरूनच प्रसिद्ध आहेत. व जॉन्सन, टेनिसन, ॲडिसन, ब्राऊनिंग, स्विनबर्न, ऑस्टिन वगैरे कवींनीं नाटकें लिहिलेलीं आहेत. जर्मनींत शिलर व गटे हे दोघे सर्वोत्तम कवी त्यांच्या नाटकग्रंथांमुळेंच प्रसिद्ध आहेत. इटालियन कवि डँटी यानें आपल्या कवित्वशक्तीस नाटयाचाच पेहराव दिलेला आहे. ग्रीस व रोम यांतील वीररसात्मक काव्य सोडून दिलें असतां बाकीचें बहुतेक काव्य नाटक-ग्रंथांतच आढळतें; व हिंदुस्थानांत तर कालिदास हा शाकुंतल नाटका-मुळें जितका प्रसिद्ध आहे तितका रघुवंश किंवा मेघदूत यामुळें प्रसिद्ध नाहीं. तात्पर्य, जगांतील बहुतेक उत्तम काव्य जर नाटकग्रंथांतूनच आढ-ळतें, तर नाटकाविषयीं जनसमाजाचा अनादर असणें फारसें संभवनीय दिसत नाहीं; व जी गोष्ट नाटकग्रंथांसंबंधानें तीच त्या नाटकग्रंथांचा प्रयोग करून दाखविणाऱ्या नटवर्गासंबंधानें असावी हें योग्य आहे.

नाटक हें मुख्यतः दृश्य काव्य आहे, म्हणजे त्यांत ऐकण्याचा भाग जरी असला तरी ऐकण्यापेक्षां पाहण्याचा भाग अधिक असतो; व दृश्य काव्य लिहिणारा जर आदरणीय आहे तर त्याचा हेतु सफल करणारा जो नटवर्ग तो आदरणीय कां होऊं नये यास कांहींच कारण नाहीं. नाटक-ग्रंथकार हा नाटक लिहिण्यानें जर निंद्य ठरत नाहीं तर त्या नाटकाचा प्रयोग व्हावा ही इच्छा तडीस नेणारा, व अशा रीतीनें नाटकग्रंथकार व जनसमाज यास अत्यंत अवश्य व उपकारक असा जो नटवर्ग तोहि केवळ धंद्याचे दृष्टीनें पाहतां निंदास्पद ठरविणें गैर होईल. जगांत तरी बहुतेक व्यवहारांत नाटक काय थोडें भरलें आहे ? भर समाजापुढें तात्पुरतें वेषां-तर करून म्हणजे झगा घालून, न्यायाधीशापुढें उसनीं भांडणें घेऊन द्रव्याकरितां अवघ्या एक दोन तासांत जो निरनिराळ्या दहा पांच भूमिका

घेतो, तो वकील नटच नव्हे काय? हा पहा आतां वादी तर पुढल्या क्षणास प्रतिवादी; आतां फिर्यादी तर लगेच आरोपी; या क्षणास सावकाराचे जाचानें गांजलेला व हप्तेबंदी मिळविण्याकरितां दारिद्र्यप्रदर्शन करून गयावया करणारा शेतकरी, तर लगेच शेतकरी अक्टामुळें धंदा बंद पडलेला व न्यायकोर्टाच्या हप्तेबंदीमुळें व दुष्काळामुळें रडकुंडीस आलेला सावकार होऊन सरकारच्या मदतीमुळें शेफारलेल्या शेतकरी वर्गाची आवेशानें निंदा करणारा सावकार; आतां रस्तेलूट झाल्यामुळें व मार खाल्ल्यामुळें दुःखी झालेली विधवा, तर पुढल्या क्षणीं मानभावीपणा करून आपला गुन्हा छपविण्याचा प्रयत्न करण्याकरितां साक्षिदारांची कसून उलट तपासणी करणारा अट्टल चोर; या क्षणास धर्मशास्त्राचे आधारानें दत्तकपुत्राचे हक्क सिद्ध करून दाखविणारा सल्लागार, तर पुढल्याक्षणीं दत्तकपुत्रानें पदभ्रष्ट केल्यामुळें सर्वस्वी ऐहिक अर्थास आंचविलेल्या मातेची कड घेऊन नीतितत्त्वें व सारासारविचार यांचे वळशावर वळसे उगाळणारा प्रतिनिधि—अशा वकिलाच्या एक का दोन भूमिका म्हणून सांगाव्या! या सर्व भूमिका करितांना व्यक्ति एकच असतां रस व रसानुकूल अभिनिवेश मात्र वेगवेगळे दाखविणाऱ्या वकिलास नट कां म्हणूं नये, व वकिली हें नाटक कां म्हणूं नये, हें मला तरी समजत नाहीं. तीच गोष्ट इतर कित्येक धंद्यांची. मोतींविक्या जेव्हां आपल्या मालाची स्तुति करतो, वाणी जेव्हां खोटा पासंग लाविला असतांहि पारडें गिऱ्हाइकाकडेच झुकतें आहे असें दाखवितो, तेव्हां तो एक प्रकारचें नाटकच करतो कीं नाहीं? वक्तृत्वोत्तेजक सभेपुढें परीक्षेस आलेला उमेदवार पुण्याचे नाटकगृहांत उभा असतां विलायतेंतील लोकांस उद्देशून जेव्हां भाषण करतो, किंवा सिसरो होऊन कॅटेलाइनचा अधमपणा रोमनसेनेटच्या नजरेस आणतो; किंवा हरिदास तीन हात लांब व एक हात रुंद अशा बैठकीवर कृष्णलीला वर्णन करतांना आपणच यशोदा, राधा, नंद, कृष्ण, पेंद्या, वाकड्या व नारदमुनीहि होऊन निरनिराळे रस रसानुकूल अशा भाषेनें व अभिनयानें आळवितो; अथवा सरकसवाला रिंगमध्यें उभा राहून आपल्या 'फूला' बरोबर क्षणभर नाठाळ घोड्याचा सवदा करण्याचा बाहणा करतो—तेव्हां तो तो मनुष्य, तो तो धंदेवाला नाटक करतो किंवा नाहीं? फार काय, पण लॉर्ड

कर्झन हे जेव्हां फॅन्सी ड्रेस बॉलमध्यें शंभर वर्षांच्या पूर्वीचे लॉर्ड वेलस्ली यांचें सोंग घेऊन सभेपुढें येतात, अथवा कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर हे कॉलेजांत विद्यार्थी असतां धर्मराजाचें सोंग घेऊन, समोरचे खुर्चीवर बसलेल्या आपल्या वडिलांसमक्ष पित्याच्या नांवानें तिळांजली देतात तेव्हां मात्र ती गोष्ट निंद्य होत नाहीं; परंतु तेच धंदेवाईक नाटकमंडळींत शिरून किंवा त्यांशीं तात्पुरता सहवास करून जर कोणी रंगभूमीवर येईल तर तो मात्र अक्षम्य गुन्हा मानला जाण्याचा संभव आहे. अर्थात् बिनधंदा करितां रंगभूमीवर येणें हें निंद्य न होतां धंदेवाईकपणानें तसें करणें हें निंद्य मानलें जातें असा सूक्ष्मभेद निघतो. परंतु नाटककारांचा धंदा तरी निंद्य कां मानला जावा? जर तो धंदा करणारा मनुष्य साधारण व इतर धंद्यांतील मनुष्यांप्रमाणें सद्गुणी—निदान दुर्गुणरहित—असला तर त्यास विशेष हलका मानण्यास वास्तविक काय कारण आहे?

खरोखर कोणताहि धंदा हा चांगला किंवा वाईट असणें हें त्या धंद्यावर अवलंबून नसतें, तर तें तो धंदा करणाऱ्या मनुष्यावर अवलंबून असतें. इंग्रजी मुत्सद्दी मि. चेंबर्लेन यांच्या प्रतिस्पर्ध्यानें एकदां सभेंत त्यांचा पाणउतारा करण्याकरितां त्यांवर वाग्प्रहार करून म्हटलें कीं, 'ठाऊक आहे तुमची मुत्सद्देगिरी! थोडे दिवसांपूर्वीपर्यंत स्क्रू (लोखंडी खिळे) करून विकीत असणारे तेच तुम्ही चेंबर्लेन कीं नाहीं?' त्यावर चेंबर्लेन हे शांतपणें म्हणाले—'माझ्या मित्रानें माझ्या धंद्याची खरोखर पुरी चौकशी केल्यासारखी दिसत नाहीं. कारण मी स्क्रूमेकर होतों हें खरें, परंतु स्क्रूमेकर होण्याच्या पूर्वी मी शूमेकर (चांभार) होतों.' शाकुंतलचे सहावे अंकांत मासे मारणाऱ्या कोळ्यास कोतवालच्या शिपायानें मासे मारण्याच्या धंद्यास उद्देशून "विशुद्धइदानीमाजीव!" म्हणजे "फारच चांगला तुझा धंदा बुवा' असा टोमणा दिला; त्यावर कोळ्यानें उत्तर केलें "सहजं किलयद्विनिंदितम् नखलु तत्कर्म विवर्जनीयम्। पशुमारणकर्मदारुणःअनुकम्पामृदुरेव श्रोत्रियः॥" अर्थात् धंद्याशीं व अंगच्या गुणांशीं मेळ असलाच पाहिजे असें नाहीं. वरील श्लोकांत 'सहज' याचा अर्थ उपजत 'जातीस' अनुलक्षून आहे. परंतु तोच शब्द उपजत 'गुणांचे' संबंधानें घेतला असतां सहज कर्म म्हणजे उपजत किंवा 'स्वाभाविक गुणानें प्राप्त' असा घेतला, म्हणजे वरील श्लोकच सर्व धंद्यांस लागू

करतां येईल. नाटकाचा धंदा करूनच हेन्री आयर्व्हिंग हा 'नाइट' झाला व जिवंतपणीं व मृत्यूनंतरहि त्यास त्याचे राष्ट्रानें सारखाच मान दिला. मिस एलेन टेरी या स्त्रीनेंहि गेलीं पन्नास वर्षें केवळ नाटकाचाच धंदा केला, व राष्ट्रीय कीर्ति संपादन केली. यावरूनहि पहातां जनसमाजाची सहानुभूति असेल तर आपल्या चारित्र्याचें दडपण धंद्यावर पाडून नटासहि उत्कृष्ठ यश मिळवितां येणें शक्य आहे असें दिसून येतें. आतां ही सहानुभूति मिळविण्याला पात्र होण्यास नटवर्गानें निर्व्यसनी बनलें पाहिजे एवढेंच नव्हे, तर जनसमूहांत बेमालूमपणें मिसळतां येईल व आपण लोकांचे डोळ्यांवर येणार नाहीं, अशा तऱ्हेचा आचार व भाषा अंगीं ठेविलीं पाहिजेत. त्यांनीं आपलें सुशिक्षण वाढविलें पाहिजे, व कलेच्या दृष्टीनें नाट्यकलेची सुधारणा करून तिला संपत्तिमान, सतेज, आणि सुंदर अशी केली पाहिजे. म्हणजे तिची आजची अपमानास्पद स्थिति हटकून नाहींशी होईल. हल्लींचा काल प्रगतीचा असून तो नाट्यसंस्थेस अनुकूल असाच आहे. कारण, नाटक हें समाजांतील सर्व जातींच्या लोकांना साधारण असें करमणुकीचें मुख्य साधन असल्यामुळें बुद्धिमान दूरदर्शी व देशभक्त मनुष्यानें कोणत्याहि प्रकारचें राष्ट्रीय शिक्षण देण्याचें मनांत आणिल्यास त्याला नाट्यसंस्थेइतकी उपयुक्त अशी दुसरी कोणतीहि संस्था सांपडावयाची नाहीं. तसेंच ललितकलांचा परिपोष यत्नतः करणें हें समाजसुधारकांचें व शिक्षकांचें मुख्य काम आहे, व नाट्यसंस्थेच्या आश्रयानें सर्व प्रकारच्या ललितकलांचा जितका परिपोष होतो तितका दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीनें क्वचितच होईल. गायन ही नाट्याची शय्याच होय असें नाटयशास्त्रकारांनीं म्हटलें आहे. तसेंच उत्तम चित्रकलेच्या प्रसादावांचून नाटयकलेची कार्यसिद्धि होणें नाहीं. उत्तम ओजस्वी असें वक्तृत्व हा तर नटवर्गाच्या अंगीं लागणारा मुख्य गुण. तात्पर्य नेपथ्यविधान, रसपरिपोषण, चित्रकलाप्रदर्शन व गायनद्वारा उच्चप्रतीचें मनोरंजन, या सर्व गोष्टी नाटयसंश्रित असल्यामुळें ललितकलांच्या सुधारणांस ही संस्था अत्यावश्यक होय. नाटयकला ही जुनीपुराणी शास्त्रसंमत व सामान्य अशी कला एकवेळ मानली गेली होती व तिचा आपण या नवीन कालांत उद्धार केला पाहिजे.

आतां याच विषयास धरून कांहीं थोड्या व्यावहारिक सूचना करा-

व्याशा वाटतात त्या मी करितों. नाट्यकलेंत बहुतेक सर्व ललितकलांचा समावेश होतो हें पूर्वी सांगण्यांत आलेंच आहे. चित्रकला, संगीत, नाट्य, नृत्य, वक्तृत्व, नेपथ्यरचना, काव्य, हीं सर्व चांगल्या नाटकाचीं अवश्य उपांगें आहेत; व या कलांत सुधारणा करण्यास आपणास नाट्यकलेचीच मुख्यतः सुधारणा केली पाहिजे. नाट्यकला ही जर अशिक्षित किंवा कनिष्ठ अशा लोकांच्या हातांत गेली तर तिजबरोबर या इतर कलांचेंहि मातेरें होण्याचा संभव आहे. हल्लीं मराठी रंगभूमीवर चांगल्या व वाईट अभिरुचीच्या लोकांत नाट्यकला काबीज करण्याबद्दल द्वंद्वयुद्ध सुरू आहे; व पैशाचा मोबदला देऊन असदभिरुचीचे लोक नाट्यकला हस्तगत करण्याचा प्रयत्न जारीनें करीत आहेत. अशावेळीं ही कला आपल्या हातीं ठेवण्याबद्दल सुशिक्षितांनीं ईर्षेनें झटलें पाहिजे; व या कामीं त्यांनीं ईर्षा धरली असतां त्यांचा विजय होईल यांत बिलकूल संशय नाहीं. कला या दृष्टीनें नाटक मंडळ्यांनीं आपल्या धंद्यांत हल्लींहून अधिक लक्ष घातलें पाहिजे; व हें करितांना स्वतःच्या स्फूर्ती प्रमाणें तिऱ्हाइतांच्या सूचनांचाहि त्यांनीं योग्य विचार व अंमल केला पाहिजे. हल्लीं अशी स्थिति आहे कीं नाटकमंडळ्या या वैय्याकरणां-प्रमाणें केवळ 'प्रयोगशरण' होऊन बसल्या आहेत; म्हणजे कोणा-च्याहि एखाद्या नाटकाचा प्रयोग एखाद्या मंडळीनें एकदां केला व तो साधारण बसला असें त्यांना वाटलें म्हणजे त्यांतील चाली रीति, गुण-दोष वगैरे सर्व वज्रलिखितप्राय होऊन जातात. त्यांमध्यें कसल्याहि प्रका-रची म्हणून सुधारणा करण्याची बुद्धि नंतर कोणास होत नाहीं. ही गोष्ट कै. आण्णासाहेब किर्लोस्कर यांची सुमारें २५–२६ वर्षांपूर्वी जीं नाटकें बसलीं त्यांचे प्रयोग आज मितीसहि अगदीं त्याच नमुन्याबरहुकूम वठ-विले जातात यावरून लक्षांत येईल. या गतानुगतिकत्वानें लोकांचे दृष्टीस व कर्णास वीट येण्याचा संभव आहे ही गोष्ट नाटकमंडळ्या लक्षांत घेत नाहींत. अभिनय, पदांच्या चाली, पोषाख व पेहेराव, सीनसीनरीची मांडणी व चटकदार खटके वगैरे सर्व गोष्टीसंबंधानें हें गतानुगतिकत्व दिसून येतें. फार काय पण ज्या पूर्वी प्रयोगांतील चुका म्हणून सिद्ध झालेल्या असतील त्यांचाहि अनुवाद व पुनरुक्ति या गतानुगतिकत्वामुळें करण्यांत आलेली आढळते! अनुकरण करणें हें नाट्यकलेचें मुख्य अंग

आहे खरें; तथापि नटवर्गानें कल्पनास्वातंत्र्य दाखविलें असतां त्यापासून त्यांचे कार्याची हानि न होतां उपयोगच अधिक होईल. सीनसीनरी संबंधानें मात्र अलीकडे बरीच प्रगती झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. व या बाबतींत आधुनिक नाटक मंडळ्या शेक्सपिअरच्या कालापेक्षां फारच पुढें गेल्या आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. तथापि, चित्रकला ही अनंत असल्यामुळें या कलेचे दृष्टीनें रंगभूमीवरील देखाव्यांत जितकी अधिक सुधारणा होईल तितकी इष्टच आहे.

नाटक प्रयोगाची लांबी कमी झाली पाहिजे. केवळ करमणूक या दृष्टीनें पाहिलें तरी पांच पांच सहा सहा तास प्रयोग चालणें हें इष्ट नाहीं. यामुळें नटवर्ग प्रेक्षकवर्ग लोकांसहि बेसुमार जागरण होतें. दिव्यांची उष्णता व लोकांची गर्दी यांनीं झालेल्या अशुद्ध हवेचें अतिरिक्त सेवन करावें लागतें. रंगभूमीवर केंद्रीकृत झालेल्या प्रखर अशा प्रकाशाकडे एकाग्र दृष्टी पांच पांच सहा सहा तास दिल्यामुळें डोळ्यांवर व मेंदूवर वाईट परिणाम होण्याचा संभव असतो. शिवाय लेखी प्रबंध लांबलचक असल्यामुळें तो कसातरी संपवून घेण्याकरितां नटवर्गास घाई करावी लागते यामुळें अर्थाची व रसाची हानि होते, व अखेर अखेर तर प्रेक्षकांची रसास्वादनशक्ति कमी होत जाते. इतके सर्व तोटे प्रयोग बेसुमार लांब झाल्यानें होतात. संगीतासंबंधानें पाहतां पद्यांचा अर्थ कळत नाहीं, सूरभरणा फार होतो, व यामुळें स्वाभाविक मानवी स्वरसौंदर्याची हानि होते. संगीत म्हणजे एकप्रकारचा नुसता सुस्वर गोंगट होतो याबद्दल, तसेंच गातांना राग आळवून रागाचें श्रोतृवृंदास सुशिक्षण देण्याची सुसंधि असतां ती दवडली जाते याबद्दल, जबाबदारी गायनकलानिपुण नटवर्गावर आहे. पदांतील अर्थ न कळल्यामुळें प्रयोगांतील संदर्भ तर मधून मधून सुटतोच, परंतु विशेषत: पद्यांतच कवीच्या प्रतिभाप्रेरित कल्पना ग्रथित केलेल्या असल्यामुळें त्या लोकांस समजत नाहींत ही मोठीच हानि होय. यास्तव एक विवक्षित सूचना अशी आहे कीं प्रत्येक पद्यांतील मुख्य मुख्य कल्पना तत्पूर्वी गद्यांत गोंवाव्या, असें केल्यानें कदाचित् कांहीं गोष्टींची द्विरुक्ति होईल, तरी पण त्याच्या योगानें काव्यकल्पना नीट समजेल व संदर्भहि सुटणार नाहीं. शब्दांत व अभिनयांत शृंगाररसाचा फाजिल परिपोष होतो हा एक अलीकडील प्रयोगांत बराच मोठा दोष आहे. रस या

दृष्टीनें शृंगार हा मनुष्यजातीला स्वभावतः प्रिय असला तरी भरसमाजांत बसून या रसाचा आस्वाद घेणें हें सदभिरुचीच्या मनुष्यास किळसवाणें वाटलेंच पाहिजे. शृंगाररसाच्या फाजिल परिपोषाचें समर्थन 'नाटक हें संसाराचें चित्र आहे,' या कोटीनें कित्येक वेळां करण्यांत येतें. परंतु हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं संसारांतहि शृंगाररसाचा अनुभव मनुष्य घेतो तो कांहीं चारचौघांत बसून घेत नाहीं. संसारांत स्त्री पुरुषांचा जो संबंध उघडपणें येतो तो शृंगार विषयक कधींच नसतो हें उघड आहे. अर्थात् प्रत्यक्ष संसारांत जितक्या प्रकटपणें शृंगार रसप्रवणक्रिया सभ्य मनुष्य करतो, त्या पलिकडे नाटकप्रयोगांत मजल जाऊं देणें हें वाईट असून नाटक म्हणजे संसारचित्र या तत्वासहि विघातक आहे. शिवाय हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं नाटकगृहांतील प्रेक्षकसमुदाय अत्यंत मिश्र असतो. यांत सर्व नात्यांचे, सर्व दर्जाचे व सर्व वयाचे स्त्री पुरुष व मुलें एकत्र बसलेलीं असतात व यामुळें शृंगार रसाचा परिपोष जितक्या अ-प्रकट, गूढ व फक्त सूचक अशा शब्दांनींच ग्रथित होईल तितका तो आदरणीय होईल.

नटवर्गासंबंधानें एक सूचना करावीशी वाटते ती ही कीं, आपल्या धंद्याचा प्रसंग वगळला असतां सर्व तऱ्हेनें समाजांतील एक सद्‌गृहस्थ या नात्यानें आपणास उत्तम मान्यता संपादन करतां येईल अशी महत्वाकांक्षा अवश्य धरावी; व त्यांनीं असें केलें तरच सुशिक्षित वर्गाचा व त्यांचा दिवसेंदिवस अधिक निकट संबंध होऊन हल्लीं त्यांच्या धंद्यास चिकटून राहिलेली समाजाची गौणबुद्धि पालटेल, व केवळ कलालोलुप म्हणून, पुढें मागें कॉलेज सोडल्यावरहि, सुशिक्षित पदवीधर नाट्यकलेचा अंगीकार करतील अशी मला आशा आहे. पुष्कळ वेळां माझ्या कल्पना दृष्टीसमोर खालीलप्रमाणें देखावा दिसतो. एखादा सुशिक्षित पदवीधर, समजा एम्. ए. अगर एल्. एल्. बी., स्वतंत्र धंद्यांत अगर नोकरींत दरमहा पांच चारशें रुपये मिळवितो; त्यास नाट्यकलेचा नाद आहे; व तो केवळ शौकाकरितां एखाद्या प्रतिष्ठित नाटक मंडळीचा भागीदार किंवा उपकर्ता झालेला आहे. तो आपल्या शहरीं मंडळी असे तोंपर्यंत आठवड्यांतून एक वेळ प्रयोगांत आपला पार्ट करितो. शनवारीं संध्याकाळीं जरा लव-कर जेवण करून तो आपल्या गाडींत बसून प्रयोगाचे वेळेपूर्वी एक तास-

भर नाटकगृहांत येऊन दाखल होतो, खिदमतदाराचे हातीं घोडा देऊन तडक नाटकगृहांतील आपल्या खोलींत जातो, व पेहराव पालटून आपली भूमिका करितो. खेळ संपतांच फिरून आपला वेष पालटतो व मंडळींत बसून काफीचा पेला घेत घेत प्रत्येक पात्रास त्याचे गुणदोष सांगून एकंदर प्रयोगाबद्दल चर्चा करून फिरून आपले गाडींत बसून घरीं जातो, व दुसरे दिवशीं सकाळपासून पूर्ववत् समाजांत मिसळून जातो. अशा तऱ्हेचीही गोड कल्पना अमलांत आणणें हें नटवर्गावर अवलंबून आहे.

एका सुभाषितकारानें म्हटलें आहे कीं:—

मौलिः स्वर्णकिरीटकांतिरुचिरौ केयूरभव्यौ भुजौ
त्वद्भृत्याः किल कुंचुकीप्रभृतयो देवेति विज्ञाप्यसे ।
इत्थं कल्पनया कुशीलच नृपाहंकारदार्ढ्यं वृथा
नृत्यांते भवतो भविष्यति मसीमात्रावशेषं वपुः ॥

कवि म्हणतो कीं "हे नटा ! तूं राजाची भूमिका ज्यावेळीं घेतोस तेव्हां तुझें मस्तक सुंदर अशा सोनेरी किरीटाचे कांतीनें शोभत असतें, तसेंच बाहुभूषणें घातल्यानें तुझे भुज किती तरीं भव्य दिसतात, त्यावेळीं कंचुकी वगैरे तुझे नोकर 'महाराज इकडून यावं, ही वाट आहे' असें म्हणत तुझ्यापुढें नाचतात. या क्षणिक वैभवाला भुलून जर तुझ्या मनांत अहंकार उत्पन्न झाला तर गड्या तो मात्र फुकट आहे. कारण भूमिकेचें काम संपून तूं ही सर्व वेषभूषा काढून ठेविलीस म्हणजे तुझ्या अंगावरचें राजवैभव जाऊन घाणेरडा रंग मात्र अंगावर राहतो!" मी तर असें समजतों कीं ही मसी व म्हणजे खरोखरीचा घाणेरडा रंग व लाक्षणिक अर्थानें पाहतां नटवर्गाची समाजाकडून होणारी जी निंदा, त्या मसीचा कुकलंक नटवर्गाला फक्त एकाच रीतीनें धुऊन काढतां येईल. म्हणजे तो ज्या निरनिराळ्या भूमिका घेतो त्यांचे ठिकाणीं ग्रंथकर्त्यांनें जे आदरणीय गुण ठेविले असतील ते आपल्या अंगीं आणिल्यानें तो काळिमा धुऊन टाकितां येईल, व नटवर्गानें आपल्या धंद्याबद्दल जर कांहीं प्रायश्चित्त घेणें जरूर असलें तर तें एवढेंच होय. ज्याला ईश्वरानें नाटकांतील नायक अगर नायिका यांच्या भूमिका करण्यास योग्य असें रूपसौंदर्य, आवाज, अगर वक्तृत्व दिलें त्यांनीं त्या गुणांची प्रौढी न करितां ज्या नायक नायिकांच्या शरीरामध्यें ईश्वरकृपेनें एक प्रकारें परकाया–प्रवेश त्यास करितां

आला त्यांचे फक्त गुण घेऊन, त्या भूमिकांतून त्यांनीं बाहेर पडावें. राजाची भूमिका घेणारानें धैर्य, औदार्य, शौर्य, वगैरे गुण आपलेसे करावे, नायिकेची भूमिका घेणारानें क्षणिक गुणीभूत असा जो लिवलिवितपणा व मवाळी हीं टाकून देऊन स्त्रीजातीस भूषणभूत असे दया, क्षमा, प्रेमळपणा, सात्त्विक वृत्ति, सहनशीलता व भक्ति, वगैरे गुण आपलेसे करण्याचा प्रयत्न करावा. अशाच रीतीनें इतर भूमिका करणारांनींहि करावें. व हे समाजोपयोगी गुण आपलेसे केले तरच हल्लीं नटवर्गाच्या धंद्यास जें एक कांहीं कारणानें थोडेसें गौणत्व येऊन राहिलें आहे त्याची त्यांनीं निष्कृति आपल्याकडून योग्य तितकी केली असें म्हणतां येईल.

---

## १३ नाट्यवस्तु विचार

### ( 'रंगभूमि' सप्टेंबर १९०७ )

नाटकाचा विषय काय असावा हा एक नेहमीं उत्पन्न होणारा प्रश्न आहे; व त्यासंबंधानें एका विवक्षित दृष्टीनें विचार करण्याचें मीं आज योजिलें आहे. साधारणतः नाटकविषयांचे १ दैविक किंवा अद्भूत व २ मानवी किंवा स्वाभाविक असे दोन स्थूल विभाग करितां येतील; व यांपैकीं वाटेल त्या प्रकारचा विषय घेऊन मनोरंजक असें नाटक चतुर नाटककारास रचितां येईल. परंतु या बाबतींत केवळ शक्याशक्यतेपेक्षां रूढि व सदभिरुचि यांच्या दृष्टीनें पाहतां मानवी व स्वाभाविक असे विषयच लोकांस आजकाल अधिक पसंत पडतील असें वाटतें. वर जे नाट्यविषयाचे दोन स्थूल भेद सांगितले आहेत ते मुख्यत: रचनापद्धतीसंबंधाचे आहेत; केवळ कथाप्रसंगाचें स्थल, त्याचा काल व त्यांतील पात्रें यांस अनुलक्षून तो भेद केलेला नाहीं. विषय पौराणिक दैविक किंवा अद्भुत असा घेऊनहि जेथें प्रतिपादन व रचना या सर्वस्वीं मानवी पद्धतीनें केल्या आहेत, तेथें अशा नाटकास दैविक किंवा अद्भुत या वर्गांत न घालतां मानवी किंवा स्वाभाविक या वर्गांतच घालणें अधिक योग्य होईल. देवदानवांची कथा अगर यक्षकिन्नर यांची गोष्ट, अथवा भुतें

खेतें वेताळ व मांत्रिक यांचा प्रसंग—असा विषय घेऊनहि जरी नाटकांतील भाषणांत व क्रियेंत मनुष्यस्वभावामध्यें सांपडणारेच गुणदोष, मानवी दृष्टीचीच शक्याशक्यता, मानवी तर्कशास्त्रानुरूप अशीच अनुमानपद्धति व व्यवहारिक कार्यकारणभाव अशाच भासल्याची रचना झालेली असेल तर तें नाटक अद्भुत म्हणतां येणार नाहीं. उलटपक्षीं विषय मात्र घेतला आहे व्यावहारिक, व आंतील रचना व योजना पहावी तर मात्र असें दिसून येतें कीं कार्यकारणभावाचा सर्वस्वी फराळ केलेला, शक्याशक्यता वाटून तोंडीं लावण्यास घेतलेली, व पावलोंपावलीं 'God in the Machine' शीं गांठ—असल्या ठिकाणीं फक्त नाटकपात्रांचीं नांवें आधुनिक आहेत किंवा स्थळ व काळ हे तुमच्याआमच्या परिचयाचे आहेत एवढ्यावरूनच तें नाटक अद्भुत नाहीं असें म्हणणें चूक होईल. नाटकांचा तिसरा एक प्रकार असा आहे कीं, त्यांत नाटककर्त्यांचे अंगीं अवश्य तें रचनाचातुर्य नसल्यानें अद्भुत व स्वाभाविक याचीं उगीच विनाकारण गुंतागुंत व व्यर्थ घोंटाळा झालेला असतो; आणि धड अद्भुत किंवा स्वाभाविक यांपैकीं एकहि प्रकारचें चित्र चांगलें वठत नाहीं. हा तिसरा प्रकार सर्वथा टाकाऊ होय. एक निव्वळ अद्भुत (Romantic) तरी खपेल आणि मग त्यांत अद्भुतत्व जितकें अधिक भरेल तितकी गोडीहि जास्त येईल. किंवा दुसरें निव्वळ स्वाभाविक तरी खपेल; व तें जितकें अधिक Realistic असेल तितकें चालेल. परंतु ज्यांत दोहोंची भेसळ झालेली असून दोन्हीच्या स्वरूपांचा लोप झालेला आहे असा हा धेडगुजरी तिसरा प्रकार मात्र सर्वस्वीं अयुक्त होय.

अद्भुत प्रकारच्या नाटकविषयांपेक्षां स्वाभाविक असेच विषय सद्‌भिरुचीस पसंत पडतील असें मी वर दर्शविलें आहे; व याचें कारण असें आहे कीं, मनुष्याचे मनावर कार्यकारणभावाचा परिणाम जितका ठसतो तितका अद्भुत व अतर्कित अशा घटनांचा परिणाम ठसत नाहीं. मनुष्यानें आपल्या कल्पनाशक्तीस जरी कितीहि भरारी मारूं दिली तरी तिची मजल कांहीं मर्यादेपलीकडे जाऊं शकत नाहीं. यामुळें एका ग्रंथकारानें म्हटल्याप्रमाणें, मनुष्यास जरी देव व देवदूत यांच्यामधील काल्पनिक संवाद वदवावयाचा झाला तरी तो मानवी प्रमाण—प्रमेयला अनुसरूनच वदवील. दुर्बिणीच्या तोंडीं ज्या प्रमाणाचें भिंग असेल त्याप्रमाणानेंच त्यांतून लांबचें

दिसणार, उजेड घ्यावयाची जेवढी खिडकी असेल तितक्या बेताचाच उजेड आंत येणार, मग बाहेर उजेड किती कां पडेना ? मनुष्याला स्वतःच्या शक्तीबाहेरच्या अशा भौतिक चमत्कारांची कदाचित् कल्पना करितां येईल. आज त्यास इकडचा डोंगर तिकडे करितां येत नाहीं किंवा विमानांत बसून आकाशांत प्रत्यक्ष प्रवास करितां येत नाहीं असें असतांहि एकादें अद्भुत नाटक लिहून तो असल्या पात्रांकडून याहि गोष्टी घडवून आणील; परंतु अध्यात्मिक बाबतींत मानवी मानसशास्त्र सोडून पलीकडे त्याच्यानें धांव घेववणार नाहीं. दुसरें असेंहि म्हणतां येईल कीं, ज्याला आपण खरोखरच अद्भुत म्हणूं असें सृष्टींत फारच थोडें असतें. सृष्टींत सर्वत्र कार्यकारणभावाचाच अम्मल व प्रभाव पावलोंपावलीं दिसून येतो; व यामुळें ' नैसर्गिकाचा उत्कर्ष ' व ' अद्भुताचें नित्यस्वरूप, ' यांची बहुधा समव्याप्तिच आहे असें आढळून येईल. तात्पर्य शब्दार्थ न समजून ज्याला आपण अद्भुत म्हणतों असेंच ' अद्भुत ' फार, व म्हणून हें अद्भुत सुद्धां स्वाभाविकाप्रमाणेंच सदभिरुचीच्या अमलांतून पार जाण्यासारखें नाहीं.

असो; तर मग सदभिरुचि हेंच मुख्य प्रमाण मानलें तर नाटकविषय कसा असावा ? म्हणजे स्थल काल रचना यांसंबंधानें त्याला असे कांहीं नियम आहेत कीं नाहीं कीं जे सदभिरुचीच्या कांट्यानें तोलले असतां त्यांच्या गुणदोषांच्या न्यूनाधिक्याचा सप्रमाण निर्देश करितां येईल ? आतां सदभिरुचि हीच गोष्ट मुळीं युगांतरानें बदलणारी आहे असें कोणी म्हणतील व ही गोष्ट कांहीं अंशीं खरीहि आहे. तथापि, आपणास सर्व युगांतील निरनिराळ्या सदभिरुचींची एकवाक्यता आज करीत बसण्याचें नसून फक्त आजच्या प्रचलित युगांतील सदभिरुचीच्या दृष्टीनें या नियमांबद्दल कांहीं म्हणतां येण्यासारखें आहे कीं नाहीं एवढेंच पहावयाचें आहे. प्रत्येक देशांतील वाङ्मयांत नाटकशास्त्रासंबंधाचे ग्रंथ आहेत; व नाटकवस्तूचे स्थळ, काळ, वगैरे संबंधानें कांहीं नियम असावे अशी बुद्धि त्या त्या वाङ्मयांतील ग्रंथकारांमध्यें सर्वसाधारणपणें दिसून येते. नाटक ही कांहीं तरी बेताल बेतंत्र गोष्ट आहे अगर असावी असें कोणासच वाटलेलें दिसत नाहीं. निरंकुश अशा काव्यवन–मतंगांनींहि शिष्टसंमत नियमांचे तीक्ष्ण अंकुश आपल्या गंडस्थलावर रोवलेले असल्यास तें भूषणास्पदच आहे

अशी कबुली दिलेली आहे. या नियमांपैकीं एक मुख्य नियम असा आहे कीं नाटयवस्तुगत काल, स्थल, व कथानक या प्रत्येकाच्या घटकांमध्यें द्वैत किंवा अनेकत्व दिसून येऊं नये तर अद्वैत दिसून यावें. या नियमालाच The Law of Unities असें इंग्रजींत म्हणतात. तर हें अद्वैत म्हणजे खरोखर काय, व तें कितपत साधतां येणें शक्य आहे याबद्दलच आज मला दोन शब्द लिहावयाचे आहेत.

जेव्हां नाटकविषय 'अद्भुत किंवा दैदिक' या वर्गाखालीं येणारा नसेल तेव्हां नाटकास संसाराचें चित्र असें म्हणतां येईल. परंतु एका विवक्षित नाटकांत सदभिरुचीस न सोडतां संसाराचा तरी केवढा भाग दाखवितां येणें शक्य आहे ? 'संसार' याचा विस्तृत अर्थ घेतला असतां जगाच्या उत्पत्तीपासून लयापर्यंत सर्व अवधीचा, व जगाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंतचा समावेश त्या शब्दांत करितां येईल. परंतु या येवढया अवधीचें अगर विस्ताराचें नाटक कसें दाखवावयाचें ? आपल्या जुन्या नाटक मंडळ्या दशावतारी खेळ करून दाखवीत असत; व अर्थात् दशावतारांमध्यें सर्व सृष्टीचा साद्यंत इतिहास आला हें कबूल आहे. परंतु हे देशावतार कसे दाखवीत हें ज्यास माहीत आहे त्यास हे नाटकप्रयोग पसंत पडतील, निदान ते परिणत अशा सदभिरुचीस धरून आहेत असें म्हणतील, असें वाटत नाहीं. हे दशावतार दाखवावयाचे म्हणजे दहादां पुढचा पडदा सोडून व उचलून निरनिराळे दहा देखावे दाखवावयाचे इतकेंच काय तें. सर्व सृष्टि सोडली तरी एकाद्या देशाचा, शहराचा, कुटुंबाचा, किंबहुना एका मनुष्याचा साद्यंत इतिहास एका नाटकांत दाखवितां येणें शक्य नाहीं. तसेंच सृष्टीपैकीं अमुक एका इयत्तेच्या भागाचा व अमुक एका इयत्तेइतक्या कालावधीचा इतिहास एका नाटय 'वस्तूंत' ग्रथित करावा असाहि नियम करितां येणार नाहीं; परंतु इतकें सांगतां येतें कीं नाटकांत मुख्यत: मानवचरित्र दाखवावयाचें असून एक अगर अनेक मनुष्यांच्या चरित्रांतील कांहीं विवक्षित भागांत जेवढया सृष्टीचा समावेश होणें शक्य असेल तितका भाग नाटकवस्तुविषय होण्यास हरकत नाहीं. या एक अगर अनेक मनुष्यांच्या चरित्राचे अनुषंगानें स्थल व काल यांचे वैचित्र्याची 'प्राप्ति' होते; व या वैचित्र्याचें नियमन सदभिरुचीस अनुसरून करण्याचे इच्छेनें Unities चा वाद उत्पन्न होतो. या बाबतींत निरनिराळ्य

वाङ्मयांतील नियमांची एकवाक्यता होत नाहीं. परंतु त्याहूनहि लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं ज्या वाङ्मयांतील नियम त्याच वाङ्मयांतील ग्रंथकारांनीं प्रायः झुगारून दिलेले आढळतात. भरत—नाट्य-शास्त्रांत एक स्थूल नियम असा दिला आहे कीं नाटकवस्तुगतकाल सूर्याचे एका परिभ्रमणाहून म्हणजे एक वर्षाहून अधिक असूं नये. परंतु या नियमाचे परिपालनापेक्षां त्याचें उल्लंघन अधिक वेळां झालेलें आढळून येतें; व सदर एक वर्षाचा नियम अगदींच स्वैरबुद्धीनें घालून दिलेला असल्यामुळें तो पाळला जाणें शक्य नाहीं. व जी गोष्ट कालासंबंधानें तीच स्थलासंबंधानेंहि समजावी.

नाटकांतील काल एकच असावा, म्हणजे नाटकांतील कथानकांचा आरंभ व शेवट यांमध्यें अमुक एक मर्यादेपर्यंत अल्पकाल जावा हें कांहीं तरी स्वैरबुद्धीनें ठरविणें अप्रयोजकपणाचें आहे; तसेंच निरनिराळ्या नाटकांमधील कथानकाच्या आद्यंतांमध्यें किती काल गेलेला सांपडतो हें पाहूनहि या बाबतींत एकादा संख्यात्मक नियम ठरविणेंहि कठीण आहे. या दृष्टीनें आम्हीं बऱ्याच नाटकांचीं संविधानकें लक्षांत घेऊन पाहिलीं तों खालीलप्रमाणें वैचित्र्य दिसून आलें. या वैचित्र्यपटाचे दोन टोंकांस दोन प्रकारचे ग्रंथकार असलेले आढळतात. एका बाजूस मोलियर, लेसिंग व लेसिंगचे मतानुयायी व दुसऱ्या टोंकास बाण भट्ट वगैरे. कालगत व स्थलगत अद्वैत किंवा ऐक्य या तत्त्वासंबंधीं लेसिंग वगैरेंनीं इतकें बंड माजविलेलें आहे कीं त्याच्या व त्याच्या अनुयायांच्या कित्येक नाटकांतील कथाभाग फक्त एक दोन प्रहरांत व एकाच घरच्या एका दिवाणखान्यांत घडून आलेलाहि दाखविला असतो. नाटककारांचा हा वर्ग वैचित्र्याचा शत्रु म्हटला तरी चालेल. दुसरे टोंकास बाणाची कादंबरी (शापसंभ्रम नाटक). यांत तीन जन्मांचें चरित्र एका सात अंकी नाटकांत गोंवलेलें दिसून येतें. याहि अंकांपैकीं पहिल्या चार अंकांत एक जन्माचें चरित्र असून पुढील तीन अंकांत दोन जन्म दाखविले आहेत. या दोन टोंकांच्या दरम्यान बरेंच वैचित्र्य दिसून येतें. She stoops to Conquer ('विजयजिगीषा') या प्रहसनांत एका रात्रीचा कथाभाग आहे. कीचकवध नाटकांत चार दिवसांची हकीकत आहे. Romeo and Juliet मध्यें चार दिवसांचाच सारा खेळ आहे. 'मृच्छकटिकां' तील कालावधि सुमारें

१ महिन्याचा असावा. 'वीरतनयां' त वस्तुकाल १०।१५ दिवसांचा असावा. 'सौभद्रां' त वाटेल तर हा १० दिवसांचा म्हणावा किंवा ४ महिने म्हणावा. 'मतिविकारां' त सुमारें एक महिना, 'प्रणयमुद्रे' त व 'त्राटिकेंत' जवळ जवळ तितकाच 'भीमदेव' 'Pizarro' मध्यें सुमारें एक महिना, 'मुद्राराक्षसां' त सुमारें ४।६ महिने, 'हरिश्चंद्र' नाटकांत दोन महिने—तात्पर्य नाट्यवस्तुकाल एक वर्षाचे आंत असलेल्या नाटकांचीं उदाहरणें हीं होत. याहून अधिक मर्यादेचीं उदाहरणेंहि पुष्कळ आहेत. शाकुंतलांतील कथाभाग ६ वर्षांचा, विक्रमोर्वशीयामधील आठ वर्षांचा, ''संभाजी' नाटकांत आठ वर्षांचा, 'उत्तररामचरितांत' तेरा वर्षांचा, 'चंद्रहास' नाटकांत वीस वर्षांचा, व 'विकल्पविमोचन' (Winter's Tale) मध्यें २२।२५ वर्षांचा आहे. ही कालगणना अर्थात्च स्थूलमानानें आहे हें उघड आहे; व ती साधारणतः त्या त्या नाटकांतील गोष्टींच्या धोरणानें केलेली आहे. परंतु यांपैकीं प्रत्येक नाटकांतच असा अंतर्गत पुरावा सांपडण्याचा संभव आहे कीं त्यामुळें या कालगणनेस कदाचित् अपवाद येईल. कारण सर्वच नाटककर्ते आपल्या कथानकांत बरोबर किती कालावधि जावयाचा हें ठरवून, व नाटकाचे कथानकास आरंभ कोठें होत आहे, त्याचा मध्य कोठें व शेवट कोठें हें लक्षांत घेऊन लिहिते तर मग या कालगणनेंत फरक पडण्याचा संभव नव्हता. परंतु या गोष्टीकडे नाटककर्त्यांचें पुष्कळ वेळां अगदीं दुर्लक्ष असतें. ते आपल्या रंगांत आले म्हणजे मग वाटेल तशीं वर्णनें करितील व वाटेल तसा कालदर्शक गोष्टींचा उल्लेख करितील. त्यांस पूर्वापार संदर्भाची आठवणहि रहात नाहीं. आणि असें झालें म्हणजे मग परस्परविरुद्ध अशा गोष्टींस मुळींच वाण नाहीं.

असो. तर मग नाटकांतून जर 'नाट्यवस्तुकाला' चा अवधि इतका बदलूं शकतो तर मग सदभिरुचीस अनुसरून प्रमाणीभूत असा नियम यासंबंधानें बांधतां येईल काय? व 'वस्तु'—गत कालासंबंधीं अद्वैत असावें असा जो नियम आहे त्याचा अर्थ तरी काय करावयाचा? असा प्रश्न उद्भवतो. व तोच प्रश्न स्थल वगैरे संबंधानें विचारतां येण्यासारखा आहे.

नाट्यवस्तुगत स्थल, काल अगर कथा यांपैकीं प्रत्येक अमुक एकच

दिलेलें होतें; व हें विपरीतत्व जाहिरातीच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें उगाच कांहीं असंबद्ध लिहून कोणीकडून तरी वाचकांचें लक्ष वेधावें, अशा हेतूनें योजिलेलें नाहीं. कारण हें संगीत हरिश्चंद्र ज्याचेवरून तयार केलेलें आहे, तें मूळ पारशी नाटक मंडळ्या करीत असतात, व त्यामध्यें विश्वामित्राचा शिष्य म्हणून एक भूमिका मुद्दाम आणिली असून तिजकडून सर्व नाटक-भर वेळीं अवेळीं, व हरिश्चंद्र तारामती वगैरे शोक करीत असतांहि, विदूषकी प्रकार व फाजिलपणा करवून हास्यरसाचें वेडें पीक खरोखरींच पिकविलें जातें. पूर्वीच्या आपल्या इकडील नाटकांतील विदूषक हा विश्वामित्राच्या या शिष्याचा सख्खा पूर्वज होता म्हटलें तरी चालेल. कारण त्यांतूनहि विदूषकाचें हेंच काम म्हणजे वेळीं अवेळीं फाजिलपणा करून रंगाचा बेरंग करण्याचें होतें. हास्यरसाप्रमाणेंच इतर रसांचा वेळीं अवेळीं मुख्य रसास सोडून परिपोष केला असतां रंगभंग होतो. परंतु तो तितका लक्षांत येत नाहीं. रसद्वैताचा हा दोष चांगल्या चांगल्या सुशिक्षित नाटककारांचे कृतींतहि घडून आलेला दाखवितां येईल. रा. कोल्हटकरांचे गुप्तमंजूषांतील वंचक कित्येक ठिकाणीं निःसंशय असाच रसभंग करणारा आहे. शारदेमध्यें म्हाताऱ्या श्रीमंताच्या फजीतीनें उत्पन्न होणारा हास्यरस हा करुणरसास पोषक झालेला आहे. तथापि शेवटीं कोदंडाकडून शारदेचें पाणिग्रहण करण्याचा जो प्रकार दाखविला आहे त्याच्या योगानें तोंपर्यंत कायम राहिलेल्या रसाच्या अद्वैताचें द्वैत होतें, व नाटकांतील पहिल्या भागाचा ठसा दुसऱ्या भागानें नाहींसा होतो असें मला वाटतें.

**कालः**—कालासंबंधानें बोलतांना द्वैत व अद्वैत हे शब्द चांगलेसे लागू पडत नाहींत हें खरें आहे, तथापि योग्य व अयोग्य कालावधि यांमध्यें सहज फरक करितां येतो. नाटक पहाणें म्हणजे अर्थात् पहाणाराजवळ कल्पनाशक्तीची थोडी बहुत सामग्री असली पाहिजे हें उघड आहे. तथापि या कल्पनाशक्तीवर कांहीं विवक्षित मर्यादेपलीकडे ताण बसला असतां सहृदय मनुष्यास खपत नाहीं. दोन अंकांमध्यें फक्त पांच मिनिटें पडदा पडला असतां तेवढ्या अवधींत कथानकांतील पांच चार महिने गेले असें समजा म्हणून सहृदय प्रेक्षकांस सांगितलें तर तें त्यांस कदाचित् करितां येईल. परंतु चंद्रहास नाटकाप्रमाणें एका अंकाचे शेवटीं तोंडा-

तील बाळकृष्ण काढून पूजा करणारा; रानावनांतील देखाव्याला सोबत नसल्यामुळें भिणारा, सातआठ वर्षांचा चंद्रहास पाहिलेला असून, लगेच पुढच्या अंकांत, आपल्या तारुण्याच्या मदतीनें आपल्या स्वरूपाकडून विषयेला प्रेमपाश घालणारा ' उपवधू ' ( हा शब्द उपवर या शब्दाचा सख्खा भाऊ आहे ) व राजकारण करण्यास पात्र झालेला असा तो दिसूं लागला असतां, या बदललेल्या देखाव्यामुळें नाटककाराच्या शार्दूल-प्लुतीचें कौतुक न वाटतां कदाचित् नाटककाराइतकी कल्पनेची देणगी आपणांस दिली नाहीं याबद्दल त्यास वाईट वाटेल. परंतु या ठिकाणीं कोणाकडे दोष असेल तर मानवी प्रेक्षकांकडे नसून, नाटककाराकडेच आहे असें मला वाटतें. प्रयोगांत एकादें पात्र आपण पाहिलें असतां पुढें त्या पात्रामध्यें आकार रंग, वय वगैरे संबंधानें कितपत फरक झालेला दृष्टोत्पतीस आला असतां सुसह्य होईल हा एक प्रश्नच आहे. वास्तविक हा फरक फारसा होणें शक्य नाहीं; केवळ वेषांतरानें, व रंगाचे सहायानें साधारणतः जितका फरक एकाद्या चेहऱ्यामध्यें प्रत्यक्ष दाखवितां येईल तितका फरक चेहऱ्याची ओळख कायम रहात असतां सुसह्य होईल, असें साधारणतः आपण म्हणूं. परंतु कित्येक स्थित्यंतरें दाखवितां येणें शक्य नसतें. व कित्येक दाखविण्याचा प्रयत्न केला असतांहि तीं मनास पटत नाहींत. शाकुंतलामध्यें पहिल्या अंकांतील धष्टपुष्ट राजा पुढील एका अंकांतहि प्रत्यक्ष आपणांस तसाच दिसतो, परंतु त्याचें वर्णन पहावें तों शोकानें कृश झालेला व हातांतील रत्नजडित कडें गळूं लागलेला असें आहे. हें स्थित्यंतर खरोखरीच दाखवितां आलें तर बहारीचें होईल; परंतु प्रत्यक्ष दाखविण्यास अशक्य अशा स्थित्यंतराचें हें एक उदाहरण आहे. त्याचप्रमाणें लहानाचा मोठा झालेला चंद्रहास त्याच चेहऱ्याचा जर खरोखर कदाचित् दाखवितां आला असता तर प्रत्यक्ष प्रयोगांत गेलेल्या एका घटकेंत कथाभागाचीं दहा बारा वर्षें लोटलीं याबद्दल आपण कदाचित् तक्रार केली नसती. परंतु आठ वर्षांचे मुलास मिशा लावून तो एकदम वीस वर्षांचा दाखवितां येण्यास मूळचा आठ वर्षांचा तरुण चंद्रहास तरी बालराक्षस पाहिजे, किंवा वीस वर्षांचा तरुण चंद्रहास तरी एखाद्या सर्कशींत प्रदर्शन करण्यासारखा ठेंगू होता

अशी कल्पना केली पाहिजे. परंतु यांपैकीं एकहि असल्याबद्दल ग्रंथकारानें कोठें सांगितलें नाहीं.

प्रेक्षकांचे कल्पनाशक्तीवर कालगणनेसंबंधानें अमर्याद ताण पडल्याचें एक मासलेवाईक उदाहरण आम्हीं एकदां पौराणिक नाटकप्रयोगांत पाहिलेलें आठवतें. नाटक लहुकुशआख्यानाचें होतें. पहिले कांहीं प्रवेश झाले. नंतर वाल्मीकिऋषि व त्याचा शिष्य हे पडद्यापुढें येऊन बसले. विदूषकाची शेंडी धरून संहितेच्या संथेंतील स्वर बसविण्याचा फार्स झाल्यानंतर पडद्याचे आंतून करुणस्वर ऐकूं आला तेव्हां वाल्मीकीनें शिष्यास हें काय आहे म्हणून विचारलें. शिष्यानें पडद्याचे आंतून जाऊन येऊन सांगितलें कीं, सीता प्रसूत होत आहे व या वेदनेमुळें होणारा हा तिचा विलाप आहे. परंतु यापुढें झालेल्या प्रश्नोत्तरांत विदूषकानें पडद्यांतून जाऊन येण्याचे श्रमहि घेतले नाहींत. तो प्रकार खालीलप्रमाणें:—

( पडद्यांत लहान मुलाचें रडणें ऐकूं येतें. )

**वाल्मीकिः**—अरे, हें काय चाललें आहे ?

**विदूषकः**—गुरुमहाराज, सीतादेवी प्रसूत झाली असून तिचा मुलगा रडत आहे.

( फिरून रडण्याचा आवाज )

**वा.**—अरे हा वेगळा आवाज दिसतो.

**वि.**—गुरुमहाराज, सीतेला जुळीं मुलें झालीं त्यांपैकीं दुसऱ्या मुलाचा हा आवाज आहे.

( पडद्यांत गलबला होतो. )

**वा.**—अरे हा गलबा कसला ?

**वि.**—गुरुमहाराज, सीतादेवीचे दोघे मुलगे लहुकुश हे बाललीला करीत असून आपले मातोश्रीपाशीं आभाळांतील चांद मागत आहेत त्याबद्दलचा हा वादविवाद चालू आहे.

( पडद्यांत आवाज होतो )

**वा.**—अरे, हा धनुष्याची प्रत्यंचा झाडलेला हा आवाज कसला ?

**वि.**—गुरुमहाराज, लहु व कुश हे सात आठ वर्षांचे वयांतच धनुर्विद्यापारंगत झाले असून ते अलीकडे धनुष्यबाणाचाच सगळा खेळ खेळूं लागले आहेत.

( पडद्यांत गलबला होतो. )

**वा.**—अरे हा गलबा कसला ?

**वि.**—गुरुमहाराज, धनुर्विद्या शिकून परिसमाप्त झालेले दहाबारा वर्षांचे लहू कुश आपल्यास वंदन करावयास येत आहेत.

( दहा बारा वर्षांचे दोन मुलगे धनुष्यबाण घेतलेले येऊन वाल्मीकीस वंदन करितात. )

बसल्या बैठकीस, अवघ्या एक दोन मिनिटांत, लहुकुशांचे जन्मापासून तों ते समाप्तविद्य होऊन तारुण्यामध्यें प्रवेश करूं लागणारे असें दाखविणें याहून कल्पनेचा अधिक अद्भुत खेळ दुसरा एखादा असेल असें आम्हांस वाटत नाहीं. परंतु कोणीहि सहृदय मनुष्य असल्या या प्रयोगदर्शनास मान डोलवील असेंहि पण आम्हांस वाटत नाहीं. अशाच रीतिनें इतर कांहीं नाटकांचीहि गोष्ट आहे. शाकुंतलांतील पहिल्या अंकांत यौवनावस्थेचें ज्ञानहि नसणारी मुग्ध कुमारिका जी व जेवढी पहातों, ती तेवढीच सातवे अंकांत पहात असतां, तिच्या बरोबर तिचा मुलगा म्हणविणारा असा एक सहासात वर्षांचा मुलगा असतो. वास्तविक हें मनास खरोखर कसें पटणार ? कल्पनाशक्ति कितीहि प्रबळ म्हटली तरी इंद्रियांचे योगानें होणाऱ्या प्रत्यक्ष ज्ञानास तिला इतका आळा कसा घालतां येईल ? या ग्रंथकाराचे अडचणींत नाटकमंडळ्यांच्या अडचणींची भर पडली म्हणजे मग तर पहावयासच नको. एखादे नाटकांतील शकुंतलेची भूमिका घेणारा मुलगा जर पोक्त असेल तर सातव्या अंकांत बरोबर सात आठ वर्षांचा मुलगा घेऊन येण्याचे प्रवेशांत तो चांगला शोभेल. परंतु पहिल्या अंकांतील मुग्ध नाईकेचीं कवीचीं वर्णनें दुष्यंताचे वगैरे तोंडून चाललीं असतां, शकुंतलेच्या ठिकाणी सांसारिक अनुभवांत मोरावळ्याप्रमाणें मुरलेली प्रौढ स्त्री प्रेक्षकांचे नजरेपुढें उभी रहाणार ! अर्थात् रसभंग झालाच पाहिजे. उलटपक्षीं ही भूमिका घेणारा मुलगा लहान असेल तर रसभंग पहिल्या अंकाच्या ऐवजीं सातवे अंकांत होईल इतकाच कायतो फरक.

अशींच इतर कित्येक उदाहरणेंहि घेऊन याच वादाचें समर्थन करितां येईल. रा. कोल्हटकरांचे गुप्तमंजूषांत सहा वर्षांचा अवधि लोटला आहे. हा अवधि सहाच वर्षें असण्यांत काय मुद्दा आहे, हें कळत

नाहीं. मुंबईचे मेडिकल कॉलेजांत शिक्षण पुरें होण्यास पांच वर्षें लागतात हें खरें, तरी सौदामिनी ज्या विद्यालयांत शिकावयास गेली तेथील कोर्स कदाचित् लवकर पुरा करितां आला असता. परंतु त्यामुळें प्रत्यक्ष प्रयोगाचे वेळीं रसभंग होण्यास मदत होते; कारण सौदामिनी पतीचा त्याग करून जात असतां नंदिनी लहान व अल्लड होती असें दाखविलें आहे. व नाटकाचे शेवटीं अर्थात् सहा वर्षांनें मोठी झालेली दिसली पाहिजे. परंतु तसें होणें शक्य नाहीं. दुसऱ्या एका दृष्टीनें या सहा वर्षांचे अवधीस आक्षेप घेतां येण्याजोगा आहे. नंदिनी विलास यांच्या प्रेमाची परिणति हा कथानकांतील एक घटक आहे, परंतु या सहा वर्षांत या नायकनायिकेच्याकडून या परिणतीस अनुकूल असें कोणतेंच कार्य झालेलें दाखविलें नाहीं. या सहा वर्षांपूर्वीं विलास हा नंदिनीबद्दल वंचकास ठराविक प्रश्न विचारित असलेला जसा दिसतो, तसा तो फिरून सहा वर्षांनींहि दृष्टीपुढें येतो. या अवधींत प्रत्यक्ष भेटीचा प्रयत्न, प्रयत्नाची चिथावणी अगर चिथावणीचा विचार यांपैकीं कांहींहि घडून आल्याचें प्रेक्षकांच्या नजरेस येत नाहीं; व या एकंदर पुराव्यावरून विलास व नंदिनी हीं सहा वर्षेंपर्यंत काय करीत होतीं असा प्रश्न विचारला तर त्याचें उत्तर असेंच द्यावें लागेल कीं, " विरहदुःखामुळें होणाऱ्या जाग्रणामुळें हीं दोघेंहि सकाळीं उशिरा उठत होतीं, दोन प्रहरीं जेवीत होतीं, व मधल्यावेळीं एकमेकांबद्दल आठवण काढून रडत होती. " ही कष्टमय स्थिति कशी व कधीं संपणार याची त्यांना कल्पनाहि नव्हती, कारण राजा अमुक वेळेस मरावयास टेकणार, व मरण्यापूर्वीं सौदामिनीस दिलेल्या वचनाप्रमाणें तो नंदिनीचें स्वयंवर पण लावून करण्यास सिद्ध होणार अशा वेळीं, अवचित सौदामिनी परत येऊन, स्वयंवराच्या बिकट व्यूहांतून मार्ग काढून, नंदिनीस विलास मिळवून देणार—ही ग्रंथकर्त्याच्या डोक्यांतील अद्भुत रचना त्या बिचाऱ्यांस काय माहीत ? त्यांच्या प्रणयाच्या या एकंदर इतिहासावरून हीं नायकनायिका कोणी शेणामेणाचे लिबलिबीत निर्जीव असे प्राणी होते कीं काय असेंहि वाटूं लागतें. सांगण्याचा मुख्य मुद्दा असा कीं तरुण नायकनायिकेच्या प्रेमासारख्या प्रबल विकाराची परिणती दाखवावयाची असतां अशा प्रसंगीं निष्कार्य व निरर्थक असा सहा वर्षांचा अवधि घालवावयास लावणें हें सर्वस्वीं रसभंगकारक आहे असें मला वाटतें. तसेंच या नाटकांत

कथानकास सुरुवात सौदामिनीच्या पतित्यागापासून न करितां ती सहा वर्षांनंतर समाप्तविघ्न होऊन परत आल्यापासून दाखविली असती तर कल्पनाशक्तीवर हल्लीं पडणारा बेसुमार ताण पडला नसता.

**स्थल:**—या संबंधानें द्वैताद्वैताची भानगड फारशी उरत नाहीं हें वर दर्शविलेंच आहे. कालावधि हा जसा मुख्य कथाभागावर अवलंबून व त्याशीं सप्रमाण असा असावा लागतो, त्याचप्रमाणें नाटकांतील स्थलवैचित्र्यहि कालावधीवर अवलंबून आहे असें म्हणतां येईल. खुद्द स्थलवैचित्र्य हें दोषास्पद नाहीं; परंतु नाट्यवस्तुगत काल समजा एक दोन महिन्यांचा दाखविला असेल परंतु त्या अवधींत होणारीं निरनिराळीं कार्यें अति दूरदूर ठिकाणीं होणारीं अशीं दाखविलीं असलीं तर तें मात्र बरोबर दिसणार नाहीं. काल्पनिक कथानकांत, स्थलांचीं नांवें काल्पनिक दिलीं असलीं तर कांहींच भानगड उरत नाहीं. परंतु ठाऊक असलेल्या अशा स्थलांचा निर्देश केला असला तर त्यांतील सापेक्ष अंतर काय आहे, हें अंतर लक्षांत घेऊन परस्परसंबद्ध अशीं कार्यें तेवढ्या कालावधींत घडून येणें शक्य आहे किंवा नाहीं, याचा सूक्ष्म विचार नाटककारास करावा लागेल. याहून स्थलासंबंधानें जास्ती सांगणेंचें कारण नाहीं. असंबद्धता उत्पन्न न होतां स्थल वैचित्र्य दाखवितां आलें तर तें Lessing Cornelli वगैरे नाटककारांनीं स्थलाद्वैताची खोटी कल्पना करून एका घरांत अगर घरांचे भागांत सर्व कथाभाग घडवून आणण्याची जी पद्धत स्वीकारली आहे तीपेक्षां अधिक सरस वाटेल.

**कार्य** (Action):—या बाबतींत अद्वैत असणें जरूर आहे. मुख्य नाट्यवस्तु एक असून तदंगभूत इतर अनेक गोष्टी असणें स्वाभाविक आहे. नायक व उपनायक, नायिका व उपनायिका या जोड्या नाटकांतून नेहमीं आढळतात. Shakespeare मध्यें तर बहुधा प्रत्येक नाटकांत एक मुख्य कथाभाग व एक उपकथाभाग असतोच, मात्र या द्वैतामधून अद्वैत निघावयाचें असेल तर, त्या दोन अगर अनेक कथानकांत कार्यकारण, अवलंब–अवलंबी अशा तऱ्हेचा नित्य व निकट संबंध असला पाहिजे.

**किरकोळ:**—नाट्यवस्तूंमध्यें अद्वैतनिष्पत्ति होण्यास इतर कित्येक गोष्टीहि साधाव्या लागतात, परंतु त्या ' किरकोळ ' या सदराखालीं पडतील. (१) कथानकांत जें स्थल व जो काल निर्दिष्ट असेल त्याला अनुकूल

अशी नेपथ्यरचना पाहिजे. जुन्यापुराण्या पोषाखांच्या रीतभातीच्या वगैरे कल्पनाशक्ति व युक्तिवाद हे चालवतील तितके चालवून नटवर्गांनीं ठरविल्या पाहिजेत. इंद्र किरीट घालीत होता किंवा फेटा बांधीत होता हें कोणी सांगावें ? परंतु नाना फडणवीस जरी आजच्या पिढीपैकीं कोणीं पाहिला नाहीं तरी तसबिरा वगैरे यांचे सहायानें त्याचा रंग रूप पोषाख पेहेराव, याजबद्दल कांहींशी कल्पना करितां येण्यासारखी आहे. म्हणून त्या कल्पनेबरहुकूम नाना फडणवीस जर रंगभूमीवर आला नाहीं, तर कथाभाग १५० वर्षांपूर्वींचा व पोषाख आजचा, अशा रीतीनें द्वैत उत्पन्न होईल. 'सवाई माधवराव' नाटकांतील नाना हल्लींच्या सुधारकाप्रमाणें डोकें राखलेलें व दाढी केलेली असा जेव्हां पुढें येतो तेव्हां व त्याचे डोक्यावर पेशवाई पागोटें नसून बुधवार पेठेंतील लोखंडयांचे कारखान्यांतील पगडी आपण पाहतों, तेव्हां तें पाहिल्याबरोबर एकदम बेरंग होतो. आणि मग त्यानें तत्कालीन अशा गोष्टींच्या उल्लेखाचा पाऊस पाडला तरी झालेली रसहानि भरून येत नाहीं. तुकाराम नाटकांतील तुकारामाचे पात्रानें हल्लींचे तऱ्हेनें डोकें राखलेलें पाहूनहि हाच प्रकार होतो.

( २ ) नाटकांतील पात्रांचे भाषणांत Anachronism ( कालनिर्देशप्रमाद किंवा असंबद्धकालनिर्देश ) झाला असतांहि रसभंग होतो. हे प्रमाद सूक्ष्मच असले तर नजरेस येत नाहींत, परंतु ते फार ढोबळ असूं नयेत. शेक्सपीअरनें बोहेमियाचे किनाऱ्यावर जहाज उतरविल्याचें व हेक्टरचे तोंडीं ॲरिस्टॉटलचे शब्द घातल्याचें प्रसिद्ध आहे. एका आधुनिक नाटककारानें एका पांडवकालीन भिक्षुकाचे तोंडांत "राजापुरी लोटा" हे शब्द घातले आहेत. अर्थात् प्रेक्षकांचें मन जितकें अधिक सुसंकृत असेल तितका अधिक रसभंग होईल.

( ३ ) नाटक पात्रांनीं खाजगी नात्यानें नाटकाबाहेरील संवाद प्रेक्षकांस कळेल असा करणें; प्रेक्षकांकडे अगर ग्यालरीमध्यें खाजगी नात्यानें पहाणें; प्रॉंपटरनें प्रेक्षकांस ऐकूं येईल अशा रीतीनें पात्रास भाषण सुचविणें; पडदा वर गेला असतां नाटकाव्यतिरिक्त मनुष्य अगर पदार्थ वगैरे रंगभूमीवर दिसून येणें; गाणाऱ्या पात्रानें पेटीवाल्यास अगर तबलजीस उघड सूचना करणें; पात्रास अनुकूल असा रंग वगैरे नसणें; इत्यादि अनेक गोष्टी रसभंगास कारण होतात. फार काय पण ज्यानें

कांहीं थोडे वेळांपूर्वीं सोंग घेऊन रंगभूमीवर काम केलें होतें, असा मनुष्य आपलें सोंग उतरून प्रयोग चालला असतां जर प्रेक्षकांत येऊन बसेल, अगर एक सोंग टाकून दुसरें सोंग घेऊन रंगभूमीवर येईल, तरीहि रसभंग होतो. या सर्व गोष्टी प्रत्यक्ष अनुभवसिद्धच आहेत व या सर्वांस साधारण असें एकच कारण असें आहे, तें हें कीं, नाटकप्रयोग मनावर ठसण्यास प्रेक्षकांचें तादात्म्य व तल्लीनता व्हावी लागते; व रंगभूमीवरील देखावा भाषणें वगैरेनीं जो एक प्रकारचा भ्रम उत्पन्न होतो, तो भ्रम जितका परिपूर्ण व निर्दोष असेल, तितकें तादात्म्य अधिक होईल. आणि वरील गोष्टींपैकीं प्रत्येक गोष्ट मुद्दाम उत्पन्न केलेल्या व गोड अशा या भ्रमाचा निरास करणारी आहे. बेकननें " Deception of the senses is a pleasure " म्हणजे ज्ञानेंद्रियांस जाणून बुजून भ्रम उत्पन्न करून त्यांची फसवणूक करणें हें एक प्रकारचें बुद्धिविषयक सुख आहे, असें म्हटलें आहे तें अगदीं यथार्थ आहे; व या वरील सर्व गोष्टींनीं या सुखास व्यत्यय येतो.

आतां कोणी असें म्हणेल कीं, हा भ्रम बोलूनचालून मुद्दाम उत्पन्न केलेला जर आहे तर, नाटक पहावयास जातांना प्रेक्षकानें वाटेल तितक्या गोष्टी गृहीत घेऊन चालण्याची तयारीच करून गेलें पाहिजे; व एक गोष्ट जर गृहीत घेतां येते, तर दुसरी वाटेल ती तशीच कां घेतां येऊं नये ? पुणें मुक्कामीं सन १९०७ चे सप्टेंबर महिन्याचे तिसावे तारखेस गणेशपेठेंतील परांजपे यांच्या इमारतींत आपण बसलों असतां आपल्या समोरील जोत्यावर घातलेल्या हिरव्या पालपट्टीवर, ठराविक सोम्या गोम्या ही मंडळी येऊन अवघ्या दोन चार तासांचे अवधींत बोलतां येईल तितकें पुणेंशाहि मराठी भाषेंत शुद्धाशुद्ध रीतीनें बोलत आहे, असें पक्कें माहीत असतांहि जर त्या ठिकाणीं त्या वेळीं १५० वर्षांपूर्वींचे पेशवाई प्रसंग, अगर अमर्याद कालापूर्वींचे पौराणिक प्रसंग घडून येत असलेले आपण पहात आहों असें गृहीत घेऊन चालण्याची प्रेक्षकवर्गाच्या मनाची तयारी करितां येते; तर मग वर सांगितलेले सर्व जरी दोष घडून आले, तरी काय हरकत आहे ? परंतु खरा सहृदय मनुष्य अशा तऱ्हेचा युक्तिवाद करणार नाहीं असें आम्हांस वाटतें. वर सांगितल्याप्रमाणें स्थल, काल, भाषा, वगैरेचे कांहीं निर्बंध सर्वस्वी दुस्तर आहेत यांत शंका

नाहीं; परंतु वर जे दोष म्हणून दाखविले ते तसे दुस्तर नव्हेत ते टाळतां येण्यासारिखे आहेत, म्हणून ते न टाळलेले सरस मनास सोसत नाहींत. रविवर्म्याचें उत्तम चित्र झालें तरी, तें खडबडीत गोणपाटावर, व तेलाच्या रंगांनीं केसांच्या ब्रशांनीं काढिलेलें असतें, असें जर माहीत आहे, तर अशा रीतीनें काढिलेल्या चित्रांतील कृष्णाचें नाक कापिलेलें असलें, किंवा सुभद्रेच्या तोंडावर थोडीशी मिसूर दिसत असली तरी काय हरकत आहे ? हा व वरील युक्तिवाद सारख्याच किंमतीचे होत. दुस्तर बंधनें असूनहि इतर रीतीनें निर्दोष कृति जर करितां आली तर अलबत ती करण्याची महत्त्वाकांक्षा प्रत्येक नाटककारानें व नटवर्गानें धरिली पाहिजे. कसेंहि नाटक असलें तरी चार घटिका करमणूक होते ही गोष्ट एका अर्थी खरी आहे. तथापि असें म्हणून भागविणें हें खऱ्या सहृदयतेचें लक्षण नव्हे.

---

## १४ उपमेचें निर्णायक गमक काय ?

### ( सह्याद्रि–जुलै १९३५ )

रा. कोल्हटकर यांचा वर छापलेला लेख दुरुस्त करण्यापूर्वी मजकडे तपासण्यास आला, तेव्हां पुन्हां एकवार मला असें अनुभवाला आलें कीं, वाङ्मयांत ज्या उपमा लेखक उपयोगांत आणतो, त्यावरून स्वतः त्याजविषयीं भलतींच अनुमानें काढलीं जातात. माझ्या आयुष्यांत १९१९ च्या विलायतच्या सफरींत प्रथमच मी बर्फ पडलेलें असें पर्वत शिखर पाहिलें. त्या बर्फाला माझ्या पत्रांत " वांगीभातावर घातलेल्या खोबऱ्याचा कीस " याची उपमा मी दिली. तिजवरून अशी दंतकथा आजवर पसरलेली दिसते कीं मी सुग्रास भोजनाचा मोठा शौकीन आहें ! हा तर्क मुळांत खरा नाहीं. शिवाय या खोट्या तर्कावरून असेंहि दिसतें कीं उपमा सुचण्याची उपपत्ति लोक बसवितात ती पुष्कळांशीं चुकीची असते. वास्तविक वांगीभात हा एक चांगलाच पदार्थ आहे; व तो खाण्याची आवड असणें कांहीं पाप नाहीं. पण पर्वतावरील तुरळक हिमवर्षावाला मी दिलेली ही खाण्याच्या

पदार्थाची उपमा जी मला सुचली, ती मी खाद्यांचा भोक्ता असल्यामुळें किंवा ती देतांना मी चमचमीत जेऊन समाधान वृत्तींत असल्यामुळें मला सुचली, हें अनुमान मुळींच खरें नाहीं !

प्रथम या बाबतींतली वस्तुस्थिति एकदां सांगूनच टाकावी हें बरें. म्हणजे खाद्यप्रियतेच्या दोषारोपापासून या पुढें तरी कदाचित् मी मुक्त होईन. बर्फ पडलेला पर्वत मी १९१९ मध्यें आगबोटीवरून स्पेनच्या दक्षिण किनाऱ्याजवळ प्रथम पाहिला. मी त्या वेळीं जेवलेला नव्हतों. किंवा मला भूकहि विशेष लागलेली नव्हती. तो देखावा पाहून मला दोनतीन उपमा सुचल्या. पण त्यांतील फक्त वांगीभातावरील खोबऱ्याची उपमाच मला द्यावीशी वाटली. कारण मी स्वत: जर बर्फ पडलेला पर्वत प्रथमच पाहिला, तर माझ्या घरच्या बायकांनीं, मुलीबाळींनीं, तो त्यापूर्वी पाहिला असणें शक्यच नाहीं. तेव्हां मला दिसलेल्या देखाव्याची कल्पना त्यांना द्यावयाची तर एखादा परिचित असा पदार्थ सुचवून आणून देणेंच प्राप्त. मला त्या-वेळीं तीन उपमा सुचल्या असें आठवतें. १ काळ्या शिवाच्या पिंडीवर पडलेलीं पांढरीं पुष्पें, २ एखाद्या काळ्याकुट्ट म्हाताऱ्या माणसाच्या डोक्या-वरील पांढरे केंस, आणि ३ वांगीभातावर घातलेलें खोबरें ! तीनहि उपमा स्त्रियांना समजण्यासारख्या होत्या; पण पहिल्या उपमेंत दोष असा कीं, शिवाच्या काळ्या पिंडीवर घातलेलीं फुलें, ती पिंडी निमुळती असल्यामुळें गळून पडतात, टिकत नाहींत; आणि पर्वतावर पडलेलें बर्फ तर स्थिर होतें. दुसरी उपमा ग्राम्य, म्हणून मी ती वर्ज केली. स्त्रियांना एखादी उपमा द्यावयाची असली तर स्वत: त्या तसली उपमा सहसा देणार नाहींत. पण तिसरी उपमा सर्व दृष्टींनीं समर्पक वाटली. अशाकरितां कीं, वांगीभात आचाऱ्यानें उपसला तरी तो ताटांतून वाढावयास नेतांना त्यावर खोबऱ्याचा कीस घालणें हें काम गृहिणींचेंच असतें. शिवाय खोबरें घालावयाचें घालून, पण त्यांतल्या त्यांत हात राखून, तें थोडें घालावें ही कला स्त्रियाच जाण-तात ! अर्थात् ज्यांना सादृश्य पटविण्याकरितां मी उपमा दिली, त्यांना समजण्यासारखी पटण्यासारखी व मार्मिक वाटण्यासारखी ही तिसरीच उपमा होय हें कोणीहि वाचक कबूल करील. तात्पर्य, या उपमेचा संबंध उपमा देणाऱ्याच्या माझ्या शीलाशीं किंवा तत्कालीन वृत्तीशींहि येत नाहीं, तर ज्यांच्याकरितां ती द्यावयाची त्यांच्या ज्ञानाशीं व अनुभवाशीं येतो.

उपमा देणारा कोणीहि प्रायः हा दुसरा संबंधच लक्षांत घेतो, व तें साधतांना त्यांतल्या त्यांत समर्पक अशा उपमेची योजना करतो.

पर्वत शिखरावर पडलेल्या बर्फाला मी वांगीभातावरील खोबऱ्याची उपमा दिली या गोष्टीचा उपयोग करून विनोद बुद्धीनें माझी कोणी थट्टा केली तर ती लक्षांत घेण्याचें कारण नाहीं. कारण बोलूनचालून तो विनोदच. उलट माझी निंदा करण्याचें व्रत ज्या कित्येकांनीं अंगिकारिलें आहे त्यांना मनांतून खरोखर तसें वाटत नसतांहि, मला सुग्रासप्रिय म्हणजे खादाड किंवा चवचाल जिभेचा हें विशेषण लावून माझी निंदा सहज करतां येते ती त्यांनीं कां न करावी ? अशाहि हेतूनें कांहींनीं त्या उपमेचा उपयोग केलेला माझ्या पाहण्यांत आहे. पण विनोदाला जसें एका कारणाकरितां उत्तर नको, तसें दुष्टबुद्धीलाहि दुसऱ्या एका कारणाकरितां नको. तथापि, या दोहों प्रकारांनीं सुचविलेल्या कल्पना मनांत भरून, त्यावरून साहित्य-शास्त्रांतला एक नवा सिद्धांत आपण साधार बांधीत आहोंत अशा गंभीर भावनेनें, जे त्या माझ्या उपमेचा दुरुपयोग करतात त्यांच्याकरितां मित्र-त्वाच्या नात्यानें थोडासा खुलासा करणें प्राप्त आहे.

वांगीभाताची उपमा मला सुचली म्हणून जर मी खादाड, किंवा निदान तत्क्षणीं माझी वृत्ति भोजनेच्छु होती अशी उपपत्ति बसावयाची, तर माझ्या ६१ व्या वाढदिवसाचे समारंभाचे वेळीं मी जें लेखी भाषण केलें त्यांत त्या समारंभाला ‘ टाइपरायटरवरील घंटे ’ ची उपमा मी दिली. तिजवरून मी ‘ टायपिस्ट ’ आहें अशी उपपत्ति बसविणें कितपत योग्य होईल याचा वाचकांनीं विचार करावा ! मी टाइप-रायटरवर पुष्कळ वेळां मजकूर लिहवून घेतों; व टाइपरायटरच्या घंटेचा आवाजहि अनेक वेळां माझ्या कानावर पडत असला पाहिजे हें उघड आहे. पण ती उपमा देतांना ‘ टायपिस्टची ’ क्षणिक वृत्ति ( यांत शीलाचा संबंध तर नाहींच ) माझी बनावी इतका प्रबळ, टाइपरायटरशीं माझा असलेला संबंध ठरूं शकत नाहीं. मी टाइपरायटरच्या घंटेची उपमा दिली तिला माझें मीच चांगलें म्हणणें योग्य नाहीं. पण विशिष्ट प्रसंगामुळें मुद्दाम म्हणण्याचें धाडस करतों कीं त्या प्रसंगाला त्याहून अधिक समर्पक उपमा दुसरी असणें सहसा शक्य आहे असें मला वाटत नाहीं. आतां मजहून एखादा अधिक प्रतिभावान मनुष्य ती सुचवूं

शकेलहि. तसें झालें तर मी तिचा मोठ्या आनंदानें स्वीकार व संग्रह करीन. पण आज तरी वरीलप्रमाणें माझें मत आहे.

हा व्यक्तिविषयक खुलासा पुरे होईल असें मला वाटतें. पण या उदाहरणावरून या विषयाची थोडी अधिक चर्चा केल्यास ती उपयुक्त होईल म्हणून या लेखांत ती थोडीशी करण्याचें योजिलें आहे. या चर्चेंत दोन मुद्दे येऊं शकतात. १ मनुष्य सादृश्यप्रेमी असण्याचें कारण काय ? हा विषय तत्त्वज्ञानाचा आहे व २ दुसरा मुद्दा असा कीं, हें सादृश्यप्रेम गृहित धरून, उपमा सुचण्यांत व देण्यांत खरी निर्णायक अशी गोष्ट कोणती ? मी या लेखांत मुख्यतः या दुसऱ्या मुद्द्याचेंच विवेचन करणार आहें. तें करतांना उपमेचा उपयोग कसा होतो व आपण तो कसा करतों हें एक उपमा देऊनच सांगतों. समजा आपल्याला कांहीं काम करावयाचें सुचलें असतां नोकरांना हांक मारण्यासाठीं टेबलावरील घंटा आपण वाजविली तर खालील प्रकार होतील कीं नाहीं ? ( १ ) कोणीहि चाकर जवळ नसल्यानें, किंवा ती त्यांना ऐकूं न गेल्यामुळें, एकहि चाकर पुढें आला नाहीं. ( २ ) एखाददुसरा चाकर पुढें आला, पण ह्या कामाला तो योग्य नाहीं असें वाटलें म्हणून त्याला तें काम सांगितलें नाहीं. काम करायचें होतें, चाकरहि पुढें आला, पण तें करील असा चाकर उपस्थित झाला नाहीं. ( ३ ) एकच चाकर पुढें आला, योग्य वाटला व त्याला तें काम सांगितलें. ( ४ ) अनेक चाकर पुढें आले आणि ते सर्वहि तें काम करण्याला लायक होते तेव्हां तारतम्यभाव चालवून, त्यांतल्यात्यांत तें काम करण्याला अधिक योग्य चाकर कोण हें परिस्थितीवरून सहेतुक ठरवून त्याजकडून, तें काम करवून घेतलें. उपमा देतांना असेच प्रकार होतात, उपमा सुचतच नाहीं तेव्हां लेखकाला बिन उपमेनें, साध्या विधानानें, बोधाचें काम करून घ्यावें लागतें. किंवा अनेक उपमा सुचतात, पण त्यांचा उपयोग कोणत्याना कोणत्या कारणांनीं अनुचित ठरेल म्हणून त्या सुचूनहि आपण त्या सर्व टाकून देतों, किंवा एकच उपमा सुचते व ती योग्य वाटून ताबडतोब देऊन आपण मोकळे होतों. पण अनेक उपमा सुचतात, कदाचित् त्या सर्वच आपापल्या परीनें इष्टसाधक अस-असतात, पण विषय व परिस्थिति लक्षांत घेतां बहुधा त्यांतली कोणती

तरी एकच सर्वांत अधिक समर्पक ठरते. येथें हा समर्पकतेचा निर्णय उपमा देणाऱ्याच्या शीलानें किंवा स्वभावानें होत नसून, त्याच्या ठिकाणीं ज्या मगदुराची रसिकता किंवा कलाकौशल्य असतें व ज्याला उपमा समजावून द्यावयाची त्याला जशी बुद्धि असते त्यानेंच अखेर तो निर्णय होतो.

पण हा विषय अधिक स्पष्ट करण्याकरितां उपमा देण्यांत ज्याचा हातखंडा तो कालीदास कविच मी घेतों; व त्याच्या रघुवंश काव्यांतील कांहीं उपमा पुढें मांडून, त्यांवरून माझा सिद्धांत कसा खरा ठरतो हें सांगण्याचा प्रयत्न करतों. रघुवंशांतील शेकडों उपमा देणारा कवि कालीदास हा एकच, व त्याचें शील रघुवंश लिहिण्यास प्रारंभ करितांना जें होतें तेंच तें काव्य अखेरपर्यंत लिहितांना तसेंच होतें, असें म्हटल्यास फारशी चूक होणार नाहीं. दर उपमेगणिक शील बदलेल तर तें शीलच नव्हे. इतक्या चंचल वृत्तीला शील म्हणतांच येणार नाहीं. आणि कवींच्या बऱ्या वाईट शीलाचा व उपमांचा मेळ घालण्याचा प्रयत्न केल्यास अनवस्था कशी प्राप्त होईल व मूर्खपणा पदरीं कसा येईल हें पुढें कळून येईलच. पण यावर कोणी म्हणेल कीं उपमा ही कवीच्या स्थिर व नित्य अशा शीलावर अवलंबून नसली तरी, त्याच्या क्षणिक कां होईना पण चंचल अशा तत्कालीन वृत्तीवर अवलंबून असूं शकेल. पण हेंहि खरें नाहीं. अर्थात् शील किंवा क्षणिक वृत्ति याहून एखादें वेगळें निर्णायक कारण कवीनें उपमेचा निश्चय करण्याला असतें हें पुढील उदाहरणांवरून दिसून येईल.

ज्याला अलंकार शास्त्रांत ‘ प्रस्तुत ’ असें नांव आहे अशा वर्णनाचे विषय रघुवंशांतील श्लोकांत कालीदासाच्या हातीं कोणते होते, म्हणजे उपमेयें कोणतीं होतीं, याला येथें महत्त्व नाहीं. तर ते विषय वाचकांच्या मनावर बिंबविण्याकरितां ‘ अप्रस्तुत ’ असे दुसरे कोणते विषय, साम्य किंवा साधर्म्य प्रगट करण्याकरितां, त्यानें योजिले यालाच महत्त्व आहे. म्हणजे ‘ उपमानें ’ कोणचीं योजिलीं याला महत्त्व आहे. त्याचीं उपमेयें कथेच्या क्रमानेंच पुढें आलीं असतील. परंतु त्याचीं उपमानें मात्र त्याला आपल्या ‘ प्रतिभेनेंच ’ साऱ्या जगांतून हुडकून काढून योजावीं लागलीं असतील.

उदाहरणार्थ हीं उपमानें घ्याः—

१ वाक् व अर्थ यांचा नित्य संबंध
२ समुद्रांतील नौका
३ बटु वामन ( ठेंगू )
४ मण्यांत ओवण्याचा दोरा
५ सोन्याचें शुद्धीकरण
६ छंदांतील प्रणवाचें आद्यस्थान
७ समुद्रांतून बाहेर पडणारा चंद्र
८ पृथ्वी आक्रांत करणारा मेरु
९ समुद्राच्या पोटांतील रत्नें
१० रस शोषून परत जीवन अर्पण करणारा रवि
११ प्राक्तन संस्कार
१२ सर्पानें दंश केलेली आपल्या पायाची अंगुली
१३ तोरणमाळा
१४ चित्रा व चंद्र यांचा योग
१५ मुलाप्रमाणें खाण्याचे हट्ट धरणारे मृग
१६ स्वाहा व हवि यांची जोडी
१७ निश्चल असें सरोवर
१८ संधिप्रकाशांतील चंद्रोदय
१९ श्रुतीला अनुसरणारी स्मृति
२० पदार्थामागोमाग चालणारी छाया
२१ गुप्त मदस्राव होणारा हत्ती
२२ लाह्या फेकणाऱ्या पौर कन्यां ( प्रमाणें फुलें उधळणाऱ्या लता )
२३ श्रद्धा व विधि यांची जोडी
२४ रात्र व दिवस यांच्यामध्यें असणाऱ्या संध्ये (प्रमाणें शोभणारी धेनु)
२५ अर्थसिद्धीच्या द्वाराप्रमाणें ( गाईच्या शिंगांतली जागा )
२६ चित्राप्रमाणें निश्चल ( धनुर्धर राजा )
२७ मंत्रौषधींनीं हतवीर्य झालेल्या सर्पा ( प्रमाणें स्तंभित झालेला तेजस्वी राजा )
२८ झाडें उपटणारा पण पर्वताच्या ठिकाणीं हतबल झालेला वायु

२९ वज्र फेकूं इच्छिणारा इंद्र
३० औषधींचा नाथ जो चंद्र ( तसा प्रजेकरितां कृश झालेला राजा )
३१ आकाशगंगेंतील तेजा ( सारखा गर्भ )
३२ वाळलेलीं पानें गळून पडल्यानंतर पालवी फुटणारी लता
३३ भ्रमर बसलेल्या कमलाप्रमाणें नीलमुख स्तन
३४ पोटांत अग्नि असलेली शमी, किंवा पोटांत गुप्त जल असलेली सरस्वती नदी ( यांप्रमाणें गर्भिणी राणी )
३५ अभ्र आलेल्या दिवसा ( प्रमाणें प्रसूतिसमय प्राप्तीमुळें म्लानवदन स्त्री )
३६ अर्थ प्रसवणाऱ्या शब्दशक्ती ( प्रमाणें प्रसूत झालेली राणी )
३७ चंद्र पाहून समुद्राला आलेल्या पुरा ( प्रमाणें पुत्रमुख पाहून झालेला हर्ष )
३८ समुद्रांतून निघालेल्या व संस्कार होऊन तेजस्वी झालेल्या रत्ना (प्रमाणें राजकुमार )
३९ नदीमुखानें होणाऱ्या समुद्रप्रवेशा ( प्रमाणें अक्षर ओळखींतून वाङ्मयांत प्रवेश )
४० पाडा बैल व्हावा किंवा हत्तीच्या पिल्लाला हत्तीपणा यावा ( त्या-प्रमाणें गांभीर्य व मनोहर शरीर प्राप्त झालेला राजपुत्र )
४१ गरुड व सर्प यांचें युद्ध
४२ समुद्राच्या पाण्यानें न विझणारा वडवानल
४३ संध्याकाळीं सूर्यानें दिलेलें तेज आपणामध्यें संक्रमित करणारा अग्नि
४४ दक्षिण दिशेला गेलेल्या सूर्या ( प्रमाणें अति उष्ण नाहीं व अति शीत नाहीं असें राजतेज )
४५ आल्हाद देण्यामुळें चंद्र, प्रखर ताप देण्यामुळें तपन ( तसा प्रजा-रंजनानें सार्थनाम होणारा राजा )
४६ क्षीरसिंधूच्या लाटांनीं आच्छादलेला अच्युत
४७ शंकराच्या जटांपासून निघालेल्या गंगेला पूर्व समुद्राकडे नेणारा भगीरथ
४८ गंडस्थळाला अंकुश लावणारा हत्तीचा माहूत

४९ पर्वताचे पंख तोडण्याला तयार झालेल्या इंद्रावर शिलांचा वर्षाव करणारा पर्वत
५० दक्षिण दिशेला गेल्यानें मंदतेज झालेला रवि
५१ जणूं कांहीं दिशांचे स्तन असे पर्वत
५२ वस्त्र गळून पडलेल्या नितंबिनीप्रमाणें मेदिनी
५३ तत्त्वज्ञानानें इंद्रिय-रिपूंना जिंकणारा योगी
५४ परत देण्याकरितांच प्रथम जल शोषणारे ढग
५५ सर्व जगाला चैतन्य देणारा उष्णकिरण सूर्य
५६ क्रमाने देवांनीं तेज पिऊन टाकलेल्या चंद्राचा कलाक्षय.
५७ ज्याच्या गर्भांतून उदक नाहीसें झालें आहे असा शरदृतूंतील मेघ
५८ अग्निहोत्रशाळेंत मुक्काम करणारा चतुर्थाग्नि
५९ वज्रानें छिन्नभिन्न केलेल्या सुमेरु पर्वताचे शिलाखंड
६० सूर्यापासून प्रकाश पावणारा जीवलोक.
६१ दिव्याला लावून प्रदीप्त केलेला दिवा
६२ साभिलाष असतांहि विवाहार्थ पित्याच्या अनुज्ञेची वाट पाहणारी कन्या
६३ चंद्राला पाहून ऊर्मी वाढणारा समुद्र
६४ फार कालानें नयनाभिमुख दयितेप्रमाणें निद्रा
६५ राजहंसांनीं जागृत केलेला गंगेच्या वाळवंटांतून उठणारा सुरगज--
इत्यादि इत्यादि इत्यादि

इतकीं उदाहरणें देण्याचें काय कारण, असें कोणास वाटेल. परंतु कालीदासाच्या उपमानांचीं जितकीं अधिक उदाहरणें देतां येतील तितकीं दिल्यानेंच "उपमेवरून कवीची तत्कालीन मनोवृत्ति ठरवूं पाहणें चूक आहे" हें माझें म्हणणें कोणासहि अधिक पटेल.

कालीदासाच्या प्रत्येक श्लोकांत बहुधा उपमा असतेच. म्हणून पहिल्या पांच सर्गांतील या ओळीनें घेतलेल्या कांहीं उपमा वर दिल्या आहेत. ह्या पाहिल्या असतां कालीदासानें, समर्पक उपमानें हुडकून काढण्याकरितां, प्रतिभेच्या साहाय्यानें त्याला अवगत असलेलें सर्व ज्ञान व विज्ञान धुंडाळलें आहे, व तें धुंडाळण्याकरितां त्यानें मार्मिकता व समर्पकता हे दोन डोळे लाविलेली दुर्बिण ( बायनॉक्युलर ) हातीं धरली आहे, हें उघड दिसतें.

मार्मिकता हा स्वतः त्याचा गुण. पण समर्पकता हा त्याला दिसलेल्या पदार्थांतला गुण. दोन्ही स्वयंसिद्ध. पण या मार्मिकतेला चलन देणारी व शेवटीं यशस्वी करणारी समर्पकता ती पुष्कळशी विषयनिष्ठ आहे ( Objective ) विषयीनिष्ठ ( Subjective ) नाहीं. यामुळें कालीदास हा कोठें वैदिक धर्माचारप्रिय तर कोठें शास्त्ररहस्यें आत्मसात् केलेला पंडित; कोठें तो सुंदर सृष्टिनिरीक्षणाचा भोक्ता तर कोठें सृष्ट पदार्थांचे अद्‌भुत गुण सेवन करणारा दर्दी; कोठें श्रृंगाररसपक्षपाती तर कोठें करुणरसांत निमज्जन करणारा सहृदय, असा बहुविध आढळेल.

शिवाय आणखी एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, उपमा समर्पक असून, त्यांतल्या त्यांत श्लेष साधण्यासारखा असला तर ती योजण्याचा मोह कोणाहि कवीला सहसा आवरत नाहीं. किंबहुना श्लेष हटकून साधत असेल तर समर्पकतेंत, औचित्यांत एखादा अंश कमी भरला तरी चालेल असें कवीला वाटतें. म्हणून कालीदासाच्या कोणत्याहि उपमेचा विचार करतांना तिचा संबंध त्याचें कायमचें शील किंवा क्षणिक वृत्ति यांजवर आधारण्याच्या आधीं, उपमा समर्पक आहे कीं नाहीं, त्यांत कांहीं श्लेष साधला गेला आहे कीं काय हें पाहावें, आणि नंतर त्याच्या शीलाची किंवा क्षणिक वृत्तीची चिकित्सा करावी. समजूत अशी आहे कीं, कालीदास हा त्यांतल्या त्यांत श्रृंगाररसाचा भोक्ता होता. व त्याच्या उपमांवरून हें सिद्ध करूं पाहणाऱ्याला मी होऊन मदत म्हणून दोन उपमा सुचवितों. एक चवथ्या सर्गांतील ५१ आणि ५२ वा श्लोक. "**नितंबामिव मेदिन्याः स्रस्तांशुकमलंघयत्**"

दुसरी

"**सदयं बुभुजे महीभुजः । सहसोद्वेगमियं व्रजेदिति ॥**
**अचिरोपनतां स मेदिनीम् । नवपाणिग्रहणाम् वधूमिव** " ॥

वाटल्यास आणखीहि असे कांहीं थोडे श्लोक देतां येतील. पण बाकी शेकडों उपमांचें काय करावयाचें ?

वरील दोनहि उपमा नुसत्या ग्राम्यच नव्हेत तर स्पष्टपणें अश्लील आहेत. ( नं. ३३ ची उपमा 'भ्रमर बसलेल्या कमलाप्रमाणें नीलमुखस्तन' ही उपमा स्त्रीच्या अवयवाच्या वर्णनाची आहे. पण ती ग्राम्य किंवा अश्लील नसून अत्यंत मार्मिक व बहारीची आहे. ) पण या दोनहि उपमां-

मध्यें ' मेदिनी ' या एकाच शब्दाचा संबंध आलेला आहे. यावरून असें वाटतें कीं त्या उपमा देतांना कालीदासाची तत्क्षण वृत्ति कामुकच होती असें अनुमान काढतां येत नाहीं. उलट असेंहि वाटतें कीं मेदिनी (राज्य-विषयक पृथ्वी) हा शब्द सुचला असतां राजा हा तिचा पति हा शब्दहि कालीदासाला आपोआप सुचतो किंवा तोच प्रकार उलटहि होतो. आणि राजा व पृथ्वी यांचा संबंध वर्णन करण्याला पतिपत्नी संबंधाची उपमा देतांना श्लेष सुचल्यास तो अश्लीलतेकडे दुर्लक्ष करतो. माझ्या एका मित्रानें असें सुचविलें आहे कीं ' मेदिनी ' याचा अर्थ जसा पृथ्वी तसाच पुष्टावयवी स्त्री ( मेदवती–मेदिनी ) असाहि होऊं शकतो. कालीदासाला कृशांगी स्त्री-पेक्षां पुष्टांगी स्त्री ही अधिक सुंदर वाटत असावी. आणि मेदिनी म्ह० पृथ्वी किंवा सुंदर स्त्री आणि तिचा भोक्ता राजा म्ह० पृथ्वीपति या कल्पना साहचर्यानें त्या कवीच्या मनांत खोल घर करून कायमच्या बसल्या असाव्या; म्हणून त्याच उपमानाची पुनरुक्ति त्याजकडून होते.

तें कसेंहि असो, पण माझा मुद्दा इतकाच आहे कीं असली उपमा कालीदास देतो त्या वेळीं तो कामुकवृत्तीचा असतो असें म्हणणें बरोबर नाहीं. शिवाय अशा वृत्तीच्या म्हणून मानल्या गेलेल्या कालीदासाच्या एकंदर उपमांमध्यें शृंगारविषयक उपमा खरोखर फार थोड्या प्रमाणानेंच आढळतात. केवळ कवीनें योजलेल्या उपमानावरूनच कल्पना करावयाची तर त्याजमध्यें जवळ जवळ एकाच वेळीं परस्परविरुद्ध वृत्ती नांदत होत्या असें सिद्ध करतां येईल व मान्य करावें लागेल. मनोवृत्ति ही चंचल म्हटली तरी कांहीं थोडावेळ तरी टिकणारी असते. दुसऱ्या एखाद्या मनो-वृत्तीनें पहिलीची जागा घेण्याला कांहीं काळ लागतोच. पण कविता कर-ण्यास बसलेल्या कवीला एका मागून एक उपमा द्यावयाच्या असल्यास इतकाहि वेळ मिळत नाहीं. नवीन उपमानाची गरज आली कीं त्याची प्रतिभा त्याच्या नेत्रांपुढें वेगळाच सृष्टिखंड उभा करते, व त्यांतून तो आपलें उपमान निवडून घेतो.

आतां उपमा सोडून देऊन एकंदर कविताविषयावरूनच कदाचित् कवीची तत्कालीन मनोवृत्ति अमुक एक प्रकारची होती असें अनुमान करतां येईल, व तें मात्र बरोबर ठरण्याचा अधिक संभव असतो. पण तो

विषय वेगळा आहे. तूर्त उपमांपुरतेंच बोलावयाचें आहे. आणि त्या पुरतेंच बोलावयाचें तर केवळ उपमानांवरून कवीच्या तत्कालीन मनोवृत्तीचें किंवा परिस्थितीचें अनुमान काढणें बरोबर नाहीं.

---

# १५ संगीताचें मराठीकरण

( रत्नाकर )

'संगीताचें मराठीकरण' या विषयावर आतांपर्यंत बरेंच लिहून झालेलें आहे. तथापि अजून तो विषय कांहींसा वादग्रस्तच राहिलेला दिसतो. निदान रा. गोविंदराव टेंबे यांच्यासारख्या सुजाण मनुष्याचीही समजूत या विषयासंबंधीं बरोबर पडत नाहीं; याचा अर्थ मी तर असा समजतों कीं, संगीताचें मराठीकरण करावें असें म्हणणाऱ्या आम्हां लोकांनीं आपली बाजू याहून अधिक स्पष्ट रीतीनें पुढें मांडली पाहिजे. मला प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं 'संगीताचें मराठीकरण' या शब्दाचा माझा अर्थ हिंदी चिजांचें हुबेहुब मराठी भाषांतर असा नाहीं. असें भाषांतर झालें तरी कांहीं बिघडलें असें नव्हे. नाटकांतील पदांच्या रूपानें आज शेंकडों हिंदी चिजा महाराष्ट्रीय लोकांच्या तोंडांत खेळतच आहेत कीं नाहीं? त्या चिजा मराठींत म्हणतांना काय अवघड पडतें अथवा काय विलगपणा येतो हें रा. टेंबे खुलासेवार सांगतील तर बरें होईल. आणि तें सांगतांना त्यांनीं हेंही सांगावें कीं, त्याच चिजा मूळ हिंदींतील तशाच स्वरालापांनीं व पद्धतीनें गातांनां विशेष चांगलेपणा काय साधला—संपादला जातो? या विद्यमान हिंदी चिजा आहेत तशाही त्या कोणी महाराष्ट्रीय गाईल तरी हरकत नाहीं. त्या भाषेंतील रसास्वाद घेण्यास मीही तयार आहें. माझें व हिंदीचें वांकडें नाहीं. पण मला त्या हिंदी चिजांच्या चालींची आवड आहे तशीच आवड मराठी भाषेचीहि असल्यामुळें, मला असें विचारावेंसें वाटतें कीं, त्या चिजांचे चालीवर त्याच पद्धतीचे प्रबंध जर कोणी मराठींत केले व गाईले तर त्यामुळें मूळच्या संगीत पद्धतीचा सर्वस्वी ऱ्हास होईल कीं काय? किंवा तो प्रबंध तसा गातां येणेंच अशक्य होईल कीं काय? किंवा केवळ मराठी भाषेच्या दूषणामुळें रसहानि झालीच पाहिजे कीं

काय ? म्हणजे मराठी भाषेंत असा काय स्वाभाविक दोष आहे कीं, ज्याच्यामुळें हिंदी–जुन्या वस्तादी हिंदी-चिजांच्या पद्धतीचे प्रबंध मराठी भाषेंत कधींच यशस्वी रीतीनें गाइले जाऊं नयेत ? रा. टेंबे हे स्वतः गायक आहेत; यामुळें त्यांनीं वरील प्रश्नाच्या दृष्टीनें हा विषय मला समजावून सांगावा अशी माझी त्यांना विनंती आहे.

रा० टेंबे यांच्या लेखांत किंचित कुत्सितपणें सुचविलें आहे तसा हा प्रश्न खरोखर ' देशभक्ती 'चा नाहीं. एवढें मोठें नांव एवढ्या लहानशा कामीं खर्चण्याचें काय कारण ? कदाचित् मातृभाषेच्या अभिमानाचा हा वाद आहे म्हटला तर कांहींसें चालेल. पण फिरून हेंही लक्षांत ठेवावें कीं, उगाच मातृभाषेच्या अभिमानाचें स्तोम माजवावें म्हणूनही हा वाद काढलेला नाहीं. तर त्यांत खरी दृष्टि कलाविलासाचीच आहे. ती अशी कीं, गायन-प्रबंधाला मनुष्यवाणीच रस पोषक होते; म्हणून तो नुसत्या सा री ग म मध्यें नसून भाषेंत रचिला जावा हें इष्ट असें जर म्हटलें तर पुढचा प्रश्न हा येतो कीं, ती मनुष्यवाणी गाणारा-ऐकणारांची वाणी म्हणजे भाषा हीच कां नसावी ? तसें असेल तर अधिक चांगलें कीं नाहीं ? चांगले स्वरप्रबंध व त्यांच्या जोडीला गाणाऱ्या-ऐकणाऱ्याला समजेल अशी भाषा हा योग म्हणजे दुधांत साखर पडणें असाच नाहीं काय ? आतां कित्येक ' फॅशनेबल ' लोकांच्या पद्धतीप्रमाणें चहा घ्यावयाचा पण तो गोड करून न घेतां, मीठ घालून किंवा लिंबाचा रस घालून घ्यावयाचा हेंच योग्य असें कोणाचें म्हणणें असेल तर वेगळें. पण निदान मी असें समजतों कीं, संगीत किंवा गायन हें ज्याअर्थीं रसपोषक म्हणून समजलें जातें, त्याअर्थीं परभाषेची बेडी तिच्या पायांत घालण्यापेक्षां, मातृभाषेचा हात तिला देऊन स्वैर धांववितां आलें व खेळवितां बागडवितां आलें तर तें अधिक चांगलें नाहीं काय ? म्हणून जुन्या उस्तादि हिंदी चिजा आज लोखंडी सेफमध्यें सुरक्षित ठेविल्या आहेत त्या बाहेर काढून वापरावयाच्या तर त्या त्याच भाषेंत वापरल्या जातील असें आश्वासन दिल्यावरही, रा० टेंबे यांचें म्हणणें असें आहे काय कीं, यापुढें इतर अशा चिजा रचणारा कोणी उस्ताद किंवा प्रबंधकार मराठींत होऊंच शकणार नाहीं ? त्या ' पद्धती 'चें अनुकरण करून, उपयोग करून किंवा आधार घेऊन, ( भाषांतर करून असें मी म्हणत नाहीं ) जर कोणी मराठी संगीत रचलें

व रीतसर मैफलींत गायिलें तर तें अशक्य आहे काय किंवा अनिष्ट आहे काय ? याचा खुलासा रा० टेंबे यांनीं केला तर बरें होईल. त्यांना भीति वाटते त्याप्रमाणें, संगीतकलेला माझ्या किंवा इतर कोणाच्या वेडाच्या लहरींत ओढून संकटांत घालावें, व तिच्यावर एखादें दुर्दैव ओढवावें, अशी माझी बिलकुल इच्छा नाहीं. माझा तो अधिकार नाहीं. मला ती पात्रता नाहीं. याविषयीं सर्वस्वीं तज्ज्ञांचा अधिकार असेंच समजून मी लिहीत व बोलत असतों. मी कांहीं संगीत प्रबंध मराठींत रचले असले तर केवळ आपले विचार व्यक्त करण्याचें एक साधन-- एक उदाहरण म्हणून ! मी केलेले कांहीं प्रबंध रा० टेंबे यांनीं पाहिलेले आहेत, त्या सर्वांनाच त्यांनीं टाकाऊ असें म्हटलें नाहीं असें मला स्मरतें. तथापि या बाबतींत कवित्वाच्या यत्किंचित्‌हि अभिमानानें किंवा संगीतज्ञत्वाच्या अभिमानानेंही मी बोलत नाहीं. एखादी कोणतीहि संगीत पद्धति किंवा एखादी कोणतीही मातृभाषा एवढेंच जमेस धरून मी फिरून विचारतों कीं, या संगीत पद्धतीनें गाणाऱ्यानें गावें व ऐकणारानें ऐकून रसास्वाद घ्यावा या गोष्टींत त्या उभयतांची मातृभाषा योजणें ही चूक ठरते कीं काय ? आणि ती चूक ठरत नसेल तर मराठीसंबंधानें तेंच म्हटलें तर त्यांत काय वावगें ? केवळ नोटेशननें सर्व प्रकारचें संगीत—त्याच्या अत्यंत सूक्ष्म-खांचाखोंचासह--हस्तगत करतां येईल असा सिद्धान्त मी कधींही मांडलेला नाहीं. कांहीं हिंदी शब्द तदर्थदर्शक मराठी शब्दांपेक्षां कानाला अधिक गोड लागूं शकतात हेंही मला कबूल आहे. पण उलट रा० टेंबे यांनाही हें कबूल करावें लागेल कीं, कांहीं मराठी शब्द देखील असे गोड किंवा अर्थपूर्ण असूं शकतील कीं, त्यांच्या तोडीचे शब्द हिंदींतही मिळणार नाहींत. प्रत्येक भाषेच्या अंगीं असे कांहीं गुण तर कांहीं अवगुणही असतात. म्हणून या वादांत मी मराठी भाषा पुढें आणतों तेव्हां ती हिंदीपेक्षां शेंकडा शंभर प्रमाणानें सरस ठरेल म्हणून नव्हे; तर कार्यक्षम होण्याइतकी पात्रता तिजमध्यें खचित आहे असा मात्र विश्वास व अभिमान मला वाटतो, म्हणून !

'रत्नाकरा'च्या एका अंकांत मीं गारा रागांतील एक चीज मराठींत तयार करून दिली आहे. तींत फक्त चाल तेवढी हिंदी चिजेची घेतली आहे. विषय कांहींसा सदृश म्हणजे पाणवठ्यावर जाणाऱ्या बालिकेच्या

वर्णनाचा आहे. पण मूळच्या चिजेंत रस शृंगाराचा आहे तर माझ्या चिजेंत वत्सलरस आहे. माझ्या या प्रबंधांतील मुख्य कल्पना टाकाऊ आहे किंवा ती मी व्यक्त करूंच शकलों नाहीं, असें रा० टेंबे म्हणतात कीं काय हें मला माहीत नाहीं. परंतु ज्या किन्नर कंठांतून 'तडाऽऽतड' हा शब्द निघालेला टेंबे यांना तापलेल्या शिशाप्रमाणें दु:सह वाटतो, त्यांना 'झमाऽऽझम' हा शब्द मात्र मराठी वाचकांना ऐकविला तर फारच मोहक किंवा दिव्य वाटावा याचें थोडें आश्चर्य वाटतें. उलट मला वाटतें कीं, पाणी भरण्यास चाललेल्या बालिकेच्या घड्यावर गारा वर्षतात तेव्हां त्याचें वर्णन करण्याकरितां 'तडा तड' हा शब्द मी जर वापरला, तर तो ध्वनीचें अनुकरण करणारा म्हणून टेंबे यांना योग्यच वाटावयास पाहिजे होता. आणि प्रबंधांतील कल्पना डोळ्यांपुढें उभी करून जर ते ती चीज गातील किंवा ऐकतील तर 'तडा तड' हा शब्द त्यांना दु:सह वाटणार नाहीं. हलवाई किंवा मेवेकरी या शब्दांत केवळ आवडीमुळें एक बरा वाटतो किंवा दुसरा बरा वाटतो असें मीं म्हटलें आहे, त्याचें स्वारस्य टेंबे यांना कळलें असावें. पण हलवाई--मिठाईवाला या शब्दांच्या उदाहरणापेक्षां, संगीत प्रबंध गोड करण्याची दुसरी कोणतीही पात्रता मराठी भाषेंत अजिबात नाहीं असें टेंबे म्हणत असतील तर माझा इलाज नाहीं. त्यांनीं पुरुषसूक्तांतील ऋचा व तिचें विकृत विडंबित भाषांतर अशीं जोडीनें देऊन, मराठी-करणाची हास्यास्पदता सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. पण त्यांना माझ्या म्हणण्यांतील मुद्दा मी समजावून देऊं शकलों नाहीं हा दोष मी आपणाकडे घेतों आणि फिरून म्हणतों कीं, संगीताचें मराठीकरण याचा माझा अर्थ 'हिंदीचें मराठींत भाषांतर' हा नव्हे. क्वचित् भाषांतर-रूप प्रबंध पुढें आणला तर तो केवळ उदाहरणाकरितांच आणला जातो असेंही मी त्यांना पुन्हा सांगतों. इतर कोणत्याही देशाच्या संगीतपद्धतीला अनुसरून ती आत्मसात करण्याचा हक्क प्रत्येक देशांतील लोकांना आहे. या बाबतींत 'कॉपी राईट नाहीं, किंबहुना आपण करतों तें अनुकरण करतों, ती पद्धत आपली नव्हे, दुसऱ्याची आहे पण चांगली आहे म्हणून आम्ही आदरानें स्वीकारतों. मात्र ती आपल्या अंगीं भिनावी म्हणून तिला मराठी भाषेचें रूप देतों, इतकेंच

माझें म्हणणें आहे. कांहीं काव्यप्रबंधांना, तसेंच संगीत प्रबंधांनाही रूढीनें परिचयानें संकेतानें इत्यादि अनेक कारणांनीं असा अधिकर प्राप्त होऊं शकतो कीं, तो त्या मूळच्या भाषेंत म्हटला—उच्चारला तरच त्या सांकेतिक भावना उद्‌भवूं शकतात. पण तीच कल्पना किंवा तीच संगीतपद्धति कायम ठेवून पण वेगळे शब्द वापरून त्याच उच्च दर्जाची भावना उत्पन्न करतां येणारच नाहीं असें कोणीं कां म्हणावें ?

रा. टेंबे यांनीं दिलेलीं उदाहरणें उलटीं करूनही हें सिद्ध करतां येईल. 'सहस्रशीर्षा पुरुष:' याचा त्याच गायनाच्या चालींत किंवा वृत्तांत 'हजार डोक्या पुरुष हजार डोळ्या पाया' असे, वैदिक स्वरांचे धक्के देत देत, मराठीकरण करणें हें मी देखील त्याज्यच मानतों. आणि उलट तुकारामाचा एखादा साधा गोड अभंग घेतला, आणि तो संस्कृत करून अभंगाच्या चालींत रागदारीवर गायिला, तरीही तो खटाटोप व्यर्थ असेंच मी म्हणेन. आणि म्हणूनच फिरून येथें एकवार सांगतों कीं संगीताचें मराठीकरण याचा माझा अर्थ केवळ जुन्या हिंदी संगीत चिजांचें गुलामगिरीनें केलेलें मराठी 'भाषांतर' असें नव्हे, तर पद्धति कायम ठेवणें, तिचा सर्व रसास्वाद लुटणें, तिच्या सर्व खुब्या कायम ठेवणें, आणि तसेच नवे प्रबंध करून फक्त मराठी भाषा योजणें. मग त्यांत मराठींतले जास्तींत जास्त गोड, जास्तींत जास्त कोमल, सुटसुटीत साधे रसपोषक असे शब्द यावेत असा आग्रह टेंबे यांनीं हवा तितका धरावा. त्यांत मी त्यांना सामीलच होईन. पण "मराठींत यापुढें अशी कोणीही एकच संगीत कवी गायक व्यक्ति, किंवा कवी व गायक यांची जोडी, निघणार मिळणार नाहीं, कीं अशा निरपवाद मराठी भाषेंत चांगल्या चांगल्या चिजांचे चालीवर संगीतांत प्रबंध रचूं शकेल." असें रा. टेंबे म्हणतील तर मला किंवा इतर कोणाला संगीताच्या मराठीकरणाचा हा व्यर्थ नाद सोडून द्यावा लागेल. पण अखंड नादानतेचा शेरा मराठी भाषेच्या कपाळावर मारावा लागेल !

ग्वाल्हेर येथील राजाभय्या यांनीं पुरंदरे यांच्या वाड्यांत जयजयवंती रागाचा ख्याल मीं केलेला गाऊन दाखविला, पण "तो गातांना गवईबोवांना हिंदी चीज म्हणणें व मराठींत चीज म्हणणें यांत अंतर दिसून आलें असेल." असें टेंबे यांनीं म्हटलें आहे. पण त्यांच्या माहिती-

करितां इतकेंच सांगतों कीं, माझ्या संगीतप्रबंधाचे छापील कागद मीं बुवांचेजवळ फक्त एक दोन दिवसच आधीं दिले होते, व त्यांनीं तो प्रबंध माझ्या समक्ष एकदांच म्हणून पाहिला होता. अर्थात् इतक्या अल्प परिचयानें तो प्रबंध गायिला म्हणूनच त्यांना कोठें कोठें अडल्या नडल्यासारखें वाटलें याचा संभव आहे. आणि इतर ख्यालाप्रमाणें तो ते ख्याल सबंध तासभर गायिले नाहींत हेंही मी जाणतों. परंतु त्याचा अर्थ मात्र असा मला कबूल नाहीं कीं, किंचित् अधिक सरावानें त्यांना तो हिंदीसारखा गातां आला नसता. त्यांच्या गाण्यांत ओढाताण झाली असेल तर ती वरील कारणांमुळें, केवळ नैमित्तिक होती. म्हणजे ती पुढें निघून जाण्यासारखी आहे असेंच मी म्हणतों.

हिंदी चिजांतील गायकी ही अनिर्बंध असते व मराठींतील सनिर्बंध असते असें रा. टेंबे मानतात. याचा अर्थ मी असा समजतों कीं, हिंदी प्रबंध गातांना हिंदी भाषेचे, विशेषतः ऱ्हस्व–दीर्घाचे यतिभंगाचे वगैरे, शेंकडों खून हिंदींत गाणाऱ्यांना करावे लागतात; पण भाषा हिंदी म्हणून ते त्याला माफ, आणि मराठी गाणाऱ्याला मात्र ती माफी देतां येत नाहीं ! पण यावर माझा प्रश्न असा कीं, मराठी चिजा पदें गातांना आजही वरील दोष काय थोडे अनुभवाला येतात ? पण हे दोष हिंदी-मराठी दोन्हीलाही समान असले तर, मराठीचा अर्थ कळून रसपरिपोषाला मदत होते एवढा तरी गुण मराठीच्या बाजूला शिल्लकच उरेल असें वाटतें. अशी ओढाताण करूनच गावयाचें, मग हिंदी भाषेचें तरी स्वारस्य त्यांत काय राहिलें ? जे दोष अनिर्वाह्य तेवढे पदारांत घ्यावे, पण बाकीचे गुण तरी साधावे हें ठीक नाहीं काय ? इतकें सर्व खुलासेवार सांगितल्यानंतरही मराठी गाण्यांत मूळ हिंदी चिजांचा ‘ झोक ’ येत नाहीं; एवढाच आक्षेप घेऊन तो मराठीच्या डोक्यांत टेंबे यांना मारावयाचा असेल तर मग माझें कांहींच म्हणणें नाहीं. त्यावर मी इतकेंच म्हणेन कीं मला आशा आहे कीं, आणखी १०–५ वर्षें गेलीं म्हणजे संगीत–अर्थात् उत्कृष्ट पद्धतीचें संगीत–मराठी भाषेंतही होतें हें रा. टेंबे यांना आपोआप आढळून येईल ! त्याचा कोणीं आग्रह धरण्याचें कारण नाहीं. आग्रह इतकाच कीं, जी गोष्ट स्वाभाविक अशी दिसते ती व्हावी असें म्हणणें.

जी गोष्ट जाणते रसज्ञ टेंबे यांची, तीच मैफलींतल्या सामान्य श्रोत्यांची असल्यास काय नवल ? कारण गायनकलेचें अज्ञान झाकण्यास, रूढीवर बसविलेली वाहवा व शाबासकी व मानेचे डोल हीं फारच उपयोगी पडतात हें सर्वांना माहीतच आहे. म्हणून मैफलींतील श्रोते लोक कित्येक वेळां मराठी पदें म्हणा असें कां सुचवितात, किंवा मराठी गायकाला चीज म्हणा असें कां म्हणत नाहींत, या वादांत मी शिरत नाहीं. महाराष्ट्रीय गायकांच्या संगीतामध्यें अजून जी थोडी गोडी व ऐट आढळून येते ती केवळ मातृभाषेचा आश्रय केला म्हणजे सर्वस्वीं निघून जाईल असें मला मुळींच वाटत नाहीं. मराठींत तुम्हीं हिंदी चालींचे संगीत प्रबंध करतां यांत संगीतकलेचें अहित आहे हें टेंबे यांचें म्हणणें मला पटत नाहीं. आणि या गोष्टीला मातृभाषेच्या अभिमानाचा 'पोरकट आव' कारणीभूत आहे असें जर रा. टेंबे म्हणतील तर मी त्याला खरोखरच हरकत घेतों. मराठींत संगीत प्रबंध रचणें किंवा गाणें याला मोर नाचतो म्हणून लांडोर नाचते हें म्हणणें गैर आहे. मातृभाषेचा अभिमान धरणें हें जर पोरकट, तर पर भाषेचा अभिमान धरणें हें गुलामगिरीचें लक्षण असें मी स्पष्ट म्हणतों. वाईट इतकेंच वाटतें कीं, स्वतः कवी, गायक व उत्तम रसज्ञ आणि कलाप्रेमी असे रा. टेंबे हे असतां, आणि त्यांना मातृभाषेचा अभिमान नाहीं असेंही म्हणण्याचें कारण नसतां त्यांनीं मराठी भाषेच्या संगीतावर इतकें घसरावें ! याचें मात्र मला राहून राहून आश्चर्य वाटतें. आपल्या विशिष्ट आग्रहाकरितां स्वतःची कवित्वबुद्धि व स्वतःची गायनकुशलता यांचा राजीनामा, निराश होऊन, देण्याला ते तयार झालेले पाहून हा मात्र हिंदी भाषेचा खरा विजय असें मी म्हणूं शकतों ! कारण रा. टेंबे व त्यांच्यासारखे कांहीं गुणी लोक जर मनावर घेतील तर ते नवी पद्धतच निर्माण करतील असेंच केवळ मी म्हणत नाहीं; पण एखाद्या जुन्या किंवा परकीय पद्धतीचा सर्व रस व सर्व बहार लुटून मराठींत आणूं शकतील असें मात्र मला वाटतें.

'एका क्रिया व्द्यर्थकरी प्रसिद्धा' या न्यायानें तंतुवाद्य, वायुवाद्य यांच्यावर विशिष्ट संगीतस्वर काढले म्हणजे अनेकांचीं अनेक कामें आपोआप होऊन जातात. त्यांत भांडण उरत नाहीं. पण अर्थाच्या द्वारें

बोध किंवा भावना यांची अपेक्षा धरली, आणि मनुष्य वाणीच्या भाषा-शब्दांचा उपयोग झाला कीं, हें भांडण सुरू होतें. आणि हें भांडण म्हणजे तरी काय ? तर तो बोध किंवा ती भावना विशेष सुलभतेनें प्राप्त करून देण्याच्या साधनाची मागणी किंवा आग्रह. पूर्वी कोळशाच्या इंजिनाची आगगाडी बोरघाट परिश्रमपूर्वक चढूं लागली म्हणजे लहान मुलांना ती 'कशासाठीं पोटासाठीं खंडाळ्याच्या घाटासाठीं ' असें म्हणतांना ऐकूं येई. बिचारा अँग्लोइंडियन इंजिन ड्रायव्हर ! त्याला विचारलें कीं, बाबा "या घाटांतून उष्णता सोशीत, धूर खात कां जातोस ?" तर तोही 'कशासाठी ? पोटासाठीं !' असेंच उत्तर देईल. मात्र त्याचे शब्द त्याच अर्थाचे इंग्रजी असतील. पण आपलें इंजिनही तोच मंत्र पाठ म्हणत चाललें आहे असें महाराष्ट्रीय लहान मुलांप्रमाणें त्याला वाटणार नाहीं !

जोंपर्यंत तंतुवाद्य, वायुवाद्य यांतूनच संगीत निघतें तोंपर्यंत एकाच स्वरसमूहांतून आपापल्या मनानें ज्या कोणाला जें काय हवें तें ऐकूं येऊं शकतें. ( पण भाषाशब्दांचा उच्चार झाला कीं ही अनेकार्थसाधकता नाहींशी होते. ) उदाहरणार्थ, त्याच नुसत्या स्वरांतून कोणाला 'सुनो-सुनोजी यार बडी लष्कर की गम्मत ' हें उर्दू नाटकांतील पद ऐकावयाला येईल, तर मुंबईच्या बाल्याला 'मला मुंबईला जायचं तिकीट काढून काहीं द्याना ' ही लावणी ऐकायला येईल. एकाच स्वरसमूहांतून कोणाला " Again Again and Again when I was single my pocket did gingle, I want to be single again."
हें इंग्रजी गाणें ऐकूं येईल, तर कोल्हटकरांच्या वीरतनयांतील "सुरूप शालिनी सौंदर्यमोहिनी नृपात्मजा निजा प्रिया करीन गेहिनी ". हें पद ऐकूं येईल. एकाच स्वरांतून कोणाला "वन वन फिरत करित गुंजारवाला" हें खाडिलकरांच्या नाटकांतलें पद ऐकूं येईल तर हिंदी मनुष्याला "पिया पिया करधर" इ० एखादी चीज ऐकूं येईल. तात्पर्य, तंतुवाद्यांत किंवा हार्मोनियम वगैरेवर संगीत उमटविलें तर प्रश्नच उरत नाहीं. कारण एकाच स्वरालापाचा ध्वनि निघत असतां, त्यांतूनच निरनिराळ्या मातृभाषा असणारे निरनिराळे लोकही मनांत आपली भाषा आणून संगीताचा अर्थासह रसास्वाद घेऊं शकतील. पण जेथें अशा

स्वरालापानें समाधान न होतां रसपोषार्थ अनिवार्य म्हणून मनुष्यवाणीचा आश्रय करणें प्राप्त होतें, तेथें श्रोत्यागायकांनीं स्वतःच्या मातृभाषेचा आग्रह किंवा अभिमान धरला तर त्यांना मायावी देशभक्त म्हणून खिजविण्याचें कारण नाहीं, किंवा एखाद्या खानदानी हिंदी पद्धतीच्या वस्तादाचा आव आणण्याचेंही कारण नाहीं. कृपा करून रा. टेंबे यांनीं हें सांगावें कीं, दुर्दैवी महाराष्ट्राखेरीज इतर कोणता असा देश किंवा राष्ट्र आहे कीं, ज्यामध्यें रसपोषक मनुष्यवाणीवर आश्रित असें संगीत लोक हटकून परभाषेंतच गातात, ऐकतात व डुलतात, म्हणजे समाधिसुख सेवितात. रा. टेंबे यांचें म्हणणें जर खरें असेल तर, उद्यां महाराष्ट्राचें विद्यापीठ करण्याचीही कल्पना टाकून द्यावी लागेल. कारण मराठी वाङ्मय हाच या विद्यापीठाचा मुख्य आधारस्तंभ; आणि इतर उत्कृष्ट वाङ्मय जर मराठींत निर्माण होऊं शकेल तर फक्त संगीत स्वरूपाच्या वाङ्मयानेंच असें काय घोडें मारलें आहे कीं तें मराठी होऊं नये ?

केवळ प्रतिपक्षी म्हणून टेंब्यांना मी हें उत्तर देत नाहीं. मला या विषयाची खरोखरच कळकळ वाटते, आणि मराठी भाषेंतून जें शक्य आहे तें अशक्य असें लोक म्हणतात तेव्हां त्याचा रागही येतो. निदान अशा म्हणणाऱ्यांचा युक्तिवाद मला समजत नाहीं. म्हणून हा विषय मला समजेल अशा रीतीनें समजावून देऊन रा. टेंबे यांच्यासारखे तज्ज्ञ लोक माझी समजूत घालतील तर मी त्यांचा फार ऋणी होईन.

---

## १६ कलियुगांतली पंधरावी विद्या

**( मासिक मनोरंजन 'दिवाळी अंक' १९०९ )**

ज्ञानप्रसाराचें साधन या दृष्टीनें वर्तमानपत्राचें निरीक्षण मनोरंजक आहेच, परंतु द्रव्यार्जनाचें साधन या दृष्टीनेंहि एखादे वेळीं त्यांचें निरीक्षण मनोरंजक होईल, असा भरंवसा आहे. परंतु हें निरीक्षण प्रस्तुत प्रसंगीं वर्तमानपत्रांतल्या मजकुरासंबंधानें न करतां त्यांतील जाहिरातींसंबंधानें आम्हांस कर्तव्य आहे. वर्तमानपत्रांचा मुख्य हेतु जनतेस बोध देण्याचा असतो; परंतु वर्तमानपत्रें चांगलीं चालण्यास त्यांची सांपत्तिक स्थिति

चांगली असावी लागते, व या सांपत्तिक सुस्थितीचें एक कारण जाहिरातीचें उत्पन्न हें आहे. वर्तमानपत्राचें महत्त्व व जाहिरातींचें उत्पन्न या गोष्टी प्राय: अन्योन्याश्रयी व अन्योन्यपोषक आहेत. जाहिरातींच्या दृष्टीनें पाहतां वर्तमानपत्राचा धंदा हा एक व्यापार आहे, व या व्यापारावर पाश्चिमात्य देशांतचसें काय पण गरीब हिंदुस्थानांतहि आजपर्यंत अनेकांनीं लाखो रुपये कमावले आहेत, पण जसें कापडाच्या व्यापारांतील व्यापाराचा माल म्हटला म्हणजे कापड, अगर लांकडाच्या व्यापारांतील माल लांकूड, तसें वर्तमानपत्रांच्या व्यापारांतला माल वर्तमान--म्हणजे बातम्या अगर त्या-वरील टीकापर लेख असें जर कोणीं म्हटलें तर तें मात्र चूक होईल. तर हा माल 'जाहिराती' होत. निदान मोठमोठ्या वर्तमानपत्रांसंबंधीं तर हें अगदीं खरें आहे. नुसत्या वर्तमानपत्राच्या वाचकांच्या वर्गणीवर कोणतेंहि मोठें वर्तमानपत्र चालणें शक्य नाहीं. मुंबईचें किंवा लंडनचें 'टाइम्स' अगर आपल्या इकडील 'बंगाली', 'पत्रिका', 'हिंदु' वगैरे दैनिक पत्रें घेतलीं व त्यांना जाहिरातींचें उत्पन्न मुळींच नाहीं असें क्षणभर मानलें तर त्यांचें एका वर्षांत चार वेळ दिवाळें निघेल, इतकी त्यांच्या खर्चांत व निवळ 'वर्गणी' च्या रकमेंत तफावत असलेली आढळून येईल. हे वर्तमापनत्रकर्ते वास्तविक बातमी अगर टीका विकीत नाहींत; तर जाहिरात-वाल्यांना जी प्रसिद्धी अगर जो प्रसार लागतो तो ते विकतात. व ते खरेदी काय करितात ? तर 'बातमीचा प्रसार' असेंच उत्तर द्यावें लागतें. ते बातमी देऊन लोकांचें चित्त अगर लक्ष विकत घेतात व तें लक्ष जाहि-रातवाल्यांस पैसे घेऊन विकत देतात. सकृद्दर्शनीं वर्तमानपत्रकर्ते बातमी विकतात असें दिसतें; परंतु जंगी वर्तमानपत्रकर्त्यांस बातमीचा व्यापारी म्हणणें, आणि, साखरेचा व्यापारीहि सालअखेर आपलें बारदान विकतो एवढ्याच करितां त्यास साखरेचा व्यापारी न म्हणतां बारदानाचा व्यापारी म्हणणें, हीं दोन्ही सारखींच असमंजसपणाचीं होतील.

संपादक व व्यवस्थापक असे वर्तमानपत्राचे दोन प्रकारचे चालक असतात. पैकीं पहिला प्रतिष्ठितपणें लोडतक्यास टेंकून बसतो, व कुटुंबांतील उधळ्या मुलाप्रमाणें खर्च कसा करावा येवढेंच त्यास माहीत असतें. अमुक पुस्तक चांगलें दिसलें कीं घे विकत; अमुक लेखक चांगलें लिहितो, सांग त्यास लिहावयास; अमुक ठिकाणीं अमुक महत्त्वाची गोष्ट घडली, आण

त्याची बातमी तारेनें; एवढें त्यास माहीत असतें; मग असें करण्यास खर्च कांहींहि येवो. पण एखाद्या जंगी वर्तमानपत्राचा जड गाडा चालविण्यास जी द्रव्यशक्ति लागते ती कणाकणानें सांठवून त्यांचे रांजण बनविण्याचें काम संपादकाचे दालनांत होत नसून व्यवस्थापकाचे खोलींत होत असतें. ताज्या अंकांतील लेखाची विद्वत्ता पाहून लोक वाहवा कसे म्हणतील याची काळजी संपादकास असते, व तो लेख लोकादरास पात्र झाल्याचें त्याच्या कानावर आलें असतां धन्यता वाटून त्याचा जीव थंड होतो. परंतु व्यवस्थापकाची दृष्टि निराळ्या प्रकारची असते. त्याला वर्तमानपत्रांतल्या 'टाकाऊ' भागांतल्या ओळीनओळीची किंमत असते, व जाहिरातींची जागा चौफेर भरगच्च भरली असें जेव्हां तो पाहतो, तेव्हांच त्याचें समाधान होतें. आंतील बातमी अगर अग्रलेख कितीहि चटकदार अगर विद्वत्तापूर्ण असला तरी त्याची त्यास फारशी किंमत वाटत नाहीं. आणि ताजा अंक हातीं पडतांच घडी उलगडून ताजी गरम बातमी वाचण्याचे धडपडींत जेव्हां एखादा वाचक वर्तमानपत्राचें मुखपृष्ठ काढून दूर फेंकून देतो तेव्हां मार्मिक 'व्यवस्थापका' स बहुधा हंसूं आदरत नसेल!

अशा रीतीनें जाहिराती ह्या वर्तमानपत्रकारांस किफायतशीर आहेतच, परंतु जाहिराती देणारांस त्या याहूनहि अधिक किफायतशीर असतात. वर्तमानपत्रांच्या वाचकांची साधारण प्रवृत्ति वर सांगितलीच आहे. व मुद्दाम जाहिराती वाचणारे 'वाचक' शेंकडा पांच तरी सांपडतील कीं नाहीं कोणास ठाऊक? एखाद्या वाचकांच्या अड्डयांत ताजें वर्तमानपत्र आलें असतां 'काय बुवा, आज काय नवी बातमी आहे! आज कशावर अग्रलेखाची झोड उठली आहे?' वगैरे पृच्छा हटकून व्हावयाचीच; परंतु 'काय बुवा, आज कशा कशाच्या नव्या जाहिराती आल्या आहेत?' असें विचारल्याचें कधीं कोणीं ऐकलें नसेल. वर्तमानपत्राच्या वाचकांचें लक्ष त्यांतील जाहिरातींवर जातां जातां ओझरतें व आकस्मिकच जावयाचें. घडी मोडीत असतां, पान उलटीत असतां त्यांकडे नजर जावयाची; व अशा घसरत्या नजरेखालीं आलेल्या पदार्थांचें सविकल्पक ज्ञान अर्थातच होऊं शकत नाहीं. परंतु या अशा स्थितींतच जो कांहीं वाचकांचा दृष्टिलाभ घडेल तेवढ्यानेंच जाहिरातवाल्यांचें काम भागतें. 'लंडन टाईम्स' मधल्या सोळा पानांत प्रत्यहीं बहुधा हजारों जाहिरातवाल्यांच्या जाहिराती असतात;

परंतु प्रत्येकास रोज कांहींना कांहीं तरी गिऱ्हाइकें मिळाल्याशिवाय राहत नाहींतच, हा अगदीं नियम आहे. आणि म्हणूनच जाहिरातींवर पैसे खर्च करणें हें कित्येक धंद्यांतलें आद्य तत्त्व होऊन बसलें आहे. कित्येक व्यापारांत जर मालाची किंमत एक रुपया तर त्याच्या प्रसिद्धीची किंमत दहा रुपये, व त्याच्या विक्रीचें उत्पन्न बारा रुपये आहे, असें दिसून येतें. अर्थात् हा जाहिरातीचा खर्च कोणी नफ्याशिवाय करीत नाहीं. असले व्यापार केवळ 'बिनभांडवली' जरी म्हणतां आले नाहींत तरी त्यांतलें बहुतेक भांडवल जाहिरातीवर खर्च होतें, ही गोष्ट मात्र अगदीं निर्विवाद आहे.

वर्तमानपत्रकर्त्यांचें व जाहिरातवाल्या व्यापाऱ्यांचें ठीक आहे; पण गिऱ्हाइकांचें काय ? निवळ जाहिरातीवर विश्वास ठेवून व्यवहार करणाऱ्या मनुष्यास पुष्कळ वेळ फसण्याचा प्रसंग येतो ही गोष्ट खोटी नाहीं. व हें तत्त्व जाहिरात देणारा व वाचणारा या दोघांच्याहि मनावर चांगलें बिंबलेलें असतें, नाहीं असें नाहीं. परंतु जाहिरातवाल्यांच्या व्यापाराची कूसच इतकी मोठी असते कीं, शंभर वाचकांपैकीं पांच श्रद्धाळू व भोळे वाचक 'सहज गमतीखातर एकवार अनुभव घेऊन पाहूं इच्छिणारे' दोन वाचक, आणि हजारो प्रयत्न करून थकलेला व 'कः कालः फलदायकः' या नात्यानें कांहीं तरी करावयाचें म्हणून कांहीं तरी करूं इच्छिणारा एखादा वाचक, इतकेच असामी जाहिरातवाल्याच्या जाळ्यांत सांपडले, तरी त्याचें काम भागतें. जो जाहिरातीवर विश्वास टाकून फसतो तो धडधडीत उघडया डोळयांनीं फसतो, सबब कोणी त्याची कींव करण्याचें कारण नाहीं. शिवाय, फसणारा आणि फसविणारा यांची गांठ समक्ष प्रायः पडण्याचा संभव नसतो; यामुळें आपल्या जाहिरातीनें फसलेल्या गिऱ्हाइकाची गांठ पडली असतां जी लज्जा जाहिरातवाल्यास वाटावयाची ती वाटण्याचा प्रसंगहि सहसा त्याजवर येत नाहीं. यामुळें ह्या जाहिरातींच्या धंद्याची पीछेहाट होण्याचा संभवहि नाहीं. याच कारणानें आणखीहि असें होतें कीं, जाहिरातवाल्या व्यापाऱ्याची पत त्याच्या आसपासच्या भागांत जरी नसली तरी 'No prophet is honoured in his own country,' या म्हणीवर विश्वास ठेवून व्यापाऱ्यास आपल्या अपमानदुःखाचें समाधान करून घेतां येतें. व वरतीं जितके वाचक दूर अंतरावरचे तितकीं त्यांच्यांतून त्यास गिऱ्हाइकेंहि अधिक मिळतात. या बाबतींत जाहिरातवाला सृष्टिनियमांची

पायमल्ली उघड करितो. गुरुत्वाकर्षणाचे नियमाप्रमाणें अंतर जितकें जास्त तितका आकर्षणशक्तीचा जोर कमी; परंतु जाहिरातीच्या प्रसिद्धीचें क्षेत्र जसें जसें पसरत जातें तसतशी जाहिरातवाल्याच्या मालाच्या गुणाची आकर्षणशक्ति कमी न होतां वाढतच जाते. हा चमत्कार नव्हे काय ? होय. पण तो खरा चमत्कार आहे.

जाहिरात हा पारधी असून जनता ही त्याची शिकार आहे, व ही शिकार हस्तगत करून घेण्यांत त्याची आजपर्यंत जी निरनिराळ्या मार्गांनीं बुद्धि खर्च झालेली आहे तिच्या योगानें कलियुगांतली ही पंधरावी विद्या निर्माण झालेली आहे. या विद्येंत बळजबरी व अनुनय या दोहोंचाही उपयोग चतुरपणानें केलेला आढळतो. वाघासमोर उभें राहून त्याला शिवी हांसडून गोळी घालणें ही शिकारीची जशी मर्दानी तऱ्हा आहे, तशीच नुसतें जाळें लावून देऊन आपण बाजूला सुरक्षितपणें गंमत पहात बसणें, ही शिकारीची जनानी तऱ्हा असें म्हणतां येईल. जाहिरातवाला आपल्या शिकारींत या दोनहि रीतींचा उपयोग करितो. कांहीं जाहिराती इतक्या ठळक, रंगीबेरंगी चित्रविचित्र व पावलोपावलीं पहाल तिकडे दृष्टि निरोध करणाऱ्या असतात कीं, थोड्याच काळांत तुमचें मन त्यांच्या पाशांत जखडून जातें. व त्याच्यावर 'मेस्मेरिझम'चा प्रयोग झाल्याप्रमाणें तें कमकुवत व परवश होतें. दुसऱ्या प्रकारच्या जाहिराती सौम्य, लपूनछपून वागणाऱ्या असतात; परंतु त्यांची घातक शक्ति मात्र कमी नसते. दोनही प्रकारच्या जाहिरातींस आधुनिक चित्रकलेची अत्यंत मदत झालेली आढळते. लहानथोरांचें चित्त आकर्षण करणारी, सर्व देशांतील निरनिराळ्या भाषा बोलणारासहि सारखीच समजणारी व सारखीच प्रिय अशी ही ललितकला जाहिरातीची सखी झाल्यापासून तिला कांहीं कमी पडेनासें झालें आहे. आधुनिक जाहिरात या सखीच्या मदतीनें पेहराव बदलण्यांत फार निष्णात बनली आहे. तिच्या पोषाख करण्याचे खोलींत किंवा फणेरीच्या पेटींत हरतऱ्हेचे रंग, चित्रविचित्र कशिदे, वेलबुट्टी वगैरेंचा संग्रह भरगच्च असतो. तसेंच इची भाषा सुभाषितालंकृत, चटकदार, ठसकेदार, गोड, मोहक अशी असून ओंठापासून आलेल्या व अतएव अतिशयोक्तिपूर्ण शब्दांची तिच्या भाषणांत रेलचेल असते.

जाहिरातींना पाश्चात्त्य देशांत चित्रकलेची इतकी मदत झालेली आहे

कीं, तिकडील एखादा जाहिरातींचा संग्रह म्हणजे खरोखरच उत्कृष्ट चित्रसंग्रह असतो, व कित्येक सचित्र जाहिराती तर राजाराणीच्या छपर-पलंगावर किंवा राजपुत्रांच्या पाळण्यावर लटकत राहण्यास योग्य अशा प्रकारच्या असतात. 'पीअर्स सोप' वगैरेंच्या जाहिरातींवर उत्कृष्ट चित्रकारांनीं आजपर्यंत लाखो पौंड मिळविले असले पाहिजेत. दुसऱ्या प्रकारच्या जाहिराती गुप्त पोलिसासारख्या असतात, व ज्यांनीं 'पिंक पिल्स'च्या जाहिराती पाहिल्या असतील त्यांस हें विधान सहज पटेल. ज्याप्रमाणें पांढरा 'ड्रेस' केलेल्या गुप्त पोलिसाचें खरें स्वरूप मध्येंच केव्हां व कसें प्रगट होईल याचा नेम नसतो, त्याचप्रमाणें वरून दिसण्यांत कांहीं तरी सरळ, सुसंगत असा, व वैद्यक विषयाचा ज्याच्याशीं कधीं संबंध मुद्दाम लावा म्हटलें तरी लावणें कठिण अशा विषयाचा मजकूर वाचीत असतां, एकदम 'पिंकपिल्स.' वर वाचकांस केव्हां ठेंच लागेल याचा नेम नससो. वरील साळसूद मथळा पाहून मजकूर वाचावयास लागावें, व निम्माशिम्मा मजकूर वाचूनहि होऊन, केव्हां कादंबरीचा प्रियप्राण असा जो शृंगार त्याचा काल्पानिक रस अनुभवीत असतां, तर केव्हां अंगावर रोमांच थरारून सोडणारी एखादी वीररसपूर्ण गोष्ट वाचीत असतां, केव्हां जगांत क्वचित्प्रसंगीं दृष्टीस पडणाऱ्या करुण देखाव्याचें शाब्दिक चित्र पाहून नेत्र अश्रूंनीं भरून गेले असतां, किंवा कधीं कोणाच्या स्वप्नांतहि न दिसणाऱ्या व केवळ अचाट कल्पनेस गोचर असा अद्भुत कथाभाग वाचून भिंवया वर चढून डोळे प्रफुल्लित झाले असतां, एकदम 'पिंक-पिल्स' हीं अक्षरें दृष्टीस पडतात! आणि मग डोळयांत अंजन पडल्यासारखें होऊन व रसमय सृष्टींत हेलकावे खाणाऱ्या कल्पनाविमानास मोठें थोरलें भोंक पडून, मन जड सृष्टिवर येऊन आपटतें—हा सर्व अनुभव ज्यास आला नाहीं असा एखादा तरी वाचक असेल काय ?

पाश्चात्यांच्या अनुकरणानें अलीकडे हिंदुस्थानांतहि या पंधराव्या विद्येचा बराच प्रचार झालेला आढळतो. जाहिरातीपुरतें भांडवल, व जाहिरातींतील मजकूर कोणाकडून लिहून आणण्यापुरती अक्कल असली म्हणजे मग इतर कांहीं नको, अशा तऱ्हेचे बरेच व्यापार इकडेहि सुरू झाले आहेत. औषधें वगैरे अनेक व्यापार अशांतलेच आहेत. एखाद्या परदेशस्थास हिंदुस्थानची कल्पना जाहिरातींवरून करावयाची असतां

हिंदुस्थानांत फक्त रोगराईशिवाय दुसरें कांहीं असेल कीं नाहीं याची शंकाहि एखादे वेळीं उत्पन्न होण्याचा संभव आहे; परंतु अनन्यसाधारण रोगीपणा उत्पन्न करून ईश्वरानें या देशाचें जें नुकसान केलें त्याच्या मोब-दल्यादाखल अनन्यसाधारण धन्वंतरी व अश्विनीकुमारहि तेथेंच उत्पन्न करून त्यानें आपली न्यायप्रियता व्यक्त केली आहे यांत शंका नाहीं, असें मात्र तो खास म्हणेल.

असो; या विद्येविषयीं ल्याहावें तितकें थोडेंच होणार आहे. जाहिरातीचें चरित्र फार मनोरम आहे. तें एक काव्यच आहे असें म्हटलें तरी चालेल. त्यांतील रस अद्‌भुत व अलंकार अतिशयोक्ति हा आहे. आत्मस्तुति हा साधारणतः दोष म्हणून गणला जातो. 'आपली आपण करी स्तुति तो एक मूर्ख' असें रामदासांनीं म्हटलें आहे. परंतु त्यावेळीं 'जाहिराती' जन्मास आल्या नव्हत्या!

---

# १७ भविष्यकथन

## ('चित्रमयजगत्' जानेवारी १९१४)

भोंदूंनीं फसवावें आणि दुधखुळ्यांनीं फसावें, असले जे अनेक प्रकार जगांत आहेत, त्यांतलाच एक प्रकार 'भविष्यकथन' हा होय. वास्तविक भूतकाळ हा भविष्यकाळाइतकाच समृद्ध आहे. तथापि, एखादें ऐति-हासिक सत्य–पूर्वी माहीत नसलेलें असें–जरी कोणीं खात्रीलायक पुराव्या-निशीं सिद्ध करून दिलें, तरी त्यामुळें कित्येकांस जो आनंद होणार नाहीं, तो भविष्यकाळची एखादी साधी गोष्ट सांगितली असतांहि होतो; मग ती खरी न ठरली तरी चालेल. बाजारांत नेहमीं उधारीचा प्रकार असा असतो कीं, माल आधीं कांहीं दिवस गिऱ्हाइकानें ताब्यांत घ्यायचा व त्याचे पैसे दुकानदारास मागाहून द्यायचे. पण अर्धवट धर्मबुद्धीनें मांड-लेल्या तामसी श्रद्धेच्या बाजारांत सर्व सव्याचाच व्यापार चालतो. म्हणजे विश्वासाचे दाम आज पटवावयाचे, आणि वायद्यावर खरेदी केलेलें भविष्य–कथन पुढें कधीं काळीं खरें ठरेल म्हणून वाट पहात बसावयाची! आणि तें खरें न ठरलें तरी काय हरकत? विश्वासाचे दाम भविष्य-

वाद्याला तोंपर्यंत फुकट वापरायला मिळतातच. शिवाय भविष्य खोटें ठरलें तरीं हे दाम सहसा कोणी परत मागत नाहीं व कोणी देतहि नाहीं. कारण श्रद्धाळू मनुष्य अशा बाबतींत मोठा दिलदार व उदार असतो! भविष्य-कथन खोटें ठरलें तरी पुष्कळ वेळां त्याचा दोष भविष्यवाद्याचे माथ्यावर न लादतां आपल्या नशिबाला बोल लावून स्वतःच्या डोक्यावर घेण्यास तो तयार असतो. ' भविष्य आयत्या वेळीं खोटें ठरलें तरी काय हरकत ? कारण तें प्रथम सांगितलें तेव्हां तरी खरें होतेंच कीं नाहीं ? पुढें खरें न ठरलें तर आपलें नशीब ! त्याला भविष्यवादी काय करणार ? ' रोग बरा झाला तर आपल्या औषधानें, बरा न झाला तर रोग्याच्या कुपथ्यानें, असा जो दुहेरी पेंच ' कलिविडंबनां ' त वर्णन केलेला वैद्य रोग्याला घालतो, तोच भविष्यवादी आपल्या ताब्यांत आलेल्या दुध-खुळ्या लोकांनाहि घालतो. किंबहुना, ते लोक तसला पेंच आपण होऊन आपणांवर करून घेतात, असेंहि म्हणतां येईल. हा अलौकिक उधारीचा प्रकार जगाच्या प्रारंभापासून सुरू आहे. भविष्यवाद्यांचा कुलक्षय होण्याची भीति कधींच नाहीं; कारण त्यांचे पोशिंदे जे श्रद्धाळू लोक त्यांचाहि कुलक्षय कधीं होत नाहीं. जगाच्या उत्पत्तीपासून या दोन्ही कुळांची परंपरा अखंड चालू आहे. कालमानाप्रमाणें त्या त्या पिढीचे पुरुष जरी नूतन पोशाख व पेहराव धारण करितात, तरी आंतून त्यांची शरीररचना व त्यांचा रंग हीं कायमच असतात.

भविष्यकथनाच्या अंगाला इतकें जें सोनें लागलें आहे, त्याचें कारण काय ? हा प्रश्न सहजच उत्पन्न होतो. वर्तमानकाल तर बोलून चालून रुक्ष व नीरस; त्यांत अद्भुतत्व असें कोणास कांहींच वाटत नाहीं. पण भूतकालाबद्दलहि मनुष्यमात्राला भविष्याइतकें प्रेम वाटत नाहीं, ही जराशी चमत्कारिक पण अनुभवसिद्ध गोष्ट आहे. मनुष्याचें तोंड नेहमीं पाहावें तों पुढच्या काळाकडे फिरविलेलें ! आगगाडींत आपण बसलों असतां मागें किंवा पुढें वाटेल त्या बाजूस तोंड करून बसण्याची सोय असते. शिवाय पुढच्या बाजूस तोंड करून बसलों असतां जो भूभाग व देखावा केवळ क्षणभर आधीं पहावयास आपणांस सांपडणार तोच, क्षणभर उशिरां कां होईना पण मागें तोंड वळवून बसलों असतांहि,

पहावयास सांपडणारच. असें असतां शेंकडा नव्याण्णव मनुष्यें पुढच्या बाजूस तोंड वळवून बसलेलींच आढळून येतील. या चमत्काराचें एक कारण असें असावें कीं, आपण मागें तोंड वळवून बसलों असतां जरी तोच भूभाग व देखावा डोळ्यापुढून जातो, तरी तो हातांतून निसटून पळून गेल्यासारखा वाटतो. म्हणजे त्याच्या दर्शनानें आपल्या बलसंपन्नतेची भावना मनांत न येतां, कमकुवतपणाची भावनाच येते. देखावा निघून जातो त्याला अटकाव करून धरून ठेवण्याची शक्ति आपणांत नाहीं याचें आपणांस नकळत वाईट वाटतें. पण तेंच पुढच्या बाजूस तोंड करून बसलों असतां, व दूर असलेला देखावा हळुहळू आपल्या डोळ्यापुढें येत असतां, त्याचें आपण आक्रमण केलें—तो आपण हस्तगत केला—अशी अभिमानाची भावना मनांत येत असावी. भूतकाळ हा मृत काळ, तो आपल्या पायांशीं मरून पडलेला; अर्थात् मेलेल्याला मारण्यांत किंवा काबीज करण्यांत कसला पुरुषार्थ ? भविष्यकाळ हें श्वापद मात्र भयंकर असून तें अंधाऱ्या दरींत बसून राहिलेलें असतें. त्याला जर आपणाला हुसकून काढून जिंकतां आलें, तर तो मात्र पुरुषार्थ खरा असें मनुष्यास वाटतें. तात्पर्य अशा रीतीनें पराक्रमाची आकांक्षा हें एक कारण होय.

दुसरेंहि एक कारण आहे. तें हें कीं, मनुष्य ज्ञानाच्या बाबतींत नेहमीं अतृप्त असतो, नुसती क्षितिजापलीकडेहि आपली दृष्टी जात नाहीं, जाग्यावर उभें राहून आपणांस सगळें जग दिसत नाहीं, ही परमेश्वराविरुद्ध मनुष्यमात्राची एक कायमचीच तक्रार आहे. तथापि, भविष्यज्ञानाची आवड ही केवळ ज्ञानसंग्रहाच्या सात्त्विक भावनेनें मनुष्य धरीत असेल तर तिला कोणी नांवें ठेवणार नाहीं. पण ज्ञानवृद्धीची ही लालसा बहुशः सात्त्विक नसते. कारण भविष्यकाळ सोडून दिला तरी वर्तमानकाळीं कोणाहि मनुष्याच्या कक्षेंत, किंवा कक्षेबाहेर पण जवळच, ज्ञानभांडार इतकें खच्चून भरलेलें असतें कीं, त्यानें हा जन्मच काय पण पुढचे अनेक जन्म घालविले तरी तें सर्व त्याला संपादितां येणार नाहीं. असें असतां केवळ एका क्षणानंतर घडून येणारी गोष्ट जर क्षणभर आधीं त्याला समजण्यासारखी असेल, तर तिच्याकरितां तो हें सर्व ज्ञानभांडार बाजूला सारील. बरें, क्षणभर आधीं कळलेल्या गोष्टीचा हटकून फायदा करून घेईल इतका तो खरा विचारी असेल तरीहि चालेल; परंतु भविष्य-

ज्ञानाला हपापलेलीं मनुष्यें सहसा इतकीं विचारी असलेलीं आढळत नाहींत. त्यांना भविष्यज्ञानाची गोडी वाटते ती ज्ञानाकरितां नव्हे, तर एक क्षणानंतर कळणारी गोष्ट आगाऊ कळली एवढ्याच करितां. चमत्कार किंवा अद्‌भुतपणा एवढ्याचाच त्यांना आनंद ! उठल्या सुटल्या ज्योतिष्यांपुढें पत्रिका टाकून किंवा हात पसरून भविष्यकथानाची याचना करणाऱ्या शंभर लोकांपैकीं एक मनुष्य तरी ज्योतिषापासून होणाऱ्या भविष्यज्ञानामुळें सन्मार्गास लागलेला सांपडेल कीं नाहीं, याची शंकाच वाटते. पण लहान मुलांना समोर दिसणाऱ्या जिनसापेक्षां तोच जिन्नस कुलुपांत असला तर अधिक हवासा वाटतो. किंवा बायबलांत सांगितल्याप्रमाणें मनुष्याच्या आद्य जनक-जननींना ज्ञानवृक्षाचें फळ खाण्याचा प्रतिबंध झाला म्हणूनच तें खाण्याची इच्छा त्यांना अनिवार झाली, तोच प्रकार भविष्यज्ञानाकरितां हपापलेल्या लोकांचा असतो. भविष्यज्ञान हें सहसा होऊं शकत नाहीं, सामान्य नियमांच्या बंधनामुळें हें अप्राप्य किंवा प्रतिषिद्ध, एवढ्याच करितां तें मिळवावें असा त्यांस मोह पडतो. निसर्गदेवतेनें घालून दिलेली मर्यादा ओलांडणें किंवा नियम मोडणें यांतच विशेष पराक्रम आहे, अशी मनुष्याची कदाचित् बुद्धि असेल; किंवा त्याच्या बुद्धींत असली महत्त्वाकांक्षाहि नसून, केवळ अनपेक्षिताची अपेक्षा करणें किंवा अनुभव घेणें इतकी पोरकटच कल्पना त्याची असूं शकेल. हजारों लहान मुलांना फटाकडीचा झालेला बार ऐकून मौज वाटते; पण त्या आवाजाचें कार्यकारण हुडकून काढण्याकडे एकाचेंहि मन वेधत नाहीं. आवाज ऐकण्यापासून झालेला त्यांचा आनंद वांझोटा असतो, तो जिज्ञासेला प्रसवत नाहीं. त्या आनंदाची उत्पत्ति व लय हीं समकालीनच असतात. याच्या उलट, फटाकडीचा आवाज ऐकल्यामुळें ज्याची जिज्ञासा जागृत झाली असा एखादा मुलगा आढळला, तर त्याबरोबर हेंहि आढळून येईल कीं, त्या प्रौढबुद्धीच्या मुलाला तो आवाज ऐकून होणारा आनंद इतर पोरकट पोरांच्या आनंदासारखा नसतो. खऱ्या जिज्ञासेशिवाय भविष्यज्ञानाची आवड धरणें पोरकटपणाचें आहे; उलट जिज्ञासाप्रेरित मनुष्याला भविष्यकथनाचा पोरकट आनंदहि होत नाहीं, व त्याचा त्याला चाळाहि लागत नाहीं.

भविष्यकथनाचा खेळ सर्व देशांत सर्व काळीं अनेक प्रकारचे लोक खेळत आले आहेत. पण भविष्यकथनाचीं म्हणून जीं उदाहरणें आढळतात,

तीं एक काल्पनिक तरी असतात; किंवा खरीं असल्यास त्यांत अद्भुत असें मुळांत फार थोडें असतें, म्हणजे तीं फक्त विशिष्ट अनुमानें असून अनुमानांच्या रीतीप्रमाणेंच खरीं ठरलेलीं असतात. पैकीं पहिल्या प्रकारचीं म्हणजे काल्पनिक भविष्यकथनेंच फार. अशांना मुळांत कांहींच आधार नसतो; पण विवक्षित गोष्टी घडून आल्यानंतर मग त्यासंबंधानें पूर्वीं भविष्यें झालीं होतीं अशी भाविक लोक आपल्या व दुसऱ्याच्या मनाची समजूत करीत बसतात. भारत–भागवतांत सुवर्णयुगें व प्रलय यांविषयींचीं भविष्यें ठिकठिकाणीं आढळतात. ज्याचें पूर्वीं भविष्य झालें नव्हतें--म्हणजे ज्याचें भविष्य झाल्याविषयीं लोक मागाहून बोलूं लागले नाहींत--असा एकहि अवतार सांपडणार नाहीं! रामचरित्राचें भविष्य शब्दशः आगाऊच झालें होतें! खिस्ताचें भविष्य त्याच्या जन्माच्या पूर्वीं झालें होतें कीं नाहीं कोणीं सांगावें? पण खिस्तानंतर झालेल्या बायबलांत मात्र त्याचा उल्लेख हटकून सांपडतो. कलंकीपुराण, गर्गसंहिता व भविष्यपुराण यांत भविष्येंच भविष्यें सांगितलीं आहेत! पण त्या त्या वेळीं जिवंत असून जुन्या भविष्यांचे उल्लेख पाहून त्यांबरहुकूम ज्यास अनुभव येईल तो खरा! हिंदू लोकांच्या 'कलंकी' प्रमाणें ज्यू लोकांचा 'मेसाया' अद्याप यावयाचा आहे; आणि ज्या वेळीं खिस्त फिरून जन्माला येणार, त्या वेळीं अनंत भूतकाळ व अनंत भविष्यकाळ यांतले सर्व मनुष्यप्राणी आपापल्या थडग्यांतून उठून देवाच्या सिंहासनापुढें उभे राहणार असें भविष्य आहे! असलें भविष्य अर्थात् खोटें ठरण्याचा संभवच नाहीं; कारण खोटें ठरण्याचा प्रसंग जग बुडेल तेव्हां! संतुष्ट मनानें दिलेला आशीर्वाद किंवा संतापानें दिलेला शाप हा केव्हां केव्हां केवळ काकतालीय न्यायानें खरा होतो; व फुलाबोलास गांठ पडून मूळच्या उद्गारांना भविष्यकथानाचें स्वरूप येतें! अशा तऱ्हेचीं भविष्यें तर कित्येक सांपडतील. रासमालेमध्यें असलीं भविष्यकथनें अनेक आहेत. दिल्लीच्या बादशहानें शीख धर्मगुरु तेखबहादूर याचा छल केला, तेव्हां त्यानें मोंगलपादशाहि नष्ट होऊन इंग्रज येतील असें भविष्य केल्याचें आतां सांगतात! पण तेंच जर खरें मानावयाचें तर 'Akbar's dream' या काव्यांत टेनिसन कवीनें इंग्रज येण्याविषयीं अकबरच्या वेळचें म्हणून काव्यपूर्ण भविष्य लिहिलें, तेंहि गंभीरपणानें खरें कां मानूं नये?

याचप्रमाणें व्हर्जिलच्या 'इलिअड काव्यांतील' "Over every shore the house of Aeneas shall reign" या वाक्यावरून रोमन बादशाहीचें भविष्य, तसेंच सेनेका याच्या नाटकांतील "There shall come a time in later ages when ocean shall relax his chains and a vast continent appear, and a pilot shall find new worlds, and Thule shall be no more earth's bound" या एका वाक्यावरून अमेरिकेचा शोध लावण्याचें भविष्य झालें होतें, असें कित्येक भाविक लोक म्हणतात. पण अशा रीतीनें काव्यांतील तुटक शब्द घेऊन त्यांचीं भविष्यें बनवूं लागल्यास वाटेल तीं भविष्यें सिद्ध करितां येतील ! असल्या भविष्यांची उपपत्ति काकतालीय न्यायानेंच ठरविली पाहिजे. कारण भविष्यगर्भ असे इतर शेंकडों हजारों उद्गार फुकट जातात, तेव्हां त्यांकडे कोणी लक्ष देत नाहीं; व जेव्हां एखादी गोष्ट कशी तरी इकडून तिकडून जुळवून दाखवितां येते, तेव्हां मात्र तिच्या बोकांडीं बसून तिला 'भविष्य-कथन' असें गंभीर नांव देतात ! भविष्यांची दुसरी एक उपपत्ति अशी लावितां येते कीं, कल्पनेची मजल अनुभवापुढें नेहमीं कांहीं थोडी तरी असतेच; आणि प्रतिभाशाली मनुष्य रेम्याडोक्या मनुष्याच्या पेक्षां पुढें जाऊन, घडून येणाऱ्या गोष्टीसंबंधानें सहजच अधिक चतुराईनें तर्क करितो; व यामुळें त्याच्या उद्गारांतून भावी वृत्तांताचें रूप किंचित् पुसट पुसट प्रतिबिंबित होणें शक्य असतें. पण चतुराईचा तर्क किंवा 'Intelligent anticipation' याहून अधिक अलौकिक किंवा दिव्य असें स्वरूप त्याला देतां येत नाहीं. ज्याला गृहीतार्थानें 'भविष्यकथन' हें नांव दिलें पाहिजे असले चमत्कार क्वचित् होतात असें घेऊन चालून त्यासंबंधानें ही वरील कैफियत आम्हीं दिली आहे. पण अनुभवी, चतुर, दूरदर्शी व प्रतिभा-संपन्न अशा लौकिक व्यक्तींना अनुमानाच्या रूपानें करितां येणार नाहींत, अशीं मुळीं भविष्यकथनेंच नसतात, असेंच आमचें म्हणणें आहे. व जीं जीं भविष्यकथनाचीं उदाहरणें म्हणून देण्यांत येतात किंवा येतील, त्या घडलेल्या खऱ्या गोष्टी असल्या तरी, वरील वर्णनाखालींच आल्या पाहिजेत.

'भविष्यकथन' या शब्दानें जरी अद्भुत भावना मनांत उत्पन्न होते, तरी तें एक प्रकारचें अनुमानच आहे व अनुमान हें ज्ञानाचें एक नेहमींचेंच साधन होय. ज्ञानाचे दोन प्रकार असतात; प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष. इंद्रियार्थ-सन्नि-

कर्षानें होणारें तें प्रत्यक्ष; पण असें ज्ञान फार थोडें व थोडा वेळ टिकणारें असतें. आतां स्मृतिजन्य ज्ञानाचाहि प्रत्यक्ष ज्ञानामध्येंच समावेश करितां येईल, कारण स्मृति हा ज्ञानेंद्रियांच्या धर्मांचाच एक परिणाम आहे. परंतु प्रत्यक्ष व स्मृतिजन्य दोन्ही मिळून होणारी ज्ञानाची भरती आपल्या एकंदर अनुमानजन्य ज्ञानाच्या भरतीपेक्षां कमीच असते. उपमिति व शाब्द असें प्रमाणांचे आणखी दोन प्रकार मानण्यांत येतात. पण त्या दोहोंचाहि अंतर्भाव अनुमानांतच केला पाहिजे. कारण, उपमानांत —म्हणजे दाखला देतांना—आपण कित्येक मूलभूत गोष्टी म्हणून गृहीत घेतों, व त्यावरून झालें तरी अनुमानच काढतों. शाब्दप्रमाणांतील आप्तवचन झालें तरी पुष्कळ वेळाच्या अनुभवानेंच तें खरें वाटत गेल्यामुळें, आप्तवचनाची यथार्थता आपण अनुमानितच करितों. असो; अनुमान म्हटलें म्हणजे त्याची रीत येथून तेथून सारखीच; व ज्या गोष्टी आपण अनुमानाच्या मार्गानें न जातांहि आपणास समजतात असें वाटतें, त्यांचेंहि ज्ञान खरोखर अनुमानाच्या सहाय्यानेंच झालेलें असतें. अनुमान करण्याची नित्य संवय लागल्यानें केवळ पाटीवर आंकडे मोडून सोडविलेल्या उदाहरणाप्रमाणें अनुमानाची कृति आपणास दर वेळेस करावी लागत नाहीं. पण तेवढ्यानें अनुमानाची म्हणून कांहीं कृतिच करावयाची नसते, असें मात्र होत नाहीं. ज्याची स्मृति धड असते तो तोंडानें हिशेब करितो, व ज्याची धड नसते त्याला आंकड्यांचा सर्व तपशील मांडावा लागतो.

पण आंकडे प्रत्यक्ष मांडले किंवा न मांडले तरी रीतीचा कांहीं तरी कारभार करूनच उदाहरण सोडवावयाचें असतें ही गोष्ट निर्विवाद आहे. तोंडानें उदाहरण सोडविणारा मनुष्य रीतीशिवाय सोडवितो, आणि पाटीवर आंकडे मोडणारा मनुष्यमात्र तें रीतीनें सोडवितो असें म्हणतां यावयाचें नाहीं. कारण, दोघांसहि उदाहरण सोडविण्यास रीत ही अवश्य व अनिर्वाह्यच आहे. आणि कोणचीहि रीत म्हणजे अनुमानपरंपरेपेक्षां दुसरें कांहींएक नाहीं. स्मृतीप्रमाणें कमीअधिक बुद्धीमुळेंहि फरक पडतो. तथापि बुद्धिवान् मुलाला अनुमानपरंपरेची स्फूर्ति लवकर झाली म्हणून त्याचें झालें तरीं अनुमानपरंपरेशिवाय चालतें असें म्हणतां येत नाहीं. बुद्धिबळें मध्यम खेळणाराला दोन डाव टाकून होणारा तिसरा डाव आधीं दिसतो; पण तोच खेळणारा निष्णात असेल तर पांच सातहि

डाव आधीं लक्षांत घेऊन त्या धोरणानें तो मोहोरीं चालवितो. पण असा भेद असला तरी मधल्या डावांच्या पायऱ्यांवरूनच दोघांनाहि जाणें आहे. सदरेवरून माडी चढण्याचा मार्ग एक म्हणजे जिना हाच; त्यावरून चढणारें मूल असेल, तर दोन पायांच्या भरतीला दोन हात लावून, चार चार पायांनीं प्रत्येक पायरी चढेल; प्रौढ मुलगा असेल तर तो एका पायरीवर एक पाय तर दुसरीवर दुसरा पाय, असा चढेल; व मोठा मनुष्य असेल, तर एका पायरीआड एक पायरी ओलांडून उड्या मारीतहि त्याला जिना चढतां येईल. पण सोपानपरंपराही त्याला कांहीं चुकणार नाहीं. अनुमान म्हणजे तीहि अशी एक सोपानपरंपराच असते.

मनुष्याचा अनुभव व बुद्धि जितकी जास्त, त्या मानानें त्याला अनुमान सोपानाच्या पायऱ्या—म्हणजे मुख्य अनुमानांतील कांहीं कांहीं पोट-अनुमानें—उड्या मारून ओलांडितां येतील. परंतु अनुमान—सोपानावरूनच सिद्धांताकडे गेलें पाहिजे हें त्याला टाळतां येत नाहीं. अनुभव किंवा बुद्धि विशेष असली तर मनुष्याला पोट अनुमानांच्या पुरचुंड्या बांधून नेहमीं तयार ठेवितां येतात इतकेंच. गणितशास्त्रांत जसे ' फॉर्म्युले ' तयार असतात, किंवा महिन्यावरून दिवसांचे पगार आकारण्याची, अथवा इंजीनियर खात्यांत इमारती बांधण्याचे कामीं लाकूड—लोखंड वगैरेंवर पडणारा भार व त्या मानानें त्यांचीं रुंदीजाडीचीं मापें ठरविणारीं कोष्टकें असतात, तशीं अनुमानविषयांतील कोष्टकें अनुभव व बुद्धि यांचे योगानें मनुष्याच्या डोक्यांत तयार होऊन राहतात; आणि मग त्यांच्या सहाय्यानें कोणत्याहि प्रश्नास मनुष्याला कमी जास्त जलदीनें उत्तरें देतां येतात. पुष्कळ गोष्टी मनुष्य हा आंगच्या उपजत बुद्धीनें करितो असें म्हणतात; परंतु, उपजत बुद्धी अशी फार थोडी असते. व जी असते तिचेंहि पृथक्करण केलें असतां, तो त्याच्या स्वतःच्या अनुमानांचा परिणाम नसला तरी, ज्यांच्या शरीरापासून तो निर्माण झाला, त्या एक अगर अनेक पिढ्यांच्या मातापितरांनीं आपल्या जन्मांत मिळविलेल्या अनुमानजन्य ज्ञानाचा परिणाम होय, असें दाखवितां येतें. सहजस्फूर्तीचेंहि स्वरूप असेंच आहे. चकमक झडल्याबरोबर ठिणगी पडली किंवा बटन दाबल्याबरोबर विजेचा दिवा लागला, तरी त्या ठिणगीचा व

त्या ज्योतिचाहि एक रासायनिक वृत्तांत म्हणून असतोच. या चमत्काराचा कार्यकारणभाव, त्याचे नियम, व तो चमत्कार उत्पन्न होण्यास लागणारी पूर्वतयारी यांचा वृत्तांत इतका मोठा असतो कीं, तो घडून येण्यास जशीं कित्येक वर्षेंहि लागलीं असतील तसा तो समजून घेण्यास कित्येक तासहि लागतील.

इतका प्रपंच करण्याचें कारण हेंच कीं, ' भविष्यकथन ' हें नांव जरी प्राय: गहनार्थप्रतिपादक आहे, तरी ती वस्तु केवळ ' अनुमान ' या सदराखालींच पडेल. अनुमान हें नीरस व तर्करुक्ष नांव दिल्यामुळें भविष्यकथनाचें सर्व स्वारस्य, त्याची सर्व रम्यता आम्ही काढून टाकतों, असा कदाचित् आक्षेप आमचेवर येईल. परंतु तो आक्षेप सोसूनहि यथार्थ वस्तुरूप दर्शन करविलेंच पाहिजे. भविष्यकथन हें केवळ दिव्यस्फुरणाचें कार्य आहे, असें गौरवयुक्त शब्दांनीं त्याचें वर्णन कोणीं वाटेल तर करो; पण भविस्यकथनास केवळ अनुमानाखालीं ओढणाराला आपल्या पदरीं नास्तिकपणाच पत्करावा लागेल असें नाहीं. कारण याच स्फुरणांतील दिव्य तेज तेवढें ईश्वरी चित्कलेंतून आलें, असें मानण्यास काय कारण ? व हें तेज तर चित्कलेंतून आलें, तर भविष्यकथन सोडून वर्तमानकाळीं होणाऱ्या इतर लोकोत्तर मानसिक स्फुरणाचे जे प्रकार आपणास दिसतात, त्यांनाहि कारण ईश्वरी चित्कलाच असें कां मानूं नये ? ईश्वर मनुष्याला चित्कला उसनी देत असेल, तर ती भविष्यकाळासंबंधीं सवाहात गप्पा मारण्यापुरतीच देतो असें कां मानावयाचें ? वर्तमानकालींहि बुद्धीचे किंवा मानसिक स्फुरणाचे चमत्कार आपणास दिसत असतां, त्यांना मात्र लौकिक गोष्टी हें नांव देऊन त्यांची योग्यता आपण कमी कां करावी ? जें वर्तमान तेवढें लौकिक व जें भविष्य तेवढें अलौकिक; जें प्रस्तुत तेवढें मानुष व जें अप्रस्तुत तें सारें दिव्य—असलें वर्गीकरण अन्यायमूलक नव्हे काय ? तें करणारांनीं भगवद्गीतेंत सांगितलेल्या ' विभूतिपूजना ' च्या सिद्धांताचें मर्मच जाणलें नाहीं असें म्हणावें लागतें.

स्वत: बुद्धि हीच मुळीं जर ईश्वरदत्त आहे, तर वर्तमानकाळीं किंबहुना आपल्या डोळ्यादेखत घडणाऱ्या तिच्या अनेक साक्षात्कारांनाहि आपण दिव्य चमत्कार कां म्हणूं नये ? ज्याच्या डोक्यांतून लोकोत्तर उज्ज्वल

काव्य निघतें, ज्याच्या हातानें अलौकिक सुंदर चित्र निर्माण होतें, ज्याची बुद्धि सराफकांट्यावर किंवा शेअरबाजारांत इतकी प्रभावशाली होते, कीं त्याच्यापुढें सर्व प्रतिपक्षी कोलमांडून जाऊन त्यालाच तेवढें अव्याहत यश मिळतें—त्या सर्वांच्या मनःस्फुरणाला दिव्यच कां म्हणूं नये ? व आमच्या या युक्तिवादानें चिच्छक्तीची व्याप्ति जगांत जर अधिक सिद्ध झाली, तर आम्ही नास्तिक न ठरतां उलट अधिक आस्तिकच ठरत नाहीं काय ? अमुक इतक्या इयत्तेपलीकडे मनःस्फुरण गेलें म्हणजे त्याला दिव्य किंवा ईश्वरी असें नांव द्यावयाचें, तर आमच्या कवीला, आमच्या चितार्‍याला, व आमच्या यशस्वी सट्टेवाल्यालाहि तुमच्या भविष्यवाद्याप्रमाणें चित्कलेचे अंशभागी मानून त्यांना तें गौरव तुम्ही देणार नाहीं, तर तुमच्या भविष्य-वाद्यालाहि तें मिळणार नाहीं ! ईश्वरी कृपेची वांटणी मनुष्यमात्रांत इतक्या सढळ हातानें करावयाची कीं नाहीं—कारण तशी केल्यानें त्या कृपेची दुर्मिळता जाऊन तिची योग्यता कमी झालीशी तुम्हांला वाटेल—हें तुम्ही वाटेल तसें ठरवा. पण वांटणीचा प्रश्न उपस्थित झाला असतां, न्यायाचा आग्रह आम्ही सोडणार नाहीं, इतकेंच काय तें आमचें येऊन जाऊन म्हणणें.

'पुढें काय ?' हा प्रश्न बहुधा प्रत्येक मनुष्याच्या पुढें उभा असतोच. उन्हांत चालणार्‍या मनुष्याला ज्याप्रमाणें आपल्या सावलीच्या टोंकाला केव्हांहि गांठतां येत नाहीं, त्याप्रमाणें 'पुढें काय ?' या प्रश्नाच्या समाप्ती-लाहि तो केव्हांच गाठूं शकत नाहीं. हिमालय पर्वतावर चढणार्‍या प्रवा-शानें एक शिखर ओलांडलें कीं दुसरें शिखर त्यामागें उभें असलेलें त्याला दिसतें; व तो तेंहि चढून गेला कीं तिसरें ! क्षितिजावर पृथ्वी आणि आकाश एकमेकांस चिकटून पृथ्वीची सीमा पोंचली असें वाटतें. पण तेथें एखादी खूण ठेवून त्याच क्षितिजप्रदेशावर आपण जावें, तों फिरून क्षितिज पहिल्या इतकेंच दूर दिसतें. 'पुढें काय ?' या प्रश्नाचें उत्तर वास्तविक 'अनंत' असेंच आहे. हें सर्व अनंतच्या अनंत मनुष्याच्या हस्तगत झाल्यास तें त्याला हवेंसेंच वाटेल; कारण खुद्द ईश्वराशीं समव्याप्ति लाभली, तर ती कुणाला नको ?आतां मनुष्यमात्र महत्त्वाकांक्षी असला तरी ही समव्याप्ति अशक्य कोटींतली म्हणून सोडून देण्यास तो तयार असतो. तथापि, भविष्यावरचा सर्व हक्क मात्र सोडून देण्यास तो तयार नसतो. इतकेंच नव्हे, तर आपापल्या शक्तीप्रमाणें भविष्याचा कांहीं थोडा तरी प्रांत हस्त-

गत केल्याशिवाय त्याला चैनच पडत नाहीं. हावरा शेतकरी जसा आपलें कुंपण थोडें तरी शेजारच्या शेतकऱ्याच्या हद्दीमध्यें ढकलून त्याची निदान हात दोन हात जागा तरी बळकावतोच, किंवा एखादा लोभी सम्राट् आपल्या राज्याच्या सरहद्दीवरचा प्रांत एकदम खालसा करण्यास नच मिळाला, तरी त्यावर आपलें कोरडें वर्चस्व ( Sphere of influence ) तरी प्रस्थापित करूं पाहतो, त्याप्रमाणें मनुष्यालाहि भविष्याच्या दुर्भेद्य प्रांतांत चंचुप्रवेश केल्याशिवाय समाधानच वाटत नाहीं.

एका अर्थानें त्याचें हें करणें बरोबरहि असतें. कारण ' वर्तमानकाळा ' चा विस्तार फारच संकुचित म्हणजे क्षणमात्र असतो. तेवढ्यावर त्याचें कसें भागणार ? काळ हा डमरूसारखा किंवा एखाद्या वाळूच्या घड्याळासारखा आहे. या घड्याळांत दोन बाजूला दोन मोठे समान आकाराचे पारदर्शक फुगे असतात. त्यांतला एक भूतकाळ व दुसरा भविष्यकाळ. भूतकाळाच्या फुग्यांतले क्षणरूपी वाळूचे कण भविष्यकाळच्या फुग्यांत हळूहळू पडत असतात. व युगांची कल्पना आपण ध्यानांत घेतली, तर तास भरला म्हणजे पहारेकरी जसा भरलेला फुगा वर व रिता फुगा खालीं करून वाळूचें घड्याळ उलटें टांगून ठेवतो, त्याप्रमाणें युगांतराच्या प्रारंभीं लीलाप्रिय परमेश्वरहि हें कालाचें घड्याळ पुन्हां प्रवृत्तीकरितां उलटें टांगून ठेवतो ही कल्पनाहि चांगली शोभेल. पण ही दुसरी कल्पना पटण्यासारखी असली किंवा नसली, तरी भूतकाळ व भविष्यकाळ हे वाळूच्या घड्याळांतील फुग्यांप्रमाणें असून वर्तमानकाळ हा फक्त त्या दोहोंना सांधणाऱ्या बारीक छिद्रासारखा असतो यांत शंका नाहीं. त्या छिद्रांतून एका वेळीं एकच वाळूचा कण खालीं पडूं शकतो, व ज्याला आपण वर्तमानकाळ म्हणतों, तो वास्तविक इतकाच स्वल्प–प्रमाण असतो. म्हणून, मनुष्याला केवळ वर्तमानकाळावरच नजर पुरवून चालत नाहीं, भविष्यकाळावरहि थोडी तरी नजर पुरवावी लागतेच. उचललें तें पाऊल भूतकाळांतून, व टाकायचें तें पाऊल भविष्य काळांत. आणि दरम्यानची जी संधि ती मात्र वर्तमानकाळ. अशी स्थिति असल्यामुळें मनुष्यानें भविष्याची थोडीबहुत उठाठेव केली, तर ती अगदींच वावगी नव्हे. तथापि, भविष्यकाळाविषयीं मनुष्यानें उठाठेव करावी, ती कितपत आणि कशी करावी हाच मुख्य प्रश्न आहे.

केवळ संसारी मनुष्य घेतला तर त्याला "पुढें काय?" हा प्रश्न बऱ्याच महत्त्वाचा असतो. कारण, संसारांत आजची तयारी काल व उद्यांची तयारी आज करावी लागते. 'श्वःकार्यमद्य कुर्वीत पूर्वाण्हे चापराण्हिकम्। नहि प्रतीक्षते मृत्युः कृतमस्य न वा कृतम् ॥' अशी नीतिच आहे. उद्यांची तरतूद आज करून ठेवणाराला 'पुढें काय?' हा प्रश्न अडचणीचा वाटत नाहीं, कारण तो त्याच्या पुढें भयप्रद रीतीनें उपस्थित होत नाहीं; व झालाच तर त्याचें उत्तर देण्याची त्याची तयारी असते! पण जे दूरदर्शी नसतात, त्यांना हा प्रश्न फार भयप्रद होतो, आणि म्हणून ते तो प्रश्न सुचला तरी टाळूं लागतात. पावसाळ्याकरितां धान्यांचे कण वारुळांत सांठवून ठेवणाऱ्या मुंग्या, बाहेर धो धो पाऊस पडत असतां आपल्या घरांत सुखानें राहतात; आणि ज्या त्या दिवसापुरता मध मिळला कीं तेवढा खाऊन टाकून, उन्हाळ्यांत चैनीनें दिवस काढणाऱ्या माशा पावसाळ्यांत उपाशी मरतात. हा साधा दाखला संसारी मनुष्याला नेहमीं लावतां येण्यासारखा आहे. यामुळें संसारी मनुष्य 'पुढें काय?' या प्रश्नाचा नेहमीं जितका विचार करील व तो सोडविण्याची तयारी ठेवील तितकें चांगलेंच. असो; जी गोष्ट खाजगी व धाकट्या संसाराची तीच सार्वजनिक व मोठ्या संसाराची. संस्था चालविणारांना उद्यांची तजवीज आजच्यापेक्षांहि आधीं पहावी लागते. एक पोट भरणें किंवा एका शरीराला कपडालत्ता पुरविणें, हें कुणालाहि फारसें कठिण जात नाहीं. पण संस्था ही व्यक्तिपेक्षां ज्या मानानें मोठी त्या मानानें तिच्या तरतुदीची काळजीहि मोठी. व संस्थेचे चालक खाजगी व्यक्तीपेक्षां अधिक दूरदर्शी असावे लागतात ते याचकरितां. तात्पर्य, या दृष्टीनें भविष्याच्या तोंडावरचा पडदा दूर सारून आंत नजर फेकणें हें सर्वथा समर्थनीय आहे एवढेंच नव्हे, तर तें एक कर्तव्यहि आहे.

भविष्यकथनाचा दुसराहि एक समर्थनीय प्रकार आहे; व तो असा कीं, पोटापाण्याचा सांसारिक प्रश्न कांहीं एक नसतां, समाजाच्या भावी स्थितीविषयीं शक्याशक्य निर्णय करून अनुमान ठरविणें, कोणची गोष्ट अधिक संभवनीय आहे व कोणची कमी संभवनीय आहे याचा तपास करणें. अशीं अनुमानें करीत बसणें हा रिकामा खेळसा वाटला तरी त्यापासून बुद्धीला जें एक प्रकारचें वळण किंवा शिक्षण मिळतें, तें फारच

उपयोगी असतें. कारण जगांत दोन शक्ति नेहमीं वावरत असतात; एक स्वेच्छा-शक्ति व दुसरी परेच्छा-शक्ति. या दोहोंच्या खेचाखेचींत जो मध्यम मार्ग निघतो तोच नियतिमार्ग—तीच परात्परेच्छा. या मध्यम मार्गाचें वळण कसकसें जाण्याचा संभव आहे, याचा अंदाज करण्यास समाज-धुरीण अशा मनुष्यानें शिकलें पाहिजे. आकाशांत दिसणाऱ्या तेजोराशीवर कोणाला चिमूटभर तांदूळ शिजवून भात करून खातां येत नाहीं, किंवा चहाला लागणारें पेलाभर पाणीहि तापवितां येत नाहीं; तथापि समुद्रावर सफर करणाऱ्या नावाड्याला लक्षावधि कोसावरून दिसणाऱ्या तारकांचा उपयोग मार्ग बिनचूक दाखविण्याला होतो, व तो त्यानें करून घेतलाच पाहिजे. त्याच न्यायानें समाजाला कांहीं तरी विवक्षित ध्येय योजून तिकडे जावयाचें असतें. व त्याकरितां भविष्यकाळची उठाठेव केल्याशिवाय त्याला गत्यंतरच नाहीं. म्हणून सामाजिक व राष्ट्रीय स्थितीविषयीं भविष्य-कथन करण्याचा प्रयत्न करणें हें अत्यंत हितावह होय.

कारण आपल्या मनची गोष्ट खरी पण ती कितपत साधेल हें पाहणें अगदीं जरूर असतें. मला मनांतून राजा व्हावेंसें वाटत असेल. पण खरो-खर मी राजा न होतां पाणक्याच होणार नाहीं कशावरून? किंवा राज्य-पदाची महत्त्वाकांक्षा धरून मी इच्छाशक्ति खूप प्रबळ केली तर माझा पाणकेपणा तरी चुकेल, आणि राज्यपद न मिळालेंच, तर निदान प्रधानपद तरी मला कां मिळणार नाहीं? अर्थात् माझ्या इच्छाशक्तीचा मार्ग तोच कांहीं नियतिमार्ग नव्हे. म्हणून मनांत इच्छा धरायची ती धरून जर मला माझें वास्तविक भविष्य ठरवितां आलें तर तें इष्टच आहे. पत्ते खेळा-वयास बसलेल्या प्रत्येक मुलाला प्रत्येक डावांत आपला कोट व्हावा अशी इच्छा असते, पण त्याच्या इच्छेप्रमाणेंच दर डावीं निकाल कसा लागणार? कारण, पत्त्यांचीं पानें चौघां गड्यांमध्यें सरसनिरस अशीं वांटून जातात, व यामुळें एकाचेच सर्व हात होणें अशक्य असतें. अशा स्थितींत स्वतःची इच्छा कितीहि असली तरी, पानांची वांटणी लक्षांत घेऊन ज्यास्तींत जास्त किती हात आपणाला करितां येतील, याचा अंदाज करून जो 'सवाल' टाकील, व तितके हात करून दाखवील—हात कमी भरून बाजू अंगावर घेणार नाहीं—त्याचेंच भविष्यकथन खरें ठरेल. तसाच कोणताहि समाज

घ्या. त्यामध्यें मतवैचित्र्य किती तरी असतें! अर्थात् त्यांतील सर्व घटकांच्या मताप्रमाणेंच समाजाचें भविष्य कसें सिद्ध होणार ?

प्रत्येकाच्या इच्छेप्रमाणें समाजस्थिति एकेक दिवस तरी रहावी असें--समजा-जर ईश्वराकडून ठरविण्यांत आलें, तर वर्षभर रोज एक एक नवाच रंग कसा होईल तो पहा! एक दिवस, पाळण्यांतल्या पोरांना बाशिंगें बांधतां येत नाहींत म्हणन पाळण्यालाच बाशिंगें बांधून झालेले बालविवाह दृष्टीस पडतील, तर दुसरे दिवशीं, 'म्हातारपणीं झालें तरी तांब्याभर पाणी द्यायला कोणी सत्तेचें मनुष्य नको काय ?' अशी सबब सांगून, नववधू संपादनाची लालसा धरणारे थेरडे, अंगावर लपविलेली सुपारी हुडकून काढण्याचा खेळ आपल्या नवोढांशीं खेळताहेत असें दिसेल! आपल्या मृतपतीची धडधड पेटणारी चिता हाच आपला खरा मोक्षमार्ग असें मानून तिजमध्यें आनंदानें प्रवेश करणाऱ्या साध्वी, किंवा, जिवंतपणीं अनेक सुखोपचारसहित आपला हात ज्यावर फिरला तो प्रियपतीचा मृदुदेह निष्ठुर अग्नि भाजीत आहे, असें पाहून त्याजवर आपली कोमल देहलता पसरून ज्वाळा शमवूं पाहणाऱ्या प्रेमशूर सतीच जिकडे तिकडे देहसार्थक करीत आहेत, असें आज दिसेल; आणि उद्यां पहावें तो साठीच्या जवळ आल्यानें नाठी बुद्धि झालेल्या प्रौढ कामिनी, स्वैर पुनर्विवाहप्रसंगीं विडया तोडण्याकरितां नव्या करकरीत अशा दांतांच्या कवळ्या जबड्यांत बसवूं पहात आहेत, किंवा आपल्या कोमल-तरुण पतिमुखाच्या लावण्यश्रीची छटा नीट दिसावी म्हणून सावधान म्हणण्याच्या वेळीं नाकावर चष्मा चढविण्याची सावधगिरी ठेवीत आहेत, असें दिसेल! आज पहावें तों, मृगचर्मावर बसून पवित्र चमसानें वेदिमुखांत गोरस ओतून श्रौताग्नि किंवा स्मार्ताग्नि प्रदीप्त करणाऱ्या अग्निहोत्र्यांच्या वषट्काराचा किंवा स्वाहाकाराचा गंभीर ध्वनि जिकडे तिकडे ऐकूं येईल, तर उद्यां मृगचर्माचे बूट पायांत चढवून, वेत्रासनाधिष्ठित होऊन, आधीं स्फटिक चमसांतून आधुनिक सोमरसाचें पान झाल्यामुळें प्रदीप्त झालेला जठराग्नि पुढें लागलीच दुसऱ्या एका प्रकारच्या गोरसाचा स्वाहाकार करून शमवीत आहेत, आणि त्या प्रमाद--प्रमोदाच्या भरांत नोकर लोकांवर शेलक्या अपशब्दांचा किंवा स्वत: एकमेकांवर लाडक्या उपनामांचा वर्षाव करीत असल्याचा गोंगाट ऐकूं येईल! आज पहावें तों पहिल्या

तारखेस झडणाऱ्या चांदरातीनें स्वर्ग लाभल्याचें सुख मानणाऱ्या खर्डे-घाशांच्या आनंदाच्या खाकी रंगांत सर्व हिंदुस्थानचा नकाशा रंगलेला दिसेल; तर उद्यां अर्धोज्ज्वल स्वराज्यवाद्यांच्या हेतूप्रमाणें युनियन जॅक आणि जरीपटका यांच्या चिन्हांनीं त्याच नकाशाचा सर्व भूमिका-पट निर्मित केला आहे, व त्यावर सर्वत्र भगव्या रंगाची छटा पसरली आहे असें आढळून येईल. आज निर्जनवनांत गाईच्या शेणानें सारविलेल्या साध्या गवताच्या झोपडींत आसनावर बसून व मांडीवर भूर्ज किंवा तमाल-पत्र घेऊन शिंपल्यांतील लाख्या शाईनें धर्मसिंधूच्या पोथ्या लिहिणारे दरिद्री विद्वान् चहूंकडे दिसतील; तर उद्यां गजबजलेल्या शहरांत लोह-प्रासादाच्या दहाव्या मजल्यावर बसून शेंकडों मैल दूर असणाऱ्या आपल्या कारखान्याच्या सुपरिंटेंडेंटला टेलिफोननें दैनंदिन आज्ञा सोडणारे लाखो-पति, किंवा हजारों मैलावर परदेशांतील आपल्या मुनिमाला सोन्याचांदीचा बाजारचा बाजार खरेदी करण्याची इशारत बिनतारी तारायंत्रानें देणारे नवकोट नारायण चहूंकडे डोळ्याला दिसूं लागतील ! पण या सर्व कल्पना झाल्या. यांतली एकहि सर्वस्वी खरी ठरण्याचा संभव नाहीं.

आपल्या मनांत असतें एक आणि होत असतें भलतेंच, असा सगळ्या जगाचा सर्वकाळाचा अनुभव असतो. आतां असें आहे म्हणून मनुष्य-मात्रानें इच्छा करण्याचें, किंवा मनोरथ बांधण्याचें सोडावें असें नाहीं. भवितव्यतेच्या बाजारांत आपण उभे असतां सर्वांत अधिक उंची माल सर्वांत कमी किंमतीस मागण्याला आपणास हरकत नाहीं; किंबहुना तसा तो मागण्याचा आपणास हक्कच असतो. तथापि, भारी पदार्थ हलक्या किंमतीस मागण्याचा हक्क जरी आपणास असला तरी, दुकानदार कोणता पदार्थ अखेर किती किंमतीपर्यंत सोडील याचाहि संभव आपणास अजमा-वतां यावयास पाहिजे. नाहीं तर एकहि सौदा न पटतां चिकार भरलेल्या बाजारांतून रिकाम्या हातानें, पण निष्फळ इच्छेचें जड ओझें मात्र मनांत बांधून, आपणास घरीं परत यावें लागेल ! शक्याशक्यतेचा व संभवासंभ-वाचा विचार हाच जगाच्या व्यवहारांत खरा उपयोगी असतो. उज्ज्वल इच्छा आपण मनांत बाळगूं नये असें नाहीं. हिंदुस्थानांत शेंकडों वर्षां-पूर्वी आलेल्या पारशांनीं इराणांतून आणलेला आपला पवित्र अग्नि जसा आग्यारींतून अद्यापि एकसारखा कधींहि विझूं न देतां प्रज्वलित ठेव-

लेला आहे, तसेंच मनुष्यमात्रानें ध्येयरूप आपल्या आकांक्षेचें अग्निहोत्र कधींहि विझूं देऊं नये. तथापि, रोजच्या भाजीचे बटाटे आग्यारींतल्या किंवा अग्निहोत्राच्या विस्तवावरच भाजून घेण्याच्या आग्रहाला मूर्खपणाचें स्वरूप येतें हेंहि विसरतां कामा नये. समुद्रावर होकायंत्र जवळ नसतां नावेंतून प्रवास करणाऱ्या खलाशाला रात्रीं दर्शन देणाऱ्या दिव्य तेजोराशीचा उपयोग मार्गदर्शनापुरता झाला तरी तो कांहीं थोडा नाहीं. त्याला भातपिठलें करून सकाळ-संध्याकाळची भूक भागवावयाची असेल तर नावेवर फांट्या किंवा कोळसे यांचा परसा पेटवूनच त्यानें आपलें काम भागवून घेतलें पाहिजे.

तात्पर्य, मनुष्यानें भविष्यकथानाच्या उद्योगांत पडावें, पण तें बालिश आनंदानें पडूं नये. म्हणजे, कोणत्याहि भावी गोष्टीचें ज्ञान अनुमानपरंपरेनेंच सिद्ध करितां येईल असें समजावें व तसें करण्यास शिकावें. दिव्य किंवा अद्‌भुत चमत्कारांच्या भानगडींत न पडतां, केवळ मनुष्यासहि लोकोत्तर असें बरेंच करण्याची शक्ति असते; आणि केवळ मनुष्यपणाचा अभिमान धरला तरीहि मनुष्यास तो पुरेसा आहे; ईश्वराच्या सिंहासनाच्या खुरालाच त्याला हात घालावयाला पाहिजे असें नाहीं. असला विचार भविष्यकथनांचें कल्पनारम्यत्व कदाचित् नाहींसें करील. पण भविष्यकथनाचा कस तरी त्यामुळें सत्याच्या कसोटीवर अधिक लागेल !

---

## * १८ मृत्यु

( सह्याद्रि–सप्टेंबर १९३५. )

मृत्यु ! किती दुःखकारक शब्द ! पण तें दुःख निराशात्मक कां असावें ? आशा आणि भावी सुखानंदाची कल्पना यांनाच जोडून दुःखाचीहि भावना असूं शकते. ही भावना जशी नैमित्तिक तशीच ती क्षणिक असते. गांव सोडून किंवा घर सोडून निघतांना वाईट वाटतेंच. फार काय एक रात्रभरच मुक्काम पडलेली धर्मशाळा सकाळीं सोडून जातांना वाईट वाटतें. मागें घरीं राहणाऱ्या लहान मुलांना हातावर खाऊ देऊन

* सर ऑलिव्हर लॉज यांच्या लेखाच्या आधारें.

आपण गांवाला निघतों, तशाच ममतेनें आपल्या शिध्यांतला पसाभर शिधा धर्मशाळेंत ठेऊन, मागें वळून तिजकडे पाहत पाहतच आपण जात नाहीं काय ? पण लक्ष मात्र बहुतेक पुढच्या प्रवासाकडे व मुक्कामाकडे असतें. त्या पुढच्याविषयीं कल्पना व काल्पनिक आनंद असतो. पण तो आशेचा असतो. अनुभवाचा सहवासाचा नसतो इतकेंच.

कन्यादान किंवा मुलीची सासरीं पाठवणी करणें ही स्वतःच्या इच्छेनें केलेली आणि प्रायः तिच्या व आपल्या आनंदाची गोष्ट असते. तरी पण पुढें जाणारीण व मागें राहणारे या दोघांच्याहि डोळ्याला पाणी येतेंच कीं नाहीं ? पण तें खरें दुःख नव्हे. तो दुःखाचा आभास. आणि वियोग हें त्याचें कारण.

कुजलेला दुखणारा दांत काढून टाकणें हें करावेंच लागतें, त्यांत भावी सुखाचा आनंद असतो. पण दांत उपटतांना मासाचे दोरे तुटतात, म्हणजेच सहवास तुटतो, यामुळें शारीरिक वेदना होतेच कीं नाहीं ?

तात्पर्य, मृत्यु हें निश्चित संकट नाहीं. पण साहस आहे. मात्र भावी सुखाची किंवा आनंदाची हटकून निराशाच असेल तर साहस कोण अंगिकारील ? तथापि साहसाच्या मोहिमेवर निघणारा कर्मवीर आणि त्याला निरोप देणारे स्नेही व आप्त यांच्या तोंडावर सूक्ष्म हास्याच्या छटे-बरोबर उदासपणाची छायाहि असतेच.

मृत्यूविषयीं हा जो विचार तो फक्त विवेकानेंच करितां येतो. आणि तो विवेक असा कीं, मृत्यु हा आत्म्याचा अन्त नसून त्याचें तें केवळ एक साहस आहे. आणि साहसामध्यें 'श्री' वास करिते या म्हणींतल्या तत्त्वावर आत्म्याचा विश्वास असतो. हा विवेक सुदृढ होण्याला मृत्यु-बरोबर जीवनाचीहि चिकित्सा करावी म्हणजे झालें. कारण प्रकाश आणि छाया यांच्याप्रमाणें मरण व जीवन हीं हातांत हात घालून सर्व विश्वभर संचार करीत असतात.

जीवनाच्या कल्पना शास्त्रज्ञानानें बदलत चालल्या आहेत. अज्ञानी लोक देहस्थिति हेंच जीवन मानतात. त्याहून ज्यांच्या ज्ञानाची मजल पुढें गेली त्यांच्या मतें, जीवन ही केवळ जडदेहस्थिति नसून ती चैतन्यरूप शक्ति आहे. पण शास्त्रीय ज्ञानाची मजल याहि पुढें गेली आहे. म्हणून जाणत्या लोकांचें मत असें आहे कीं, जीवन हें एक अखंड अविनाशी व

अखंड प्रेरक असें अध्यात्मिक तत्त्व आहे. हें तत्त्व आपल्या कार्याला जीवनरूप चैतन्यशक्तीचाच काय पण जडदेहाचाहि उपयोग करून घेतें. पण तें त्या दोहोंशीं समव्याप्त नाहीं. म्हणून त्या दोहोंबरोबर तें समाप्तहि होत नाहीं.

चैतन्याची शक्ति ही काय नुसती प्राणीमात्राच्या जीवनांतच असते ! सूर्यप्रकाशांतहि शक्तीच आहे. तिचा उपयोग आपण मनुष्यें व्यवहाराला करून घेतों त्याप्रमाणेंच आत्मतत्व हें जीवनचैतन्याचा उपयोग करून घेतें. खरोखर जीवन ही मर्यादित शक्ति नाहीं. कारण एका बीजापासून वृक्षांच्या अनेक पिढ्या निर्माण होतात. बीजांत एकच वृक्ष निर्माण करण्याची शक्ति असती तर एकच वृक्ष निर्माण होऊन ती संपली असती. पण तसें नाहीं. अदृश्य सूर्यकिरण आणि जडवस्तूचा एखादा कण यांचा संयोग झाला म्हणजे जसा त्याचा प्रकाश प्रगट होतो, तसाच आत्मतत्त्वाचा चैतन्यकणाशीं संयोग घडला म्हणजे जीवन प्रगट होतें, व त्यापासून त्याचा वियोग होईपर्यंत त्या देहचैतन्याच्या आधारें तें तत्त्व संकल्प, विकल्प, घटना विघटना इत्यादि आपल्या इच्छाशक्तीनें करीत राहतें.

चैतन्यशक्ति हें आत्मतत्त्वाच्या हातांतलें कारागिरीचें हत्यार आहे. तसेंच जडदेह हेंहि चैतन्यशक्तीच्या हातीं कारागिरीचें एक हत्यार असतें. आत्मा हाच, संकल्पानें असो वा यदृच्छेनें असो, अन्नकणाच्या साहाय्यानें व सृष्टिनियमानुसार विशिष्ट आकाराचा जड देह बनवितो. मग तो देह सर्वांत हीन प्राणी, घर करून रहाणारा समुद्रांतला शंख असो, किंवा स्तुतीनें ईश्वराला आळविणारा उच्च कोटीला पोहोंचलेला मनुष्य असो, किंवा यक्षगंधर्व असो, किंवा अंतराळांतील ग्रहनक्षत्रें असोत, शरीर हें आत्मतत्त्वाच्या आविर्भावाचें एक साधन आहे. मात्र तें आवश्यक आहे. अंतःकरणांत सुस्वर गायन असेल, पण तें प्रगट होण्याला गळा किंवा वाद्य पाहिजे ना ?

प्राण्याचें शरीर हें एकच आत्म्याच्या प्रगटीकरणाचें साधन आहे असें नाहीं. त्याचे इतर प्रकार आम्हांला माहीत नाहींत, म्हणून ते नाहींतच असे कोणीं कां म्हणावें ? आमचा जन्म या पृथ्वीगोलाच्या पाठी-

वर झाला. आणि त्यावरील इतर प्राण्यांप्रमाणें आम्हांलाहि पांचच इंद्रि आहेत. म्हणून ईश्वराच्या सृष्टींत पृथ्वीहून दुसरीं अधिष्ठानें नाहींत किं पांचाहून अधिक इंद्रियें नाहींत असें कां म्हणावें ? पण या गो आपल्या मृत्यूनेंच कळून येणाऱ्या आहेत. आत्मतत्त्व आणि त्या यदृच्छेनें जडला गेलेला हा विशिष्ट देह यांचा वियोग झाल्याशिवाय इत सृष्टीचें प्रत्यक्ष ज्ञान कसें होईल ? आणि या ज्ञानाचे प्रसंग पुढेंच अ त्यामुळें मृत्यु हा आत्मतत्त्वाचा अन्त ठरत नाहीं.

या मृत्यूनें सगळें शरीर नष्ट होतें असेंहि नाहीं. त्यांतील एक पेशीबी शिल्लकच राहतें. त्याचे एकामागून एक विभाग होत गेले तरी त्या अतिसूक्ष्म विभागाच्या रूपानें तें बीज राहतेंच. ही गोष्ट एरवीं लक्षांत घेण्याला कठी पण मनुष्याचें नख, दंत, केश व सर्पाची कांत असे पदार्थ जिवंतपणीं शरिरापासून अलग व नष्ट होतात यावरून लक्षांत येण्यासारखें आहे. प आत्मतत्त्वाच्या आठवणीची एक खूण याहून देहाची अधिक किंम नाहीं. मृत अपत्याचे कपडे किंवा त्याचे खेळण्याचे पदार्थ दृष्टीस पडल्या मुळें, मूल प्रत्यक्ष भेटल्याप्रमाणें भावना उचंबळून येते. म्हणून त्य कपड्यांत किंवा त्या पदार्थांत तें प्रत्यक्ष मूल असतें काय ? जे मृत अ आपण म्हणतों ते इतर ठिकाणीं जिवंत असतात. पूर्वीच्या जीवनाची व नव्या जीवनाची प्रक्रिया भिन्न असली तरी जीवन हें सत्यच आहे.

थडगीं किंवा समाधी या केवळ स्मरणाच्या खुणा होत. तीं कांहं मृताचीं वसतिस्थानें नाहींत. अन्य जीवनाची प्रक्रिया कशी असते हें आपणाला प्रत्यक्ष कळत नाहीं, व तें नवें जीवन ज्यांना लाभलें ते परत येऊन आपणाला नक्की कांहींच सांगत नाहींत. पण ते कोठेंतरी आसपास असतातच. जे पुढच्या मार्गाला लागले त्यांनीं परत यावें अशी आपली इच्छा असून काय उपयोग ? वेगळ्या जीवनांत त्यांना झालेलें विश्वसृष्टीचें ज्ञान ते आपणाला कसें पटवून देऊं शकतील ?

तें त्यांचें वेगळें जीवन म्हणून तें एक वेगळें जग असें मात्र ठरत नाहीं. कारण जग हें एकच एक आहे. आपणांकडे जेव्हां दिवस असतो तेव्हां तिकडे खरोखरच रात्र असते असा भाग, व त्या भागांत राहणारे लोक, प्रत्यक्ष या पृथ्वीगोलावरच आहेत कीं नाहीं ? तीच कल्पना वाढवून विस्तारवून कल्पना चालविली तर असें दिसून येईल कीं, आम्हीं एका

अदृश्य भिंतीच्या अलीकडे आहों, ते त्या भिंतीपलीकडे आहेत. पण दोघेहि एकाच घरांत आहोंत. टेलिफोन किंवा बिनतारी संदेशयंत्र यांच्या साहाय्यानें आपण ज्यांच्याशीं बोलतों ते असेच अदृश्य भिंतीच्या आड असतातच कीं नाहीं ?

त्यांच्या आपल्यांतलें अंतर संभाषण व्यवहारानें नाहींसें केलें जातें तसेंच ज्यांना आपण मृत म्हणतों त्यांच्या आपल्यांतलें अंतर प्रेमानें सांधलेंहि जातें. ह्या इतर जीवनांतील जीवांश हे, आमच्या भाषेनें, सुखी किंवा दुःखी आहेत हें आपणाला समजणार नाहीं. या जगांतल्या आपल्या धर्मकल्पना, नीतिकल्पना, यांवरून आम्ही त्यांच्याविषयीं जें म्हणूं तें कांहीं तरीच असेल, खरें नसेल. आमच्या इंद्रियांना अगम्य असे जीवच काय पण जड भौतिक पदार्थहि आपण अनुमानानें जाणतोंच कीं नाहीं ? नुसतें जाणतोंच नव्हे तर त्यांचा व्यवहारहि करतोंच कीं नाहीं ? हें कसें तें प्रयोगशाळेंत किंवा रसायन शाळेंत वावरणाऱ्या शास्त्रज्ञांना विचारा. ते सांगतील. ज्यांचें अस्तित्व मान्य करावें लागतें पण ज्यांचें स्वरूप वर्णन करितां येत नाहीं अशा अणुपरमाणूंचा मनोरंजक खेळ व उपयुक्त व्यवहार या ठिकाणीं आज सुरू आहे.

या अणुपरमाणूंनाहि एका अर्थानें शरीरें आहेत. पण त्या शरिरांतील जड अंश इतके दूर दूर पसरलेले आहेत व त्यांच्या दरम्यान इतकीं प्रचंड पोकळ अंतरें आहेत कीं, एकंदर अन्तराळांतील अवकाशाच्या मानानें ते कांहींच नाहींत. सूर्याभोंवतीं फिरणारे दहा पांच ग्रह ! मग बाकी उरलें तें काय ? याचें स्पष्ट उत्तर असें कीं, मनानें केलेलें चिंतन किंवा कल्पना हेंच चैतन्य. ओळखीचा मनुष्य भेटला म्हणजे आपण त्याला नमस्कार करितों. तसा सगळ्या अदृश्य विश्वाला नित्य करावा. कारण अनोळखी विश्व हेंहि पण सत्यच आहे, व त्या विश्वांत आपणहि एक वेळ प्रविष्ट होणार आहों. त्यांतलें वेगळें जीवन अनुभवणार आहों. त्या जीवनाची आपल्या कल्पनेनें होईल तितकी सुंदर कल्पना करावी. पण त्याबरोबर लक्षांत ठेवावें कीं, त्याहून सुंदर असें तें जीवन आहे. आपण जीवर आज आहों ती मर्यादित सृष्टीच जर इतकी सुंदर तर जी अमर्याद व अज्ञात ती किती तरी अधिक सुंदर असेल ! अर्थात् या इतर जीवनांत प्रवेश कर-

ण्याचें एक द्वार म्हणजेच ऐहिक मृत्यु असें समजावें. म्हणजे मृत्यूचें भय वाटणार नाहीं.

सर ऑलिव्हर लॉज यासारख्या विख्यात तत्त्वज्ञानें जें सांगितलें त्याचा पडताळ हजारो वर्षांपूर्वी आपल्या उपनिषदकारांनीं जें सांगितलें त्यावरून पाहतां येण्यासारखा आहे.

---

# १९ अमानुष, मानुष व अतिमानुष

सृष्टीच्या ज्ञानाप्रमाणें सृष्ट पदार्थांचें वर्गीकरण बदलावें हें स्वाभाविकच आहे. कल्पनांची व्यवस्था लावणें हेंच वर्गीकरणाचें कार्य. म्हणून कल्पनांचे स्वरूपाप्रमाणें त्यांची वर्गवारी बदलली तर त्यांत आश्चर्य नाहीं.

सजीव व निर्जीव असें सृष्ट पदार्थांचें वर्गीकरण पूर्वी आपण करीत होतों. पण अलीकडे सजीवत्वाची व्याख्या बदललेली असून आपण ज्यांना निर्जीव असें खुशाल म्हणत होतों, त्यांना यापुढें तसें म्हणणें बरोबर होणार नाहीं असें सिद्ध झालें आहे. पायांत घालण्याच्या कातड्याच्या जोड्याला सजीवत्वाचा कोणताही गुणधर्म असेल असें पूर्वी स्वप्नांतसुद्धां आलें नसतें. पण हल्लीं प्रो. जगदीशचंद्र बोस यांनीं असें ठरविलें आहे कीं, चर्मी जोड्याला सुद्धां एका अर्थानें सजीव म्हणतां येईल. कारण त्याला देखील श्रमानंतर विश्रांतीची अपेक्षा असते; ही विश्रांति नियमित वेळीं मिळाली तर तो अधिक टिकतो, व न मिळाली तर कमी टिकतो.

हल्लीं जोड्याला एका अर्थानें 'सोल' Sole असतोच; पण उद्यां दुसऱ्याही एका अर्थानें त्याला 'सोल' Soul असतो असें न ठरेल कशावरून? व तसें झालें तर काय काय होईल याची कल्पना करणें गमतीचें आहे! युरोपांतील सोशियालिस्ट लोकांच्या अनुकरणानें आपलें जोडे 'आठ तासांच्या दिवसां'ची मागणी करितील कीं काय? अथवा ती मागणी आम्हांस कबूल न झाल्यास सर्व जोडे उठून परस्पर सहानुभूतीचा संप करितील कीं काय कुणास ठाऊक? त्यांनीं गोष्ट या थरावर न नेल्यास त्यांचा मोठेपणाच म्हणावयाचा, पण फाटका जोडा वाप-

रणारावर किंवा जोडा दिवसभर एकसारखा वापरणारावर ( Cruelty to Animals Act ) सजीव प्राण्यांस निर्दयतेनें वागविल्यास शिक्षा सांगणाऱ्या कायद्याप्रमाणें खटला होण्यास तरी कांहीं हरकत उरणार नाहीं.

जोडयाचें हें सचेतनत्व जर हळुहळू उत्क्रांतितत्त्वाप्रमाणें वाढूं लागलें तर ' जोडयानें मारलें, ' या वाक्यांतील ' तृतीयेचा अर्थ ' काय ? हा वैय्याकरणप्रश्न अगदींच अप्रयोजक ठरणार नाहीं. पूर्वी बायबलांतील ' बालामच्या गाढवाला ' जशी वाचा फुटली तशी कदाचित् पायांतील जोडयासही अवचित वाचा फुटावयाची ! आणि तसें झाल्यास पुढें कधीं काळीं होणाऱ्या एखाद्या राष्ट्रीय सभेंतील गोंधळांत फेंकल्या गेलेल्या जोड्याकडून त्या कृत्यास त्याची स्वतःची पसंति अगर नापसंति, किंबहुना एकंदर राष्ट्रीय सभेसंबंधानें त्याचीं राजकीय मतें, एखाद्या वर्तमानपत्राच्या 'स्पेशल बातमीदारा'स मुलाखतींत कळण्याचा संभव आहे. ' पुत्रात् इच्छेत् पराजयम् ' या नात्यानें आपल्या वंशजांमध्यें घडून आलेली बुद्धीची ही परिणती पाहून सुरतेच्या राष्ट्रीय सभेंत फेंकल्या गेलेल्या त्याच्या प्राचीन पूर्वजांस आनंद व अभिमान वाटल्याशिवाय खचित राहणार नाहीं.

' सजीव ' व ' निर्जीव ' या वर्गीकरणाची जी गोष्ट तीच ' अमानुष, व मानुष व अतिमानुष ' या वर्गीकरणाची होण्याचा संभव आहे, किंबहुना या पूर्वींच ती होऊन राहिली आहे असेंहि म्हणण्यास काय हरकत आहे ? यापुढें कोणत्याही पदार्थासंबंधानें तो ' सजीव कीं निर्जीव ? ' अशा प्रश्नापेक्षां ' अधिक सजीव कीं कमी सजीव ? ' हाच प्रश्न अधिक बरोबर ठरेल. तसेंच अमानुष, मानुष व अतिमानुष या तीन विशेषणांत वाटतें तितकें व्यवच्छेदकत्व उरणार नाहीं.

याचें कारण हें कीं, या तीन विशेषणांनीं दर्शित अशा पदार्थांपैकीं मध्यवर्ती जो मनुष्य त्याचें अधिष्ठान नाहींसें होऊन तो स्थानभ्रष्ट झाला आहे. मनुष्य हा उपरिनिर्दिष्ट त्रयींतील मध्यमेरु असून त्याच्या अंगीं इतरांत कांहीं नाहींत असे गुणधर्म आहेत असें मानण्यांत येत असे. पण मनुष्यासंबंधाची ही कल्पना अलीकडे पार बदलली आहे.

बहुतेक सर्व धर्मांतून मनुष्य हा एवं-गुणविशिष्ट व स्वयंभू असा मानिला जात असे. स्वयंभू याचा अर्थ ईश्वराप्रमाणें ' स्वतःनें स्वतःस उत्पन्न करणारा ' असा घ्यावयाचा नाहीं. तर ' अगदीं पहिल्यापासूनही हल्लीं आहे

असाच–मुळींच न बदललेला–अकृत्रिम ' असा घ्यावयाचा. शंकराची ' स्वयंभू ' पिंडी याचा अर्थ ' स्वतःनें स्वतःस निर्माण केलेला दगड, असा नाहीं. ' स्वयंभू म्हणजे ईश्वरनिर्मित हें तर खरेंच, परंतु आहे अशाच स्वरूपाचा, ओबडधोबड पण मूळापासून पिंडीच्याच आकाराचा, पाथरवटानें टाकीनें घडून तो आकार दिला नव्हे असा अर्थ असतो. त्याच अर्थानें ' मनुष्य ' हा ' स्वयंभू ' असा मानला जात असे.

उदाहरणार्थ; ख्रिस्तीधर्मांत मनुष्य हा ईश्वरसृष्टींतील स्वतंत्र पदार्थ मानला जात असे. प्रथम पांचसहा दिवस ईश्वरानें इतर सर्व सृष्ट पदार्थ बनवले; परंतु त्यांच्याकडे पाहून त्यास समाधान होईना. तेव्हां शेवटीं त्यानें मनुष्य निर्माण केला; तो त्यानें आपल्या स्वरूपासारखाच केला; आणि मग त्याच्याकडे ईश्वरानें पाहिलें तेव्हां त्याला समाधान वाटलें ! बरोबरच आहे ! लीलाप्रियत्व हें जर ईश्वराला सुटत नाहीं तर त्याहीपेक्षां दुस्तर अशी जी आत्मप्रीति ती त्याला कशी सुटणार ? असो, आपला चेहरा आरशांत पाहून मनुष्याला जें समाधान वाटतें तें समाधान मनुष्याच्या तोंडाकडे पाहून खिस्ती ईश्वराला झालें.

खुद्द ईश्वरही जर आत्मप्रीतिपासून मुक्त नाहीं तर मनुष्य कसा असेल हें दिसतेंच आहे. अर्थात् त्यानें स्वतःला सर्व सृष्टीचा राजा ठरवून टाकलें! खिस्तीधर्माप्रमाणें ईश्वराकरितां म्हणजे ईश्वराचे धन्यवाद गाण्याकरितां मनुष्य, व मनुष्याकरितां जग निर्माण झालें आहे. ख्रिस्तीधर्माप्रमाणें मानवी अहंकार कोठवर जातो याचें वर्णन एका ख्रिस्ती कवीच्या शब्दांनींच देतों म्हणजे झालें.

Ask for what end the heavenly bodies shine  
Earth for whose use ? Man answers it is for mine !  
For me kind Nature wakes her geinal powers  
Suckles each herb and spreads out every flower.  
Annual for me the grape the rose renew.  
The juice nectrous and the balmy dew.  
For me health gushes from a thousand springs.  
Seas roll to waft me, suns to light me rise.  
My foot-stool earth; my Canopy the skies.

मनुष्य हा ईश्वराचा लाडका लेक. अर्थात् त्याचे अंगीं अनन्य-

सामान्य गुण असावेत यांत आश्चर्य काय ? त्याच्या राज्याच्या अठरा कारखान्यांपैकीं एकाना एका कारखान्यांत सर्व सृष्टिजन्य पदार्थ, पदार्थच काय प्राणीसुद्धां—पडतात. तो व सर्व सृष्टि यांचा फक्त सेव्यसेवक संबंध आहे ! कोणी त्याच्या भक्ष्यस्थानीं पडतो, तर कोणी त्याचें शरीर शोभवितो. कोणी त्याचें भांडार समृद्ध करितो, तर कोणी त्याच्या शिकारखान्याला किंवा अजबखान्याला वैचित्र्यलाभ करून देतो, इतकाच फरक !

हिंदुधर्माप्रमाणें मनुष्यत्वाची कल्पना इतकी उद्दाम व अहंकारावलिप्त नाहीं. मनुष्यदेह हा सर्वोत्तम मानिला गेला आहे खरा. पण चौऱ्यांशी लक्ष जीवयोनि फिरून झाल्यानंतर तो जीवास प्राप्त होतो असेंही मानलेलें आहे. याचा अर्थ जीवास उत्तेजनपर असला तरी तो अहंकारवर्धक होत नाहीं. खिस्तीधर्मामध्यें मनुष्याच्या आत्म्याचा व इतर जीवयोनीचा कांहींएक अर्थाअर्थी संबंधच नाहीं असें मानतात, पण चौऱ्यांशी लक्ष जीवयोनि भोगल्यावरच मग नरदेह प्राप्त होतो या समजुतींत त्या क्षुद्रयोनींचा व आत्म्याचा अवश्य संबंध येतो. किंबहुना ही सजजूत उत्क्रांतीच्या ताज्या शास्त्रीय उपपत्तीशीं अगदीं जवळ जवळ आहे. शिवाय, मनुष्य हा भोक्ता असला तरी नश्वर आहे. व त्यांतूनही सुखभोगाचें साधन यापेक्षां धर्मसाधन या नात्यानेंच मनुष्यदेहाचें महत्त्व अधिक मानिलें जातें. तथापि मागें सांगितलेल्या अर्थानें मानवयोनि ही स्वयंभू व स्वतंत्र आहे अशीच हिंदुधर्माचीही समजूत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

पण अलीकडे शास्त्रीय शोध होऊन उत्क्रांतिवाद सिद्ध झाल्यापासून अमानुष, मानुष व अतिमानुष हा भेदभाव व हें वर्गीकरण नित्य व अबाधित नाहीं असें कबूल करणें प्राप्त झालें आहे.

खिस्तीधर्मात सांगितलेली मनुष्यजातीच्या उत्पत्तीची उपपत्ति शास्त्रीय शोधांनीं खोडून काढून आतां असें सिद्ध केलें आहे कीं, मनुष्य ही स्वतंत्र स्वयंभु योनि नसून सजीव प्राण्यांच्या उत्क्रांतीच्या शिडीपैकीं मनुष्ययोनि ही एक पायरी आहे. मनुष्य हा एक इतर प्राण्यांप्रमाणेंच अंडज प्राणी आहे. इतकेंच नव्हे, तर गर्भसंभवानंतर कांहीं काळपर्यंत मनुष्यगर्भ आणि इतर प्राण्यांचा गर्भ यांजमध्यें न ओळखूं येण्याइतकें साम्य असतें. मनुष्य आणि इतर प्राणी यांच्यामधील फरक कालांतरानें व्यक्त होऊं लागतो.

तोंपर्यंत सर्व प्राणिमात्रांचा आद्य पूर्वज जो अमीबा नामक जीवबिंदु त्याच्याप्रमाणेंच मनुष्याचें स्वरूप व क्रिया असते. पुढें परिणतीस सुरुवात झाली तरी कांहीं कालपर्यंत मनुष्य, पक्षी, सर्प, मासे वगैरेंचे गर्भ सारख्याच स्वरूपाचे असतात. सहा आठवड्यांचा ( पोटांतील ) मनुष्य प्राणी, व आठ आठवड्यांचा ( पोटांतील ) कुत्रा हे हुबेहुब सारखे असतात. आठव्या आठवड्यापर्यंत मनुष्यास शेपटी असते. मनुष्य व माकड यांच्यातील साम्य तर याही पलीकडे जातें. ' माकड ' हा ' मनुष्या'चा बापच नसला तर चुलत बंधु तरी खास आहे. चिंपांझी माकडाचें पोर आणि रानटी निग्रो मनुष्याचें पोर यांतील भेद फार खोल चौकसपणाशिवाय कळून येणार नाहीं. लहान मुलें आणि कुत्रीं यांच्या संवयी बहुधा सारख्याच असतात.

अमानुष प्राण्यांपैकीं पुष्कळांच्या वांट्याला बुद्धीचें देणें ईश्वराकडून आलें आहे. व त्यांतल्या त्यांत मुंगी, हत्ती, माकड, कुत्रा, घोडा वगैरेंच्या अंगीं जी बुद्धिमत्ता दिसून येते तिच्यावरून त्यांना एक प्रकारचीं मनुष्यें म्हणण्यास हरकत नाहीं. इतर प्राण्यांच्या अंगीं उपजत संस्कार प्रबळ असतात मनुष्यांच्या अंगीं हे संस्कार इतके प्रबळ नसतात, पण शिक्षण मिळविण्याची पात्रता त्याच्या अंगीं विशेष असते. याचा अर्थ असा कीं, मुळींच शिक्षण मिळाल्याशिवाय एखादा मनुष्यप्राणी राहिला अशी जर आपण कल्पना केली, तर तो या इतर प्राण्यापेक्षांही दुबळा व निरुपयोगी असल्याची कल्पना आपल्यास करावी लागेल. उदाहरणार्थ, कोंबड्याचें पोर अंड्यांतून बाहेर पडतें त्याच दिवशीं इकडेतिकडे स्वतंत्रपणें फिरून कीडमुंगी, किंवा धान्याचे कण टिपून खाऊं लागतें. मनुष्य नांव पावलेल्या कित्येक आयदी गर्भश्रीमंतांपेक्षां या कोंबड्याच्या पोराच्या अंगीं अधिक स्वावलंबन आहे हें कोणीही कबूल करील. कित्येक प्राणी तर याच्याही पुढें जातात. जन्माच्या वेळीं अंगाला चिकटलेली वार अंगावरून पुरी दूर झाली नाहीं अशा स्थितींत, आपल्या भक्ष्य प्राण्यावर ते आपल्या जबड्याचा वार करूं लागतात. मनुष्यप्राणी मात्र रडवा आहे त्याला रडण्याशिवाय आपलें भक्ष्य मिळविण्याचें दुसरें साधन नाहीं; तोंडांत दूध पडलें तर त्याला घोटतां मात्र येतें.

उपजत संस्कार प्रबळ असूनही वर सांगितलेल्या प्राण्यांच्या अंगीं

शिक्षण मिळविण्याची पात्रता बरीच असते. पण शिक्षणाच्या कामीं ते परावलंबी आहेत; व मनुष्यप्राणी स्वतः स्वार्थपरायण असल्यामुळें त्यांना शिक्षण देण्याचें काम तो करीत नाहीं. पण सक्तीचें मोफत शिक्षण देणें हें सुधारलेल्या सरकारचें जसें काम आहे; तसेंच अमानुष प्राण्यांना सक्तीचें मोफत शिक्षण देणें हें सुधारलेल्या मनुष्यप्राण्याचें काम आहे—अशी चळवळ व मागणी या 'अमानुष' प्राण्यांनीं केली तर मनुष्य त्याला काय उत्तर देऊं शकेल ? आपणास कोणी शिक्षण दिलें तर आपण काय करूं शकतों याचा अनुभव या प्राण्यांनीं मनुष्यास आणून दिलाच आहे.

सर्कशींत किंवा पशुपक्षांच्या खेळांत जीं कामें पहावयास सांपडतात तीं खरोखरच इतकीं आश्चर्यकारक असतात कीं, या प्राण्यांसंबंधानें ते विद्यार्थी व आपण शिक्षक इतकाच फार तर अभिमान मनुष्यानें बाळगावा; मी मनुष्यप्राणी आणि ते अमानुष प्राणी अशा प्रकारचा अभिमान धरण्याचें कारण नाहीं. मण्यांची माळ ओंवणारी चिमणी, तोफांची सरबत्ती करणारा जवान मर्द पोपटभाई, शेव्हिंग सलून चालविणारा किंवा गृहस्थाश्रमाचें नाटक दाखविणारा माकड, टाईपरायटरवर लिहिणारी हत्तीण, लिहिणें वाचणें शिकून आपल्या धनिणीला सुशिक्षित सोबत्याप्रमाणें सहवास घडविणारा कुत्रा आणि तोंडचे हिशोब करणारा घोडा हीं वर्णनें वाचलीं म्हणजे मग अमानुष आणि मनुष्य असा भेद कोठें राहतो ?

बुद्धिविषयांत हे प्राणी मनुष्यांहून दुबळे असतात, तरी पण उपजत गुणांमध्यें ते मनुष्याहून श्रेष्ठ असतात हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. पण दुसरीही एक गोष्ट सांगितली पाहिजे. ती ही कीं, मनुष्य प्राण्यापेक्षां कांहीं कांहीं नैतिक गुणांमध्येंही ते श्रेष्ठ असतात असें म्हटलें तरी चालेल. घोडा आणि कुत्रा हे प्राणी कृतघ्न बनले किंवा त्यांनीं विश्वासघात केला हें कधीं कोणाच्या ऐकिवांतही नसेल. विशेषतः कुत्र्यामध्यें तरी बौद्धिक आणि नैतिक गुणांचें मिश्रण फार चांगलें पहावयास सांपडतें. कुत्र्याची समजूत आणि शहाणपणा हीं त्याच्या इमानीपणाबरोबरीचीं असतात. अर्थात् कुत्र्याचीं सत्कृत्यें समजून उमजून, बऱ्या वाईट बुद्धीनें, व तारतम्यानें केलेलीं असतात. व असें असल्यामुळें कुत्र्याला अमानुष म्हणणें कठीण आहे. पुष्कळ वेळां मनुष्यांना वाईट उपमा द्यावयाची असतां

कीं, पत्राचा खप व महत्त्व हीं तर वाढलींच, पण उत्पन्नहि वाढून सालीना हजारों रुपयांचा नफा उरूं लागला. त्यांनीं सर्व कर्ज तर फेडलेंच; पण छापखाना, इमारत, फौंडरी, चित्र-साहित्य इ० सर्व गोष्टी यथास्थित करून हिंदू पत्राला आज विलायतेंतल्या लंडन टाइम्सची योग्यता जवळजवळ प्राप्त करून दिली आहे. लंडन टाइम्सप्रमाणें आपलें धोरण ठेविलेलें आहे. म्हणजे देशांतील सर्वांत पुढें गेलेल्या राष्ट्रीय पक्षाशीं सहानुभूति ठेवावयाची, पण सर्वस्वी एककल्ली कोणचेंहि धोरण स्वीकारावयाचें नाहीं, व भडकून जावयाचें नाहीं.

'हिंदू' व 'केसरी' यांच्या पन्नास वर्षांच्या कारकीर्दींत पाहिलें असतां त्या दोहोंत कित्येक बाबतींत साम्य कसें घडत आलें हें सूक्ष्म दृष्टीनें पाहाणाराला तेव्हांच कळेल. तें कसेंहि असो. पण १९२८ सालीं हिंदू पत्राची ज्युबिली झाली, व आज 'केसरीची' ती होत आहे, हें पाहून हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत या राष्ट्रीय वृत्तीच्या वर्तमानपत्रांची सुवर्ण ज्युबिली करण्याइतकें, म्हणजे अर्ध शतकाचें, आयुष्य लाभून त्यांना स्थैर्यहि आलें आहे हा विचार समाधानकारक असून मनाला खंबिरी आणणाराहि आहे. एखाद्या प्रचंड आवारभर पसरलेल्या कारखान्यांत चौदिशांना रात्रीं पाहारा करण्याकरितां रखवालदार नेमतात, व ते मधून-मधून हुषार सावध असें म्हणून एकमेकांना जाग्रत ठेऊन धीर देत असतात. हिंदूच्या ज्युबिलीचें वर्तमान ऐकून केसरीला हीच भावना झाली. व आज केसरीची ज्युबिली झाल्याचें वर्तमान ऐकून मद्रासच्या हिंदूलाहि तीच भावना होईल यांत शंका नाहीं.

---

## ३० महाराष्ट्रांतील वृत्तपत्रें

(केसरी—ज्युबिली अंक)

छापखाने, वर्तमानपत्रें देशांत असणें हें वैभवाचें किंवा भरभराटीचें अवश्य अनिर्वाह्य लक्षण असें म्हणतां येणार नाहीं. कारण त्याशिवायहि देश सुखी संमृद्ध, संपन्न असूं शकतो. सुधारणेचीं साधनें हीं इतकीं अग-

णित आहेत कीं, तीं कधींच पुरीं वाटत नाहींत. आज लोकांना आगगाडी व तारायंत्रें हीं सुधारणेची मुख्य खुण असें वाटतें. पण इंग्लंडचे लोक ज्या एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीला वैभवशाली असें म्हणतात त्या काळीं आगगाडी व तारायंत्र नव्हतें. व वर्तमानपत्रेंही नव्हतीं. अशाच रीतीनें हिंदुस्थानांतील जुन्या देशी राजांच्या काळीं आगगाड्या तारायंत्र किंवा वर्तमानपत्रें यांपैकीं कांहींच नव्हतें तथापि तेव्हां देशांत वैभव नव्हतें असें म्हणतां येत नाहीं. काळ हा जसा एकच टिकून राहात नाहीं, त्याप्रमाणें निरनिराळ्या काळाला सुधारणेचीं उत्कर्षाचीं साधनें आणि वैभवाच्या खुणा याहि एकच एक प्रकारच्या नसतात. आज कोणीं हिंदुस्थानच्या लोकांना जर म्हटलें कीं, "तुम्हांला तुमचीं जुनीं राज्यें देतों, पण आजचीं आगगाड्या, तारायंत्रें व वर्तमानपत्रें काढून घेतों." तर लोक कबूल होणार नाहींत काय? आम्हांला वाटतें खचित कबूल होतील, व ते म्हणतील कीं, "परकी राजसत्ता तरी देशांतून नष्ट होऊं द्या; मग जें काय वैभव सत्ता, संपत्ती, देशांत असेल तिची अधिक चांगल्या रीतीनें वांटणी कशी करतां येईल हें आपण पाहूं!" व पाहूंच लागलों म्हणजे वाटतें कीं तिकडे जशीं वर्तमानपत्रें जन्माला आलीं व परिणती पावलीं त्याचप्रमाणें इकडेहि कां झालें नसतें? प्रजास्वातंत्र्याचें हें एक प्रकारचें वारें आहे. तें एकदां वाहूं लागलें म्हणजे एकाचें पाहून दुसऱ्या देशावर व दुसऱ्याचें पाहून तिसऱ्या देशावर तें वाहूं लागतें. एका टोंकाला झारशाहीसारखी जुलमी राजसत्ता जर नष्ट झाली व दुसरीकडे चीनजपानसारखे एशिॲटिक देश प्रजास्वातंत्र्याचा उपभोग घेऊं लागले तर मध्यें हिंदुस्थानच काय असा मोकळा राहिला असता! आज ब्रिटिश मुलखांतील राज्याप्रमाणें संस्थानिकांच्या राज्यांतहि नवीन राज्यघटना होऊं लागल्याच आहेत कीं नाहींत? असो. कोणत्या स्थितींत काय झालें असतें याचा खल करीत बसण्यांत व तर्क चालविण्यांत फारसें स्वारस्य नाहीं. प्रत्यक्ष वस्तुस्थिती काय आहे हें आपण आतां पाहूं.

आतां आपण महाराष्ट्राकडे वळूं! १८१० झालीं मिशनरी लोकांनीं मराठी पुस्तकें छापण्याला या इलाख्यांत सुरुवात केली. त्यांचें पहिलें पुस्तक 'सिंहासन बत्तिशी' हें होय. अर्थात् मराठ्यांचें सिंहासन इंग्रजांच्या

हातीं लागण्यापूर्वीच त्यांच्या मुद्रणकलेनें मराठी 'सिंहासनबत्तिशी' हस्तगत केली. १८२१ सालीं पुण्यास विश्रामबागेंत संस्कृत पाठशाळा सुरू झाली. १८२२ मध्यें मुंबईस 'बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी' स्थापन झाली, व तिला मिळालेल्या रु. ५०,००० तून ग्रंथप्रसिद्धीचें काम सुरू झालें. १८३७ त वे. शा. सं. बाळशास्त्री जांभेकर यांनीं 'दिग्दर्शन' व १८४० त रा. भाऊ महाजन यांनीं साप्ताहिक 'प्रभाकर' वर्तमानपत्र सुरू केलें. १८४२ त पुण्यास इंग्रजी शाळा सुरू झाली. १८४८ सालीं पुण्यास खासगी मराठी शाळा मराठे लोकांकरितां निघाली. १८४९ मध्यें पुण्यास 'ज्ञानप्रकाश' सुरू झाला. १८५१ त पुण्यांतील संस्कृत व इंग्रजी वर्गांना मिळून 'पूना कॉलेज' हें नांव प्राप्त झालें. १८५५ सालीं 'मुंबई एज्युकेशन सोसायटी' मोडली व सरकारी शाळाखातें सुरू झालें. १८५७ सालीं 'मुंबई युनिव्हर्सिटी' निघून मॅट्रिक्युलेशन परीक्षा सुरू झाली. १८६२ सालीं पहिला बी. ए. झाला व त्याच वर्षी 'इंदुप्रकाश' वर्तमानपत्र सुरू झालें. १८६५ सालीं पहिली वकिली परीक्षा सुरू झाली. १८६६ सालीं पहिला एल्. एल्. बी. झाला. १८७३ सालीं 'सत्यशोधक समाज' स्थापन झाला. १८७७ सालीं 'दीनबंधू' हें ब्राह्मणेतरांचें वर्तमानपत्र सुरू झालें. १८८१ सालीं 'केसरी व मराठा' हीं वर्तमानपत्रें सुरू झालीं. केसरीच्या आधीं निघालेलीं अशीं कांहीं वर्तमानपत्रें महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं होतीं. त्यांपैकीं कांहींचीं नांवें खालीं दिलीं आहेतः—

प्रभाकर, ज्ञानप्रकाश, इंदुप्रकाश, सुबोध पत्रिका, ज्ञानोदय, वर्तमान-दीपिका, शुभसूचक, बोधसुधाकर, पूर्णचंद्रोदय, वैष्णवपंच, धूमकेतू, जगन्मित्र, दी नेटिव्ह ओपिनियन, बेळगांवसमाचार, वृत्तवैभव. इ०

१८८० सालांतील मुंबई इलाख्यांतील शिक्षणसंस्थांचे आंकडे खालीलप्रमाणें होते—मुंबई इलाख्यांत एकंदर शाळा पांच हजारांच्या आंत व एकंदर विद्यार्थी पावणेतीनलक्ष होते. सर्व प्रकारचीं मिळून ८ कॉलेजें, १ आर्टस्कूल, ४८ हायस्कूलें, १७७ मिडिल स्कूल्स्, २ वैद्यकवर्ग, ५ धंदेशिक्षणाचे वर्ग व बाकी प्राथमिक शाळा. मुलींच्या शाळांची संख्या २८४ होती व ट्रेनिंगचे वर्ग ९ होते. एकंदर विद्यार्थ्यांत ब्राह्मण शेंकडा २३, इतर ५९ व मुसलमान शेंकडा १७ असत. शिक्षणाप्रमाणें वाङ्म-

याची वांटणी अर्थात् बेताचीच होती. त्या सालाच्या सरकारी रिपो-र्टांत एकंदर मुंबई इलाख्यांत छापखान्यांची व ग्रंथादिकांची संख्या खालीलप्रमाणें होती—

छापखाने मुंबईत ४८, महाराष्ट्रांत २३, गुजराथेंत १५. पुस्तकें मुंबईस ५३१, महाराष्ट्रांत ४६५, गुजराथेंत ९४, भाषेच्या दृष्टीनें १०७ इंग्रजी, २०८ मराठी, २०५ गुजराथी, अशी वर्गवारी होते. मासिक वगैरे पुस्तकें १५१. एकंदर वर्तमानपत्रें ८३. पैकीं २ इंग्रजी १० अँग्लो-मराठी, व निव्वळ देशी भाषेंतील वर्तमानपत्रें ७१. देशी भाषें-तील वर्तमानपत्रांपैकीं ३४ मराठी, ३१ गुजराथी. एकंदर पुस्तकसंग्रहा-लयांची संख्या ८७ होती, शिळा छापखाने सुमारें २५ होते. वर्तमान-पत्रांमध्यें अधिक खप एका गुजराथी वर्तमानपत्राचा होत असून, त्याच्या जास्तींत जास्त १६५० प्रती निघत असत. हजार प्रतींवर निघ-णारीं वर्तमानपत्रें ६ व पांचशें प्रतींवर खपणारीं वर्तमानपत्रें १४ होतीं.

---

## ३१ जुना ज्ञानप्रकाश

( केसरी—ज्युबिली अंक )

विलायतेंतील व इकडील छापखाने आणि वर्तमानपत्रें यांची तुलना करीत मागें गेलों असतां, ती मोठी मनोरंजक वाटते. या बाबतींत आमच्या हाताशीं दोन साधनें आहेत. त्यांचा थोडासा उपयोग येथें करण्याचें आम्ही योजिलें आहे. हीं दोन साधनें अशीं. (१) आजच्या पूर्वी ८१ वर्षांचें म्हणजे १८४९ सालचें ज्ञानप्रकाशाचें 'फाईल'. ज्ञानप्रकाश याच सालीं प्रथम अवतीर्ण झाला व हें फाईल त्याच्या पहिल्या व दुसऱ्या वर्षाचें आहे. या फायलीचीं पहिलीच १२ पानें उपलब्ध नाहींत. परंतु ता. २६ फेब्रुवारी १८४९ रोजच्या ज्ञानप्रकाशाचें, म्हणजे पहिल्या वर्षाच्या तिसऱ्या अंकाच्या मुखपृष्ठाचें फोटो ब्लॉकचें चित्र याखालीं आम्ही दिलें आहे. यावरून त्याच्या दर्शनी स्वरूपाची थोडीशी कल्पना येईल. हा अंक अवघ्या आठ पानांचा आहे. व एकेका पानाची लांबी सुमारें दहा इंच व रुंदी सुमारें साडेसात इंच आहे. एका या वर्तमानपत्रांची वार्षिक वर्गणी

दहा रुपये व दरमहिन्याची वर्गणी एक रुपया होती! (२) दुसरें साधन विलायतच्या 'लंडन मॅगेझिनचें' सन १७६८ सालाचें बांधीव पुस्तक हें होय. सन १९३० सालापूर्वी म्हणजे ८१ वर्षांचा काळ वजा घातला असतां जसें १८४९ हें साल येतें, तसेंच कर्मधर्मसंयोगानें १८४९ च्या पूर्वी ८१ वर्षांचा काळ वजा घातला असतां १७६८ हें साल येतें. म्हणजे ८० वर्षांच्या दोन टप्यांनीं मागें जातां जातां काय दिसतें? आजच्या केसरी ज्ञानप्रकाश किंवा यासारखीं अन्य देशी मराठी वर्तमानपत्रें, अथवा आजच्या 'हिंदु' सारखीं देशी इंग्रजी वर्तमानपत्रें; तसेंच 'टाईम्स ऑफ इंडिया' 'स्टेट्स्मन' यासारखीं आजचीं 'अँग्लोइंडियन' वर्तमानपत्रें व 'लंडन टाइम्स' 'डेली मेल' या सारखीं विलायती पत्रें घेऊन त्याच्याशीं १८४९ चा ज्ञानप्रकाश व १७६८ चें 'लंडन मॅगेझिन' यांची तुलना केली असतां त्याचीं स्वरूपें, किती वेगवेगळीं आहेत हें पाहून मनाला पुष्कळ बोध होतो. तो हा कीं, छापखाने वर्तमानपत्रें यांच्या दृष्टीनें पाहतां आम्ही विलायतच्या लोकांपेक्षां निदान एक शतक तरी मागें आहोंत.

असो. प्रथम १८४९ च्या ज्ञानप्रकाशाची कांहीं कल्पना यावी म्हणून त्याचें दर्शनी चित्र वर दिलेंच आहे, पण आंतील मजकुरांचे कांहीं नमुने देतों. या पत्राचें त्या वेळचें महत्त्व लक्षांत येण्याकरितां ज्ञानप्रकाशाच्या दुसऱ्या म्हणजे १९ फेब्रुवारी १८४९ च्या अंकांत आढळलेला खालील मजकूर कोणतीहि चूक दुरुस्त न करतां दिला आहेः—

"लेब्ररीची वार्षिक सभा भरली त्यात मेहेरबान बोनसाहेबच व मिस्तर रीविससाहेब व न्यूटनसाहेब व टरकीनसाहेब वगैरे साहेब लोक व पुरंधरे व आबासाहेब ढमढेरे प्रमुख ग्रहस्त जमले होते, त्यासमई पहिले नंबरचे वर्तमानपत्र सदहु साहेब लोक याणी लोकास त्याचा लाभ समजाउन घेत जावें म्हणून शिफार केली. त्याजवरून सरकारी चाकर व ग्रहस्थ व सरदार व वकील लोक यांनीं घेण्याचें कबूल करून सह्या घातल्या आज आमच्या वर्तमानपत्र विकत घेणारे यादीवर सह्या पनास ५० आहेत व आणखी ५० मिळतील अशी उमेद आहे म्हणजे या वर्तमानपत्राचा कारखाना नीट चालेल आम्ही मेहेरबान ब्रोन साहेब प्रशीदनूर याचे फार उपकारी आहो कारण कीं सरदार लोक वगैरे याणी समजूत दिल्यावरून सह्या केल्या असे त्या साहेबानीं या देशच लोकांचे ही तास्तव केलें ही

गोष्ट त्याचे स्मरण फार दिवस या लोकामध्यें राह्याजोगे आहे. आम्हास आता खातरी वाटते. कीं, सरदार व सरकारी कामगार हे या वर्तमानपत्रास उछावाने आश्र देतील."

## वर्तमानपत्रांचा उपयोग

[ज्ञानप्रकाश, ता. ५ मार्च सन १८४९ इसवी पुस्तक १ कागद ४ पृष्ठ २६]

ज्ञानप्रकाशकर्ते यांस—

विनंती विशेष तुम्ही पत्र काढतां परंतु त्याचा उपयोग बहुतास अजून कळत नाहीं. जे मोटे मोटे म्हणवितात व आपले ठिकाणीं गर्व करून आहेत त्यांस देखील असें वाटतें हा रिकामा उद्योग आहे. परंतु तुमच्यावाटचें मीच बीलतो. बातमीपत्राचे उपयोग फार आहेत आपले लोकामध्यें तर कोणास बातमी मुळींच कळत नाहीं. ज्यास त्यास आपला आपला विचार दिसतो ज्याची त्याची नजर आपलेघरापुरती असते पुढे काहीं कळत नाही. याजमुळे हे लोक पुढे सरकत नाहीत. मजुरी करणे हे काही फारसे शहाणपण नाहीं शहाणपण म्हणजे कोठे काय आहे हें पाहणें सर्व देशावर व जगावर नजर ठेवणे माहितगारी करणें यांचें नांव शहाणपण याजकरतां आम्ही या लोकाची प्रार्थना करतो की तुम्ही दिवस सुस्ती न राहिलेत त्याची फळे ही भोगता परंतु अजून तरी तुमची नजर दूरवर जाऊं द्या विद्या करा वर्तमानपत्रादिक वाचीत जा म्हणजे तुम्हास बहुतकरून माहिती होईल जेन समजेल ते पुसा आणि खातरी करा वाद विवाद करीत जा म्हणजे तुमची बुद्धी वाढेल विद्येचे शत्रुत्व कराल व कुबुद्धिचा आश्रय कराल तर फजीत पावाल जवळ तुमच्या दोन पैसे असले म्हणून सर्व मुलखात आहेत असे नाही आपले सारखा दुसऱ्याचा विचार करावा. हे विनंती. **एक विद्यावृद्धेच्छू**

## सरकारवर टीका करण्याचा अधिकार

[पृष्ठ ४६-४७ ता. १९ मार्च १८४९ पुस्तक ३ कागद ६]

"अलीकडे कांहीं गृहस्थानी आम्हास असे सुचविले की, आमचे नांव पत्रात दाखल होऊ नये. असे कितीएक उद्गार आमचे कानी आले. त्यास महाराज आपण असें समजावे की कमांडर चीफ व गव्हर्नर जनरल याचे आजचे काळी नानासाहेब भाऊसाहेबासारखे पराक्रम त्यांचीहि नांवें कारण परत्वे निघतात व त्यांचे वर्तुणुकेचा विचार होतो कारण कीं जो सरकारची चाकरी करितो त्यांचें वर्तुणुकेविषयीं छापणारें यानीं जें संभवेल

तें लिहिण्यास अधिकार आहे कारण कीं जो सरकारचा चाकर तो लोकांचा चाकर आणि छापणारा लोकाचे डोळे आहेत आणि दुसरे असे आहे की बहुधा आधारावाचून आम्ही लिहित नाहीं. त्यास आमचे पत्र वाचणारांपैकी कोणाचे नांव बाहेरचे पत्रात पाहाण्यात आले ते आम्ही जर तुम्हास कळवावे तर मग छापावे कशास व तुमची चाकरी कशास करावी जे जे कोणी तुम्हास म्हणतील ते आम्ही तुमचे कानावर घालू तुमचे उत्तर असेल तें आम्ही छापु म्हणजे त्याचे निवारण जाहले. छापखाने सुधारणेचे द्वार आहे. "

### INDIANISATION

[ पृष्ठ ५४ कागद ७ ]

काळे पलटणीतील साहेबलोक इतर कामावर नेमले जातात याजमुळे पलटणीत अंमलदार कमी होतात असा बोभाट सरकारात गेल्यावरून असा ठराव जाहला कीं, हल्ली पोस्टमास्तर जे आहेत ते पलटणीत पाठवून तेथे काळे लोक नेमावे, सबब दरएक पोस्ट ऑफिसांत हेडक्लार्क पोस्टमास्तर नेमले.

आम्हास वाटते कीं आशा जागा नेटीव लोकास देतील तर बरे होईल व जसे पोस्टमास्तर तसेंच कितीएक पलटणींतील साहेबलोक असि० मास्तर नेमले आहेत व त्याच्या जागा अन्कविनांढेल म्हणजे विलायतची सनद नाहीं आशा आहेत त्या जागा काळे लोकास दिल्या असता चांगले आहे शास्त्रात सरकारी कामगारांचे गुण कोणते असावे ते असे लिहिले आहेत. "

व्यवहारानृप: पश्येत्‌विद्वद्भिर्ब्राम्हणैः सह ॥ धर्मशास्त्रानुसारेण क्रोध लोभ विवर्जित: १ श्रुताध्ययनसंपन्नाधर्मज्ञः सत्यवादिन: ॥ राज्ञासभासदः कार्यारिपौमित्रेच येसमः २ या प्रकारचे असावे.

### संस्थानिकावर टीका

( पृष्ठ ७६ पुस्तक १ कागद १० ता. १६ एप्रिल १८४९ )

" संपूर्ण जगात पाहिले तरी राजे हे बहुधा मूर्खच असतात तेणें करून राजद्वारी अनाचारादि अनर्थ फार असतात परंतु सर्व जगांत राज्याचे मूर्खपणाविषयीं प्रमुख देश हिंदुस्थान आहे येथें बहुधा राजा हा शब्द मूर्ख वाचक झाला आहे राजास गरीब लोका इतकी जरी अक्कल असती

तरी राज्ये नीट चालली असती परंतु जेथें पहावे तेथें राज्ये मूर्खशिरोमणी असतात मग राज्याची व्यवस्था कशास पुसावी अस्तु असें आहे खरें परंतु अलीकडे होळकरांचा मुलगा गादीवर आहे त्यांस शिक्षक उमेरसिंग ठेवला आहे तो गुरुही योग्य आणि तदनुसार होळकर यांस विद्याभ्यास चांगला झाला आहे. जर आमचे स्वदेशीच राजे असें कांहीं शाहणे झालें आणि त्यांस कोठें काय आहे हें दिसूं लागलें तर फार चांगलें आहे त्यांचें हातूनच कांहीं या देशचे लोकांचें कल्याण होईल तर होईल, नाहीं तर अक्षरशत्रूपासून काय होणार ? आणि आजपर्यंत काय झालें हें दिसतच आहे. कारभाऱ्यानें खरें भाषण केलें म्हणजे यजमान मूर्ख होत नाहीं. याचकरितां कारभारी स्पष्टवक्ता असावा. बहुधा कारभारी मुखरंजक भाषण करणारे फार. ते असे कीं, रेडा गाभणा आहे कीं काय ? असा प्रश्न यजमानांनीं केला म्हणजे त्याजवर कारभारी उत्तर देतात कीं, महाराज रेडा ५ ५ शेर दूध देतो असें आर्जवी उत्तर करितात. परंतु कोणी असें म्हणत नाहीं कीं हे मूर्खा, रेडा कधीं गाभणा होत असतो काय?

### पेनसिन ( पेनशिन )

[ पृष्ठ ८७ पुस्तक १ कागद ११ ता. २६ एप्रिल सन १८४९ इसवी ]

सरकारांतून चाकरास पेनसिन व्हावयाचें मान हलकें आहे. तथापि सिविल खात्यांत कांहीं तरी देतात. परंतु जे विद्याशिखविण्याचे पंतोजी वगैरे आहेत त्यास पेनसिन कितीहि चाकरी केली किंवा कितीहि योग्यता असली तरी देत नाहीं, हें फार आश्चर्य आहे कीं, या सरकारची चाल अशी आहे कीं जेथें जाईल तेथें हत्ती जाईल. नाहीं तेथें सुई जाणार नाहीं. एखादे वेळेस मोठा उदारपणा करतात, दुसरे वेळेस पराकाष्ठेचा लोभाविष्टपणा करतात. विद्येचे खात्यांतील लोकांस प्रथम पगार थोडे, आणि वृधापकाळी पेनसिनें नाहींत. याजमुळें कित्येकास आधार नाहींसा होतो. किंवा शक्ति नसली तरी बळेंच चाकरी करावी लागते. आम्हास वाटतें कीं, विद्येचे खात्यांतील लोकांचा दावा जबरदस्त आहे. त्यांस पेनसिनें अवश्य असावी व येविशीं सरकारनें कदुपणा करूं नये. कारण. कीं, हे लोक फार उपयोगी व विद्या शिखविणें हा सरकारचा मोठा धर्म आहे. लढाई जाहली म्हणजे लाखो रुपये खर्च होतात. आणि फळ कांहीं विशेष होत नाहीं. दुसरें मुलुख

मिळतात. परंतु उपयोग काय? जे मिळाले आहेत, त्यांतील लोकांचें कल्याण करावयाचें टाकून आणखी मुलुख घेऊनं कर्तव्य काय? याजकरतां विद्येचे कामांत सरकारनें उदारपणा करावा, अमेरिकेंत इंग्लंडांत पाहा किती खर्च विद्येकरतां देत आहे? कितीयेक मोटाले विद्वान समुद्रासारखे बहुंत त्या देशांत आहेत. तशीच विद्या या देशांत जाहली पाहिजे. कर्नाटकांतील जाहागीरदारास पुसा कीं इंग्रज हिंदुस्थानांत आहेत? तर तो म्हणेल कीं बेळगांवास आहेत. आणखी कोठें आहेत, कोणास ठाऊक? या प्रमाणें सर्वंच गोष्टींची गैर माहिती आहे. यास्तव छापी कागदावर जसा धारा आहे. त्यासारखा धारा या कामाकडे अजि जाऊं द्यावा.

## तक्रारी–रस्त्यानें जोरानें तट्टू हांकणें

[ पृष्ठ ९९ कागद १३ ता. ७ मे १८४९ ]

ज्ञानप्रकाशकर्ते यांसः—

विशेष. मी परवाचे दिवशीं रस्त्यांत जात असतांना एक गोष्ट पाहिली. ती आपणांस कळविण्यासारखी आहे म्हणून लिहितो.''

एक गृहस्थ घोड्यावर बसून येत होता. त्याचें घोडें लहान तट्टूसारखें होतें. आणि पुढें पोरगा धांवत होता आणि रस्ता पैस होता.तरी मोठ्यानें हाका मारून पैस, बाजूला व्हा म्हणून दूरदूरचे लोक होते त्यांत घाबरें करीत असे.

ज्यास घोडें इत्यादि वाहन अनुकूल आहे त्यांनीं रस्त्यावरचें माणसांस सावध करावें ही गोष्ट चांगली. परंतु सांप्रत लोकांस चोपदार, भालदार नाहींत, याजकरितां त्याचें फळ तें वीतभर घोड्यावर आणि वीतभर पोरावर काढतात, आणि विनाकारण रस्त्यावरचें लोकांस उपद्रव करितात. रस्त्यांत माणसें वाटेवर नसली तर ओरडण्याची काय गरज आहे? परंतु पुढें माणूस धाववून गलबा करावा हें मोठें महत्त्व वाटतें. म्हणून लोक असें करतात असें वाटतें ही विनंती. —पादचारी.

# ३२ इकडील वर्तमानपत्रें

( केसरी–ज्युबिली अंक )

हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतील कांहीं महत्त्वांच्या पत्रांचा उल्लेख मागें केलाच आहे. वर्तमानपत्राचें महत्त्व लक्षांत घेतल्यावर त्यांचा व्याप व विस्तार निरनिराळ्या अंगांनीं कसा होतो हें लक्षांत येतें. अलीकडे वेगवेगळ्या धंद्यासाठीं व विवक्षित समाजाच्या उन्नतीसाठीं अशींहि कांहीं साप्ताहिकें, पाक्षिकें, मासिकें निघालीं आहेत. अशा प्रकारचीं नियतकालिकें म्हणजे सहकारी वृत्त, किर्लोस्कर खबर, उद्यम, दूत, कीर्तन मासिक, रामदास-रामदासी वगैरे. वृत्तपत्रांत राजकीय, सामाजिक, धार्मिक, व्यायामविषयक, शैक्षणिक असेहि पोटभेद पडतात.

वर्तमानपत्राचें मुख्य कार्य म्हणजे लोकपक्षाची वकिली कुशलतेनें करून समाजाचा उत्कर्ष जेणेंकरून होईल असें शिक्षण आपल्या पत्र-द्वारें लोकांस देणें. जिल्हानिहाय प्रसिद्ध होत असलेल्या वर्तमानपत्रांचें कार्य मर्यादित असतें व त्यांना एक प्रकारचें स्थानिक महत्त्वच अधिक प्राप्त होत असतें. महाराष्ट्र, वऱ्हाड, मध्यप्रांत या तीन मराठी प्रांतांत जिल्हानिहाय दोनतीन साप्ताहिकें आतां प्रसिद्ध होऊं लागलीं आहेत. या पत्रांत जिल्ह्याचें राजकारण व स्थानिक महत्त्वाच्या बाबींचाच उल्लेख अधिक असतो. अशा सांप्ताहिकांपैकीं महत्त्वाचीं साप्ताहिकें म्हणजे सोलापूरचा कर्मयोगी, धुळ्याचा प्रबोध, जळगांवचा प्रागतिक, पुण्याचा भाला, नाशिकचें स्वातंत्र्य व लोकसत्ता, ठाण्याचा प्रतियोगी, रत्नागिरीचा बलवंत, गोव्याचा हिंदु व भारत, कुलाब्याचा कुलाबा-समाचार, सावंतवाडीचा वैनतेय, साताऱ्चा प्रकाश, समर्थ व ऐक्य; यवतमाळचें लोकमत, अकोल्याचा प्रजापक्ष, उमरावतीचा उदय, व स्वतंत्र हिंदुस्थान इत्यादि. तसेंच विजयी मराठा, दीनमित्र, सुबोध पत्रिका, टणत्कार, तरुण भारत, वीरशैव केसरी यांचाहि उल्लेख केला पाहिजे. नागपुरास रा. गोपाळराव ओगले यांनीं चालविलेल्या ' महाराष्ट्र'चें महत्त्व प्रांतिक तर आहेच आहे. पण देशी भाषांतून चालवि-

लेल्या वर्तमानपत्रांत त्याचा नंबर फारच वरचा लागेल यांत शंका नाहीं. वऱ्हाड मध्यप्रांताकडील राष्ट्रीय पक्षाचें तें मुखपत्र होय.

मुंबई–पुण्याकडील साप्ताहिकें म्हटलीं कीं, त्यांचें महत्त्व संपादकीय विचारावरच असतें. मुंबईतील श्रद्धानंद, प्रताप, प्रगति ह्या साप्ताहिकांचें वैशिष्ट्य वेगवेगळें असल्यामुळेंच त्यांचा प्रसार होऊन तीं लोकप्रिय ठरलीं. भाषाशुद्धि, हिंदुसभेच्या कार्याचा प्रचार, शुद्धि–संघटन यांच्यावर श्रद्धानंदाचा भर असे. रा. नवरे यांनीं चालविलेल्या ( प्रेस ऑर्डिनन्समुळें बंद पडलें ) प्रताप पत्राचें वैशिष्ट्य म्हणजे क्रांतिकारकांचे खटले व त्यांचीं चरित्रें देणें व हिंदुसभेचा प्रचार करणें हें होय. 'प्रगति'पत्राचा हेतु प्रचलित विषयांवर भारदस्त व वरच्या वर्गाच्या सुशिक्षित वाचकवर्गास रुचतील व पटतील अशा विचारांचे लेख प्रसिद्ध करणें हा दिसतो. याशिवाय मौज, विविधवृत्त, सिनेमा समाचार, वगैरे निरनिराळ्या समाजांत खपणारीं सप्ताहिकें आहेतच.

उदय, बलवंत, कर्मयोगी यांना जिल्ह्यापलीकडे महाराष्ट्रांतहि महत्त्व प्राप्त झालें आहे. सोलापूरच्या कर्मयोगीनें गेल्या मे महिन्यांत सोलापुरास घडलेल्या लष्करी व पोलिसांच्या अत्याचाराची खात्रीलायक माहिती महाराष्ट्राला देण्याचें श्रेय आपल्या पदरीं जोडलें यांत शंका नाहीं. कर्मयोगीचे संपादक रा. रामभाऊ राजवाडे यांनीं धैर्यानें ही हकीकत प्रसिद्ध केली याबद्दल त्यांचेवर लष्करी अंमलदारांचा रोष होऊन त्यांना लष्करी कायद्याखालीं ७ वर्षांची शिक्षाहि झाली! तसेंच हल्लींच्या सत्याग्रहाचे चळवळींत 'उदय' चे संपादक रा. नारायणराव बामणगांवकर व 'बलवंतचे' संपादक रा० ग. वि पटवर्धन, 'कुलाबा समाचार'चे संपादक रामभाऊ मंडलीक, 'नौबत'चे संपादक रा. लालजी पेंडसे, यांनीं प्रत्यक्ष भाग घेऊन देहदंडहि दिला. हिंदुधर्माची कड घेऊन भांडणारें 'संग्राम' नांवाचें पत्र पुण्यास निघत असे. त्याचे संपादक श्री. ग. म. नलावडे यांनीं हिंदू हितरक्षणार्थ कारागृहवासहि सोसला.

संस्थानांतील नियतकालिकांत सावंतवाडीचा वैनतेय, कोल्हापूरचा विद्याविलास, हैद्राबादचा ( दक्षिण ) नागरिक व निजाम विजय यांचा निर्देश व्हावयास पाहिजे. सांगलीसहि दोन नवीन साप्ताहिकें अलीकडे सुरू झालीं आहेत. पण संस्थानी प्रजेचें हित पाहणारें व संस्थानाच्या प्रगतीकडे लक्ष

देणारें पत्र म्हणजे पुण्यास निघणारें "संस्थानी स्वराज्य". फक्त संस्थानी विषयाला वाहून घेतलेलें असें हें एकच पत्र.

मराठी दैनिकांचें दालन कांहीं वर्षे अगदीं लहान होतें. मुंबईस कांहीं वर्षे इंदुप्रकाश, राष्ट्रमत, संदेश, लोकमान्य, राष्ट्रसेवक हीं पत्रें चालू होतीं. संदेशचें महत्व होमरूल लीगच्या चळवळीचे वेळीं विशेष होतें. असहकारितेच्या वेळीं लोकमान्य पत्राचा जन्म झाला. पण चळवळीची लाट ओसरली व एकाच शहरांत 'नवाकाळ' व 'लोकमान्य' हीं दोन मराठी दैनिकें प्रसिद्ध होऊं लागलीं. लोकमान्य हें कंपनीचे ताब्यांत असल्यामुळें लवकरच बंद करणें भाग पडलें. पण अलीकडे 'नवाकाळ', 'लोकहित' यांशिवाय ज्ञानप्रकाश (सकाळचा व संध्याकाळचा), प्रभात, श्रीलोकमान्य, ताजी बातमी, वगैरे नवीन नवीन दैनिकें सुरू झालीं आहेत. ताजी बातमी वाचण्याची लोकांत उत्पन्न झालेली आवड हीच या दैनिकांची जन्मदात्री समजावी लागेल. पुण्यांतील दैनिकें म्हणजे ज्ञानप्रकाश, लोकसंग्रह, व पुणें समाचार. 'ज्ञानप्रकाश' हें प्रागतिकांचें मुखपत्र. 'लोकसंग्रह' हें पत्र १९१८ सालीं निघालें. सुमारें तीन वर्षे तें चाललें. त्याचें संपादकत्व पंत पराडकर, ल. ब. भोपटकर, शंकर गणेश लवाटे यांचेकडे कांहीं दिवस होतें. सुमारें चार वर्षांपूर्वी डॉ. श्री. व्यं. केतकर यांनीं 'पुणें समाचार' हें दैनिक सुरू केलें. ज्ञानकोश कचेरींतील मंडळीच हें पत्र चालवीत. पण थोडेच दिवसांत हें पत्र बंद पडलें. जगांतील तात्पुरत्या महत्त्वाच्या व विस्मयपूर्ण घडामोडी, कौतुकास्पद बातम्या व चित्तवृत्ति थरारून जाईल अशीं वर्णनें यांनाच अशा दैनिक वृत्तपत्रांत प्राधान्य दिलें जातें.

पण अलीकडे मुंबईच्या मजूरवर्गाच्या हिताकडे लक्ष देणारींहि कांहीं वृत्तपत्रें निघालीं आहेत. तीं म्हणजे धूमधडाका, मजूर, लालबावटा, क्रांति हीं होत. क्रांति हें पत्र हल्लीं मिरत खटल्यांत सांपडलेले रा. डांगे यांनीं चालविलें होतें. हेच त्या पत्रांचे जनक व या पत्रांत जगांतील मजूरवर्गाच्या चळवळी, बोल्शेव्हिझम, कम्युनिझम या विषयांवर अभ्यास करून लिहिलेले लेख येत असत.

याशिवाय अलीकडे सरकारच्या दडपशाहीमुळें व मुद्रणस्वातंत्र्यावर सरकारनें ऑर्डिनन्स काढून चढविलेल्या हल्ल्यामुळें, सत्याग्रह पत्रिका,

कॅांग्रेस पत्रिका, कॅांग्रेस बुलेटिन्स यासारखीं बातम्या पुरविणारीं बुलेटिन्स लोकप्रिय झालीं आहेत. सरकारनें बुलेटिन्सवरहि गदा आणली व लोकांना बातमी देणेंच कठीण झालें तेव्हां रस्तोरस्तीं भुईपत्रिकाहि निघूं लागल्या! हा एक वृत्तपत्राचा गमतीचा नवीन प्रकार निघाला.

दैनिकांचा व साप्ताहिकांचा प्रांत सोडून दिला तर पाक्षिकें व मासिकें यांत अधिकच विविधता आढळते. सर्वसाधारणपणें मनाचें रंजन करणारें मनोरंजन, मॉडर्नरिव्ह्यूच्या धर्तीवर निघालेलें रत्नाकर, विविधज्ञानविस्तार, यशवंत, पुरुषार्थ, मधुकर, स्फूर्ति, चित्रमय जगत्, लोकशिक्षण हीं मासिकें प्रमुखपणें डोळयापुढें दिसतात. याशिवाय व्यायामाची काळजी घेणारें व्यायाम, लहान मुलांना आनंद देणारा ' आनंद ' व मुलांचा खेळगडी, महिलांच्या सुखसोयीकडे व स्त्रीशिक्षणाकडे लक्ष देणारीं स्त्री मनोरमा, गृहलक्ष्मी; सर्व लोकांचा स्नेही असें लोकमित्र हीं मासिकें प्रमुख होत. उद्यम, प्राविण्य, दूत, किर्लोस्करखबर हीं विशेषेंकरून व्यापारी विषयाला वाहून घेतलेलीं मासिकें होत. याशिवाय मुमुक्षु, स्वाध्याय, वैदिक कर्मयोग, काव्यरत्नावली, समाजस्वास्थ्य, गोरक्षण, रामदास–रामदासी हीं विवक्षित कार्याकरितां वाहून घेतलेलीं मासिकें आहेत. दैवज्ञ मासिक, तेलगूसमाचार, भंडारीविजय, ब्राह्मण पत्रिका; यंग मुस्लिम (साप्ताहिक) यांसारखीं समाज व ज्ञातिविशिष्ट नियतकालिकेंहि पुष्कळ आहेत.

मुंबई इलाख्यांतील इतर वर्तमानपत्रें पाहिलीं तर सर फेरोझ–शाहा मेथा यांनीं स्थापन केलेला क्रॉनिकल, मरहूम वाच्छा गांधी यांचें सांजवर्तमान, बॉंबेसमाचार, मुंबईचे नवे शेरीफ मर्झबान यांचा जामेजमशेत, फ्री प्रेस जर्नल या मुंबईच्या पत्रांना अग्रेसरत्व द्यावें लागतें. मुंबईसमाचार, गुजराथी समाचार, सांजवर्तमान, जामेजमशेत हीं गुजराथींत निघतात. फ्री प्रेस जर्नल अगदीं अलीकडलें म्हणजे ४–६ महिन्यांतलेंच आहे. पण त्या पत्रानें अग्रलेख, स्फुटें न लिहितांहि हल्लींच्या चळवळींत प्रचाराचें कार्य बरेंच केलें आहे. युद्धपूर्वकालांत जर्मनींत कांहीं पत्रें असेंच करीत. छोट्या छोट्या बातम्यांचे छेदक देऊन त्यांतच टीकात्मक मेख असावयाची. तेंच धोरण फ्री प्रेस जर्नलनें ठेवलें आहे. अहमदाबादचीं पत्रेंहि बरींच लोकप्रिय आहेत. त्यांपैकीं प्रजाबंधु, गुजराथी पंच यांखेरीज म. गांधींचीं यंग इंडिया, गुजराथी व हिंदी नवजीवन हीं विशेष महत्त्वाचीं होत.

कर्नाटकांत कन्नडिग, जयकर्नाटक, कर्मवीर, कर्नाटकवैभव, धारवाडवार्ता, राजहंस इत्यादिकांचीं नांवें प्रसिद्ध आहेत.

याप्रसंगानें पूर्वीं चालत असलेल्या पण हल्लीं बंद पडलेल्या केसरीच्या कांहीं व्यवसाय बंधूंचीं नांवें खालीं दिलीं आहेत.

मोदवृत्त--वाई; धर्म--वाई; स्वराज्य--सोलापूर; विहारी--मुंबई; हरिकिशोर--यवतमाळ; देशसेवक--नागपूर; जगद्धितेच्छु, राष्ट्रहितैषि, काळ व स्वराज्य --पुणें हीं पत्रें बंद झालीं याबद्दल आम्हांला फार वाईट वाटतें.

अखिल हिंदुस्थानांत वर्तमानपत्र हा स्वतःचा धंदा करून किंवा मत-प्रसाराच्या हौसेनें ज्यांनीं आजवर वर्तमानपत्रांत लेख लिहून आपल्या बुद्धीचा किंवा भावनेचा फायदा राष्ट्राला दिला अशांपैकीं कांहीं प्रमुख लोकांचीं नांवें खालीं दिलीं आहेत.

(१) राजा राममोहनरॉय (२) हरिश्चंद्र मुखर्जी (३) खिस्तोदास पाल (४) राजकुमार सर्वाधिकारी, (५) कृष्णकमल भट्टाचार्य (६) शंभुचंद्र मुखर्जी (७) शिशीर कुमार घोष (८) मोतीलाल घोष (९) पादशाहा (१०) नरेंद्रनाथ घोष (११) सुरेंद्रनाथ बानर्जी (१२) अरविंद घोष (१३) शाम-सुंदर चक्रवर्ती (१४) रामानंद चतर्जी (१५) जी. सुब्रह्मण्य अय्यर (१६) वीर राघवाचारीयर (१७) शंकरन नायर (१८) के. नटराजन करुणाकर मेनन (१९) परमेश्वरंपिल्ले (२०) ए. रंगस्वामी अयंगार (२१) पट्टाभी सीताराम अय्यर (२२) राजगोपाळचारी (२३) जी. ए. नटेसन् (२४) श्रीनिवासशास्त्री (२५) श्रीनिवासन् (२६) गुप्त, (२७) बिशन नारायण धार (२८) गंगाप्रसाद वर्मा (२९) सी. वाय्. चिंतामणी (३०) सच्चिदानंद सिंह (३१) सी. रंगा अय्यर (३२) पं. जगत नारायणलाल (३३) कृष्णकांत मालवीय (३४) गणेश शंकर विद्यार्थी (३५) पराडकर, (३६) गणेश सखाराम देऊसकर (३७) दुग्वेकर (३८) सहाणी (३९) पं. जय-रामदास दौलतराम (४०) डॉ. चोइतराम (४१) के. के. आठवले (४२) लाला लजपतराय (४३) पंडित (नागपूर) (४४) दादाभाई नौरोजी (४५) महादेव गोविंद रानडे (४६) विश्वनाथ नारायण मंडलीक (४७) जनार्दन सखाराम गाडगीळ (४८) परमानंद (४९) मलबारी (५०) नारायणराव चंदावरकर (५१) दिनशा वाच्छा (५२) भाटवडेकर, (५३) दाजी आबा-जी खरे (५४) नारायण विष्णु गोखले (५५) दामोदर गणेश पाध्ये (५६)

नारायणराव समर्थ (५७) देसाई, (५८) चिं. ग. भानु (५९) कृष्णशास्त्री चिपळूणकर (६०) गोपाळराव गोखले (६१) सिताराम हरी चिपळुणकर (६२) अच्युत बलवंत कोल्हटकर (६३) वीर वामनराव जोशी (६४) भोपटकर बंधु, (६५) नारायण लक्ष्मण फडके.

## ३३ वर्तमान पत्रें व देशी-विदेशी भाषा

( केसरी-ज्युबिली अंक )

समुद्रास भरती येऊं लागली म्हणजे ती समुद्राला येऊन मिळणाऱ्या नद्या व खाड्या, तसेंच जमिनीच्या कोन्या कोपऱ्यांत शिरलेले समुद्राचे भाग, या सर्वांतून एक सारखीच भरत असते. हिंदी जनता हा समुद्र व नवें शिक्षण हा चंद्र हें रूपक केलें असतां असें आढळून येईल कीं, हिंदुस्थानांतील ज्या प्रांतांतून हें नवें शिक्षण मिळण्याला सुरुवात झाली होती त्यांतच इतरांच्यापेक्षां आधीं राष्ट्रीय भावनेची भरती भरत गेली. आणि मुंबई, मद्रास, बंगाल या तीन प्रांतांत नवीन शिक्षणाचा उदय सुमारें एकाच वेळीं झाला असल्यामुळें, त्यांत राष्ट्रीय भावनेच्या वर्तमान-पत्रांचा उदयहि जवळ जवळ एकाच वेळीं झाला. कलकत्त्याचा 'बंगाली' मद्रासचा 'हिंदू' व पुण्याचा 'केसरी' हीं नांव घेण्यासारखीं, म्हणजे निश्चित राष्ट्रीय वृत्तीचीं वर्तमानपत्रें, फार थोड्या वर्षांच्या फरकानें सुरू झालीं किंवा नामांकित संपादकांच्या हातीं गेलीं.

केसरी १८८१ सालांत सुरू झाला. तत्पूर्वी त्याचें काम मुंबईचें 'इंदु प्रकाश' हें वर्तमानपत्र चांगल्या रीतीनें करीत होतें. पण तें पत्र अर्धें इंग्रजी व अर्धें मराठी असें होतें. असलें पत्र दोन भाषांत निघणें हें लेखकांच्या हौसेच्या दृष्टीनें सोयीचें वाटलें तरी तें वाचकांच्या गैरसोयीचेंच असतें. इसापनीतींतील दोन बायकांच्या दादल्यासारखी त्यांची गोष्ट होते. तरुण बायकोनें नवऱ्याच्या डोक्यांतले पांढरे केस आवडत नाहींत म्हणून काढून टाकावे, वृद्ध बायकोनें काळे केस आवडत नाहींत म्हणून काढून टाकावे, व अशा रीतीनें दोनहि प्रकारचे केस जाऊन नवऱ्याच्या डोक्याला टक्कल पडावें, त्याप्रमाणें 'इंदु प्रकाशाची' गोष्ट होत असे.

निव्वळ मराठी वाचकाला इंग्रजी मजकूर वाचतां येत नाहीं म्हणून 'आपली इतकी जागा गेली' या हिशेबानें तो नाखूष; आणि पहिल्या पिढीच्या शिकलेल्या लोकांना इंग्रजीचें कौतुक अधिक म्हणून मराठी लेखांकडे ते नाखूष होऊनच पाहात. पुण्याच्या 'ज्ञानप्रकाशा'चीहि मध्यंतरीं कांहीं दिवस अशीच स्थिति झाली होती. 'सुधारक' पत्रांतहि प्रथम कांहीं दिवस इंग्रजी व मराठी दोनहि भाषांत लेख येत. पण ही गोष्ट फायद्याची नाहीं असें पाहून 'ज्ञानप्रकाशा'नें पुढें इंग्रजी लेख टाकून दिले; व आतां आर्यभूषण छापखान्याचें किंवा सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचें 'सर्व्हंट ऑफ इंडिया' नांवाचें सर्वस्वी इंग्रजी असें स्वतंत्र पत्र निघूं लागलें आहे. दोन भाषांच्या संमिश्र वर्तमानपत्रांची अडचण लक्षांत येऊन, कै. चिपळूणकर, आगरकर, टिळक यांनीं प्रारंभापासूनच 'केसरी' हें पूर्ण मराठी व 'मराठा' हें पूर्ण इंग्रजी अशीं दोन स्वतंत्र पत्रें काढण्याचें ठरविलें. दोघांची मालकी व धोरण एकच, पण प्रत्येकाची भाषा मराठी किंवा इंग्रजी म्हणजे एक जिनसी. बंगाल्यांत संमिश्र भाषांच्या वर्तमानपत्रांचा प्रयोग फारसा झाला नसावा असें वाटतें. देशी भाषेंतून लेख—म्हणजे वर्तमानपत्री व ललित वाङ्मय विषयक लेख—लिहिण्याची लज्जत व आवड बंगाली लोकांना पुष्कळ; आणि इंग्रजी 'अमृत बझार पत्रिका', 'हिंदू पेट्रियट', 'बंगाली', 'वंदेमातरम्' या इंग्रजी वर्तमानपत्रांनीं जशी कीर्ति मिळविली तशीच 'आनंद बझार पत्रिका' वगैरे बंगाली भाषेंतील पत्रांनींहि मिळविली होती. महाराष्ट्राप्रमाणें बंगाल्यांतहि बंगाली व इंग्रजी अशा एक जिनसी भाषेंतील वर्तमानपत्रांनीं वेगवेगळ्या रीतीनें आपलें कार्य केलें. एकमेकांच्या पायांत पाय घातले नाहींत. बंगाल्यांत निवळ कित्येक बंगाली भाषेंतील वर्तमानपत्रें खूप लोकप्रिय असून त्यांच्या वर्गणीदारांची संख्या २०—२५ हजारांपर्यंत गेली होती किंवा हल्लीं असेलहि. पण अलीकडे राजकीय चळवळींत सर्व हिंदुस्थान हा एकजीव झाल्या कारणानें, इंग्रजी भाषेंत चाललेल्या बंगाली वर्तमानपत्रांनीं जसें चांगलें नांव कमावलें, तसें निव्वळ बंगाली भाषेंतील पत्रांनीं मिळविलें नाहीं. जमीनदारांच्या मदतीनें चाललेला व युक्तिवादशूर असा खिस्तोदास पाल यांचा 'हिंदू पेट्रियट', त्यानंतरचा विचारांनीं

नेमस्त पण राष्ट्रीय भावनेच्या तीव्र भाषेचें तीक्ष्ण पाणी दिलेला सुरेंद्रनाथ बानर्जी यांचा 'बंगाली', व त्या मागून ज्वलज्जहाल स्वरूपाचा आणि काव्य व तत्त्वज्ञान यांच्या भाषा-सरणीनें पूर्ण नटलेला अरविंद घोष यांचा 'वंदेमातरम्' ही बंगाल्यांतील इंग्रजी वर्तमानपत्रांची चढती भांजणी होय. त्यानंतर अलीकडे 'फॉरवर्ड' वगैरे पत्रें राष्ट्रीय चळवळीला वाहिलेलीं अशीं निघालीं. परंतु त्यांना 'वंदेमातरम्' पत्राची सर आली नाहीं. बंगाली भाषेंतील वर्तमानपत्रांत राष्ट्रीय भावना होती. पण 'बंगाली' 'वंदेमातरम्' अशा पत्रांत जी सभ्यता व जें उच्च वातावरण आढळून येई तें या देशी भाषेंतील पत्रांतून येत नसे. कदाचित् परक्या भाषेंत लिहूं म्हटलें तरी ग्राम्य लिहितां येत नाहीं हेंहि कारण असेल, पण बंगाली भाषेंतील पत्रांत कुत्सितपणा, कुटाळक्या, व्यक्तिनिंदा, उखाळ्यापाखाळ्या या गोष्टी विशेष असत.

---

# ३४ जर्मन वाङ्मयसम्राट

( केसरी ता. २२ मार्च १९३२ )

बरोबर शंभर वर्षांपूर्वी आज, म्हणजे ता. २२ मार्च १८३२ रोजीं, जगविख्यात जर्मन कवी गटे याचा अवतार समाप्त झाला. विद्येचें माहेर-घर व पंडितांचें आगर अशा जर्मन राष्ट्रानें त्यालाच आजवर कवि-सम्राट असें मानलें आहे. त्या बहुमानाला व स्वतःच्या प्रेमभावनेला शोभेल अशा अनेक रीतींनीं, जर्मनीचे स्वाभिमानी लोक गटेच्या पुण्यस्मरणाचा समारंभ साजरा करणार आहेतच. पण राष्ट्रीयत्वाच्या रूढ व्याख्येमुळें या कविवर्याला 'आपला' असें ज्यांना म्हणतां येणार नाहीं असे, म्हणजे जगांतील इतर देशांचे लोकहि, या वाङ्मय-क्षेत्रांतील विभूतीला आजच्या प्रसंगीं स्तुतिपुष्पें वाहून स्वतःस धन्य मानतील यांत शंका नाहीं. आप-परभाव हा मनुष्यमात्राला मोठा दुस्तर असतो हें तर खरेंच; पण राष्ट्रीय-त्वाच्या गर्विष्ठ व दुर्दम भावनांचा जेथें निरास होतो अशाहि कांहीं जागा जगांत आहेत. आणि त्यांपैकींच वाङ्मय-क्षेत्र हें होय. 'स्वदेशे पूज्यते राजा, विद्वान् सर्वत्र पूज्यते' या वचनांत 'सर्वत्र' हा शब्द मोठा

मार्मिकपणाचा पडला आहे. तो शब्द घालणारा जुना संस्कृत पंडित जरी 'नवखंड पृथ्वी व दहावें खंड काशी' असा भोळा हिशोब करून, सर्व जगाला आपल्या या भरतखंडांतच कोंबून मोकळा होण्याइतका भूगोला-विषयीं अज्ञानी असला तरी, त्याचें अज्ञान त्याच्याबरोबरच संपलें आणि त्याचें हें सुभाषित वचन जसें त्रिकालाबाधित शिल्लक उरलें, तसाच 'सर्वत्र' शब्दहि, सन १९३२ सालापर्यंत शोध लागलेल्या, सर्व पृथ्वीला लागू पडणारा असा उरला.

हिंदुस्थानच्या लोकांनीं या जर्मन कवि—सम्राटाविषयीं प्रेमादर व्यक्त करणें म्हणजे गरिबांनीं श्रीमंतांशीं आपलें नातें जोडूं पाहाण्यासारखें स्वाभिमानशून्यपणाचें ठरेल असें कदाचित् कोणाला वाटण्याचा संभव आहे. पण खरोखर तें तसें नाहीं. कारण जर्मन लोकांनीं एकंदर संस्कृत विद्येबद्दल किती प्रेमादर व्यक्त केला आहे हें पाहिलें म्हणजे, वरील प्रकारचा आक्षेप निर्मूल ठरतो. निदान वैदिक वाङ्मयाच्या तरी आस्थेवाईक अभ्यासाच्या कामीं, आणि परिश्रमपूर्वक तत्संरक्षणाच्या कामीं, जर्मन आर्यांनीं भारतीय आर्यांना जें जवळ जवळ मागें टाकलें आहे, तें त्या वाङ्मयाविषयीं खरा प्रेमादर वाटत असल्याशिवाय असेल काय ? पण तो व्यापक विषय सोडून देऊन केवळ संस्कृत काव्यापुरतें पाहिलें तरीहि, जर्मन पंडितांनीं ती प्रेमादराची भावना निःसंशय प्रगट केली आहे. फार काय, आजच्या आमच्या अग्रलेखाचा विषय कविवर्य गटे याचेंच उदाहरण घेऊं. अभिजात संस्कृत नाट्यवाङ्मयांत कालिदासाच्या शाकुंतला-लाच अग्रपूजेचा मान भारतीय पंडित देतात. पण गटे यानें शाकुंतला-विषयीं ज्या उत्कट भावनेचे उद्गार काढले आहेत, तसे उद्गार खुद्द एखाद्या हिंदी पंडितानेंहि काढलेले आढळणार नाहींत. कोणत्याहि काव्य-नाटकाचें खरें अंतरंग भाषांतराच्या द्वारें प्रगट होणें बहुधा कठीण असतें. असें असतांहि, आंग्ल पंडित सर विल्यम जोन्स यानें केलेलें शाकुंतल नाटकाचें भाषांतर वाचून, गटे हा आनंदानें नुसता नाचूं लागला असें म्हणतात. आणि त्या आनंदाच्या भरांत त्यानें या कालिदास—कृतीविषयीं जे उद्गार काढले त्याचें भाषांतर खालीं दिल्याप्रमाणें करण्याचें आम्ही धाडस करितों. गटे म्हणतोः—

"नूतन वर्षाच्या तारुण्यागमीं प्रगट होणारे वृक्षलतांचे मोहोर व फुलोरे,

आणि त्याच वर्षाच्या उतारपणांत उतरलेले परिपक्व फळांचे घोस व लोंगर हे कधीं एकत्र पहावयास मिळतील काय? नेत्रांना सौंदर्यलाभ, अंतःकरणाला आनंद, रसिक रसवंतीला मेजवानी, आणि ज्ञानक्षुधेला पौष्टिक अन्नसमृद्धि, हीं एकाच वेळीं एकाच पदार्थापासून लाभलेलीं कोणाला कधीं कोठें पहावयाला सांपडतील काय? त्याचप्रमाणें स्वर्ग आणि पृथ्वी यांत मिळणारीं सुखें एकत्र कशीं लाभतील? पण नाहीं. हा चमत्कार मला एके ठिकाणीं खराच पहावयास सांपडला आहे. तुम्हांला हें खरें वाटत नाहीं ना? ठीक आहे. सांगतों तर ऐका. शाकुंतल नाटकांत हें सर्व एकत्र अनुभवाला येतें. आणि त्या नाटकाचें मी नुसतें नांव घेतलें म्हणजे पुरें आहे. तें नुसतें नांवच तुम्हांला हें माझें म्हणणें परस्पर पटवील!"

वरील स्तुतिकलापांत गटे यानें अद्भुत म्हणून वर्णन केलेला एक प्रकार, म्हणजे वसंत ऋतूंतील कोमल फुलांचा बहर आणि शरदृतूंतील परिपक्व धान्यफळसमृद्धि यांचा समवाय होय. कित्येकांचें मत असें आहे कीं, शाकुंतल नाटकांत शकुंतलेच्या रूपानें प्रगट झालेली तारुण्यांतील सरस भावनांची ललित लीला, आणि तापस मुनींच्या रूपानें प्रगट झालेलें प्रौढवयांतील तत्त्वज्ञान व शहाणपण, यांना उद्देशूनच गटेनें वरील फुलाफळांचें रूपक केलेलें आहे. पण वस्तुसृष्टि हीच कित्येकवेळां कल्पनासृष्टिलाहि लाजविते असें म्हणतात; त्याप्रमाणें स्वतः गटे याच्या अंतःकरणांतच, अखंड तरुण अशी भावनांची लीला आणि अकाल-प्रसव अशा प्रौढ तत्त्वज्ञानाचा विकास हीं एकत्रित झालीं होतीं. कारण त्यानें विशीपंचविशीच्या आंत लिहिलेल्या कवितेंत तत्त्वज्ञानाची जितकी झाक उमटते, तितकीच पंचाहत्तराव्या वर्षी लिहिलेल्या तत्त्वज्ञानांत उज्ज्वल कविप्रतिभा प्रगटलेली आहे. गटे याच्या सारखे दीर्घायुष्य लाभलेले सरस्वती-भक्त आधीं थोडे, व या सर्व दीर्घायुष्यभर ज्यांचे हातून अशी उज्ज्वल साहित्यसेवा घडली असे तर त्यांतूनहि फार थोडे.

अंधाऱ्या रात्रीं विमानांतून प्रवास करणारे लोक असा अनुभव सांगतात कीं, तासन् तास व शेंकडों कोस मजल मारावी तेव्हां कोठें, आसपासच्या प्रदेशावर स्वच्छ प्रकाश पाडणारी रोषनाई खालीं एखाद्याच ठिकाणीं दृग्गोचर होते. मधून मधून वाटेंत गांवें लागत असल्यामुळें दिवे अगदींच दिसत नाहींत असें नाहीं. पण ते दिवे अस्पष्ट, लुकलुक-

गारे व फार तर स्वतःचें अस्तित्व प्रगट करण्याला समर्थ असे असतात. आपल्या भोंवतालच्या प्रदेशाची रूपरेखा दुरूनहि पाहणाराला स्वच्छ दाखविण्याइतका उज्ज्वल दीपराज क्वचितच भेटतो. जी गोष्ट दिव्यांची तीच प्रतिभासंपन्न महानुभाव कवींची. आकाशगंगेंतल्या हतप्रभ अंधुक तारकांसारखे वाङ्मयक्षेत्रांत प्रकाशणारे कवि जगभर इतस्ततः पसरलेले आहेतच. पण शेक्सपीयर, गटे, कालिदास असे फार थोडे कीं, ज्यांनीं एकदां पाजळून ठेवलेला दिवा पुनः पुनः त्यांत नवें तेल–तूप घातल्याशिवाय अखंड देदीप्यमान असा तेवत राहतो, व भोंवतीं आणखी इतर दिवे लावले काय, मालवले काय, स्वतः त्याच्या प्रकाशाला भर पडत नाहीं किंवा उणेपणा येत नाहीं. जगावर पसरलेलें अज्ञान व अरसिकत्व यांच्या अंधाऱ्या रात्रीं, मनोविमानांतून विश्वसंचार करावयास निघालेल्या वाङ्मयप्रेमी प्रवाशाला, भरतखंडांत दोन हजार वर्षांपूर्वी एखादाच कालिदास भेटतो, तर इंग्लंडांत सतराव्या शतकांत एकादाच शेक्सपीअर, व अठराव्या–एकोणिसाव्या शतकांत जर्मनीमध्यें एखादाच गटे आढळतो.

पहिल्या प्रतीचे कवि इतके दुर्मीळ असतात, म्हणूनच त्यांचें महत्त्व. पण खाणींतून क्वचित निघणारा एखादा कोहिनूर प्रत्यक्ष कोणाच्याहि ताब्यांत असो, ती मिळकत दुसऱ्या एका नात्यानें सगळ्या जगाची मिळकत होऊन बसते. त्याप्रमाणें कालिदासानें गीर्वाणवाणी सनाथ केली, किंवा शेक्सपीअरनें आंग्लभाषेला अमर केलें, किंवा गटे याच्या प्रतिभेनें जर्मनभाषा जगविख्यात केली, तरी या तिघांहि कवींचें कवित्व हा अखिल मानव जातीचाच ठेवा होय. मंगळाच्या ग्रहगोलावरून पृथ्वीकडे पाहाणाराला हिमालयाचीं, आल्प्स पर्वताचीं किंवा रॉकी माउन्टनचीं उत्तुंग शिखरें तेवढींच दिसतील. यामुळें त्यानें तीं एकाच पर्वताचीं शिखरें अशीं मानल्यास तें स्वाभाविकच आहे. आणि या तीनहि पर्वतशिखरांचें अधिष्ठान जी पृथ्वी ती कृत्रिम भेदानें कोणी त्रिखंड मानली तरी मुळांत अखंडच नव्हे काय? अलेक्झांडर हंबोल्ट या जर्मन जगत्प्रवाशाला पृथ्वी अखंड वाटावी यांत आश्चर्य नाहीं. म्हणून त्यानें कालिदासालाहि एका विशिष्ट राष्ट्राचा कवि असें न मानतां पृथ्वीवरील सर्व कवींची एकच माला असें कल्पून तींत त्याला मानाचें स्थान दिलें आहे ( A high place among the poets of all nations ).

या महाकवीचा जन्म सन १७४९ सालीं जर्मनींत फ्रँकफुर्ट या गांवीं झाला. त्याच्या वरच्या तीन पिढ्यांतील पूर्वजांनीं नालबंदापासून मुत्सद्द्या-पर्यंत अनेक धंदे केले होते. त्याची आई १८ वर्षांची असतांच तिला गटे हें पहिलें अपत्य झालें. तिच्यापासून त्याला कल्पना व प्रतिभा हीं मिळालीं. आणि भावनांवर ताबा चालवून त्यांची शिस्त राखणारा करारी-पणा हा गुण त्याला आपल्या बापापासून लाभला होता. या दोन देण-ग्यांमुळें गटे याचें जीवनचरित्र, त्याचें वाङ्मय, व त्याचें तत्त्वज्ञान या सर्वांमध्यें एक प्रकारची तालबद्धता, अनुछृंखळता, व्यापक दृष्टि, व स्वयं-नियंत्रण या गोष्टी दिसून येतात. वयाच्या १६ व्या वर्षाचे आंतच गद्य, पद्य, नाटक इत्यादि वाङ्मयप्रकार लिहिण्याला त्यानें सुरुवात केली होती. पुढें वैद्यकशास्त्र व कायदा यांचा त्यानें अभ्यास केला. व थोडे दिवस वकिलीहि केली. सन १७७५ सालीं, म्हणजे वयाच्या २६ व्या वर्षीं, वैमार येथील राजाकडून त्याला कायमचा आश्रय व उपजीविकेचें साधन मिळालें. त्या छोट्या राज्यांत प्रधानमंडळांतील एक प्रधान म्हणूनहि त्यानें कांहीं दिवस काम केलें. पण त्याचा मुख्य भर वाङ्मयावर होता; आणि खुद्द राजा हाच त्याचा मित्र व चाहता होता; यामुळें त्याला आपला हा आवडीचा उद्योग करण्याला स्वस्थपणा लाभला.

" विनाश्रया न शोभन्ते पंडिता वनिता लताः " हें वचन सर्वस्वीं खरें आहे. मुळांतच कोणांत नसलेली प्रतिभा केवळ राजाश्रयानें उत्पन्न होत नाहीं हें खरें. पण प्रतिभेच्या बीजाला अंकुर फुटून तिचा वृक्ष होण्याला, आपत्तीच्या कोरड्या कडक उन्हाळ्यापेक्षां संपन्नतेची ऊबदार हवा व राजाश्रयांतून झिरपणाऱ्या संपत्तीच्या झऱ्याचा ओलावा हींच अधिक गुणकारी व फलप्रद होऊं शकतील हें काय म्हणून नाकबूल करावें? प्रतिभेनें आपत्तीशींहि झगडून जय मिळविला तर तिचा पराक्रम—गुण अधिक ठरेल. परंतु आजवरच्या वाङ्मयाच्या इतिहासांत, विद्वान शास्त्री—पंडितांना व प्रतिभासंपन्न कवींना मिळालेल्या राजाश्रयानेंच ज्ञान व काव्यानंद यांचा लाभ जगाला पुष्कळच झालेला आहे. राजाश्रयानें विद्येला ठाव, नांव व वाव मिळतो. ठाव म्हणजे द्रव्याचा आधार, नांव म्हणजे कीर्ति, आणि वाव म्हणजे विस्तार व वैचित्र्य यांना लागणारा प्रांत. जगाच्या इतिहासांत ऑगस्टस, भोज, विक्रम, श्रीहर्ष, चवदावा व

अठरावा लुई, एलिझाबेथ व व्हिक्टोरिया, इत्यादि राजे व राण्या यांचीं नांवें एकेका उज्ज्वल वाङ्मययुगाशीं निगडित झालीं आहेत, याचेंहि कारण विद्येला योग्य वेळीं मिळालेला राजाश्रय हेंच होय.

असो. गटे याचा बहुश्रुतपणा व बुद्धिमत्तेची आक्रमणशीलता एवढी होती कीं, त्यानें काव्यवाङ्मयाप्रमाणें गणित, भौतिकशास्त्र व वैद्यकशास्त्र यांचेंहि खोल परिशीलन करून त्या विषयांवर अनेक निबंध लिहिले. परंतु ज्ञानसाधन या दृष्टीनें त्यांचा उपयोग असला, व त्यामुळें गटेच्या प्रज्ञेचा व प्रतिभेचा अष्टपैलूपणा सिद्ध होत असला, तरी गटे याची खरी कीर्ति त्याच्या आत्मानुभूतीमुळेंच आहे, आणि त्याची आत्मानुभूतिच मुख्यतः त्याच्या वाङ्मयांतून प्रगट झालेली आहे. वैमार येथील दरबारांत त्यानें राज्यकारभाराचें काम केलें, व फ्रेंच राज्यक्रांतींतील एका युद्धांत आपल्या राजाबरोबर तो स्वारीवरहि गेला होता. पण राजकारणांत त्याचें खरें लक्ष नव्हतें. तत्त्वतः फ्रान्समधील राज्यक्रांति, व तींत दिसून आलेला मनुष्यस्वभावाचा उच्छृंखलपणा, हीं त्याला पसंत नव्हतीं. तथापि नेपोलियनाविषयीं त्याला आदर वाटे, त्यामुळें आपल्या देशाचा शत्रु म्हणून त्यानें त्याचा द्वेष केला नाहीं. गटेच्या अंगीं तीव्र देशभक्ति होती, पण ती संकुचित दृष्टीच्या राष्ट्रीय भावनेची नव्हती. तो सर्वस्वी विश्वबंधुच नसला तरी, मनुष्यस्वभावांतील स्वातंत्र्यबुद्धि व त्रैगुण्य हीं ओळखून मानणारा, व आपापल्या परीनें मिळेल ती आत्मानुभूति मिळवून जो काय मोक्ष साधेल तो मनुष्यानें साधावा किंवा गति मिळवावी अशा मताचा तो होता. तसेंच संसारांत दुःखभावनेपेक्षां आनंद, सहानुभूति, सौंदर्य, अवलोकनाची मार्मिक दृष्टि, या हेतूवर त्याच्या जीवननौकेचें सुकाणूं सर्व आयुष्यभर फिरत राहिलें. तो स्वतः सुंदर, देखणा, भव्य व प्रतिभेच्या तेजानें तळपणारा असा असल्यामुळें, नेपोलियन बोनापार्ट व गटे यांची भेट झाली तेव्हां नेपोलियनच्या तोंडून "वाहवा, हाच पुरुष–श्रेष्ठ खरा" असे उद्गार निघाले म्हणतात.

वाङ्मयामध्यें अनेक पद्धति, पंथ, संप्रदाय असतात हें प्रसिद्ध आहे. प्रत्येक देशांत या पंथांना वेगवेगळीं नांवें मिळतात. परंतु त्यांतील भेदांचें व विरोधाचें तत्त्व एकच एक असतें. तें तत्त्व म्हणजे, परंपरेचें प्रेम व अभिमान (अर्थात सुसंस्कृत असा अभिमान) यानें प्रतिभेला स्फुरण

मिळतें किंवा मिळावें ? अथवा आत्मस्वातंत्र्याच्या उच्छृंखलताप्रियत्वानें तें स्फुरण मिळावें ? असा हा वाद सनातन आहे. इंग्रजींत या पहिल्या पक्षाला किंवा संप्रदायाला 'क्लासिसिझम्' असें म्हणतात व दुसऱ्याला 'रोमँटिसिझम्' म्हणतात. वास्तविक पहिल्या पक्षाच्या तत्त्वांत स्थायीभावाला विशेष महत्त्व दिलेलें असतें, व दुसऱ्या संप्रदायाच्या तत्त्वांत त्वरित व अनिरुद्ध प्रगतिप्रियतेला महत्त्व दिलेलें असतें. पहिल्याची दृष्टि आहे तें सर्व जमेला धरून त्यांतूनच आत्म्याला प्रगति व आनंद वाढवून मिळवून देण्याची असते. आणि दुसऱ्याची तत्त्वाची दृष्टि, जुनें कोणतेंहि जमेला न धरतां, निराधार अंतराळीं जन्मलेल्या (!) एखाद्या पक्षाप्रमाणें जिकडे दृष्टि जाईल तिकडे पंख हालवून आक्रमण करणें याकडे असते. सत्यनिष्ठा व सौन्दर्यलालसा हीं दोघांनाहि असतातच. परंतु त्यांच्यांतील भेद हा केवळ स्वभावानुसार पडतो व त्यामुळें प्रत्येकाच्या आत्मानुभूतीचें स्वरूप वेगळें ठरतें.

वरील दोन संप्रदायांपैकीं कवि गटे हा पहिल्याचा अनुयायी म्हणतां येईल. तो केवळ डोळे मिटून शून्यसंशोधन करणारा नव्हता; तर सृष्टि व मनुष्यजीव हा सर्वस्वीं सत्य मानून त्यांच्या विकासांतून दिसून येणाऱ्या आत्मविकासावर त्याची श्रद्धा अढळ होती. पण या विकासाची क्रिया किंवा कृति सुरू असतांनाहि, प्रीति, आनंद व सौन्दर्योपभोग यांची मनुष्याला लयलूट करतां येईल व ती त्यानें अवश्य करावी अशा मताचा तो होता. नदीचें परतीर गांठण्याकरितां पाण्यांत पडलेला पोहणारा मनुष्य हा, प्रवाहाचें पाणी तोडीत असतांनाच, स्नानावगाहनादि क्रीडा यथेच्छ करीत असतो. तसेंच मनुष्य–जीवानेंहि संसारांत करावें, आणि शक्य तितका भवितव्यतेवर विजय मिळवावा हें त्याचें तत्त्वज्ञान होतें. परंपरेचा पूर्ण अभिमानी व तिच्याशीं प्रेमबद्ध असल्यानें, ग्रीक व रोमन काव्य, तत्त्वज्ञान व कलाकौशल्य यांचा निकट परिचय गटे यानें करून घेतला होता. आणि वाङ्मयविहाराला प्रारंभ करतांना, जर्मन भाषेंत प्रसिद्ध असलेल्या 'ष्टुर्म व ड्रांग' म्हणजे 'स्टॉर्म अँड ऑप्रेशन' किंवा 'वादळ व उत्पात' या शब्दांनीं दर्शविलेल्या तत्त्वाकडे त्याचें लिखाण किंचित् झुकलें होतें तरी, त्याच्या प्रतिभेमध्यें जो स्थितिस्थापकतेचा मोठा गुण होता त्याच्या आधारावर त्यानें सर्व जन्मभर विचार व भावना यांच्यामध्यें तादात्म्य व तालबद्धता हीं दोनहि

यशस्वीपणानें संभाळलीं. कवित्वाला भावनेचा उन्माद हा जरी अवश्य मानतात, तरी गटेच्या कवित्वांत इतर इतके मोठे व प्रभावी गुण होते कीं, उन्मत्त भावनेनें पराक्रमी बनलेल्या रोमँटिक संप्रदायांतील कवींपेक्षां गटे हाच जर्मनींत आजवर अधिक कीर्तिमान होऊन राहिला आहे.

त्याच्या काव्यनाटकादिकांची माहिती द्यावयाची हें काम त्यांच्या परभाषेच्या आवरणामुळें फार कठिण. आणि गटेची वाङ्मय-संपत्ति एवढी विशाल आहे कीं, त्याच्या चरित्रविषयक अशा एखाद्या लेखांत तिचा ओझरताहि परिचय करून देणें कठिण. मग मर्म प्रतिपादन करणें तर अशक्यच. म्हणून आम्ही इतकेंच सांगतों कीं, ज्या आंग्ल भाषेच्या द्वारानें गटे याला शाकुंतल नाटकाची ओळख झाली, त्याच मध्यस्थाच्या द्वारें, गटेच्या कांहीं वाङ्मयखंडाची ओळख, निदान इंग्रजी जाणणाऱ्या हिंदी मनुष्याला, होऊं शकेल. म्हणून ज्यांना या दृष्टीची हौस असेल त्या वाङ्मयप्रेमी रसिकांनीं त्याच्या कादंबऱ्या, त्याचीं वीणाकाव्यें, व त्याचें सर्वोत्कृष्ट नाटक 'फौस्ट' हें अवश्य वाचावें. या नाटकाला आपलें प्रमुख राष्ट्रीय काव्य असें जर्मन लोक मानितात. इंद्रधनुष्याप्रमाणें त्यांत प्रगट झालेला आल्हादकारक सप्तरंगीपणा पाहून कोणाहि वाचकाला आनंद झाल्याशिवाय राहणार नाहीं. कवि व नाटककार हे आपापल्या परीनें तत्त्वज्ञानीहि असतात. म्हणून गटेच्या काव्यांतून व नाटकांतून अंतिम स्वरूपाचे असेहि अनेक तात्त्विक प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केलेला आढळेल. आणि खरोखर कोणतेंहि 'तत्त्वज्ञान' म्हटलें म्हणजे, असले अंतिम प्रश्न सोडविण्याचा, समर्याद बुद्धीनें व समर्याद प्रतिभेनें, केलेला तो प्रयत्न याहून त्याला अधिक गौरवयुक्त असें नांव देतां येणेंच शक्य नाहीं. या दृष्टीनें पाहतां कवि व तत्त्वज्ञानी हीं दोनहि वर्णनें गटे याला लागू पडतात. तथापि ज्ञानसृष्टि वश करणारे लोक सहसा शब्दसृष्टि वश करूं शकत नाहींत ही गोष्ट अनुभवसिद्ध असल्यामुळें, जगानें गटे याला वरील दोहोंतून महाकवि हेंच उपपद लावण्याचें अधिक पसंत केलें आहे. कारण त्याला साधली अशी शब्दकिमया फार थोड्या कवींना साधते.

वर एके ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें, जर्मनी हें विद्येचें माहेरघर व शास्त्रीपंडितांचें आगर आहे, ही गोष्ट जर्मनींत होऊन गेलेले ल्यूथर, लिबनिटस, लेसिंग, हेगेल, हाइन, शोपेनहूर, शिलर, हौप्टमन, कायसरलिंग,

इत्यादि प्रसिद्ध महानुभाव ग्रंथकार ध्यानांत आणले असतां सहज पटण्यासारखी आहे. पण कवि गटे याच्या नांवानें जर्मनीच्या रसिकपणाचा व विद्वत्तेचा जो बोध जगाच्या मनावर होतो तो इतर नांवांवरून तितका होत नाहीं. आजची २२ मार्च ही तारीख, शंभर वर्षांच्या फरकानें कां होईना, पण, या जगविख्यात पराक्रमी वाङ्मयभक्ताची आठवण करून देणारी आहे. म्हणून प्रस्तुत लेखानें केसरीच्या वाचकांना त्याचें पुण्यस्मरण करून देण्याचा प्रयत्न आम्हीं केला आहे. कारण याहि बाबतींत वर सांगितल्याप्रमाणें, राष्ट्रीय भावना ही कोणत्याहि राष्ट्राच्या प्रगतीला अवश्य असली तरी ती संकुचित असावी असें मात्र नाहीं. स्वाधिष्ठान न सोडतांहि, विभूतिपूजेच्या तत्त्वानुसार, जगांतील कोणत्याहि भागांतून मिळणाऱ्या ज्ञानाचा, गुण–संपत्तीचा, ऊर्जितत्वाचा, विभूतिमत्वाचा प्रकाश घेऊन, आपलें मनोमंदिर पवित्र व प्रकाशमान करणारी तीच खरी राष्ट्रीयबुद्धि असें आम्ही तरी समजतों.

## ३५ वासुदेवशास्त्री खरे यांचा मृत्यु

( केसरी–मे १९२४ )

जुन्या पिढींतले पण नव्याहूनहि अधिक उमेदीनें संशोधनाचें कार्य करणारे मिरजेचे सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक, कवि व नाटककार वासुदेवशास्त्री खरे यांस मिरज मुक्कामीं बुधवार ता. ११ रोजीं रक्तक्षयाच्या विकारानें देवाज्ञा झाली हें कळविण्यास आम्हास अत्यंत वाईट वाटतें. केसरी-मराठा संस्थेच्या जन्मापासूनच शास्त्रीबुवांचा संबंध या संस्थेशीं जडला होता. केसरीच्या मथळयावर असलेल्या 'स्थितिं नो रे दध्याः' या श्लोकाचें 'गजालिश्रेष्ठा या' हें समवृत्तांतलें पद्यमय भाषांतर शास्त्रीबुवांनींच करून दिलें होतें. टिळक डेक्कन कॉलेजांत असतांनाच त्यांचा टिळकांशीं परिचय जडला; परंतु पुढें शास्त्रीबुवांचा व्यवसाय भिन्न तऱ्हेचा सुरू झाला व त्यांतूनहि त्यांस संस्थानांत राहण्याचा प्रसंग आला, म्हणून ते प्रत्यक्ष राजकीय चळवळींत पडले नाहींत; तथापि लोकमान्यांच्या राजकारणाविषयीं त्यांना अंत:करणपूर्वक सहानुभूति वाटत असे.

खरेशास्त्री यांचें मूळ गांव कोंकणांतील ग्वाहागर हें होय. त्यांचें घराणें शास्त्रविद्येविषयीं प्रसिद्ध आहे. कोंकणांतून वर आल्यावर त्यांनीं प्रथम सातारा येथें कै० विद्वच्छ्रेष्ठ अनंताचार्य गजेंद्रगडकर यांचे घरीं राहून संस्कृत विद्येचा परिश्रमपूर्वक अभ्यास केला. तेथें असतां ते कै. बाळाचार्य गजेंद्रगडकर यांचे सहाध्यायी होते. गजेंद्रगडकर-घराण्यासंबंधानें खरेशास्त्री यांची नेहमीं आदरबुद्धि असे. शास्त्रीबुवांनीं पुढें पुण्यास नवीन निघालेल्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें संस्कृत शिक्षकाची नोकरी धरली. त्या वेळीं त्यांचा व टिळकांचा स्नेहसंबंध विशेष दृढ झाला. पुढें मिरज येथें नवीन हायस्कूलची योजना झाल्यामुळें कै. अण्णाजी रामचंद्र अत्रे यांना हेडमास्तर व खरेशास्त्री यांना संस्कृत शिक्षक म्हणून मुद्दाम नेण्यांत आलें. लोकमान्य टिळकांचे शिफारशीवरून या उभयतांची मिरजेस नेमणूक झाली होती. पुण्यास असेपर्यंत शास्त्रीबुवांना इंग्रजी फारसें येत नव्हतें. परंतु मिरजेस गेल्यावर रात्रीचा दिवस करून केवळ स्वतःच्या प्रयत्नानें त्यांनीं इंग्रजीचा उत्तम अभ्यास केला, व दोन-तीन वर्षांत मिरज लायब्ररींतील सर्व इंग्रजी ग्रंथ त्यांनीं वाचून टाकले! पुण्यासारख्या ठिकाणीं ते असते तर संस्कृत व मराठी भाषांप्रमाणें इंग्रजी भाषेवरील त्यांचें प्रभुत्वहि लोकांच्या निदर्शनास खचित आलें असतें. पण दुर्दैवानें त्यांची आयुष्यक्रमाची गाडी एका मागासलेल्या संस्थानाच्या आडरूळावर गेली त्यामुळें त्यांचें सर्व प्रकारें नुकसान झालें. या अशा स्थितींत असतांहि त्यांनीं उत्तम ग्रंथकार व लोकोत्तर इतिहाससंशोधक म्हणून कीर्ति मिळविली हेंच त्यांच्या बुद्धिमत्तेचें व ध्येयनिष्ठेचें खरें लक्षण होय. ग्रंथवाचनाची गोडी लागली असतां तहानभूक विसरणें हें वर्णन शास्त्रीबुवांसंबंधानें अक्षरशः पाहावयास सांपडे, व खेळण्याचा अड्डा काय किंवा विद्याव्यासंग काय, दोहोंसंबंधानें त्यांची बैठक येवढी दांडगी असे कीं, आठआठ प्रहर देखील ती कित्येक प्रसंगीं टिकलेली आहे. कविता करण्याचा नाद शास्त्रीबोवांना लहानपणापासून असे. मिरज हायस्कुलांत गेल्यानंतर लगेच त्यांनीं "यशवंतराव" नांवाचें महाकाव्य लिहिलें. त्यांच्या फुटकळ कविताहि बऱ्याच आहेत. विद्यार्थ्यांना संस्कृत शिकवीत असतां प्रसिद्ध संस्कृत काव्यग्रंथांतील श्लोक घेऊन त्यांचें समवृत्त मराठी भाषांतर तावडतोब ते करून दाखवीत. ते शिक्षक या नात्यानें मोठे रागीट व मारके असत;

तथापि त्यांच्या शिक्षणप्रसंगीं विद्यार्थ्यांना कोट्या, हास्यविनोद, कथाकलाप, काव्यस्फूर्ति व सुभाषितसंचय यांचा जो अपूर्व लाभ घडे, त्यामुळें विद्यार्थी त्यांचा राग व मार दोनहि विसरून जात व त्यांजवर नेहमीं खूष असत. पुढें स्वतः त्यांनीं इतिहास विषयाचा व्यासंग सुरू केल्यानंतर काव्य व नाटक या दोनहि गोष्टींना सहजच गौणत्व आलें व पुढें केवळ जरूरी-पुरत्याच ते त्यांना हातीं धरीत. तथापि त्यांच्याशीं संभाषण करण्याचा प्रसंग ज्यांना सुदैवानें लाभला असेल त्यांना खरी बहुश्रुतता हा पदार्थ काय असतो हें कळून आल्याशिवाय राहिलें नसेल. यांच्या आख्यायिका म्हणजे चालतें-बोलतें उदार शिक्षण होतें.

मिरज हायस्कुलांत संस्कृत शिक्षक बनल्यापासून तेथें ३० वर्षें काम करून पेन्शन घेतल्यावरहि आमरण ते मिरजेसच राहिले. १८९८ सालीं त्यांनीं आपल्या 'ऐतिहासिक लेखसंग्रह' मासिकद्वारा संशोधन कार्यास प्रारंभ केला आणि यावज्जन्म तें कार्य त्यांनीं अत्यंत एकनिष्ठेनें व कळ-कळीनें चालविलें. ऐतिहासिक पत्रांच्या भाराभर गळाठ्यांतून महत्त्वाचीं पत्रें नेमकीं निवडून काढणें आणि त्यांतला वेंचक भाग वाचकांपुढें व्यव-स्थितपणें मांडणें ही हातोटी शास्त्रीबुवांना फारच उत्तम साधली असल्यानें 'ऐतिहासिक लेखसंग्रह' हें मासिक फारच लोकप्रिय झालें. शास्त्रीबुवांनीं पुढें या मासिकाचें पुस्तकांत रूपांतर केलें. त्याचे आतांपर्यंत ११ भाग छापून प्रसिद्ध झाले असून १२ व्या भागाची लेखी प्रत शास्त्रीबुवांनीं तयार करून ठेवली आहे. शास्त्रीबुवा हे रसिक विद्वान असून त्यांच्या साध्या भाषणांत देखील मनोरंजक कोट्या व विनोदपर अलंकार भरपूर असत, यामुळें त्यांचीं नाटकेंहि फार लोकप्रिय झालीं आहेत. 'गुणोत्कर्ष' हें त्यांचें पहिलें नाटक प्रसिद्ध होऊन चाळीस वर्षें होत आलीं, तथापि त्याची लोक-प्रियता नव्या नाटकाइतकीच ताजी आहे. त्यांचें 'तारामंडळ' हेंहि नाटक वाखाणण्याजोगें झालें आहे; पण 'उग्रमंगल' आणि 'शिवसंभव' या शेवटच्या नाटकांनीं सर्वांवर ताण केली आहे. या नाटकांतील प्रसंग ऐति-हासिक माहितीला धरून असून अत्यंत उठावदार बनले आहेत. ऐतिहासिक लेखसंग्रहांखेरीज त्यांनीं नाना फडनविसांचें चरित्र, अधिकारयोग, शहाजी वगैरे ग्रंथांनीं व निबंधांनीं इतिहास विषयांत चांगलीच भर टाकली आहे.

जुन्या काळीं केवळ इंग्रजी शिक्षणानें मिळणारी पदवी संग्रहीं नस-

त्यानें, बुद्धिमान् तेजस्वी व कतृत्वशाली अशा ज्या अनेक गृहस्थांना गरिबींत दिवस काढावे लागले व कर्तृत्वाला शोभण्याजोगी कीर्ति ज्यांना लाभली नाहीं अशांपैकींच खरेशास्त्रीबुवा हे एक होत. ते कोणत्याहि युनिव्हर्सिटीचे उच्च पदवीधर अथवा फर्डे वकील किंवा बॅरिस्टर होण्याइतकी त्यांची बुद्धिमत्ता होती. आपले रँग्लर परांजपे यांना सुदैवानें प्रो. कर्वे यांच्या उत्तेजनानें विद्येचें निराळें वळण न लागतें तर त्यांचा सर्व बुद्धिचमत्कार वेदांचा जटापाठ किंवा घनपाठ म्हणण्यांतच निदर्शनास आला असता, व निवळ स्मरणशक्ति हेंच त्यांच्या कर्तृत्वाचें परिमाण होऊन बसलें असतें. ही जी गोष्ट रँग्लर परांजपे यांच्यासंबंधीं घडावयाची टळली ती, किंचित् रूपांतरानें, खरेशास्त्री यांच्या बाबतींत प्रत्यक्ष घडून आली असें म्हणतां येईल. एरवीं येवढी बुद्धिमत्ता व एवढी उद्योगप्रियता यांची फलश्रुति एखाद्या मागसलेल्या संस्थानांत मोडकळलेल्या हायस्कूलांतील पंतोजीगिरींत व्हावी या चमत्काराचा ग्रंथ उलगडत नाहीं. खरेशास्त्रीबुवांना सर्व जन्मांत चाळीसपंचेचाळीस रुपयांहून अधिक पगार मिळूं नये व खालसातींत एखाद्या यःकिश्चित् प्राथमिक शिक्षकाला जें पेन्शन मिळूं शकतें त्याच्या निम्म्यानेंहि खरेशास्त्री यांना पेन्शन मिळूं नये ही दुर्दैवानें केलेली त्यांच्या योग्यतेची विटंबनाच होय. तथापि शास्त्रीबुवांच्या स्वभावांत संतोषवृत्ति असून शिवाय संसाराच्या छानछुकीनें मिळणाऱ्या सुखापेक्षां विद्याव्यासंगानें मिळणारें सुख अधिक मानण्याची पात्रता खरोखरच मोठी यामुळें स्वतःच्या स्थितिसंबंधानें त्यांचे तोंडून कोणास कधीं पश्चात्तापाचे किंवा दैन्याचे उद्गार ऐकावयास सांपडले नाहींत.'

शास्त्रीबुवांनीं इतिहाससंशोधनाचें जें काम पंचवीस वर्षें केलें तें इतकें भरीव व सुव्यवस्थित झालेलें आहे कीं कोणत्याहि पिढींतील आंग्लविद्याविभूषित विद्वानाला तें शोभेल व अभिमानास्पद होईल. रा. ब. पारसनीस यांच्याप्रमाणें साधनांची अनुकूलता किंवा राजवाडे यांच्याप्रमाणें पदरीं संसार नसल्यामुळें मिळालेलें संचारस्वातंत्र्य, या दोनहि गोष्टींचा लाभ शास्त्रीबुवांस घडलेला नसतां, या उभय इतिहाससंशोधकांपेक्षांहि त्यांचें संशोधनकार्य अधिक सूत्रबद्ध व व्यवस्थित झालें हें कोणीहि कबूल करील. खरेशास्त्र्यांपेक्षां पारसनीस यांचे संग्रहीं अधिक मातबर

मौल्यवान् कागपदत्र असतील; किंवा राजवाडे यांच्या अंगीं असलेली कल्पनेची भरारी किंवा शीघ्र-ग्रहणशक्ति खरे यांचे अंगीं नसेल. परंतु खरेंच बोलावयाचें तर या उभयतांच्यापेक्षांहि खरेशास्त्री यांचे अंगीं अधिक निकोप अशी विवेचक बुद्धि होती. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या एकंदर ग्रंथप्रसिद्धीमध्यें जी सारासारबुद्धि, प्रमाणबद्धता, शिस्त, पद्धत व वाचकांना आपल्याशीं समरस करण्याची हातोटी होती ती खरोखरच अवर्णनीय होय. पारसनिसांचा ऐतिहासिक साधनसंग्रह पाहून मनुष्याला हेवा वाटेल, आणि राजवाड्यांची संशोधकीय रंगीबेरंगी आतषबाजी पाहून मनुष्य क्षणभर आश्चर्यचकित होऊं शकेल. परंतु ऐतिहासिक चिकित्सक बुद्धीला रुचकर, सहज पचणारें व कायमची पुष्टि देणारें असें खाद्य खरेशास्त्री यांच्या ग्रंथांत जसें मिळतें तसें इतरत्र क्वचितच मिळेल. मोठ्या पायावर लहान इमारत ते रचीत, यामुळें त्यांचीं अनुमानें सहसा अबाधित रहात; व आपल्या ऐतिहासिक माहितीचा ते कधींहि मीनाबझार करून मांडीत नसल्यामुळें त्यांच्या निबंध-प्रबंधांतील प्रमेयें आपल्या आवाक्यांतील आहेत असेंच सर्वांस वाटे.

पटवर्धनी कागदपत्र हा एकच जरी त्यांनीं आपला मुख्य विषय केला होता तरी इतिहासाच्या बहुतेक सर्व अंग-उपांगांत त्यांची गति असे. त्यांनीं प्रसिद्ध केलेला कोणताहि खंड चाळून पाहिल्यास त्यांच्या कामाचा सुबकपणा, सुव्यवस्थितपणा, व उपयुक्तता कोणासहि दिसल्यावांचून राहणार नाहीं. पटवर्धन-घराण्यासंबंधानें तर खरेशास्त्री हे प्रामाण्यतेच्या दृष्टीनें वेदश्रुतीच होऊन बसले होते. पण वाईट येवढेंच वाटतें कीं, ज्या घराण्यांचा लौकिक वाङ्मयद्वारा चिरंतन करण्याचें श्रम खरेशास्त्री यांनीं घेतलें, त्या घराण्यांतील संस्थानिकांनीं, क्वचित्प्रसंगीं त्यांना खैरात म्हणून देणग्या दिल्या असल्या तरी, आपल्या घराण्याचे उपकारकर्ते म्हणून योग्य मान किंवा ग्रंथप्रकाशनास भरपूर द्रव्यसाहाय्य दिलें नाहीं. परंतु परक्याच्या मदतीवर अवलंबून राहणें हा खरेशास्त्री यांचा स्वभावच नव्हता. मिळेल त्या साधनांत निर्वाह करून आपल्या चिकाटीच्या व उद्योगाच्या बळावर संशोधनकार्य सिद्ध करावयाचें हा त्यांचा बाणा होता व तो त्यांनीं आमरण पाळला यांत शंका नाहीं. उपास तर उपास काढून,

पायानें मजला मारून, प्रहरानुप्रहर दप्तरें चिवडून, आपल्या हातानें नकला करून, परगावीं बसून प्रुफें वाचून, व पुढच्या ग्रंथाच्या विक्रीनें छापखानेवाल्याचें मागच्या ग्रंथाचें कर्ज फेडून--तात्पर्य शक्य तितक्या अडचणी सोसून--खरेशास्त्री यांनीं इतके ग्रंथ छापून काढले कीं, पुणें--मुंबईसारख्या विपुल साधन संपन्न शहरीं राहणाऱ्या श्रीमान संशोधकासहि त्यांचा हेवा वाटेल. स्वतः पदवीधर नसतां ज्यांनीं केलेले ग्रंथ युनिव्हार्सिटीच्या अभ्यासक्रमांत प्रमाणभूत मानले व शिकविले जातात, आणि सर्व जन्मभर उदरनिर्वाहाकरितां भांडारकरांचीं संस्कृत पुस्तकें शिकवावीं लागलीं असतां, मराठी इतिहाससंशोधनाच्या मर्यादित क्षेत्रांत कां होईना, पण डॉ. भांडारकर यांसारखी कीर्ति ज्यांनीं मिळविली, त्यांचें उदाहरण कोणत्याहि समाजांत कोणत्याहि पिढीपुढें आदर्शभूत म्हणून ठेवण्यास हरकत नाहीं.

शास्त्रीबुवांच्या निधनानिमित्त दुःखवट्याची सभा मिरज हायस्कूलांत रा. ब. आगाशे यांच्या अध्यक्षतेखालीं विद्यार्थिसंघातर्फें भरली होती. तींत शास्त्रीबुवांचें अर्धवट राहिलेलें ऐतिहासिक लेखसंग्रहाचें कार्य तडीस नेण्याकरितां रा. ब. आगाशे, यशवंत वासुदेव खरे, कृ. गो. रानडे आणि पु. ह. कुर्लेकर यांचें एक मंडळ नेमण्यांत आलें आहे. या मंडळाचे हातून अपुरें राहिलेलें कार्य पूर्ण होवो, अशी आमची सदिच्छा आम्ही प्रकट करतों. तथापि शास्त्रीबुवांच्या मृत्यूमुळें महाराष्ट्राच्या ऐतिहासिक वाङ्मयाच्या अभिवृद्धीला जो जबर धक्का बसला त्याचा दुष्परिणाम सर्वथैव नाहींसा करणें शक्य नाहीं. इतका चतुरस्र, निरलस, मार्मिक, माहितगार आणि निष्ठावंत इतिहाससंशोधक पुनः लाभणें दुर्घटच आहे. तथापि त्यांच्या शिष्यांनीं व चहात्यांनीं त्यांचे आजपर्यंत प्रसिद्ध झालेले लेखसंग्रह विकत घेऊन सक्रिय सहानुभूति दर्शविल्यास बाणभट्टाची अर्धवट राहिलेली कादंबरी जशी त्यांच्या चिरंजिवांनीं पूर्ण केली त्याप्रमाणें शास्त्रीबुवांचें चिरंजीव पुढील खंड प्रसिद्ध करण्याची जबाबदारी स्वशिरावर घेऊन ती पार पाडतील अशी आम्हांस आशा वाटते.

---

## ३६ बेळगांव येथील साहित्य संमेलन

### वारा सुटला पण आग विझली

( केसरी—४ जून १९२९ )

बेळगांव येथील मराठी साहित्य–संमेलन निर्विघ्नपणें पार पडलें ही आम्हांला मोठ्या संतोषाची गोष्ट वाटते. विघ्न आलें असतें तरी त्याला म्हणजे एखाद्या घातपाताचेंच स्वरूप आलें असतें असा अर्थ नाहीं. पण एखाद्या सभेमध्यें किंवा सभेबाहेरहि संभावित मनुष्याचा कोणी कोणत्याहि रीतीनें अपमान करणें हें एक प्रकारचें विघ्नच होय. आणि असा कोणताहि प्रकार साहित्य-संमेलनाच्या प्रसंगीं बेळगांवास घडला असता तर बेळगांवकरांनीं तो आपल्या अब्रूला कमीपणाच मानला असता. पण स्वतः बेळगांवकरांनीं तर असा प्रकार घडूं देणार नाहीं असा मनाशीं निर्धार केला होताच, पण सुदैवानें धारवाड बागलकोटकडील कट्टर कर्नाटकी लोकहि वेळींच मनाशीं उमजले होते कीं, भलतेंसलतें कांहीं करावयास बेळगांवीं गेल्यास उलट आपलीच शोभा व अप्रतिष्ठा नगराभिमानी बेळगांवकरांकडून झाल्याशिवाय राहणार नाहीं. कसेंहि असो. प्रारंभापासून अखेरपर्यंत साहित्यसंमेलन निर्विघ्नपणें पार पडलें. आणि तें अशा रीतीनें पार पडणें हाच बाहेरगांवच्या लोकांच्या दृष्टीनें संमेलनाचा यशस्वीपणा ठरत आहे. कारण बेळगांवास संमेलनप्रसंगीं काय काय अनिष्ट गोष्टी घडणार याविषयीं केवळ भविष्य नव्हे पण निदान कल्पनाचित्र त्यांनीं रंगवून मनाशीं ठेवावें इतका बोभाटा, कट्टर कर्नाटकी लोकांच्या तामस गुणाचा, वर्तमानपत्रांवरून व लोकवार्तेवरून झाला होता. संमेलनाच्या या यशाबद्दल आम्ही बेळगांव येथील महाराष्ट्रीय व विशेषतः कानडी पुढाऱ्यांचें अभिनंदन करतों.

पण अशा रीतीनें संमेलन निर्विघ्नपणें पार पडलें तरी संमेलनाचे परिणाम मागें कोणते राहणार हा एक प्रश्न होताच. कारण संमेलनाचे पाहुणे घरोघर परत गेले, आणि नंतर मागें बेळगांवांतील किंवा कर्नाटकांतील महाराष्ट्रीय व कानडी जनता आणि पुढारी यांच्यांतील भेदभाव किंवा तेढ पूर्वींहून अधिक वाढली, तर हें संमेलन बेळगांवास मुळींच न भरतें

तरी बरें होतें असें शांततावादी सामोपचारवादी लोकांना वाटणें स्वाभाविक होतें. पण सुदैवानें ही तेढ वाढण्याऐवजीं उलट, पूर्वी असलेली तेढच थोडीशी कमी होण्याचा परिणाम या संमेलनानें घडवून आणला असें आतां म्हणतां येईल. केवळ हक्काच्या दृष्टीनें पाहतां, कांहींहि परिणाम झाला तरी, बेळगांव शहरांतील महाराष्ट्रीयांना हें संमेलन तेथें बोलावण्याचा आणि बाहेरच्या महाराष्ट्रीयांना बेळगांवास जाऊन तें भरविण्याचा हक्क होता. आणि एकदां हक्क बजावणीच्या दृष्टीनेंच पहावयाचें ठरल्यावर मग संभावितांच्या अपमानाचें विघ्नच काय पण घातपाताचा संभव पत्करूनहि हें संमेलन भरविणें जरूर आहे असें म्हणतां आलें असतें. हिंदु-मुसलमानांचा द्वेष इतक्या परमावधीला गेला असतांहि जर ताबुताचा किंवा बकरईदचा सण पाळूं नका असें मुसलमानांना कोणी म्हणूं शकत नाहीं, किंवा गणपत्युत्सवाच्या मिरवणुकी अथवा पालख्यांचे इतर समारंभ पार पाडण्याला हिंदू कंबर बांधतात, तर बेळगांवास मराठी साहित्यसंमेलन भरवूं नका असें कोण म्हणूं शकतो ? किंवा कोणी तसें म्हटलें असतें तरी त्याचें कोण ऐकतो ?

पण एक तर कर्नाटकी व महाराष्ट्रीय लोकांत तेढ उत्पन्न झाली असली तरी तिला हिंदु-मुसलमानांतील द्वेषाची उपमा देण्याइतक्या पराकाष्ठेला ती केव्हांहि पोंचली नव्हती. म्हणून अनिष्ट टाळणें शक्यच नाहीं अशी खात्री वाटली असती तर, बेळगांव येथील महाराष्ट्रीयांनीं कदाचित् हें संमेलनच नको असें म्हणून माघार घेऊनहि समंजसपणा दाखविला असता. त्याचप्रमाणें संमेलन भरून कर्नाटकाचीच काय हानि व्हावयाची असेल ती होऊं द्या, पण आपण संमेलनाला विरोध केला असला दुर्लौकिक नको, असें धोरण कर्नाटकांतील कट्टरांनींहि अखेर स्वीकारून आपला समंजसपणा व्यक्त केला असता, इतका या उभय जनतेच्या पुढाऱ्यांच्या राष्ट्रीय भावनेवर आमचा दृढविश्वास आहे. पण श्री. गंगाधरराव देशपांडे व श्री. दत्तोपंत बेळवी अशांकडून वेळींच झालेल्या प्रयत्नांमुळें, यांपैकीं कोणाच्याच राष्ट्रीय बुद्धीचें सत्त्व पाहण्याची वेळ आली नाहीं. आणि बेळगांवच्या महाराष्ट्रीयांना "आपण आपला हक्क यथान्याय तितकाच बजावीत आहों" आणि कर्नाटकीय पुढाऱ्यांनाहि "आपल्या न्याय्य हक्कांना कोणत्याहि प्रकारें बाध येण्याची भीति नाहीं" अशा खात्रीनें

उत्पन्न झालेल्या शांत मनोभावनेच्या स्थितींतच हें संमेलन भरविण्याचा संकेत व तयारी झाली. शिवाय प्रत्यक्ष संमेलनांतहि ही भावना स्थिर व दृढ होण्यासारख्याच गोष्टी घडून आल्या.

मराठी साहित्यसंमेलन बेळगांवास भरण्याचा विचार बेळगांव येथील कांहीं मराठी वाङ्मयप्रेमी लोकांनीं केला असें कळतांच, त्याला विरोध करण्याकरितां कर्नाटकांतून कांहीं लोक ग्वाल्हेरीस गेले. तेथें त्यांनीं बेळगांवकरांच्या निमंत्रणास प्रतिकूलता दर्शविली. कर्नाटक प्रां. कॉं. कमिटीच्या वतीनेंहि ग्वाल्हेरीस विरोधी तार पाठविण्यांत आली. अखेर संमेलन बेळगांव येथें भरण्याचें निश्चित झाल्यापासून कर्नाटकांतील सर्व वर्तमानपत्रांनीं व व्यक्तिशः कांहीं पुढाऱ्यांनीं संमेलनावर व महाराष्ट्रावर बेसुमार टीकांचे हल्ले सुरू केले. आणि संमेलनाच्या प्रसंगीं विघ्नें येणार अशी कांहीं लोकांना धास्ती वाटूं लागली. या सर्वांला कारण एकच. तें असें कीं या संमेलनाच्या निमित्तानें महाराष्ट्र हा कर्नाटकावरील अतिक्रमणाचा आणखी एक वेढा वळणार. पण ही भीति सर्वस्वी निराधार आहे अशी बेळगांवच्या देशपांडे बेळवी प्रभृति कर्नाटकाभिमानी पुढाऱ्यांना पुरी माहिती व खात्री असल्यानें, तसेंच संमेलन बोलावणाऱ्या बेळगांवकर महाराष्ट्रीयांचाहि असला हेतु नसल्यानें, उभयतांची सहजच एकवाक्यता झाली. आणि संमेलनासाठीं स्वागतमंडळ बनविण्याकरितां बेळगांवास जी पहिलीच जाहीर सभा ना. बेळवी यांच्या अध्यक्षतेखालीं ता. ३ जून १९२८ रोजीं भरली तींत जो ठराव करण्यांत आला तो असा:—

"सन १९२९ सालामध्यें म. सा. संमेलनाची जी बैठक बेळगांवीं बोलावण्यांत आली आहे ती बोलावणारांचा उद्देश मराठी साहित्यसंवर्धन हाच असून त्यांना भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाशीं कांहीं कर्तव्य नाहीं, व हें निमंत्रण सर्व बेळगांव जिल्ह्यातर्फे नसून मराठी भाषेविषयीं प्रेम असणाऱ्या बेळगांव जिल्ह्यांतील लोकांतर्फेच आहे; असें आजची सभा स्पष्ट जाहीर करीत आहे." हा ठराव ना. बेळवींच्या सूचनेवरून श्री. दळवींनीं मांडला व त्यास डॉ. साठे यांनीं अनुमोदन दिलें. गंगाधरराव देशपांडे यांनींहि त्या ठरावास पुष्टि दिली व तो बहुमतानें पास झाला. या ठरावांत 'कर्नाटकीयांच्या समजुतीकरितां हा ठराव करण्यांत येत

आहे. अशा आशयाचे शब्द जोडावे असें श्री. मोरोपंत मराठे यांनीं सुचविलें होतें. पण त्यांची ती सूचना नापास झाली. वरील ठरावानें पुष्कळसा गैरसमज आपोआप दूर झाला. व त्यामुळें किंबहुना त्याच्या आधींपासूनच, वस्तुस्थिति माहीत असल्यानें, बेळगांव शहराच्या कांहीं समंजस कर्नाटकी पुढाऱ्यांनीं स्वागतमंडळाचे सभासद होऊन वर्गण्या दिल्या.

तथापि बेळगांवाबाहेरील धारवाड बागलकोट इत्यादि तीव्र कर्नाटकीय लोकमताच्या प्रमुख केंद्रांचे ठिकाणीं संमेलनाविरुद्ध चळवळ चालू राहिली. तिला आळा बसण्याचें कांहीं काम बेळगांव येथें अखिल कर्नाटक परिषदप्रसंगीं झालें. तो प्रकार प्रसिद्ध आहे व तो असा. महाराष्ट्राच्या अतिक्रमणबुद्धीचा इनकार करून, कर्नाटकाच्या भीतीचा परिहार करून, उभय समाजांतील संबंधाचें स्पष्टीकरण करण्याकरितां श्री. गंगाधरराव देशपांडे यांनीं अशा आशयाचा ठराव विषयनियामक मंडळापुढें मांडला कीं 'बेळगांव हा कर्नाटकाचा एक भाग आहे व तेथील सार्वजनिक स्वरूपाचें सर्व काम कानडींतून चालण्यास हरकत नाहीं. असा ठराव बेळगांव येथें भरणाऱ्या येत्या मराठी साहित्यसंमेलनांत पास करून घ्यावा.'

हा ठराव विषयनियामक मंडळानें एकमतानें मंजूर केला.परंतु दुसरे दिवशीं मुख्य परिषदेपुढें तो मांडण्याला देशपांडे उभे राहिले, तेव्हां कांहीं फाजील कर्नाटकी पोरासोरांनीं गोंधळ करून त्यांना बोलूंच दिलें नाहीं. यामुळें तो ठराव तसाच दप्तरीं राहिला ! या अत्याचाराचा निषेध सर्व जबाबदार कर्नाटकीय पुढाऱ्यांनीं एकमुखानें केला व दुसरे दिवशीं देशपांडे यांचें भाषणहि मुद्दाम करविलें. तथापि स्वतः महाराष्ट्र-साहित्यसंमेलन काय धोरण स्वीकारणार हें पाहावयाचें राहिलेंच होतें. म्हणून त्या धोरणांतहि कर्नाटकाला भीतिप्रद असें कांहींएक नाहीं हें सिद्ध करण्याकरितां संमेलनाच्या विषयनियामक मंडळापुढें श्री. केळकर यांनीं देशपांडे व बेळवी यांच्या संमतीनें खालील ठरावाचा मसुदा मांडिला.

"हल्लीं कर्नाटकामध्यें कानडी–मराठीचा जो वाद उत्पन्न झाला आहे, तो सर्व दृष्टींनीं अत्यंत अनिष्ट असून, तो शक्य तितका लवकर मिटविला जाणें हें उभय पक्षींहि अतिशय जरूरीचें आहे असें या संमेलनाचें मत आहे. म्हणून त्या हेतूनें असें ठरविण्यांत येत आहे कीं:—

१ बेळगांव जिल्हा हा कर्नाटकाचा एक भाग आहे व या जिल्ह्यांत कानडी ही प्रमुख म्हणजे बहुसंख्याकांची भाषा आहे.

२ म्हणून या जिल्ह्यांतील महाराष्ट्रीयांनीं या भाषेस या जिल्ह्यांतील प्रमुख भाषा या नात्यानें योग्य तो मान द्यावा.

३ त्याबरोबरच या जिल्ह्यांतील कर्नाटकीय लोकांनीं मराठी ही भ्रातृभाषा या नात्यानें तिलाहि योग्य तो मान व या जिल्ह्यांतील अल्पसंख्याकांची ती भाषा म्हणून योग्य व अवश्य तें तिला संरक्षण द्यावें.

वर कलम २ व ३ यांत नमूद केलेल्या तत्त्वांचें प्रतिपादन कर्नाटक साहित्यसंमेलनानेंहि आपल्या ठरावांच्या द्वारानें करून कर्नाटक व महाराष्ट्र यांच्यामधील सलोखा कायम टिकविण्याला मदत करावी अशी या संमेलनाची इच्छा आहे. ”

या ठरावावर आणि त्यांतल्या त्यांत कलम ( १ ) वर दोन दिवस एकसारखा वाद चालू होता. आणि अखेर अध्यक्षांनीं कांहीं लोकांच्या मागणीवरून, कलम ( १ ) हें संमेलनाच्या प्रत्यक्ष कार्यक्षेत्रांत पडण्यासारखें नाहीं म्हणून नियमबाह्य आहे असें ठरविलें. अशा रीतीनें कलम ( १ ) हें निघून गेल्यावर, उरलेलीं कलमें २ व ३ हीं, आपल्यापुरतीं जरी तीं योग्यच होतीं तरी, मूळ ठराव मांडणारांच्या दृष्टीनें त्यांच्या हेतूला तीं अपुरीं पडणारीं होतीं म्हणून, अशा अर्धवट व अपूर्ण ठरावाला आम्ही संमति देऊं शकत नाहीं असें केळकर, बेळवी, देशपांडे व खापर्डे यांनीं सांगितलें. तथापि तीं दोन कलमें, कांहीं शाब्दिक फेरफार करून, संमेलनानें मंजूर केलीं. त्या दोन कलमांत म्हटल्या प्रमाणें उभय पक्षीं वर्तन झालें तरीहि हा अप्रिय वाद मिटण्याला हरकत नाहीं. कलम ( १ ) हें अध्यक्षांनीं नियमबाह्य ठरविलें याचें कारण मराठी-साहित्यसंमेलनाला कॉंग्रेसच्या प्रांतरचनेशीं प्रत्यक्ष कांहीं कर्तव्य नाहीं; तें आज आहे तसें राहो किंवा बदलो. परंतु हें कलम आपल्या ठरावांत समाविष्ट करण्याला वरील त्रिवर्गाला कारण इतकेंच कीं, कर्नाटकीय लोकांनीं जी नसती भीति उराशीं बाळगून ठेविली आहे ती नाहींशी होण्याला त्या कलमांतल्या सारखे स्पष्ट उद्गार महाराष्ट्रीयांकडून निघणें अवश्य होतें. प्रांतरचना हा विषय जरी भाषा-संमेलनाच्या कार्यक्षेत्रांत पडत नसला तरी इतकें सूक्ष्म व कांटेकोर पाहून चालत नाहीं, आणि ज्या अर्थीं या संमेलनामुळेंच हा वाद पुनः

उपस्थित झाला त्याअर्थी या संमेलनांतच त्या वादाचें निराकरण होणें श्रेयस्कर होतें. तथापि अशा गोष्टींत प्रत्येकाची पाहाण्याची दृष्टि वेगळी असते. नियोजित संमेलन भरविलें जावें व तें निर्विघ्नपणें पार पडावें अशाविषयीं उभय पक्षांशीं बोलूनचालून ज्यांनीं एक प्रकारें विशिष्ट जबाबदारी पत्करली होती त्यांच्या दृष्टीनें कलम (१) हें अवश्यच होतें. पण ज्यांच्यावर अशा प्रकारची कोणतीहि जबाबदारी नव्हती, व उभय प्रांतांत सलोखा राहावा अशी मनांतून इच्छा असली तरी संमेलनांत ठराव कोणता व्हावा कोणता न व्हावा याविषयींच्या आपल्या कांटेकोर मताला मुरड घालण्याचें ज्यांना कारण नव्हतें अशांनीं कलम (१) ला हरकत घ्यावी हें स्वाभाविकच आहे. आणि उभय पक्षांची ही मनःस्थिति परस्परांना चांगली ठाऊक होती म्हणूनच कलम (१) वगळून व बाकीचीं ठेवून संमेलनानें बहुमतानें ठराव मंजूर केला तरी त्याबद्दल कोणी कोणावर रागावले रुसले नाहीं. सर्व गोष्टी प्रामाणिक मतानुसारच घडल्या. तसेंच संमेलनानंतर जे दोनतीन खुलासे म्हणून ताबडतोब प्रसिद्ध झाले त्यावरून देखील, ठराव कोणत्याहि स्वरूपांत मंजूर झाले तरी, बेबनाव असा मुळींच उरला नाहीं. अपेक्षेप्रमाणें कर्नाटक व महाराष्ट्र यांतील जनतेच्या दिलजमाईचें कार्य यशस्वी झालें असेंच दिसून आलें.

तारीख २९ मे रोजीं केळकर, बेळवी, देशपांडे व गुंजाळ यांनीं प्रसिद्ध केलेल्या खुलाशांत वरील गृहस्थांनीं कलम (१) हें आपणास कां पाहिजे होतें याचें स्पष्टीकरण केलें आहे. परंतु शेवटीं असेंहि म्हटलें आहे कीं, "अध्यक्ष व इतर सभासद यांनाहि मतस्वातंत्र्याचा अधिकार आहेच व त्यांनीं आम्हाप्रमाणेंच जें केलें तें प्रामाणिकपणानें व खऱ्या बुद्धीनें केलें असेंच आमचें मत आहे." पण याहून महत्त्वाची गोष्ट ही कीं, संमेलनाचे अध्यक्ष श्रीयुत परांजपे यांनीं वरील ठरावांतील कलम (१) हें संमेलनापुरतें अग्राह्य मानलें तरी त्यांतील आशय व्यक्तिशः त्यांना अमान्य नव्हता, आणि ही गोष्ट त्यांनीं व इतर पांचपंचवीस महाराष्ट्रीय गृहस्थांनीं स्वतःचा वेगळा खुलासा प्रसिद्ध करून स्पष्ट केली. त्यांत असें म्हटलें आहे कीं, "कॅांग्रेसनें ठरविलेल्या हल्लींच्या विभागणीप्रमाणें कर्नाटक प्रांतांत बेळगांव जिल्हा समाविष्ट होत असल्याचें आम्हास केव्हांहि अमान्य

नव्हतें व नाहीं. ” आणि शेवटीं या दोन्ही खुलाशांना उद्देशून, व ते जमेस धरून बेळगांव येथील कर्नाटकाभिमानी अशा १७ प्रमुख लोकांनीं आपलाहि एक खुलासा ताबडतोब प्रसिद्ध केला. त्याचा आशय असा कीं, “ वरील दोनहि खुलाशांत उभय प्रांतांतील प्रेम वृद्धिंगत करण्याची भावना उघड आहे व तिला आम्हीहि उलट मान्यता देतों. आणि मराठी साहित्यसंमेलनांतून झालेले ठराव व त्यानंतर प्रसिद्ध झालेले खुलासे हे सर्व लक्षांत घेऊन, हा कानडी--मराठीचा अप्रिय वाद आम्हापुरता तरी संपला आहे, व इतर कानडी मराठी जनतेनेंहि तो संपवावा अशी आमची आग्रहाची विनंति आहे. ”

असो. अशा रीतीनें संमेलनाचा शेवट गोड झाला. किंबहुना या संमेलनाविषयीं साशंक असणाऱ्या लोकांना आतां ‘ अपकृतापि उपकृत-मनेन ’ असेंहि म्हणतां येण्यासारखें आहे. कारण संमेलनापूर्वी कांहीं गुप्त व कांहीं प्रगट रूपानें धुमसत असलेला हा वाद संमेलनाच्या प्रसंगानें तीव्र स्वरूपांत प्रगट झाला, आणि त्या संमेलनप्रसंगानेंच तो अखेर पूर्णपणें शमविण्यास मदत केली, ही गोष्ट उभय प्रांतांतील पुढाऱ्यांना भूषणास्पद आहे. पण त्याचें खरें श्रेय, त्यांतल्या त्यांत बेळगांव शहरांतील ज्या मराठी वाङ्मयाभिमानी व वाङ्मयप्रेमी महाराष्ट्रीय तरुणांनीं हें संमेलन भरविण्याची मूळ कल्पना काढली व ती चिकाटीनें व धैर्यानें तडीस नेली, त्यांनाच आम्ही देऊं इच्छितों. आम्हाला आशा वाटते कीं बेळ-गांव येथील कर्नाटकाभिमानी पुढाऱ्यांनीं प्रसिद्ध केलेल्या हस्तपत्रकाचा प्रसार सर्व कर्नाटकभर होऊन, त्यांत विनंति केल्याप्रमाणें बेळगांव शहरा-बाहेरचे म्हणजे अखिल कर्नाटकांतील पुढारी ‘ हा वाद संपला ’ असें आपल्या जनतेला सांगतील, व महाराष्ट्रासंबंधीं आलेली नसती शंका मनांतून दूर करून, आपण योजलेल्या कर्नाटक प्रांताच्या एकीकरणाच्या व कानडी भाषेच्या अभिवृद्धीच्या उद्योगाला ते विश्रब्ध मनानें झटून लागतील.

---

# ३७ महाराष्ट्राच्या बौद्धिक जीवनाचा प्रश्न

( साप्ताहिक सकाळ-१४ नोव्हेंबर १९३३ )

'स्वतंत्रपणें अवलोकनपूर्वक अध्ययन व विचार करून, व्यासंगपूर्वक ग्रंथरचना करणारे अभ्यासक आपल्या समाजांत थोडे सांपडतात. याला कारण आपल्या अभ्यासकांचें दारिद्र्य असें पुष्कळ सांगतात व त्यांत थोडासा सत्यांश आहे तरी तें पुरेसें समर्पक कारण नाहीं. मी विलाय-यतेंत कांहीं प्रोफेसरांचें जीवन पाहिलें आहे. अशा बाबतींत तुलना करणें कांहींसें कठीण असलें तरी, त्यांच्या पैकीं पुष्कळ प्रोफेसरांचें जीवन इक-डील प्रोफेसरांच्या जीवनाहून अधिक श्रीमंतीचें आहे असें म्हणतां येणार नाहीं. मात्र त्यांच्या व इकडील प्रोफेसरांच्या व्यासंगांत पुष्कळच फरक दृष्टीस पडतो हें निर्विवाद आहे. याचें एक कारण असें कीं त्यांच्यापुढें मोठें ध्येय व मोठीं माणसें सारखीं वावरत असतात. त्यामुळें आपल्या बौद्धिक ठेंगूपणाची त्यांची जाणीव जागृत रहाते. पुढें जाण्याची ईर्षा कायम रहाते. आपल्या समाजांत आजन्म बौद्धिक व्यासंग करणारे जे काय थोडेबहुत लोक आहेत त्यांचा व प्राथमिक अभ्यासकांचा निकट परिचय येण्याचे प्रसंग वारंवार येतील तर तें फार उपयुक्त होईल. या योगानें उच्च ध्येय, व बौद्धिक उंचीचीं माणसें यांचें उदाहरण, तरुणपिढीच्या डोळ्यांसमोर राहील. अशा प्रकारच्या एका विद्यमान गृहस्थाचें सहज सुचलेलें म्हणून चिंतामणराव वैद्यांचें उदाहरण सांगण्या-सारखें आहे.

### व्यासंगाचीं साधनें

'आपल्याकडे व्यासंगाचीं साधनें कमी किंवा तुटपुंजीं आहेत हें खरें नाहीं काय?' प्रतिनीधीनें विचारलें. रा. केळकर म्हणाले--आपल्या व्यासंगाच्या साधनांची पाश्चात्य साधनांशीं कधींच बरोबरी करतां येणार नाहीं हें खरें असलें तरी, साधनांची दुर्मिळता ही आज पुण्यांत तरी अडचण राहिलेली नाहीं. सर्व्हंटस् ऑफ् इंडिया सोसायटी, केसरी कचेरी, फर्ग्युसन व सर परशुरामभाऊ हीं कॉलेजें यांचे ग्रंथसंग्रह कांहीं कमी मौल्यवान नाहींत. अलीकडे तत्वज्ञान या विषयावर कांहीं लिहावें म्हणून

मधून मधून माझें वाचन चालू आहे. त्यासाठीं नुकताच मी फर्ग्यूसन कॉलेजांत गेलों व तेथील तत्वज्ञान विषयाचा ग्रंथसंग्रह पाहिला, तों तेथें तत्वज्ञानावर आधारभूत अशीं कमी अधिक हजार पांचशें पुस्तकें मला आढळलीं. वाचणारा वाचील तरी किती! त्यांतून एकाद दुसरें पुस्तक तेथें नसलें तर अभ्यासकानें मागितल्यास तें विकत आणवून देण्याची सोयहि या सर्व संस्था हौसेनें करतील. तीस वर्षांपूर्वी ग्रंथांच्या बाबतींत जी दुर्मिळता होती ती आज नाहीं. मी आयर्लंडचा इतिहास हें पुस्तक मुख्यतः सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीच्या लायब्ररींत वाचन करून घरीं लिहिलें; व ग्यारिबाल्डीचें चरित्र लिहिण्यापुरतीं पुस्तकें सातारा व पुणें. ने. ज. लायब्ररींत मिळालीं. सारांश काय कीं, आज मुम्बईच्या खालोखाल पुण्यांत तरी अभ्यासकास व्यासंगांच्या साधनांची वाण आहे असें म्हणतां येणार नाहीं.

## ग्रंथलेखनाची माहिती

'आपण आपले ग्रंथ कसकसे लिहिले याची माहिती सांगाल काय? विचारण्याचा हेतू असा कीं, सार्वजनिक चळवळीच्या ऐन भाऊगर्दींत आपणांस बौद्धिक व्यासंगांस फुरसत कशी मिळाली हें कळावें.' प्रतिनिधीनें विचारलें.

—"मी लिहिलेल्या पुस्तकांत निरनिराळीं पुस्तकें निरनिराळ्या कारणांनीं लिहिलीं गेलीं. कांहीं प्रसंग साधण्याच्या उद्देशानें, तर कांहीं वर्तमानपत्राच्या व्यासंगांत लोकांपुढें मांडावयास बरा विषय आहे या उद्देशानें, तर कांहीं कर्तव्य व जबाबदारी म्हणून, तर कांहीं निव्वळ

## बौद्धिक व्यासंगाच्या आवडीनें

म्हणून लिहिलेलीं आहेत. माझें 'मराठे व इंग्रज' हें पुस्तक इ. स. १९१८ सालचें मराठी राज्याचें शतसांवत्सरिक वाङ्मयश्राद्ध साधण्याच्या उद्देशानें मी लिहिलें त्यावेळीं मी केसरीचा संपादक होतों. मराठ्यांत प्रसंगानुसार लिहीतच असें. व होमरूल लीगची चळवळ धडाक्यानें चालू असतां त्याची बरीचशी जबाबदारी उरकण्याचें काम मजकडेच होतें. विलायतेस जाण्याचाहि संभव होता. अशा ऐन गर्दीमध्यें हें पुस्तक लिहिण्याचें काम उरकावें लागलें म्हणून त्यावेळीं कामाच्या गर्दीतून फुरसत सांपडली कीं पुरें, तेवढीच संधि साधून मी तें लिहि-

ण्याचें काम पुरें केलें. आयर्लंडावरील पुस्तक, एकीकडे आयर्लंडमध्यें होमरूलची चळवळ जोरांत चालू असून हिंदुस्थानांत बंगाली क्रांतिकारांचा जोर नुकताच सुरू झाला असतां लिहिलें गेलें. त्यावेळीं डॉ. रासबिहार घोष हे कौन्सिलांत म्हणाले कीं, 'हिंदुस्थान हें आयर्लंड होईल.' या वाक्यावरून

## मला विचार सुचला

हिंदी राजकारणाची चळवळ डोळ्यापुढें ठेवून आयरिश स्वातंत्र्याच्या झगड्याचा इतिहास केसरींत एका मागून एक लेखांक रूपानें लिहून काढला, उरलेला स्वतंत्ररीतीनें लिहिला; व त्या सर्वांचें मिळून पुस्तक काढलें. माझ्या नाटकांपैकीं दोन म्हणजे 'तोतयाचें बंड' व 'चंद्रगुप्त' हीं केवळ नाटक लिहिण्याच्या हौसेनें लिहिलीं; व त्या पुढील नाटकें मुख्यतः धंदेवाईक दृष्टीनें लिहिलीं. लोकमान्य टिळकांचें चरित्र हें अर्थातच आवश्यक कर्तव्य व जबाबदारी यांच्या जाणीवेनें लिहिलें. सुभाषित व विनोद राजशास्त्र व मराठी वाङ्मयावरील इतर लिखाण हें पुष्कळसें केवळ व्यासंगाच्या आवडीनेंच लिहिलें गेलें. त्यांतील सुभाषित व विनोद हें पुस्तक तर मी विषय वाचीत गेलों व मला समजला तसतसा लिहित गेलों. आतां त्याची पुष्कळच बदललेली अशी आवृत्ती काढावी लागेल. कारण त्यांतील कितीतरी विचार मला आतां बदलावेसे किंवा वेगळ्या रीतीनें मांडावेसे वाटतात. माझ्या लेखनासंबंधीं मला एक सूचना द्यावीशी वाटते ती ही कीं, माझी

## ग्रन्थलेखनाची भूमिका

एकांगी तज्ज्ञाची नाहीं, तर सर्वांगीण अभ्यासकाची आहे. आपणांस समजलेला विषय दुसऱ्यास समजावून सांगणाराचीहि आहे."

श्री. तात्यासाहेब पुढें म्हणाले :—

"आपण वाचीत असतां टिपणें करून ठेवण्याची फार आवश्यकता आहे. पडल्या पडल्या सहज वाचण्यावर माझा विश्वास नाहीं; अशा वेळीं कादंबऱ्या हव्या तर वाचाव्या, गंभीर ग्रंथांचें वाचन हें असें सैल असतां उपयोगी नाहीं. तें पक्कें करण्यासाठीं टिपणें केलींच पाहिजेत. गेल्या पंचवीस वर्षांत मी पुष्कळ व्याख्यानें दिलीं असतील, पण माझें असें व्याख्यान नाहीं कीं ज्यांचीं मीं पूर्वी त्रोटक मुद्यांचीं टिपणें केलीं नाहींत.

आपल्या व्यासंगाच्या ग्रंथोपयोगी विषयांचीं टिपणें मात्र नुसतीं आपापल्यास समजण्याजोगीं करूं नयेत तर त्यांच्या वाचनानें आपापल्यांस समजलेले विषय-संदर्भ दुसऱ्यासहि कळावे हा उद्देश ठेवावा. या योगानें दुसऱ्याचा तर फायदा होतोच, पण आपल्याहि विचारांतील अंधुक संदिग्धता नाहींशी होऊन त्यास रेखीव नेमकेपणा येतो. बरीचशी ग्रंथनिष्पत्ती ही अशामुळें होते.'

'आपल्याकडे ग्रंथ लिहून झाला तरी तो प्रकाशनाच्या मर्गात अडचणी आहेत हें खरें ना?' प्रतिनिधीनें विचारलें. केळकर म्हणाले—"होय, पण ग्रंथाच्या ऐवजीं एकाद्यानें लेख किंवा लेखमाला रूपानें आपल्या व्यासंगाचा फायदा समाजाला द्यावयाचें ठरविलें तर असे लेख प्रसिद्ध करूं इच्छिणारीं वर्तमानपत्रें निदान आज तरी थोडीं नाहींत. पुण्यांत आज कांहीं नाहीं, तरी

## पन्नासावर प्रोफेसर्स

असतील व ते विद्यार्थ्यांना एकच एक विषय शिकवितात. ज्ञानाच्या त्यांच्या शाखेंत त्या सालांत नवीन उत्पन्न झालेले ग्रंथ व विचार यांशीं त्यांचा परिचय असतो. निदान असावयास तरी पाहिजे. अशा अध्यापकांनीं, जर गेल्या वर्षांत त्यांच्या ज्ञानाच्या शाखेंत तयार झालेल्या ग्रंथांचा व विचारांचा मराठी वाचकांस परिचय करून देण्यासाठीं वर्षांतून दोन तीन लेख किंवा लेखमाला लिहिली तर ती त्यांच्या नांवाखालीं छापतां येईल. त्यांना त्याचा मोबदला देतां येईल. वर्षभर अनेकांची मिळून झालेली व विविध अशी लेखमाला चालू राहील. मराठी वाचकांचा फायदा होईल. यापैकीं कोणा एखाद्या लेखकाला भारी किंमतीच्या एकाद्या पुस्तकाची जरूर लागली तर ती दूर करणें अशक्य नाहीं. मी एकदां सवडीनें ही योजना पुण्यांतील प्रोफेसरांच्या पुढें मांडणार आहें. या कामासाठीं पन्नासजण पुढें न आले तरी निदान दहावीस तरी पुढें येतील अशी मला आशा आहे.

प्रति:—'आपल्या म्हणण्याचा सारांश म्हणून मी पुढील शब्दांत मांडतों. "उच्च ध्येय नजरेसमोर असावें, व्यासंगी माणसांचा वारंवार सहवास घडून यावा, व जें कांहीं वाचलें त्याचीं सुबोध भाषेंत टिपणें करून ठेवण्याची संवय असावी?"

## स्वयंस्फूर्तीच खरी

श्री. तात्यासाहेबः-- 'होय, हें तर पाहिजेच, आणखी समाजांत कोणी तरी आपल्या अभ्यासकांना नेट लावून हें काम उरकून घेणारा मार्ग-दर्शकही हवा. याचें मी एकच उदाहरण देतों. कै. महादेव मल्हार जोशी यांना मी विनंती केल्यावरून त्यांनीं केसरींत ' आधुनिक सुशिक्षितांचा वेदांत ' या विषयावर एक सुंदर लेखमाला लिहिली. त्याबरोबरच हें खरें आहे कीं, ज्याला त्याला व्यक्तिशः आवडही पाहिजेच. दुसऱ्यांनीं सांगून किंवा दुसऱ्यांचें पाहून कोण किती करूं शकणार? वेदांताप्रमाणें साहित्यांतहि असें म्हणावेंसें वाटतें कीं, गुरू हा इच्छा असेल त्यालाच भेटतो. तो दूर नसतो हें खरें, पण गुरूला भेटण्याची तळमळ असल्यावांचून सर्व व्यर्थ आहे. माझें ग्रंथलेखन आजहि चालूं आहे, ग्रंथ लेखनानें मला मिळाली याहून कोणती अधिक किर्ती मिळणार आहे? किंवा अधिक द्रव्यलाभ तरी कोणता? पण बौद्धिक व्यासंगावांचून करमत नाहीं हेंच ग्रंथलेखनाचें कारण. अशा प्रकारें बौद्धिक व्यासंग करणारा इसम सार्वजनिक चळवळींत व सार्वजनिक चळवळ करणारा बौद्धिक व्यासंगांत अधिकच उपयुक्त ठरतो. कारण त्यांचा उभयविधी उद्योग परस्परांस साह्यभूत होत असतो."

## नवीन प्रश्नांची चर्चा

प्रतिः-- "समाजांत भविष्यकाळांत सोडविण्याजोगे प्रश्न कोणते आहेत हें विद्यमान माहिती जमा करून त्यावरून अनुमानें काढून ठरविण्याजोगें नाहीं का?"

श्री. तात्यासाहेब केळकर :-- 'अशा रीतीनें सामाजिक अवलोकनानें पुरावा गोळा करून अभ्यास करण्याची अलीकडे पद्धत सुरूं झालेली आहे. ती फार चांगली आहे, पण मी त्या पिढींत व त्या विचारांत वाढलेला मनुष्य नाहीं. मी स्वतःला संशोधक असें समजत नाहीं. मात्र अशा संशोधनाची आज आपल्याला फार जरुरी आहे; व ज्ञानाच्या मार्गातील पुढील पाऊल टाकतांना बहुधा अशा संशोधनाची यापुढें विशेष जरूर लागेल असें मला दिसत आहे.

## अभ्यासू जीवनाच्या अडचणी

प्रतिः-- ' महाराष्ट्रांत बौद्धिक जीवनाच्या मार्गांत विशेष अडचणी कांहीं आहेत काय? '

उत्तर:– होय. आपल्याकडील प्रोफेसर किंवा संशोधक अशा लोकांना स्वतंत्र राहून व्यासंग चालू ठेवून संशोधन वगैरे करण्यास लागणारा पगार देऊन, फुकट पण विद्येच्या अभिलाषानें त्यांना पदरीं संभाळणाऱ्या ज्या संस्था लागतात त्या महाराष्ट्राच्या दारिद्र्यामुळें निर्माण होऊं शकत नाहींत. महाराष्ट्र कोणत्याहि प्रांतापेक्षां कमी बुद्धिवान नाहीं. पण त्यांत जे थोडे उच्च दर्जाचे बुद्धिमान निपजतात, त्यांना खरें स्वास्थ्य असें लाभवून देऊन केवळ विद्येचेंच काम करून घेणारी एकही संस्था महाराष्ट्रांत नाहीं यामुळें महाराष्ट्रांतील जे बुद्धिमान पुरुष युरोपांतील विद्यापीठांतही नांव मिळवून इकडे येतात, त्यांना आल्या दिवसापासून कर्ज निवारण्याचा किंवा संसार चालविण्याचा उद्योग करण्यांत दिवसांतील मुख्य भाग घालवावा लागतो. शिवाय आपल्या कॉलेजांतून विलायतेंत नांव मिळविलेले असे बुद्धिवान लोक आहेत, पण त्यांना पगाराचें काम म्हणून, विशेषत: संस्थेचें हित म्हणून, अगदीं खालच्या वर्गांनांही शिकविण्याचें हास्यास्पद काम करावें लागतें. अशा रीतीनें मुख्य दिवस घालविणाऱ्या त्या बिचाऱ्याला संशोधनाला लागणारें स्वास्थ्य कोठून लाभणार? वर इंग्लंडांतील प्रोफेसरांचा मी उल्लेख केला; ते इकडील प्रोफेसरांसारखेच पैशानें गरीब असतील; पण आपल्या पगाराचा मोबदला त्यांना आपल्या बुद्धीचा असा पैसा पै करून द्यावा लागत नाहीं. त्यांना मिळणारें वेतन फार मोठें असतें असें नाहीं, पण त्यांना स्वस्थ राहून केवळ विद्यार्जनाचें कार्य करतां येतें. रोजची तासवारीची शिकवणी त्यांच्या मागें नसते, ही फार मोठी गोष्ट आहे.

---

## ३८ मराठी वाङ्मय

(२७ जानेवारी १९२० रोजीं न्यू पूना कॉलेजमध्यें झालेल्या व्याख्यानाचा सारांश)

इंग्लिश भाषेस मोठें महत्त्व देण्याचा कांहीं दिवसांपूर्वी एक काल होता. त्यावेळीं मराठी भाषेंतसुद्धां इंग्लिश शब्दांचा भरणा करण्याचा मोह लोकांना आवरत नसे. इंग्लिशमध्यें सणसणीत भाषण करणारा तोच खरा वक्ता अशीहि त्यावेळीं समजूत झाली होती. इंग्लिश भाषेला

नसतें महत्त्व देऊन मराठी भाषेची हेळसांड त्या वेळीं करण्यांत आली, तिचा परिणाम अद्यापही आपणास भोगावा लागत आहे. अद्यापही आपण आपल्या भाषणांत इंग्रजी शब्दांची भेसळ करतों व खाजगी व्यवहारांत सुद्धां आपलें लेखन केवळ मराठी भाषेत न होतां तें इंग्लिश-मध्यें होत असतें हा प्रकार नवीन पिढीच्या लोकांनीं बंद करण्याचा यत्न केला पाहिजे. आपला खाजगी पत्रव्यवहार इंग्रजींत करण्याचा मोह खुद्द चिपळूणकरांना सुद्धां आवरला नाहीं हें पाहून आश्चर्य वाटतें. आपण सरकारी नोकरी सोडून सरकारच्या दास्यत्वांतून मुक्त झालों असें महत्त्वाचें वृत्त त्यांनीं आपल्या बंधूंना कळविलें, तें पत्र त्यांनीं इंग्रजीमध्यें लिहिलें होतें. ज्यांनीं निबंधमाला लिहिली त्यांना मराठीमध्यें आपला खाजगी पत्रव्यवहार करतां आला नसता असें नाहीं. पण इंग्लिश भाषा वापरण्याचा मोहच प्रथमपासून आपणांस अनावर झाला आहे. टिळक हे सुद्धां आपला पत्रव्यवहार कित्येक वेळां मराठींत न करतां इंग्रजी-मध्येंच करीत व आपणांकडून ही चूक होत आहे असेंही त्यांना कळून चुकलें होतें.

परभाषेंतील शब्द जरूर तेथें आपल्या भाषेंत घेणें हें गैर आहे असें म्हणतां येणार नाहीं. इंग्लिशसारख्या भाषासुद्धां जर परभाषेंतील शेंकडा ८० शब्द घेऊन तयार झालेल्या आहेत तर मराठीच्या शुद्धीकरणा-करितां अनिर्वाहपक्ष म्हणून परभाषेंतील कांहीं शब्द आपणास घ्यावे लागले तर ते घेण्यास वास्तविक कांहीं हरकत असूं नये. "व" हें उभयान्वयी अव्यय परकीय भाषेंतील आहे. पण तें टाकून द्यावें म्हटलें तर त्याच्यासारखा छोटासा शब्द उपलब्ध नाहीं. 'वटवट' हा शब्द ज्या भाषेंतून घेतला त्याचा सदर भाषेंतील अर्थ 'चिमणी' असा आहे. असले सुटसुटीत व अर्थबोधक शब्द परकीय भाषेंतील आहेत म्हणून टाकतां येणार नाहीं.

शक्य तितके नवीन शब्द भाषेंत निर्माण करण्याचाही आपण प्रयत्न करीत असलें पाहिजे. मराठी भाषेची स्तुति करावयाची असली तरी संस्कृताची निंदा कोणी करूं नये. संस्कृत ही वेदकालीन भाषा आहे. अनार्यांनीं आर्यांची संस्कृति घेतली त्याबरोबर त्यांची संस्कृत भाषाही घेतली. मद्रासकडच्या अनार्यांची भाषा तामील असली, व त्यांचें गद्य

किंवा पद्य वाङ्मय तामील भाषेंत असलें, तरी त्यांच्या धर्माची भाषा संस्कृतच आहे, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. संस्कृत मुळींच न आलें तर मराठी भाषा सुधारेल, असें नाहीं.

मराठी भाषेंत संस्कृत शब्दांचा वाटेल तसा भरणा करूं नये, हें अगदीं खरें आहे. संस्कृत ही उपकारी भाषा असें मानलें पाहिजे. मराठीकरितां संस्कृत, संस्कृतकरितां मराठी नव्हे ! संस्कृत भाषेचें सौंदर्य व तिचा शब्द-कोश कधींही कमी पडणार नाहीं. त्या भाषेंतील क्लिष्टभाग काढून टाकून, त्या वाङ्मयांतील शास्त्रग्रंथांचीं भाषांतरें करणें, आज अत्यंत जरूरीचें आहे. रामायण भारत या ग्रंथांचीं मराठी भाषांतरें ज्यांनीं केलीं आहेत, त्यांनीं भाषेवर एक प्रकारचे उपकारच केलेले आहेत.

---

## ३९ महाराष्ट्र साहित्य संमेलन

( १९२७ सालीं पुणें येथें भरलेल्या साहित्य संमेलनाच्या १२ व्या अधिवेशनांतील स्वागताध्यक्षीय भाषण. )

पुण्यास भरणारें असें हें पांचवें संमेलन होय. यापूर्वीचें संमेलन पुण्यास १९०८ सालीं भरलें होतें. अर्थात् संमेलनाच्या भेटीचा लाभ पुण्याला आज सुमारें वीस वर्षांनीं मिळत आहे. मध्यंतरीं तें दोन वेळां बडोद्यास, दोन वेळां मुंबईस, एक वेळ अकोल्यास व एक वेळ इंदुरास भरलें. साहित्य संमेलनाच्या कल्पनेचा मूळ उगम पुण्यास २४ वर्षांपूर्वी झाला. त्या जुन्या काळीं या नूतन कल्पनेला स्फूर्ति मिळाली ती कै. माधवरावजी रानडे यांजकडून मिळाली असेल असें कोणी अनुमान करील तर खरेंच ठरेल.

१८८५ सालीं जें पहिलें साहित्य--संमेलन पुण्यास भरलें, त्याच्या विनंतिपत्रावर नीळकंठराव कीर्तने, माधवराव रानडे, माधवराव कुंटे, हरिभाऊ दामले, काशीनाथपंत मराठे, नाना योगी, व्यंकटराव बाबा वकील अशा सद्गृहस्थांच्या सह्या आहेत. नव्या व जुन्या ग्रंथांचें संगोपन, संशोधन व प्रकाशन या गोष्टी करण्याकडे लोकांचें लक्ष वेधावें, साहित्यव्यासंगी लोकांच्या अडचणी व अनुभव एकमेकांस सांगण्यास

संधि मिळावी असा संमेलनाचा उद्देश होता. या पहिल्या संमेलनांत श्री. माधवरावजी रानडे यांनीं सन १८४५ ते १८८५ या अवधींतील मराठी ग्रंथांचें तुलनात्मक सिंहावलोकन केलें होतें. शिवाय दक्षिणा प्राईझ कमिटीचें काम अधिक व्यवस्थित व फलदायी करावें असें पुण्यांतील विद्वान मंडळीस वाटत असल्यानें त्याहि गोष्टीचा प्रश्न या संमेलनांत निघाला होता. पुढें नऊ वर्षांनीं या कल्पनेस मूर्त स्वरूप येऊन डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी या नांवाची संस्था अस्तित्वांत आली आणि नवीन ग्रंथांचें परीक्षण करून त्यांतील कांहींना बक्षिसें देणें, निवडक इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें करविणें, आणि पेशव्यांचें दप्तर तपासून त्यांतील उपयुक्त लेखांचें प्रकाशन करणें हीं कामें या संस्थेमार्फत होऊं लागलीं. परंतु स्वतः साहित्यसंमेलन सन १८८५ सालीं जें एकदां भरलें तें पुनः १९०६ सालापर्यंत पुण्यास कोणाच्या दृष्टीस पडलें नाहीं!

त्या सालीं हें पुनरुज्जीवन होण्याचें मुख्य कारण असें कीं, १८८५ ते १९०५ या वीस सालांत नवीन वळणाचें आणि राष्ट्रीय विचाराचें असें बरेंच वाङ्मय निर्माण होऊं लागलें होतें. परंतु डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीला अशा वाङ्मयाचा जितका परामर्ष घेणें योग्य होतें तितकें तिच्या परिस्थितीमुळें तिजकडून घडलें जाणें शक्य नव्हतें. १९०६ च्या सुमारास नव्या मनूंतील अनेक मराठी ग्रंथकार व लेखक हळुहळू उदयाला येऊं लागले होते. अर्थात् डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीसारख्या संस्थांतून घेतल्या जाणाऱ्या परामर्षापेक्षां अधिक कळकळीचा, आपलेपणाचा व उत्तेजनपर असा परामर्ष, नवीन ग्रंथांचा व ग्रंथकारांचा, घेतला जावा अशी इच्छा सुशिक्षित लोकांमध्यें सहजच उत्पन्न झाली होती. १८८५ सालीं भरलेल्या संमेलनांत कांहीं उपयुक्त ठराव पास करण्यांत आले. तशा प्रकारचे ठराव एखाद्या प्रतिष्ठित परिषदेच्या द्वारें पुनः पुनः झाल्यास लोकमत प्रगट करण्याला त्यायोगें फार चांगल्या प्रकारचें सहाय्य होणार होतें आणि व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीसारख्या परोपजीवि संस्थेकडून, विशेषतः तिच्या मर्यादित साधनांनीं आणि बंदिस्त व नेमस्त अशा कार्यक्षेत्रांत हें लोकमत प्रगट करण्यास तर वाव नव्हता. म्हणून सातारा येथें कै. पारसनीस यांच्या प्रयत्नानें सन १९०५ सालीं साहित्यसंमेलनाचें पुनरुज्जीवन करण्यांत

आलें. सातान्यास उपक्रम झालेल्या या कल्पनेला पुढल्याच वर्षी पुण्यास चांगलें स्वरूप आलें. मुंबई युनिव्हर्सिटीमध्यें मराठी भाषेचा प्रवेश करविणें, ऐतिहासिक व वाङ्मयात्मक लेखांचा संग्रह करणें, इतिहास-संशोधनास व्यवस्थित स्वरूप देणें, शिलालेखांचें वाचन करणें, आधुनिक कवींचा परामर्ष घेणें, मराठी भाषेचा कोश, विश्वकोश यांसारखे प्रचंड ग्रंथ निर्माण करविणें इत्यादि उच्च प्रतीच्या विषयांची चर्चा पुण्यास भरलेल्या या दुसऱ्या व एकंदरीनें तिसऱ्या साहित्यसंमेलनांत प्रथम झाली. याच वेळीं साहित्य परिषद या नांवाची कायमची संस्थाहि स्थापण्यांत आली. त्यानंतर १९०७ व १९०८ सालींहि पुण्यास साहित्यसंमेलन भरविण्यांत आलें. त्यांत या जुन्या व कांहीं नव्या विषयांचें प्रतिपादन होऊन, संस्थेच्या कार्यास व्यवस्थित प्रारंभ होणार तोंच हिंदुस्थानांतील राजकारणाच्या वातावरणांत वादळ व उत्पात यांना सुरुवात झाली आणि तेव्हांपासून साहित्यसंमेलन जें बाहेर भरूं लागलें तें यंदा पुण्यास परतून आलें.

---

## ४० तांबे हीरकमहोत्सव

( २७ नोव्हेंबर १९३४ रोजीं कविवर्य भास्करराव तांबे यांच्या हीरकोत्सवानिमित्त शारदा मंदिराच्या विद्यमानें भरलेल्या सभेंत गोखले स्मारक हॉलमध्यें केलेलें भाषण. )

" श्री. तांबे हे कवि ह्या नात्यानें आबालवृद्ध स्त्री-पुरुषांना सारखेच प्रिय आहेत. अशी लोकप्रियता फार थोड्या कवींना लाभते. या छोट्या मुलीनें आतांच त्यांची कविता पाठ म्हणून दाखविली, यावरून सर्वांनाच त्यांच्या कवितेचा ध्यास कसा लागला आहे हें दिसतें.

कवीनें आपल्या साठाव्या वर्षीही तरुण पिढीला प्रिय होणें ही गोष्ट कठिण आहे. उतारवयांत कवीची प्रतिभा जरी कायम असली तरी तिच्यावर अनुभवाचें इतकें जबरदस्त दडपण पडतें कीं, त्या प्रतिभेंतून नकळत जुनेपणाचा छाप असलेला सूर निघूं लागतो. परंतु तांब्यांच्या कवितेला तरुण पिढीहि मान देते यावरून ती कशी उत्कृष्ट आहे हें सिद्ध होत आहे.

## साठ वर्षें वयानंतर काय वाटतें

असा मघां अत्रे यांनीं प्रश्न केला. मला असें वाटतें कीं, साठ वर्षें उलटल्यावर आणखी साठ वर्षें जगावें असें वाटतें. मात्र यापुढें मरण आल्यास त्याचें कार्य झालें असल्यामुळें तो सुखानें मरतो. पण अधिक आयुष्य लाभल्यास अधिक कार्य करावें असेंच वाटतें. आणि तांब्यांनाहि असेंच वाटत असेल. ते म्हणतात कीं, मधुघट रिकामे पडले, पण ईश्वरी योजना असेल तर ते घट पुन्हां काठोकाठ भरून वाहूं लागतील.

" Those Whom God Loves Die Young "

अशी म्हण आहे, पण ती साफ खोटी आहे. दुःखांत सुख अगर समाधान मानण्यासाठीं ती म्हण तयार करण्यांत आली आहे. यापेक्षां जास्त अर्थ तिला नाहीं.

ईश्वराचा लाडका असेल तो लवकरच मेला पाहिजे असें नाहीं. तर तो जास्त जगून ईश्वराची कीर्ति या जगावर जास्त पसरील.

श्री. तांबे यांच्या कवितेंत '**प्रणय**' व '**तत्त्वसंशोधन**' हे दोन गुण प्रामुख्यानें आहेत. प्रेमळपणा हा त्यांचा विशेष आहे.

श्री. तांब्यांच्या कवितेची सगुण मूर्ति कल्पिली तर मला ती "**कडेवर मूल घेतलेल्या प्रौढ व प्रेमळ तरुणी**" प्रमाणें दिसते.

याप्रमाण इतर कांहीं कवींच्या कवितेच्या मूर्ति मीं कल्पिल्या आहेत. त्या अशा कीं, केशवसुत यांची कविता मला "**दाभणकाठी पंचा नेसलेल्या, कोरीव मिशांच्या सुदृढ शरीराच्या अस्सल चित्पावन ब्राह्मणाप्रमाणें दिसते.**"

गिरीश यांची कविता मला, "**ब्राह्मण स्त्रीनें मुद्दाम गुरविणीचा वेश घेतल्याप्रमाणें**" दिसते.

श्री. चंद्रशेखर यांची कविता **या कानापासून त्या कानापर्यंत आडवें गंध लावलेल्या शास्त्र्याप्रमाणें** दिसते; श्री. ठोंबरे यांची कविता, **झाडाच्या पल्लवांत लपून किलबिल करणाऱ्या पक्षाप्रमाणें** मनोरम वाटते. श्री. माधव ज्युलियन यांची कविता बरींच वर्षें **महाराष्ट्रांत राहिलेला पठाण आपल्या बरोबरीच्या स्त्रीशीं जसा**

बोलतो तशी वाटते. या उपमांना कांहीं कार्यकारणभाव नाहीं, पण मला आपलें जें वाटलें तें सांगितलें.

श्री. अत्रे यांची कविता म्हणजे आपल्या शेजारीं उभें राहून आपल्याला गुद्गुद्गुल्या करून क्वचित प्रसंगीं आपल्या डोळ्यांतून पाणी काढावयास लावणाऱ्या अस्वलाप्रमाणें आहे.

प्रो. वासुदेवराव पटवर्धन हे श्री. तांब्यांच्या कवितेसंबंधीं म्हणाले होते कीं, "ती कविता म्हणजे जुन्यानव्याचें मिश्रण आहे व पक्का बनाव न झालेल्या विविध पदार्थांचें मिश्रण आहे." पण मला वाटतें हें वर्णन सर्वच कवींना लागणारें आहे.

ज्ञानेश्वर सर्वांत जुने कवि, पण त्यांना नव्यांत ओढणारे लोक त्यावेळीं होतेच. प्रत्येक कवि हा संधिकालावरच उभा आहे; तेव्हां प्रत्येक मनुष्यही कांहीं थोडा नवा व कांहीं थोडा जुना असा असतो.

श्री. तांबे यांचें जुनेंपण नव्यांना, किंवा नवेपण जुन्यांना विद्वेष वाटण्यासारखें नाहीं; याचें कारण त्यांचें लिहिणें शुद्ध भावनांनीं भरलेलें असतें.

कलानिर्मिति करण्याला नीतिविषयक हेतु असलाच पाहिजे असें नाहीं. पण त्यांत जर कांहीं अनीतिमूलक असेल तर तें क्षम्य ठरूं नये

असें श्री. तांबे यांचें कला व नीति या वादांतील मत असल्याचें मागें एकदां मी सांगितलें होतें.

श्री. तांबे यांची कविता अगदीं निर्लेप आहे. त्यांत अश्लीलता बिलकूल नाहीं. त्यांची कवितची एकही ओळ अशी नाहीं कीं, जी तीन पिढ्यांतील माणसें एकत्र बसून वाचूं शकणार नाहींत. तांबे हे अपराध्याचें समर्थन करणारे नाहींत पण त्यांच्या चुकीचा सहानुभूतिपूर्वक विचार करावा असें म्हणणारे सहृदय पुरुष आहेत.

असो, याप्रसंगीं आपण श्री. तांब्यांना दीर्घायुष्य चिंतणें आपलें कर्तव्य आहे.

---

# ४१ केसरी-प्रबोधकारांचें पुनरभिनंदन

( केसरी ४ जुलै १९३१. )

' केसरी-प्रबोध ' ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीची पहिली प्रत ता. २० मार्च १९३१ रोजीं, टिळकस्मारकमंदिरांत झालेल्या जाहीर ज्युबिली-समारंभांत, के. प्रबोध मंडळाकडून मला व माझे मित्र व सहकारी रा. धोंडोपंत विद्वांस यांना नजर करण्यांत आली. त्या वेळीं मीं मंडळाचे तोंडीं आभार मानलेच. पण या ग्रंथाची प्रथमावृत्ति एकाच आठवड्यांत विकून गेल्यामुळें मंडळानें हल्लीं त्याची दुसरी आवृत्ति काढून तिचीहि एक प्रत फिरून आम्हांला नजर केली आहे. यामुळें आम्हांला कृतज्ञतापूर्वक मंडळाचे फिरून एकवार जाहीर रीतीनें आभार मानणें अवश्य आहे. प्रथमावृत्तीहून ही दुसरी आवृत्ति किती व कशी वेगळी आहे हें स्वतः ग्रंथसंपादक यांनीं आपल्या प्रस्तावनेंत सांगितलेंच आहे. अर्थात् आभारप्रदर्शन व अभिनंदन यांचाहि दुसऱ्या आवृत्तींत कांहीं वेगळेपणा हवाच. पण तो काय आहे हें आम्ही न सांगतां तें पाहण्याचें काम वाचकांवरच सोंपवितों. पण या अभिनंदनांत कांहीं वेगळेपणा असला तरी आमचे आभार व कृतज्ञताबुद्धि ही जुनीच आहे, प्रथम आवृत्तीच्या प्रतींप्रमाणें त्याबरोबरच ती संपून गेली नाहीं, व कधीं संपून जावयाचीहि नाहीं. म्हणून आमचे आभार नवे नसून जुनेच आहेत. पण गाण्यांतील पालुपद तेंच असलें तरी कडवें नवीन असतें, त्याप्रमाणें अभिनंदन मात्र थोडें वेगळ्या रीतीनें करणार आहों.

' केसरीप्रबोध ' ग्रंथ हातीं घेतल्याबरोबर प्रथमच ठळकपणें ज्या गोष्टी नजरेस पडतात त्या अशा:—१ ग्रंथ मोठा भरदार, घसघशीत, आठ-नऊशें पानांचा आहे. २ ग्रंथ-सत्त्वाच्या मानानें त्याची किंमत फारच कमी आहे. ३ ग्रंथाची आवृत्ति छापखानेवाल्यांनीं वाखाणण्यासारख्या अगदीं थोड्या वेळांत छापून काढली. ४ ग्रंथांतील निरनिराळ्या विषयांवरील लेख लिहिणारांचा चित्र-परिचय थोडक्यांत चांगला करून दिला आहे. ५ विषयांत वैचित्र्य पुष्कळ साधलें असून विवेचनहि साधार व खुलासेवार आहे. ६ केसरीच्या ५० वर्षांत आलेल्या लेखमाला व लेख-

कांची यादी दिल्यानें सामान्यतः अलभ्य अशी बरीच माहिती वाचकांस मिळाली आहे. ७ थोड्या वेळांत अनेक लोकांनीं एकच धोरण ठेवून संघटनाचातुर्य दाखवून कार्य बिनबोभाट सिद्धीस नेलें. ८ ग्रंथाच्या तयारीला लागणारी द्रव्यसामुग्री चालकांनीं सहजासहजीं जुळविली. ९ ' केसरी-प्रबोध ' ही केसरीसंबंधानें अर्धशतकाची एक प्रकारें छोटीशी एनसायक्लो-पीडियाच बनली आहे. १० कोणत्याहि जुन्या वर्तमानपत्राला ज्या प्रकारें ' प्रबोध '—रचनेचें भाग्य मिळालें नाहीं तसें ' प्रबोध ' संपादकांनीं केसरीस मिळवून दिलें.

वरील सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या असतां या ग्रंथयोजनेचे कल्पक, चालक, छापखानेवाले व वाचक ( ग्राहक ) या सर्वांचें अभिनंदन गुण-ग्राहकताबुद्धीनें कोणीहि मनःपूर्वक करील. केसरी--ट्रस्टींनीं तेंच अभिनंदन कृतज्ञतापूर्वक करण्याचीं कारणें तीनः-- १ यासारखा ग्रंथ त्यांनीं स्वतःच ज्युबिलीनिमित्त काढला असता तरी तो हवाच होता. पण त्यांना न होणारें हें त्यांचें काम या संपादकमंडळानें केलें. २ हें सर्व काम सर्वस्वी स्वयंस्फूर्तीनेंच झालें. केसरी ट्रस्टींना यांत एका अक्षरानें कोणीं विचारलें नाहीं किंवा पैशाची मदत मागितली नाहीं. आम्ही मदत केली ती इतकीच कीं, कामाच्या सौकर्यार्थ आमच्याजवळच्या छापील अनुक्रम-णिकांचीं बाडें पुरविलीं आणि आमचे जवळचीं केसरीचीं फाइलें दिलीं. पण त्यांतहि प्रत्युपकार झालाच कीं, कांहीं जुनीं फाइलें विस्कटलेलीं अपूर्ण होतीं तीं चालकांनीं ठाकठीक करून चिठ्या चिकटवून इतर ठिकाणचे अंक मिळवून त्यांच्या भरतीनें तीं शक्य तितकीं पूर्ण करून व बांधवून, आम्हांस परत दिलीं. ३ आपल्या कामाकरितां त्यांनीं तयार केलेली सूचि तर फारच मौल्यवान असून हल्लीं ती आम्हीं मुद्दाम वेगळीं माणसें लावून केसरी—संपादक मंडळाच्या देखरेखीखालीं तपासून पूर्ण करून घेत आहों व जमल्यास पुढें मागें ती छापून प्रसिद्धहि करूं. तात्पर्य या एका कामांत अनेकांचीं अनेक कामें झालीं. त्या सर्वांनींच चालकांचे व संपादक मंडळाचे आभार मानले पाहिजेत.

आतां या ग्रंथाच्या अंतरंगाकडे वळून दोन शब्द लिहितों. हा ग्रंथ हातीं घेतला म्हणजे एक गोष्ट दिसते ती ही कीं, केसरीसारख्या एखाद्या वर्तमानपत्राचें काम अर्धशतकाइतकें अखंड चालले व कालांतरानें त्याचें

समालोचन करतां आलें तर, जणुं काय एका दिशेच्या क्षितिजापासून दुसऱ्या दिशेच्या क्षितिजापर्यंत पसरणारा असा एक प्रचंड बौद्धिक नकाशा वाचकांच्या नव्या पिढीच्या डोळ्यांपुढें उघडून मांडतां येतो. आणि हा नकाशा पाहत असतां देशाच्या इतिहासाचा चित्रपट तर दिसतोच; पण त्यांतल्या त्यांत शिक्षण, संस्कृति, समाजस्थिति, वाङ्मय यांच्या इतिहासाचाहि चित्रपट तसाच दिसतो. अंधाऱ्या रात्रीं निर्मळ निळ्या आकाशाकडे पाहात आपण वर डोळे लावून निजलों असतां तारकापुंजांचा प्रकार दिसतो तो अवर्णनीय होय. पहिल्यापासून आठव्या पर्यंतच्या दर्जाचे तारे इकडे तिकडे पसरलेले असून परसापेक्ष जागा न सोडतां आपल्या चंचळ तेजानें कमी-अधिक चमकत आहेत. त्यांतच कोठें कोठें आपल्या निश्चल तेजानें प्रकाशणारे, पण वस्तुतः प्रगतिपर, असे ग्रह आपल्या परिभ्रमणाचें काम ठराविक कक्षेंत, केव्हां वक्री तर केव्हां मार्गी होऊन, पार पाडीत आहेत. या व्यतिरिक्त आकाशगंगा म्हणून एक तेजाचा पट्टा आकाशभर पसरलेला असून, त्यांत अमुकच असा वेगळा तारा कोणताहि दाखवितां येत नसला तरी, या तेजोपटलाचें संकीर्ण स्वरूप पाहतां त्याची अगाधता व अगण्यता यांचा गंभीर ठसा मनावर उठल्याशिवाय राहात नाहीं. ग्रह सोडून निश्चल तारे घेतले असतां यदृच्छेनें त्यांच्या बनलेल्या विविध आकृत्या प्राणिदर्शक भासून त्यांचे नसते गुणदोषहि मनाला भासूं लागतात. केसरी वर्तमानपत्राच्या पन्नास वर्षांच्या फाइली चाळल्या असतां त्यांतील अनेक लेखकांसंबंधानें असाच कांहींसा देखावा मनश्चक्षूंना दिसत नाहीं काय?

किंवा दुसरीहि एक कल्पना सुचण्यासारखी आहे व ती एखाद्या प्रचंड गालिचाची. आकाशांतील तारकापटांचें कर्तृत्व मनुष्याकडे असत नाहीं. पण गालिचाचें कर्तृत्व मनुष्याकडे असतें. अर्थात् पन्नास हात लांबीचा उलगडून पसरलेला गालिचा, आणि पन्नास वर्षांच्या केसरीच्या फायली चाळल्या असतां मनांत उभा राहणारा अखंड स्मृतिपट, हीं दोनहि एकरूपच नव्हेत काय! गालिचा पन्नास हात असला तरी त्याची मध्यवर्ती कल्पना एकच. सुताची जाडी, रंगरचना प्रकार, आकृति या भिन्न भिन्न असल्या तरी त्यांतहि ठराविक क्रम, ठराविक अंतर असून ते सर्व प्रकार मध्यवर्ती कल्पनेला पोषक व अनुरूप असेच असतात. पण गालिचा सान्त व समर्याद असल्यानें, वर्तमानपत्राच्या अखंड

सातत्याचा व नव्या ताज्या बनावटीचा जो गुण तो गालिच्याच्या कल्पनेंत प्रतीत होत नाहीं. म्हणून याहून अधिक समर्पक अशीहि एखादी कल्पना करतां येईल. मध्यें खळ न पडतां अखंड चालू राहणें हा वर्तमानपत्राचा मुख्य गुण असतो, व कधीं बंद न पडतां अनंतकाल चालू राहावें अशी स्वत: वर्तमानपत्राची तरी आकांक्षा असते. मग ती सफल होवो वा न होवो. म्हणून कल्पना करूं कीं विणकरीचा एक प्रचंड माग उभारलेला आहे. त्यावर एक लांबचलांब ताणा उभ्या सुतांचा बसविलेला असून, त्यांत बाण्याचें आडवें सूत भरून वस्त्र विणण्याचें काम चालू असतांच, इकडे लांबीच्या बाजूनें ताणा वाढविण्याचें कामहि सुरू आहे. ताण्याचा प्रारंभ कोठें झाला हें उकलून पाहावयाचें असल्यास तें पाहण्याचें साधन आहे. तसेंच विणून झालेल्या वस्त्राची घडी तर न मोडावी, पण तें उलगडून त्यांत काय प्रकार आहेत हें पाहतां यावें अशी कांहीं यांत्रिक योजना आहे. पाहणारे हीं दोनहि, म्हणजे प्रारंभ व प्रगति, पाहत असतां इकडे विणण्याचें काम सुरूच असतें. त्याला खळ पडत नाहीं व बाजूला उभे राहून पाहणाराला हात, दोन हात, चार हात कपडा विणला जात असतां दिसत असतो. अर्ध शतक चालू राहिलेल्या व पुढेंहि चालू असलेल्या वर्तमानपत्राला ही सर्व उपमा समर्पक नव्हे काय ?

या पन्नास हात कापडाचा म्हणजे पन्नास वर्षांच्या केसरीचा लांब ताणा एकच, म्हणजे स्वराज्यविषयक अशी अखंड व ताठर भावना ही होय. तसेंच समाजाच्या उत्कर्षाची अखंड पण धांवती आशा आकांक्षा. पण हा ताणाच इतका लांब कीं, बाणा घालून वस्त्र विणण्याचें काम कोणाहि एका मुख्य "वीव्हिंग मास्तरा"ला संपवितां आलें नाहीं; व प्रत्येकाला आपल्या हुकमतीखालीं किंवा उजव्या डाव्या हाताला इतर विणकर कामगार घेऊन तें काम चालवावें लागलें आहे. याचा सहज परिणाम असा कीं, कोठें बाणा ठासून भरला गेला तर कोठें तो विरळ भरला गेला. कोठें एखादा तुटका दोरा न सांधतां खंड पडून दुसरा नवाच दोरा सुरू झाला. तर कोठें एकावर एक दोन सुतें आल्यानें तितक्यापुरतें अंग जाड झालें. कोठें कुशल कारागिरानें सुंदर फुलें व वेलपत्तीची किनार विणली, तर कोठें दुसऱ्यानें साध्या सफाईनेंच मनोहरपणा

आणला. कोठें कोणी चित्रांच्या आकृति काढल्या तर दुसऱ्या कोणीं स्मरणांत ठेवण्यासारखीं सुंदर वचनांचीं अक्षरें विणलीं. तात्पर्य, अनेकांत एकत्व, विविधत्वांत समता व रंगवैचित्र्यांतच संकीर्ण एकजिनसीपणाचा देखावा असा वस्त्रपट म्हणजे वर्तमानपत्र होय. विणकरीचा हा अद्भुत माग सुरू असतां छपाईच्या यंत्राच्या रूपानें तो गतिदर्शक शब्दहि करीत असतो!

स्वदेशी कवीनें सरस्वतीस्तवन करितांना वाणी (वाक्तंतू) संबंधानें म्हटलें आहे कीं 'विचित्रो यस्य विन्यासो विदधाति जगत्पटं ॥' पण परदेशचा कवि झाला तरी तेंच म्हणणार. प्रतिभा येथून तेथून एकच. म्हणून ज़र्मन कवि गोएटी यानेंहि काळाला "Roaring Loom of Time" असें म्हटलें आहे. आणि काळ म्हणजेच ज्या संसाराचें इतिवृत्त व इतिहास वर्तमानपत्रें लिहितात तो संसार होय. संसाराच्या व्यवहाराला वगळून काळाची कल्पनाच होऊं शकत नाहीं.

इतर कोणा वर्तमानपत्राला मिळालें नाहीं असें भाग्य 'केसरी प्रबोध'-कारांनीं केसरीला लाभविलें हा या पुस्तकाचा एक विशेष असें मीं वर म्हटलें आहे. तें कसें? तर असें. माझ्या आठवणींत केसरीशिवाय ज्याच्या पन्नाशीचा आनंदोत्सव पुस्तकरूपानें साजरा झाला असें एक 'विविधज्ञान-विस्तार' मासिक पुस्तक हेंच होय. त्याचा उत्सव साजरा करणारीं पुस्तकें निघालीं तीं निबंधसंग्रहाच्या रूपाचीं आहेत. हे निबंध निरनिराळ्या विद्वानांना विस्तारकारांनीं स्वतः विनंति करून लिहविले आहेत. पण हें काम संबंध दोन वर्षांवर चालू होतें. पन्नाशीचा आनंदोत्सव करावा असेंच 'विस्तारा'चें महत्त्व निःसंशय होतें. निबंधहि चांगले व विद्वानांनीं लिहिले आहेत. परंतु हें काम इतकें रेंगाळलें कीं, शेवटीं ग्रंथप्रकाशकांना त्याचा जवळ जवळ कंटाळा आला व झालें तें कामहि, निदान एका खंडाच्या छपाईच्या दृष्टीनें, व्हावें तसें समाधानकारक झालें नाहीं. तात्पर्य, स्वतः 'विस्तार' कारांची खटपट व छापखान्याची स्वाधीनता असतां, आनंदोत्सवानिमित्त निघणाऱ्या ग्रंथाची अशी अवस्था. येवढ्याकरितांच 'केसरीप्रबोध' कारांनीं आपलें सचित्र व सर्वांगसुंदर असें आठनऊशें पानांचें पुस्तक तीन महिन्यांत दोन आवृत्त्यांनीं काढलें याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच आहे.

हा ग्रंथ तयार करण्याच्या श्रेयांत अनेक गृहस्थ भागीदार असले तरी त्यांतल्या त्यांत रा. सदाशिव विनायक बापट, रा. श्रीपाद महादेव माटे व रा. दत्तोपंत आपटे हे मूळपासूनचे व प्रमुख असल्यामुळें त्यांचे केसरी ट्रस्टींतर्फें मी मनःपूर्वक आभार मानतों. वाचकवर्गाचे प्रतिनिधि या नात्यानें केसरीचें ऋण फेडावें या बुद्धीनेंच हा उद्योग त्यांनीं आरंभिला आणि सर्वस्वी निःस्वार्थी बुद्धीनें पार पाडला. एक पैचिहि अपेक्षा न धरतां त्यांनीं एक दोन महिने आपला सर्व वेळ या कार्याला रात्रंदिवस वाहिला. आपल्या वाचकवर्गांत अशा प्रकारची स्फूर्ति उत्पन्न करण्याइतकें, ज्ञान-दानाच्या दृष्टीनें, उपकारित्व पन्नास वर्षांच्या केसरींत आलें ही गोष्ट स्वतः केसरीला अभिमानास्पद वाटली तरी, ते उपकार उचित रीतीनें फेडणाऱ्या वाचकवर्गाच्या कृतज्ञतेचेंच कौतुक विशेष होय.

---

## ४२ काव्य-प्रकाशन समारंभ

( १७फेब्रुवारी १९३३ रोजीं महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी त्रैमासिकांतील निवडक कविता-संग्रहाच्या प्रकाशनप्रसंगीचें भाषण )

“ मीं आजच्या समारंभाचें आमंत्रण स्वीकारलें याला कारण असें कीं, प्रौढ मनुष्यालाहि अधून मधून लहान व्हावेसें वाटतें. पण ही इच्छा घरीं एकटे बसून कांहीं सफल होत नाहीं. घरीं लहान मुलें गोष्टी सांगा म्हणून पाठीशीं लागलीं, आणि त्यांना आवडेल व समजेल अशा तऱ्हेची गोष्ट आपणास सांगतां आली नाहीं, म्हणजे प्रौढ दशेंतील विद्वत्ता व लेखनपद्धति किती एकांगी असते हें लक्षांत येतें ! विद्वान वक्त्यांनाहि सुशिक्षित प्रौढ समुदायापुढेंच तेवढें बोलतां येतें. तेंच खेडेगावांत जाऊन अशिक्षित शेतकरी लोकांना त्यांच्या भाषेंत समजेल असें सांगा म्हटलें तर तसें त्यांना सांगतां येत नाहीं. तोच प्रकार लहान मुलांना गोष्टी सांगतांना होतो. काव्यग्रंथाची एक प्रत शारदादेवीस अर्पण करण्याकरितां म्हणून मजजवळ दिली. पण खरें पाहूं गेलें असतां वाङ्मय ज्या वेळीं प्रकट होतें, तेव्हांच तें अर्पण होतें. आतांचा हा प्रकार म्हणजे फक्त नैवेद्य दाखविण्यापैकीं आहे.

आतां त्रैमासिकाविषयीं बोलावयाचें तर काव्यग्रंथांत कवींची जी भेसळ करण्यांत आली आहे ती माझ्या मतें बरोबर नाहीं. या पुस्तकांत जशा विद्यमान व माजी विद्यार्थ्यांच्या कविता आहेत तशाच विद्यार्थ्यांच्या व कांहीं शिक्षकांच्या आणि नामांकित कवींच्या कविताहि आहेत. माधव ज्युलियनसारखे कवी एके काळीं या शाळेंत शिक्षक होते. म्हणून त्यांच्या कविता त्रैमासिकांत प्रसिद्ध करण्यांत आल्या. पण त्यांच्या कविता व इतर शिक्षकमंडळींच्या कविता यांचा दूरान्वित संबंध जोडून या पुस्तकांत पुनः उद्धृत करून विद्यार्थ्यांच्या कवितेंत भेसळ करणें बरोबर नाहीं. मासिक पुस्तक हें विद्यार्थ्यांच्याच लेख-कवितांनीं भरलेलें असलें पाहिजे; व अशा तऱ्हेचीं निवडक लेखांचीं पुस्तकें विद्यार्थ्यांच्याच लेखांनीं आणि कवितांनीं नटलेलीं असलीं पाहिजेत. जुन्या पिढींत व नव्या पिढींत जर कांहीं अंतर असेल तर तें मुलांच्या अंगीं बीजरूपानें असलेल्या गुणांचा विकास होण्यास पूर्वी वाव मिळत नसे हें होय. हल्लींच्या पिढींतील मुलांनाच प्रतिभेचा गुण आहे, व जुन्या पिढींतील लोकांना नव्हता असें नाहीं. पण पूर्वी आतांसारखीं मासिकें निघत नसत, व त्यामुळें लिहिण्याला वाव मिळत नसे.

## कलात्मक शिक्षणाची जरुरी

हल्लीं अशी स्थिति नाहीं. मासिकें, त्रैमासिकें तर निघतातच, पण वर्गागणिक हस्तलिखित मासिकेंहि काढण्यांत येतात. हस्तलिखित मासिकांतील गोंडस हस्ताक्षर, टापटीप, चित्रकला, काव्य इ. पाहून समाधान व आनंद होतो. पाणीदार रुबाबदार चेहरा असणें ही जशी एक स्वाभाविक शिफारस असते, तशी हस्ताक्षर चांगलें असणें हीहि शिफारस आहे. दिवसेंदिवस वाङ्मयक्षेत्र अधिकाधिक व्यापक होणार असून मागणीहि पुष्कळ वाढणार आहे. आणि मागणीचा पुरवठा करावयाचा तो अशा तऱ्हेच्या विद्यार्थीवर्गातूनच होणारा आहे. भातशेतीची जमीन लहानशी घेऊन तिला जाळून भाजून तिची योग्य प्रकारें मशागत करून मग त्यांत बीं पेरतात व पावसाळ्यांत तीं रोपें काढून मुठीमुठींनी सर्वत्र लावतात. त्याप्रमाणें मुलांच्या मनांत बीजरूपानें असलेली लेखनव्यवसायाची आवड योग्य प्रकारें शुद्ध करून वाढविली म्हणजे फलनिष्पत्ति होऊन पुरेसा पुरवठा करतां येईल.

आतां विद्यार्थ्यांना मला आजच्या प्रसंगीं इतकेंच सांगावेसें वाटतें कीं, दिवसेंदिवस येणाऱ्या स्थितींत जुन्या पद्धतीच्या शिक्षणाचा फारसा उपयोग होणार नाहीं. परंपरागत झालेल्या ठराविक शिक्षणाच्या चाकोरीनें जाऊन आतां भागणार नाहीं. ठराविक पद्धतीचें शिक्षण बाजूला सारून हरएक प्रकारचे धंदे करण्याचा प्रसंग पुढें येणार आहे. आणि येणाऱ्या परिस्थितीला योग्य तऱ्हेनें तोंड देण्याची आतांपासून त्यांनीं तयारी केली पाहिजे. कला, कौशल्य, व्यापार कोणती तरी निराळी दिशा ठरवून प्रयत्न करावयास लागलें पाहिजे. व जी कला शिकण्याची मुलाला इच्छा व आवड असेल तिला घरच्या पालकांनीं प्रोत्साहन दिलें पाहिजे. मॅट्रिक झाल्यावर बी. ए. चा मार्ग न चोखाळतां मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण प्राथमिक समजून, पुढें कोणत्या तरी कलेचें किंवा धंद्याचें शिक्षण त्यांनीं घेतलें पाहिजे. कोणता धंदा शिकावा हें स्वतः विद्यार्थ्यानें स्वतंत्र बुद्धि चालवून ठरवावें. माझ्या नातवानें हायस्कुलांत असतांच नौकानयनाचा अभ्यासक्रम आपल्या बुद्धीनें ठरवून घेतला, व तो आज कराची ते रंगून पर्यंत जाणाऱ्या बोटीवर काम करीत असतो. तसेंच बेळगांव येथील सोमण वकिलांचा मुलगा व सातारा येथील कात्रे यांचा मुलगा हे दोघेहि आज इंग्लंडमध्यें नाविक कारभार व मरीन एंजिनियरिंगचें शिक्षण घेत आहेत. हींच मुलें आज नेहमींच्या मार्गानें गेलीं असतीं तर बी. ए., एम्. ए. पर्यंत गेलीं असतीं; पण तींच आज इंग्लंडमध्यें स्वतंत्रपणानें व उत्साहानें शिक्षण घेत आहेत. तेव्हां अतःपर पूर्वीच्याच शिक्षणपद्धतीचा अवलंब न करतां नवी कांहीं तरी महत्त्वाकांक्षा मनांत धरून त्या दिशेनें कांहीं तरी नवीन उद्योगधंदा मुलांनीं शिकावयास पाहिजे." वरील आशयाचें अध्यक्षांचें भाषण झाल्यावर श्री. खासनीस यांनीं अध्यक्षांना हार घातला. शेवटीं श्री. बापट यांनीं आभार मानल्यावर समारंभ संपला.

---

# ४३ गायनकलेचें विश्वव्यापकत्व

( ता. ५, ६ व ७ जुलै १९२८ रोजीं पुणें येथें गांधर्व-महा-विद्यालयाच्या विद्यमानें भरलेल्या 'महाराष्ट्र-संगीत-परिषदेच्या' दुसऱ्या अधिवेशन प्रसंगीं केलेल्या अध्यक्षीय भाषणाचा सारांश )

" पंजाब, काश्मीर, बंगाल वगैरे प्रांतांत जाऊन जलसे करून पं. पलुसकर यांनीं महाराष्ट्रीय संगीताची गोडी व शास्त्रीय पद्धति तेथील लोकांना पटवून दिली व संगीताच्या अध्ययनाचें पवित्र कार्य सुरू केलें, याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों. सामुदायिक रीतीनें या विद्येचा प्रसार महाराष्ट्रांत व इतर प्रांतांत कसा होईल याविषयीं माझ्या मनांतील कांहीं सूचना कराव्या या हेतूनें व गायनाची गोडी मला मनापासून आहे म्हणून मी अध्यक्षपद स्वीकारलें. शिल्पकला, चित्रकला वगैरे कलांमध्यें जरी कांहीं विशेष गुण असले तरी गायनकलेमध्यें जें विश्वव्यापकत्व आहे तें इतर कलांमध्यें अगर शास्त्रांमध्यें आढळत नाहीं. याचें प्रत्यंतर म्हणजे प्रत्येक मनुष्यप्राणी आपलें रंजन स्वतःशींच तालावर अगर सुरावर गुणगुणत करीत असतो. मधुर गाण्यानें हत्ती वश होतात असें सांगतात. विषारी सर्प देखील आपल्या बिळांतून बाहेर येऊन गायनाचे मधुर आलाप कानीं पडतांच डोलूं लागतो हें आपण तर प्रत्यक्षच पाहतों. गाण्याचा उपयोग ज्याप्रमाणें लहान मुलांना निजविण्याकरितां करतात त्याचप्रमाणें राजे लोकांना उठविण्याकरितांहि संगीताचा उपयोग केला जातो ! प्रेम व क्रोध, युद्ध व शांतता इत्यादि परस्परविरोधी योगांना देखील संगीताचा उपयोग होऊं शकतो. जाति, वयोमान, लिंगभेद यांमधील कोणतीहि अडचण गायनशास्त्राच्या आड येत नाहीं व असा मनुष्यप्राणी नाहीं कीं जो गायनाला लुब्ध होत नाहीं. ग्रह व तारेहि भ्रमण करीत असतांना गात असतात व तें त्यांचें गायन तद्रूप झाल्यास ऐकूंहि येतें म्हणतात. पाश्चात्य शिक्षणामुळें आपल्या जुन्या कलांमध्यें नवीन जागृति उत्पन्न झाली आहे. तरी पण पाश्चात्य शास्त्रीय विचारसरणीची भेसळ जशी इतर शास्त्रें व कला यांमध्यें झाली आहे तशी या संगीत कलेमध्यें झाली नाहीं ही आनंदाची व अभिमानाची गोष्ट आहे. व या नवीन जागृतीचा फायदा घेऊन आपणाला

उत्कर्ष करतां येईल. संगीतशास्त्राला राजदरबारांत जें स्थान होतें तें आतां राहिलें नाहीं. गवई लोकांचा परामर्ष व संभावना राजे लोक करीत असत; परंतु तो राजाश्रय आतां राहिला नाहीं. तथापि लोकाश्रय दसपटीनें वाढला आहे ही फार आनंदाची गोष्ट आहे.

देवस्थानांच्या द्वारें देखील संगीतशास्त्राला मदत होत असे व थोड्या-फार प्रमाणांत अजूनहि होते. सुमारें ३०-३५ वर्षांपूर्वी मोठमोठे गवई ज़ाहीर जलसे करणें हें कमीपणाचें आहे असें मानीत असत; परंतु जाहीर जलसा करण्याची पद्धत आतां पडूं लागली आहे. एखाद्या गायनाचार्या-ज़वळ कांहीं वर्षें राहून व व्यक्तिसेवा करून गायनप्रेमी शिष्यानें गुरुविद्या संपादन करावी ही सांप्रदायी पद्धति आतां मोडत जाऊन 'गायनशाळा' स्थापन होऊं लागल्या आहेत. गायनाचीं पुस्तकें अलीकडे गुरुस्थानीं येऊं लागलीं. नाट्यसंगीतामुळें गायनविद्या गेल्या २५-३० वर्षांत बरीच पुढें आली. गायनाचार्य नाटकांमध्यें जाऊन गाऊं लागले. शृंगारिक पदें व लावण्या कमी होऊं लागल्या व त्यांचे जागीं व्यावहारिक व लौकिक विषय-पर पदें येऊं लागलीं. पाश्चात्य संस्कृतीचा व विचारपद्धतीचा फायदा हा झाला कीं, संशोधनदृष्टि वाढूं लागली. अर्थात् संगीतशास्त्राची परागति नसून प्रगति चालू आहे ही अभिमानाची गोष्ट आहे.

पाश्चात्य व पौर्वात्य गायनपद्धतींत तात्त्विक भेद आहेत व ते असे कीं, पाश्चात्य गायनपद्धतींत अनेक स्वरांच्या एकतानतेला (Harmony) महत्त्व अधिक दिलें जातें. एकाच वेळीं अनेक सूर उत्पन्न करणें हेंच काय तें विशेष असें मानण्याची त्यांची पद्धति व ती आपल्या इकडे नाहीं. नियम-बद्ध स्वर घोळघोळून म्हणणें व आनंद उत्पन्न करणें हा त्यांच्यांतील व आपल्यांतील अभिरुचीमध्यें फरक आहे. इंग्रजी पद्धतींत राग नाहींत, चिज़ा आहेत. स्वरलेखनपद्धतीच ते सरास अनुसरतात व आपणाकडे ही पद्धति नवीन आहे. पाश्चात्य पद्धतींत लय आहे पण ताल नाहींत. परंपरेचें वा संप्रदायाचें बंधन तोडून पण त्यांतलें चांगलें तेवढें राखून या नव्या जागृतीचा फायदा घेऊन संशोधन अधिक वाढलें पाहिजे. परंपरा अजीबात सोडावी असें माझें म्हणणें नाहीं, तरी पण पंजाबी, आंध्र, तेलंगी, मद्रासी गायनपद्धतींत गुणदोष काय आहेत ह्यासंबंधींची माहिती असणें जरूर आहे व संगीतांतील सर्व पद्धतीमध्यें जो प्रवीण आहे तो श्रेष्ठ ही

भावना प्रत्येकानें बाळगली पाहिजे. स्वतःचें आहे तें सुटेल अशी भीति न मानतां उत्कृष्ट व ग्राह्य असेल तें अनुसरण्याकडे प्रवृत्ति व्हावी. जुन्या पदांच्या चाली ठेवाव्या व त्या चालींवर नवे मराठी प्रबंध रचण्यांत यावेत. संभावित स्त्रियांना गाण्याची कला अवगत असणें हें भूषण आहे असें वाटत असेल तर स्त्रियांना उपयुक्त व योग्य असे प्रबंध रचून पुस्तकें प्रसिद्ध झालीं पाहिजेत. हल्लींचा काल शाहिरी वाङ्मयाला अनुकूल नसला तरी उत्कृष्ट गुणांचे पोवाडे बनविण्यांत यावेत. लहान मुलें मुली स्त्रिया व प्रतिष्ठित तरुण या सर्वांना उपयुक्त असें पद्य वाङ्मय उत्पन्न केलें पाहिजे.

राग म्हणजे काय, रागिणी म्हणजे काय, श्रुति बारा आहेत कीं बावीस आहेत, याची खासगी जाहीर चर्चा व्हावी. स्टाफनोटेशनपद्धति चांगली कीं, सा री ग म पद्धति चांगली हें तज्ज्ञांनीं ठरवावें. 'स्टाफनोटेशन-पद्धति' मध्यें जर कांहीं गुण असतील तर आपण ज्याप्रमाणें इंग्रजी भाषा आपद्धर्म म्हणून शिकतों त्याप्रमाणें आपद्धर्म म्हणून स्टाफनोटेशन-पद्धति शिकावयाला काय हरकत? पण देशांतील संगीत व्यवहाराला ती पद्धति लावूं नये. पिंगळे, भातखंडे, पं. पलुसकर, आचरेकर, बर्वे, कृष्णराव मुळे, तांबे, अनंत संताराम माळवे वगैरे गायनाचार्य संगीत-शास्त्राच्या संशोधनाचा प्रचार करीत आहेत ही फार आनंदाची गोष्ट आहे. हिंदी गायनपद्धतीचा पगडा महाराष्ट्र गायनपद्धतीवर बसला ही फार शोचनीय गोष्ट आहे. हिंदी भाषेचें हें जूं आपण झुगारून दिलें पाहिजे. हिंदी गायनपद्धतींत यतिभंग, ऱ्हस्व, दीर्घ यांमधील भेद पाहात नाहींत व अर्थाचा तर विधिनिषेधहि नाहीं व हीच पद्धति आपणाकडे अनुसरली जात आहे. परराष्ट्रीय राजकारणांत भाषेचा उपयोग लिहिलेल्या खलि-त्याचा यथार्थ अर्थबोध होऊं नये याकडे करण्यांत येतो व तेंच उदाहरण आमच्या गायन पद्धतीला लागू पडत चाललें आहे. गवई लोक हिंदी भाषेंतील निरर्थक किंवा दूषणास्पद अर्थाचीं वैचित्र्यरहित पद्यें म्हणून गायनांतील निम्मा आनंद घालवून टाकतात. तरी शुद्ध व अर्थबोधक अशीं मराठी पदें व गायकी प्रबंध बनविले पाहिजेत. हिंदीचें दास्य झुगा-रून द्यावें व मातृभाषेचा अभिमान धरावा. गवई लोकांना मी कांहीं सूचना करतों. त्या अशा कीं, (१) कोणतेंहि पद्य म्हणतांना पहिल्यानें

तें संपूर्ण व मोठ्यानें स्पष्ट म्हणून दाखवावें. कारण त्या योगानें शब्दबोध व अर्थबोध होईल. (२) राग, पद्याची जाति ताल काय आहे हें गवयानें पहिल्यानें सांगून नंतर गावयाला सुरवात करावी. (३) गुरुपरंपरेचा अभिमान धरून आपलें नांव व गायनपद्धति कोणती तें सांगावें. (४) ज्या चिजा म्हटल्या जातील त्यांचें नोटेशन प्रसिद्ध करण्यांत यावें. (५) संस्कृत पद्यांशीं संबंध ठेवावा. (६) सूरभरणा फारसा असूं नये. (७) हार्मोनियमची मदत फारशी घेऊं नये. (८) रागलक्षणांचीं पदें करण्यांत यावींत. व शेवटची सूचना अशी कीं, श्रोत्यांनीं गायनप्रसंगीं शांतता ठेवावी. कारण सामाजिक आनंद हा सर्वांचाच आहे.

---

## ४४ माझीं स्वतःचीं नाटकें

(ता. ७ सप्टेंबर १९२३ रोजीं न्यू पूना कॉलेजमध्यें झालेल्या व्याख्यानाचा सारांश)

'आज जो विषय मी भाषणाकरितां घेतला आहे, त्या विषयावर भाषण करण्याची माझी प्रथम इच्छा नव्हती. परंतु ह्याच ठिकाणीं पूर्वी माझे मित्र रा. वामन मल्हार जोशी यांनीं स्वतःच्या 'रागिणी' कादंबरीवर भाषण करून तशी एक प्रकारची वहिवाट घालून दिली असल्यामुळें मजवर ही आपत्ति आली आहे. ज्यांत स्वतःच्या कृतींच्या गुणदोषांची चर्चा करावी लागणार, अशा विषयावर बोलणें म्हणजे आपत्ती नाहीं तर काय ? परंतु आत्मनिरीक्षण करण्याची संवय कांहीं वाईट नाहीं. असा विचार करून पुन्हां मी मुद्दाम निरोप पाठवून रुकार दिला व आज येथें आलों. स्वतःच्या नाटकांवर स्वतः ग्रंथकारानें भाषण करणें, ही अवघड गोष्ट आहे. कारण व्याख्यानांत त्याला स्वतःचे दोष सांगावे लागणार व त्यामुळें दोषांची आयतीच कबुली दिली जाणार ! बरें; तो आपलें जें गुणवर्णन करील, तें त्याच्याच तोंडून आल्यामुळें त्याची मूळची किंमत कमी होणार, असा पेंच पडला आहे; तरी श्रोतृवर्गाला माझें असें सांगणें आहे कीं, मी सांगेन तेंच त्याच भाषेंत बाहेर प्रसृत करावें. ग्रंथकर्त्यानें स्वतःच्या ग्रंथांच्या गुणावगुणांचें आविष्करण करणें म्हणजे स्वतः आपल्या शरीरावर शस्त्रक्रिया करून घेण्यासारखें आहे. पूर्वी ही गोष्ट शक्य नव्हती. परंतु हल्लीं मात्र

गुंगी आणणाऱ्या औषधांच्यामुळें ही गोष्ट शक्य झाली आहे. विद्वेषी टीकाकार डॉक्टरप्रमाणें चरचर कापणारी टीका करील हें सहज संभवतें. आतां एक प्रकारचें औषध पाठीच्या मणक्यांत 'इंजेक्ट' केलें असतां खालचा भाग बधिर होतो व स्वतःच्या शरीरावर स्वतःला शस्त्रक्रिया चरचर करतां येते. आपली आपणावर तशी टीकारूपी शस्त्रक्रिया करणें हल्लीं शक्य आहे, हें जाणून मी अहंकारलोपाची भूल घेतों व भाषणास सुरवात करतों.

ज्यांचीं नाटकें रंगभूमीवर केलीं जातात अशा तऱ्हेचा नाटककार मी नाहीं. अशा तऱ्हेचा नाटककार होण्यास अद्‌भुतपणा हा जो एक गुण लागतो, तो मजपाशीं नसल्यामुळें मी होईन, असेंहि वाटत नाहीं. मी नाटकाचा अतीशय भोक्ता आहें. हल्लीं जागरणें सोसत नाहींत म्हणून; नाहीं तर नाटकें पाहण्याचा नाद मला आहे. नाटक हा लोकांना मान्य असा करमणुकीचा विषय आहे. इंग्रजी वाङ्मयांत ज्याला अग्रस्थान दिलें जातें, तो शेक्स्पीयर 'नाटककार' म्हणूनच प्रसिद्ध आहे. नाटक व कीर्तन हीं जवळ जवळ समसमान आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. नाटकांत प्रत्येक भूमिकेला पृथक् पात्र असतें, परंतु कीर्तनांत कीर्तनकाराला एकट्यालाच सर्व कामें करावयाचीं असतात.

मी एकंदर आठ नाटकें लिहिलीं. पैकीं सहाच नाटकें लोकांच्या स्मरणामध्यें आहेत. पहिलें नाटक 'नवरदेवाची जोडगोळी' हें शेरिडनच्या 'ट्रायव्हल्स' ह्या पुस्तकाचें भाषांतर आहे. ह्यांत महाराष्ट्रांतील कुणबाऊ भाषा पहाण्यास मिळेल. हें मी एल्. एल्. बी. ची परीक्षा झाल्यावर निकाल होण्यास जो वेळ होता, त्या वेळांत लिहून काढलें. दुसरें 'सरोजिनी' हें नाटक मी साताऱ्यास वकिली करण्यास नुकतीच सुरवात केली असतां जें बंगाली शिकलों, तें कसें काय तयार झालें आहे, हें पाहण्याकरितां लिहिलें. आमच्या बंगाली शिक्षकाचें मत, तें छापून काढण्यास हरकत नाहीं असें पडल्यामुळें मी, तें पुण्यास आल्यावर १८९६ मध्यें छापून काढलें. नंतर मी १९१२ पर्यंत कोणतेंच नाटक लिहिलें नाहीं. त्याचें कारण, मला तें जमेल असें वाटेना. यापुढें मी जें नाटक लिहिलें तें 'तोतयाचें बंड' हें होय. हें नाटक पूर्ण ऐतिहासिक आहे. यांत इतिहासाचा कोठेंही विपर्यास झाला नाहीं, असें वासुदेव शास्त्र्यांचें मत आहे. या नंतर 'चंद्रगुप्त' नाटक

लिहिलें. ही अद्‌भुत कथा आहे. यांत इतिहासाचा भाग चंद्रगुप्त व चाणक्य या नांवांखेरीज कोणताहि नाहीं. यानंतर 'कृष्णार्जुन युद्ध' लिहिलें; ही एक 'हाय कॉमेडी' आहे. त्याला आधार जरी केवळ हरदासी कथेचा आहे, तरी याची गणना पौराणिक नाटकांत करण्यास हरकत नाहीं. यापुढें 'अमात्य माधव' हें लिहिलें. हेंहि एक 'रोमान्स'च आहे. मात्र यांतल्या माध्वचार्याची कल्पना मला लॉर्ड लितनच्या 'रिच्ल्यू' पात्रावरून सुचलेली आहे. यानंतर १९१८ सालीं मी 'वीर-विडंबन' हें नाटक लिहिलें. ही एक 'सटायर' आहे. या नाटकाची उभारणी एका रम्य कल्पनेवर आहे. ती कल्पना म्हणजे पांडवांसारख्या कर्दनकाळ योद्धयांचें अज्ञात वासांत झालेलें विडंबन होय. यांत माझा कटाक्ष विशेषतः अर्जुनावर आहे. जातीनें ुरुष असून वर्षभर स्त्रीचें सोंग घेऊन रहावयाचें, ही कल्पना रम्य नाहीं काय ? माझें शेवटचें नाटक संत भानुदास हें खरें नाटक नसून हा एक गावगुंडी फार्स आहे. येथें आमच्या नाटकांचें आत्मवृत्त खलास झालें. आतां गुणदोष चर्चा. प्रथमतः मी माझे दोष सांगतों. माझें कोणतेंहि नाटक मी तत्त्वाकरितां लिहिलें नाहीं. केवळ कलेच्या अभ्यासाकरितां लिहिलें आहे. बहुधा कोणतेंही नाटक तत्त्वाकरितां लिहिलें जात नाहीं. माझ्या पश्चात् 'तोतयाच्या बंडावरून' एखादा लेखक असें तत्त्व काढील कीं, मी हें नाटक भवितव्यतेचा प्रभाव दाखविण्याकरितां लिहिलें आहे. परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. नानाफडणविसावर संकट आलें होतें. हा एकच विचार माझ्या मनांत घोळत होता व त्यांतून तो कसा पार पडला असेल ह्याची कल्पना करितांना मला 'अमलेची' कल्पना सुचली व ती वाढवून मी त्या नाटकाची समाप्ती केली. माझ्या चंद्रगुप्त नाटकाचें कोणीं असें तत्त्व काढील कीं, मला चाणक्याच्या द्वारें मनुष्याची अविचारानें केलेली प्रतिज्ञा कशी पुरी होत नाहीं हें दाखवावयाचें होतें; परंतु खरें तसें नाहीं. त्यांत मला केवळ एका विदेशी कल्पनेचें स्वदेशी कलम करावयाचें होतें. कृष्णार्जुनयुद्धामध्यें मला वेदांततत्व प्रतिपादन करावयाचें नसून केवळ नारदाची कलहप्रियता व गालव गंधर्व चरित्र वर्णन करावयाचें होतें. तीच स्थिति अमात्यमाधवाची. त्यांतहि माझा ज्ञानोत्तर कर्माचें प्रतिपादन करण्याचा हेतु नसून केवळ कलेचा

अभिलाष हाच हेतु होता. तद्वत वीरविडंबनांत मला मोठ्या लोकांवर आपत्ति येतात हें सांगावयाचें नसून वेषधारी अर्जुन कसा असेल, ह्या रम्य कल्पनेशीं विलास करावयाचा होता. भानुदासामध्यें मला संत सामर्थ्याचें वर्णन करावयाचें नसून गांवगुंडांचें वर्णन करावयाचें होतें. म्हणून माझ्या नाटकांचें विगमन पद्धतीनें निरीक्षण करून मी सांगतों कीं, नाटक तत्त्वाच्या दृष्टीनें लिहिलें जात नाहीं, निदान मला तरी लिहितां येत नाहीं.

माझा दुसरा दोष असा कीं, मला भावनेचा किंवा रसाचा अत्युत्कर्ष जो यशस्वी नाटककर्त्याला आवश्यक आहे, तो साधत नाहीं. माझ्यांत कथानकांची गुंतागुंत करण्याचें कौशल्य नाहीं. व चवथा दोष असा कीं, मला मात्रेप्रमाणें अचूक लागू पडणारा विनोद साधत नाहीं. आतां माझे गुण सांगतों. भाषा साधी व सोपी आहे. संविधानकें चित्ताकर्षक आहेत. शृंगार शुद्ध आहे. कोणत्याहि नाटकाचें 'Back ground' उत्तान शृंगाराला पोषक नाहीं. त्यामुळें नाट्यशास्त्रप्रणेत्या भरत मुनीचा जो आदेश, नाटक हें पितापुत्र पतिपत्नी यांना एकाच वेळीं पाहतां यावें, तो बरोबर पाळला जातो व माझ्या मतें या गोष्टीस फार महत्व आहे. हा नियम जर सरसकट पाळला गेला, तर नाटकांची सांप्रतची तिरस्कारार्हता बरीच कमी होईल. मला बुद्धि व भावना यांचें मिश्रण साधतें. माझ्या नाटकांवर प्रतिकूल टीका नाहीं. माझीं पद्यें क्लिष्ट नाहींत. कांहीं ठिकाणीं तीं उत्तम काव्याचा मासला म्हणून लोक वाचतात असें म्हणतात.

---

## ४९ नाटक धंद्याला अवमान्यता कां ?

( १९२३ सालीं पुणें येथें भरलेल्या एकोणिसाव्या नाट्यसंमेलनांत केलेलें भाषण )

" मी आपणांपुढें कूट प्रश्न मांडणार आहें. त्याचा विचार आपण करा. त्याचें उत्तर अजून मला समाधानकारक सुटलें नाहीं. तो कूट प्रश्न असा आहे कीं, ' नाट्य व्यवसायीलोकांविषयीं सार्वजनिक लोकांत

अवमान्यता दिसून येते ती कां ? ' याचें उत्तर मला समाधानकारक असें सुचलें नाहीं. तरीसुद्धां मी याचा विचार करण्याची रीत आपल्यापुढें मांडतों. हा मानसिक शास्त्राचा प्रश्न आहे. याचें पृथक्करण मी असें केलें आहे. अवमान्यतेबद्दल मला असें सांगावयाचें आहे कीं, हा विरोधाभास आहे. वास्तविक नाटकाचा धंदा आनंददायक आहे. काम करणाऱ्यालाहि आनंद होतो, ही पहिली अनुकूलता, दुसरी नाट्य हें उपयुक्त आहे व समाजाला शिक्षण देणारें आहे. समाजाचें चित्र दाखविणारें आहे.

इतका वेळ मी अनुकूल गोष्टी सांगितल्या, आतां प्रतिकूल गोष्टी मांडतों. म्हणजे हा कूट प्रश्न होईल. नाटकाच्या धंद्याला सर्व जगांत कमीपणा मानीत आले हें खरें आहे. भरतमुनीनीं नाट्यधंद्याला कमीपणा दिला आहे. इंग्लंडमध्यें २०० वर्षांपूर्वी उडाणटप्पूचा कायदा होता. त्या बाबतींत या नटांना लायसेन्स घ्यावें लागे. जुन्या रोमच्या वेळींहि यांत कमीपणा मानीत असत. आधुनिक कालांतहि कमीपणा मानला जातो. शेक्सपियरनें नाटकें उत्तम लिहिलीं, पण त्याला रंगभूमीविषयीं तिटकारा वाटत असे. मग नाटकें लिहावयाचीं कशाकरितां ? पाणपोई घालण्यांत पुण्य आहे पण पाणपोईंत पाणी पिण्यांत पाप आहे, त्याप्रमाणेंच हें झालें. नाटकें वाचणें, लिहिणें चांगलें, पण नाटकें करणें पाप ! मग लिहावयाचीं कशाला ? जशी जेक्सपियरची भावना तशीच आपल्याकडच्या नाटककारांची आहे कीं नाहीं ? किती नाटककार नट व्हायला तयार आहेत ? नाटकें लिहिलीं व नटाचें काम केलें अशी ४।५ मंडळी आहेत. किर्लोस्कर, देवल, डोंगरे, पाटणकर या मंडळींनीं स्वतः नाटकें लिहिलीं व नाटकांत कामहि केलें. नाटकें लिहिणारे पुष्कळ असे असतात कीं, प्रसंग आला तरी स्टेजवर यावयाचे नाहींत.

## नाटक धंद्याला समाजांत अवमान्यता कां ?

याचें पहिलें कारण, कंपन्यांतून लोक दरिद्री असतात असें म्हणावें तर समाजांत एरवीं हजारों दरिद्री असतात. ते अनीतिमान असतात म्हणावें, तर पुष्कळ नट नीतिमान आहेत. तिसरें कारण म्हणजे त्यांच्या वेषावरून ते हटकून नाटकांतील म्हणून ओळखतां येतात, असें म्हणावें तर, समाजांत त्यांच्यापेक्षांहि छचोर पोषाख केलेले किती तरी लोक आढ-

ळतात. ते नाटकांत आले नाहींत एवढेंच चुकलें. बाकी आणावयाचें तर स्टेजवर तसेंच आणून त्यांना बसवावें. ते धंदा करून पैसे मिळवतात म्हणावें तर सर्वच लोक धंदा करितात. नाटकें लिहून पैसे मिळविणें सनदशीर ठरतें, तर मग नाटकें करून पैसे कां मिळवूं नयेत ? या नटांचा धंदा म्हणजे तेंचतेंच बोलायचें, पुनरुक्ती करावयाची, त्यामुळें नट सांगकाम्या होऊन त्याच्या बुद्धीला कमीपणा येतो. पुनरुक्तीमुळें नटांना अवमान्यता येते म्हणावें तर मार्कट्वेन प्रत्येक गांवीं तीच तीच गोष्ट सांगत असे. हरिदास, पुराणीक तींच आख्यानें, तींच पुराणें सांगतात. गवई तेंच तेंच पद गातो. तेव्हां पुनरुक्ती हें अवमान्यतेचें कारण होत नाहीं. राजकारणी पुरुषांचीं व्याख्यानें ठराविक विषयावर असलीं कीं, त्यांत पुनरुक्ती असते.

नाट्य ही ललितकला आहे. तेव्हां आपण सारख्या दर्जाच्या कला पाहूं व त्यांत मान्यता कां व यांत अवमान्यता कां, याचा आपण विचार करूं. चित्रकला, काव्य, नाटकें लिहिणें, गायन यांना अवमान्यता नाहीं, चितान्यांनीं चित्र काढलें तर अवमान्यता नाहीं मग नटांनीं समाजाचें चित्र काढलें तर अवमान्यता कां ? नट वेषांतर करतो म्हणून वाईट म्हणावें तर चितारी हा 'नेचर' ला वेडावीतच असतो. कोणीकडे खरा डोंगर व कोणीकडे याचा फळ्यावरचा लहान डोंगर ! मग हें निंद्य कां नाहीं ? एखाद्याला सामान्य माणसाचें काम असलें व तो प्रेक्षकांत बसला असला तर तो वाईट नाहीं, पण त्याच पोषाखांत स्टेजवर गेला कीं वाईट कां !

चितारी, कवि, गवई यांनीं अनुकरण केलें तरी तें दूषण नाहीं, ते नकली आभास उत्पन्न करतात हें निंदास्पद ठरत नाहीं. पण ॲक्टर नकली आभास करतो मग हा निंदास्पद कां ? चित्रकार, कवि, नट यांत काय फरक आहे ? हें मी पृथक्करण केलें. रीत सांगितली. त्यांत व यांत फरक इतकाच कीं, चित्रकार फळा रंगवितो; मागाहून त्याच्यापासून चित्र वेगळें असतें. कवि हा शब्द ब्रम्हांतले घेतो पण काव्य केलें व बाजूला ठेवलें, अशी त्याची स्थिती असते. चित्रकार व कवि हे निर्जीव वस्तूंवर काम करतात पण नटाला सजीव देहावर काम करावें लागतें. अनुकरण करावें लागतें. ॲक्टरमधील स्वत्व नष्ट होतें. चितारी, कवि, गवई, यांच्या

शरीरांत फरक पडत नाहीं. ॲक्टरला विकारविकृत स्वरूप घ्यावें लागतें. त्यामुळें त्यांतील व्यक्तित्व नष्ट होतें. या प्रश्नाचें अंतिम उत्तर देतां आलें नाहीं. आपणच याचा विचार करा. '

---

## ४६ नाटकें व संभावितपणा

( १९२८ सालीं पुणें सोशल क्लबाच्या इमारतीच्या उद्घाटन प्रसंगीं केलेल्या भाषणाचा सारांश. )

"आगरकरांनीं स्वतः नाटकें लिहिलीं. कॉलेज थिएट्रिकल्स्मध्यें टिळक ॲमॅच्यूर म्हणून साथीदार होते. चिपळूणकर शास्त्र्यांनीं तर नाटकांतच काम केलें होतें. डेक्कन कॉलेजमध्यें आम्हीं नाटक केलें. त्यावेळेस सेल्बी साहेबांचें भांडण झालें. तेव्हां सल्ला विचारण्याकरितां मंडळी टिळकांच्याच-कडे गेली होती. वाङ्मयाशीं नाटकाचा संबंध येतो, म्हणून सर्वजण त्याच्यांत भाग घेतात. नाटक लिहिणें हें संभावित व करून दाखविणें हें असंभावित असें व्हावयाचें नाहीं. ही गुंतागुंत आहे. आतां ज्या नाटक लिहिणाऱ्यांच्या अंगांत नाटकांत काम करण्याची पात्रताच नाहीं असे पुष्कळ लोक यांतून सुटतील. सगळ्या धंद्यांत कांहीं ना कांहीं अंशीं हा भाग आहे. सभांतून भाषणें करणाऱ्याला अभिनय यावा लागतो. वकील तर यांतून सुटत नाहीं. वकिली हा नटाचा धंदा आहे. वकील अशीलाशीं तादात्म्य पावला म्हणजे जवळ जवळ तो नटच होतो. तादात्म्य पावणें हें जगांत कोणालाहि सुटत नाहीं. नाटक लिहिण्यांस कालाचा अपव्यय करतां, असें काहीं लोक मला म्हणतात. त्यांना मी सांगतों **नाटक हा काव्याचा आत्मा आहे**. वाङ्मयांत नाटक हा श्रेष्ठ भाग आहे. हें सांगूनहि त्यांनीं ऐकिलें नाहीं तर शेवटीं तुम्हाला नाटक लिहितां येत नाहीं म्हणून तुम्ही असें म्हणतां असें मी त्यांना सांगतों. ज्याला विनोद करतां येतो तो कधींहि स्वस्थ बसणार नाहीं. जो नष्ट संशय ज्याच्या तोंडावर कधींहि हास्य चमकत नाहीं, तो माणूस काय करणार? नाटक लिहिणें संभावितणाचें व नाटक करणें संभावितपणाचें नाहीं, असें कोणालाहि म्हणतां यावयाचें नाहीं. तथापि धंदेवाईक व हौशी हा भेद

दुस्तर आहे. याचें कारण निःस्वार्थीपणा हा स्वतःच मोठा सद्गुण आहे. हा हौशी नटांचा क्लब आहे. सोशल क्लबांतूनच सार्वजनिक कामें बाहेर पडत असतात. न्या. रानड्यांनीं सोशल क्लबवर व्याख्यान देऊन ठिक-ठिकाणीं असे क्लब स्थापन झाले पाहिजेत असें सांगितलें होतें. संहति किंवा जूट तेथेंच दिसून येते."

## ४७ हास्यरस व असदभिरुचि

मराठी रंगभूमि आज ज्यांना द्रव्यदृष्ट्या विशेष वश झाली आहे अशा नाटककार–प्रहसनकारांपैकीं, पुण्याचे नागरिक रा. माधवराव जोशी हे एक होत. नाट्यलेखनाची हौस, त्या कलेंतील कौशल्य व मार्मिकपणा, इतक्या गोष्टी रा. जोशी यांना अनुकूल असल्यामुळें, त्यांनीं प्रथम गंभीर भावनाप्रधान नाटकें लिहून पाहिलीं. पण अशीं नाटकें लोकप्रिय होत नाहींत व त्यापासून अपेक्षित द्रव्यलाभ घडत नाहीं असें पाहून, रा. जोशी यांनीं जनतेवर एक प्रकारचा 'सूड' घ्यावा त्याप्रमाणें, हास्यरस-प्रधान प्रहसनें लिहिण्यास सुरवात केली. आणि या मार्गानें त्यांना गेलीं सातआठ वर्षें तरी इतकें यश मिळालें कीं, समाजावर आपण पुरा सूड उगवला या विजयाच्या भावनेनें तरी त्यांनीं आपला हात आतां आंख-डून धरण्यास हरकत नव्हती! पण तसें कांहीं न घडतां त्यांची लेखणी अधिकच भराऱ्या मारूं लागली. त्यांचीं नाटकें हीं बोलून--चालून प्रह-सनेंच असल्यामुळें त्यांत कांहीं अतिशयोक्ति, कांहीं ग्राम्यपणा, कांहीं थिल्लरपणा या गोष्टी सहजच येत. कारण समाजांतील दोषास्पद स्वभाव व शील यांचें चित्र रंगवून रंगभूमीवर लोकांपुढें मांडण्याच्या कार्यांत या गोष्टी फारशा टळण्यासारख्या नव्हत्या, निदान त्या अक्षम्य तरी मानल्या गेल्या नाहींत. पण ग्राम्यतेची उडी अश्लील व बीभत्स यांत पडूं लागली; आणि मनुष्यस्वभावाचीं व्यंगें लोकांपुढें फक्त हास्योत्पादक रीतीनें मांड-ण्याची मर्यादा सुटून अश्लीलता व बीभत्सपणा रंगविण्याचा प्रकार सुरू झाला, तेव्हां सहजच समाजांत त्याविरुद्ध प्रतिक्रिया सुरू झाली.

कांहीं वर्षांपूर्वीं अशा प्रकारचें एक नाटक रंगभूमीवर सुरू असतांच

सभागृहांतील प्रेक्षकांनीं उठून त्याचा उघड निषेध केला. पण अशाला दाद कोण देणार? बरें, अशा कामीं जे लोक पुढें होऊन सरकारी कायद्याची मदत घेण्याचा प्रयत्न करतील, त्यांच्यावर 'उपद्व्यापी' व 'लब्धप्रतिष्ठित' असा शेरा हटकून पडावयाचा! त्यामुळें आक्षेपकांची स्थिति साप धरला तर चावतो, सोडला तर पळून जातो अशा प्रकारची होऊन राहिली. पण रा. जोशी यांनीं 'वशीकरण' नांवाचें जें एक प्रहसन अलीकडे रंगभूमीवर आणलें त्यानें कित्येक आक्षेपकांच्या दृष्टीनें अश्लीलता व बीभत्सपणा यांचा कहर झाला असें वाटून त्यांनीं डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांजकडे तक्रार अर्ज दिला. त्याप्रमाणें चौकशी होऊन ता. १ ऑगष्ट रोजीं डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांनीं या नाटकाचा परवाना काढून घेऊन त्याच्या प्रयोगाला बंदी केली. आणि आतां नाटकांतील आक्षेपार्ह शब्द काढून टाकल्यामुळें फिरून तो परवाना दिला आहे म्हणतात! 'शितावरून भाताची परीक्षा' या न्यायानें हा बंदीचा हुकूम म्हणजे रा. जोशी यांच्या प्रहसन लेखन-पद्धतीवर एक प्रकारें वट शेराच होय. म्हणून हा प्रकार आम्हांला एकंदरीनें सर्वस्वी खेदकारक वाटतो.

हल्लींचे दिवस लोकशाहीचे व स्पष्टोक्तीचे आहेत यांत शंका नाहीं. आणि यापूर्वी जे प्रश्न ज्या रीतीनें जनतेपुढें चर्चेला येत नसत ते यापुढें येणार असें भावी पिढीनें घेऊन चालण्यास हरकत नाहीं. पण स्पष्टोक्तीच्या मर्यादा कितीहि वाढल्या तरी अश्लीलता व बीभत्सपणा यांत त्यांचें पर्यवसान होणें हें केव्हांहि इष्ट नाहीं. या दोहोंमधील फरक ही एक उच्चतम मनःसंस्कृतीनें काढलेली बारीक रेघ असें वाटेल तर म्हणावें. परंतु ती रेघ बारीक असली तरी, सरहद्द या नात्यानें तिचें सामर्थ्य अतिशय आहे हें ओळखलें पाहिजे. स्वतंत्र राष्ट्राच्या मुलुखांतील सरहद्द अशीच बारीक किंबहुना काल्पनिकहि असते. पण त्या सरहद्दीच्या अतिक्रमणानें तुंबळ रणें माजतात ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे! रा. जोशी यांचें हल्लींचें हें प्रहसनच काय पण त्यांच्या इतर कांहीं प्रहसनांतहि हें मर्यादेचें अतिक्रमण झालेलें वाचकांच्या व प्रेक्षकांच्या दृष्टीला अगदीं उघड दिसून येतें. या अतिक्रमणाची वर्तमानपत्रांतून जाहीर चर्चा करणें फार कठीण आहे. कारण तसें करतांना टीकाकाराला स्वतःवरच अश्लीलतेचा व बीभत्सपणाचा दोष घ्यावा लागेल. म्हणून आमचें म्हणणें इतकेंच कीं, रा. जोशी यांनीं अशा जाहीर

चर्चेची अपेक्षा करूं नये. ते स्वतःच इतके मार्मिक आहेत कीं, हें अतिक्रमण कसें कोठें घडतें हें त्यांचें त्यांना पुरें माहित आहे. जागृताला जागें कोण करणार? रा. जोशी यांचीं प्रहसनें दंभस्फोट किती यशस्वी रीतीनें करतात हें त्यांचें 'म्युनिसिपालिटी' नाटक ज्यांनीं पाहिलें असेल त्यांना कळून येईल. आणि याच कारणामुळें रा. जोशी यांच्या मार्मिक बुद्धीचा उपयोग सत्कारणीं व्हावा, त्याचा अपव्यय होऊं नये असें वाटतें. रा. जोशी यांचीं नाटकें त्यांतील खऱ्या गुणांकरितां लोकप्रिय झालीं तर तें योग्यच आहे. पण अश्लील व बीभत्स वाक्यें व दृश्यें आणि भाषणें हीं काढून टाकलीं असतां त्यांच्या हास्यरसोत्पादनाला व मार्मिकतेला कमीपणा खचित येणार नाहीं अशी आमची खात्री आहे. अश्लीलतेलाहि कोर्ट–कायद्यांनीं आळा घालणें ही गोष्ट फार दुर्घट आहे व इष्टहि नाहीं. अर्थात् स्वतः प्रहसनकाराच्या सदभिरुचिवरच जनतेला अधिक भिस्त ठेवावी लागणार. म्हणून त्यांनीं समाजानें आपली मान नाटककर्त्यांच्या मांडीवर विश्वासानें ठेवली आहे असें समजून ती कापूं नये, व योग्य तो विवेक करावा असें आमचें त्यांना सांगणें आहे.

---

## ४८ शब्दकोश समृद्धीचे उपाय

( ता. १४ डिसेंबर १९३३ रोजीं शब्दकोशाच्या दुसऱ्या भागाच्या प्रकाशनप्रसंगीं केलेलें अध्यक्षीय भाषण. )

हल्लीं ग्रंथप्रकाशनाची जी एक विशिष्ट पद्धति निघाली आहे ती खरोखरच स्तुत्य आहे. अशा तऱ्हेच्या ग्रंथांना जितक्या मार्गांनीं प्रसिद्धि देणें शक्य असेल तितक्या मार्गांनीं ती द्यावी. हा शब्दकोश ग्रंथ किती महत्त्वाचा आहे व त्याची उपयुक्तता किती आहे हें निराळें सांगावयास नकोच. अशा तऱ्हेचे कोश काढून संपादक मंडळानें मराठी भाषेवर मोठा उपकार केला आहे असेंच कोणीहि म्हणेल. आज जी ग्रंथनिर्मिती होत आहे, तिला अशा कोशांचा उपयोग होत आहे कीं नाहीं किंवा ग्रंथलेखक अशा कोशांचा उपयोग कितपत करीत असतील हें पाहूं. माझ्या हातीं पहिला भाग पडल्यापासून आतांपर्यंत फार झालें तर मी त्याचा पांचसहा वेळांच

उपयोग केला असेल. पुस्तक संग्रहीं असलें तरी शब्द हुडकून काढून त्याचा लिखाणांत उपयोग करण्याची प्रवृत्ति एकंदरीनें कमी. कां कीं, त्याचें कारण प्रसंग कमी. असे प्रसंग व असे शब्द हुडकून काढून लेखांत घालणारे लेखकहि विरळाच. अशी स्थिति कां उत्पन्न व्हावी ? याचें कारण हल्लींचें हायस्कूलमधील किंवा कॉलेजांतील शिक्षण हेंच होय. इंग्लिश इन्टू इंग्लिश म्हणजे इंग्रजी शब्दाला प्रतिशब्द द्यावयाचा तोहि इंग्रजीच अशी हल्लीं पद्धति आहे. संस्कृत पाठशाळेकडे पाहिलें तरीहि संस्कृतचें शिक्षण संस्कृतमधूनच दिलें जातें. कोशाचा मुख्य उपयोग ग्रंथलेखन व शिक्षण. पण या दोनहि बाबतींत मराठी कोश बाजूला ठेवून शिक्षण दिलें जात आहे. तसेंच लेखहि लिहिले जात आहेत. एखादा लेखक नवा शब्द बनवतो. पण त्याच अर्थाचा शब्द कोशांत कोणता आहे हें तो पाहत नाहीं. या कोशाचा खराखुरा उपयोग तेव्हांच होईल कीं जेव्हां शाळा-कॉलेजांमधून शिकविण्यांत येणारे विषय हे मराठी भाषेच्याद्वारा शिकविले जातील, व विश्वविद्यालयांत मराठीच्याद्वारें व मराठी विषयाची स्वतंत्र परीक्षा घेतली जाईल. इंग्लंड, जर्मनी, फ्रान्स वगैरे राष्ट्रांत तद्देशीय भाषेंतून शिक्षण दिलें जातें आणि म्हणूनच त्यांच्या भाषेंतील शब्दभांडारांत दिवसागणिक भर पडत आहे. याला अपवाद म्हणजे आमचा दुर्दैवी हिंदुस्थान देश होय. जेव्हां महाराष्ट्र युनिव्हर्सिटी स्थापन होईल तेव्हां या कोशांचा खरा व पूर्ण उपयोग होईल. आज या कोशांचा उपयोग, जे गृहस्थ महाराष्ट्र युनिव्हर्सिटीचा प्रश्न काढतांच मराठी ग्रंथ कोठें आहेत, कोश कोठें आहेत वगैरेसारख्या अडचणी म्हणून दाखवितात त्यांचीं तोंडें बंद करण्यास तरी खास होईल. पुढें उत्पन्न होणारी उणीव भरून काढण्यास अशा तऱ्हेचे कोश होणें हें अत्यंत जरूर आहे.

## कोशाची समृद्धि

आतां अशा तऱ्हेचा कोश कितीं अंगांनीं समृद्ध करतां येईल हें पाहूं. मुख्यतः संस्कृत, जुनें मराठी, प्रांतिक बोली, परकी व ग्राम्य, इतक्या प्रकारच्या शब्दांचा समावेश अशा कोशांतून व्हावयास पाहिजे. परक्या भाषेंतील शब्दांवर बहिष्कार घालून त्यांना दूर लोटण्याची सावरकरी पद्धत मला मुळींच मान्य नाहीं. मराठी संस्कृति ही संस्कृतावर अवलंबून असल्या-मुळें संस्कृत भाषेंतील सर्व शब्द आपल्या कोशांत बेशक घ्यावे. कारण

आजीचें धन हें स्त्री–धन असल्यामुळें तें नातीला (मराठीला) सर्वच्या सर्व घेण्याचा अधिकार आहे. या कोशांत अग्नयायतन किंवा अधोर्ध्व असा शब्द दिला आहे. हा मराठी शब्द कसा होतो ? असे जर शब्द चालतात तर मग संस्कृत वाङ्मयाचा मुलूख खालसा करून त्यांतील सर्व शब्द घेण्यांत हरकत काय आहे ? हा एक मार्ग झाला. दुसरा मार्ग म्हणजे जुन्या मराठींतले शब्द. ज्ञानेश्वरींतले शब्द कोणी आपल्या लेखांत लिहिलेले वाचावयास मिळाले तर आपणांस नवीन ज्ञान प्राप्त झाल्याचा आनंद होतो. मग त्यांतील सर्व शब्दांचा सरसहा उपयोग करून हा आनंद द्विगुणित कां करूं नये ? जुन्या मराठींतले शब्द, एक ठिकाणीं करण्यास फारसे आयास पडावयाचे नाहींत. कारण अपरिचयत्वाच्या दृष्टीनें महत्त्वाचे शब्द थोडे सांपडतील. यानंतर धंद्यांतले शब्द. यांचा उपयोग उदाहरणें देण्याच्या दृष्टीनें फार आहे व सामान्य खेडवळ जनता व तुम्ही सुशिक्षित लोक यांचा एकजीव होण्यास हेच शब्द उपयोगी पडतील. तसेच ऐतिहासिक वाङ्मयांतील पार्शिअन व अरेबिक शब्द. यांचाहि समावेश मराठी शब्दकोशांत करून घेतला पाहिजे. आपल्या पूर्वजांनीं ज्या शब्दांना दूषण मानलें नाहीं त्या शब्दांवर आपण बहिष्कार टाकण्याचें कारण काय ? अशा शब्दांना आपल्या मराठी व्याकरणाचे प्रत्यय लावून त्यावर आपल्या संस्कृतीचा संस्कार केला म्हणजे झालें. इंग्रज बायको करून घेणारा हिंदु मनुष्य व्रात्यस्तोमविधीनें आपल्या बायकोला हिंदु करून घेत नाहीं का ? मग परकी शब्दांवरच बहिष्कार कां ? तेथें आपण आक्रमणपर वृत्ति ठेवावी. ज्ञान कोठल्याहि देशांतलें असलें तरी तें पवित्रच. मग शब्दानेंच काय पातक केलें आहे ? शब्दकोश म्हटला कीं तो नेहमीं पवित्र. त्यांत सुश्लिल, अश्लील असा भेदभाव नसतो. या दृष्टीनें पाहतां ग्राम्य शब्दांचाहि समावेश कोशांत केला पाहिजे. ग्राम्य शब्द झाले तरी ते आपल्या भाषेंतलेच असतात. तसेच नवीन शब्द बनवून तेहि शब्दकोशांत घातले पाहिजेत. कारण भाषा, व्यवहार, कायदा, लोकमत, रूढि, शास्त्र यांची समव्याप्ती कधीं होतच नाहीं. या जोड्यांचा नेहमीं पाठशिवणीचा खेळ सुरू असतो. व्यवहार नेहमीं पुढें, भाषा त्याच्या मागें अशी स्थिति नेहमींच असते. असो. अशा तऱ्हेनें सर्व बाजूंनीं शब्दकोशाचा ग्रंथ समृद्ध करण्यास

प्रत्येकानें मदत केली पाहिजे व संपादक मंडळानेंहि आक्रमणशील दृष्टि ठेवून शब्दकोश तयार करण्याचें कार्य केलें पाहिजे.

## ४९ दिंडी कवितेची छाननी

ग्वाल्हेरचे श्री. कृ. गोखले यांनीं प्राध्यापक माधवराव पटवर्धन यांच्या दिंडीच्या व्याख्येवर आक्षेप घेतांना असें म्हटलें आहे कीं, दिंडीचा सतरा अक्षरांचा चरण होऊंच शकत नाहीं. पण हें खरें नाहीं. उदाहरणाकरितां मी खालील चरण रचून देत आहें तो पहावाः—

सतत विकसित तव वदन–कुमुद बाले। ( १७ अक्षरें ) ही ओळ नुसती गेयच नव्हे तर सार्थहि आहे. दिंडीच्या चरणांत शेवटचीं दोन अक्षरें दीर्घ पाहिजेतच असें पटवर्धन म्हणत असतील तर तेंहि बरोबर नाहीं. कारण वरचीच ओळ खालीं लिहिल्याप्रमाणें रचितां येईल.

सतत विकसित तव वदन-कुमुद गमतें ( १८ अक्षरें ) माझ्या मतें दिंडीच्या व्याख्येंत किंवा वर्णनांत खालीं दिलेलीं लक्षणें किंवा बंधनें असतात.

१ दिंडीच्या चरणाच्या एकंदर मात्रा एकोणीस असतात.

२ ह्या एकोणीस मात्रांचे स्वाभाविक रीतीनें दोन तुकडे पडतात. असे कीं, पहिल्यांत नऊ मात्रा व दुसऱ्यांत दहा मात्रा असाव्य.

३ दिंडीच्या चरणांत कमीत कमी अकरा अक्षरें असलींच पाहिजेत व अधिकांत अधिक अठराच असूं शकतील.

४ दिंडीच्या चरणांत कोठेंहि ओळीनें पांचाहून अधिक दीर्घाक्षरें असूं शकत नाहींत.

५ दिंडी हें तीन अक्षरी गणाचें वृत्त म्हणण्यापेक्षां एकोणीस मात्रांची जाति हें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल.

६ मात्र दिंडी ही जाति मानिली तरी तिच्या चरणांत कमींत कमी तीन लघु अक्षरें असावीं लागतात. उलट किती लघु अक्षरांची संख्या ओळीनें बसूं शकेल हें मी वर दिलेल्या उदाहरणांवरून सिद्ध होईल.

७ कमींत कमी हव्या असणाऱ्या तीन लघु अक्षरांपैकीं पहिलें लघु

अक्षर चरणाच्या पहिल्याच दोन अक्षरांत आगें किंवा मागें यावें लागतें. दुसरें लघु अक्षर चरणाच्या शेवटच्या सहा मात्रा भरून देणाऱ्या अक्षरांच्या लगेच मागें आलें पाहिजे. तिसरें लघु अक्षर मात्र मध्यंतरीं सोईप्रमाणें कोठेंहि येऊं शकेल. असें करतांना यतिभंग होऊं देणें न देणें हें कवीच्या कुशलतेवर अवलंबून राहील.

मी वर दिलेल्या नियमांना कोणा वाचकांनीं अपवाद दाखवून दिल्यास मी त्यांचा आभारी होईन.

---

## ५० वर्तमानपत्री धंद्याची शाळा

( १९३३ सालीं पुणें येथील संपादकसंमेलनाच्या पहिल्या दिवशीं केलेल्या भाषणाचा सारांश. )

' या विषयासंबंधीं माझा उल्लेख अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत केला आहे. परंतु १९२२–२३ सालीं मी केसरी कचेरींत वर्तमानपत्री शिक्षणाचा एक वर्ग वर्षभर ठेवला, तो तें शिक्षण तेवढ्यानें पुरें होईल अशा समजुतीनें नव्हे, तर टिळक महाविद्यालयांतून जीं मुलें टिळक विद्यापीठाची पदवी घेऊन बाहेर पडलीं.त्यांना पुढील चरितार्थाला उपयुक्त असें कांहीं शिक्षण मिळावें म्हणून. या पदवीधरांविरुद्ध आधींच लोकांचा दूषित ग्रह होता. व त्यांतच त्यांची बेकारी दिसली तर तो अधिक दृढ व्हावयाचा. म्हणून एक वर्षभर त्यांना महिना तीस रुपयांची शिष्यवृत्ति दिली. लागू विषयांचीं नवीं पुस्तकें खरेदी केलीं. केसरीच्या संपादक मंडळापैकीं कांहींनीं त्यांना इतिहास, अर्थशास्त्र, राजनीतिशास्त्र अशा विषयांचें थोडथोडें शिक्षण दिलें व बहुश्रुतपणाची दिशा सर्वसामान्यरीत्या दाखविली. पण हें काम खर्चाचें म्हणून पुढें हा वर्ग चालविला नाहीं.

वर्तमानपत्री शिक्षणांचा रीतसर वर्ग महाराष्ट्रांत कोणीं काढला तरी इतके विद्यार्थी फी देणारे मिळणार नाहींत कीं, फींतून वर्गाचा सर्व खर्च भागेल. शिवाय मुख्य मुद्दा हा कीं, हा धंदा वर्गांतून शिकवून कोणाला किती खरोखर येईल याला बरीच मर्यादा आहे. इतर अनेक लोकांप्रमाणें

वर्तमानपत्रकर्ता हा पुष्कळ उपजत गुणांचा असतो. शिक्षणानें मदत होत नाहीं असें नाहीं. तसें मी म्हणेन तर कोणत्याच शिक्षणाच्या शाळा नकोत असें म्हणण्यासारखें होईल. परंतु उपजत गुणाला या विषयांत मी बारा आणे किंमत देईन, तर शिक्षणाला चार आणे देईन. शिवाय हें शिक्षणहि एखाद्या वर्गांत दिल्यापेक्षां एखाद्या वर्तमानपत्राच्या कचेरींत राहून विद्यार्थ्यानें खालपासून वरपर्यंत जात जात शिकत शिकत मिळविलेलें बरें. याला अप्रेंटिसशिप म्हणतां येईल; व पाश्चात्य देशांत औद्योगिक किंवा शास्त्रीय शिक्षण हें शिक्षणाच्या वर्गापेक्षां कारखान्यांतच अधिक मिळतें. फक्त अमेरिकेंतच वर्तमानपत्री शिक्षणाचें विद्यापीठ आहे असें वाटतें. त्या देशांत वर्तमानपत्रांचे प्रकार व तऱ्हा इतक्या आहेत व धंदाहि इतका मोठा चालतो कीं, या शिक्षणाचे वर्ग तेथें चालू शकतील. पण हिंदुस्थानांत अजून ती वेळ आली नाहीं असें वाटतें.

आजपर्यंत इकडे जितके नामांकित वर्तमानपत्रकार होऊन गेले त्यांपैकीं कोणींहि असें शिक्षण घेतलेलें नव्हतें. किंवा आजहि वर्तमानपत्रांच्या कचेऱ्यांतून अनुभविक संपादक आपल्या हाताखालच्या लोकांना विद्यार्थ्यांसारखें पढवितात, किंवा शाळेंतील एक्झरसाइज बुकाप्रमाणें त्यांचे लेख तपासून गुणदोषचर्चा करतात, असें घडत नाहीं. शिकावयास मिळतें तें इतकेंच कीं नेमून दिलेला विषय लिहावा, किंवा स्वत: घेऊन लिहावा; व तो लेख अखेर प्रसिद्ध होतांना त्यांत कमजास्त काय झालें असेल तें पाहून पुढें सुधारणा करावी. अशा क्रमानें निरनिराळे विषय हातून लिहून होतात. पण एखाद्या गणपति करण्याच्या कारखान्यांत मूर्ति करावयाला शिकण्याप्रमाणें संपादकीय कचेरींतील शिक्षण असतें. आपल्या हातानें शाडूचा ओला गोळा घ्यावा. कांहीं मनानें व कांहीं समोरच्या मूर्ती पाहून चित्र बनवावें. आणि तें नापसंत ठरल्यास ती मूर्ति मोडून पुन: त्याचा शाडूचा गोळा करावा.

लेखकाचें शिक्षण घेणारानें स्वत: आपल्याच हातानें आपले लेख फाडण्यास शिकलें पाहिजे; किंवा कोणी ते नापसंत करून फाडले तर त्याबद्दल विषाद न मानण्यास तयारी ठेविली पाहिजे. सामान्य चार ओळींची बातमी लिहिण्यापासून अग्रलेख लिहिण्यापर्यंत कितीतरी प्रकारचें

लेखन वर्तमानपत्रांत असू शकतें. आणि त्यापैकीं आपण कोणत्या प्रकारचें लेखन लिहिण्यास पात्र आहों हें, नवीन लेखकाला मजकूर लिहून काढून व फाडूनच अधिक शिकतां येईल. कांहीं गोष्टी शिकवून येतील; पण त्या फार थोड्या. आणि कांहीं तर कधींच शिकवून येणार नाहींत. माझें स्वत:चेंच उदाहरण वाटल्यास सांगतों. तें असें कीं, टिळक काय लिहितात, कसें लिहितात हें मीं त्यांच्या सन्निध राहून पंचवीस वर्षें पाहात होतों. त्यांनीं तोंडानें सांगितलेला मजकूरहि मीं आपल्या हातानें किती तरी लिहिला असेल. परंतु त्यांची भाषाशैली मला कधींहि आपलीशी करतां आली नाहीं तसेंच इतर कित्येकांना त्यांचा मार्मिकपणा ( जजमेंट ) आपलासा करतां आला नाहीं.

तात्पर्य, आदर्श वर्तमानपत्रकार हा उपजत गुणाचा असतो कीं शिकून तयार होतो हा वाद, आणि इतर कित्येक ठराविक वाद सारखेच आहेत. ईश्वरनियती खरी कीं व्यक्तिस्वातंत्र्य खरें ? नशीब खरें कीं उद्योग खरा ? आनुवंशिक संस्कार खरे कीं परिस्थिति खरी ? या वादांत आपण जशी आणेवारीची वांटणी करतों, तशीच या वादांतहि केली पाहिजे. वर्तमानपत्रांत लिहितां येणार नाहीं असा मनुष्य सहसा मिळणार नाहीं. पण त्यांत विशेष प्रकारची कर्तबगारी सिद्ध होणें हें उपजत गुणांनींच होईल. माझ्या मतें लोकांना लिहिण्याची आस्थाच कमी, पात्रता कमी असें नाहीं. आपलें एखादें मत बनलें तर तें लोकांना सांगावें शिकवावें याची खरी हौस ज्याला असेल, किंवा लेखनकलेंत रंगण्याची हौस ज्याला असेल, तोच चांगला वर्तमानपत्रकार होईल. पण वर्तमानपत्री लिहिण्याला धंद्याचेंहि स्वरूप असत नाहीं असें नाहीं.

वर्तमानपत्रकार म्हटला म्हणजे तो देशभक्त असें समजण्याची खेडेगांवांत लोकांची रीत आहे. पण केवळ संपादक म्हटला म्हणजे तो देशभक्त किंवा संपादकाबाहेर देशभक्त नाहीं, अशी बुद्धि लोकांची होणें योग्य नाहीं. म्हणून मी कोठेंहि खेडेगांवीं गेलों तरी मुद्दाम सांगत असतों कीं देशभक्ति करण्याचा अधिकार सर्व लोकांस सारखाच आहे. जसा आपल्या आईवर प्रेम करण्याचा अधिकार त्या आईच्या सगळ्या मुलांना सारखा असतो. याचाच उलट प्रकार असाहि आढळतो कीं, वर्तमानपत्रें हीं जर देशभक्तीकरितां चालवावयाचीं तर त्यांना वर्गणी घेऊं नये असेंहि म्हणणारे

भोळे लोक आढळतात ! “ टिळक जर खरे देशभक्त तर त्यांनीं केसरी पत्र वर्गणी न घेतां लोकांना वांटावें ! ” असें म्हणणारा अवलिया मीं पाहिलेला आहे. पण हें म्हणणेंहि चूक. खरें हेंच कीं, वर्तमानपत्राला जशी देशसेवेची एक बाजू आहे, तशी धंद्याचीहि एक बाजू आहे. म्हणून बाहेर खेडेगांवीं जातों तेव्हां मी होऊन लोकांना सांगतों कीं, देशभक्त हें आडनांव ठीक आहे; पण कोणी संपादकाच्या कामाखेरीज इतर कांहीं खऱ्या देशभक्तीचें काम करीत असेल तरच त्याला देशभक्त म्हणावें. प्रत्येक संपादक लिहितो त्यांतलें कांहीं उपजीविकेचें साधन म्हणून, किंवा पगारी काम म्हणून व कांहीं तो स्वतःच्या हौसेनें लिहितो म्हणजे कलाविलासा-करितां लिहितो आणि कांहीं लिहितो तें देशहितबुद्धीनें प्रेरित होऊन बोधसेवा करण्याकरितांच लिहितो.

मामुली काम करण्याला वर्तमानपत्राच्या कचेरींत जितके लोक लाग-तात तितके सहज मिळतात. वर्तमानपत्रांच्या कचेरींतील नोकरीकरितां इतके अर्जदार येतात कीं, त्यांना नकारच द्यावा लागतो. दुसरें कांहीं येत नाहीं तर वैद्यकी कर किंवा मुखत्यार वकील हो असें पूर्वीं म्हणत, त्याप्रमाणें दुसरें कांहीं येईना तर संपादक हो अशी म्हण पडण्याची भीति वाटूं लागली आहे. तथापि ‘ नवीन व उत्कृष्ट ’ याची जागा कोणत्याहि धंद्यांत नेहमीं रिकामीच असते; त्याप्रमाणें वर्तमानपत्रांच्या कामांतहि आहे. मजकडे नोकरी मागावयास येणाऱ्या सर्वांना मी सांगत असतों कीं, केसरींत काय असतें हें तुम्ही पाहातच आहां. तरी त्यांत जें कांहीं नाहीं असें एखादें नवें व लोकोपयोगी असें लेखनाचें अंग जोडण्याची तुमची तयारी असल्यास, तुम्हांस नोकरी मिळण्याचा संभव आहे. इतर अनेक वर्तमानपत्रकारांनाहि त्यांच्या कचेरींत नोकरी मिळवूं इच्छिणारांना असेंच सांगावें लागत असेल. ही झाली पगारी नोकर होऊं इच्छिणारांची गोष्ट. पण मतप्रकाशनाची हौस, लेखनकलेची हौस, ज्यांना आहे अशा लोकांना घरबसल्याहि वर्तमानपत्रांत लिहितां येऊं शकतें. त्यांच्या लेखांना, ते तसेच चांगले असल्यास, प्रसिद्धी मिळते व मोबदलाहि मिळूं शकतो.

पुण्यांत काय किंवा जिल्हानिहाय काय, बुद्धिमान लोक म्हणजे लेखक होण्याच्या योग्यतेचे लोक किती तरी आहेत. तथापि जिल्हानिहाय वर्त-

मानपत्रें चालविणें फायदेशीर होत नाहीं. याचें कारण कांहीं थोडें लिहिण्याची हौस कमी, पण कांहीं थोडें असेंहि खरें कीं बाहेर गांवच्या लोकांना अद्यापि वर्तमानपत्र विकत घेऊन वाचण्याची गोडी असावी तितकी नाहीं. एरवीं एक जिल्हा म्हटला म्हणजे लाखों लोकांची वस्ती. त्यांच्याविषयीं बातमी व त्यांना बोधप्रद असें लेखन ज्यांत आहे असें दर जिल्हानिहाय निदान एक वर्तमानपत्र चालून फायदेशीर होण्यास हरकत नाहीं. तात्पर्य, या सर्व दृष्टींनीं पाहतां वर्तमानपत्री शिक्षणाची शाळा आज कितपत चालेल याची शंकाच आहे. तथापि दिवस मात्र असे येत आहेत कीं वर्तमानपत्राच्या धंद्याचीं कांहीं कांहीं अंगें मुद्दाम शिकवून लोक तयार करतां येतील तर बरें. समाजाचा संसार सर्व बाजूंनीं इतका वाढला आहे कीं, श्रमविभाग करण्याचीच वेळ येत आहे. वर्तमानपत्राच्या एक एक वेगवेगळ्या अंगासंबंधानें एक एक तज्ज्ञ शिकून किंवा अनुभवानें तयार होईल तर चांगलें. आतां लोकांना तात्त्विक लेखनापेक्षां बातम्या गोष्टी, संवाद, विनोद, चटकदारपणा या गोष्टी अधिकाधिक आवडूं लागल्या आहेत. या सर्वांना वर्तमानपत्रांतून स्थान मिळालें पाहिजे. कारण वर्तमानपत्र हेंच भावी लोकशिक्षणाचें मुख्य साधन होणारें आहे.

---

## ९१ कल्चर मोत्यांचा वाद

एकदां वाद सुरू झाला म्हणजे कशांतूनहि कांहींहि निघतें. असाच प्रकार कल्चर मोत्यासंबंधाचा झाला आहे. कारण विदेशी मालाच्या जाहिरातीच्या खुलाशांत कल्चर मोत्याचें मराठी भाषांतर करावें लागलें; व आतां त्यांतून योग्यायोग्य मराठी प्रतिशब्दाबरोबर, त्या मोत्यांचा खरेखोटेपणा किंवा गुणधर्म या संबंधाचाहि उपवाद निघूं पाहत आहे. तथापि ही गोष्ट इष्टच होय. कारण या वादांतून कल्चर मोत्यासंबंधानें अधिक माहिती वाचकांना मिळेल, व उलटसुलट दोनहि प्रकारच्या कांहीं शंका दूर होतील.

प्रथम कल्चर शब्दाच्या भाषांतरासंबंधानें पाहूं. आम्हाकडे यासंबंधीं अनेक पत्रें आलीं आहेत, व त्यांतील अनेक पर्याय शब्द पाहिले म्हणजे

मन गोंधळून जातें. तथापि नवीन शब्दाबद्दल कोणी तरी कांहीं तरी रूढि धिटाईनें पाडावी लागते, व हा रूढ शब्द एकंदरीनें बरा असल्यास तोच पुढें कायम होतो. आम्ही दहा वर्षांपूर्वी आमदार, खासदार व नामदार असे तीन शब्द, १ स्थानिक कौन्सिल, २ वरिष्ठ कौन्सिल व ३ कौन्सिल ऑफ स्टेट यांच्या सभासदांचा भेद दर्शविण्याकरितां मुद्दाम बनवून योजले ते आतां हळूहळू रूढ झाले आहेत.

असो, या विषयावर ज्यांनीं आम्हाकडे पत्रें पाठविलीं, त्यांपैकीं रा. माधवराव मोडक हे 'लावणीचे' मोती असा शब्द सुचवितात. जळगांवचे सोन्यामोत्यांचे व्यापारी रा. माधवराव खांबेटे हे लिहितात कीं, 'कल्चर' म्हणजे 'कृत्रिम' नव्हे. शुक्रनीतींत कृत्रिम हा शब्द बनावट या अर्थी योजला आहे तो श्लोक असाः—

कुर्वन्ति कृत्रिमं तद्वत् सिंहलद्वीपवासिनः ।
तत्संदेहविनाशार्थं मौक्तिकं सुपरीक्षयेत् ॥

तसेंच 'मानसोल्लास' व 'अगस्तिमत्' यामध्येंहि कृत्रिम हा शब्द बनावट या अर्थीच वापरला आहे. पण वरील ग्रंथकारांच्या वेळीं कल्चर मोतींच नव्हतीं, तेव्हां तीं असतीं तर त्यांनीं कोणता शब्द लावला असता हें सांगवत नाहीं. स्वतः रा. खांबेटे यांनींहि आपल्या पुस्तकांत कल्चर याचें भाषांतर 'लावणीचीं' मोतीं असें केलें आहे. कारण कल्चरच्या कृतींत बीजारोपणाचा अर्थ येतो; आणि कल्चर मोतीं सोडून इतर बाबतींतहि बीजसंवर्धन व फलप्राप्ति अशा अर्थीच 'कल्चर' शब्द लावतात.

## देवधर काय म्हणतात

रत्नागिरीचे रा. दत्तात्रय कृष्ण देवधर यांनीं या विषयावर एक अत्यंत चिकित्सक व मार्मिक लेख आमचेकडे लिहून पाठविला आहे. आणि कदाचित् हा मोत्यांचा वाद सोडला तरी प्रतिशब्दघटनेच्या अवघड विषयांतहि शब्दकोशकारांना मार्गदर्शक होण्यासारखा तो लेख आहे. रा. देवधर लिहितात कीं, "कल्चर याचें भाषांतर 'कृत्रिम' या शब्दानें करण्यांत कोणताहि दोष नाहीं. योग्य शब्द न सांपडल्यास लेखकानें काय करावें ? असे योग्य शब्द सांपडत नाहींत म्हणून कॉलरा, कागद असे परकीय शब्दच रूढ होतात. इंग्रजानें मँगो हा शब्द मंगॉय या मल्याळी शब्दावरून घेतला आहे. आणि पेपर हा शब्द त्यांनीं पॉप्युरा या परकी शब्दावरून

घेतला आहे. असें न करतां केवळ भाषांतर करण्याचा आग्रहच जर कोणी धरला तर रा. सावरकर यांनीं 'फाउंटन पेन' याचें भाषांतर 'अखंड लेखणी' किंवा 'मशीप्रसू' असें केलें आहे, तसा प्रकार व्हावयाचा! रिक्रूटच्या ऐवजीं 'रंगरूट' हा शब्द विनोदानें वापरतां वापरतां रूढ झाला. पण 'प्रॉमिसरी नोट' याच्या ऐवजीं 'परमेश्वरी' हा अजून रूढ झाला नाहीं. रा. देवधर म्हणतात, 'टाइप' या शब्दाचें भाषांतर 'टंक' या शब्दानें १२ वर्षांपूर्वी प्रथम मी केलें. तो शब्द आतां बहुतेक रूढ झाला आहे. 'स्टीरिओ टाईप' याला 'स्थिर टंक' हा शब्द लो. टिळकांनीं मला पूर्वी सुचविला होता, पण तो अद्यापि तितका रूढ झाला नाहीं.

कल्चर या शब्दाचें भाषांतर काय करतां येईल म्हणून विचार करतां खालील विचारपरंपरा उत्पन्न झाली. कल्चर पर्ल याला 'उप-मोतीं' कां म्हणूं नये? जसें 'वन' हें ईश्वरीकृत व 'उपवन' हें मनुष्य-कृत! हे शब्द देखील मनुष्यप्रयत्नच सुचवितात. किंवा कल्चर म्हणजे 'संस्कृत' 'सुधृत' असें म्हणण्यास काय हरकत? किंवा 'अर्धकृत्रिम' असा शब्द कां लावूं नये? कारण सर्वस्वी नैसर्गिक नसलें तरी निस-र्गाच्या बराच जवळ कल्चर मोतीं हा आहे. गोळीबंद बीजभूत मोतींच कालवाच्या अंगांत घालून त्याचा गोळीबंद मोती होईल, त्याला तो पहिल्यापेक्षां अधिक चांगला म्हणून 'सुसंस्कृत' असेंहि म्हणतां येईल. किंवा 'किमयेचा मोतीं' असाहि शब्दप्रयोग करावा. किमयेनें सोनें बनवितां येतें, पण त्याला कोणी खरें सोनें मानीत नाहीं. कारण छेद, दाह व निकश या तीन कसोट्या किमयेच्या सोन्याला लागूं शकत नाहींत. कल्चर याला 'निमखरें' असेंहि म्हणतां येईल.

## खांबेटे काय म्हणतात.

रा. खांबेटे लिहितात कीं, 'सूर्यारुणसंवाद' नामक एका जुन्या ग्रंथांत 'वादीखंड' प्रकरणांत माशाच्या डोळ्यापासून मोतीं करण्याच्या कृति सांगितल्या आहेत, व त्याला 'कृत्रिम मौक्तिक' हें नांव दिलें आहे व तें सार्थ आहे. कल्चर मोत्याच्या गाभ्यांत स्वत: मोती नसतें, तर खडा कण किंवा मोत्याच्या शिंपल्याचा एखादा गुळगुळीत तुकडा असतो. अर्थात् जें सबंधच्या सबंध खरें मोती नाहीं त्याला घडीव, बनावट असें

न म्हटलें तरी निदान कृत्रिम, निमखरें असें म्हणण्यास हरकत नाहीं. नाहीं तर देवधर यांच्या म्हणण्याप्रमाणें "कल्चर 'विश्वामित्री मोतीं' किंवा 'कृत्रिम शुद्ध' असा शब्द बरा होईल. किंवा मुक्तीचे चार प्रकार लक्षांत घेतले असतां कल्चर मोत्याला सरूप मोती (सरूप मुक्ती-प्रमाणें) हा शब्द लावतां येईल. अंतर्बाह्य घडण सर्वस्वी नैसर्गिक असेल तर त्याला 'सायुज्य' मोती असें म्हणतां येईल." शेवटीं देवधर लिहितात कीं, "आमच्या मोत्याच्या व्यापाऱ्यांनीं हा शब्दाचा वाद सोडून द्यावा, व जपानी लोकांप्रमाणें मोत्याची शेती कशी होईल याकडेच अधिक लक्ष द्यावें. म्हणजे कल्चर मोत्यें देखील स्वदेशी या सदराखालीं पडूं शकतील."

यासंबंधांत मुंबईचे मोत्यांचे व्यापारी रा. भागवत यांच्याकडून पुन: एक पत्र आलें. त्यांत त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, "मुंबईचे व्यापारी रा. जी. एस् रानडे यांनीं सुचविल्याप्रमाणें कल्चर याचें भाषांतर 'संवर्धित' असें करूं नये, तर झाडांच्या लागवडीची उपमा घेऊन कल्चर मोत्याला 'बागायती' मोतीं असें म्हणावें. आणि नैसर्गिक मोत्याला 'जंगली' असें म्हणावें." या शब्दांनीं गिऱ्हाइकांचें समाधान झाल्याचें रा. भागवत लिहितात. पण समानार्थक शब्दांचा भेद दाखविण्याच्या आपत्तीनें आपल्या कल्चर मोत्याकडे 'बागाइती' हा चांगला शब्द घेऊन खऱ्या मोत्यांना 'जंगली' हा शब्द लावला तर तें खऱ्या मोत्यांचे व्यापारी बरें मान्य करतील? जंगली हा शब्द-प्रयोग अगदींच जंगली झाला असें आम्हाला तरी वाटतें! शेवटीं निरुपाय होऊन रा. भागवत लिहितात कीं, "कल्चर हाच शब्द भाषेंत रूढ होईल तर फार बरें!"

### जंगली मोतीं

असो. पारिभाषिक शब्दांचा वाद किती जिकिरीचा होऊं शकतो हें वरील वादावरून वाचकांच्या पुरें लक्षांत येईल. पण या मोत्यासंबंधानें दुसरा एक मुद्दा अजून शिल्लकच राहिलेला आहे. तो असा. रा. भागवत व रा. रानडे यांनीं आमच्याकडे याविषयीं जें वाङ्मय पाठविलें त्यांत कल्चर मोत्यांना सर्वस्वी खऱ्या मोत्यांची योग्यता देतां देतां त्यांनीं ती इतकी दिली कीं, स्वस्त मिळणारीं कल्चर मोतीं टाकून देऊन महाग

मिळणारीं नैसर्गिक ( खरीं ) मोतीं घेणाऱ्या लोकांना त्यांनीं जवळ जवळ मूर्ख ठरविण्याइतका दोष दिला आहे ! पण आम्ही जरी त्यांतले तज्ज्ञ नसलों तरी सारासार विचार केला असतां आम्हांसहि कांहीं शंका येतात. कल्चर मोत्यांचे अभिमानी म्हणतात कीं " अहो ! कल्चर मोतीं हें खरेंच्या खरेंच. पण शिवाय हटकून गोळीबंद व अगदीं एका आकाराचें तयार होतें. शिवाय रंग, पाणी, टिकाऊपणा इत्यादि गुणधर्मांमध्यें त्यांच्यांत व नैसर्गिक मोत्यांत कांहींच फरक नाहीं."

पण प्रश्न असा कीं, इतका बेमालुमपणा कल्चर मोत्यांत असेल तर त्यांना कलचर मोतीं हें अर्थभेददर्शक नांव तरी कां द्यावें ? असें नांव देणारांनींच नैसर्गिक मोत्यापासून त्याचा भेद व कमीपणा आपण होऊन व्यक्त केला असें होत नाहीं काय ? जर कल्चर मोती सोळा आणे शुद्ध व खरें, तर तें बेलाशक खऱ्या मोत्यांत मिसळूनच कां सर्रास विकूं नये ? रंग, पाणी, टिकाऊपणा या सर्व गुणांत जर तें खऱ्या मोत्यांच्या सोळा आणे बरोबरीचें, तर केवळ एकजात गोळीबंद हा त्याचा गुण नष्ट होतो कीं काय ? व तो दोष समजावयाचा कीं काय ? A thing too good to be true अशी त्याची गोष्ट म्हणतां येईल कीं काय ? आणि विशेष असामान्य गोळीबंद आकार हा जर दोष नसून गुण म्हटला तर त्याला नैसर्गिक मोत्याहून पुष्कळ अधिक किंमत यावी ! पण व्यवहारांत तसें न होतां अगदीं उलट प्रकार दृष्टीस पडतो. अर्थात् अनुमान असें निघतें कीं, तज्ज्ञ सराईत व्यापारी व गिऱ्हाईक यांच्या डोळ्याला कल्चर मोती हें खऱ्यांत मिसळलें असतांहि नजरेनें वेगळें म्हणून हुडकून काढतां येईल.

### कल्चर मोति गौण कां मानतात

तात्पर्य, कल्चर मोत्यालाच सोळा आणे खरेपणा देणाऱ्यांवरच उलट या किंमतीच्या फरकाचा खुलासा करण्याच्या पुराव्याचा बोजा पडतो. आणि भारी किंमत येणारें तें खरें व कमी किंमत येणारें तें कृत्रिम असें म्हणण्यांत फारसा दोष येऊं शकत नाहीं. रा. खांबेटे यांच्या पत्रांत हें गुपित थोडेसें फोडलेलें आम्हाला आढळलें. पर्ल ट्रेडिंग कं. किंवा रा. जी. एस. रानडे यांच्या छापील पत्रकांत लिहिलेल्या कल्चर मोत्यांच्या उत्पादनाचा प्रकार रा. खांबेटे यांनाहि मान्य आहे. परंतु वरीलप्रमाणें दोहोंच्या किंमतींत फरक पडण्याचें कारण जें खांबेटे यांनीं दिलें आहे, तें

या छापील पत्रकांत न देतां, दोनहीं मोतीं गुणानें सर्वस्वी सोळा आणे बरोबरीचीं आहेत असें जें म्हटलें आहे तें मात्र सोळा आणे सत्य नाहीं इतकेंच आम्ही म्हणतों. व्यापारी जाहीर पत्रकांत मर्माची ही गोष्ट लिहिण्याची जबाबदारी व्यापाऱ्यावर कोणी घालणार नाहीं हें खरें. तथापि वादच निघाला म्हणजे तज्ज्ञ लोक कांहीं गैरसोयीच्या गोष्टी पुढें करणारच! रा. खांबेटे हे स्वतः मोत्यांचे व्यापारी असले तरी त्यांना कल्चर मोत्यांत जो कमीपणा आहे तो उघडपणें कबूल करावासा वाटतो. ते लिहितात, "कल्चर मोतीं चिनी, जपानी समुद्रांत मुख्यतः होतें. पण या समुद्रांतील कालवे इराणच्या व मानारच्या आखातांतील कालव्यांपेक्षां निराळ्या जातीचे असतात. म्हणजे या समुद्रांतील कालवांनीं केलेलीं किंवा त्यांजकडून करविलेलीं दोनही मोतीं रंगाला व तेजाला कमसर असतात म्हणून तीं डोळ्याला वेगळींच दिसतात. कल्चरचा प्रयोग इराणच्या आखातांत केल्यास रंगरूपामधील हा फरक निघून जाईल.

तथापि दुसराहि एक विशेष फरक आहे. तो असा कीं, स्वभाविकपणें कालव्याच्या अंगांत घुसलेले रेतीचे कण फार बारीक असतात. पण कलचरच्या प्रयोगांत मुद्दाम घुसवलेले कण मोठे असतात. म्हणून कल्चर मोती हें जरी कालवांनीं घातलेल्या रसाच्या थरांनींच तयार झालें, तरी कल्चरचे मोत्यांतील हे थर कमी जाडीचे असतात. म्हणून खरें मोतीं झिजत गेलें तरी पुष्कळ दिवस टिकतें व कलचर मोतीं लवकर झिजून निकामीं होतें. तसेंच विंधारी म्हणजे मोत्यास भोकें पाडणारे लोक भोकें पाडतांना खरीं व कल्चर मोतीं कोणतीं हें ओळखूं शकतात. त्यांचा अनुभव असा कीं, खरें मोतीं अधिक टणक म्हणून अधिक टिकाऊ, व कलचर मोतीं कमी टणक म्हणून कमी टिकाऊ असतें. शेवटीं रा. खांबेटे लिहितात कीं, कल्चर मोत्यांचा खरेपणा प्रस्थापित करण्यांत स्वाभाविक मोत्यांची सर्वांशीं बरोबरी आहे असें दाखविण्याचा उद्देश असल्यास तो मात्र वरील कारणामुळें बरोबर नाहीं. कल्चर मोत्यांस स्वाभाविक मोत्यांची योग्यता कधींहि येणार नाहीं; व त्यामुळें दोघांची तुलना करतांना कल्चर मोत्यांना कमी लेखलें तर त्यांची 'बदनामी' झाली असें म्हणणें योग्य नाहीं.

---

# ९२ रा. ऋषि व परलोकविद्या

( केसरी ता. १० जुलै १९३४ )

मी परलोकाचा द्वेष्टा नाहीं किंवा परलोकविद्येचा द्वेष्टा नाहीं; परंतु अशा बाबतींत प्रत्यक्ष अनुभवाला जें येतें तितकेंच मानणारा मी आहें. परवां नुकतीच रा. रामभाऊ मंडलीक यांनीं परलोकविद्येच्या प्रयोगाची माहिती केसरींत प्रसिद्ध केली. अर्थात् दुसऱ्या बाजूचीहि माहिती प्रसिद्ध होणें जरूर व न्यायाचें आहे, म्हणून माझाहि अनुभव मी देतों.

पुष्कळ वर्षांपूर्वीं, म्हणजे रा. ऋषी यांनीं या विद्येचा अभ्यास प्रथम सुरू केला तेव्हां, ते माझेकडे आले व प्रयोग पाहा असें म्हणाले. मी दोनतीनदां त्यांचे प्रयोग पाहिले. परंतु त्यांतून कांहींच निष्पन्न झालें नाहीं. घरीं प्रयोग केल्यानंतर मुद्दाम केसरी कचेरींत माडीवर एक प्रयोग केला. त्यांत कै. टिळकांच्या स्पिरिटला ऋषींनीं बोलावून घेतलें. तेव्हां त्यांना आम्ही मंडळींनीं दोन प्रश्न विचारले. एक प्रश्न असा होता कीं "टिळक विलायतेहून परत आले त्यानंतर तिकडील बँकेंत तिकडील राजकीय चळवळीकरितां ( फॉरिन प्रॉपॅगँडा ) किती पैसे मागें ठेवले ?" आमचा अदमास असा होता कीं, इकडे टिळक पर्सफंड तीन लाखांचा जमल्यामुळें, व होमरूल लीगचाहि फंड असल्यामुळें, टिळक बरीच मोठी रक्कम विलायती बँकेंत ठेऊन आले अशी बिनमाहितगार माणसाची समजूत सहज असावी ! म्हणून ऋषि हे बहुधा असें उत्तर देतील कीं, रक्कम बरीच मोठी असावी !! आणि अखेर आमच्या अपेक्षेप्रमाणेंच ऋषि यांनीं उत्तर देवविलें, व तिकडील बँकेंतील शिल्लक रकमेचा आंकडा एक लक्ष रुपये सांगितला. पण वस्तुत: टिळकांनीं विलायतेहून येतांना एक पैदेखील विलायती बँकेंत मागें शिल्लक ठेवली नव्हती. फार काय, सामान्य प्रवाशाजवळ जितकी रक्कम असावी इतकीच त्यांचेजवळ बरोबर येतांना होती. अर्थात् टिळकांच्या स्पिरिटनें दिलेलें उत्तर खोटें ठरलें. दुसरा प्रश्न असा होता कीं, "टिळकांनीं जी गीतारहस्याची आवृत्ति शेवटची काढली तिच्या प्रतीची किंमत त्यांनीं

किती ठेवली होती ?" पण टिळकांच्या स्पिरिटला हेंहि सांगतां आलें नाहीं. या दोन गोष्टींवरून जें अनुमान काढावयाचें तें वाचकांनीं काढावें.

परलोकविद्या ही तत्त्वत: व बीजत: खरी असेल. पण वाटेल त्या मृत मनुष्याच्या आत्म्याला बोलावून आणून त्याजकडून इहलोकची माहिति आपण सांगवितों असें म्हणणें हें एक मोठें धारिष्ट आहे इतकेंच मी म्हणतों. माझी श्रद्धा आहे ती अनुभवजन्य सत्य ज्ञानावर आहे; आणि ऋषींच्या परलोकविद्येचा तसा अनुभव मला अद्यापि आलेला नाहीं. त्यांची पुनः प्रयोग करून दाखविण्याची तयारी असल्यास तसें करून पाहण्याला मी व माझे कित्येक मित्र तयार आहों. प्रयोगाच्या आमच्या अटी अगदीं साध्या आहेत. पाटीवर जें कांहीं लिहावयाचें तें आमच्या हातून लिहिलें गेलें पाहिजे. म्हणजे मृताच्या आत्म्यानें तें आम्हांपैकीं कोणाच्या तरी हातून लिहविलें पाहिजे. दुसरा एक साधा प्रयोग आम्ही सुचवितों तो असा कीं, एकीला लागून असलेल्या दुसऱ्या खोलींत आम्ही, ऋषि किंवा त्यांचे मीडियम यांना न दाखवितां, कांहीं वस्तु मांडून ठेवतों व दार बंद करून घेतों. नंतर ऋषि यांनीं लगतच्या खोलींत बसून वाटेल त्या स्पिरिटला बोलावून आणून, त्याजकडून बंद केलेल्या खोलींतील वस्तु काय आहेत व कशा मांडल्या आहेत तें सांगावें. किंवा अशाच प्रकारचा दुसरा एकादा साधा प्रयोग निर्णयार्थ त्यांनीं सुचवावा. त्यांची परलोविद्या पक्की किंवा खरी आहे असें आम्हीं न मानलें तर आम्ही त्यांची निंदा करण्याकरितां किंवा मत्सरबुद्धीनें तसें करतों असें त्यांनीं समजूं नये. सत्यासत्यनिर्णयाला कोणती कसोटी लावावी याविषयीं फारसें दुमत होण्याचें कारण नाहीं आणि तसली कोणतीहि कसोटी लावून आम्ही हे प्रयोग जाहीर रीतीनें करून पाहण्यास तयार आहों. आम्ही श्रद्धाळू नाहीं हा वाटल्यास आमचा दोष म्हणावा. पण आम्हाला सत्यान्वेषणाची प्रामाणिक बुद्धि नाहीं इतकें कोणी न म्हटलें म्हणजे झालें. आम्ही लिहितों तें ऋषिप्रमाणेंच दुसरे जे कोणी परलोकविद्येचें समर्थन करणारे असतील त्यांनाहि उद्देशून आहे असें समजावें.

---

# ९३ शिवजयंत्युत्सव

(पुणें भारत स्वयंसेवक मंडळातर्फे ता. २५ मार्च १९३२ रोजीं श्री शिवाजी जन्मतिथ्युत्सव साजरा करण्यांत आला त्या प्रसंगाचें भाषण )

" व्याख्यात्यांनीं उत्तम माहिती मिळवून साधार व्याख्यान दिलें. अर्थात् तें चांगलें झालें हें सागणें नको. व्यक्तीसारखी व्यक्ति असतां लोकोत्तर कार्य शिवाजीनें केलें हें सांगणें जरूर आहे. शिवाजीमहाराजांच्या मागें नुसतीं स्तुतीचीं विशेषणें लावण्यानें विशेष परिणाम होत नाहीं. ताजमहालाच्या दारावर ' हा पृथ्वीवरील स्वर्ग येथें आहे ' अशी पाटी लावली तरी ती वाचून कोणाचें समाधान होत नाहीं. तर प्रत्यक्ष दर्शन घेऊनच तें सुख अनुभवलें म्हणजे समाधान होतें. हातांत दहा हजारांची नोट दिली व ती न मोडतां तीवर आपली गुजराण कर, असें कोणाला सांगितलें तर हातांतील नोटेनें कांहीं पोट भरत नाहीं. ती मोडूनच शिधासाहित्य घेतलें पाहिजे. तसें मोठ्या व्यक्तीबद्दल नुसती स्तुति गाण्यापेक्षां ती मोठी कां हें पृथक्करणपूर्वक ऐकण्यांत खरें स्वारस्य असतें.

इतिहासांत बखरीला महत्त्व होतें. पण जेव्हां इतिहासाचीं साधनेंच उपलब्ध नव्हतीं तेव्हां तें महत्त्व ठीक होतें. अलीकडे डच इंग्लिश रेकॉर्डांतून साधनें उपलब्ध झालीं आहेत त्यांचें संशोधन करून सत्य माहिती मिळणें शक्य झालें आहे. नव्या युगांत नवें प्रवर्तन होतें, त्याप्रमाणें अलीकडे इतिहासाचीं नवीं साधनें उपलब्ध झालीं आहेत; त्या नव्या नव्या कागदपत्रांवरून केलेला शास्त्रीय पद्धतीचा अभ्यास हाच खरा आनंद देणारा असतो. सत्याचा आनंद जसा अपूर्वाईचा तसें सत्य अशा इतिहासाच्या आनंदाचेंहि आहे. बखरकार हे शिवाजीच्या काळाला जवळ असले तरी त्यांच्यापेक्षां दूरच्या कालांतील हल्लींचे संशोधक यांनाच त्याची खरी व विश्वसनीय माहिती मिळाली आहे. कारण त्यांना कागदपत्र उपलब्ध आहेत. शिवाजीच्या चरित्राकडे पाहिलें तर असें दिसून येतें कीं जन्मतःच तो राजा होता. जीव घेण्याची सत्ता ही राजाची अंतिम सत्ता होय. ती शिवाजीला जन्मतः होती. पण त्यानें मोठेपणीं हें केलें कीं आपला मुलूख वाढविला, इभ्रत वाढविली, सत्ता वाढविली व इतर राजांकडून

बरोबरीचा मान मिळवून घेतला. परंतु त्याचें महानुभावित्व पाहावयाचें असेल तर तपशिलांत गेलें पाहिजे व त्या तपशिलांतील गोष्टी पाहिल्या म्हणजे त्याचा मोठेपणा पटतो. तसा तो आजच्या व्याख्यात्यांनीं पटवून आनंद दिला याबद्दल मी सर्वांच्या वतीनें त्यांचे आभार मानतों."

---

# प्रस्तावना

## १ कोल्हटकर लेखसंग्रह

माझे स्नेही रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या 'सुदाम्याचे पोहे' या नांवाच्या पुस्तकाला मी पूर्वी १९१० सालीं त्यांच्या विनंतीवरून प्रस्तावना लिहिली होती. त्याला आज बावीस वर्षें झालीं. हल्लीं त्यांच्या टीकात्मक व इतरही लेखांचा समग्र ग्रंथ छापून निघत असून त्यालाही मीच प्रस्तावना लिहावी, अशी विनंति रा. माडखोलकर व रा. खांडेकर यांनीं मला केली. तीही मीं अत्यंत आनंदानें मान्य केली. कारण या निमित्तानें रा. कोल्हटकर यांच्या वाङ्मयसेवेचे गुणगौरव करण्याची मला आणखी एक संधि मिळणार आहे. मात्र मला यांहीपेक्षां अधिक आनंद देणारी अशी एक गोष्ट होऊं शकली असती. ती म्हटली म्हणजे, रा. कोल्हटकर यांचे फक्त टीकात्मक लेख वगैरेच एकत्र छापून निघत आहेत त्याऐवजीं, त्यांच्या एकंदर म्हणजे काव्य, नाटक, लघुकथादि सर्व वाङ्मयाचीच आवृत्ति एकदम एकत्र निघणें, ही होय. कोल्हटकर यांचें वय व प्रकृति लक्षांत घेतां, त्यांचे हातून यापुढें विशेषसा लेखनव्यवसाय होणें फारसें संभवनीय दिसत नाहीं. यामुळें, त्यांचे देखत त्यांच्या एकंदर लिखाणाची नवीन व स्वतंत्र आवृत्ति काढतां आली, तर त्या योगानें त्यांचें ऋण जनतेनें फेडल्यासारखें होईल. गृहत्याग करून वानप्रस्थाश्रम स्वीकारण्याकरितां निघालेल्या मनुष्याला आपण वाढविलेली, लालनपालन केलेली सर्व कुटुंबीय मंडळी निरोप देण्याघेण्याला जमलेली पाहून जो आनंद होतो, तोच ही आपल्या लेखांची समग्र आवृत्ति पाहून रा. कोल्हटकरांना झाला असता.

अशा प्रकारची आवृत्ति निघती व 'संपूर्ण कोल्हटकर' ग्रंथरूपानें एकदम अवतरता, तर त्याचे पांच चार खंड व तीन चार हजार पानें झालीं असतीं. इंग्लंड वगैरे देशांत सुप्रसिद्ध लेखकांच्या लिखाणाच्या अशाच प्रकारच्या समग्र संकलित आवृत्त्या निघतात, हें आपण पहातों;

च कोल्हटकरांसारख्या आपल्या इकडील अग्रगण्य साहित्यसेवकाच्या लिखाणाच्याही आवृत्त्या तशाच निघाव्या, अशी सहजच आकांक्षा उत्पन्न होते. त्याचीं माझीं कारणें वेगवेगळ्या प्रकारचीं आहेत. पहिलें कारण असें कीं, कोणाही लेखकाचे लेख मधून मधून केव्हां तरी व तुटक वाचले असतां त्यांचा जो परिणाम वाचकाच्या मनावर होतो, त्यापेक्षां ते लेख एकत्र वाचले असतां त्याचा परिणाम अधिक यथार्थ व टिकाऊ असा होतो. एकत्रपणानें त्या लेखांच्या बोधाला अशी एक गति मिळते कीं, ती तुटक लेखांच्या वाचनानें उत्पन्न होऊंच शकत नाहीं. सिनेमाच्या चित्रमालेंतील एक एकटें अंगुष्ठमात्र चित्र निरनिराळ्या वेळीं, म्हणजे तुटक व कालावधीनें, पडद्यावर दाखविलें असतां, त्यापासून बोध असा फारसा होणार नाहीं. पण, तींच चित्रें झरझर एकामागून एक, डोळ्याचें पातें लवूं देण्याला किंवा मनाला विराम घेण्याला सवड न देतां, पडद्यावर पाडलीं किंवा फिरत्या चक्रांतून दाखविलीं, तर गतीची क्रिया स्पष्ट दिसते; व चित्रास चरित्र ( हकिकत ) व चारित्र्य ( बोध ) प्राप्त होतें. बर्नार्ड शॉ व गॅल्सवर्दी यांचीं कांहीं कांहीं नाटकें मी पूर्वी तुटक व मधून मधून वाचलीं होतीं. पण, हल्लीं त्या दोघां नाटककारांचे संपूर्ण ग्रंथ मजजवळ आहेत. ते हातीं घेऊन जेव्हां त्यांचीं पानें मी चाळतों, तेव्हां एरवीं न होणारी अशी एक अखंड अनुस्यूतत्वाची भावना मनांत प्रकट होते खरी. ग्रंथकार हा निरनिराळ्या वेळीं निरनिराळे लेख लिहो. पण त्याचें मन हें चित्रपटाप्रमाणें अखंड असतें; व त्याचें दर्शन खंडशः झाल्यापेक्षां एकत्र झाल्यानें त्याच्या स्वरूपाची कल्पना बिनचूक होते. कोणत्याही लेखकाचे सर्व लेख मिळून ती एक मूर्तीच होते. म्हणून, ती सगळीच्या सगळी पाहावयास मिळावी, असें वाटतें. तिजकडे पाहतांना कदाचित् आपला डोळा एकदां या एकदां त्या विशिष्ट अवयवावर क्षणभर निश्चल रहात असेल. पण, मूर्तीच्या इतर भागांवर कोणी झांकण टाकून किंवा ती मोडून, एकदां तिचा हा अवयव तर एकदां तो अवयव दाखविला, तर आपल्याला काय वाटेल?

याविषयीं माझें आणखीही एक कारण आहे. तें हें कीं, एखाद्या ग्रंथकाराच्या ग्रंथांत शिरून वाचून कोणी पाहील तें पाहो न पाहो; पण त्याचा भरदार ग्रंथसंग्रह एकत्र पाहिल्यास त्याच्या पात्रतेसंबंधानें, योग्यतेसंबंधानें

खरें अनुमान होण्यास मदत होते. ही योग्यतेची दृष्टि थोडी लौकिक किंवा वाटेल तर ग्राम्य आहे, असेंही म्हणा. पण, संस्कृतीच्या मुद्यावर जेव्हां राष्ट्राराष्ट्रांची तुलना होण्याचा प्रसंग असतो, तेव्हां त्यांतील प्रमुख ग्रंथकारांनीं एकंदर लिखाण किती केलें, हें पाहावयास सांपडलें असतां त्या तुलनेला मदत होते. समजा कीं, इंग्लंडचा शेक्सपियर, फ्रान्सचा व्हॉलटेअर, जर्मनीचा गटे व हिंदुस्थानाचा कालिदास किंवा विद्यारण्य-स्वामी यांच्या लेखांपैकीं कांहीं ओळी प्रत्येकीं अशा काढून दाखवितां येतील कीं, तेवढ्यावरून तो प्रत्येक लेखक स्फूर्तिमान् व प्रतिभासंपन्न होता, असें सहज दिसून येईल. पण, वरील ग्रंथकारांच्या जोडीला ज्यांना कोणी केव्हांही बसवीत नाहींत, अशा गौण लेखकांच्या लेखांतल्याही तशाच प्रकारच्या व तितक्या अर्थात् दहा पांच ओळी काढून दाखवितां येतील. केवळ एखादें वचन, एखादी कोटी, एखादी उपमा, एखाद्या कवितेच्या चार दोन हृदयंगम ओळी येवढ्यावरच महत्त्वाची परीक्षा येऊन ठेपली, तर चांगल्या वाईट लेखकांची कदाचित् उलटापालटही व्हावयाची! पण, भौतिक शास्त्रांत महत्त्वाचा हिशेब आकार व घनता यांच्या गुणाकारानें करितात ( mass × density = weight ). त्याप्रमाणें ग्रंथकारांच्या महत्त्वाचाही हिशोब त्यांनीं किती चांगलें लिहिलें याबरोबरच किती पुष्कळ लिहिलें यावरूनही करितात. असा एकही हतभाग्य मनुष्य झाला नसेल कीं, ज्याची प्रज्ञा एकाद्या ना एकाद्या वेळीं तरी स्फुरण किंवा उन्मेष पावली नसेल. पण, त्याच प्रज्ञेला प्रतिभा म्हणतात कीं, जी प्रतिक्षणीं नवीन नवीन स्फुरण किंवा नवा नवा उन्मेष पावूं शकते. द्रौपदीच्या स्थालींतून एक वेळ जितकें अन्न निघे, तितकें अन्न एकदां केव्हां तरी निघणारीं मडकीं घरोघर असतातच. पण, तीच द्रौपदीची स्थाली कीर्तिमान् कीं, जिच्यांतून सगळें अन्न काढून घेतलें, तरी ती पुन: फिरून पूर्वींप्रमाणेंच समृद्धच. प्रतिक्षणीं रेडियमच्या अंगांतून जितकी चित्शक्ति बाहेर पडते, तितकी शक्ति वीज भरलेल्या एकाद्या बॅटरींतून निघूं शकेल. पण ती बॅटरी लगेच फिरून नव्यानें भरावी लागेल. याच्या उलट रेडियमचा एक कण घेतला, तर तो इतका चित्शक्तिपूर्ण असतो कीं, तो 'अखंडस्फुरणगुणशाली' असें म्हणतां येतें. हे सर्व दाखले मोठ्या व लहान लेखकांची तुलना करितांना उपयोगीं पडण्यासारखे

आहेत. शेक्सपिअर, व्हॉल्टेअर, गटे यांच्या ग्रंथांनीं भरलेलें एकेक छोटें कपाट पाहिलें, म्हणजे लेखक या नात्यानें त्यांचा मोठेपणा निराळा वर्णन करून सांगण्याचें कारण उरत नाहीं. एकाद्या दुकानावरची किंवा पेढीवरची सेफ किंवा तिजोरी केवढी मोठी आहे, यावरून केवळ तेथें चालणाऱ्या व्यवहाराची कल्पना कोणीं केल्यास ती फारशी चुकणार नाहीं; कारण, आंत ठेवण्याचा ऐवज जर थोडा असेल, तर उगाच पुष्कळ खर्च करून मोठी तिजोरी सुखासुखी कोण घेईल ?

आजूबाजूनें इतकें विवेचन केल्यावर आपण मूळच्या मुद्यांवर म्हणजे राष्ट्राराष्ट्रांतील लेखकांच्या तुलनेकडे येऊं. या तुलनेसंबंधानें आम्हांला असें म्हणावयाचें आहे कीं, हिंदुस्थानांतील लेखकवर्गाची माहिती युरोपियन वगैरे देशांत फारशी नाहीं. यामुळें त्या राष्ट्रांच्या बरोबरीनें हक्क सांगण्याची वेळ आली असतां हिंदुस्थान मागें पडतें. युरोपियन दलाल किंवा पुजारी ज्याला भेटला व त्यामुळें ज्याची कीर्ति त्रिखंड पसरली, असा रवींद्रनाथ टागोरांसारखा भाग्यवान् वाङ्मयसेवक हिंदुस्थानांत एखादाच. बाकीचे सर्व प्रांतांतील वाङ्मयसेवक प्रसिद्धीच्या असल्या आगंतुक साधनांच्या अभावामुळें मागें पडले आहेत; व राष्ट्रीय संपन्नतेच्या हिशेबांत अशा लेखकांच्या लिखाणाच्या महत्त्वाचा ऐवज जमेच्या बाजूला पडावयाचा, तो त्या साधनांच्या अभावीं जमा धरितां येत नाहीं. युरोपियन पंडितांच्या द्वारें ज्या भारतीय वाङ्मयाची कीर्ति—कीर्ति कसली, माहिती—युरोपियन राष्ट्रांना नुसती ओझरती ऐकीव आहे, ती प्रायः कालिदासासारख्या एकाद्या पुराण कवीची. पण, हिंदुस्थानांत दुसऱ्या तिसऱ्या प्रतीच्या इंग्रज वाङ्मयसेवकांचीं नांवें त्यांच्या इतिहासासह पाठ असणारे जितके लोक हिंदुस्थानांत आज आढळतील, त्याच्या दशांश किंवा शतांशही लोक जुन्या कालिदासाचें नांव माहित असणारे इंग्लंडांत मिळणार नाहींत. आणि, आधुनिक कवि व लेखक यांच्यापैकीं एकाचें तरी नांव इंग्लंडांत कोणास माहीत असेल कीं नाहीं, याची शंकाच वाटते. आमचा हा अदमास खरा असल्याचें प्रत्यंतर परवां सहज परस्पर मिळालें. ऑक्सफर्ड येथील प्रो. थॉमसन हे कांहीं महिन्यांपूर्वी माझ्या भेटीला आले. तेव्हां त्यांच्या आवडत्या दोन विषयांवर माझें त्यांचें संभाषण झालें. ते विषय म्हणजे (१) हिंदुस्थानांतील निरनिराळ्या देशी भाषांची प्रगति व त्यांच्यांतील

ज्ञानभांडाराची माहिती इंग्लंडांतील विद्वान् लोकांना करून देण्याची योजना व (२) दुसरा विषय हिंदुस्थानचा इतिहास नव्या दृष्टीनें पुन: लिहविण्याची योजना. प्रोफेसरमजकूर हे बंगाल्यांत कांहीं दिवस राहिलेले असल्यामुळें, त्यांना बंगाली भाषेंतील कवि व लेखक यांची माहिती बरीच होती. महाराष्ट्रसंबंधानें त्यांनीं ग्रँट डफ, रानडे व किंकेड यांच्या ग्रंथांत पूर्वीच्या संतकवींची माहिती अगदीं उडत उडत तरी वाचली होती. परंतु, गेल्या शतकांत महाराष्ट्रांत जे प्रसिद्ध लेखक किंवा कवि होऊन गेले, त्यांविषयीं त्यांना पूर्ण अज्ञान असल्याचें दिसून आलें. आतां, ते ही माहिती मिळविण्याच्या कामगिरीवरच मुद्दाम निघालेले असल्यामुळें, प्रथम मुंबईस त्यांनीं थोडासा कानोसा घेतला होता; व बॅ. जयकर यांच्याकडून स्वत: माझ्या नांवाचें ओळखीचें पत्रच त्यांनीं आणलेलें असल्यामुळें, माझ्या लेखनव्यवसायाविषयीं त्यांना थोडीबहुत माहिती सहजच होती. पुण्यास ते माझ्या घरीं आले, त्यावेळीं माझ्या लिखाणाविषयीं गोष्ट निघाली; व ते माझ्या ग्रंथांची माहिती विचारून पेन्सिलीनें टांचणें करूं लागले. तेव्हां, माझ्या समग्र ग्रंथांची स्थूल वर्णनपर एक इंग्रजी यादी माझ्या एका पुस्तकांत शेवटीं जोडलेली आहे, ती यादी व तें पुस्तक मी त्यांना नजर केलें. माझ्या ग्रंथांची यादी वाचून त्यांच्या मनावर थोडासा परिणाम झाल्यासारखें दिसलें, व तो परिणाम हा कीं, इतके ग्रंथ लिहिणारे लेखक महाराष्ट्रांत असतां, आपल्याला यांच्याबद्दल इंग्लंडांत कांहीं माहिती असत नाहीं, याबद्दल त्यांनीं खेद प्रदर्शित केला. पुढें मी त्यांना, अलीकडील हरि नारायण आपटे, कोल्हटकर, वामनराव जोशी, राजवाडे इत्यादि गृहस्थांचीं नांवें तुम्हांला माहीत आहेत काय, असें विचारलें. त्याला त्यांनां नकारच द्यावा लागला. शेवटीं, त्यांच्या विनंतीवरून, फिरून ते सूचना देतील तेव्हां, मराठी भाषेंतील अलीकडच्या लेखकांसंबंधीं एक टांचण तयार करून त्यांना पुरविण्याचें मी कबूल केलें.

या सर्व विस्तृत हकीकतीचें तात्पर्य आतां मी एका वाक्यांत सांगणार आहें. तें हें कीं, प्रोफेसर मजकूर मजकडे आले, तेव्हां माझ्या कपाटांत हरिभाऊ आपट्यांच्या सगळ्या ग्रंथांचा एक सेट, तसेंच रा. कोल्हटकर यांच्या ग्रंथांचा एक सबंध सेट असता, तर ते मी त्यांना नुसते दाखवून म्हणालों असतों कीं, " हे पहा आमच्यांतील नामांकित अग्रगण्य ग्रंथ-

कार. त्यांच्या ग्रंथांचे हे चार चार पांच पांच व्हॉल्यूम असून, त्यांचें लिखाण तीन चार हजार पृष्ठांपर्यंत गेलेलें आहे. " तर त्यांच्या मनावर खचित एकदम परिणाम झाला असता. आतां त्या ग्रंथांत प्रोफेसर मजकूर मुळींच शिरूं शकले नसते. कारण त्यांना मराठी वांचतांहि येत नसावें. आणि, अवघ्या दोन तासांच्या संभाषणांत त्यांना कोल्हटकरांच्या गुणगौरवाची ओळख मला कशी करून देतां आली असती ? पण, तीन चार हजार पानांच्या ग्रंथसंग्रहाकडे नुसतें पाहूनच, त्यांना कोल्हटकरांचा मोठेपणा, निदान एका अंगानें तरी पटला असता. एकादा माणूस मोठा आहे असें कोणी म्हटल्यास, ' आणा तर त्याला कांट्यावर घालून त्याचें वजन करूं ' असें त्या दुसऱ्यानें म्हणणें, हें ग्राम्य दिसतें. तसेंच ग्रंथांच्या संख्येवरून किंवा जाडीवरून लेखकाचा मोठेपणा पाहाणाऱ्याच्या गळीं डोळ्यांच्या द्वारें उतरविण्याचा माझा हा प्रयत्न ग्राम्यसा कोणाला वाटेल. पण खरोखर तो तसा नाहीं. कारण टाकाऊ लिखाण सहसा कोणी सांभाळीत नाहीं; व तें मुद्दाम छापण्याचा खर्च तर कोणी करीत नाहींच नाहीं. अर्थात् या छापलेल्या ग्रंथावरून ग्रंथकाराचें महत्त्व ठरविण्याची कल्पना अगदींच शुष्क ठरणार नाहीं. आणि, वर प्रो. थॉमसन् यांच्या उदाहरणांत दर्शविल्याप्रमाणें, महाराष्ट्राचें वाङ्मयवर्चस्व इंग्रज लोकांना पटवून देण्याच्या कामीं मी सुचविलेल्या योजनेचा फार उपयोग आहे, असें मला निश्चितपणें वाटतें. एरवीं आज ' Woe to the conquered ' " जितांच्या डोक्यांत दगड ' ही म्हण अनुभवाला येते. राजकीय दृष्टया हिंदुस्थान हा जित असेल, नियतिचक्राच्या फेऱ्यांत तळाशीं जाऊन पोंचलेला असेल, ही गोष्ट कबूल. पण 'गरीबाला गोत्र नाहीं,' हें म्हणणें जसें मूर्खपणाचें, तसेंच इंग्रजांनीं " या जित राष्ट्रांत विद्वत्ता कसची पैदा होणार !" हें म्हणणेंहि मूर्खपणाचेंच ठरेल. पण, तें नुसतें मूर्खपणाचें आहे असें म्हणून तरी उपयोग काय ? इंग्रजांच्या बरोबरीनें इंग्रजी भाषेंतील प्रभुत्व आम्हीं प्रगट केलें, तरी आज त्याला किंमत नाहीं. जो विषय इंग्रजांना कळतो त्यांतली ही गोष्ट. मग जो विषय त्यांना मुळींच कळत नाहीं, त्या आमच्या देशी भाषांतील विद्वत्तेच्या केवळ अज्ञानामुळेंच त्यांनीं आम्हांला नादान ठरवावें, यांत काय नवल ? आणि ही गोष्ट खरीच आहे. इंग्रजांचें राज्य आमच्यावर आहे म्हणूनच आम्हांला त्यांच्या वाङ्मयाचें अध्ययन

करावें लागतें; आणि म्हणूनच, त्यांच्यांतील तिसऱ्या–चौथ्या प्रतीच्या लेखकांच्या योग्यतेला आमच्या देशी भाषेंतील पहिल्या–दुसऱ्या प्रतीचेहि विद्वान् पोंहोचूं शकत नाहींत, अशी समजूत आमची आम्हीं करून घेतों, तर इंग्रजांना बोल कां लावावा ? इंग्लंडवर आमचें राज्य असतें, तर इंग्रज मराठी राजभाषा म्हणून शिकलेच असते. मग तिच्या ऐश्वर्याला काय कमी होतें ? मग आमच्या चंद्रशेखराचा अभ्यास त्यांनीं मिल्टन समजून केला असता; माधव ज्यूलियंनला बायरनचें स्थान मिळालें असतें; राजवाडे लंडन युनिव्हर्सिटींत मराठी इतिहासाचे प्रोफेसर झाले असते; आणि त्याज-बरोबर आमच्या कोल्हटकरांना मूर्धाभिषिक्त विनोदी लेखक म्हणून मार्कट्वेनसारखी मान्यता मिळाली असती. पण इंग्लंडवर आमचें राज्य स्थापणें राहो; हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांतच आमच्यापुरतें आम्हांला खरें स्वराज्य व स्वातंत्र्य मिळेपर्यंत आमची देशी भाषा इंग्रज लोक अभ्यासितील, अशी अपेक्षा बाळगण्याचा आम्हांला हक्क नाहीं. म्हणून, इतर साधनांनीं आमचें वाङ्मयनैपुण्य इंग्रजांना किंवा युरोपियनांना जें काय जशा रीतीनें पटवितां येईल, तें तरी पटविण्याचा आम्ही प्रयत्न करावयाला नको काय ?

असो. माझ्या अपेक्षेप्रमाणें रा. कोल्हटकर यांच्या एकंदर लिखाणाचा संग्रह आजच एकत्र न छापला गेला, तरी प्रस्तुतची प्रस्तावना लिहितांना मला मनानें त्या सर्व लिखाणाचा परामर्ष घेणें अवश्य आहे. कारण रा. कोल्हटकर यांच्या बुद्धीचा व लेखनपद्धतीचा जो विशेष गुण म्हणजे कोटिबाजपणा व विनोदशीलता, तो हल्लींच्या या मुख्यतः टीकात्मक लेखसंग्रहांत अपेक्षेइतका आढळत नाहीं. तो त्यांचा गुण त्यांचीं नाटकें व विशेषतः त्यांची 'साहित्यबत्तिशी' यांतच आढळून येतो. असें होण्याचें कारण हें कीं, कोणतीही टीका म्हटली म्हणजे तिचें स्वरूप विध्वंसक असतें आणि टीका-विषयानें टीकात्मक लेखाची पद्धति मर्यादित केली जाते. नाटकांतहि ही मर्यादा थोडीशी पडतेच. कारण त्यांतल्या कांहीं थोड्याशा पात्रांनाच कोट्या किंवा विनोद करणें हें शोभतें; या गोष्टी सरसकट सर्व पात्रांच्या तोंडीं घालतां येत नाहींत, पण 'साहित्यबत्तिशी'तील लेखांमध्यें कोटिबाजपणा व विनोदशीलता यांना अगदीं अनिरुद्ध संचाराला वाव मिळाला आहे. टीका ही स्वभावतःच संकोचात्मक असते, तर स्वतंत्र लेख हे विकासात्मक असतात. माझ्या 'तोतयाच्या बंडा'वर रा. कोल्हटकर हे टीका लिहावयास

बसले, व तेथें त्यांनीं वरील नियमाला अपवाद निर्माण करून विकासात्मक व विधायक असा नाट्यशास्त्रावर स्वतंत्र प्रबंधच लिहिला. पण, या विकासांत त्यांनीं प्रायः गंभीर म्हणजे सर्वस्वी शास्त्रीय अशीच दृष्टि ठेवल्यामुळें, या निबंधांत त्यांचे गुण विशेष प्रगट झालेले नाहींत. इतर टीकात्मक लेखांत त्यांचा कोटिबाजपणा व विनोदशीलता हे गुण प्रच्छन्न स्वरूपांत आढळतात. कारण तेथें त्यांचा उपयोग दोषदर्शन, निंदा यांकडेच मुख्यतः करण्यांत आला आहे. त्यांतली बुद्धि सरळ, खेळकरपणाची व कलाविलासची नसून, अकारण किंवा सकारण कुत्सितपणाची आहे. त्यांचे टीकात्मक लेख वाचीत असतां वाचकाच्या चेहऱ्यांवर हास्याची झांक दिसेल;—पण क्रोध, तिरस्कार तुच्छता इत्यादि भावनांमुळें जें विकृत हास्य तोंडावर उमटतें, त्याचीच ती छटा असते. म्हणून त्या हास्याला एक प्रकारचा कडवटपणा येतो. परंतु 'साहित्यबत्तिशीं'तील लेखांतही मनुष्यस्वभावाच्या कांहीं नमुन्यांवर एक प्रकारें टीकाच असली, तरी टीकाविषयक व्यक्ति म्हणून कोणीही डोळ्यांपुढें उभी असत नाहीं. यामुळें ती केवळ कल्पनासृष्टींतली शिकार वाटते. तिनें कोणत्याही जिवंत प्राण्याच्या अंगाला जखम होत नाहीं व उद्वेग वाटावा असें कांहीं घडत नाहीं. 'साहित्यबत्तिशीं'तील विषय त्यांनीं आपले दोन्ही गुण प्रगट करण्याकरितां हवे तसे हुडकून घेतल्यामुळें, त्यांना त्या विषयाला वाटेल तितके पैलू पाडतां आले. प्रकाशाचा तोच किरण 'अनगड' रत्नांवर पडला असतां परावर्तित न होतां फुकट जातो; पण घासलेल्या पैलूदार रत्नांवर पडला असतां अत्यंत उज्ज्वल तेज प्रगट करूं शकतो. त्याप्रमाणें रा. कोल्हटकरांच्या गुणांचा प्रकाश त्यांच्या 'साहित्यबत्तिशी'तून जितका प्रगट होतो, तितका त्यांच्या इतर लेखांतून होत नाहीं.

असो. माझ्या या प्रस्तावना लेखांत होणाऱ्या अवश्य विषयांतरासंबंधानें इतका खुलासा करून आतां मुख्य विषयाकडे वळतों.

## आठवणी

रा. कोल्हटकर यांचा कोटिबाजपणा व विनोदशीलता यांच्याशीं माझा परिचय केवळ त्यांच्या लेखांवरून झालेला नाहीं; तर प्रत्यक्ष त्यांच्याशीं बोलण्याचालण्यांत व स्नेहाच्या व्यवहारांत झालेला आहे. रा. कोल्हटकर यांच्याशीं माझा परिचय प्रथम डेक्कन कॉलेजांत झाला. सन १८८९ सालच्या पहिल्या

तिमाहींत मी फर्ग्युसन कॉलेजमध्यें पी.ई.च्या वर्गांत असतां एक दोन वेळ डेक्कन कॉलेजांत गेलों होतों; व पुढें १८९१ सालीं तर मी बी. ए. च्या अभ्यासाकरितां डेक्कन कॉलेजांत राहिलों, तेव्हां इंग्रजी व संस्कृत हे विषय ऐच्छिक म्हणून त्यांनीं व मी दोघांनींहि घेतलेले असल्यामुळें, त्यांचा माझा सहवास वर्गबंधु, सहाध्यायी म्हणून वाढला. त्यांतच आम्हां कॉलेज विद्यार्थ्यांनीं त्या वर्षीं केलेल्या मृच्छकटिक नाटकाची भर पडली. पुढें एल्एल्. बी. च्या अभ्यासाकरितां १८९२ व ९३ सालीं आम्ही दोघे व इतर कांहीं विद्यार्थी मिळून मुंबईस एकाच घरांत क्लब करून राहिलों होतों. १८९३ नंतर ते मुंबईस राहिले; परंतु मी मात्र एल्एल्. बी. च्या टर्म्स संपवून साताऱ्यास जाऊन राहिलों; व पुढच्याच वर्षीं एल्एल्. बी. ची परीक्षा पास होऊन सनद काढून वकीली करूं लागलों. पण १८९६ सालीं केसरी–मराठा संस्थेला येऊन मिळाल्यामुळें माझा वाङ्मयव्यासंग सहजच अखंड सुरू झाला. रा. कोल्हटकर यांच्या बाबतींत मात्र थोडा उलटा प्रकार झाला म्हणजे वाङ्मयाच्या नादानें त्यांची एल्एल्. बी. ची परीक्षा होण्याचें कांहीं वर्षें लांबणीवर पडलें. पण, वकिलीची परिक्षा पास झाल्यावर, सनद बाजूला टाकून धंदा म्हणून मला जशी लेखणी हातीं घेतां आली, तशी त्यांना घेतां आली नाहीं. ज्या वाङ्मयाभिरुचीनें त्यांची वकिलीची परीक्षा लांबविली, तिजवर त्या वकिलीनें पुढें जन्मभर सूड घेतला. स्वतःच्या स्वीकाराला विलंब केल्याच्या रागावर वकिलीनें त्यांना जन्मभर राबावयास लावलें. जणूं कांहीं, तिनें निश्चयच केला कीं, यांची व वाङ्मयसेवेची गांठच पडूं द्यावयाची नाहीं. परंतु रा. कोल्हटकर यांनीं वकिली अप्रिय असतांही जन्मभर ती सांभाळली. पण, त्याबरोबर वाङ्मयसेवाही त्यांनीं इतकी केली कीं, तसलें दुसरें उदाहरण दुसऱ्या कोणाही वकिलाचें, निदान महाराष्ट्रांत तरी, दाखवून देतां येणार नाहीं. त्यांनीं आपली वकिली अत्यंत प्रामाणिकपणानें केली व अत्यंत मेहनतीनेंही केली. कारण त्यांच्यामागें संसाराचा व्यापही तसाच मोठा होता. परंतु मनांतून त्या वकिलीच्या मेहनतीची त्यांना इतकी नावड असे कीं, ती एक खडतर तपश्चर्या असेंच त्यांना वाटे. संसारांतील संपन्नते-पेक्षां स्वाधीनता व स्वतंत्रता हाच त्यांना मोक्ष वाटे; व या मोक्षाकरितां ही

तपश्चर्या केलीच पाहिजे, ती सुटत नाहीं, हें ते जाणून होते. पण, त्यांच्या सर्व जन्मभर त्यांना खरा आनंद कोणता असेल तर तो लिहिणें वाचणें व रसिक सहृदय स्नेह्यांशीं वाग्विलास करणें हाच होता. ही हौस भागण्याला त्यांना मुख्य नड ही आली कीं, वकिलीच्या धंद्यामुळें तालुक्याहून मोठ्या दर्जाच्या गांवीं त्यांना राहतां आलें नाहीं. मे महिन्याच्या सुट्टींत पुण्यामुंबईकडे फेरी मारिली असतां वाङ्मयप्रेमाच्या स्नेह्यांच्या गांठी काय पडतील, तेवढ्याच. खेडेगांवच्या एकांतवासाचा मात्र त्यांनीं वाङ्मयचिंतनाच्या कामीं फार उपयोग करून घेतला. अकोला, उमरावतीसारख्या मोठ्या ठिकाणीं ते राहाते, तर ३०–३२ वर्षांपूर्वीं प्रारंभ केलेली त्यांची वकिली पुष्कळ चांगली चालली असती. पण एकंदरीनें वकिलीच्या कामाला अनुकूल असा त्यांचा स्वभाव नव्हता. फौजदारी व दिवाणी अशा दोन्ही कोर्टांतून त्यांनीं वकिली केव्हांच केली नाहीं, आणि दिवाणी कोर्टांत वकिली केली, तीसुद्धां तालुक्याचा गांव पत्करून म्हणजे येऊन जाऊन एकाच कोर्टाचा संबंध राहावा अशी. माझ्या समजुतीप्रमाणें कोल्हटकरांनीं आपल्या सगळ्या वकिलीच्या धंद्यांत कोर्टाकडून किंवा कुळाकडून कधीं एकही शब्द बोलून घेतला नसेल; व इतक्या दिवसांत त्यांनीं कोर्टाला रजेचा अर्जही कधीं केला नसेल. वकिलीच्या धंद्याच्या दृष्टीनें पाहातां त्यांची कर्तव्यनिष्ठा अत्यंत वाखाणण्यासारखी होती.

अशा रीतीनें वकिलीचा धंदा त्यांनीं सुखाचा करून घेतला, तरी त्यांचा खरा आनंद वकिलीच्या कामांतील यशांत किंवा तदनुषंगिक द्रव्यसंग्रहांत नव्हता. त्यांच्याकडे कुळें ओढलीं जात असतील, तीं दलालीनें तर नाहींच; पण स्वतःच्या लोभबुद्धीच्या प्रयत्नानेंही नाहीं. किंबहुना, वकिलीच्या धंद्यांत दिसून येणाऱ्या त्यांच्या उल्हासानें किंवा तडफेनें तीं आकर्षिलीं गेलीं नाहींत; तर केवळ त्यांच्या सरळ वागणुकीनें, कर्तव्यतत्परतेनें म्हणजे त्यांच्यावरील विश्वासानें ! पण या बाजूच्या उल्हासाची व आनंदाची वाण त्यांनीं आपल्या स्वभावानें व वाङ्मयसेवेनें भरून काढली. कुग्रामवस्तींतही त्यांच्या भोंवतीं कुळांचा अशिलांचा मेळा जेवढा जुळत असेल, त्यापेक्षां एरवींच्या वेळांत त्यांच्याशीं संभाषण करण्याचा आनंद लुटणाऱ्या विनोदलोलुप स्नेह्यांचा मेळाच मोठा असे. त्यांच्या ठिकाणीं वसत असलेला हा आकर्षकतेचा गुण विद्यार्थीदशेपासूनच

लोकांना पहावयाला सांपडे. मला असें स्मरतें कीं, स्नेह्यासोबत्यांशीं संभाषण करणें याला त्यांनीं विद्यार्थीदशेंत पहिलें स्थान दिलेलें असून, अभ्यासक्रमांतील ग्रंथवाचनाला दुसरें व कमी महत्त्वाचें स्थान दिलें होतें. मात्र गप्पागोष्टींची हौस असल्यामुळें आपल्या भोंवतीं स्नेह्यासोबत्यांचा घोळका जमविणारा जो दुसराही एक विद्यार्थिवर्ग कॉलेजांतून पहावयास मिळतो, त्याच्यासारखा मात्र यांचा प्रकार नव्हता. कारण, अभ्यासक्रमांतील पुस्तकांना जरी यांनीं दुय्यम स्थान दिलें होतें, तरी पहिलें स्थान मिळालेल्या यांच्या मित्रसंभाषणांतून ज्या गप्पागोष्टी चालत, त्यांत विद्याव्यासंग व संस्कृतीची उपासना यांचा भाग बराच असे. त्यांच्या विनोदी स्वभावाबरोबर ईश्वरानें त्यांना दुसरीहि एक देणगी दिली होती. ती गायनकलेची. आमच्या वेळीं डेक्कन कॉलेजांत रा. मल्हारपंत गर्दे, रा. गोविंदराव ओक, रा. मं. जि. तेलंग, केसकर वगैरे कांहीं मंडळी गाणारी होती; पण त्यांचा आवाज बारीक असे. रा. कोल्हटकर यांचा आवाज हवा तसा बारीक किंवा मोठा लागत असून, त्यांच्या गळ्यांत तान चांगली फिरत असे. याहीपेक्षां त्यांचा विशेष गुण हा कीं त्यांच्या संग्रहीं पदांच्या चाली विविध प्रकारच्या असत. ते एकटे असले, तरी स्वतःशीं गात व गुणगुणत बसावयाचे; आणि, भोंवतीं मंडळी जमली कीं, अर्थातच त्यांना गाण्याचा आग्रह व्हावयाचा. मग कोणी बाजूला बसून बुक्कावर किंवा पेटीवर तालाचा ठेका धरावा, कोणी समोर बसून वाहवा द्यावी, असें होतां होतां या गाण्याच्या जलशांत घटकाच्या घटका जात. रसिकता, गायनपटुता, विनोदशीलता, कोटिबाजपणा व नाट्यवाङ्मयप्रेम ह्यांपैकीं एखादा गुण अंगीं असणारे थोडेबहुत विद्यार्थी केव्हांहि कोणत्याही कॉलेजांत असतातच. पण, रा. कोल्हटकर यांच्या अंगीं हे विविध गुण एकत्रित झालेले असल्यामुळें, लोकप्रियतेचें व आकर्षकतेचें एक विशेष केंद्र असेच ते होऊन बसले होते. डेक्कन कॉलेजच्या मुख्य मोठ्या इमारतींत राहणारांना थोडाबहुत संकोच सोसावा लागे. पण, ज्यांना औट हौसेस म्हणतात, त्या बैठ्या खोल्यांतून राहणाऱ्या विद्यार्थ्यांना आसपास मोठें खुलें मैदान असल्यामुळें संकोच वाटत नसे. आणि, तरुण विद्यार्थ्यांच्या शीलाला शोभण्यासारखा आरडाओरडा, उच्छृंखलपणा, गायनाच्या मजलशी वगैरे सर्व प्रकार तेथें मुक्तकंठ चालत.

कोल्हटकरांच्या या गुणांची आवड असणारे सहानुभवी विद्यार्थी तर त्यांच्या भोंवतीं जमतच. पण, अभ्यास करून कंटाळा आला, म्हणजे तो घालविण्याकरितां म्हणूनही कांहीं विद्यार्थी त्यांचे भोंवतीं जमत. अशामुळें त्यांना एकलकोंडेपणा हवासा वाटला, तरी तो मिळत नसे. १८९१ सालीं कॉलेजांत मृच्छकटिक नाटक झालें. त्याची स्फूर्ति व कांहीं अंशीं नाटकांतील गायनांत यश मिळण्याचा आधार हीं रा. कोल्हटकरांपासूनच बरीचशीं मिळालीं होतीं. ते स्वतः चांगले गाणारे होते, तरी चारुदत्ताचें काम करण्याची महत्त्वाकांक्षा इतर कारणांमुळें त्यांना धरितां येण्यासारखी नव्हती. कारण त्यांच्या ढबींत एक प्रकारचा बोजडपणा असे. तथापि चारुदत्ताची भूमिका घेणाऱ्या गर्द्यांनांही त्यांच्याकडून चाली बसवून घ्याव्या लागत. मनाच्या आवडीचा विषय वाङ्मय आणि बी. ए. च्या परीक्षेच्या अभ्यासाचाही विषय वाङ्मयच. त्यामुळें आमचें तें वर्ष आनंदांत गेलें; व अखेर आम्हीं दोघेही त्या सालीं परीक्षा पास झालों.

पुढील सालीं मुंबईस एल्एल्. बी. च्या अभ्यासाला जाऊन राहिलों, तेव्हां कॉलेजांतील विशेष परिचयाची अशी आम्ही कांहीं मंडळी कांहीं दिवस क्लब करून व कांहीं दिवस खाणावळींत जेऊन राहिलों. तथापि राहतें घर एकच होतें. या मंडळींत मी, रा. कोल्हटकर, त्यांचे बंधु निळकंठराव, कै. बाक्रे, रा. नानल, कै. रा. ब. केशवराव दामले, कै. करंदीकर वगैरे होतों. यांपैकीं दामले हे पुढें अकोल्याचे प्रमुख वकील व नेमस्त पक्षाचे पुढारी झाले. रा. नानल हे रत्नागिरी जिल्ह्यांतील प्रमुख वकील असून मुंबई कायदेकौन्सिलचे सभासद झाले; व आज लोकल बोर्डांचे अध्यक्ष आहेत. रा. करंदीकर हे धारवाडास वकिली करूं लागले, पण अल्पवयी वारले. रा. बाक्रे हे मोठे बुद्धिवान् व तरतरीत असत. दिसण्यांत वामनमूर्ति पण एकदां वाद करूं लागले व आपले मोठे डोळे फिरवूं लागले, म्हणजे प्रतिपक्षाला जेरीसच आणावयाचे ! पण प्रकृतीच्या दुर्बलतेमुळें ते पुढें एल्एल्. बी. ही होऊं शकले नाहींत; व सावंतवाडी येथें हायस्कूलचे हेडमास्तर असतां अकालीं मरण पावले. रा. डांगे या नांवाचे वऱ्हाडचे एक गृहस्थ क्लबांत असत. ते व बाक्रे यांचीं वादविवादाचीं युद्धें नेहमींच जुंपत; आणि मग बाक्रे यांचा सफाईचा युक्तिवाद आणि डांगे यांचा स्वार्थी अडाणीपणा यांचें युद्ध पाहण्याची मोठी मौज असे.

नानल यांचें सामर्थ्य स्तिमितपणांत असल्यामुळें, विशेष बोलण्याचालण्याचा प्रसंग येई, तो माझा व कोल्हटकर यांचाच. क्लबांत न राहिलेले पण बाहेरून जेवावयास येणारे असे एक गृहस्थ रा. बळवंत बाबाजी देशपांडे हे असत. ते पुढें नगरास प्रमुख वकील व राष्ट्रीय पक्षाचे पुढारी झाले, पण अल्प वयांत वारले. रा. देशपांडे हे थोडेबहुत स्वतः गात व कोल्हटकरांप्रमाणें तेही गायनप्रेमी असत. पण देशपांडे हे शास्त्रीय गायनाचे अभिमानी व कोल्हटकर हे कवाली गायनाचे अभिमानी. यामुळें त्या उभयतांतील वाद मोठे मौजेचे चालत; व एकमेकांकडून प्रतिपक्षाच्या गायनपद्धतीची चेष्टाकुचेष्टा चाले. तेव्हां या दोहोंपैकीं कोणतीच पद्धति हस्तगत नसलेल्या माझ्यासारख्या श्रोत्या प्रेक्षकाला मोठीच करमणूक होई. कोल्हटकर यांचे चुलतबंधु नीळकंठराव हे एल्फिन्स्टन हायस्कुलांत विद्यार्थी असत. ते कै. रा. ब. वामनराव कोल्हटकर यांचे चिरंजीव, अच्युतराव कोल्हटकर यांचे बंधु. हे नीळकंठराव आपल्या बंधूप्रमाणेंच गायनप्रेमी व स्वतः गाणारे असत. तथापि, थोरल्या बंधूनीं गावें व धाकट्यांनीं पुस्तकावर तबल्याचा ठेका धरावा आणि हें पद म्हण तें पद म्हण असें सुचवावें, अशी खाशी जोडी जमे. दोघेही आपापल्या परीनें लहरी. यामुळें कलावंत हे लहरी कसे असतात, याची आम्हां इतरांना चांगली साक्ष पटे. पदें म्हणा म्हणून कोणी खणपटीस बसला, तर हे म्हणावयाचे नाहींत; आणि, स्वतः म्हणण्याची लहर येऊन यांनीं एकदां तोंड उघडलें, म्हणजे मग कोणी कंटाळून उठून जाऊं लागला, तरी समोर श्रोता पाहिजे म्हणून त्याला हाताला धरून बसवीत ! दुसऱ्या कोणाला गातां येत नाहीं हें माहित असतांही, ज्याला त्याला तुम्ही हें पद म्हणा पाहूं; तें म्हणा पाहूं, असा यांचा आग्रह चालावयाचा. पण, त्यांत त्याला गाणें येत नाहीं हें त्याचें वर्म काढण्याचा हेतु नसून, आपण गातों तेव्हां इतरांनाही गातां कां येऊं नये, अशा भोळ्या भावनेचा तो आग्रह असून, शिवाय सुचविलेलीं पदें स्वतःच पुढें म्हणून दाखविण्याची ती एक अनाहूत प्रस्तावना असे. कायद्याचा अभ्यास हा नाइलाज म्हणून करावयाचा. पण तो रुक्ष म्हणून त्याविषयीं कोणीही एकानें दुसऱ्यापाशीं चकार शब्द काढावयाचा नाहीं. आपलें औषध आपणच प्यावें व तोंड वांकडें करावें लागलें तर तें दुसऱ्यास दाखवूं नये, अशी कायद्याच्या अभ्यासाविषयीं आमची भावना

होती. खरें प्रेम काय तें गायन, वाङ्मय व नाटक यांसंबंधाचेंच सर्वांना असे.

आमच्यापैकीं रा. नानल यांनीं या वेळीं शेक्सपिअरच्या रिचर्ड दी थर्ड (Richard III) चें भाषांतर चालविलें होतें. मी शिवाजी व संभाजी हे औरंगजेबाच्या कैदेंत दिल्लीस असल्या वेळच्या प्रसंगाचें एक नाटक लिहीत होतों; व मधुनमधून एकादी कविता करून रा. हरिभाऊ आपटे यांच्या 'करमणूक' पत्रांत प्रसिद्धीस पाठवीत होतों. स्वतः कोल्हटकर यांनीं नाटकाचा विषय ठरविला नव्हता; परंतु पारशी व गुजराती नाटक मंडळ्यांच्या प्रयोगांतील संगीताच्या पदांच्या चाली स्मरणांत सांठवून ठेविण्याचा व घोकण्याचा उद्योग त्यांनीं सुरू केला होता. तसेंच 'विविधज्ञानविस्तारां'त टीकात्मक लेख लिहिण्याची सुरवात याच वेळीं त्यांनीं केली; व त्यांचा पहिला लेख–म्हणजे प्रस्तुत लेखसंग्रहांतील पहिला—पाटणकरांच्या विक्रमशशिकला नाटकावरील टीकात्मक लेख होय. बिचारे बाक्रे हे वाङ्मयाच्या भानगडींत मुळींच पडणारे नव्हते. परंतु उभयतां कोल्हटकरबंधु व मी यांच्या इतकाच उल्हास पारशी गुजराती नाटकें पाहण्याविषयीं त्यांना वाटे; व महिन्यांतून निदान दोन तीन नाटकें आम्ही सर्वजण पाहावयास जात असूं. या सुमारास मुंबईस चित्रकलेचीं प्रदर्शनें भरत. त्याचप्रमाणें सुप्रसिद्ध चित्रकार राजा रविवर्मा यांचा मुक्काम मुंबईस असून, त्यांचीं चित्रें खाजगी रीतीनें पाहावयास मिळत; व ते प्रत्यक्ष चित्र काढण्याचें काम करीत बसत, तेव्हां तें जाऊन पाहणें हाही एक करमणुकीचा विषय असे. राजा रविवर्मा यांचें Begum after Her Bath (स्नानानंतर वेषभूषा करून दिवाणखान्यांत आलेली बेगम) असें एक चित्र तेव्हां प्रथमच दाखविण्यांत आलें व तें पुष्कळ लोकप्रिय झाल्याचें स्मरतें. पारशी गुजराती नाटकें कलेच्या दृष्टीनें अगदींच हीन दर्जाचीं असत. पण त्यांतील पोषाख, देखावे व कांहीं अशीं गायनपद्धत्व हीं मनांत भरण्यासारखीं असत. पण, आम्ही जे हीं नाटकें पाहावयास जात होतों, ते त्यांतील कथाभागाकडे किंवा सीनसीनरीकडे ध्यान देण्याकरितां नव्हे; तर त्यांतील पदें ऐकण्याकरितां आणि त्यांतील असंबद्ध रचना, भाषणें व विनोद यांचा आनंद लुटण्याकरितां. हीं नाटकें पाहात असतां मार्मिकपणानें व विनोदबुद्धीनें हंसणारे बहुधा आम्हीच असूं. कारण सर्व सामान्य प्रेक्षक-

गण हा नाटककाराइतक्याच हीन संस्कृतीचा असे. आम्हांला मात्र नाटकें पाहात असतां व घरीं परत आल्यावर, पुढील एखादें तसेंच नाटक पाहावयास जाईपर्यंत ती करमणूक पुरून उरे. किर्लोस्कर मंडळी मुंबईंत फारशी येत नसे; व शाहूनगरवासीचाही तोच प्रकार. यामुळें कलाविलासाच्या दृष्टीनें नाटक पाहण्याला जाण्याचें साधन फारसें नव्हतें. म्हणून फारशी गुजराती नाटकें पाहून दुधाची हौस आम्हांला ताकावर भागवून घ्यावी लागली. त्या काळीं थट्टेचा व विनोदाचा जो जो म्हणून विषय मिळे, त्याची अपूर्वाई वाटे. यामुळें क्लबाच्या आचाऱ्याचा भोळा बोलघेवडेपणा किंवा चाळींतील खाणावळवाल्याच्या स्वभावांतील व्यंगें असलेही विषय आपापसांतील विनोदाला आम्हांला उपयोगी पडत. १८९३ सालीं मुंबईस हिंदु–मुसलमानांचा दंगा झाला, तेव्हां आम्ही गिरगांवांत मंगळदास नथूभाई यांच्या चाळींत राहात होतों, व मुंबईंत अलिकडे होणाऱ्या दंग्याचे वेळीं तेथील रहिवाशांची काय भावना असेल, याची जाणीव चाळीस वर्षांपूर्वी आम्हांला झाली होती. दोन दिवस कॉलेजचीं व्याख्यानें बंद असून आम्ही चाळींत बंदिवानासारखे होतों. तथापि त्या वेळींही विनोदबुद्धि जागृत होती. त्या चाळींत आमच्याबरोबर रा. काका महाजनि व त्यांची मित्रमंडळी वगैरे राहात असत. या सुमारास देशावरच्या एका नाटक मंडळीला पाठविण्याकरितां महाजनि यांचे स्नेही गोविंदराव सोरटी यांनीं कांहीं खोट्या दाढ्यामिशा खरेदी केल्या होत्या. त्या त्यांनीं लावून मुसलमानांचीं सोंगें घेतलीं; व चाळींतील दादरावरून दणदण चढून आले असतां, आम्ही इतर खोल्यांतील लोक आत्मरक्षणाकरितां वऱ्हांड्यांत जमलों व शेवटीं नाटक उघडकीला येऊन केवढा हशा पिकला, हें अजून आठवतें. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, आम्ही डेक्कन कॉलेजांत असतांना होतों त्याहून मुंबईस एल्एल्. बी. चा अभ्यास करितांना एकाच चाळींत जवळ जवळ राहत असल्यानें कोल्हटकरांचा व आमचा स्नेह विशेष जमला; आणि त्यांच्या व आमच्या वाङ्मयाभिरुचीची ओळख परस्परांना पूर्वीहून अधिक पटली.

दुसऱ्या एल्एल्. बी. च्या दुसऱ्या वर्षाच्या टर्मस् भरून झाल्यावर, कोल्हटकर व मी जे वेगवेगळे झालों, ते इतके कीं, वर्षा दोन वर्षांनीं त्यांची माझी सुटींत सहज गांठ पडेल, तेव्हांच भेट व्हावयाची व हास्य-

विनोदाची उजळणी व्हावयाची. पत्रव्यवहारांचा त्यांना व मला सारखाच कंटाळा. म्हणजे, चालचलाऊ कामासंबंधानें पत्रें लिहिण्याचा नव्हे; तर रिकामपणीं वाङ्मय रंगवून केवळ एकमेकांच्या मनोरंजनाकरितां पत्रें लिहिण्याचा कंटाळा. दोघांनाही दिवसभर पुरून उरतील इतकीं आपआपलीं कामें होतीं. वकिलीचा धंदा व वर्तमानपत्राचा धंदा यांत प्रत्येकीं कांहीं निरनिराळ्या सोई गैरसोई असल्या, तरी दोहोंना एक गोष्ट साधारण अशीच होती ती ही कीं, सकाळपासून संध्याकाळपर्यंत आपल्याच मुख्य व्यवसायांत वेळ जावा. कोल्हटकरांना रोज कोर्टापुढें उभें रहावें लागे, असें दिसे. पण, मी वर्तमानपत्राच्या रूपानें आठवड्यांतून एकदांच लोकांपुढें उभा आहें असें दिसलें, तरी त्याकरितां मलाही आठवडाभर राबावेंच लागत असे. शिवाय, थोडासा वेळ उरला, तर त्यांना व मला आपआपले ग्रंथ-लेखनाचे विषय चिंतनार्थ असतच. कोल्हटकरांची सुटी मे महिन्यांत ठराविक असे; त्यांत ते आपलीं पुस्तकें बहुधा लिहीत. मला ठराविक मोठी सुटी अशी केव्हांच नव्हती. म्हणून, नेहमींच थोडथोडी सवड काढून फावल्या वेळांत मला आपलें ग्रंथलेखन करावें लागे. आणि, कोल्हटकर ज्याप्रमाणें म्हणूं शकतील कीं, माझें ग्रंथलेखन हौसेचें असलें, तरी तें माझ्या कोर्टकचेरींतील कर्तव्याचे आड मी कधींही येऊं दिलें नाहीं, त्या-प्रमाणें मीही म्हणूं शकतों कीं, माझ्या वर्तमानपत्राच्या किंवा सार्वजनिक कर्तव्याच्या आड माझें ग्रंथलेखन मीही कधीं येऊं दिलें नाहीं. आमचा पत्रव्यवहार असता, तर ग्रंथलेखनासंबंधाचाच असता. पण आपल्या इकडे पाश्चात्य देशांतील लोकांप्रमाणें वाङ्मयस्वरूपाचा पत्रव्यवहार करण्याची प्रथा पडलेली नाहीं; व इतर कारणांनींही आम्हीं परस्परांस पत्रें लिहिण्याच्या भानगडींत फारसे पडलों नाहीं. पण, मला असें पक्कें स्मरतें कीं, माझा ‘ सुभाषित आणि विनोद ’ हा निबंध बराचसा लिहून झाल्यावर, मी मुद्दाम उठून तेल्हाऱ्याला त्यांच्याकडे गेलों; व तो निबंध वाचून त्यांनीं चर्चेच्या द्वारें मला पुष्कळ मदत व सूचना केल्या. उलट, याचा मोबदला ते मला असा देत कीं, मे महिन्याच्या सुटींत ते आपल्या एखाद्या नवीन पुस्तकाचें हस्तलिखित पुण्यास घेऊन येत, तेव्हां तें मला वाचावयास देत. नाटकें हीं निबंधासारखीं नसतात. म्हणजे, निबंधाप्रमाणें त्यांत कोणी कांहीं सूचना केल्या, तरी फारशा अमलांत आणतां येत नाहींत; व मी सूचना

केल्या असल्या, तरी कोणाच्या सूचना घेण्याचा स्वभाव कोल्हटकरांचा नसल्यामुळें, मी सूचना करण्याच्या भानगडींत न पडतां बरें वाईट काय दिसतें, याविषयीं सामान्य चर्चा करीं. फक्त एकच बाब अशी निघाली कीं, ज्यांत त्यांना माझ्या सूचनांची आवश्यकता भासली; व मी सुचविल्या, त्या त्यांनीं अंमलांत आणल्या. ती बाब म्हणजे नाटकांतील कुणबाऊ भाषेची. कोल्हटकरांना कुणबाऊ भाषा बोलतां येत नाहीं व मला ती येते, असें पाहून त्यांनीं, मी व रा. पिंपळखरे यांजवर आपल्या कुणबाऊ पात्रांची भाषा, त्यांच्याच विनोदी वर्णनाप्रमाणें, अधिक शुद्ध म्हणजे अधिक अशुद्ध करून देण्याचें काम सोंपविलें; आम्हीही आनंदानें त्यांची भाषा हवी तशी अशुद्ध करून दिली.

मे महिन्यांत किर्लोस्कर मंडळीचा मुक्काम पुण्यास असला, म्हणजे तर नाट्यविषयक संभाषणें व गायन यांची गोडी कोल्हटकर असल्यामुळें विशेष येई. तसेंच कै. वासुदेवशास्त्री खरे वगैरे रसिक गृहस्थ मे महिन्यांत पुण्यास आले, म्हणजे आमच्या घरीं आम्हां त्रिवर्गाच्या ज्या बैठकी होत, त्यासारखे आनंदाचे प्रसंग बहुधा फारच थोडे असतील. पुण्यास कोल्हटकरांच्या 'मतिविकार' नाटकाचे प्रयोग प्रथम झाले, तेव्हां असें ठरलें कीं, पहिल्या प्रयोगापूर्वी मीच त्या नाटकाचें सविस्तर परीक्षण दैनिक पत्रांतून करावें; व त्याप्रमाणें 'ज्ञानप्रकाशा'च्या पांच सहा अंकांत ओळींनें तें करून, प्रयोगाच्या शनिवारीं तें संपविलें. कोल्हटकरांच्या प्रमाणें मी नाट्यकलेसंबंधानें फारसे सुक्ष्म नियम मनाशीं बसविलेले नाहींत. सामान्यत: जें चांगलें असतें तें लोकांना चांगलें वाटल्याशिवाय रहात नाहीं; आणि, विद्वान् व सहृदय लोकांच्या मनांत कलेच्या नियमांची प्रतीति आपोआपच उदित होत असते; ती नियम लिहून काढण्यावर अवलंबून नसते. कसेंहि असो. मी कलेचा उपासक आहें; व कलेच्या मागें नीति, बोध, नियम, हेतु वगैरेंची उपाधि फारशी लावूं नये, असें म्हणणारा आहें. ही गोष्ट बडोदें येथील साहित्यसंमेलनाचा अध्यक्ष या नात्यानें मी आपल्या भाषणांत सांगितली आहे. तें माझें मत आजही कायम आहे. आणि त्याच मतानुसार मी 'मतिविकारा'चें जें परीक्षण केलें, तें बहुधा कोणताही नियम डोळ्यांपुढें न ठेवितां सारासार विचारानें केलें आहे. या परीक्षणांत नाटकाच्या हेतुसिद्धीविषयीं मी कांहीं

लिहिलें, तें इतक्या करितांच कीं, स्वत: कोल्हटकरांनीं त्या नाटकाचा आपला हेतु पुनर्विवाहाचें समर्थन असा मानलेला असला, तरी तो हेतु प्रत्यक्ष नाटक-रचनेंत कसा विफल ठरला आहे, हें दिसावें आणि हें दाखविण्यापुरतेंच हेतु-सिद्धीचें विवेचन केलें आहे. त्यांत मी हेंही दाखविलें आहे कीं, 'मति-विकार'च काय, पण कोल्हटकरांनीं इतर कांहीं नाटकेंही हेतुपुर:सर लिहिलेलीं दिसत असलीं, तरी वस्तुत: त्यांनीं त्यांचा विशिष्ट हेतु सफल झालेला नाहीं. आणि, स्वत: त्यांच्या स्वाधीन असलेल्या प्रत्यक्ष नाट्य-रचनेंतही जर नाहीं, तर मग सामाजिक व्यवहारांत तो कसा सफळ होणार? पण, त्या टीकेंत मी हेंही दाखविलें आहे कीं, कलेचे नियम असे कोणतेही मानले किंवा न मानले तरी व विशिष्ट हेतूची जाणीव मनांत ठेवली किंवा न ठेवली तरी, कलाविलास या दृष्टीनें कोल्हटकरांचीं नाटकें हृदयंगम व सरस असतात. आणि, माझी टीका तत्त्वज्ञानाधिष्ठित नव्हती, तरी लोकांना ती एकंदरीनें तेव्हां पुष्कळ पसंत पडली व अजूनही लोक ती फार पसंत करितात, असें मला वाटतें.

कोल्हटकरांच्या टीकात्मक लेखांत स्थलसंकोचामुळें त्यांच्या तत्त्वज्ञानाचा जसा कोंडमारा होतो, तसाच त्यांच्या विनोदाचाही होतो, ही गोष्ट माझ्या पुष्कळ वर्षांपूर्वी निदर्शनास आली; व मला असें आठवतें कीं, ही गोष्ट मी कोल्हटकर यांजपाशीं बोलून दाखवून त्यांना असें सुचविलें कीं, 'तुमच्या विनोदबुद्धीला होणारा हा अन्याय दूर करण्यासाठीं तुम्ही स्वतंत्र असे विनोदी लेख लिहावे, हें बरें.' कदाचित् स्वत: त्यांच्याही मनांत ही गोष्ट असेल. कसेंही असो. या माझ्या सूचनेनंतर त्यांनीं स्वतंत्र लेख लिहिण्यास सुरवात केली. ते लेख त्यांच्या बुद्धिकौशल्याची, प्रतिभेची व विनोदशील-तेची साक्ष देणारे आहेत; व जसजसे दिवस अधिक जातील, तसतशी त्यांच्या या गुणांना मान्यता अधिक मिळत जाईल. पण, या लेखांना प्रारंभींच एक थोडेंसें गंडांतर आलें. तें असें कीं, श्रावणी, गणपति, इत्यादि धार्मिक विषयांवर कांहीं विनोदी लेख आल्यामुळें लोकांना ते लेख बरेचसे अप्रिय झाले. आधीं विनोदाला सोंवळेपणा अद्यापि आलेला नव्हता; त्यांतून विनोदाचा हल्ला प्रथमदर्शनींच लोकांच्या धार्मिक समजुतीं-वर आल्याकारणानें हेतुविपर्यासापर्यंत मजल गेली; व अशा लेखांत मत-प्रतिपादनापेक्षां कलाविलासच खरोखरी अधिक असतो, ही गोष्ट लोकांना

सहसा पटेच ना. हे लेख 'करमणूक' 'सुधारक' व 'विज्ञानविस्तार' यांतून येत. 'सुधारक' 'व करमणूक' यांच्या संपर्कामुळें त्यांच्या स्वाभाविक दोषांत भरच पडली. आणि, मुंबईत 'बालबोध' 'सरस्वतीमंदिर' वगैरे नियतकालिकांतून त्याच्यावर बरीच झोड उठविली गेल्यामुळें.........नें ते त्यापुढें छापण्याचें जवळ जवळ नाकारलें, असेंही म्हणतात. या निषेधाचा प्रतिध्वनि १९०९ च्या बडोदें येथील साहित्य-संमेलनांत फार मोठा उमटला. पण, विनोदाच्या दृष्टीनें कोल्हटकरांच्या लेखांविषयीं माझें सर्वस्वीं अनुकूल मत असल्यामुळें, मी त्यांची तरफदारी त्या संमेलनांतच केली. पुढील सालीं तेथपर्यंत छापलेल्या अशा लेखांची आवृत्ति 'सुदाम्याचे पोहे' या नांवानें 'मासिक मनोरंजना'नें प्रसिद्ध करण्याचें ठरविलें. तेव्हां, सहजच कोल्हटकर यांनीं त्या पुस्तकाला मी प्रस्तावना लिहावी, अशी मागणी केली; व मीही तें काम मोठ्या आनंदानें स्वीकारलें. अशा रीतीनें विनोदासंबंधानें वाढत्या वाङ्मयाला मदत म्हणून माझें अवश्य कर्तव्य मी केलें.

एका अर्थानें साहित्यसंमेलनाचा अध्यक्ष होण्याचा मान रा. कोल्हटकर यांना माझ्या आधींच मिळावयास पाहिजे होता. कारण, त्यांचें ग्रंथकर्तृत्व माझ्या आधीं सुरू झालें, असें म्हणतां येईल. परंतु, 'केसरी'सारख्या वर्तमानपत्राशीं संबंध असल्यामुळें, तो मान माझ्यानंतर त्यांना मिळाला. इंदूर येथील साहित्यसंमेलनाला आम्हीं दोघेही सभासद म्हणून हजर होतों; व आम्हां दोघांचींही त्यांत भाषणें झालीं. त्यांत मी केलेलें आभारप्रदर्शनाचें भाषण कोल्हटकर व मी दोघांनीं मिळून योजिलें होतें; व माझ्या भाषणांत कोट्या काय करावयाच्या हें त्यांनीं व मी मिळून बसल्या बसल्या जागच्या जागीं ठरविलें, असें मला स्मरतें. बडोदें येथें १९२२ सालीं भरलेल्या साहित्य संमेलनाचें अध्यक्षपद मला देण्यांत आलें. त्या संमेलनास ते हजर राहूं शकले नाहींत. तथापि त्यांनीं संमेलनास उद्देशून कांहीं सूचना पाठविल्या होत्या. त्या चांगल्या होत्या व त्या 'विविधज्ञानविस्तारां'त प्रसिद्धही झाल्या होत्या. पुढें पुण्यास कविसंमेलन करण्याचें ठरलें त्याचें, व फिरून साहित्यसंमेलन पुण्यास भरविण्याचें ठरलें, त्याचेंही अध्यक्षपद रा. कोल्हटकर यांना देण्यांत आलें होतें. कविसंमेलनांत मी आपल्या विलायतच्या यात्रेवरील विनोदी कविता

वाचून दाखविल्या; व काव्यदृष्टि या विषयावर भाषण केलें. रा. कोल्हट-कर यांचें भाषण फार चांगलें झालें; व त्यांनीं त्यांत काव्याची चिकित्सा शास्त्रीयदृष्ट्या केली आहे. मराठी साहित्यसंमेलनाच्या प्रसंगीं तर स्वतः मीच स्वागताध्यक्ष होतों, आणि श्रीमंत बाबासाहेब घोरपडे, इचलकरंजीकर, यांनीं प्रास्ताविक भाषण करून परिषदेचें काम आम्हां दोघांवर सोपविलें, तें आम्हीं सहकारितेनें पार पाडलें. या संमेलनाच्या अध्यक्षाच्या भाष-णांत कोल्हटकरांनीं वाङ्मयाची शास्त्रीय चर्चा केली, ती लोकांना फार आवडली. याच संमेलनांत अश्लील वाङ्मयाची बरीच चर्चा झाली; व तेथपासून ती आजपर्यंत चालूच आहे, हें गेल्या वसंत व्याख्यानमालेंत झालेल्या चर्चेवरून दिसून येतें. या विषयावर कोल्हटकर यांना अधिकार-युक्त वाणीनें आपले विचार सांगण्याला फारसा अवसर मिळाला नाहीं; आणि, स्वतः त्यांचें वाङ्मय या दोषापासून सर्वस्वीं अलिप्त नसलें, तरी त्यांचा अश्लीलतेविरुद्ध असलेला कटाक्ष त्यांच्या अगदीं पहिल्या टीका-त्मक लेखापासून दिसून येतो.

यानंतर कोल्हटकरांचें पुण्यास येणें जाणें बरेंच कमी झालें. त्यांची प्रकृति डोळ्यांच्या विकारानें व तोंडाच्या पक्षघातानें बिघडली; स्वतंत्र रीतीनें हिंडणें फिरणें त्यांना कठीण होऊन बसलें; आणि, वाङ्मयोपास-नेचे नामांकित प्रसंगही त्यानंतर पुण्यास विशेषसे घडले नाहींत. उलट पक्षीं, मलाही उठून काम सोडून त्यांच्या भेटीकरितां मुद्दाम जाणें फारसें शक्य नव्हतें. किंबहुना, १९०४ ची माझी तेल्हाऱ्याची खेप सोडली असतां, मी, वऱ्हाडच्या बाजूला निघालेल्या दौऱ्याच्या प्रसंगाखेरीज, मुद्दाम होऊन त्यांना जाऊन कधीं भेटूं शकलों नाहीं. मे महिन्याच्या निश्चित सुटीमुळें कोल्हटकरांचें येणें पुण्याला वारंवार घडे. परंतु, माझ्या धंद्यांत ठराविक सुटी नसल्यानें किंबहुना विश्रांतीही नसल्यानें मला इच्छा असली, तरी कोल्हटकरांचे गांवीं जाऊन मुक्काम केव्हांही करितां आला नाहीं. पत्रव्यवहारासंबंधानेंही वर लिहिलेंच आहे. तात्पर्य, त्यांचें माझें रहाणें दूर; धंदा वेगळा; व स्वभावांची ठेवणही वेगळी;—यामुळें आम्ही एका अर्थानें जरी बाळमित्र आहों व एकमेकांविषयीं आम्हांला आदर आहे आणि वाङ्मयाची अभिरुचि तर दोघांनाही सारखीच आहे, तथापि प्रायः आम्ही दूरान्वितच आहों, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

पुष्कळ वेळां समान शिष्यांच्या योगानें गुरूंचें साहचर्य घडतें. तशीही गोष्ट त्यांची माझी नाहीं. कारण, त्यांच्या शिष्यांचा गोतवळा मोठा असला, तरी त्यांच्याशीं माझा फारसा निकट संबंध येत नाहीं; व स्वत: माझ्याविषयीं म्हणावयाचें, तर मी कोणत्याही प्रकारें वाङ्मयांत गुरुपीठ म्हणून निर्माण केलेलें नसून, अमुक एक गृहस्थ किंवा लेखक हा माझा शिष्य आहे, असें मी यथार्थतेनें म्हणूं शकत नाहीं. या बाबतींत म्हटलेंच तर इतकें मात्र म्हणेन कीं, कोल्हटकरांना विनोदी राज्याचे मूर्धाभिषिक्त अधिपति मानतात; आणि माझीही गणना एका दृष्टीनें विनोदी लेखकवर्गांत होत असते. यामुळें आम्हां दोघांचा किंवा विनोदी वाङ्मयाचाही अल्प परिचय असणारे कांहीं लोक मलाही कोल्हटकरांचा संप्रदायी मानतात. पण, वास्तविक ही चूक आहे. कोल्हटकरसंप्रदायाच्या विनोदाची जात व माझ्या विनोदाची जात ही अगदीं वेगळी आहे. त्यांना व मला विनोद हा प्रिय आहे, इतकेंच समानाधिकरण्य दाखवितां येईल. सर्व जगच आपआपल्या परीनें विनोदाचें ऋणी असल्यामुळें कोल्हटकर, त्यांचे संप्रदायिक अनुयायी व मी हे विशिष्ट प्रकारचे ऋणानुबंधी आहोंत, इतकेंच फार तर म्हणतां येईल.

परस्पर स्नेहबुद्धि व आदर असतां, कोल्हटकर व मी यांना फारसें साहचर्य लाभलें नाहीं, याचीं सामान्य कारणें वर सांगितलींच. तथापि एक विशेष कारण आहे; व तेंही येथें नमूद केलें पाहिजे. तें असें कीं, माझ्या आवडीनें किंवा परिस्थितीमुळें कां होईना, मी राजकारणाच्या व समाजकारणाच्या अशा एका केंद्रांत प्रथमपासूनच समाविष्ट झालों कीं, त्याच्याविषयीं कोल्हटकरांना सहानुभूति कधींच नव्हती. निव्वळ सामाजिक सुधारणेसंबंधाचीं मतें लक्षांत घेतलीं, तर रा. कोल्हटकर व मी यांच्यामध्यें बहुधा अभेदच आहे. धर्मात शास्त्र व रूढि यांचे संबंध व त्यापैकीं रूढीला महत्त्व, समाजाची प्रगतिपात्रता, सामाजिक निर्बंध कांहीं मर्यादेंत शिथिल करण्याची आवश्यकता, स्त्रीशिक्षण, केशवपन, पुनर्विवाह, मिश्रविवाह, अस्पृश्योद्धार, हीन जातींची उन्नति, विचारस्वातंत्र्य—या सर्व समाजसुधारणेच्या प्रमुख बाबी असें गेल्या पस्तीस चाळीस वर्षांत मानण्यांत आलें आहे; व त्यासंबंधानें माझीं व कोल्हटकरांचीं मतें एकच आहेत. मी स्वत: आपल्या कुटुंबांत ब्राह्मणांतील पोटजातीचे विवाह घडवून आण-

लेले आहेत; ' केसरी'चा संपादक असतां खुद्द पुण्यास, विधवाविवाहोत्तेजक मंडळातर्फे डॉ. भांडारकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या सभेंत पुनर्विवाहाचें योग्य रीतीनें मंडन केलें आहे; पुनर्विवाहितांच्या अपत्यांच्या लग्नसमारंभाला हजर राहून बहिष्कार पाडून घेतला आहे; व स्त्रीशिक्षणाच्या कामीं तर मी शक्य तितकें कार्य स्वतःच्या उदाहरणानें केलें आहे. तथापि, रा. कोल्हटकर यांच्या मनांत जुन्यापुराण्या पिढीसंबंधानें जी तेढ किंबहुना तीव्र तिरस्कार वसत असतो, तो मजमध्यें नाहीं. जुन्या पिढीला शिव्या देणें तर राहोच, पण उपदेश करण्याचा आव घालणें, म्हणजे तें एक नसतें मोठेपण आपणांकडे घेणें आहे. म्हणून, जुन्या समाजांतच राहून नांदून त्यांजविषयीं स्नेहबुद्धीनें व स्वतःच्या उदाहरणानें सामाजिक सुधारणा घडवून आणावी, असें माझें मत आहे. यामुळें जुन्या पिढीचे लोक मला सुधारक म्हणतात आणि नव्या पिढीचे लोक मला पुराणमतवादी म्हणतात. असा कांहीं संमिश्रयोग मजसंबंधानें घडलेला आहे. कोल्हटकरांची भूमिका याहून वेगळी आहे. ते स्वातंत्र्यवादी सुधारक व युद्धवादी सुधारक असल्यामुळें, त्यांना लेखनव्यवसायांत जेथें जेथें संधि सांपडली, तेथें तेथें जुन्या पिढीच्या लोकांवर त्यांनीं अगदीं आंतड्याला पीळ पाडून घेऊन, व केवळ ग्राम्यता पदरीं न येईल इतकीच मर्यादा सांभाळून, घेववेल तितकें तोंडसुख घेतलें आहे. या बाबतींत ' केसरी ' वर त्यांचा फार राग. कारण, तें पुराणमतवादी पक्षाचें मुखपत्र असें समजलें जाई. आतां, कदाचित् ' केसरी 'शीं माझा संबंध नसता, तरी समाजसुधारणेविषयीं कोल्हटकरांच्या व माझ्या मतांत वर दाखविल्याप्रमाणें थोडीबहुत तफावत राहिलीच असती. तथापि, केवळ ' केसरी 'शीं माझा प्रत्यक्ष संबंध असल्यामुळें, ती तफावत त्यांना वाजवीहून विशेष वाटे; आणि ' केसरी ' वरचा राग ते मजवरही मनानें काढीत.

त्यांच्या माझ्यांतील दुसरा भेद राजकारण व सार्वजनिक चळवळी यासंबंधाचा. स्वतः कोल्हटकर हे राजकारणांत नेमस्तपक्षाभिमानी. पण त्या पक्षाचें असेंही कार्य त्यांनीं वास्तविक कांहींच केलें नाहीं. कारण, प्रत्यक्ष कृतींत ते नेमस्त राजकारणापासूनही सर्वस्वीं अलिप्त होते. तीच गोष्ट कोणत्याही सार्वजनिक चळवळीची. पैकीं राजकारणाच्या दृष्टीनें

ते मला केव्हां जहाल तर केव्हां ढोंगी असें समजत. जेथें मी खरो-खरच जहाल असेन, तेथें मी त्यांना अप्रिय होतोंच. परंतु, जेथें मी जहाल नव्हतों, तेथें मी जहाल पक्षांतून फुटून निघालों नाहीं, याबद्दलही त्यांच्या दृष्टीनें दोषी असें; व मी प्रत्यक्ष पक्षत्याग न करणें यालाच ते ढोंग समजत. सार्वजनिक चळवळींत मी पडतों, याविषयीं त्यांना मला विशेष कांहीं नांवें ठेवतां येत नव्हतीं. परंतु, नसती उपाधि मागें लावून घेण्याच्या माझ्या स्वभावाला तरी ते दोष देत ! असें असल्यावर खुद्द लो. टिळकांसंबंधानें त्यांना काय वाटत असेल, हें सांगावयास नकोच. त्यांनीं क्वचित्प्रसंगीं टिळकांच्या संबंधानें गौरवपर उद्गार काढलेले आहेत. परंतु, तो पुष्कळसा शिष्टाचाराचा व दाक्षिण्याचा भाग होता, इतकेंच ! पण, त्यांना टिळकांच्या कामगिरीविषयीं काय वाटत असेल, याचें स्थूल गमक असें कीं, कोल्हट-कर हे साऱ्या जन्मांत 'केसरी' चे वर्गणीदार कधींच नव्हते; स्वत: होऊन त्यांनीं टिळकांचा 'केसरी' कधींच वाचला नाहीं; व १९१० सालापासून मी 'केसरी' चा संपादक झालों, तेव्हां निदान माझ्या सहानुभूतीनें व मित्रभावानें तरी ते 'केसरी' पहात असतील, अशी जी भावना मी मनाशीं सहज वृत्तीनें ठेवीं, ती किती भ्रामक असे, याचीं प्रत्यंतरें मला मोठ्या बोधप्रद रीतीनें मधून मधून मिळत. इतकें मात्र होई कीं, त्यांच्या स्नेही वकीलमंडळीचा 'केसरी'वर बहिष्कार नसल्यामुळें, माझा एकादा लेख त्यांना चांगलासा वाटला आणि त्याची वाखाणणी त्यांनीं कोल्हट-करांजवळ केली व हातांत अंकच नेऊन दिला म्हणजे ते तो वाचीत, असें सांगतात. पण, माझ्या अवघ्या संपादकीय आयुष्यांत माझ्या अमुक एका लेखाबद्दल त्यांनीं अभिज्ञान किंवा सहानुभूति पत्रद्वारें किंवा समक्ष प्रकट केली असें मला आठवत नाहीं. वर या ज्या गोष्टी मीं सांगितल्या, त्यांत आमच्या स्नेहाला किंवा परस्पर आदराला बाध आणण्यासारखें विशेष कांहीं नव्हतें. यामुळें वरील सर्व गोष्टी अखेरपर्यंत कायम असतांही, त्यांच्या माझ्या स्नेहांत फारसें अंतर पडलें नाहीं. तथापि, आमचा जो स्नेह होता तो बहुतांशीं वाङ्मयाभिरुचीवर अधिष्ठित होता हें दर्शविण्याकरितांच मी या अनेक गोष्टींचा उल्लेख केला आहे.

## विनोदाचा नवा अवतार

आधुनिक मराठी वाङ्मयांतील विनोदयुगाचे प्रवर्तनकार असें कोल्हट-

करांचें जें वर्णन करण्यांत येतें, तें अगदीं यथार्थ आहे. विनोदाचा परिणाम हास्य; व हास्याची गणना संस्कृत साहित्याचार्यांनीं मूर्तिमंत व प्राथमिक रसांत केलेली आहे. यावरून हा रस कोल्हटकरांच्या लेखणीनें आज प्रथम जन्माला आला, असें त्यांच्या एकाद्या अंधभक्तानें म्हटल्यास तें अप्रयोजकपणाचें होईल, हें उघडच आहे. पण जुन्या साहित्यग्रंथांत हास्यरसाची सोपपत्तिक व सोदाहरण चर्चा असली, तरी त्या रसाला साहित्याचार्य मनानें गौण मानतात, हें व्यक्त होण्याइतकी हास्यरसाची उपेक्षा त्यांच्या हातून घडली आहे, हें कोणासही नाकबूल करितां येणार नाहीं. पूर्वी 'सुभाषित व विनोद' हा ग्रंथ लिहिण्याच्या वेळीं हास्यरसाचा उपयोग संस्कृत वाङ्मयांत एकंदरीनें कोठें व किती झाला आहे, हें पाहण्याकरितां मी मुद्दाम टिपणें केलीं. तीं अजून माझ्या संग्रहीं आहेत. त्यांवरून मी असें निश्चित म्हणूं शकतों कीं, या रसाचा उपयोग संस्कृत ग्रंथकारांनीं एकंदरीनें फार थोडा केला आहे; व केला तोही अशा विकृत रीतीनें केलेला आहे कीं, तें पाहून हास्यरसाविषयीं कोणाच्याही मनांत विशेष आदरबुद्धि किंवा कृतज्ञता उत्पन्न होणार नाहीं. येऊन जाऊन एक मृच्छकटिक नाटकच असें आढळतें कीं, त्यामध्यें विनोद हा स्वाभाविक स्वरूपांत साधलेला असून, त्याच्या वाचनानें विनोदाविषयीं प्रतिकूल भावना उत्पन्न होत नाहीं. संस्कृत वाङ्मयाचा बहुतेक काळ तें वाङ्मय कठीण व पंडितगिरीचें करण्यांत गेला. विद्वत्ता फार जाडी; तर्ककौशल्य इतकें सूक्ष्म कीं, एका केसाचे शंभर भाग करितील. पण, ज्यामध्यें ही विद्वत्ता सांठवून ठेवली गेली, तो वर्ग असा होता कीं, एक तर त्यांतील महात्म्यांनीं आपलें कवच फोडून त्यांतून बाहेर येऊंच नये; किंवा ते आलेच, तर त्यांचा परिचय व संभावना राजे लोकांच्या परिवारांतील केवळ खुषमस्कऱ्यांतच नसली, तरी निदान अंधस्तुतिपाठकांत व्हावी. अशा परिस्थितींत खरा सात्त्विक, शुद्ध विनोद गुणोत्कर्ष पावूं शकत नाहीं. या विनोदाची मजल राजपरिवारांत फक्त सुभाषितापर्यंत जाऊन पोंचली. म्हणजे त्याचा उपयोग बुद्धिकौशल्य प्रगट करण्याकडे झाला. परंतु, सामाजिक मनुष्याचे विकार व भावना प्रकट करण्याला विनोद हा सहृदयतेला जी मदत करितो, ती देण्यास त्या काळीं अवसर नव्हता. सहृदयता असेल; पण ती सांकेतिक वाक्प्रचारांच्या आवरणांत इतकी दडपून गेलेली असावी कीं, मनुष्याच्या मनाचा एकच

भाग बोलतो व तोही तेंच तेंच बोलतो, आणि इतर भागाला जणुं कांहीं कुलूपच लागून राहिलें होतें, असें वाटतें. विद्वानांनीं विनोद हा ओंवळा म्हणजे दूषणास्पद मानला. आणि एका टोंकाला राजपरिवार व दुसऱ्या टोंकाला ग्राम्य समाज यांनीं विनोदाचा स्वीकार केला, पण तो अश्लीलत्वाला नेऊन भिडविला. यामुळें, या मोठ्या कालावधींत हल्लींच्या काळासारखा सुशिक्षित वाङ्मयप्रेमी असा मध्यम सामाजिक वर्ग तेव्हां नव्हता, असें म्हटलें तरी चालेल; व असला तरी त्याला विनोदाचें शिक्षण मिळत नव्हतें, असें तरी म्हणतां येईल. एकादा नाटककार किंवा कादंबरीकार वाङ्मय लिहिण्यास बसेल, तेव्हां प्रसंगवशात् प्रतिभा त्याला विनोदाची सूचना करील. कारण, मनुष्य वाङ्मय लिहावयास बसला आणि त्याला विनोदाचें दर्शन मनांत दुरूनही साऱ्या जन्मांत झालें नाहीं, अशी कल्पना करणें अशक्य आहे. म्हणूनच, वर सांगितल्याप्रमाणें संस्कृत वाङ्मयांत विनोदस्थळें आढळतात. पण, फिरून वर सांगितल्याप्रमाणेंच हीं स्थळें फारच मर्यादित म्हणजे जवळ जवळ मोजून संख्या सांगण्याइतकींच भरतील. मध्ययुगांत संस्कृत विद्येतील निरनिराळ्या शास्त्रांवर अनेक ग्रंथ निर्माण झाले. परंतु, त्यांत प्रायः शपथेलाही विनोदस्थळ सांपडणार नाहीं, असा आमचा तर्क आहे. यानंतर प्राचीन मराठी वाङ्मय घेतलें, तरी त्यांतहीं प्रायः हीच गोष्ट आढळते. श्रीरामदासांनीं 'टवाळां आवडे विनोद । उन्मत्तांसि नाना छंद' या अवघ्या दोन ओळींत विनोदपरामर्षाचा सर्व तत्कालीन ग्रंथ लावून दाखविला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. 'टवाळां आवडे विनोद ।' या म्हणण्यावरून त्या काळीं विनोद नव्हता असें नाहीं, हें सिद्धच होतें. पण तो कोणत्या प्रतीचा होता हें उघड दिसतें. आतां तत्कालीन शिष्टांना व सभ्यांना विनोद सुचत नसेल, असें नाहीं. पण विनोदावरील बहिष्कार असेल, तो मनांत सुचण्यावर किंवा समानशीलव्यसन लोकांनीं खाजगी संभाषणांत प्रकट करण्यावर नव्हता; तर तो पंडितसभांतील भाषणांत किंवा ज्ञानविषयक ग्रंथांत उपयोगांत आणण्यावर होता, असें अनुमान निघतें.

इंग्रजी अंमल सुरू झाल्यानंतर वाङ्मय लिहिण्यास थोडथोडी सुर-

वात झाली. विनोदाला किंचित् प्रतिकूल अशी पद्यरचना किंवा काव्य याऱ्या जागीं गद्य पुढें येऊन सरसावलें. तथापि, जुन्या संस्कृत पंडितगिरीची वृत्ति सर्वस्वी लोपली नव्हती. ती संस्कृताऐवजीं मराठी गद्यांतून प्रगट होत होती, इतकेंच. यामुळें अनेक प्रकारच्या इंग्रजी वाङ्मयाचा अभ्यास केलेला, स्वतः मनानें विनोदशील असणारा, आणि एका मोठ्या क्रांतीच्या वेळीं क्षितिजावर येणारा, असा स्फूर्तिशाली, सहृदय, रसिक लेखक म्हणजे विष्णुशास्त्री चिपळूणकर हे प्रकट होईपर्यंत, पूर्वीच्या मराठी गद्यलेखांतून विनोदस्थळें दाखवून देणें हेंही काम, संस्कृत वाङ्मयांतील विनोदस्थळें दाखविण्याइतकेंच, अवघड होऊन बसलें. एका अर्थीं कृष्णशास्त्री व विष्णुशास्त्री या दोघांची बुद्धिमत्ता व विद्वत्ता एका तोलाचीच असतां, विनोदाचा लवलेशही बापाच्या लिखाणांत सांपडूं नये, व त्याचें स्पष्ट रूप मुलाच्या लिखाणांत प्रकट व्हावें, याचा बोध घेणें म्हणजे तत्कालीन स्थित्यंतरावर पडत असलेला प्रकाश पहाणें होय. बुद्धिमत्ता व विद्वत्ता तीच असतां, बापानें व मुलानें ज्या हेतूनें वाङ्मय लिहिलें, त्या हेतूच्या फरकांतच हा बोध पाहिला पाहिजे. विष्णुशास्त्री देखील किंचित् पंडितगिरीकडे झुकणारेच होते !

## ' हंसणारे सिंह !'

जुन्या पंडितगिरींत व नव्या पंडितगिरींत हा फरक आहे कीं, पहिलीचें ध्येय कांहीं विशिष्ट वर्गाला उद्देशूनच विशिष्ट विषयच सांगण्याचें होतें; पण नव्या पंडितगिरीचें ध्येय सर्वच विषय शक्य तितक्या अधिक लोकांना उद्देशून समजून सांगण्याचें आहे. पहिलें ध्येय साधण्याला विवेचनपद्धति अवघड व परिभाषा कूटबद्ध असली तरी चालत असे. पण दुसरें ध्येय साध्य व्हावयाचें, तर विवेचनपद्धति सोपी व भाषाहि साधी आणि व्यवहारांतली वापरावी लागते. याशिवाय आणखीही एक गोष्ट आवश्यक असते. ती ही कीं, सामान्य लोकांना बोध करावयाचा, तर तो त्यांना खुषींत ठेवूनच करावा लागतो. आणि कोणालाही खुषींत ठेवावयाचें तर त्याला विनोदासारखें दुसरें साधन नाहीं. विनोद करून दुसऱ्याला हंसविणें ही गोष्ट खरोखर वाटते तितकी सोपी नाहीं. शिवाय, फिरून तो ग्राम्य विनोद नव्हे, तर प्रतिष्ठित विनोद करून ! समाजांत कांहीं नुसते विद्वान् असतात, तसे कांहीं नुसते विनोदी लोकही असतात.

पण, विद्वान् असून विनोदी असे प्राय: थोडे आढळतात. सेंटबूव्ह या फ्रेंच तत्त्वज्ञानें असें म्हटलें आहे कीं, It is not given to everyone to make the mind laugh; and what pleasures can surpass those of the mind ?" प्रतिष्ठितपणाचा विनोद देखील पुष्कळ लोकांना आपआपल्या मनांत सुचूं शकेल. आणि तो सुचण्याइतके सहृदय व रसिक जुने पंडित खचित होते. पण, विद्याविषयक ग्रंथ लिहितांना त्यांच्या डोळ्यांपुढें फार मर्यादित व तज्ज्ञ असाच वर्ग असे म्हणून, व विद्यार्थ्यांना पाठ शिकवितांना प्रतिष्ठा व गांभीर्य राखणें सहजच अवश्य म्हणून, विनोदाचा उपयोग त्यांच्याकडून सहसा केला जात नसावा, असें वाटतें. पण छापखाने निघाल्यापासून ग्रंथकारांच्या डोळ्यांपुढचा मर्यादित तज्ज्ञ वर्ग जाऊन, त्यांच्या जागीं वर्तमान व भविष्य काळांतील अफाट व अतज्ज्ञ वाचकवर्ग दिसूं लागला असावा. राजे लोकांची खुषमस्करी करण्याऐवजीं आतां समाजाची खुषमस्करी करण्याचा प्रसंग आला. अर्थात् ती चांगली करावयाची तर मनुष्यस्वभावाच्या अंतरंगांत शिरूनच केली पाहिजे. कोणाच्याही अंतरंगांत शिरावयाचें, तर तें हास्यविनोदानें जितकें होतें तितकें दुसऱ्या कशानें होऊं शकत नाहीं, हा जगाचा अनुभवच आहे. दुसराही एक विचार आहे. तो असा कीं, राजे लोकांची भिस्त आपल्या सैन्यावर; आणि सैन्य स्वाधीन राखण्याचें कार्य हुकमतीशिवाय व दराऱ्याशिवाय होत नाहीं. याच्या उलट राजे लोकांशीं टक्कर देण्याची इच्छा धरणारांचें सैन्य जनता हेंच होय. आणि तें सैन्य स्वाधीन रहावयाचें तर तेथें हुकमत व दरारा हें साधन होऊं शकत नाहीं; तर प्रेम व विनोद यांच्या योगानें अनुनय करणें हेंच होऊं शकतें. व्हॉलटेअर एका पत्रांत आपल्या मित्राला लिहितो "I have no sceptre but I have a pen" (माझ्या हातीं राजदंड नाहीं, नुस्ती लेखणी आहे. पण राजाला म्हणावें संभाळून रहा!). आणि खरोखरच त्या लेखणीनें त्यानें क्रांति घडवून आणली. जर्मन तत्त्ववेत्ता नीत्शे यानें असें म्हटलें आहे कीं, "जनता वश करून आपल्या मागून न्यावयाची, तर त्या कामीं 'हंसणाऱ्या सिंहांची' योजना केली पाहिजे." हें विधान नीत्शेच्या नेहमींच्या विधानपद्धतीप्रमाणें अत्यंत ठसकेदार व चमत्कारिक असें आहे. पण खरेंही आहे.

मेंढया वळवून नेऊन घरांत घालवयाच्या कामीं कुतऱ्यांचा उपयोग मेंढपाळ करितात. हे कुत्रे संरक्षक खरे; पण कदाचित् त्यांच्या भुंकण्यामुळें मेंढयांना त्यांची भीति वाटून तें कार्य होत असावें. पण मनुष्य-समाजरूपी मेंढयांना वळवून नेण्याचे कामीं सिंहाचा उपयोग करावयाचा, व फिरून ते सिंह हंसरे असावयाचे, ही कल्पना अजब खरी ! सिंह हे मनुष्यभक्षक म्हणून प्रसिद्ध आहेत, मनुष्यरक्षक नव्हत. त्यांची गुरगुर व गर्जना माणसाला गर्भगळित करणारी आहे. पण गुरगुरण्या गर्जण्या-ऐवजीं सिंह हा स्वतः हंसूं लागला व माणसांना एखाद्या विदूषकाप्रमाणें हंसवूं लागला, तर केवढा चमत्कार होईल ? पण नीत्शेची कल्पना जगांतील विनोदी लेखकांनीं सिद्ध करून दाखविली आहे. जुन्या काळां-तले शूद्रक, ॲरिस्टोफेनीस्, ल्यूशियन, मध्ययुगांतले इरॅसमस्, रॅबेले; चॉसर्, बटलर, सरवेंटिस; आधुनिकांतले व्हॉल्टेअर, लेसिंग, मॉंटेन, मोलिअर, स्टर्न, स्विफ्ट, गोल्डस्मिथ, ॲडिसन, चार्लस लॅंब, मार्कट्वेन; मॅक्स ऑरेल, बॅरी, अनातोल, फ्रान्स, बर्नार्ड शॉ, चेस्टरटन, चिपळूण-कर, परांजपे, कोल्हटकर, गडकरी इत्यादि मंडळींना ' हंसणारे सिंह ' च म्हणतां येईल. या मनुष्यसिंहांची बुद्धिमत्ता सिंहशक्तिसारखी प्रबल असून, त्यांनीं आपल्या विनोदी हास्योत्पादक लेखांनीं अज्ञान व भोळेपणा यांचा प्रचंड संहार केला. सिंह स्वतःचें तोंड उघडून ग्रास करितात; तर या लेखकांनीं हंसविण्याच्या जोरानें लोकांचीं तोंडें उघडून त्यांचा ग्रास केला ! सिंह आपल्या सान्निध्यानें भूप्रदेश सभय करितात; तर या लेखकांनीं मनुष्यमात्रांचीं मनें निर्भय केलीं !

मार्कट्वेनचा विनोद हिंदी सुशिक्षितांनाही कळत नाहीं. याचें कारण मार्कट्वेनच्या डोळ्यांपुढें असलेले असंबद्धतेचे नमुने अमेरिकेंतच निर्माण झालेले आढळतील. एक इंग्रज टीकाकार म्हणतो, " विनोदाचा एका काळांतला नमुना पाहून त्याचें अनुकरण करूं पहाणारा दुसऱ्या काळांतला मनुष्य सपशेल फसावयाचा. त्यानें त्या अनुकरणाविषयीं निराशच व्हावें. ज्यांना हें म्हणणें चमत्कारिक वाटेल, त्यांनीं जुन्या कवितेच्या विनोदी वाङ्मयाचा एकादा ग्रंथ घेऊन वाचला म्हणजे कळून येईल. काळ बदलला म्हणजे त्याबरोबर सुभाषितस्थानें, विनोदस्थलेंही बदलतात; व जुन्यांना शिळेपणा येतो. ॲरिस्टोफेनीस किंवा होरेस यांच्या वक्रोक्तीचें

स्वारस्य आज किती लोकांना कळेल ? रॅबेलेचा विनोद तर इतका खोल व परिस्थितीच्या पाशांत गुंतून गेलेला आहे कीं, फक्त विद्वान् पंडितांनाच तो कळूं शकेल; व तेंही ते स्वत: कांहीं शतकें मागें उडी मारून रॅबेलेच्या सामाजिक परिस्थितींत जाऊन बसतील तेव्हांच. तीन शतकांपूर्वी शेक्सपियरच्या नाटकांतील ज्या कोट्या ऐकून तत्कालीन रंगभूमींतील पिटमधील लोक पोट दुखेपर्यंत हंसले असतील, त्यांतील कांहीं ऐकून कदाचित् हल्लींच्या श्रोत्यांच्या तोंडावर सुरकुतीही पडणार नाहीं. एकोणिसाव्या शतकाच्या अखेर ज्या प्रकारच्या विनोदी कविता प्रचारांत होत्या, तसल्या कविता आतां फिक्या पडतात. तसेंच ग्राम्य किंवा कुणबाऊ भाषेच्या उपयोगानें नाटकपात्रांकडून जो विनोद निर्माण केला जातो, तो केव्हांही एका प्रान्तापुरता किंवा एका कालखंडापुरता असतो. " * जे. बी. प्रीस्टली यानें, एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पंचवीस वर्षांत नाटक कादंबऱ्यांतून कोणत्या प्रकारचीं विनोदस्थळें रंगलीं जात असत, त्यांचीं कांहीं गमकें दिलीं आहेत. त्या काळच्या हूड, थिओडर हूक, मॅरियट, पीकॉक, वॉरन

---

*The humour of one day is the despair of the next. Let doubters prove this for themselves by taking down some volume purporting to give the best wit and humour of a former generation. The topics on which humorists most frequently expend their fancy become stale and musty with the passage of time. The satire of Aristophanes or Horace, the broad indecencies of Rabelais, still draw appreciation from scholars, but it takes a scholarly mind to place them in proper perspective.

There are no drearier passages in Shakespeare than those which evoked shrieks of mirth from the groundlings of three centuries ago. The best products of early Victorian jesters, with the exception of a few still admired, because of artful versification, seem lame and wheezy. Most of those appalling concoctions in dialect form which convulsed our grandfathers have passed to deserved oblivion. Even the detached whimsicalities of a great master, a Mark Twain, after a few years sound less whimsical than when they were first uttered.

वगैरे दहा पांच विनोदी लेखकांचा निर्देश करून, त्यानें असें म्हटलें आहे कीं,—

This period produced a literature of its own that is to be distinguished from what came before and what followed after by its high spirits ; these were the days of Barham, Hood, Lever, Surtees, Theodore Hook, Marryat, Peacock, Warran, Walker and his ORIGINAL, and a hundred more ; even criticism was troubled by the prevailing spirit, and so we had Christopher North and his roistering NOCTES. The innumerable volumes that these gentlemen produced, between bottle and bottle as it were, shadowed forth a world that was really a reflection of the paradise of, say, a typical literature of dragoons, a world of galloping horses, hot brandy and water, oysters, practical jokes, devilled kidneys—( against which Poe protested so passionately in his attack upon Lever ), funny stories, inn parlours, quaint bewhiskered rascals, bobbing chambermaids, negus and macaroons, idiotic foreigners ( usually counts and barons ), comic, red-nosed and predatory spinsters, gouty old-gentlemen and very perfunctory love affairs. At its worst, nothing could be more stupid than this literature, which compels the reader to dance attendance upon half-witted militia men and horsedealers and dandies in their dreary half-witted revels, knowing that not a single idea or a really amusing character or even an entertaining remark will ever show a sail above the sickening flood of brandy and water. At its best, in spite of innumerable faults of taste and a lack of ideas, this literature of masculine high spirits and comradeship was fleetingly touched with a kind of poetry, for there was about it a certain boyish eagerness, a laughing spontaneity, that raised the world it created above time change and made it into a Valhalla of whiskered light dragoons, so that there are moments when the reader feels that its lounging bloods, its devil-may-care majors and roguish servants, with their freedom from ordi-

nary care, their immense appetites and immeasurable high spirits, their unflagging gusto, are really gods in disguise. But it had to be subtly humanised and mellowed in the mind of genius, like wine in the brandy cask, before it became great literature. ( The English Comic Characters. p. 199 ).

वरील उताऱ्याचें थोडक्यांत भाषांतर करणें अशक्य आहे. तथापि त्यांतील मुद्दा इतकाच कीं, त्या काळीं इंग्रजी समाजांत असलेलें अतिरिक्त मद्यप्राशनाचें व्यसन आणि त्या व्यसनाच्या आधीन झालेल्या किंवा त्याच्या आसपास फिरणाऱ्या किंवा त्याच्या अनुषंगानें व्यवहार करणाऱ्या म्हणजे दारूचा वास ज्यांच्या अंगाला अधिक उणा हटकून येतो, अशा पात्रांशिवाय विनोदी ग्रंथकारांना दुसरीं साधनें क्वचितच् मिळालीं. इंग्रजी विनोदी वाङ्मयांतील बुली बॉटम ( Bully-Bottom ), टचस्टोन, टोबी बेल्हा, ॲग्यु चीक, फॉलस्टाफ, शॅबो, पार्सन ॲडॅम्स, शॅंडी, कॉलिन्स, सामवेलर, मिकॉबर, पिकविक इत्यादि विनोदी पात्रें घेतलीं असतां, तीं निर-निराळ्या कालांतील हास्यास्पद समाजस्थितीचे नमुने होत. त्यांची अदला-बदल कोणी करूं शकला नसता, हें कोणालाही नाकबूल करितां येणार नाहीं.

त्यांच्या टीकात्मक लेखांतला विनोद तीव्र वक्रोक्तीचा असून, तिचा हेतु टीकाविषयीभूत ग्रंथकाराला चीत करावयाचा असतो. त्यांची टीका सुरू झाली, म्हणजे वाचकाला आपण ती एक शिकार पहात आहों, असें वाटतें; खेळ पाहतों असें वाटत नाहीं. ग्रंथकाराच्या गैरहजेरींत त्याच्या ग्रंथनिर्मितीचें सावज कोल्हटकरांच्या हातीं एकटें सांपडलें आहे; व सर्व प्रकारचीं घातक बौद्धिक हत्यारें व साहित्यक्रीडेंतले संवगडी पारधी बरोबर घेऊन कोल्हटकर त्याच्यावर तुटून पडले आहेत, असाच भास त्यांचे टीकात्मक लेख पाहून होतो. शिकारीचें पर्यवसान, कलेच्या दृष्टीनें तरी, मृगयापशुवध हेंच होय, यांत शंका नाहीं. पण, शिकारीं-तील हांकयांच्या आरडाओरडीला व पारध्यांच्या जयघोषाला कोणीही हास्यविनोद म्हणत नाहींत. त्यांच्या टीकेंत मारीन किंवा मरेन अशा भावनेचें तर्कयुद्ध असतें. कुत्र्यामांजरांचीच काय पण वाघ सिंहांचींही पिलें कोवळ्या उन्हांत एकमेकांवर हल्ला केल्याचा खेळ खेळत असतात, तेव्हां त्यांत युद्धांतील सर्व प्रकार असतात. पण अंग ओरबाडून निघत

नाहीं व रक्तपात होत नाहीं. अशा प्रकारची टीका कोल्हटकरांची फारशी नसते. टीकाविषय हा जेव्हां त्यांना शत्रूसारखा वाटतो, तेव्हां त्यांची तीक्ष्ण वक्रोक्ति उपयोगांत येते. जेव्हां त्यांना तो क्षुद्र किंवा अनुकंपनीय वाटतो, तेव्हां ते वक्रोक्ति बाजूला सारून ठेवतात. पण, बोधाचें काम हातीं घेऊन त्याला जेव्हां ते लेखनकलेच्या शिक्षणाचे धडे देऊं लागतात, तेव्हां वक्रोक्तीइतकाही विनोदाला अवसर त्यांच्या विवेचनांत राहत नाहीं. पण मल्ल किंवा शिक्षक यापेक्षां तिसरीही एक भूमिका टीकाकारांची असूं शकते. ती प्रेमळ सहानुभवी स्नेह्याची. या भूमिकेवरून टीकाकार हा टीकाविषयीभूत ग्रंथकाराचे दोष दाखवील, पण ते त्याला फारसा कमीपणा न येईल अशा बेतानें; आणि त्याचे गुण दाखवील तर तेही श्रेष्ठानें कनिष्ठाला पाठीवर शाबासकी देण्या-करितां थोपटावें अशा आढ्यताखोरीच्या पद्धतीनें नव्हे. कोल्हटकरांनीं ही खेळीमेळीची पद्धति टीकालेखांत फारशी अनुसरलेलीच नाहीं. याचें एक कारण कदाचित् हें असावें कीं, ते लेख प्रायः 'विविधज्ञानविस्तारां'-तच छापले गेले. या मासिक पुस्तकाला वयातीतत्वामुळें सहजच वडी-लकी आली होती. स्पर्धेला कोणी उभा नव्हता. शिवाय, कोल्हटक-रांच्या पूर्वीं त्यांच्याइतका तर नव्हेच, पण त्यांच्या निम्याइतकाही विनोद-प्रिय टीकाकार लेखक त्यांतील टीकात्मक लेख लिहिण्याला 'विस्ता-रा'ला मिळालेला नव्हता. स्वतः विनोदालाच अजून प्रतिष्ठा लाभावयाची होती. आणि गंभीर लेखनपद्धतीच्या अखंड परंपरेच्या खोल चाकोरींत 'विविधज्ञानविस्तार' गेलेला असल्यामुळें, त्यांतून त्याला वर काढणें म्हणजे त्याच्या विशिष्ट सनातनत्वाला दूषण लावणें, त्याची गांभीर्याची प्रतिष्ठितपणाची कीर्ति मळविणें, यासारखें स्वतः संपादकांना व इतरांना वाटत असल्यास नवल नाहीं. या प्रतिष्ठितपणाचे (लब्धप्रतिष्ठितपणाचे असेंही कोणी कदाचित् म्हणेल) पिंड प्रथम कोणी चाळविले असतील, तर ते मात्र कोल्हटकरांनींच. पण पिंड चाळविण्यापूर्वी ते घालावे लाग-तात, या न्यायानें कोल्हटकरांनीं 'विस्तारां'तील जुन्या पिढीच्या लेख-कांच्या आत्म्यांना थोडेसें हलल्यासारखें वाटण्याइतकें चालन आपल्या विनोदी लेखणीनें दिलें, तरी जुन्या पिढीची गांभीर्यपरंपरा सगळीच सोडली नाहीं.

कोल्हटकर तपशीलवार दोषदर्शनाच्या लहरींत आले, म्हणजे काना मात्राअनुस्वार हेही त्यांच्या तावडींतून सुटावयाचे नाहींत. मग व्याकरण-दोषांची कथा काय? आणि संगति असंगति इत्यादि सर्व दुष्ट अनुमान पद्धतीच्या गोष्टींविषयीं व कलेच्या अंगाविषयीं तर बोलावयासच नको. ग्रंथलेखकाचा खर्डा असा तपासून देण्याला त्यांना कसा वेळ होत असेल किंवा अशा निष्फळ परिश्रमाची हौस त्यांना कशी वाटत असेल, हें त्यांनाच ठाऊक. पण, टीकेच्या कामीं पक्केपणा असावा असा नियम प्रथमपासूनच त्यांनीं स्वतःला घालून घेतलेला असावा, असें वाटतें. आणि टीकाकार इतका तपशिलांत गेलेला पाहिला, म्हणजे मग ग्रंथ-कर्त्याला हें तरी म्हणतां येत नाहीं कीं, टीकाकारानें आपली उपेक्षा केली. ग्रंथकाराचा व टीकाकाराचा मतभेद होवो; पण त्यानें आपलें कर्तव्य इमानदारीनें केलें, इतकें तरी ग्रंथकाराला कबूल करावें लागतें. ग्रंथ नीट न वाचतां दिलेला अभिप्राय अनुकूल असेल किंवा प्रतिकूल असेल. पैकीं अभिप्राय अनुकूल असला, म्हणजे मग ग्रंथ वाचून न पाहिल्याची तक्रार ग्रंथकार सहसा करीत नाहीं. पण, न वाचतांच प्रतिकूल अभिप्राय टीकाकारानें दिला म्हणजे ग्रंथकाराला सहजच राग येतो व तो योग्यही असतो. कारण अपात्रीं दान करणें हें अन्यायानें केलेल्या अपहारापेक्षां पुष्कळ बरें. चुकूनच करावयाचें तर कोणाचें बरें तरी करावें, वाईट मात्र करूं नये, हा नीतिशास्त्रांतला एक ढोबळ सिद्धांत आहेच. कोल्हटकरांच्या टीकांसंबंधानें एक गोष्ट मात्र निःसंदेह रीतीनें सांगतां येण्यासारखी असून, तींत त्यांना भूषणभूत असें वैशिष्ट्य पुष्कळच आहे. तें हें कीं, त्यांच्या इतकें खोलांत व तपशिलांत शिरणारा टीकाकार विरळा. सर्वच टीकालेखांत त्यांनीं ही सूक्ष्म समालोचनपद्धति अनुसरली आहे असें नाहीं. कारण, कित्येक टीकालेखांत त्यांनीं ग्रंथाच्या नांवाच्या उल्लेखापलीकडे त्याचा फारसा परामर्ष घेतलेला नाहीं. पण जेथें तपशिलांत शिरण्याचें त्यांनीं मनावर घेतलें, तेथें ते इतके खोल जाऊन सूक्ष्मांत वावरलेले आढळतात कीं, हौशी व पगारी शाळा-मास्तरही विद्यार्थ्यांचीं 'एक्सरसाईज' बुकें इतक्या कसोशीनें तपाशीत नसेल. ही गोष्ट छापील टीकात्मक लेखांपुरतीच आहे असेंही नाहीं. कारण मला अशी माहिती आहे कीं, विद्यार्थ्यांच्या विनम्रभावानें एखाद्या तरुण

शिष्य लेखकानें जर आपल्या लेखाचें किंवा ग्रंथाचें हस्तलिखित त्यांच्याकडे तपासावयास दिलें, व त्यांनीं प्रसन्न होऊन तें वाचून सूचना करण्याचें अभिवचन दिलें, तर तें परत जातांना या 'बारीक डोळ्या' शिक्षक-मित्राच्या हातून शुद्धाशुद्धाच्या खुणांनीं व सूचनात्मक शेऱ्यांनीं चिताड होऊनच परत जावयाचें. 'विस्तारा'च्या संपादकांकडून परीक्षणार्थ-कोल्हटकरांकडे गेलेल्या कांहीं ग्रंथांच्या लेखकांवरही अशीच अनाहूत किंवा अनपेक्षित कृपा त्यांच्याकडून झालेली आहे.

कोल्हटकरांनीं केलेल्या निरनिराळ्या परीक्षणांतून ग्रंथांसंबंधानें खालील दोष दाखविण्यांत आले आहेत. त्यांवरून त्यांचें निरीक्षण किती सूक्ष्म असतें हें दिसून येईलः— असंगति, विसंगति, वाईट भाषा, अश्लीलत्व, ऱ्हस्वदीर्घांच्या चुका, समस्त पदांच्या चुका, बनावट शब्द, परभाषा-दूषण, ग्राम्यत्व, हेतुविरुद्ध शब्दयोजना, दुर्बोधत्व, रसापकर्ष, यतिभंग, अतिशयोक्त चमत्कृति, गणमात्रादोष, चौर्यकर्म, विद्वत्तेचा बहाणा, शास्त्राचें अज्ञान, शब्दश्लेषाचें व्यसन, अस्थानीं पद्य-प्रयोग, पद्यांत प्रमाणबद्धतेचा अभाव, रचनेंतील दोष, भाषांतराची चूक, दूरान्वय, पाल्हाळ, माहितीचा अपुरेपणा, बोजड भाषा, कृत्रिमता, अकारणत्व, आकस्मिकत्व, अप्रयोजकत्व इत्यादि.

## टीकालेखांतील कांहीं दोष

कोल्हटकरांच्या कांहीं टीकात्मक लेखांत एक दोष उघड उघड दिसून येतो, त्याचा उल्लेख अवश्य केला पाहिजे. पण, तो सांगितल्यावर तो घडण्याचें कारणहि आम्हांला सांगतां येईल, असें वाटतें. म्हणून तेंहि आम्हीं सांगणार आहों. हा दोष म्हणजे टीकालेखांची लांबी व टीकाविषयीभूत ग्रंथाचें महत्त्व यांमधील प्रमाणबद्धतेचा अभाव. कांहीं कांहीं लेखांत हें प्रमाण फारच सुंदर रीतीनें साधलें आहे. याचीं दोन उदाहरणें द्यावयाचीं, तर 'गायकवाड सरकारच्या उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें' व 'मराठी भाषेचे संप्रदाय व म्हणी' या दोन ग्रंथांवरील टीका-लेखांचीं देतां येतील. आणि त्यांतल्या त्यांत दुसरें उदाहरण आम्हांला समर्पक वाटतें. या लेखानें या पुस्तकाचीं छत्तीस पानें घेतलीं आहेत. पण, विषय इतका महत्त्वाचा आहे कीं, हा लेख दीडपट लांबला असता तरी तेंहि शोभलें असतें. उलट त्यांतल्या त्यांत हात आंखडून कोल्हटकरांनीं या

ग्रंथाचें इतकें सूक्ष्म परीक्षण केलें आहे कीं, तसें इतर कोठेंही आमच्या पाहण्यांत आलेलें नाहीं. या लेखांत तत्त्वज्ञानात्मक लिखाण, तपशीलवार टीका व व्यावहारिक विधायक सूचना यांचा मेळ फारच सुंदर पडलेला असून प्रमाणबद्धताही उत्कृष्ट साधली आहे. पण याच्या उलट प्रकारचीं उदाहरणेंही बरींच दाखवितां येतील; व तींही दाखविलींच पाहिजेत. पहिलें उदाहरण 'पण लक्षांत कोण घेतो.' ही टीका तेवीस पानें आहे. पण त्यांत प्रत्यक्ष पुस्तकाच्या गुणदोषांचें विवेचन दीड पानही नाहीं. बाकीच्या बावीस पानांत सामाजिक सुधारणेवरील आक्षेपांचें खंडन व केशवपनप्रतिबंधाचें मंडन आहे. ही चर्चा सोपपत्तिक आहे यांत शंका नाहीं. पण तो स्वतंत्र निबंध म्हणून चांगला दिसला असता. दुसरें उदाहरण केशव वामन पेठे यांच्या दोन पुस्तकांचें. हा बारा पानांचा लेख 'रिकामपणाच्या कामगिरी'त घालण्यासारखा आहे! तिसरें उदाहरण 'सद्यःस्थितिप्रेरित दोन नवीं नाटकें' या लेखाचें. हा लेख एकोणतीस पानांचा आहे. पहिलीं वीस पानें समाजशास्त्र, नीतिशास्त्र, राजकारणशास्त्र व राजकीय पक्षोपन्यास असल्या विषयांनीं घेतलीं असून, सुमारें एकविसाव्या पानांत, "लेखाचे प्रारंभीं आम्हीं एक विधान केलें त्याचा अर्थ वाचकांस आतां कळून येईल," असें म्हटलें आहे! धन्य त्या जडबुद्धि वाचकांची! हरिदासानें कीर्तनाचा मुख्य अभंग एकदां स्वतः म्हणून मागचे गाणारे व तबलजी यांना गात व वाजवीत बसवावें; आणि आपण गांवभर हिंडून, चहाफराळ झोडून, समयांतील तेल संपण्याचे सुमारास परत सभामंडपांत येऊन अभंग पुन्हां म्हणून पूर्वरंग सजविण्यास कंबर बांधावी, तशांतला प्रकार या टीकालेखांत झाला आहे. आणि चवथें व सर्वांत ढोबळ उदाहरण 'तोतयाचें बंड'वरील टीकेचें.

या लेखाचीं सुमारें शंभरसवाशें पृष्ठें झालीं असून प्रत्यक्ष ग्रंथावरील टीका अवघीं कांहीं थोडीं पानेंच आहे. इतर मजकूर म्हणजे नाट्यकलेवर तो एक स्वतंत्र निबंधच आहे. प्रस्तुत पुस्तकांत हा सर्व टीकात्मक लेख एकत्र पाहावयास मिळतो म्हणून कांहीं तरी बरें. पण, तो लेख पूर्वी 'मासिक मनोरंजनां'त प्रसिद्ध होऊं लागला, तेव्हां वाचकांना त्याबद्दल काय वाटलें व ते काय काय म्हणाले, याची आम्हांला चांगली आठवण आहे. पहिल्या लेखांकांत मूळ ग्रंथकर्त्याच्याच संबंधानें व तेंही अवघें अर्धें

पानच मजकूर असून, पुढें "या नाटकाचें परीक्षण कलेच्या दृष्टीनें करण्याचें योजिलें आहे" असें आश्वासन टीकाकारानें दिलें; आणि तेथून नाट्यकलेच्या चर्चेत तो जो शिरला, तो पुढें कित्येक महिने तींतून बाहेर पडला नाहीं! 'तोतयाचें बंड' या मथळयाखालील लेखांनीं 'मनोरंजना'चे अंकच्या अंक बाहेर पडावे, आणि प्रेक्षकांनीं वाचावयास जावें तों त्यांत तोतयाचा किंवा त्याच्या बंडाचा एका शब्दानेंही पत्ता लागूं नये, असा प्रकार कांहीं दिवस सुरू होता. शेवटीं वाचक कंटाळले व त्यांच्या या मानसिक उपेक्षेच्या स्थितींतच टीकेचा शेवटचा भाग केव्हां येऊन गेला, हें त्यांचें त्यांनाही कळलें नसावें. नाटक पाहण्यास जाण्याची अनिवार हौस असणाऱ्या एखाद्या स्त्रीनें मुलाला बरोबर नेणें अडचणीचें वाटून, त्याला एकदां घेऊन अफूची मोठीशी गोळी त्याच्या तोंडांत द्यावी, व पहांटेच्या सुमारास परत येऊन मग "त्याला खरंच भूक लागली असेल कीं" असें म्हणून फिरून अंगावर घ्यावें, तशांतला प्रकार नाट्यकलेच्या संशोधनव्यवसायांत गढलेल्या कोल्हटकरांनीं या टीकेंत केला. एका नाटकाच्या परीक्षणास उद्युक्त झालेल्या या टीकाकारानें टीकालेखांत प्रमाणबद्धता किती सोडली, इतकेंच आम्हांस येथें सांगावयाचें आहे. शाळेंत एखाद्या मुलानें लेखणी कशी करावी असें शिक्षकाला विचारल्यास, " थांब, तुला सांगतों ऐक " असें म्हणून, लाकूड व लोखंड या दोहोंचा भौतिक व रासायनिक वृत्तांत सांगण्यास सुरवात करावी, आणि जवळ जवळ पृथ्वीच्या उत्पत्तीपासूनचा इतिहास सांगावा, तसेंच कांहींसें या लेखांत झालें आहे. 'तोतयाचें बंडा'चें परीक्षण नाट्यकलेच्या दृष्टीनें करण्यांत कांहींच वावगें नव्हतें. पण, त्याकरितां टीकाकारानें स्वतःच्या मनाशींच कांहीं नियम ठरवून ते पुढें मांडून लावून दाखवून परीक्षण केलें असतें, तर वीस पंचवीस पानांत ही टीका सांगोपांग संपूर्ण झाली असती. पण, हल्लींप्रमाणें मिया मूठभर आणि दाढी हातभर असें केल्यानें, 'तोतयाचें बंड' हें टीकाकारानें नुसतें निमित्तादाखल घेतलें, त्याचा खरा हेतु नाट्यशास्त्रावर स्वतंत्र निबंधच लिहावयाचा होता, व तो या प्रसंगानें पूर्ण करून घेतला, असे उद्गार पुष्कळ वाचकांनीं काढल्याचे आम्हांला स्वतःला स्मरतात. असें सांगतात कीं, उदेपूरचे रजपूत राजे जुनें स्वातंत्र्य गेल्याबद्दल अजून मनांत रंजीस आहेत, अशी एक दंथकथा

आहे; आणि, हें वैराग्य प्रगट करण्याकरितां, ते जेवतांना सोन्याच्या विस्तीर्ण ताटाखालीं आणि निजतांना सुवर्णमंचकावरच्या सात गाद्यांच्या तळीं एक पळसाचें पान लावीत असतात ! कां कीं, त्या योगें, पूर्वी मुसलमान बादशहांनीं पराभव केल्यावर, जयपूरच्या स्वाभिमानी राण्यानें अरण्यांतच सर्व जन्म घालविला आणि पळसाच्या पानावरच भोजन व शयन केलें, याची आठवण रहावी ! पण, या पानाच्या तुकड्यानें सोन्याचें ताट व छप्पर पलंग यांच्या उपभोगाचें समर्थन जितकें होईल, तितपतच ' तोतयाचें बंड ' हा मथळा लिहीत गेल्यानें त्या खालील नाट्य-विषयक तत्त्वज्ञानाच्या प्रचंड विवेचनाचें समर्थन होईल.

वरील तीन चार उदाहरणें, दिल्यानंतर हें असें कां घडलें असावें, याची आमची कल्पना सांगावयाची उरली, ती आतां सांगूं. आमच्या समजुतीप्रमाणें रा. कोल्हटकर यांनीं आपल्या निबंधलेखनाचें वळण मेकॉलेच्या निबंधावरून प्रथम उचललें; व तेंच किंचित् फेरबदल करून कायम केलें असावें. तसेंच, कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या निबंध वाचनाचीही छाप कोल्हटकर यांच्या निबंधांवर पडलेली आहे. आणि या दोन लोकोत्तर लेखकांच्या कांहीं गुणांची बरोबरी कोल्हटकरांच्या लेखनाचे गुण करितील, यांत शंका नाहीं. पण, रा. कोल्हटकर यांनीं त्यांच्या जोडीला स्वतःचें म्हणून जें वळण जोडलें, त्यानें कोल्हटकरांच्या लेखनपद्धतींत एक अवगुण मात्र उत्पन्न झाला. कै. विष्णुशास्त्री यांच्या निबंधलेखनाचा एक गुण असा कीं, ते मुख्य विषयाला, व परीक्षण असेल तर मुख्य ग्रंथाला, सोडून सहसा फारसे आजुबाजूला जात नाहींत. मेकॉले हा मात्र, कोल्हटकर यांच्याप्रमाणेंच एखादा ग्रंथ परीक्षणाला घेऊन, त्याचें निमित्त करून, तत्संबंधी विषयावरील आपलें ज्ञान निबंधांत भरपूर ओततो. कोल्हटकरही तेंच करितात. पण फिरून या दोहोंत फरक असा कीं, मेकॉलेच्या लेखांत तात्त्विक चर्चेनें जाड्यता मुळींच येत नाहीं. बहुधा असें प्रतिज्ञापूर्वक म्हणतां येईल कीं, मेकॉले यानें जीं हजारों पानें निबंधांचीं व इतिहासाचीं लिहिलीं, त्यांतील एकही पान असें काढून दाखवितां येणार नाहीं कीं, वाचकाला तें कंटाळवाणें वाटेल. क्वचित् संगति सुटो, दूरान्वय होवो; परंतु जेथें पान उघडून वाचावें, तेथें तें हृदयंगमच ! मेकॉलेच्या विचारसरणींत पुष्कळ दोष असतात. त्याच्या वावदूकपणानें सत्यापलाप

होऊं शकतो. आणि, भूल देऊन मनुष्याला आडमार्गाला नेऊन लुबाडावें, त्याप्रमाणें तो वादांत आपल्या उज्ज्वल भाषापद्धतीनें वाचकाला भलत्या दिशेला नेऊन त्याची विवेचकबुद्धि हिरावून घेतो. पण हें कांहीं असलें, तरी मेकॉलेचें लिखाण वाचीत असतां कंटाळा येऊन झोंपीं गेलेला मनुष्य आजवर जन्मलाच नाहीं. कोल्हटकरांच्या लेखांत मात्र, ते तत्त्वसंशोधनांत शिरतात तेव्हां, अशा प्रकारचा अनुभव पुष्कळ वेळां येतो. आणि, त्यांचें तात्त्विक विवेचन हें सर्वस्वी सत्यनिष्ठ असतें असेंही कोणी यथार्थतेनें म्हटलें, तरी त्या योगानें त्या लिखाणाचा केव्हां केव्हां कंटाळा येतो, ही गोष्ट नाकबूल करितां येत नाहीं व तिचें समर्थनही करितां येत नाहीं. तत्त्वज्ञान झालें तरी तें सोपें करून सांगूं नये, असा नियम कोणत्याही शास्त्रांत सांगितलेला नाहीं. यामुळेंच अवघड गोष्ट सोपी करून सांगणें ही एक लेखनकलेंतील सिद्धि मानली जाते. मेकॉलेनें आपल्या इतिहासानें कादंबऱ्यांनाही मागें टाकलें ही गोष्ट प्रसिद्धच आहे; व त्याच्या लेखनकलेंतील या सिद्धीचें तें निदर्शक होय. पण कोणी म्हणेल कीं, तो इतिहास लिहीत होता ! तर झोंप आणणारे इतिहासही आम्ही कांहीं वाचले आहेत, असें उत्तर त्याला देतां येईल. आम्ही स्वतः तत्त्वज्ञान (Philosophy) हा विषय फारसा वाचलेला नाहीं. पण ज्यांनीं तो आपलासा केला आहे असे कांहीं विद्वान स्नेही सांगतात कीं, तत्त्वज्ञान हें देखील कँटसारखें अवघड किंवा अगम्य असें लिहावें लागत नाहीं; तर लोकांच्या अंतःकरणांत सहज प्रवेश करील, अशा पद्धतीनें तत्त्वज्ञानही लिहितां येतें. आम्ही The Story of Philosophy हें पुस्तक नुकतेंच वाचलें. त्याचा कर्ता वुइल डयूरँट यानें तत्त्वज्ञानाच्या इतिहासाची माहिती देतांना खुद्द तत्त्वज्ञानाचेंच सिद्धांत सांगितले आहेत; पण ते इतक्या सोप्या भाषेंत लिहिलेले आहेत कीं, तोही ग्रंथ एकाद्या कादंबरीसारखाच वाटतो. रा. कोल्हटकर यांनीं मनांत आणलें, तर अवघड विषय सोपा करून त्यांना सांगतां येणार नाहीं, असें नाहीं. पण एका बाजूला तत्त्वज्ञान सांगावयाचें तें समर्पक, संपूर्ण व सांगोपांग सांगण्याची दुर्निवार इच्छा; आणि जेथें तें तत्त्वज्ञान लिहावयाचें तेथील लेखनक्षेत्राची संकुचित मर्यादा;—या दोन अडचणींच्या तडाक्यांत कोल्हटकर नेहमीं सांपडल्यामुळेंच त्यांच्या लिखाणाला अशा प्रसंगीं दुर्बोधत्व आलें आहे.

स्थलसंकोचाची ही अडचण त्यांच्या नाटकांतूनही त्यांना अडवितांना आढळून येते. त्यांनीं आपल्या नाटकांतील कित्येक पात्रांच्या तोंडीं इतकें उत्कृष्ट तत्त्वज्ञान घातलें आहे कीं, त्याची बरोबरी दुसरा कोणी मराठी नाटककार क्वचितच करील. पण, तें तत्त्वज्ञान इतकें अवजड व दुर्बोध होऊन बसतें कीं, तें मनोरंजक व सोपें करून सांगावयाचें तर त्यांच्या एक एक वाक्याचीं चार चार फुटकळ वाक्यें करावीं लागतील. तशींच त्यांचीं नाटकांतील पदें. त्यांतील कल्पना इतक्या सुंदर असतात, पण स्थलसंकोचामुळें इतक्या ठांसीव लिहिल्या जातात कीं, त्यांतील रहस्य उकलून काढणें हा एक उद्योगच होऊन बसतो. भौतिक शास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें Atom किंवा परमाणु हा कोणी फोडील, तर त्यांतून पुष्कळ दिव्य शक्ति निर्माण होईल. पण तो परमाणु फोडणार कोण ? तसाच प्रकार कोल्हटकरांच्या तात्त्विक चर्चेच्या भाषेचा आहे. कोल्हटकरांच्याच एका पट्टशिष्यानें एक अशी कोटि केली आहे कीं, पुढें होणाऱ्या नव्या पीनलकोडांत कांहीं विशिष्ट प्रकारच्या शिक्षा ठेवाव्या ! उदाहरणार्थ, देवधरांच्या पतपेढयांवरील व्याख्यानांचें स्वारस्य सांगणें, खाडिलकरांच्या ‘ मानापमानां ’तील पदांचा अर्थ लावणें, वगैरे. आम्हांला वाटतें कीं, गडकऱ्यांची गुरुभक्ति जर आड न येती, तर ‘ तोतयाचें बंडां ’तील नाट्यकलेचें विवेचन झोंपीं न जातां किंवा जांभई न येऊं देतां वाचावें, अशीही शिक्षा त्यांनीं सुचविली असती. आमचें असें स्पष्ट मत आहे कीं, कै. गणेश कृष्ण आगाशे यांनीं म्हटल्याप्रमाणें, कल्पनेच्या भरारींत कोल्हटकर हे उंच आकाशांत उडणाऱ्या गरुड पक्ष्याप्रमाणें आहेत; व कै. देवल हे या दृष्टीनें पोपटासारखे होत. परंतु लौकिक उपयोगाच्या किंवा लेखनकलेंतील सिद्धीच्या दृष्टीनें बोलावयाचें झालें, तर असेंच म्हणावें लागेल कीं, स्वतः गरुड कोणाला दिसत नाहीं व त्याची वाणी कोणाला ऐकूं येत नाहीं. पण, पोपट हा पढविलेले शब्दच उच्चारणारा असला, तरी त्याचे बोल ऐकून आनंद वाटतो; व लहान मुलेंही त्याच्याशीं संभाषण करूं शकतात. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, निव्वळ विद्वत्तेच्या दृष्टीनें किंवा कल्पनेच्या भरारीपुरतें पाहिलें, तर कोल्हटकर हे बहुतेक विद्यमान सर्व लेखकांना मागें टाकून दूर जातील. पण, विद्वत्ता किंवा कल्पना झाली, तरी भाषेच्या द्वारें जितकी समजेल व पटेल तितकीच ती लोकांची. आम्हांला पुष्कळ वेळां असें वाटतें कीं, कोल्हटकरांनीं

आपल्या पदांतील कल्पना खड्या स्फुट तात्त्विक बोलांप्रमाणें सुट्या व पसरून मांडल्या असत्या, तर त्यांतील सौन्दर्य रतिभरही कमी न होतां, प्रसादामुळें त्या कल्पनांत वाचकांच्या मनांतून स्फुरलेलें संवादी तेज शिरून, त्या रत्नांप्रमाणें निरंतर चमकत राहिल्या असत्या. पण आज तरी कोंदणाच्या अवजड उपाधींत त्या पुष्कळशा दडून बुजून गेल्या आहेत. जी गोष्ट कोल्हटकरांच्या हातून झाली नाहीं, ती पुढें मागें त्यांचा एखादा भक्त करूनही दाखवील; म्हणजे त्यांचीं पदें सुंदर सोप्या गद्य भाषेंत उकलून दाखवील; व तसें झालें तर ' कोल्हटकरांच्या कल्पनासृष्टींतील सौन्दर्यस्थळें ' अशा मथळ्याचें एखादें लहानसें पुस्तक निर्माण होईल. पण कोल्हटकरांचा जन्म मात्र अशा अडचणींत गेला कीं, नाटकप्रयोगाला कालाची मर्यादा म्हणून पदांत कल्पना जखडून बसल्या; आणि टीकात्मक लेखांना मासिक पुस्तकांत स्थलसंकोच म्हणून त्यांत अंतर्गत असलेलें तत्त्वज्ञान गूढ भाषेंत जखडून बसलें.

आम्ही वर लिहिल्याप्रमाणें कोल्हटकरांनीं निरनिराळ्या विषयांवरील आपलें तत्त्वज्ञान लहान मोठ्या पण स्वतंत्र ग्रंथांतून मांडून प्रसिद्ध केलें असतें, तर तें त्यांनींही पुष्कळसें सोपें करून लिहिलें असतें. पण, त्यांना ग्रंथलेखनापेक्षां ग्रंथप्रसिद्धीची अडचण अधिक दुस्तर वाटत होती, असा संशय मला नेहमीं येतो. त्यांनीं नाटकें लिहावीं; व तीं रंगभूमीवर येण्याचीं तर राहोतच, पण एखाद्या मासिकपुस्तकानें त्यांना एक पैचाही मोबदला न देतां केवळ एकदम छापून काढलीं, म्हणजे तो कोल्हटकरांवर एक उपकारच व्हावा, अशी स्थिति पुढें पुढें आली. आणि निबंधांसंबंधानेंही अशीच स्थिति कां न होईल, अशी शंका त्यांची त्यांनाच प्रथमपासून जाणवत असावी. वऱ्हाडांत वकिली करून चार पैसे मिळविणाऱ्या व वाङ्मयाविषयीं अत्यंत हौस बाळगणाऱ्या या धुरंधर लेखकाची ही स्थिति लक्षांत घेतली, म्हणजे मराठी भाषेविषयीं दुःखद विचार मनांत येतात. पण ही स्थिति एकट्या कोल्हटकरांचीच नसून, या कामीं त्यांना सहानुभवी असे अनेक विद्वान् ग्रंथकार सांपडतील, म्हणूनच आम्ही या गोष्टींचा जो उल्लेख केला, तो स्वतः कोल्हटकरांना कमीपणा आणणारा नसून, साक्षर महाराष्ट्राच्या विपन्न आर्थिक स्थितीचें त्यामुळें यथोचित वर्णन केलें, इतकेंच कोणीही समजावें.

विनोदी लेखक या नात्यानें कोल्हटकरांना जरी आद्य स्थान असलें, तरी नाटककार या नात्यानेंही त्यांचें स्थान फारसें कमी नाहीं. त्यांच्या पूर्वी किर्लोस्कर व देवल हे दोनच नाटककार असे होऊन गेले कीं, आधुनिक-प्रसिद्ध नाटककारांत त्यांची गणना करितां येईल. कालक्रमानें किर्लोस्कर हे पहिले. आणि, जुन्या नाटकांच्या गोंधळांतून ते प्रथमच वर डोकें काढीत होते, व स्वत: ते विद्वान् नव्हते, यामुळें केवळ आपली असंस्कृत बुद्धि-मत्ता व रसिकपणा यांच्या बळावर त्यांनीं अवघीं अडीच नाटकें रचिलीं. पण त्यांच्या जोरावर त्यांनीं भावी संगीत नाटकांच्या पिढीवरील लोकांचा विश्वास पायावर खडा केला. या अडीच नाटकांपैकीं 'शाकुंतल' हें तर बोलून चालून भाषांतर. आणि 'रामराज्यवियोग' अपुरें असून, आहे त्यांत म्हणण्यासारखें स्वारस्यही नाहीं. फक्त 'सौभद्र' हें मात्र त्यांच्या निर्माणक नाट्यबुद्धीचें फळ असून, तें जितकें गोड तितकेंच टिकाऊही आहे. गेल्या पसतीस वर्षांत इतके विद्वान्, सुविद्य, बुद्धिवान् नाटककार पुढें आले असतां, अजूनही त्यांचें 'सौभद्र' हें नाटक आपल्या गुणांनीं आढ्यता सांभाळून, आपलें स्थान न सोडतां इतरांशीं सामना देत आहे. त्यानंतर देवल पुढें आले. त्यांचीही गणना खरोखर खऱ्या 'विद्वानां'त करितां येत नाहीं. त्यांचींही 'शापसंभ्रम,' 'मृच्छकटिक' व 'संशय-कल्लोळ' हीं तीन भाषांतरित नाटकें वगळलीं असतां, 'शारदा' हें एकच नाटक त्यांनीं स्वतंत्र असें लिहिलें. त्यांत संस्कृताचा आधार न मिळाल्यामुळें मृदु रचनेचे शब्द व रम्य कल्पना यांचा आधार नाहींसा झाला. यामुळें त्यांचें 'शारदा' एका हातांत व 'मृच्छकटिक' आणि 'शापसंभ्रम' हीं दुसऱ्या हातांत घेऊन पहाणाराला देवलांचें संस्कृति-दारिद्र्य तेव्हांच दिसून पडतें. पण, 'शारदा' नाटकाकरितां त्यांनीं निवड-लेला विषय हा तत्कालीन सुधारणाप्रवण समाजाच्या मन:स्थितीला अनुरूप असल्यामुळें, त्यांत त्यांच्या नाटकाला बैठक चांगली लाभली; आणि, त्यांच्या भाषेंतील सोळा आणे प्रसाद व तीन आणे विनोद यांच्या योगानें तें नाटक आतां मागें पडलें, तरी पुष्कळ वर्षें त्यानें टिकाव धरिला होता.

## नाटककार कोल्हटकर

देवलांच्या मागोमाग कोल्हटकर हेच नाटककार म्हणून पुढें आले.

नाटककार म्हणून पुढें येणें हा एक तऱ्हेचा पराक्रमसाच वाटतो. कारण त्याच्या मार्गांत बरींच विघ्नें असतात, ही गोष्ट पूर्वींपासून अनुभवाला आलेली आहे. या विघ्नांत अपात्रतेचा समावेश मीं करीत नाहीं. पण, लेखकाच्या अंगीं पात्रता असूनही त्याची पात्रता एखाद्या चांगल्या नाटक मंडळीला पटली पाहिजे, ती पटत नाहीं. हें पहिलें विघ्न. प्रत्येक मंडळीचा मालक हा कोणत्याही नाटकाकडे त्याच्या योग्यतेच्या दृष्टीनें पाहात नाहीं; तर त्यापासून आपल्याला उत्पन्न काय होईल या दृष्टीनें पहात असतो. आधीं तो स्वत: विद्वान् नसतो. असला तरी आपल्या मंडळींत असलेलीं नटपात्रें व नाटककारांनीं योजलेलीं नाटकपात्रें यांचा कसा काय मेळ बसेल, हें त्याला पाहावें लागतें. तो मेळ बसला, तरी नाटक रंगभूमीवर प्रेक्षकांना कितपत आवडेल व त्यास पैसा किती मिळेल, हें त्याला पहावें लागतें. कारण नाटक मंडळी सांभाळणें चालविणें हें काम खर्चाचें असतें; व मालक फारसा लोभी नसला तरी हा कायमचा खर्च व नवी सीनसीनरी तयार करण्याचा नैमित्तिक खर्च भागवितां भागवितां त्याला पुरे पुरे होतें. नाटक मंडळीचा व्यवसाय हा बोलून चालून एक धंदा आहे. त्यांत नफा सुटला पाहिजे. आपल्या घरचें खाऊन किंवा चरितार्थाकरितां इतर धंदे करून, फावल्या वेळीं एकत्र जमून, नाटकें केवळ हौसेकरितां किंवा नाट्यकलेच्या प्रेमाकरितां करणारे लोक असतील, तर त्यांची मात्र गोष्ट वेगळी. त्यांना ग्राम्य रुचीला लोकप्रियतेला भीक घालण्याचें कारण नाहीं. उच्च ध्येय ठेऊन, विद्वान् लोकांचा सल्ला घेऊन, उच्च प्रतीचीं तेवढींच नाटकें, जुनीं वा नवीं, रंगभूमीवर आणितां येतील. पण अशा मंडळ्या महाराष्ट्रांत गेल्या अर्धशतकांत अवघ्या एक दोनच निघाल्या. अशा मंडळ्या बाहेर गांवीं फारशा हिंडूं शकत नाहींत; गांवच्या गांवांत थोडे फार प्रयोग झाले म्हणजे पुढें ठराविक खेळांना पैसा मिळत नाहीं. शिवाय, नाटकमंडळी हौशी आहे येवढ्यावर पैसे देऊन प्रयोग पाहावयास येणाऱ्या प्रेक्षकांचें समाधान, नाट्यकौशल्याबरोबर चांगले रम्य पोषाख पेहराव व देखावे दृष्टीस पडल्याशिवाय, होत नाहीं. तात्पर्य, स्वत:ला पगार नको असणारे नट, मोबदला न घेणारा नाटककार आणि पैसे न घेऊन किंवा घेऊन पण अगदीं साध्या नाट्यसाधनांनीं रंगभूमीवर दाखविलेला प्रयोग

पाहण्यांत समाधान मानणारे विद्वान् व रसिक प्रेक्षक इतका संच जुळेल, म्हणजे असला कपिलाषष्ठीचा योग येईल, तेव्हांच उंची व शुद्ध अभिरुचीच्या नाटककारानें लिहिलेल्या ध्येयवादी नाटकाला उदार आश्रय व उत्तेजन मिळणार ! पण तो काळ पूर्वी नव्हता व आजही नाहीं. पुढें केव्हां कदाचित् येईल, नाहीं कोणीं म्हणावें ? असो. पण येवढी गोष्ट खरी कीं, नाटककाराच्या अंगीं पात्रता असली, तरी रंगभूमीच्या द्वारें त्याला पुढें येण्याला नाटकमंडळीची मुख्य अडचण प्रथमपासून होती. याशिवाय आणखी एक अडचण अशी असते कीं, एखाद्या नाटक मंडळींत एखाद्या नाटक ग्रंथकाराला सुप्रतिष्ठित असें स्थान मिळालें, म्हणजे मग आपण आणखी नाटकें लिहित जावें व तीं रंगभूमीवर येण्याला साधनभूत असलेली व हस्तगत झालेली नाटकमंडळी दुसऱ्याच्या हातीं जाऊं नये, अशी आकांक्षा व लोभी वृत्ति त्याला उत्पन्न होते; व बळीच्या झारींत शिरून बसणाऱ्या शुकाचार्याप्रमाणें, तो नाटकमंडळीच्या गादीवर बसून नूतन नाटक ग्रंथकारांचा प्रवेशमार्ग अडवितो. हा प्रकार बहुतेक विद्यमान नाटकमंडळ्यांमध्यें दिसून आलेला आहे. त्याप्रमाणें देवलांचा मार्ग पुष्कळ दिवसपर्यंत अण्णा किर्लोस्करांनीं अडविला; कोल्हटकरांचा देवल यांनीं अडविला; आणि ( स्वतः कोल्हटकरांकडे खरोखर हा दोष नसतां) कोल्हटकरांनीं आपला मार्ग अडविला अशी खुद्द त्यांच्या कांहीं स्नेह्यांची समजूत झाली. असो. देवल हे किर्लोस्कर मंडळीचे नाटककार सल्लागार व ' मास्तर ' असतांनाच कोल्हटकरांच्या नाटकांचा, केवळ आपल्या गुणांच्या जोरावर, मंडळीच्या रंगभूमीवर प्रवेश झाला; व त्या मंडळींत त्यांचें स्थान सुमारें पुढें दहा बारा वर्षें टिकलें. या अवधींत वीरतनय, गुप्तमंजूष, मूकनायक, प्रेमशोधन व मतिविकार इतकीं त्यांचीं नाटकें त्या नाटकमंडळीच्या हातून रंगभूमीवर आलीं. पण, किर्लोस्कर मंडळींतील फूट व तिचा ऱ्हास या बरोबरच, आपलीं नाटकें रंगभूमीवर आलेलीं पाहण्याचा कोल्हटकरांच्या हौसेचा ऱ्हास सुरू झाला. त्यानंतर त्यांनीं वधूपरीक्षा, सहचारिणी, परिवर्तन, जन्मरहस्य, शिवपावित्र्य, श्रमसाफल्य व मायाविवाह अशीं नाटकें लिहिलीं. पण, त्यांपैकीं वधूपरीक्षा हें नाटक रंगभूमीवर मधून मधून दृष्टीस पडतें. 'सहचारिणी' रंगभूमीवर आल्यानंतर लवकरच अदृश्य झालें. 'परिवर्तन' या नाटकाचा पैशाचा मोब-

दला त्यांच्या पदरांत पडला, तरी तें गंधर्व नाटकमंडळीकडून बसविलेंच गेलें नाहीं; व इतर नाटकें कोणीकडून तरी बिनखर्ची छापून निघालीं म्हणजे मिळविलें असें होऊन कोल्हटकरांना शेवटीं मासिक पुस्तकांचा आश्रय करावा लागला. हें लक्षांत घेऊन, गडकऱ्यांची एक अनुप्रासात्मक उक्ति कोल्हटकरांच्या नाट्यजीवनाला लावून, कांहीं लोक म्हणतात कीं, "जगण्यांत जोंवर अर्थ आहे, तोंवरच मरण्यांत मौज आहे."

पण ही दृष्टि खरी नाहीं. रंगभूमीवर आलें व फार दिवस टिकलें, तरच तें 'नाटक' असें कोणी मानोत. पण, नाटक हें स्वतंत्र रीतीनें वाङ्मय आहे. म्हणून तें रंगभूमीवर असलें किंवा नसलें, तरी वाङ्मयदृष्ट्या त्याची किंमत अबाधितच राहते. एवढें मात्र खरें कीं, स्वत: नाटककाराची ही दृष्टि नसेल तर त्याला मात्र निराशा वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. उपेक्षित, खंडित व अवमानित अशीं हीं कोल्हटकरांनीं लिहिलेलीं वरील नाटकें त्यांनीं अशा वेळीं लिहिलीं कीं, त्यांच्या वकीलीच्या धंद्यांतील उत्पन्न कमी झालें, व वाढत्या संसाराच्या खर्चाला प्राप्तीच्या इतर साधनांची जरूरी भासूं लागली. पण, योग असा कीं, याच सुमारास खाडिलकर व गडकरी यांचा उत्कर्ष होऊन कोल्हटकरांची पीछेहाट होऊं लागली; आणि The law of decreasing returns (धंद्याची वाढ व नफा यांचें प्रमाण कांहीं एका मर्यादेपलीकडे सम न राहतां व्यस्त होत जातें.) या अर्थशास्त्रांतील एका सुप्रसिद्ध सिद्धांताचा कटु अनुभव कोल्हटकरांच्या वांट्याला आला. अशा रीतीनें एकदां बस्तान बिनसलें म्हणजे मग जुने स्नेहसंबंध ढिले होतात, गैरसमजांचें पीक पिकतें, मानाच्या कल्पना तीव्र होतात, अपमानाच्या भ्रामक कल्पना बळावतात; आणि, जेथें फुलें वेचलीं तेथें गोंवऱ्या वेचण्याचा प्रसंग आपल्यावर आला, असें वाटून मनुष्य विनाकारण माणुसघाण्या व एक प्रकारचा Timon of Athens बनतो. ज्या नाटक मंडळ्यांनीं पुढें पुढें कोल्हटकरांना (कोणत्याही कारणांनीं कां होईना) आपल्या 'रजिस्टरां'तून काढून टाकलें, त्यांनींच एक वेळ त्यांना गादीवर बसवून त्यांचे देवासारखे उपचार केले, धन्यासारखे हुकूम मानले, शिष्यासारखा आदर दाखविला होता. यामुळें कोल्हटकरांची फसगत झाली हें खरें. त्यामुळें त्यांच्या निराशेची तीव्रता कमी न होतां उलट वाढणारच. पण, नाटकग्रंथकार व नाटक मंडळ्या यांचे संबंधच

असे नाजुक असतात कीं, असलीं परिवर्तनें अपरिहार्य होत. म्हणून यासंबंधीं सगळा दोष नाटक मंडळयांनांही देतां येत नाहीं. या खेदकारक इतिहासाचा बोध निदान भावी बुद्धिमान् नाटकग्रंथकारांच्या पिढीनें घेण्यासारखा आहे. आणि, माझ्या मतें नाटक हें जरी दृश्य वाङ्मय असलें, तरी दृश्याच्या आधीं तें पाठ्य आहे, आपण निर्माण करितों तें वाङ्मय पाठ्य या नात्यानें जर सरस वठलें तर निदान पहिली मजल आपण जिंकली, व आपल्या नाटकांना रंगभूमीवर स्थान न मिळालें तरी ग्रंथसंग्रहांतून तरी तें स्थान त्यांना मिळाल्याशिवाय राहणार नाहीं, अशा आत्मविश्वासानें व त्या दृष्टीनें कोणी नाटकें लिहील, तर कदाचित् कोल्हटकरांना आलेल्या अनुभवाचें परिवर्तन होऊन, नाटककार हा प्रयोगशरण न होतां प्रयोग हाच नाटककार–शरण होऊं शकेल. कोल्हटकरांनीं नाटक मंडळयांशीं व समकालीन नाटकग्रंथकारांशीं आलेल्या आपल्या निकट संबंधाचें वर्णन आपल्या आत्मचरित्रांत लिहून ठेवलें आहे, असें म्हणतात. पण तें लोकांपुढें येण्यापेक्षां अप्रगट राहिलेलेंच बरें असें आम्हांला वाटतें. कारण तें प्रगट झाल्यास, आज वाचकवर्गाची त्यांच्या नाट्यवाङ्मयाच्या व्यवसायासंबंधानें जी निर्विकार मोहक व अद्‌भुतरम्य अशी कल्पना आहे, तिच्यांत विनाकारण बिघाड व्हावयाचा. सांगण्याचें तात्पर्य हें कीं, कोल्हटकरांच्या नाटकांचा विचार करितांना भावी पिढीनें तरी त्यांचा विचार मुख्यतः नाट्यवाङ्मय या दृष्टीनेंच करणें उचित होईल !

## टीका म्हणजे काय ?

वाङ्मयाचे दोन प्रकार मानतात. एक स्वयंस्फूर्त व दुसरा निमित्तस्फूर्त. दोन्ही मनांतूनच उद्‌भवतात. पण पहिला प्रकार मन व सृष्ट वस्तु यांच्या संनिकर्षानें जन्माला येतो. आणि दुसरा प्रकार पहिला प्रकार पाहून त्यावरून सुचतो. पहिला उत्पन्न झाला नसता, तर दुसराही उत्पन्न न होता. ही गोष्ट कलेच्या सर्वच अंगांना लागू आहे. म्हणजे चित्र, नाट्य, शिल्प, संगीत, वक्तृत्व या कला आधीं जन्माला आल्या, म्हणून मग त्यांच्याविषयींची टीका जन्माला आली. टीका म्हणजे, त्या त्या कलांची उत्पत्ति, स्थिति व अपकर्ष किंवा नाश यांच्यासंबंधाचे नियम व सिद्धांत ज्यांत सांगितले आहेत, असे वाक्प्रबंध. भाषेच्या नंतर जसें व्याकरणशास्त्र, शब्दसिद्धिशास्त्र किंवा

मीमांसाशास्त्र जन्मास येतें, तसेंच कलाविधानानंतर टीकाशास्त्र जन्मास येतें. टीका म्हणजे गुणदोषदर्शनात्मक विध्वंसक व विधायक चिकित्सा. ज्याला आपण वाङ्मय म्हणतों, तें वक्तृत्व या कलाविभागांत पडतें. कारण त्या कलाविभागाचें उपादानकारण किंवा द्रव्य म्हटलें म्हणजे वाक्, वाणी, वर्णात्मक मनुष्यवाणीचे शब्द हे होत. ते तोंडानें बोलले किंवा हातानें लिहिले तरी त्यांत प्रयोजनतः फरक नाहीं. चित्र, नाट्य, शिल्प, या कलांची भाषा मूर्त जडद्रव्यात्मक असून तिचा मनाशीं सन्निकर्ष डोळ्यांच्या द्वारें होतो. तोंडी वाङ्मय म्हणजे वक्तृत्व हें कानांतून मनांत शिरतें; व लेखी वाङ्मय म्हणजे लेखन हें डोळ्यांच्या द्वारें मनांत शिरतें. संगीत हें देखील कानांतूनच मनांत शिरतें. पण तें स्वरमय आहे, वर्णमय नाहीं. म्हणून त्याला वाङ्मय म्हणत नाहींत.

प्रस्तुत आपणांला वाङ्मय टीकाशास्त्रापुरतें बोलावयाचें आहे; व तें हेंच कीं, प्रथम वाङ्मय जन्माला येतें व त्यानंतर त्याचा परामर्ष घेणारें टीकाशास्त्र जन्माला येतें. एका बाजूस वाङ्मयाचा व मनुष्यजीवनाचा जो संबंध, तोच दुसऱ्या बाजूस टीकाशास्त्राचा व वाङ्मयाचा आहे. मनुष्यजीवनाचा अर्थ सांगणारें तें वाङ्मय असें म्हटलें, तर वाङ्मयाचा अर्थ सांगणारें तें टीकशास्त्र असें म्हणतां येईल. काव्य, नाटक, कादंबरी, निबंध इत्यादि वाङ्मयसाधनांच्या योगानें मनुष्य जीवनरहस्याचा ग्रंथ लावून दाखवितो; तर टीकाशास्त्राच्या योगानें तो वाङ्मयरहस्याचाच ग्रंथ लावून दाखवितो. कारण, वाङ्मय झालें तरी तें रहस्यमयच आहे; व तें रहस्य समजून सांगितल्याशिवाय फारसें समजत नाहीं. तें रहस्य पुष्कळसें नियमानुबंधी आहे; व या नियम—प्रबंधांनाच टीकाशास्त्र म्हणतात. पण, ‘ सत्राजिताचा बाप कोण तर अठराजित म्हणावा, ’ त्याप्रमाणें टीकाकारांचेही टीकाकार व टीकाशास्त्राचींही टीकाशास्त्रें संभवतात. ग्रंथ कसे लिहावे कसे न लिहावे, आणि असे लिहिले तर ते चांगले कां म्हणावे व तसे लिहिले तर वाईट कां म्हणावे, हें सांगण्याचा अधिकार जसा टीकाकार आपणांकडे घेतो, त्याप्रमाणें, म्हणजे गुरूलाही गुरू भेटूं शकतो त्याप्रमाणें, टीका कशी करावी, कशी न करावी, आणि अशी टीका केली तर ती चांगली कां म्हणावी व तशी केली तर ती वाईट कां म्हणावी हें सांगण्याचा अधिकार ज्यांना येतो, असे प्रतिटीकाकारही असूं शकतात.

अशा टीकाकारांच्या मतें ग्रंथ व ग्रंथकार हेही इतर सृष्ट वस्तूंइतकेच वाङ्मयविषय होऊं शकतात.

ग्रंथांतही मानवी व्यक्तित्व दिसून येतेंच. ग्रंथकाराची प्रत्यक्ष माहिती आपणांला असली, तर ती भरींत भरच म्हणावयाची. पण त्या माहिती-विणें अडतेंच असें मात्र नाहीं. वाल्मीकि, व्यास, होमर अशा पुराण ग्रंथकारांची माहिती—ऐतिहासिक सत्यस्वरूपाची माहिती—आपणांला कितीशी आहे ? पण रामायण, भारत, इलियड असे ग्रंथ वाचले असतां त्यांतूनच एक 'अमूर्त मूर्ति' मनश्चक्षूंपुढें उभी राहते. आणि 'मूर्त मूर्ती' प्रमाणें तिचीही गुणदोषवर्णन चिकित्सा करितां येते. ग्रंथाला वाङ्मय म्हणावयाचें; या चिकित्सेला टीका हें नांव आहे. टीका या शब्दाच्या सामान्य अर्थाशिवाय वेगळा व त्याहून अधिक चांगला असा एक अर्थ त्या शब्दाला हळू हळू येऊं लागला आहे; व तो ग्रंथ-परीक्षण हा होय. टीका म्हटली म्हणजे व्यवहारांत तिचा एक अर्थ प्रायः दोषदर्शन; त्यांत गुणग्रहणाचा समावेश होत नाहीं. टीकेचा दुसरा अर्थ, अर्थ विशद करून सांगणारीं, टिपणें किंवा प्रबंध. दोहोंपैकीं पहिल्या अर्थाला दुष्टता आहे, दुसरा संकुचित आहे. पण परीक्षणार्थी टीका ही गुणदोषदर्शनात्मक असून, ती चर्चा ग्रंथविषयाला एकाद्या मनुष्य व्यक्ती-प्रमाणें समजूं शकते; व स्वतः ती चर्चा म्हणजे तें त्या व्यक्तीच चरित्र होऊं शकतें. परीक्षणात्मक टीकेला लोक फारसे मानीत नाहींत; वाङ्मयांत मूळ ग्रंथाची प्रत पहिली व परीक्षणात्मक टीकेची प्रत दुसरी असें सहजच मानण्यांत येतें. मूळग्रंथ व वाचकाचें मन यांच्यामध्यें उगीच लुडबुड करणारी उपाधि अशीही तिची अवमानना करण्यांत येते. एका अर्थानें तें खरेंही आहे. आणि, मूळग्रंथांची उपेक्षा करून, ते न वाचतां, तत्परीक्षणात्मक टीकेवरच जेव्हां वाचक भागवून घेऊं लागतात, तेव्हां "दूती म्हणून गेली व स्वतःच प्रिया होऊन बसली" असा आक्षेप तिच्यावर सहजच येतो.

पण याला दोन उत्तरें देतां येतात. पहिलें असें कीं, सर्वच वाचकांना सर्व ग्रंथ मुळांत समग्र वाचण्याला साधनें, वेळ किंवा पात्रता नसते. हीं साधनें व वेळ नसेल, तेव्हां टीका ही उघडच उपकारक ठरते. पण हीं साधनें व वेळ असला, तरी मूळग्रंथ समजण्याची पात्रता खरोखर किती वाचकांत असते ? आणि समजुतीच्याही पलीकडे जाऊन सम्यक् गुणदोष-

ग्रहण म्हणून उरतें; व तेंच तर सर्वांत कठीण आहे. घरोघर सोनें हा पदार्थ थोडाबहुत असतोच. पण, तो जेव्हां आपण विकावयाला निघतों, तेव्हां फसलें जाऊन कमी किंमत पदरांत पडूं नये, म्हणून आपण सराफ कट्ट्यावर जाऊन त्याची टीप कां करितों ? तर आपण अज्ञ म्हणून. तोच प्रकार बाजारी सोनें विकत घ्यावयाचें असेल तेव्हांही. कारण, सोनेंविक्या आपणांला फसवून कमी प्रतीचें कमी वजनाचें सोनें पदरांत बांधील, म्हणूनही सराफ कट्ट्यावर जाऊन त्याची टीप करून घ्यावयाची. तात्पर्य, आपण सोन्याचे मालक असलों, किंवा होणार असलों, तरी त्याच्या खरेदी विक्रीचा व्यवहार करितांना आपणांला सराफाइतकाच किंवा कदाचित् त्याहून अधिक तज्ज्ञ, पण सराफापेक्षां हटकून अधिक प्रामाणिक, अशा तिऱ्हाइताचें सहाय्य घ्यावें लागतें. अशा तिऱ्हाइतांना सराफ बाजारांत अर्थातच मोठा मान असतो. पण त्यांच्या दुकानांत तुम्हांला सोनें आढळणार नाहीं; तर सूक्ष्मोत्तम असा धारवाडी कांटा मात्र आढळेल ! आणि, त्यानें तुमचें सोनें वजन करून कसाला लावून, त्याच्या टिपणाची चिठ्ठी सोन्याच्या गळ्यांत बांधून दिली, म्हणजे मग तुम्हीं खरेदी विक्रीच्या व्यवहारांत स्वत: निर्भय होतां; व न्यायकोर्टांतही त्या चिठ्ठीचा आधार तुम्हांला घेतां येतो. त्याच न्यायानें टीकाकाराकडे न जातां मूळग्रंथ वाचूनच त्यांचें रहस्य समजण्याची पात्रता स्वत: तुमच्यामध्यें असली, तर तें सोन्याहून पिवळें झालें. टीकाकार हा कांहीं ' माझ्याकडे या ' अशी जाहिरात देऊन तुम्हांला आपल्याकडे बोलावीत किंवा भुलवून नेत नाहीं. तुमचे तुम्हींच वाटल्यास त्याच्याकडे जा. पण गेलांत तर ग्रंथमर्म कदाचित् अधिक समजून किंवा रहस्यसत्व अधिक घेऊन परत याल. ' कालिदासावर उत्तम ग्रंथ कोणता ? ' असें तुम्ही त्याला विचारल्यास कदाचित् ' कालिदासच ' असें कूटोत्तर तो देईल, तर त्यांत स्वारस्य असेलच, आणि सत्यही असेल; व तो हें उत्तर असें देतो याचा अर्थ इतकाच, कीं " मनुष्यानें शक्य तेथवर मूळग्रंथच स्वतःच वाचावे. तें वाचन पहिल्या प्रतीचें, व तें शक्य नसेल किंवा अपुरें पडेल, तरच त्यानें आम्हां टीकाकारांकडे यावें. "

## कोल्हटकरांच्या टीकेचे प्रकार

टीकाकारांचे तीन प्रकार होऊं शकतात ( १ ) पोलीस, ( २ ) न्याया-

धीश व ( ३ ) कायदे निर्माण करणारा. पूर्वी ( १ ) मल्ल, ( २ ) शिक्षक व ( ३ ) मित्र असे आणखी तीन प्रकार सांगितले. त्यांपैकीं मल्ल हा पोलिसांत अंतर्भूत होतो. शिक्षक व कायदे निर्माण करणारा हे जवळजवळ एकच. आणि मित्राचा समावेश न्यायाधीशांत होऊं शकेल. कारण न्यायाधीशांत विकारवैरभाव नसून, त्यानें गुणदोष यांची निवड व पारख समतोल बुद्धीनें करावयाची असते. या कर्तव्यांत सहानुभूतीची भर पडली तर तोच मित्र म्हणतां येतो. टीकाकारांच्या या तिन्ही भूमिका सर्वत्र मधून मधून कोल्हटकरांच्या टीकात्मक लेखांत आढळून येतात. त्यांची कायदे करणाऱ्या शिक्षक टीकाकाराची भूमिका मुख्यतः 'तोतयाच्या बंडा'वरील टीकेंत व कांहींशी 'प्रेमाभासा'वरील टीकेंत दिसून येते. पोलीस या नात्याच्या टीकाकारांची त्यांची भूमिका 'विक्रमशशिकला नाटक,' 'हिंदुधर्म आणि सुधारणा', 'मुक्ता', 'पुष्पभाषात्मक चरित्र', 'दोन सामाजिक नाटकें,' 'संगीत प्रेमाभास नाटक' इत्यादि टीकांतून दिसून येते. न्यायाधीश व मित्र या प्रकारच्या टीकाकारांची त्यांची भूमिका 'शापसंभ्रम', 'संगीत नाटकत्रय', 'संगीत सौभद्र' 'किर्लोस्करांचें चरित्र,' 'तोतयाचें बंड' इत्यादि टीकांतून दृष्टीस पडते. पुष्कळ लोक कोल्हटकरांना, 'विक्रमशशिकला' नाटकासारख्या अत्यंत क्षुद्र नाटकावर टीका करण्याला उगाच प्रवृत्त झाले, असें म्हणतात; व 'विविधज्ञानविस्तारा'चे तत्कालीन सल्लागार कै. नाडकर्णी यांनीं ही टीका छापावी असा सल्ला दिला तरी, असल्या चांगल्या लेखकानें असल्या क्षुद्र नाटकाचा समाचार घेण्यांत उगीच आपली लेखणी विटाळली, असें त्यांना कळविलें होतें. परंतु, त्या वेळीं, म्हणजे १८९२ सालीं, कोल्हटकर हे अवघे एकवीस वर्षांचे तरुण पदवीधर होते. लेखनकलेचा अंकूर नुकताच त्यांच्या मनांत फुटूं लागला होता. त्यांच्या टीकाबुद्धीचे दांत कोंवळे होते, तरी ते लहान मुलांच्या दांतांप्रमाणें चावा घेण्यासाठीं शिवशिवूं लागले होते. पण, याहीपेक्षां विशेष गोष्ट ही कीं, इतक्या अल्प वयांतही बहुश्रुतता व सदभिरुचीनें बनविलेली विवेचकबुद्धि त्यांची इतकी तीक्ष्ण बनली होती कीं, दृष्टीसमोर असलें खाद्य आल्यावर ते गप्प बसतील हें शक्यच नव्हतें. नाटक हा विषय घेतला असतां, स्वतः कोल्हटकरांनीं यापूर्वी नाटकें नुसतीं बघितलींच नव्हे, तर रंगभूमीवर

स्वत: केलीं होतीं; व त्याच्याही आधीं दहा वर्षें लिहिलीं होतीं. शिवाय ' विक्रमशशिकला ' नाटकाची लोकप्रियता व त्याबरोबरच त्याची दुष्टता यांचा विरोध लोकांच्या डोळ्यांत किती खुपत होता, हें आम्हीं स्वतः तेव्हां मुंबईसच रहात असल्यामुळें फार चांगलें स्मरतें. अर्थात् ' विविध-ज्ञानविस्तारा 'च्या सल्लागाराची उपेक्षाबुद्धि आणि कोल्हटकरांच्या ताज्या दमाची युयुत्सुबुद्धि यांचा मेळ पडणें शक्य नव्हतें. नाटक कसें असावें याविषयीं कोल्हटकरांच्या निश्चित कल्पना यापूर्वींच बनून तयार राहिल्या असल्यामुळें, नाटक कसें नसावें याचें प्रत्यक्ष मूर्तिमंत उदाहरण त्यांच्या डोळ्यांपुढें आल्यानंतर, त्यांना गप्प कसें बसवेल ? विष्णुशास्त्री चिप ळूणकरांचें उदाहरण डोळ्यांपुढें आणि त्यांच्यासारखे लेखक होण्याची महत्त्वाकांक्षा मनांत असल्यावर, कोल्हटकरांचे पाय ' विविधज्ञानविस्तारा ' सारख्या त्या वेळच्या अग्रगण्य मासिक पुस्तकाकडे चालूं लागावे, यांत आश्चर्य नाहीं. तेव्हांपासून कोल्हटकरांनीं टीकाकार पोलिसाचें जें दांडकें हातीं घेतलें, तें त्यांनीं पुढें केव्हांच खालीं ठेवलें नाहीं. पहिल्याच टीका-लेखांत त्यांनीं अश्लीलतेवर उपसलेलें हत्यार त्यांच्यासारख्या व त्यांच्या वेळच्या नवतरुणांना भूषणास्पद होतें, असें कोण म्हणणार नाहीं ? आतां पोलिस झाला तरी, एकाद्या पिकलेल्या फळांच्या बागेंत तो गेला असतां, फळ तोडून अर्पण करण्याला किंवा विकत देण्यालाही मालक जाग्यावर नाहीं असें पाहून, आपल्या हातानें एकादें फळ तोडून खाण्याची त्यालाही वासना व्हावी, हें साहजिकच आहे. या न्यायानें आपल्या रोमान्सच्या किंवा कोटिबाजपणाच्या भरांत कोल्हटकर आले असतां, त्यांच्याही हातून अश्लील शब्दप्रयोग लिहून गेलेले आहेत. तथापि, आपल्या चुकांबद्दल जरूर तर ते एक वेळ क्षमा मागतील; पण अश्लीलते-संबंधानें आपलें धोरण तरी त्यांनीं कधींच बदललें नाहीं, असें म्हणणें भाग आहे. हा मुद्दा सोडला, तरी कोल्हटकरांनीं टीकाकार या नात्यानें पोलिशीचें जें एक मोठें काम सतत केलें तें असें कीं, वाङ्मयाच्या राज-मार्गांतून संचरणाऱ्या लोकांना स्वैरपणानें भटकण्याची इच्छा झाली असतां, त्यांना डावी उजवी दाखवून योग्य दिशेवर ठेविलें. ' मॅकबेथ ' नाटकाच्या भाषांतरावरील टीकेंत कोल्हटकरांनीं कै. शिवरामपंत परांजपे यांच्या भाषां-तरांतील चुका दाखवून दिल्या त्या पहातां, व प्रो. परांजपे यांचा लेखक

या नात्याचा वडिलपणा लक्षांत घेतां, कोल्हटकरांची ही टीका शिक्षकपणाच्या सदरांत न घालतां पोलिशीच्या सदरांतच घालावी लागेल. 'वीरतनयाची ढाल' या लेखांत त्यांनीं लोकांना कडकडून चावे घेतले आहेत; पण तो सर्व प्रकार आत्मसंरक्षणाचा म्हणून क्षम्य वाटतो. पण, मल्ल या नात्यानें प्रतिपक्षाला चारी मुंडे चीत करून, त्याच्या उरावर बसून, चौफेर लोकांकडे हंसत पाहण्याची त्यांची टीका 'हिंदुधर्म आणि सुधारणा' व 'प्रेमाभास' या दोन पुस्तकांवरील होय. पैकीं 'हिंदुधर्म आणि सुधारणा' या लेखांत त्यांनीं प्रतिनिधिस्वरूप स्वीकारलें होतें. या पुस्तकांतील विषय समाजसुधारणेचा; त्या विषयाला स्वरूप वादाचें; त्यांतील दोन पक्ष तत्कालीन सुधारक व पुराणमतवादी यांपैकीं पुरणमतवादी वर्गाचा प्रतिनिधि म्हणून कै. प्रि. गोळे हे पुढें आले होते; व कोल्हटकर यांची भूमिका सुधारणावादी वर्गाचा प्रतिनिधि ही होती. या कुस्तींत कोल्हटकरांनीं दाखविलेंले वादकौशल्य हा त्यांच्या एकंदर टीकालेखांतील वाङ्मयाचा व युक्तिवादाचा अत्युत्कृष्ट नमुना असें आम्हांला तो लेख प्रथम वाचला तेंव्हां वाटलें; व तें आमचें मत आजही कायम आहे.

पण, स्वत: पोलीस देखील एकादे वेळीं पोलिशीचें काम विसरून, स्वतःच्या अभिमानाचा सूड उगविण्याकरितां डगला पट्टा फेंकून देऊन, प्रतिपक्षाच्या नरडीला हात घालतो, तसा देखावा कोल्हटकर यांच्या 'प्रेमाभास' नाटकावरील टीकेंत झालेला आहे; व त्याला तसा पूर्वेतिहासहि आहे. तो असा कीं, कोल्हटकरांचीं पहिलीं तीन नाटकें प्रसिद्ध झाल्यावर, पुण्याचे रा. ठोसर व रा. मराठे यांनीं त्या तिन्हीही नाटकांचे वाभाडे काढण्याचा मुद्दाम बेतच करून, इतर दोघां तीघां मित्रांच्या सहकारितेनें एक काल्पनिक कुटाळचावडी निर्माण केली; व कोल्हटकरांचा शब्द न् शब्द उलथा पालथा करून, त्यांत असलेलीं व नसलेलींही व्यंगें अशीं विकृत करून मांडलीं कीं, कोल्हटकरांचा उपहास होऊन ते अगदीं क्षुद्र नाटककार ठरावे! ही टीका प्रथम हप्त्याहप्त्यांनीं प्रसिद्ध होऊन शेवटीं त्याचें पुस्तकही निघालें; व त्याचें नांव 'नाट्यकलारुक्कुठार' असें आहे. टवाळगिरी सर्वांनाच आवडते, या न्यायानें कोल्हटकरांच्या शत्रूंप्रमाणें मित्रही ती टीका वाचून हंसले नसतील असें नाहीं; व रा.

ठोसर हे पदरांत पडलेला हा विजय राखून सांभाळून बसते, तर एका अर्थानें कोल्हटकरांवर तो त्यांचा कायमचाच विजय होऊन राहिलाही असता. पण, शर्यतींत किंवा सोडतींत पहिल्याच खेपेला मिळालेला पैसा, पुन्हां त्या फंदांत न पडतां, व्याजीं लावून जर जुगारी निवृत्त होईल तर जन्माचा सुखी होईल. पण हें होत नाहीं म्हणून तर शर्यती, जुगारी व सट्टे यांचे अड्डे पहिल्या दिवसासारखे आजही भरभराटलेले आढळतात. जें पहिलें यश खरोखरच दैवानें किंवा यदृच्छेनें लाभलेलें असतें, तें तसें नसून आपल्याच शहाणपणाचें व तज्ज्ञतेचें फळ होतें, असा भ्रम मनुष्याला पडतो; व त्याला मिळालेलें हें पहिलें यश तो फिरून नवीन तिकिट विकत घेऊन पणाला लावतो. तशी स्थिति रा. ठोसर यांची झाली. त्यांना हें माहित नव्हतें कीं, रागांत मनुष्यानें स्वतःला हास्यास्पद करून घेण्याचा एकटा एकच राजमार्ग नसतो. आणि, तो एक सोडून दुसऱ्या मार्गानें आपण गेलों; तर हास्यास्पदता ही आपणांला येऊन गांठणार नाहीं, असें नाहीं, असो. टीकाकार ठोसर यांना स्वतः नाटककार होण्याची कुबुद्धि झाली. त्यांनीं 'प्रेमाभास' या नांवाचें नाटक लिहिलें पण, तें इतकें नीरस ठरलें कीं, कोल्हटकरांपेक्षांही अधिक हास्यास्पद होण्याचा प्रसंग त्यांच्या स्वतःवर आला. मग खुनशी स्वभावाचे कोल्हटकर विनाकारण आगळीक केलेल्या आपल्या शत्रूला थोडेच सोडणार? त्यांनीं 'प्रेमाभास' नाटकाचा भरपूर समाचार घेतला; व प्रतिशत्रुता कशी साधून घेतली हें या ग्रंथांत छापलेला लेख, वाचूनच वाचकांनीं पहावें. त्याचें वेगळें वर्णन करण्याचें कारण नाहीं. पण असले लेख, म्हणजे कारणपरत्वें विकारदूषित झालेले लेख, सोडून दिले, तर कै. देवल यांच्या 'शापसंभ्रमा'वरचा, कै. किर्लोस्कर यांच्या 'सौभद्र' नाटकावरचा, कै. आपटे यांच्या मराठी भाषेंतील म्हणींवरचा, रा. वामनराव जोशी यांचा 'रागिणी' वरचा व माझ्या 'तोतयाचें बंड' या नाटकावरचा—हे टीकालेख कोल्हटकरांच्या टीकाविषयक प्रतिभेचे उत्कृष्ट नमुने म्हणून दाखवितां येतील.

## कोल्हटकरांची कल्पनाशक्ति

कोल्हटकरांना स्वतःविषयीं एका गोष्टीचा अभिमान फार असून, तो निरनिराळ्या रीतींनीं प्रगट झालेला दिसतो. तो अभिमान आपल्या स्वतंत्र काव्य-नाट्य-निर्मितीसंबंधानें; आणि हा अभिमान बहुतांशीं यथार्थ आहे,

असें म्हणतां येईल. खरी गोष्ट अशी असते कीं, मनुष्याला आमूलाग्र अशी नवी कल्पना सहसा करितांच येत नाहीं. पण अनुभवांतील वेगवेगळ्या जुन्या कल्पनांचें मिश्रण त्याला करितां येतें; व तें मिश्रण स्वतंत्रपणें करणें, दुसऱ्याचें उचलून न घेतां स्वतःच्या स्फूर्तीनें व बुद्धीनें करणें, याचेंच नांव स्वतंत्र निर्मिति होय. उदाहरणार्थ, मनुष्यदेह व हत्ती या दोन वस्तु मनुष्यानें निरनिराळ्या पाहिलेल्याच असतात. पण, शिरविरहित मनुष्यदेह कल्पून, कल्पनेनें मनुष्याचा शिरच्छेद करून, व त्याचप्रमाणें हत्तीचें मुंडकें वेगळें कल्पून, त्या दोहोंच्या मिश्रणानें गणपति निर्माण करणें याला स्वतंत्र निर्मितिही म्हणतां येईल. कारण गणपति हा सत्यसृष्टींत नाहीं. मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंह या अवतारांच्या मूर्तिही अशाच मिश्र कल्पनेच्या. म्हणून त्या मूळ ज्यानें कल्पिल्या त्यानें ती स्वतंत्र निर्मितीच केली. ग्रीक पुराणांत Centaur ही असलीच मिश्र कल्पना आहे. असो. रा. कोल्हटकर जेव्हां आपल्या निर्मिति स्वतंत्र असल्याचा हक्क सांगतात, तेव्हां तो वरील अर्थानेंच घ्यावयाचा असतो. सर्व काव्याचीही गोष्ट अशीच आहे. म्हणजे ज्या उपमानांच्या व उपमेयांच्या साधर्म्य—वैधर्म्यावर बहुतेक प्रमुख अलंकारांची मांडणी झालेली असते, तीं दोनही मूळ सृष्टींत निर्मितच असतात. पण एक हें व एक तें अशीं घेऊन, त्यांचे सुंदर संबंध साम्यविरोधादिक घडवून दाखवून, चमत्कृति उत्पन्न करणें याचेंच नांव काव्यशक्ति; व ती तितक्या अर्थानें खरी स्वतंत्रच आहे. जी गोष्ट काव्यकल्पनांची तीच नाट्यविषयक कल्पनांची.

असो. या अर्थानें कोल्हटकरांची निर्मिति प्रायः स्वतंत्र असते. तथापि, त्यांच्याही कित्येक कल्पनांना इतर ठिकाणचा आधार असतो; म्हणजे त्या त्यांच्या मनांतून कमी अधिक प्रमाणानें, त्यांना कळत न कळत, त्यांच्या कृतींत संक्रमित होतात. याचीं कांहीं उदाहरणें दिलीं असतां लक्षांत येईल. 'प्रेमशोधनां'तील जुळ्या भावांची कल्पना त्यांनीं Count de Bragallon या ड्यूमाच्या कादंबरीवरून, व मार्क्ट्वेनच्या Prince and Pauper या गोष्टीवरून घेतलेली असावी. तसेंच 'वीरतनयां'तील बकुल व त्याचा मारेकरी फत्तेसिंग यांचा प्रवेश तर शेक्सपिअरच्या 'किंग जॉन' या नाटकांतील राजपुत्र व मारेकरी यांच्या प्रवेशाचें स्पष्ट अनुकरण किंवा रूपांतर आहे. मात्र भाषांतर नव्हे. तसेंच, 'सहचारिणी' नाटकाची

कल्पना फ्रेंच कादंबरीकार ' पॉल डी कॉक ' याच्या एका कथेवरून, आणि ' जन्मरहस्य ' नाटकाची कल्पना ' पॉल अँड व्हार्जिनिया ' या फ्रेंच कादंबरीवरून सुचलेली दिसते. ' परिवर्तन ' नाटकालाही असाच आधार असावा; व या आधाराचा उपयोग कोल्हटकरांप्रमाणें इतर कांहीं मराठी नाटककारांनाही झालेला आहे. राज्य गमावून विरक्त स्थितींत अरण्यांत जाऊन राहिलेल्या ' प्रेमशोधनां'तील राजाची कल्पना शेक्सपिअरमध्यें आढळते. अशीं आणखीही कित्येक उदाहरणें दाखवितां येतील; व कोणास दाखवितां न आलीं तरी मूळांत असतील. पण ही गोष्ट कोल्हटकरांना दूषण देण्याकरितां आम्ही सांगत नाहीं. कारण, शेक्सपिअरच्याही बहुधा प्रत्येक नाटकाला जुनीं कथानकें, गोष्टी, पोवाडे इत्यादिकांचा आधार होता, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. कांहीं कांहीं कल्पनाच इतक्या मोहक असतात कीं, त्या एकदां मनांत बसल्या म्हणजे आपला पगडा कधींही सोडीत नाहींत. आणि, सृष्टिसौंदर्य हें जसें सर्व जगाच्या मालकीचें म्हणून तें अनुभविण्याच्या स्थळीं कोणीही जाऊन बसून आपल्यापुरतें तें आपल्या मालकीचें करणें यांत चोरी होत नाहीं, त्याप्रमाणेंच कवि व नाटककार यांची गोष्ट आहे. भाषांतरकार व रूपांतरकार हा आपला आधार प्राय: कबूलच करितो. कारण तेथें बहुतेक सर्व पुंजी पुस्तकांचीच असते. परंतु, भाषांतर किंवा रूपांतर नसतां मनाला चटका लावून सोडणाऱ्या कल्पनाही स्वतंत्र बुद्धीच्या मनुष्याला उपयोगांत आणण्याची इच्छा होते. पण, अशा ठिकाणीं कल्पनाबीज तेवढें दुसऱ्याचें, परंतु त्याचें खतपाणी, मेहनत—मशागत हीं त्या बीजाचा उपयोग करणाराचीं असतात. यामुळें अशा कल्पना उसन्या घेऊन उपयोगांत आणल्या, तरी त्याला फारसा दोष येत नाहीं.

कोल्हटकरांची कल्पनाशक्ति किती विशाल आहे याचें प्रत्यंतर जसें त्यांच्या नाटकांवरून येतें, तसेंच त्यांची ग्राहकबुद्धि किती खोल आहे हें त्यांच्या ज्योतिषशास्त्रविषयक निबंधावरून दिसून येतें. गणित हा विषय कोल्हटकरांना खालीं शाळेंत किंवा वर कॉलेजांत चांगला येत होता असें नाहीं. गणितविषयांत भरपूर मार्क न मिळाल्यामुळें हायस्कुलांतील आपली एक स्कॉलरशिप गेली, असें ते सांगत. कॉलेजांतही त्यांनीं गणितविषयाच्या जोरावर बहुमानाचा वर्ग मिळविला नाहीं; व बी. ए. करितां गणित हा

विषय ऐच्छिक म्हणून घेतला नाहीं. तात्पर्य, गणित विषयाचें त्यांचें ज्ञान असें तसेंच असतां, व नाटक--निबंधादि प्रकारांनीं त्यांचा वाङ्मयव्यवसाय सुरू असतां, कांहीं एका निमित्तानें त्यांना ज्योतिर्गणित या विषयाची जिज्ञासा उत्पन्न व्हावी आणि त्यांत त्यांनीं कित्येक वर्षें परिश्रम करावे, हें आश्चर्य नव्हे काय ? आणि, त्यांनीं नुसती आपली जिज्ञासा तृप्त केली इतकेंच नव्हे, तर कै. केतकरांसारख्या ज्योतिर्गणितज्ञांनाही आपल्या शंका-प्रश्नांनीं कुंठित केलें; ' असे प्रश्न विचारणारा मनुष्य मला हिंदुस्थानांत भेटला नाहीं, ' असें त्यांजकडून म्हणवून घेतलें; ज्योतिषविषयक ग्रंथांचे परीक्षक असा अधिकार त्यांनीं प्राप्त करून घेतला; आणि शेवटीं ज्योतिष-संमेलनाचें अध्यक्षस्थान प्राप्त करून घेतलें. रा. दामोदर सांवळाराम यंदे यांनीं आपल्या मालेंत प्रसिद्ध केलेला त्यांचा ज्योतिषविषयक ग्रंथ तज्ज्ञ ज्योतिषी लोकांना विशेष उपयुक्त नसला, तरी त्या विषयाचा अभ्यास करणाऱ्या नवीन विद्यार्थ्याला तो मार्गदर्शक आहे. या संमेलनांतून पुढें निघालेल्या वादांत किंवा शुद्ध पंचांगाच्या चळवळींत त्यांनीं कोणताही भाग घेतला नाहीं. यावरून सामाजिक सुधारणेप्रमाणें पंचांगसुधारणेची आस्था त्यांना नाहीं असें कृतीवरून अनुमान करितां आलें, तरी ही सुधारणा झाली पाहिजे असें त्यांचें निश्चित मत प्रस्तुत पुस्तकांतील ' ग्रह-गणित ' या नांवाच्या केतकरकृत ग्रंथाच्या परीक्षणांत दिसून येतें. ग्राहक-शक्तीचेही दोन प्रकार होतात. एक महत्प्रमाण वस्तूंचें स्वरूप व त्यांचे संबंध यांचें बुद्धिग्रहण; आणि दुसरा सूक्ष्मप्रमाण वस्तूंचें स्वरूप व त्यांचे संबंध यांचें बुद्धिग्रहण. कोल्हटकरांचें ज्योतिषशास्त्रांतील निष्णातत्व हें पहिल्या प्रकारचें उदाहरण होय. आणि, पन्नास वर्षांतील महाराष्ट्राच्या स्थित्यंतरासंबंधीं त्यांनीं वि. ज्ञा. वि. च्या ज्युबिली ग्रंथांत लिहिलेल्या निबंधांत दिसून येणारें सूक्ष्मावलोकन हें दुसऱ्या प्रकारचें उदाहरण म्हणून देतां येईल.

## समारोप

असो. रा. कोल्हटकरांच्या लेखनकलेविषयीं आणखी किती तरी लिहितां येण्यासारखें आहे. पण तसें केल्यानें प्रस्तावनेच्या मर्यादेचें अतिक्रमण होईल. मिळाल्या तेवढ्या जागेंत मी, कोल्हटकरांच्या लेखनक्षेत्राच्या अनेक प्रांतांवर ओझरती नजर टाकून, भावी पिढीच्या वाचकांना उपयोगी

पडावें या दृष्टीनें त्यांच्या लेखनविषयांचें समालोचन केलें आहे. कित्येक ठिकाणीं माझीं मतें म्हणून मीं मांडिलीं आहेत. त्यांविषयीं कोणाचा मत-भेद होण्याचा संभव आहे. पण त्यामुळें चालू पिढींतील एक नामांकित अग्रगण्य व अनुकरणीय लेखक या नात्यानें कोल्हटकरांच्याविषयीं वाट-णाऱ्या माझ्या व त्यांच्या आदरबुद्धींत फरक पडणार नाहीं.

## २ लो० टिळकांचे केसरींतील लेख

( भाग १ ला )

लोकमान्य टिळकांच्या केसरींतील लेखांचा हा पहिला भाग आज, म्हणजे त्यांच्या द्वितीय श्राद्धतिथीच्या दिवशीं, प्रसिद्ध करण्यांत येत आहे. सर्व टिळकभक्त त्याचा प्रेमपूर्वक स्वीकार करितील अशी आशा आहे.

टिळकांच्या लेखणींतून उतरलेले व केसरींतन वेळोवेळीं प्रसिद्ध झालेले लेख पुस्तकरूपानें संग्रहित करावे, अशा अर्थाच्या सूचना त्यांच्या हया-तींत, स्वत: त्यांनांहि, अनेकांकडून करण्यांत आल्या होत्या; व पुढें मागें केव्हां तरी ही गोष्ट करावयाची असें त्यांनीं योजूनहि ठेविलें होतें. परंतु अखेरपर्यंत ती तशीच राहून गेली! सुमारें चार वर्षांपूर्वी रामकृष्ण दत्तात्रेय पराडकर यांनीं या कामाकरितां केसरीचीं कांहीं जुनीं फाइलें मिळवून, लोकमान्यांच्या सल्ल्यानें त्यांचे लेख खंडशः छापून प्रसिद्ध करण्याचें मनांत आणून, या कामास लोकमान्यांची संमतीहि विचारली होती. पण या बाबतींतील अखेर योजना निश्चित न होतां इतर कार्यांच्या गर्दींमुळें हें काम तसेंच राहून गेलें. लो० टिळकांच्या मृत्यू-नंतर त्यांचीं वार्षिक श्राद्धें अनेक प्रकारांनीं होत आहेत; तेव्हां त्यांतच त्यांचे केसरींतील लेख छापून खंडशः वाचकानां दिले तर तो एक प्रकार लोकांना विशेष आवडेल असें आम्हांस वाटतें; व त्याप्रमाणें त्यांच्या लेखांचा हा पहिला भाग श्राद्धतिथीसच बाहेर पडत आहे.

ही योजना कदाचित् गतवर्षीच्या श्राद्धतिथीसच अमलांत यावयाची. पण त्या प्रसंगीं, शक्य तर, लोकमान्यांचें चरित्रच लिहून प्रसिद्ध करावें असाहि एक विचार आमचे मनांत होता. पण १९२०-२१ सालीं

फुरसतीचा जो वेळ मिळाला तो या चरित्राच्या साधनांची जुळवाजुळव व टिपणें करण्यांतच गेला. त्यामुळें या लेखांच्या प्रसिद्धीचें काम मागें पडलें. पण गेल्या दीड वर्षाचा अनुभव पाहतां, चरित्रलेखनाचें हें एकटें एकच काम स्वतंत्रपणें पत्करून त्या करितां इतर सर्व चालचलाऊ कामें कित्येक महिने बाजूस ठेवल्याशिवाय चरित्रग्रंथ लिहून होणें अशक्य आहे, अशी खात्री झाली. म्हणून तो योग केव्हां येईल तेव्हां येवो, पण निदान द्वितीय मृत्युतिथी तरी कांहीं वाङ्मयस्वरूपाचें श्राद्ध केल्याशिवाय टळूं देऊं नये असा विचार आम्ही केला; व त्याप्रमाणें हल्लींचें हें पुस्तक छापण्याची तयारी केली.

लो० टिळकांनीं केसरींत सुमारें तीस पस्तीस वर्षेंपर्यंत अनेक विषयांवर लेख लिहिले. त्यांत मुख्य भर अर्थात् राजकीय विषयांवर होता हें सांगावयास नकोच. तथापि याखेरीज इतर विषयांवरील त्यांचे लेखहि, राजकीय लेखांइतकेच, भारदस्त, सणसणीत, मार्मिक व विद्वत्ताप्रचुर असल्यामुळें त्यांचाहि ग्रंथरूपानें संग्रह होणें अवश्य आहे यांत शंका नाहीं. पण हा एकंदर लेखसंग्रह एकदम छापून निघणें जसें अवघड, तसेंच तो सर्व एकदम विकत घेणें हें वाचकांनाहि गैरसोईचें ठरतें. यामुळें आम्हीं अशी योजना केली आहे कीं, प्रथम केसरींतील लोकमान्यांचे राजकीय विषयावरील लेख, व त्यानंतर त्यांचे सामाजिक, धार्मिक, वाङ्मयात्मक वगैरे विषयांवरील लेख छापावयाचे. राजकीय विषय मोठा असल्या-कारणानें त्याचे हल्लींएवढे दोन किंवा कदाचित् तीनहि भाग होतील; व इतर विषय मिळून आणखी दोन भाग होतील. अशा रीतीनें सुमारें अडीच तीन हजार पृष्ठांत लोकमान्यांच्या निवडक लेखांचा संग्रह होईल.

राजकीय विषयक लेखांच्या या पहिल्या भागांतील पहिला लेख ता. २१ आगष्ट १८८८ चा असून शेवटचा लेख ता. २० जुलै १८९७ चा आहे हें वाचकांच्या ध्यानांत येईलच. या नऊ वर्षांतील लेखांचींच इतकीं पृष्ठें झाल्यामुळें हा भाग येथेंच पुरा करावा लागला हें खरें. तथापि ही खंडमर्यादा इतर स्वाभाविक कारणांनींहि प्राप्त झाली आहे. लो० टिळकांच्या चरित्राप्रमाणें त्यांच्या लेखनव्यवसायाचेहि तीन भाग, कालाच्या दृष्टीनें, आपोआप पडतात. टिळकांनीं राजकीय चळवळ व

तदनुषंगानें संपादकाची लेखणी हातीं घेतल्यापासून स० १८९७ सालीं राजद्रोहाचा पहिला खटला व दीड वर्षाची शिक्षा होईपर्यंत पहिला भाग पुरा होतो. दुसऱ्या भागास 'पुनश्च हरिः ओम्' या त्यांच्या केसरींतील अग्रलेखानें सुरवात होऊन, सन १९०८ सालीं केसरीवरील राजद्रोहाचा दुसरा खटला व त्यांत सहा वर्षांची काळेपाण्याची शिक्षा होण्याचे सुमारास त्याचा शेवट होतो. पुढें मंडालेहून स. १९१४ सालीं लो० टिळक परत आल्यानंतर त्यांनीं केसरीचें संपादकत्व आपल्याकडे घेतलें नाहीं हें खरें. तथापि राजकीय चळवळीच्या भरांत व लेखनव्यवसायाच्या आवडीनें, त्यानंतरहि प्रायः आयुष्याच्या अखेरीपर्यंत त्यांनीं केसरींत अनेक लेख लिहिले आहेत. केसरींतील त्यांच्या राजकीय लेखसंग्रहाचा हा तिसरा भाग होईल. हे तीनहि भागच काय, पण इतर विषयांवरील भागहि, शक्य तितके लवकर छापून प्रसिद्ध करावे असें आम्हीं योजिलें आहे. तथापि वर्षांतून एक किंवा फार तर दोन भाग छापण्याहून अधिक जलदीनें हें काम होणें शक्य नाहीं. आणि ग्राहक व वाचक यांच्याहि दृष्टीनें थोडथोड्या कालावधीनें हे भाग बाहेर काढणें हेंच सोयीचें आहे. तात्पर्य, या लेखसंग्रहाचे भाग प्रसिद्ध होण्याच्या मुदती व तारखा आजच निश्चित ठरवितां न आल्या तरी सुमारें तीन वर्षांत यथाक्रम ही योजना पुरी होईल असा आमचा आजचा अंदाज आहे.

आतां या संग्रहांतील खुद्द लेखांसंबंधानें दोन शब्द सांगणें जरूर आहे. आम्हीं छापीत आहों ते 'लो० टिळकांनीं केसरींत लिहिलेले लेख'च होत. तथापि नेमके या स्वरूपाचेच तेवढे लेख बिनचूक निवडून काढणें हें किंचित अडचणीचें आहे; तें कां हें मार्मिक वाचकांच्या तेव्हांच लक्षांत येईल. स्थूलरूपानें केसरी व टिळक यांचा केव्हांहि अनन्य संबंधच आहे अशी सामान्य वाचकांची समजूत असणार, व तींत पुष्कळच तथ्य आहे. तथापि ज्या मुदतींत एखादा मनुष्य एखाद्या वर्तमानपत्राचा जाहीर रीतीनें संपादक असतो, त्या मुदतींत त्या वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेले सर्वच काय; पण संपादकीय लेख देखील सर्वच्या सर्व त्यानेंच लिहिलेले असतात असें नाहीं ही गोष्ट प्रसिद्ध आहे. या नियमाला अनुसरून, लो० टिळक हे केसरीचे जाहीर संपादक असलेल्या मुदतींत केसरींत प्रसिद्ध झालेल्या अग्रलेखांतून इतरांनीं लिहिलेले अग्रलेखहि मिसळलेले आहेत.

अर्थातच ते या लेखसंग्रहातून वगळले पाहिजेत. पण खर्चाच्या या रकमांप्रमाणें जमेच्याही कांहीं रकमा आहेत. त्या म्हणजे लो० टिळक हे केसरीचे जाहीर संपादक नसतां त्यांनीं केसरींत लिहिलेले लेख या होत. म्हणून प्रस्तुत लेखसंग्रहांत पहिल्या प्रकारचे लेख वगळून दुसऱ्या प्रकारचे लेख घ्यावे लागणार आहेत.

वर्तमानपत्रांचा शिरस्ताच असा असतो कीं, त्यांत कोणता अग्रलेख कोणी लिहिला याची फोड किंवा नामनिर्देश करणें शिष्टाचाराविरुद्ध मानलें जातें. एवढेंच काय, पण कोणत्याहि वर्तमानपत्राच्या कचेरींत अग्रलेखवार लेखकांच्या नांवनिशींची नोंदहि ठेविली जात नाहीं. यामुळें लेख व त्यांचे लेखक यांचा मेळ घालणें हें काम कोणासहि इतर रीतीनेंच करावें लागतें. हा विवेक करण्याचें मुख्य साधन म्हटलें म्हणजे सराईत लेखकांची दृढ बनलेली लेखनपद्धति.या साधनानें परिचित वाचकाला कोणचा लेख कोणाचा हें शंभरांपैकीं नव्वद वेळां बिनचूक ओळखून काढतां येतें. लो० टिळकांची लेखनपद्धति तर अशी विशिष्ट प्रकारची होती कीं, त्यांच्या लेखांच्या लेखकत्वाविषयीं कोणास फारशी संशयाची जागा उरतच नाहीं. तथापि परिचिताची ही दृष्टी चालवूनहि त्यांनीं लिहिलेला एखादा अग्रलेख दुसऱ्याचा व दुसऱ्यानें लिहिलेला अग्रलेख त्यांचा, असा भ्रम चुकून एखाद्याहि ठिकाणीं आम्हांला पडला नसेल अशी खात्री किंवा निर्वाळा आम्ही देऊं शकत नाहीं हें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे.

आतां हा भ्रम सर्वथैव निष्कारणच असतो असें मात्र नाहीं. कित्येक राजकीय अग्रलेखांतील विषयच इतका सामान्य व चलनी स्वरूपाचा असतो कीं, त्यावर स्वतः टिळकांनीं लेख लिहिला तरी तो कदाचित् सामान्य स्वरूपाचाच उतरूं शकेल. कित्येकवेळां सर्व भाषा स्पष्टपणें टिळकांची नसावीसें वाटलें तरी लेखकास विषयाची विचारसरणी टिळकांनीं सांगितली असावी व माहितीचीं साधनें दर्शविलीं असावीं यामुळें लेखांत टिळकांच्या विशिष्ट विचारांचें प्रतिबिंब उमटलेलें स्पष्ट दिसतें. कित्येक वेळां अग्रलेखाचा एक भाग दुसऱ्याकडून लिहवून, दुसरा भाग पुष्टीकरितां किंवा पूर्तीकरितां स्वतः टिळकांनीं लिहिलेला असावा असा भास होतो; व प्रत्यक्ष व्यवहारांत असें घडतेंहि. अशा वेळीं निवड करणारास 'सोडलें तर पळतें व धरलें तर चावतें,' या द्राड म्हणीचा अनुभव

सहजच येतो ! कारखान्यांतील केरकचऱ्यांतून लोखंडाचे कण वायां न जावे म्हणून लोहचुंबकाच्या साहाय्यानें तेवढेच कण उचलून घेऊन बाकीचा केर टाकून देण्याची सोय असते. किंवा शुद्ध सोन्यारुप्यांत हिणकस मिसळलें गेलें असतां तेजाबाच्या साहाय्यानें तीं वेगवेगळीं करितां येतात. पण वर्तमानपत्रांतील लेखांच्या संबंधानें असलें बिनचूक विवेचक साधन कसें मिळणार ? म्हणून इतर रीतीनें कार्याचा निर्वाह व मनाचें समाधान करून घेणें प्राप्त होतें. त्यांतूनहि एखादा लेख टिळकांचाच खरो-खर असतां तो या संग्रहांतून वगळला गेला तरी ती मोठीशी बाब नाहीं. कारण केसरींतील टिळकांचें अक्षरान् अक्षर संग्रहित करावयाचें हा प्रस्तुत ग्रंथमालेचा उद्देश नाहीं. अडचण काय ती; खरा टिळकांचा लेख नसतां तो प्रस्तुत ग्रंथसंग्रहांत त्यांचा म्हणून चुकून समाविष्ट झाल्या-चीच होय व अशा गोष्टींचें मागाहून ज्ञान झाल्यास ती चूक निवड करणाराच्या मनाला किंवा वाचकालाहि नाजूक शल्यासारखी जाचत राहील हें उघड आहे. पण या बाबतींत मुख्य हेतूकडेच लक्ष देऊन किरकोळ चुकांची उपेक्षा करणेंच योग्य होईल. किंवा किंचित् अडमुठेपणा मुद्दाम स्वीकारून आम्हीं असाहि युक्तिवाद कां न करावा कीं स्वत: जाहीर संपादक असतां, म्हणजे केसरींत आलेले अग्रलेख आपलेच (टिळकांचे) आहेत अशी लोकांची समजूत होण्यासारखी असतां, जे लेख टिळकांनीं संपादकीय म्हणून स्वीकारले ते एका अर्थानें त्यांचेच झाले ! ‘ आप-णांसारिखे करिती तात्काळ ’ किंवा ‘ लोह परिसा खाया जाये । लोह सुवर्णची होये ’ या अभंगवाणी प्रमाणें केसरींतील अग्रलेखांसंबंधीं लेख-कालेखकांत भेद करणें हें सर्वथा अयोग्यच होईल. म्हणून प्रस्तुत लेख-संग्रहांत टिळकांनीं न लिहिलेला असा एकादा लेख चुकून छापला गेला असें कोणास आढळलें तरी त्या गोष्टीची वाच्यता करण्याचा त्याला अधिकार नाहीं हें जसें कायदेशीररीतीनें म्हणतां येतें, तसेंच, वरील विचारसरणी लक्षांत घेतां, मार्मिकतेच्या आग्रहानेंहि तें म्हणतां येईल.

टिळक हे केसरीचे जाहीर संपादक होण्यापूर्वी त्यांनीं केसरींत फार थोडे लेख लिहिले. व या काळांत जे लेख त्यांनीं लिहिले ते प्राय: सामा-जिक किंवा धार्मिक विषयांवर लिहिले अशी माहिती मिळते. फार काय,

पण न्यू इंग्लिश स्कुलांतील भांडणामुळें आगरकरांऐवजीं टिळक हे सन १८८७ सालीं केसरीचे संपादक ठरून जाहीर झाले तरी, त्यानंतर बरेच दिवसपर्यंत ते केसरींत लिहित नसत. आमच्या माहितीप्रमाणें, टिळकांनीं न्यू इंग्लिश स्कूल व फर्ग्यूसन कॉलेज सोडल्यावर जी पहिली राजकीय चळवळ केली ती क्रॉफर्ड प्रकरणीं, म्हणजे बडतर्फ झालेल्या किंवा होऊं घातलेल्या मामलेदारांच्या तर्फे. या चळवळींत खबूतरखान्यामध्यें टिळकांनीं जाहीर सभेंत भाषण केलें तेंच त्यांचें पहिलें इंग्रजींतील भाषण होय. व ता. २१ ऑगस्ट १८८८ च्या केसरींत क्राफर्ड प्रकरणावर त्यानीं लिहिलेला लेख हाच प्राय: केसरींत राजकीय विषयावर त्यांनीं लिहिलेला पहिला लेख होय असें सांगतात. तसेंच या भागांतील शेवटचा लेख, ज्या गुन्ह्याच्या आरोपाच्या वातावरणांत त्यांचें सर्व राजकीय चरित्र गेलें त्या राजद्रोहाच्या व्याख्येसंबंधीं आहे. अर्थात् प्रस्तुत खंडांतील हे आरंभ अनेक दृष्टींनीं मनोरंजक वाटण्यासारखेच आहेत. पुढील भागांतील पहिला लेख, 'पुनश्च हरि: ॐ' हा येईल व दुसरा भागही लवकरच तयार होईल म्हणून वाचकांनीं पुढील भागांकडे अवधान ठेवावें.

---

# लो० टिळकांचे केसरींतील लेख

( भाग २ रा )

प्रस्तुतचा ग्रंथ हा लो. टिळकांनीं केसरींत लिहिलेल्या राजकीय लेखांचा दुसरा खंड किंवा हत्ता होय. पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेंत आम्ही सुचवून ठेविल्याप्रमाणें या दुसऱ्या खंडांतील पहिला लेख " पुनश्च हरि: ॐ " हा असून त्यांत लोकमान्यांनीं केलेलें आपल्या मनोवृत्तीचें आविष्करण किती तेजस्वी आहे हें वाचकांस दिसून येईलच. पुढें आरंभिलेल्या स्वाध्यायाला त्यांनीं, आपल्या सर्व मदतगारांचे उदारपणें आभार मानून म्हणजे वैदिक पद्धतीनें लौकिक ऋण फेडून, या लेखापासून सुरवात केली. आपल्या पुढील कार्यक्रमासंबंधानें त्यांनीं असें जाहीर केलें कीं कायदा बदलला असेल तर तो लक्षांत बाळगूं तथापि ज्या काळीं कायद्यानें जितकी मोकळीक दिली असेल तिचा पूर्ण फायदा घेऊन निर्भयपणें आपण लोक-

मत जागृति करूं व जनतेच्या हक्कांचें समर्थन करूं. या निर्भय उक्तित ठेवलेला ' हातचा ' आज कायदेभंग हा शब्द सर्वसामान्य होऊन बसल्यावर कित्येकांच्या कानाला कसासाच लागेल. तथापि तो लेख सन १८९९ सालांतील आहे येवढीच गोष्ट लक्षांत ठेविली असतां पुरें होईल. तसेंच या खंडाच्या अखेरचा म्हणजे परिशिष्टाच्या पूर्वींचा लेख ' हिंदुस्थानची वाट काय ' या विषयावरचा छापलेला आहे. त्यांतील शेवटचीं वाक्येंहि वाचकांनीं ध्यानांत धरण्यासारखीं आहेत. हा लेख सन १९०५ च्या आगष्ट महिन्यांतील म्हणजे बनारस कॉंग्रेसच्या आधीं लिहिलेला आहे. त्यांत लो. टिळक लिहितात " हिंदुस्थानास प्रान्तिक स्वातंत्र्य दिल्याखेरीज गत्यंतर नाहीं, अशी विलायतेंतील लोकांची खात्री करून देणें महत्प्रयासाचें काम आहे खरें पण त्यास इलाज काय ? तो प्रयास जर आमचे हातून होत नसेल तर उगीच वायफळ बोलण्यांत कांहीं हंशील नाहीं. " या वाक्यांतील सुधारणाविषयींची टिळकांची विधायक सूचनाहि लक्षांत ठेवण्यासारखी आहे. प्रस्तुत खंडाचे हे आद्यंत लक्षांत घेतले म्हणजे या लेखांनीं आक्रमिलेल्या पांच सहा वर्षांत टिळकांचें साध्य व साधन हीं कोणचीं होतीं हें उघड दिसून येईल.

प्रस्तुत ग्रंथांत प्लेग, दुष्काळ, स्थानिक स्वराज्य, दडपशाहि, लष्करी खर्च, जमीन महसुलाचा कायदा, होळकर सरकारचा राजिनामा व कर्झनशाहीचा प्रारंभ हे टिळकांच्या लेखांचे प्रमुख विषय आहेत. वरील अनेक विषयांवरचीं लो. टिळकांचीं मतें महाराष्ट्रास सामान्यतः अवगत असलीं तरी त्यांवरील टिळकांचे स्पष्टोक्तिपूर्ण व बाणेदार लेख वाचणाऱ्यांस त्या जुन्या काळीं आपण प्रत्यक्ष असल्याचा भास तर होतोच पण राजकारणाच्या त्या त्या विषयांत विद्यमान स्थितिपेक्षांहि भावी स्थिति कल्पनेनें आकलन करून ती लक्षांत घेऊन लिहिलेले त्यांचे लेख दूर दृष्टीचे कसे ठरतात याचाहि वाचकांस अनुभव येतो. तथापि या खंडांतील लेख राष्ट्रीय चळवळीच्या खऱ्या प्रारंभापूर्वीचे आहेत व त्यांत ध्येयवादी टिळकांपेक्षां विवेकवादी टिळकच अधिक दृग्गोचर होतात ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. या राष्ट्रीय चळवळीचा खरा प्रारंभ वंगभंगापासून व बनारसच्या राष्ट्रीय चळवळीपासून होतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणून यापुढील खंडांत याहिपेक्षां वाचनीय असे टिळकांचे लेख जे येणार तें

वाचण्याला खंडांतील लेख वाचून होणारी पूर्व तयारी वाचकांनीं करून ठेवावी व यापुढचा खंड आम्हीं या पूर्वीच हातीं घेतला असून तो वाचकांच्या हातीं लवकरच देऊं अशी आम्हांस उमेद आहे.

---

# लो० टिळकांचे केसरींतील लेख

( भाग ३ रा )

लोकमान्य टिळकांच्या केसरींतील राजकीय लेखांचा हा तिसरा भाग महाराष्ट्रीय जनतेपुढें मांडतांना आम्हास समाधान वाटत आहे. लोकमान्यांच्या सामाजिक, धार्मिक व संकीर्ण अशा लेखांचा आणखी एक किंवा दोन भाग पुढें प्रसिद्ध करावयाचे आहेत. आणि ते झाल्यावरच हें त्यांच्या लेखांच्या प्रकाशनाचें काम पुरें झालें असें म्हणतां येईल हें खरें. पण राजकीय लेखांचा हा अखेरचा खंड असल्यामुळें संकल्पित कार्यापैकीं एक विशेष महत्त्वाचा विभाग येथें पूर्ण झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. तीन साडेतीन वर्षांपूर्वी, १९२२ च्या ऑगस्ट महिन्यांत, १८८८ ते १८९९ पर्यंतच्या लेखांचा ' पहिला ' खंड वाचकांपुढें मांडतांना " दुसऱ्या खंडांत १८९९ ते १९०८ पर्यंत व तिसऱ्या खंडांत १९१४ ते २० पर्यंतचे लेख येतील " असें आम्ही म्हटलें होतें. पण १८९९ पासून १९०५ पर्यंतच्या लेखांचींच सहासातशें पानें झाल्यामुळें दुसरा खंड तेथेंच संपविला व १९०५ ते १९२० पर्यंतच्या लेखांचा सुमारें पांचशें पानांचा हा तिसरा खंड तयार केला. या खंडाचा आरंभ १९०५ च्या ऑगस्टमधील, वंगभंगाच्या चळवळीस प्रारंभ झाला त्यावेळेच्या " आणीबाणीची वेळ " या लेखानें झाला आहे. याच चळवळींत पुढें स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय-शिक्षण व निःशस्त्रप्रतिकार इत्यादि अंगांची भर पडून तिला प्रचंड सार्व-राष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें व चळवळीमागून दडपशाही या परकीय राज्यांतल्या स्वाभाविक व ठराविक क्रमानें दडपशाही उत्पन्न झाली. त्यांतच १९०८ मध्यें लोकमान्यांना सहा वर्षांची शिक्षा झाली. १९१४ सालीं कैदेंतून सुटून आल्यानंतर राष्ट्रीय पक्षाचा राष्ट्रीय सभेंत कसा प्रवेश होईल याचा विचार लो० टिळकांनीं प्रथम आरंभिला. १९१४ ते २० पर्यंतच्या

लेखांचीं, या तिसऱ्या खंडाच्या उत्तरार्धाचीं, सुमारें २०० पृष्ठें आहेत व त्याची सुरुवात " राष्ट्रीय सभा व मद्रासची कॉंग्रेस " या लेखानें झालेली आहे. या उत्तरार्धातहि १९१९ सालांत लो. टिळक हे विलायतेंत गेल्या-मुळें मध्यंतरी एक लहानसा खंड पडला आहे. १९१९ सालाचे अखेरीस विलायतेहून परत आल्यावर लिहिलेला एकच लेख या सालांत आहे. लोकमान्यांचा अखेरचा महत्त्वाचा केसरींतील अग्रलेख म्हणजे " नवी विटी नवें राज्य " हा ता. १०।४।२० च्या केसरींतला कॉंग्रेस लोकशाही पक्षाच्या जाहिरनाम्यावरचा होय. यानंतर ता. २७।४।२० च्या केसरींत " दोन खुलासे " या मथळ्याखालीं निवडणुकीच्या नियमासंबंधीं खुलासे-वजा एक अग्रलेख त्यांनीं लिहिला. पण त्याचें आतां महत्त्व नसल्यामुळें " नवी विटी नवें राज्य " या लेखानेंच या भागाची समाप्ति करून त्याच लेखांत उल्लेखलेला कॉंग्रेस लोकशाही पक्षाचा जाहिरनामा परिशिष्ट म्हणून अखेरीस दिला आहे.

लोकमान्यांच्या राजकीय कार्यांतील स्वदेशीबहिष्काराची चळवळ व होमरूलची चळवळ या दोन चळवळी अत्यंत महत्त्वाच्या होत व त्या चळवळींच्या भरांत त्यांनीं लिहिलेले अत्यंत तेजस्वी असे लेख या तिसऱ्या भागांत समाविष्ट झाले असल्यामुळें पहिल्या दोन भागांपेक्षांहि या भागास विशेष महत्त्व प्राप्त होईल यांत शंका नाहीं. या भागांतील पहिल्या " आणी-बाणीची वेळ " या लेखाचा प्रारंभ " परकीय राजसत्तेखालीं जिंकलेल्या लोकांनीं आपल्या हक्कांच्या बचावाकरितां किंवा नवीन हक्क मिळविण्या-करितां काय तजवीज केली पाहिजे हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे " या वाक्यानें झाला असून याच हक्कांच्या संरक्षणाकरितां व संवर्धनाकरितां काढलेल्या कॉंग्रेस लोकशाही पक्षाच्या जाहिरनाम्यानें त्याचा शेवट झालेला आहे. हे एकरूप असलेले उपक्रमोपसंहार मनांत ठेऊन मध्यंतरीच्या ग्रंथाची संगती लावतांना अभ्यास, अपूर्वता, अर्थवाद, उपपत्ती इत्यादिकांची सरणी वाचकांनीं आपआपल्याच परीनें बसवावी. मात्र ती बसवितांना परि-स्थितीची पार्श्वभूमिका अखंड नजरेपुढें ठेविली पाहिजे. कारण परिस्थिति-प्रतियोगित्व, म्हणजे जशी परिस्थिती येईल तसें तिला तोंड देण्याचें अपूर्व सामर्थ्य किंवा कौशल्य लोकमान्यांच्या अंगीं होतें.

लोकमान्यांच्या परिस्थिति–प्रतियोगित्वाचें एक ठळक व समर्पक असें

उदाहरण या तिसऱ्या भागांतच पहावयास सांपडतें. १९०५ ते १९०८ सालापर्यंत राजकारणांत सरकारनें लोकांना कांहींच अधिकार दिले नव्हते व देण्याची आशाहि फारशी नव्हती. अशा वेळीं देशांत तीव्र असंतोष उत्पन्न करणारे व सरकारच्या कृत्यावर कडक व विध्वंसक स्वरूपाची टीका करणारे लेख त्यांनीं लिहिले. पण सरकार स्वराज्याचा हप्ता देण्याचा विचार करील असा थोडाबहुत संभव उत्पन्न झाल्यावर त्यांनीं विधायक सूचनांच्या स्वरूपाचेहि लेख लिहिले. उदाहरणार्थ या तिसऱ्या भागांतली 'हिंदी स्वराज्यसंघ' ही लेखमाला पाहा. असंतोष कायम ठेवा हा त्यांचा आग्रह होताच. सरकारची मूठ घट्ट आवळलेली होती त्यावेळीं त्या असंतोषास निर्गुण-निराकार असें स्वरूप होतें. पण महायुद्धाचे योगानें निर्माण झालेल्या परिस्थितीनें सरकारची मूठ सैल होणार असें दिसतांच लोकमान्यांनीं आपल्या चळवळीला सगुण व साकार स्वरूप दिलें. विध्वंसक टीकेपेक्षां विधायक सूचनांचे लेख सामान्य माणसास कमी तेजस्वी वाटतात. कारण विध्वंसक टीकेंत जो एकमुखीपणा असतो तो जाऊन विधायक कामाचे वेळीं त्यास तपशिलाचीं अनेक तोंडें फुटतात व यामुळें टिळक 'मवाळ' झाले कीं काय, असाहि कित्येक अर्धवटांस भास होतो. पण विधायक कामांची खरी जरूरी उत्पन्न झाली असतां चळवळीचें केवळ विध्वंसक स्वरूपच टिळकांनीं ठेवलें असतें तर ते काळाच्या ओघाच्या खास मागें पडले असते व इतर कित्येक पुढारी तसे पडलेहि. काळाच्या लाटेच्या शिघेवर नेहमीं आरूढ असावयाचें या लोकमान्यांच्या स्वाभाविक गुणामुळें ते यावेळीं मागें पडले नाहींत. १९१४ सालीं मंडालेहून सुटून आल्यानंतर लोकमान्यांनीं केसरीचें प्रत्यक्ष संपादकत्व आपलेकडे कधींच घेतलें नाहीं. तरी विशेष महत्त्वाच्या प्रसंगीं ते अग्रलेख लिहीत असत व हे त्यांचे अखेरचे लेख म्हणजे ४० वर्षांच्या अनुभवानें बनलेल्या त्यांच्या राजकीय परिणतप्रज्ञेचे उत्कृष्ट नमुनेच आहेत. सारांश या तिसऱ्या भागांत ७५ च लेख असले तरी महत्त्वाचे दृष्टीनें पहिल्या दोन भागांत मिळून छापलेल्या सुमारें २६० लेखांहूनहि वाचकांना ते अधिक उद्बोधक वाटल्यास नवल नाहीं.

लोकमान्यांची राजकीय मतें व तत्त्वज्ञान हीं ज्यांस स्वतः स्वतंत्रपणें समजून घ्यावयाचीं असतील त्यांनीं या तीन भागांतून प्रसिद्ध झालेल्या

राजकीय लेखसंग्रहाचें आमूलाग्र परिशीलन करावें. या तीन भागांत मिळून एकंदर ३३५ लेख आले असून त्यांचीं सुमारें १८०० पानें भरलीं आहेत. सन १८८१ सालापासून केसरी निघत असला व त्याच्याशीं डे. ए. सोसायटीच्या इतर मंडळींबरोबर टिळकांचाही संबंध असला व पुढें १८८७ सालीं टिळक केसरीचे संपादक झाले तरी १८८८ मधल्या क्रॉफर्ड प्रकरणापर्यंत टिळकांनीं केसरींत फारसें लिहिलेलें नाहीं. सोसायटी सोडल्यानंतरच त्यांनीं राजकीय चळवळींत खरें लक्ष घालण्यास प्रारंभ केला. मूळ ज्या लोकांनीं केसरी काढला त्यांची विचारसरणी तेजस्वीच होती. ता. ४ जानेवारी १८८१ रोजीं निघालेल्या केसरीच्या पहिल्या अंकांत पहिल्याच पानावर संपादकांनीं असें जाहीर केलें आहे कीं, "सरकारी अधिकारी आपलीं कामें कोणकोणत्या तऱ्हेनें बजावतात याविषयीं केवळ नि:पक्षपातबुद्धीनें व कोणाची भीड न बाळगतां मजकूर लिहिण्याचा आमचा इरादा आहे." (या पहिल्या पानाचें छायाचित्र पहिल्या भागाच्या प्रारंभीं दिलें आहे त्यांतलें हें वाक्य वाचकांस सहज वाचतां येण्याजोगें आहे.) हीच परंपरा टिळकांनीं पुढें चालविली व १८८८ मध्यें लिहिलेल्या क्रॉफर्ड प्रकरणांतील पहिल्याच अग्रलेखाचे अखेरीस ते म्हणतात "आगीपासून दोन कोस दूर राहून फुशारक्या मिरविणारे शेंकडों आहेत! पण आगींत सांपडल्यावर मग सत्वास जागणाऱ्या मनुष्यांची संख्या मोजण्यास एका हाताच्या बोटांची सुद्धां जेथें जरूर पडत नाहीं तें राष्ट्र कसलें व लोक तरी काय! 'विकार हेतौ सति विक्रियंते येषां न चेतांसि त एव धीरा: ।' या कालिदासोक्तिप्रमाणें जेव्हां कांहीं 'धीर' किंवा 'वीर' आपणांत निपजतील तेव्हांच आमच्या देशाच्या विद्येचा व सुधारणेचा खरा लाभ झाला म्हणावयाचा" १९२० सालीं लिहिलेल्या 'नवी विटी नवें राज्य' या लेखाचे अखेरीसहि ते म्हणतात "लवकर प्राप्त होणाऱ्या या नव्या युगांत आमच्या वतीनें काम करण्यास जी मंडळी आम्हास पाहिजे आहेत ती निर्भय, जोरदार, स्वार्थास लुब्ध न झालेली, आणि कडव्या उमेदीची पाहिजे आहेत" ही निर्भय व तेजस्वी वृत्तीच मधल्या सर्व लेखांतून अखंड अनुस्यूत आहे. मात्र निर्भय व तेजस्वी कृतीची पार्श्वभूमिका या उद्गारांपाठीमागें नसती तर ते पोकळ व वायफळ ठरले असते. पण उद्गारांतील तेजस्वीपणाप्रमाणेंच त्या त्या कालीं ते वाचतांना वाचकांच्या

डोळ्यापुढें स्पष्टपणें लोकमान्यांची निर्भय व धडाडीची कृतीहि असे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. म्हणजे, त्या लेखांच्या लोकांच्या मनांवर झालेल्या परिणामाचें रहस्य कळेल, एरवीं कळणार नाहीं.

राजकारणांत पाऊल ठेवण्याच्या आधीं लोकमान्यांच्या ऐन उमेदीच्या तारुण्यातलीं कित्येक वर्षें एका शिक्षणसंस्थेंत गेलीं, त्या संस्थेंत मतभेद होऊन एकप्रकारच्या उद्वेगानें ते तेथून बाहेर पडले होते. "मी आज शाळा सोडल्यामुळें सर्व जन्माचें ध्येय सोडलें असेंच मला वाटतें" असें ते राजीनाम्याचे अखेरीस म्हणतात, यावरून ही गोष्ट दिसून येईल. शिवाय टेबलाशीं बसून लेख लिहिण्याची, किंवा लेखक म्हणून गाजण्याचीहि टिळकांना प्रथमपासूनची हौस नव्हती, उलट कंटाळाच होता. हौस म्हणण्यापेक्षां राजकीय कर्तव्याचा एक महत्त्वाचा भाग म्हणूनच ते लेख लिहीत. तारुण्याचीं पहिलीं कांहीं वर्षें दुसऱ्या व्यवसायांत गेलीं असतांना व लेखनव्यवसायाची आवडही विशेष नसतांना, कार्यनिष्ठा व वाटेल ती गोष्ट हातांत घेतली तर करीन अशी कर्तबगारी व प्रभावशाली बुद्धिमत्ता त्यांचे अंगीं होती; म्हणूनच त्यांनीं असें स्फूर्तिदायक वाङ्मय निर्माण केलें. लेख लिहितांना भाषा सजविण्याची अगर रंगविण्याची खटपट त्यांनीं कधींच केलीं नाहीं. त्यांचा कोणताही लेख वाचतांना, आपल्या मनांतील आशय किंवा स्फूर्तिदायक संदेश वाचकांचे अन्तःकरणांत जाऊन भिनावा अशा तऱ्हेची त्यांची स्वाभाविक कळकळ दिसून येते. या कळकळीमुळें येणारा साहजिक जोरदारपणा सडेतोडपणा व उत्कटपणा हाच त्यांच्या भाषेचा अलंकार. टिळकांचे हे लेख जो तादात्म्यबुद्धीनें वाचील त्याच्या मनःचक्षुपुढें टेबलावर बसून हातांत लेखणी घेऊन लिहीत असलेली टिळकांची मूर्ति दिसणार नाहीं. तर उभे राहून मोठ्या आवाजांत, महत्त्वाच्या शब्दांवर जोर देऊन बोलणारी टिळकांची मूर्तीच दिसेल. बहुतेक लेखकांच्या लेखांत त्यांच्या लेखणीची कुशलता हीच विशेष दिसून येते. टिळकांच्या लेखांचें तसें नसून त्यांत अंतःकरणापासून निघालेल्या व अंतःकरणास जाऊन भिडणाऱ्या सहजस्फूर्त ओजस्वी वाणीचा ओघच दिसून येतो. आणि हें टिळकांचें अंतःकरण, अनेक आघात व संकटें सहन करीत असतां आरंभापासून अखेरपर्यंत सारखेंच कणखर व स्फूर्तिमय राहिलें हीच टिळकांची अलौकिकता.

निरनिराळ्या प्रसंगीं आपल्या विशिष्ट राजकीय तत्त्वज्ञानास अनुसरून लोकांचीं मतें तयार करणें हाच त्यांचे मतें वर्तमानपत्रांचा उपयोग होता. "कोळसा उजळला तरी काळाच" या प्रेस-ॲक्टसंबंधींच्या या तिसऱ्या खंडांत आलेल्या अग्रलेखांत (पृ.३५५) टिळक लिहितात "गुळगुळीत कागदावर रंगी-बेरंगी बुळबुळीत मजकूर छापून लोकांचें रंजन करणें हें कांहीं वर्तमानपत्र-कर्त्यांचें मुख्य काम नव्हे ... ...... देशाची राजकीय स्थिति काय, राजकीय दृष्ट्या लोक कोणत्या अवस्थेंत आहेत, त्यांचे हक्क कोणते, राज-कीय दृष्ट्या बाल्यावस्थेंतून निघून प्रौढावस्थेस कसें यावें, किंवा अशा प्रकारच्या प्रगतीस जे विघ्नें आणतात त्यांच्या दोषांचें आविष्करण करून ते दोष दूर करण्यास राष्ट्रानें राजनिष्ठपणानें आणि कायदेशीरपणानें कोणते कोणते उद्योग करावे, हें लोकांस समजावून देण्यासाठीं, त्यांच्या मनांत भरविण्यासाठीं आणि तद्नुरूप उद्योगास त्यांस प्रवृत्त करण्यासाठीं लोकांचे राजकीय शिक्षक म्हणून स्वतंत्र देशांतील वजनदार वर्तमानपत्रें प्रयत्न करीत असतात." वरील उताऱ्यांत टिळकांनीं केसरींतील आपल्या राजकीय लेखांचें मर्मच मांडलें आहे. लोकांचें मत एका विशिष्ट दिशेनें वळविण्यास अर्थातच निरनिराळ्या दृष्टीनें तत्पोषक असे कोटिक्रम व दाखले लोकांच्या पुढें ठेवावे लागतात. त्या प्रमाणें विशिष्ट मताचा पुरस्कार व प्रतिपक्ष्याचे मुद्दे सप्रमाण खोडून काढणें इतकेंच नव्हे तर प्रतिपक्ष उप-हास करीत असेल तर उलट त्याचीहि उपहासास्पदता तितक्याच उत्कट-तेनें निदर्शनास आणणें व जेथें प्रतिपक्ष टीका करीत असेल तेथेंहि उलट टीका करणें या गोष्टीहि क्रमप्राप्तच ठरतात. त्या करतांना टिळकांनीं प्रति-पक्षाची कधींहि गय केली नाहीं किंवा प्रतिपक्षाच्या बाजूनें काय म्हणतां येण्याजोगें आहे याचा विचार मांडला नाहीं. स्वपक्ष व स्वमत पुढें मांडतांना ते वकिलाच्या भूमिकेवर उभे राहिलेले असत. आणि आपली बाजू मांडणें व दुसऱ्याची बाजू चूक कशी हें दाखविणें येवढेंच काम ते करीत. दोन्ही बाजू सारख्याच अलिप्तपणानें पाहणाऱ्या न्यायाधीशाच्या भूमिकेवर ते सहसा आरूढ होत नसत. मात्र यावरून त्यांना कोणत्याहि प्रश्नाची दुसरी बाजू दिसत नसे असें मात्र नव्हे. कारण ज्यावेळीं न्याया-धीशाप्रमाणें दुसऱ्या बाजूचा विचार पुढें मांडणें स्वपक्षाचे दृष्टीनेंच आव-श्यक ठरे अशा वेळीं ते तीहि समतोलपणें मांडीत हें प्रस्तुत खंडांतील

सुरतेच्या बखेडयानंतर १९०८ सालीं लिहिलेल्या "राजकीय पक्षोपन्यास" इत्यादि लेखांवरून किंवा १९१६ सालीं लिहिलेल्या "बेळगांवची परिषद व समेट" या लेखांवरून दिसून येईल.

असो, लोकमान्यांच्या चाळीस वर्षांच्या राजकीय कामगिरीच्या इतिहासाचीं साधनें या दृष्टीनें लेखांच्या या तीन भागांचें महत्त्व इतिहासांत राहील. या साधनांवरून दिसून येणाऱ्या कांहीं सामान्य गोष्टी वर दिग्दर्शित केल्या आहेत. पण त्याशिवाय इतर अनेक अनुमानें प्रत्येकजण आपापल्या परीनें या लेखसंग्रहांतून काढूं शकेल. टिळकांचें धार्मिक व सामाजिक तत्वज्ञान समजल्याशिवाय त्यांचें राजकीय तत्वज्ञान नीट उलगडणार नाहीं हें देखील या तीन भागांवरून चाणाक्ष वाचकांस कळून येईल व यामुळें पुढें येणाऱ्या धार्मिक व सामाजिक लेखांच्या भागांबद्दल उत्कंठा व जिज्ञासा उत्पन्न करण्यासहि हे तीन भाग कारणीभूत होतील असें आम्हास वाटतें. या तिसऱ्या भागाला जशी तीन भागांचें समालोचन करणारी ही प्रस्तावना जोडली तशीच त्यास तीनही भाग मिळून एक विस्तृत सूचीहि जोडली आहे व टिळकांचा विशिष्ट विषयावरील लेख अगर विचार हा तीन भागांपैकीं कोणत्या भागांत व कोणत्या पानांत आहे हें चटकन हुडकून काढण्यास या सूचीचा चांगला उपयोग होईल.

लोकमान्य टिळकांनीं हिंदी राष्ट्रावर व विशेषतः महाराष्ट्रावर जो एक विशिष्ट तत्वज्ञानाचा अगर विचारसरणीचा छाप वठविला तो उखडून धुवून, सारवून अगर विद्रूप करून टाकण्याचें प्रयत्न दुर्दैवानें आज अनेक दिशेनें चालू आहेत. अशा वेळीं महाराष्ट्रानें तरी लोकमान्यांच्या तत्वज्ञानाविषयीं अमूक तमूक काय म्हणतो असल्या सांगोवांगीवर अवलंबून न राहतां खुद्द लोकमान्यांच्या मूळ लेखांकडेच कोणत्याहि शंकेचे अगर संशयाचे वेळीं वळावें हें उत्तम. राजकीय बाबतींत या तीन भागांनीं जसें एक 'स्वयंनिर्णया'चें साधन निर्माण झालें तसेंच सामाजिक व धार्मिक बाबतींतहि एक साधन आम्ही लवकरच महाराष्ट्रीयांच्या हातीं देऊं अशी आम्हास उमेद आहे.

---

# लो० टिळकांचे केसरींतील लेख

( भाग ४ था )

लो. टिळकांचे केसरींतील लेख पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याचा उपक्रम आम्हीं सुमारें नऊ वर्षांपूर्वी सुरू केला. त्याप्रमाणें प्रथम राजकीय विषयक लेखांचे तीन खंड पुढीलप्रमाणें प्रसिद्ध झाले. खंड १–पृष्ठसंख्या ६९५. खंड दुसरा–६३४ खंड तिसरा–४९२.

त्यानंतर हल्लीं, टिळकांचे केसरींत प्रसिद्ध झालेलेच पण संकीर्ण विषयांवरील लेख हल्लींच्या या चवथ्या खंडांत संग्रहीत करून प्रसिद्ध करण्यांत येत आहेत. यांतील विषय धर्म, समाज, वाङ्मय, शिक्षण, शास्त्र, इतिहास इत्यादि आहेत. केसरीपत्र लो. टिळकांनीं बहुतांशीं राजकारणाला वाहिलेलें असल्यामुळें त्यांत अवांतर विषयावर लेख लिहिण्याचा प्रसंग सहसा येत नसे; व तो आला तरी कोणताहि विषय आपल्या विशेष आवडीचा किंवा विशेष वादग्रस्त होऊन राहिलेला असल्याशिवाय त्यावर मोठे किंवा स्वतंत्र लेख लिहून टिळकांनीं अशा विषयांचा फारसा परामर्ष कधीं घेतला नाहीं. यामुळें अशा अवांतर विषयांवरील त्यांचे सर्व लेख एकाच खंडांत संग्रहित करतां आले. परंतु तेवढ्यावरून अशा विषयासंबंधींही लो. टिळकांची विचारसरणी व भाषाशैली कशी होती हें कोणाहि वाचकास उत्तम प्रकारें कळून येण्यासारखें आहे. सूक्ष्म विवेकाबरोबर निश्चित सिद्धांताची मांडणी, आणि होतां होईल तों कोणत्याहि विषयाला मूलभूत असलेल्या शास्त्राचा व मर्म ताडण्याचा थोडक्यांत प्रयत्न हा गुण या खंडांतील लेखामधून ठळकपणें दिसून येतो.

चालू राजकारण हा बोलूनचालून डोकें तापून किंबहुना तापवूनहि घेण्याचा विषय असें टिळक मानीत यामुळें अशा विषयावरील लेखांत समतोलपणा राखण्याचा त्यांनीं कधीं विशेषसा प्रयत्न केला नाहीं. स्वमत प्रतिपादनाची ज्याला खरी हौस असेल किंवा अशा विषयांत ज्याची भावना तीव्र असेल त्याला समतोलपणा राखतां येणार नाहीं, किंबहुना तो मुद्दाम राखणें हा अशा लेखांचा गुण न होतां दोषच होतो, असें टिळकांना वाटत असे. परंतु शास्त्रीय विषय म्हटला म्हणजे तेथें डोकें शांत कसें

ठेवावें, शास्त्रशुद्ध कसें लिहावें, कोणत्याहि मुद्दयाच्या दोन्ही बाजू कशा पहाव्या, वावगा शब्द कसा टाळावा, केवळ बुद्धि व तर्क यांच्या द्वारानेंच वाचकांच्या अंतरंगांत प्रवेश कसा करावा याची जाणीव टिळकांना, कोणाची त्यांच्याविषयीं एरवी कल्पना होईल त्याहून अधिक होती हें ओरायन, आर्कटिक् होम दि इन् वेदाज् हे त्यांचे इंग्रजी ग्रंथ व गीता-रहस्य हा त्यांचा मराठी ग्रंथ वाचणारास सहज दिसून येईल. हा त्यांचा गुण प्रस्तुत खंडांतील वाङ्मयात्मक लेखांमध्यें स्पष्टच दिसतो. धर्म व समाजसुधारणा यांच्या बाबतींत सर्व जन्मभर ते एका विशिष्ट पक्षाचे प्रतिपक्षी म्हणून लिहिणें व बोलणें हें त्यांना प्राप्त झालें होतें तरी अशा विषयांतहि तात्त्विक चर्चा म्हणून जेथें जेथें उद्भवली तेथें तेथेंहि टिळकांचे उपरिनिर्दिष्ट गुण प्रस्तुत खंडांतील लेखांतून प्रगट झाले आहेत. पूर्वीच्या तीनहि खंडांतील लेखांहून प्रस्तुतच्या खंडांतील लेखांचें वैशिष्ट्य व अपूर्वत्व कोणासहि दिसून येईल. आणि टिळक व राजकारण यांचा अखंड संबंध मराठी वाचकांनीं मनांत जोडून ठेविलेला असल्यामुळें, त्यांनीं पूर्वी विशेष लक्ष्यपूर्वक न वाचलेले किंवा टिळकांच्या राजकीय चळवळीच्या झपा-ट्यांत विसरून गेलेले हे लेख मराठी वाचकांना आतां मोठे कौतुकास्पद वाटतील यांत शंका नाहीं. ते वाचणारांना सामाजिक, धार्मिक विषयांच्या चर्चेत टिळकांची समाजरचनाविषयक तत्त्वें व धोरण काय होतीं हेंहि कळून येण्यासारखें आहे.

प्रस्तुत खंडांतील लेख केसरीच्या फाइलांतून शोधून निवडून काढणें, छाप-खान्याकरितां त्यांची प्रत तयार करविणें वगैरे बाबतींत चि. काशिनाथ नरसिंह केळकर, वाङ्मयविशारद, टिळक विद्यापीठ व चि. महादेव धोंडो विद्वांस एम्. ए. एल्एल्. बी. वकील पुणें यांची सर्वांशीं मदत झाली; व हें काम त्यांनीं निरपेक्ष बुद्धीनें, केसरी-मराठा संस्थेच्या अभिमानानें केलें, याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों.

---

# ३ लो० टिळकांच्या आठवणी व आख्यायिका

( खंड १ ला )

More knowledge may be gained of a man's real character by a short conversation with one of his servants than from a formal and studied narrative, begun with his pedigree and ended with his funeral. —Boswell.

When will man-kind learn that literature is one thing and sworn testimony another ? —Augustine Birrell.

गतवर्षी लो. टिळकांच्या चरित्र ग्रंथाचा पहिला खंड प्रसिद्ध केला त्याच्या प्रस्तावनेंत मीच असें दर्शविलें होतें कीं, माझा हा ग्रंथ अनेक दृष्टींनीं अपूर्ण आहे व चरित्र ग्रंथ लिहिण्याच्या ज्या अनेक पद्धति होऊं शकतात त्यांपैकीं एकाच पद्धतीचा अवलंब मला करितां आला आहे. ही पद्धति म्हणजे प्रकरणवार साधार माहिती देण्याची. पण या पद्धतीचा अंगीकार केल्यामुळें टिळकांचे चरित्रांत घडलेल्या बारीकसारीक फुटकळ गोष्टी किंवा संभाषणें वगैरे मला देतां आलीं नाहींत. अशा गोष्टींना प्रकरणवारींत फारसें स्थान मिळत नाहीं, व कालानुक्रमानें चरित्र लिहिलें गेलें तरी अशा गोष्टी कालनिरपेक्ष असल्यामुळें त्या त्यांत कोंबणें योग्य होत नाहीं. अर्थात् अशा गोष्टींचा समावेश एकाद्या संकीर्ण प्रकरणांत किंवा स्वतंत्र ग्रंथांत करणें अधीक सोयीचें ठरतें. माझा चरित्र ग्रंथ अपुरा म्हणजे १८९९ पर्यंतच असल्यामुळें त्यांत संकीर्ण प्रकरण घालतां आलें नाहीं. आणि याच ग्रंथाचा दुसरा खंड पुढें केव्हां तरी मी लिहीन अशी मनाला थोडीशी आशा वाटत असल्यामुळें किरकोळ गोष्टींचा वेगळा ग्रंथ तयार करण्याची कल्पना मला सुचणें शक्यच नव्हतें. अर्थात् तो लवकर हवा तर तो लिहिण्याचा प्रयत्न इतर कोणाकडूनच व्हावयास पाहिजे होता; व तशा एका प्रयत्नाचेंच फळ म्हणजे श्री. सदाशिवराव बापट यांनीं तयार केलेला ' लोकमान्यांच्या आठवणी व आख्यायिका 'चा हा संग्रह होय. प्रस्तुत पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याचें मी कबूल केलें त्याचें झालें तरी कारण असें कीं, माझ्या चरित्र ग्रंथाला हा ग्रंथ कांहींसा पुरवणीदाखल आहे,

व जें काम वरील कारणाकरितां मजकडून झालें नाहीं तें काम बापट यांच्या या पुस्तकानें अंशतः पार पाडलें या कृतज्ञताबुद्धीमुळेंच मी ही प्रस्तावना लिहीत आहे.

लोकमान्यांच्या आठवणींना श्रीयुत बापट यांनीं आपल्या 'आत्मनिवेदनांत' अनेक उपमा दिल्या त्या यथार्थ आहेत. या आठवणींना त्यांनीं विस्कळीत माणिकमोत्यें असें एके ठिकाणीं म्हटलें आहे, तर मुख्य चरित्र-ग्रन्थाच्या इमारतीच्या चिरेबंदींत भरलेल्या दरजा असें दुसरे एके ठिकाणीं म्हटलें आहे. पैकीं दुसरी उपमा हीन—वस्तुदर्शक असली तरी अधिक समर्पक आहे असें मला वाटतें. कारण मोत्यांच्या एका सराला दुसरा सर जोडल्यानें अधीक शोभा आली तरी अधीक खंबिरी येत नाहीं. पण दगड—विटांतील दरजा कुशलतेनें भरल्या गेल्या तर इमारतीला शोभा व बळकटी हीं दोनहि लाभतात.

प्रकरणवार लिहिलेला एकादा चरित्र ग्रन्थ वाचून चरित्रविषयाच्या कार्यक्षेत्राची सुसंगत व व्यापक कल्पना येऊं शकेल. पण त्याचा स्वभाव व त्याचे गुणदोष यांची कल्पना आठवणीवजा किरकोळ हकीकती किंवा संवादप्रसंग यांनीं जितकी येऊं शकते तितकी एकादें संपूर्ण प्रकरण वाचल्यानेंहि कदाचित् येऊं शकणार नाहीं. बॉसवेल यानें जॉन्सनचें चरित्र लिहिलें त्याच्या प्रस्तावनेंत असें म्हटलें आहे कीं, "निवळ सार्वजनिक कागदपत्रांवरून तयार केलेल्या चरित्र ग्रंथानें खऱ्या चरित्र ग्रंथाचें कार्य भागत नाहीं, व प्रसंगविशेषीं चरित्रविषयाच्या एकाद्या यःकश्चित् नोकराशीं झालेल्या लहानशा संभाषणानें त्याच्या खऱ्या चारित्र्याविषयीं जें ज्ञान होतें तें इतर माहितीनें पूर्ण व परिश्रमपूर्वक परंतु औपचारिक रीतीनं लिहिलेल्या चरित्र ग्रंथापासून होत नाहीं; मग त्यांत जुन्या वंशावळीपासून खुद्द त्याच्या स्वतःच्या स्मशानयात्रेपर्यंत माहिती का असेना." स्वतः बॉसवेल यानें आपल्या सुप्रसिद्ध चरित्र ग्रंथानें वरील सिद्धान्त सोदाहरण सिद्ध केला आहे असेंच म्हणावें लागतें.

वास्तविक बॉसवेलचें हें चरित्र वाचणारास त्यांतील हकीकतींच्या क्षुद्रपणाचा एकंदरीनें वीट आल्याशिवाय राहत नाहीं. केवढा प्रचंड ग्रंथ, पण त्यांतील पानेंच्या पानें ओलांडावीं तेव्हां कोठें खरोखरच चटकदार

किंवा बोधप्रद किंवा खरी स्वभावदर्शक अशी एकादी गोष्ट किंवा संभाषणांतील वाक्य सांपडतें. परंतु क्षुद्रता व चवळपणा हे दोष असतांही बॉसवेलचा ग्रंथ अखिल आंग्ल वाचकवर्गाला प्रिय व मान्य होऊन बसला आहे. याचें कारण फिरून एक वेळ बॉसवेलच्याच शब्दांत सांगावयाचें तर, असें म्हणतां येईल कीं " Minute particulars are frequently characteristic and always amusing when they relate to a distinguished man. " अर्थात् मोठ्यांचें मोठेंपण हेंच असल्या चिल्लर हकीकतींचा क्षुद्रपणा पचविणारें रसायन होय. इतिहास काय किंवा चरित्र काय, तें कोणाचेंहि कोणीहि लिहिण्याचे व छापण्याचे श्रम घेतले एवढ्याच कारणानें देखील वाचक तें सहज एकवेळ तरी वाचतो. ग्रंथसंग्रहालयांतून एखाद्यानें झडतीच घेतली तर, केवळ ग्रन्थाचें स्वरूप मिळाल्यामुळेंच ज्यांचें चरित्र एक वेळ वाचनीय झालें अशा चरित्रविषयांचीं उदाहरणें अनेक सांपडतील. मग चरित्रविषय लोकोत्तर असेल तर त्याच्या चरित्र ग्रंथांत सर्वसाधारण अशा गोष्टी खपल्या जातील, किंबहुना वाचनीय ठरतील, यांत काय नवल ? जॉन स्टुअर्ट मिल किंवा बेंजामिन फ्रँक्लीन यांनीं आत्मचरित्रें लिहिलीं तीं सर्वमान्य आहेत. तथापि त्यांतील शेंकडों गोष्टी अशा दाखवितां येतील कीं, त्या सामान्य व्यक्तींच्या चरित्रांतहि सांपडूं शकतील. पण मिल व फ्रँक्लीन हे असामान्य पुरुष होऊन गेले, म्हणूनच तद्विषयक सामान्य गोष्टी देखील चित्ताकर्षक वाटूं लागतात. मराठी भाषेंतील प्रो. कर्वे यांचें आत्मचरित्र व कै. श्री. रमाबाईसाहेब रानडे यांचें " आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी " हीं पुस्तकें देखील वरील दोन प्रकारचीं उदाहरणें होत. शिक्षणाप्रीत्यर्थ कर्वे यांना भोगाव्या लागलेल्या अडचणी ज्यांना भोगाव्या लागल्या अशीं सामान्य माणसें किती तरी सांपडतील ! पण तीं माणसें पुढें सामान्य ठरलीं म्हणून त्यांच्या अडचणींचें कौतुक नाहीं, व तीं सामान्य म्हणूनच त्यांच्या अडचणींची सार्वजनिक नोंद कोणी करून ठेवीत नाहीं. पण तेच कर्वे हे अखेर असामान्य कोटीपैकीं ठरले म्हणून त्यांच्या अडचणींच्या आठवणी स्वतः त्यांनीं लिहून काढाव्या असा त्यांना मित्रांनीं आग्रह केला व लोकहि त्या वाचून त्यांचें कौतुक करतात. कै. रमाबाईसाहेब यांच्या पुस्तकांत वर्णिलेलीं नव्या-जुन्या पिढींतील नणंदा-भावजयांचीं भांडणें आपल्या समा-

जांत काय थोडीं पाहण्यास सांपडतील ? तसेंच रमाबाईसाहेबांनीं आपल्या पतींच्या रुसण्या फुगण्याविषयीं ज्या खासगी हकीकती लिहिल्या आहेत तशा हकीकती सामान्य कुटुंबांत किती तरी घडतात. परंतु पति कै. रानड्यांसारखा पुरुष व पत्नी रमाबाईसाहेबांसारखी स्त्री, म्हणूनच त्या रुसव्याफुगव्यांची हकीकत वाचणारांस क्षुद्र वाटत नाहीं, तर कौतुकास्पद वाटते.

कै. रा. ब. सीताराम विश्वनाथ पटर्धन यांची अशी एक गोष्ट सांगतात कीं, लहानपणीं ज्या घरांतील खुंटीवर मधुकरीची झोळी ते अडकवीत असत त्याच खुंटीवर पुढें ए. इन्स्पेक्टर झाल्यावर त्यांनीं आपली जरीची रेशमी पगडी पहिल्या दिवशीं ठेवली, तेव्हां त्यांना आनंदाश्रु आले. ही आख्यायिका पटवर्धन यांचें चरित्र लिहिलें गेलें असतें तर त्यांत अवश्य घालण्यासारखी आहे. वास्तविक आख्यायिकेंतील जरतारी रेशमी पगडी किंवा मधुकरीची झोळी किंवा घरांतील खुंटी यांपैकीं कोणतीच वस्तु अपूर्व नाहीं. सर्वच नित्य परिचयांतील आहेत. परंतु पगडी व झोळी यांचा संबंध खुंटीनें एकत्र आणून, पटवर्धनांची पूर्वीची गरीबी व पुढें दैवयोगानें किंवा पुरुषार्थानें त्यांना लाभलेली श्रीमंती यांचा चमत्कृतिजनक असा संबंध आणून दिल्यामुळें, गरिबीची आठवण व श्रीमंतीचा अनुभव या दोन विजेच्या तारांचा संयोग होतांच कर्तृत्वरूप गुणाची ठिणगी पडून आख्यायिका संग्रहणीय ठरते.

वरील सर्व विवेचन दिसण्यांत क्षुद्र भासणाऱ्या आठवणींपुरतेंच आहे. पण तें मुद्दाम करण्याचें कारण हेंच कीं, प्रस्तुत आठवणींच्या पुस्तकावर एखाद्या विद्वेषी टीकाकाराकडून पहिला व जोरदार आक्षेप यावयाचा तो त्यांतील कित्येक हकीकतींच्या क्षुद्रपणावरूनच हें मी जाणून आहें. ज्या हकीकती तशा क्षुद्र नसतात त्यांचें समर्थन करण्याचें कारण पडत नाहीं. त्या स्वत:प्रमाणेंच असतात. म्हणजे त्या वाचल्याबरोबर कोणीही मनुष्य स्वयंस्फूर्तीनें असे उद्गार काढतो कीं, "हें थोराच्या थोरपणाचेंच लक्षण होय. असलें आचरण सामान्य मनुष्याच्या हातून घडणें नाहीं, असलें भाषण सामान्य मनुष्याच्या तोंडून निघणें नाहीं." असे उद्गार काढण्यास असामान्य अशा दहापांच हकीकती ग्रंथांत असतील तर त्या इतर सामान्य अशा शेंकडों हकीकतींना आपणाबरोबर तारून नेतात. आणि खऱ्या संस्मरणीय व तेजस्वी अशा शेंकडा १०।५ गोष्टी देखील

ज्याच्या संबंधानें सांगतां येणार नाहींत त्याचें चरित्र किंवा त्याच्या आठवणी लिहिण्याछापण्याची स्फूर्ती कोणाला होणार ? प्रस्तुत आठवणींच्या या ग्रंथांतहि सामान्य असामान्य यांचें प्रमाण जवळ जवळ वर सांगितल्यासारखेंच पडेल असें कदाचित् कोणी म्हणतीलहि. वाळल्याबरोबर ओलें जळतें म्हणतात. तसाच थोराबरोबर लहानाचाहि सहज सत्कार होतो, पण त्याबद्दल कोणी नाक मुरडीत नाहीं. परंतु थोरांच्या लहानसहान गोष्टी नुसत्या खपून जातात असेंच केवळ नसून त्या आदरणीयहि कां ठरतात ? याचें उत्तर असें कीं, त्यांच्यामुळें थोर विभूतींचे स्मरणप्रसंग वाढतात म्हणून. थोरांचें स्मरण हें स्फूर्तिदायक असल्यामुळें तें नित्य किंवा निदान जितका अधीक वेळ घडेल तितकें घडावें असें वाटणें स्वाभाविक आहे. ग्रंथांत थोरांच्याहि सर्वच आठवणी पहिल्या प्रतीच्या उत्कृष्ट अलौकिक असतील तर उत्तमच. पण त्या तशा नसल्या तरी दुय्यम दर्जाच्याहि आठवणी यथाशक्ति स्फूर्तिदानाचें काम करतातच. सगुण पूजेचें तत्त्वच आठवणींच्या ग्रंथांच्या मुळाशीं असलेलें दिसून येतें. देवपूजेंतील सामुग्री सामान्य किंमतीचीच असते. परंतु देवपूजेची भावना उत्पन्न करुन देणारें अभिषेकपात्र चार आण्यांचें असलें तरी अंघोळीचें पाणी तापविण्याच्या पन्नास रुपये किमतीच्या बंबापेक्षां तें अधिक पवित्र व जपून ठेवावेंसें वाटतें ! देव धुतल्यावर पुसण्याच्या वस्त्राला एक पैसाहि पडत नाहीं. पण त्याचें धार्मिक महत्त्व स्वतः मालकानें नेसलेल्या जरतारी पीतांबरापेक्षांहि अधीक ठरतें !

मानसिक शास्त्राचा असा नियमच आहे कीं, आपणांस कोणाचेंहि स्मरण होतें तें तत्संबंधीं सगुण रूपाच्या कोणत्या तरी एक किंवा अनेक अंगांनींच होतें, निर्गुण अशी आठवण होऊंच शकत नाहीं. कारण आठवण ही ज्या मूळ ज्ञानसंवेदनेची पुनरुक्ति असते तें ज्ञानहि सगुण म्हणजे बाह्य सृष्टीच्या साधनानें किंवा आधारानेंच झालेलें असतें. या बाबतींत स्मृतिविषय हा महत्त्वाचा किंवा बिनमहत्त्वाचा या भेदानें फरक पडत नाहीं. स्मृतिविषय कमी महत्त्वाचा असल्यास फार तर आपणास त्याची स्मृतिच होणार नाहीं, किंवा झालीच तर कमी वेळां होईल. पण स्मृति झाली म्हणजे मग ती दोनहि विषयांसंबंधानें सारख्याच रीतीनें व्हावी लागते. कोणाहि मनुष्याची आठवण व्हावयाची म्हणजे तत्संबंधीं जी गोष्ट आपल्या अधिक परिचयाची तिचेंच ज्ञान

आपणाला प्रथम आठवतें. परिचित मनुष्यमात्राची आठवण सामान्यतः त्याचें रूप आठवूनच होते. मनुष्यपरिचयांत डोळ्यांचाच उपयोग इतर इंद्रियांपेक्षां अधीक होतो. स्वरूपानंतर त्याचा पोषाक, त्यानंतर त्याची बोलण्याचालण्याची विशेष ढब, त्यानंतर त्याचे सामान्य गुणदोष, व शेवटीं तत्संबंधीं अनुभवाचे विशेष प्रसंग या क्रमानें आठवणी होतात. पण उलट स्वरूप हें प्रथम स्मरणांत न येतां ज्यांची आठवण होते अशा वस्तूंचींहि उदाहरणें देतां येतील. फुलांची आठवण प्रायः वासावरून, पक्ष्यांची आठवण प्रायः त्यांच्या शब्दावरून, व खाद्य पदार्थांची आठवण प्रायः त्यांच्या रुचीवरून होते. केवळ स्पर्शानें ज्यांची आठवण होते अशा पदार्थांचीं उदाहरणें देणें थोडें कठीण आहे, पण देतां येतील. या नियमानुसार, मोठ्या लोकांची आठवण आपणास कशामुळें होते असा प्रश्न मनांत उत्पन्न झाल्यास त्याचें एकच ठराविक असें उत्तर देतां येणार नाहीं. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, थोर लोक त्यांच्या कीर्तिमुळें जितक्या लोकांना माहीत असतात त्यापेक्षां फार थोड्यांना ते प्रत्यक्ष स्वरूपानें माहीत असतात. खुद्द लो. टिळकांचेंच उदाहरण घेतलें तर त्यांची कीर्तिद्वारा माहिती असलेले लोक व त्यांना प्रत्यक्ष पाहिलेले लोक यांचें प्रमाण दरशेंकडा दहा किंवा पांच असें पडेल. अर्थात् उरलेल्या नव्वद किंवा पंचाण्णव लोकांना टिळकांचें स्मरण व्हावयाचें तर तें त्यांच्या स्वरूपद्वारा न होतां त्यांच्या कीर्तीचें ज्ञान ज्या निरनिराळ्या प्रसंगीं झालें असेल त्या प्रसंगांच्या द्वारानेंच होईल. कोणाला आपल्या गांवांत झालेली त्यांच्याविषयींची सभा आठवेल, कोणाला त्यांजविषयीं ऐकलेल्या एकाद्या पदाची आठवण होईल, कोणाला त्यांचें नांव ठेवलेल्या एकाद्या इमारतीवरून आठवण होईल, वगैरे वगैरे. पण टिळकांशीं प्रत्यक्ष परिचय असलेल्या लोकांनाहि त्यांची आठवण त्यांतल्या त्यांत स्वतः त्यांच्याशीं घडलेल्या विशेष प्रकारच्या प्रसंगावरून किंवा अनुभवावरून होणार हें उघड आहे. ज्यांना हें खरें-खोटें पहावयाचें असेल त्यांनीं एकादे वेळीं अवचित पण मुद्दाम टिळकांना स्मरणांत आणण्याचा प्रयत्न करून पहावा, म्हणजे प्रस्तुत ग्रंथांत ज्या प्रकारच्या आठवणी नोंदल्या गेल्या आहेत तशा प्रकारच्या आठवणी त्यांनाहि होतील. आणि आठवण नुसती मनांत होऊन उपयोग नाहीं, तर ती सांगतां किंवा वर्णन करतां आली पाहिजे, असें

म्हटलें तर विशिष्ट प्रसंगाचा उल्लेख केल्याखेरीज भागणारच नाहीं; व तो प्रसंगहि असाच असणार कीं, ज्यांत टिळकांच्या कोणत्या तरी एका गुणानें किंवा दोषानें किंवा लकबेनें आठवण करणाराच्या मनावर इतर प्रसंगां-पेक्षां अधीक खोल असा ठसा उमटला होता. आठवण सहज झाली किंवा मुद्दाम केली तरी तें कार्य वरील नियमांचे द्वारेंच घडून येणार. कारण मानसशास्त्राचें बंधनच तसें आहे.

आपण नेपोलियन याचेंच उदाहरण घेऊं. त्याच्या चरित्रांतील जग-विख्यात गोष्टी या जणुं कांहीं त्याचें स्मरण करण्याला पुरेशा नाहींत असें वाटूनच कीं काय, अनेक चरित्रकारांनीं त्याच्या संभाषणांतील लहानसान वाक्येंहि मोठ्या कौतुकानें संग्रहीत करून ठेवलीं आहेत. शिवाय दुसरे असेहि कित्येक ग्रंथ आहेत कीं, त्यांत नेपोलियनच्या जगविख्यात गोष्टींचा कांहींच उल्लेख नसतां, त्या संबंधीं अगदीं किरकोळ साध्या अशाच गोष्टीच्या म्हणजे आठवणींच्या बखरी त्यांत लिहून काढल्या आहेत. त्यांत नेपो-लियन दिसला कसा, बोलला कसा, त्याच्या अंगावर पोषाक कसा असे, त्याची उठण्याबसण्याची ढब कशी असे, तो काय खाई, काय पिई व तें कसें खाई व कसें पिई, त्याच्या नित्य व नैमित्तिक संवयी काय होत्या, तो कोणाला केव्हां काय बोलला असल्या चिल्लर गोष्टी त्यांनीं लिहून ठेवल्या आहेत. वास्तविक नेपोलियनचें नेपोलियनत्व या एकाहि गोष्टींत नव्हतें. पण तो इतर रीतीनें मोठा ठरलेला असल्यामुळें वरील किरकोळ गोष्टींत देखील त्याच्या अंगचा मोठेपणा संसर्गानें संक्रमित झाला होता अशा बुद्धीनें किंवा भ्रमानें त्या गोष्टी त्यांनीं लिहिल्या आहेत. कित्येक लोकांना अशा क्षुद्र गोष्टींचीं टांचणें करण्याची संवयच असते, त्याप्रमाणें गोरगॉड नांवाच्या नेपोलियनच्या एका परिचारकानें, नेपोलियन सेंट हेलिना येथें असतांना, त्याच्या नित्य क्रमांतील बारीकसारीक गोष्टींच्या रोजनिशांचीं बाडें लिहून ठेवलीं आहेत. पण असंस्कृत बुद्धीच्या या लेखकाच्या या बाडांनीं अत्यंत थोर संस्कृतीच्या व श्रेष्ठ सदभिरुचीच्या चरित्र ग्रंथकारांनाहि गुंग-वून सोडलेलें आढळतें. लॉर्ड रोजबरी यानें नेपोलियनचें अखेरच्या दिव-सांचें चरित्र लिहिलें आहे त्यांत नेपोलियनचीं संभाषणें म्हणून एक स्वतंत्र भागच घातला आहे. या भागांत उल्लेखिलेलीं किंवा टीकाविषय झालेलीं पुष्कळ संभाषणें अशीं आहेत कीं, नेपोलियनपेक्षां फार कमी योग्यतेचा

मनुष्यहि तसलीं वाक्यें बोलता. मात्र तो कमी योग्यतेचा म्हणून त्यांचा कोणी संग्रह केला नसता इतकेंच काय तें. उदाहरणार्थ—

" Every thing is matter, only more or less organised. A man is only a more perfect being than a dog or a tree and living better." किंवा " What is soul ? Where is the soul of a sleeper or of a madman or of a bee ? " किंवा " There is so much that one does not know that one cannot explain." किंवा " War is a strange art and I assure you that I have learnt nothing from all the battles I fought that I did not know in the first. " किंवा " माझ्या मनांत निरनिराळ्या विषयांचे निरनिराळे कप्पे आहेत. जरूर असेल तेव्हां वाटेल तो कप्पा मी उघडूं शकतों " किंवा " माझ्यामध्यें काम करण्याची किती ताकद आहे तिचा मलाच अंत लागलेला नाहीं " वगैरे वाक्यें घेतलीं तर त्यांत तीं एकाद्या नेपोलियनानें उच्चारलीं याशिवाय त्यांत अलौकिक असें काय आहे? पण हीं वाक्यें स्वत: अलौकिक म्हणून कोणी तीं संग्रहीत केलेलीं नाहींत, तर एका अलौकिक मनुष्याच्या तोंडून तीं निघालीं या विशिष्ट विभूतिपूजनाला तीं वाक्यें स्मृतीचें तितकें अधीक सगुण अधिष्ठान मिळवून देतात म्हणूनच.

ज्यांचें चरित्र चमत्कारमय किंवा अद्‌भुत अशा वर्णनीय गोष्टींनीं व चमत्कारांनीं भरलेलें आहे त्याची जर ही गोष्ट तर ज्याच्या चरित्रांत अद्‌भुत गोष्टी घडल्या नाहींत, तथापि जे आपल्या लोकोत्तरपणामुळें संस्मरणीय ठरले, त्यांच्या संबंधीं मिळतील तितक्या आठवणीच्या गोष्टी कोणा चरित्र लेखकानें उकरून काढल्यास काय आश्चर्य? डॉ. जॉनसन हा एक मोठा लेखक होता, परंतु त्याच्या आयुष्यांत अलौकिक अशा गोष्टी फारच थोड्या घडल्या. अर्थात् अशा मनुष्याची स्मृति जाग्रत राहण्याकरितां बॉसवेलसारख्या चरित्रकाराला हजारों बारीकसारीक गोष्टी हुडकून उकरून काढून लिहिण्याचा मोह पडला. आतां त्याला असा मोह पडला यापेक्षां विद्वान व सदभिरुचीचे वाचक अशा पुस्तकाला डोक्यावर घेऊन घेऊन नाचूं लागले हेंच सकृद्दर्शनीं अधिक आश्चर्याचें वाटतें. तथापि डॉक्टर जॉनसनचा मोठेपणा एकदां गृहीत घेतल्यावर

असल्या चिल्लर गोष्टींच्या संग्रहाची व त्याच्या कौतुकाची उपपत्ति आम्हीं वर दर्शविल्याप्रमाणेंच करावी लागेल.

असो; लोकोत्तर चारित्र्याच्या मनुष्यांच्या आठवणीविषयींची अशी उपपत्ति लाविल्यावर दुसरीहि एक गोष्ट त्याबरोबर सांगावी लागते ती ही कीं, अशा आठवणी संग्रहित करून ठेवणें हें जरी समर्थनीय व उपकारक असलें, तरी त्याला कांहीं स्वाभाविक अशा मर्यादा व बंधनें असतात. आणि तीं न ओळखून चालणार नाहीं. पैकीं पहिलें बंधन विश्वसनीय-तेचें व दुसरें औचित्याचें. पहिल्या बंधनासंबंधानें इतकेंच म्हणतों कीं, आठवणी लिहिणारावर फार मोठी जोखीम येऊन पडते. त्याचा लेख हा एक प्रकारचा ऐतिहासिक पुरावा होऊन बसण्याचा संभव असतो. म्हणून त्यानें सर्वस्वी सत्याला स्मरून व इकडचें तिकडे कांहीं न करितां आपली माहिती करड्या टाकानें लिहिली पाहिजे. जेथें आपली स्मरण-शक्तीच दगा देईल किंवा घोटाळा करील तेथें इलाज नाहीं. परंतु एरवीं जें जसें घडलें असेल तें तसेंच लिहिणें श्रेयस्कर असतें. कोणाच्याहि आठवणी लिहिणें त्या पुराव्याच्या शास्त्राच्या मूलतत्त्वाला धरूनच लिहिलेल्या हव्या. आठवण ही, प्रथमत: घडलेली ज्यानें गोष्ट प्रत्यक्ष पाहिली त्यानेंच ती चक्षुर्वैसत्यं म्हणून सांगितलेली असावी. ऐकीव माहिती प्राय: त्याज्यच; निदान तशा प्रकारची आठवणही दुय्यम प्रतीची समजावी. अशा दुय्यम प्रतीच्या आठवणींचा समावेश आख्यायिका या सदराखालीं सहज होऊं शकतो. परंतु आख्यायिकांना इतिहासाचें स्वरूप नसून बखरीचें स्वरूप असतें हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. शिवाय आख्यायिका झाली तरी ती "खुद्द पाहणारानें खुद्द मला सांगितली" येथपर्यंत तरी तिच्या मुळाशीं प्रत्यक्ष संबंध असला पाहिजे. पण या पलीकडे जाऊन सांगोवांगीच्या नात्यांत चुलतपणाच्या जितक्या अधिक चुली येतील तितकी सत्याची राख अधिक झालेली आढळेल. प्रस्तुत पुस्तकांत आख्यायिका म्हणून कांहीं घालण्यांत आलेल्या आहेत, व त्या जरी खोट्या मानण्याला फारसें कारण नाहीं, तरी पुराव्याच्या दृष्टीनें म्हणजे शास्त्रीय सत्यकथनाच्या दृष्टीनें त्या आठवणीपेक्षां गौणच ठरतात.

औचित्याचें बंधन नंबर दोनचें असलें तरी तेंहि फार महत्त्वाचें आहे. मोठ्या मनुष्याचा संबंध आलेल्या पुष्कळशा गोष्टी मोठ्या भासतात हें

जरी खरें, तरी त्यापैकीं कोणत्या सांगाव्या व कोणत्या सांगू नये, हा भेद अर्थात् सूचिकाग्र अशा सूक्ष्म सद्भिरुचीनेंच लक्षांत येण्यासारखा असतो. क्षुद्र हकीकतीसंबंधीं प्रथम ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, मनुष्य कोणी कितीही मोठा असला, तरी तो निर्दोष किंवा निर्व्यंग असा असत नाहीं. आणि Paint me as I am म्हणजे 'मी जसा आहें तशीच हुबेहुब माझी तसबीर काढा' हें म्हणणारानें म्हटलेलें शोभतें तरी चित्र काढणाऱ्याला तें सर्वस्वी मान्य करून चालत नाहीं. या ठिकाणीं स्वतः चित्रविषयापेक्षां चित्रकाराला अधिक सहृदयता व मनाचा नाजुकपणा ठेवावा लागतो. मनुष्याचे दोष किंवा व्यंगें ही झाकलीं जावीं म्हणून प्रत्यक्ष खोटें बोलूं नये हें खरें. पण त्यावर किंचित् पांघरूण घालणें किंवा उदारपणाचा कानाडोळा करणें हें दाक्षिण्यच मानलें जातें. ज्या चिल्लर गोष्टींत दोष नाहींत अशाही पण कित्येक प्रसंगीं उपेक्षणीय ठरतात. रिॲलिझम किंवा यथावस्तुदर्शन हा शब्द झाला तरी तीहि एक कलाच आहे. म्हणजे तिच्यांतहि निसर्गाला कृत्रिमतेची किंवा कौशल्याची किंचित् मुरड घालणें हें प्रेक्षकाला प्रियच वाटतें. थोर व्यक्तींच्या भाषणसंभाषणासंबंधानें तर फारच सावधगिरी ठेवणें जरूर असतें. नेपोलियनचें चरित्र लिहिताना लॉर्ड रोजबरी म्हणतो :—

"It is not wise to record every word that falls from a great man in retirement. The mind which is accustomed to constant activity and which is suddenly deprived of employment is an engine without guidance. The tongue without a purpose is not always under control." पण हे शब्द बंदिवासांतील नेपोलियनला उद्देशून लिहिलेले होते. त्याच्या तोंडून निघणारा प्रत्येक शब्द मौल्यवान मानून तो जपून ठेवण्याकरितां हातांत पाटी-पेन्सिल घेऊन न कळत टपून बसलेले लोक नेपोलियनच्या भोंवती होते. व ही गोष्ट नजरेला आणून "अशांच्या देखतां तुम्ही जपून बोलत जा" अशी नेपोलियनला त्याच्या एक दोन स्नेह्यांनीं नाजूक सूचनाहि केली होती. पण पराक्रमी मनुष्य एकदम बंदिवासाच्या रिकामपणांत पडला म्हणजेच याची जीभ बेसुमार बोलूं लागते असें मात्र नाहीं. तर मोठीं माणसें मोकळीं असतां आवेशाच्या भरांतहि जें न टिपून

ठेवावें असें बोलूं शकतात. यांत बोलणाराकडे कांहीं दोष येतो हें खरें, पण तें बोलणें मुद्दाम टिपून ठेवून कायम करणाराकडे अधिक दोष येतो. आवेशाच्या वाऱ्यानें मोठ्या माणसाच्या भाषणाचें अंग उघडें पडेल तेथें जवळच्या मनुष्यानें जर सहानुभूतीनें पांघरूण घालून लाज राखली नाहीं तर तोच अधिक अपराधी ठरेल. डॉ. जॉनसन याचीं भाषणें शब्दान्शब्द देण्यामध्यें बॉसवेल याची पुष्कळ ठिकाणीं अशीच चूक झाली आहे. ऑगस्टाईन बिरेलं म्हणतो कीं, It is impossible to recognise all Johnson's recorded utterances with any one view of anything. When crossed in conversation or goaded by folly he was capable of anything." सुमारें वीस वर्षांपूर्वीं स्वत: लो० टिळकांनीं या विषयावर एका प्रसंगीं असेच उद्गार काढलेले आहेत. १९०४ सालीं मुंबईस हिंदू युनियन क्लबमध्यें कै० महादेव गोविंद रानडे यांच्या श्राद्धतिथीनिमित्त कै० गणपत रावजी आगाशे यांनीं व्याख्यान दिलें, त्यांत आगाशे यांनीं रानडयांच्या कांहीं आठवणी म्हणून सांगितल्या. त्यांवर त्यांना उद्देशून टिळकांनीं केसरींत खालील टीका केली आहे. "या गोष्टी मुंबईकरांस नव्या असतील, परंतु पुणें शहरांत त्यांस कोणी विशेष महत्त्व देईल असें आम्हांस वाटत नाहीं. लहान मनुष्य काय आणि मोठा काय, प्रसंगविशेषीं निरनिराळ्या प्रकारचे व कधीं कधीं एकमेकांस विरुद्धही विचार प्रदर्शित करीत असतो, परंतु त्यामुळें त्याची तीं मतें कायमचीं होतीं असें समजणें वेडेपणाचें होय! मनुष्याच्या शरीराप्रमाणें त्याचें मनहि नेहमीं उमेदींतच असतें असें नाहीं; त्याच्या मनांत कधीं दु:खाची तर कधीं नाउमेदीची झांक येत असते; व अशाप्रसंगीं त्याच्या तोंडांतून निघालेले उद्गार जर जगापुढें मांडूं लागलें तर त्या मनुष्यास लवकरच मूर्ख बनवितां येईल. शिवाय असेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, आयुष्याच्या हरएक क्षणीं मनुष्य जें बोलतो तें पूर्ण विचारांतीं बोलतो असें नाहीं. इतकेंच नव्हे तर त्याच विषयावर जर सार्वजनिक तऱ्हेनें बोलण्याचा प्रसंग आला तर निराळ्याच तऱ्हेनें तो बोलतो. याकरितां मोठ्या मनुष्याचें चारित्र लिहिणारांनीं किंवा त्याच्या गोष्टी सांगणारांनीं जें लिहिणें किंवा सांगणें तें सारासार विचार पाहून लिहिलें पाहिजे."

पण सत्य व औचित्य या दोन मर्यादा संभाळण्यांत आल्यास, आठवणी व आख्यायिका या चरित्रकथनाचें एक अंग म्हणून अत्यंत उपयुक्त ठरतात. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं निबंधमालेंत 'विनोद व महदाख्यायिका' हें सदर घातलें होतें. त्यांतील मोठ्या लोकांसंबंधाच्या आख्यायिका वाचणारांस त्या किती मनोरंजक असतात किंबहुना स्वभावदर्शनाचा गुण त्यांत किती सांठविलेला असतो हें ध्यानांत येईल. शास्त्रीबोवांनीं ही कल्पना इंग्रजी वाङ्मयावरून घेतली होती. ती कोणत्याहि देशाच्या वाङ्मयाला व थोर पुरुषांना लागू पडण्यासारखी आहे. ॲनेकडोटज कथाकलाप हा समुद्रासारखाच विस्तीर्ण असतो व समुद्रासारखींच त्यांत रत्नें सांपडतात, धड चरित्र ग्रंथ नव्हे धड प्रबंधग्रंथ नव्हे, धड कालानुक्रमवार इतिहास नव्हे अशाहि पुस्तकांचे उत्कृष्ट नमुने असतात. खरे शास्त्री यांनीं प्रसिद्ध केलेली 'हरिवंशांची बखर' हें एक वरील नमुन्याच्या ग्रंथाचें उदाहरण होय! व ज्या ग्रंथाला मी ही प्रस्तावना लिहीत आहें तोहि वरील नमुन्याच्या ग्रंथाचेंच एक उदाहरण होईल. त्यांतील प्रत्येक आठवण हें एक स्वतंत्र चित्र आहे. व कोणाहि चरित्रविषयाची निरनिराळ्या माणसांनीं काढलेलीं जितकीं अधिक चित्रें उपलब्ध होतील तितकें त्याचें चरित्रवर्णन अर्थात् अधिक पूर्ण होईल. एकाद्या मनुष्याचा पुतळा किंवा मूर्ती करावयाची असेल तर त्याला मूर्तिकारापुढें निरनिराळ्या अनेक बाजूंनीं बसावें लागतें, याचें कारण हेंच कीं, कोणत्याहि एका बाजूनें मनुष्याचें जें स्वरूपदर्शन घडतें तें त्याची ढोबळ ओळख पटवून देण्यास पुरेसें असलेंतरी तें एकांगीं म्हणून अपूर्णच असतें. पण पुतळा हा चोहोंबाजूंनीं पाहातात, निदान दिसूं शकतो, म्हणून मूळ मनुष्याला निरनिराळ्या बाजूंनीं पाहिलें असतां तो जसा दिसेल तसा पुतळाहि करावा लागतो. नुसत्या फोटोवरून टिळकांना ज्या अल्पपरिचितांनीं पाहिलें असतें ते टिळकांच्या मागच्या बाजूस उभे असतां त्यांना टिळकांची ओळख पटली नसती. पण टिळकांचा पुतळा ज्यांनीं चारी बाजूंनीं पाहिला असेल त्यांना मागच्या बाजूनेंहि टिळक ओळखतां आले असते. टिळकांचे शेंकडों फोटोग्राफ उपलब्ध आहेत. पण ते निरनिराळ्या बाजूंनीं घेतले असल्यानें प्रत्येकांतील स्वरूप वेगळें दिसतें. आणि त्याच कारणांकरितां त्यांच्या कोणाहि मूर्तिकाराला त्यांचे जितके अधिक फोटोग्राफ मिळतील

तितके हवे असतात. टिळकांच्या जडस्वरूपाची प्रतिमा रक्षण करण्याला ज्याप्रमाणें हे अनेक फोटोग्राफ उपयोगी पडतात, त्याचप्रमाणें त्यांचें समग्र अमूर्त स्वरूप रक्षण करण्याला या किंवा अशा आठवणी व आख्यायिका सहजच उपयोगी पडणाऱ्या आहेत.

आतां कित्येक आठवणींतून नुसतें टिळकांचें चित्र न दिसतां त्याजबरोबर चित्र काढणाराचेंहि स्वरूप दृग्गोचर होतें. पण त्यांचें कारण इतकेंच कीं, त्याठिकाणीं चित्राच्या पश्चात् भूमिकेंत चित्रकार हा स्वतःच उभा असतो. अन्यसंबंधीं टिळकांचे प्रसंग आठवण्यापेक्षां त्याला आत्मसंबंधीं टिळकांचे प्रसंग सहजच अधिक आठवतात व ते त्याला प्रिय म्हणूनच लक्षांत राहतात. एकाद्या मनुष्याचा फोटो त्याला एकट्याला पुढें उभा करून घेतां येतो, परंतु त्याच्या आठवणीचें चित्र काढावयचें तर त्यांत त्याच्याबरोबर दुसऱ्या कोणाचा तरी संबंध येणारच. तीच गोष्ट टिळकांसंबंधीहि खरी आहे. कारण बहुतेक सर्व आठवणी टिळकांच्या लोकसंग्रहात्मक व्यवहारांतील आहेत; व व्यवहार म्हणजे दुसऱ्याचा संबंध आलाच. या व्यवहारांत टिळकांच्या शेंकडों स्नेह्यांनीं व चाहत्यांनीं आपल्या मनाच्या किंवा ज्ञानेंद्रियाच्या कॅमेऱ्यानें जे शेंकडों फोटो घेतले त्यांच्या निगेटिव्ह् कांचा त्यांच्या अंधाऱ्या स्मृति कपाटांत झांकून ठेविल्या गेलेल्या होत्या. आठवणी गोळा करणारानें इतकेंच केलें कीं, त्या त्या लोकांना विनंति करून त्या त्यांजकडून त्यांच्या जवळील निगेटिव्ह् छापवून एक एक प्रत मागविली, व ती प्रत छापून डोळ्यानें पाहणें हें स्वतः त्यांनाहि प्रिय म्हणून त्यांनीं ती मागणाराला दिली. अर्थात् आठवणी व आख्यायिका यांचें बापटकृत हें पुस्तक म्हणजे अशा चित्रांचा संग्रह किंवा फोटोचा आल्बम होय. म्हणूनच त्याला ठराविक प्रारंभ नाहीं, ठराविक अंत नाहीं, ठराविक कालानुक्रम नाहीं, ठराविक संगति नाहीं. चित्रसंग्रहाप्रमाणें तो कोठेंही उघडल्यास त्यांत टिळकांच्या टिळकत्वाच्या अनेक अंगांपैकीं कोणत्या तरी एकाद्या अंगाचें चित्र यदृच्छेनें पहावयास मिळेल. सोडतींतील निरनिराळ्या किंमतीच्या तिकिटाप्रमाणें या पुस्तकांत कोणास त्यांची बुद्धिमत्ता, कोणास त्यांचें धैर्य, कोणास त्यांची देशभक्ती, कोणास त्यांची सूक्ष्म विवेचकशक्ति, कोणास त्यांची लोकसंग्रहेच्छा, कोणास त्यांची लोकप्रियता, कोणास त्यांची विद्वत्ता, कोणास त्यांचे मित्रवात्सल्य,

कोणास त्यांची धार्मिक बुद्धि, कोणास त्यांचें व्यवहारचातुर्य दर्शविणारें चित्र लाभेल. किंवा प्रस्तुत पुस्तक हें टिळकभक्तांना एक प्रकारची शकुनवंतीच होईल. फरक इतकाच कीं, शकुनवंतींत एकादे प्रसंगीं अनिष्ट वचन किंवा दुर्भाग्यचिन्ह निघूं शकतें, पण टिळकांच्या आठवणींची ही शकुनवंती उघडणारास त्याच्या मनाला ज्याच्या योगानें सत्स्फूर्ती मिळेल असेंच कांहीं तरी निघेल यांत शंका नाहीं.

---

## ४ लो० टिळकांचीं धर्मविषयक मतें

( टिळक स्मारक ग्रंथ-माला–पुस्तक १ लें. )

लोकमान्यांविषयीं उत्तम निबंध लिहिणारास बक्षिस देण्याकरितां म्हणून रत्नागिरी येथील एका भगिनीनें १२५ रु. रक्कम १९२४च्या एप्रिलमध्यें मजकडे पाठवून दिली. निबंधाच्या विषयाबद्दल या भगिनीनें, स्वतः कांहीं सूचना न करितां, तो टरविण्याचें काम मजकडेच सोंपविलें होतें. लोकमान्यांच्या राजकारणविषयक मतांची चर्चा आजपर्यंत पुष्कळ झालेली आहे व पुढेंहि प्रसंगानुसार ती होत राहणार. तेव्हां 'लोकमान्यांची धर्मबुद्धि व धर्मविषयक मतें' या विषयावर साधार व सप्रमाण असा व केसरीचे निदान १० रकाने भरतील इतका मोठा निबंध मागविण्याचें मीं ठरविलें. असें ठरविण्यांत, एक तर बक्षिस रक्कम देणाऱ्या व्यक्तीची धार्मिक भावना व लोकमान्यांविषयींची पूज्यबुद्धि यांस अनुरूप असाच हा विषय होईल, असा एक विचार होताच, पण शिवाय या विषयासंबंधानें लोकांत अनेक गैरसमज व भिन्न भिन्न कल्पना प्रचलीत आहेत तेव्हां यासंबंधीं लोकांना साधार व सप्रमाण असें विवेचन वाचावयास मिळालें तर फार चांगलें होईल असाहि एक विचार होता.

धार्मिकपणा म्हणजे काय यासंबंधीं आपल्या जुन्या ठरून गेलेल्या कांहीं कल्पना आहेत. त्या दृष्टीनें पाहूं गेल्यास लोकमान्य धार्मिकतेच्या कसोटीस पूर्णपणें उतरणार नाहींत. जुना आचारधर्म यथासांग पाळणें हीच खरी धार्मिकता होय, असली कर्मठपणाची दृष्टि स्वीकारून लोकमान्यांना नास्तिक किंवा धर्मलंड ठरविणारे कांहीं जुने लोक अजूनहि

समाजांत वावरत आहेत. उलट सामाजिक सुधारणेच्या वादांत त्यांनीं पुराणमताभिमान्यांची बाजू उचलल्यामुळें सुधारक लोक त्यांना कट्टे पुराणमतवादी किंवा 'ऑर्थोडॉक्स' ठरवितात, आणि नीतिधर्माच्या दृष्टीनें विचार करणारे लोक त्यांच्या नैतिक शुद्धतेमुळें व स्वार्थत्यागपूर्वक कर्मयोगाच्या आचरणामुळें त्यांना आधुनिक काळांतले एक महान् संत समजतात. त्यांच्या आयुष्यांत त्यांना ठिकठिकाणीं एखाद्या धार्मिक संताप्रमाणें लोक मान देत असत आणि त्यांच्या मूर्तींची पूजा करणें, स्तोत्रें गाणें, आरती करणें, नवस करणें इत्यादि सर्व साधूंच्या बाबतींत होणारे शुद्ध भाविकपणाचे प्रकार त्यांच्या आयुष्यांत घडून आले व अजूनहि कित्येक ठिकाणीं चालू आहेत.

आमच्या मतें या निरनिराळ्या कसोट्यांपैकीं नीतिधर्माची कसोटीच श्रेष्ठ मानली पाहिजे. लोकमान्य सर्वच जुने आचारधर्म अगदीं कडकपणें पाळीत नसले तरी, ते पाळणाऱ्या लोकांबद्दल त्यांस अत्यंत आदर वाटे. जुन्या सरकारांत, परंपरेंत व आचारधर्मांत कालानुरूप सुधारणा व्हावी असें त्यांचें मत असलें तरी जुनी परंपरा शक्य तोंवर राखली पाहिजे व तिचा अभिमान बाळगला पाहिजे असेंच त्यांचें मत होतें. त्यांची आस्तिक्यबुद्धि आरंभापासून अखेरपर्यंत जाज्वल्य होती आणि तिच्या जोरावरच ते प्रचंड लोककार्य करूं शकले व संकटांतून उत्तीर्ण झाले. त्याचप्रमाणें नैतिक आचारशुद्धतेच्या बाबतींतहि त्यांचें आचरण नमुनेदार व सर्वांना कित्ता घेण्यासारखें होतें, आणि 'तुका म्हणे तोचि संत। सोशी जगाचे आघात' या अनुभविक वचनाप्रमाणें त्यांनीं लोकांकरितां तुरुंगवासादि अनेक कष्ट सोसले. या सर्व गोष्टींवरून त्यांना संत किंवा विभूति मानण्याची प्रवृत्ति लोकांत उत्पन्न झाली व या विशिष्ट दृष्टीनें ती सर्वस्वी योग्य अशीच होती.

लोकांपुढें संदिग्ध स्वरूपांत असलेल्या या महत्वाच्या विषयाची साधार व सप्रमाण चर्चा व्हावी या हेतूनें ता. २९ एप्रिलच्या केसरींत जाहीर रीतीनें निबंध मागविले. लोकमान्यांच्या पुण्यतिथीला बक्षिसाचा निकाल जाहीर होऊन उत्तम ठरलेला निबंध केसरींत प्रसिद्ध व्हावा अशा बेतानें ता. ३० जूनचे आंत निबंध मागितले, व त्याप्रमाणें एकंदर १६ निबंध आले. या विषयावर इतक्या अल्पावधींत इतके निबंध येतील अशी

अपेक्षा निदान आम्हीं तरी केली नव्हती. निबंधांचें परीक्षण करण्या-करितां प्रो. करमरकर, वे. शा. सं. सदाशिवशास्त्री भिडे, श्री. वामन मोरेश्वर पोतदार व ग. वि. केतकर यांची कमीटी नेमण्यांत आली व कमीटीनें दिलेला निकाल ता. २२ जुलैच्या केसरींत प्रसिद्ध करण्यांत आला. परीक्षकांनीं या सोळा निबंधांपैकीं एकंदर सहा निबंध उत्तम ठरवून त्यांपैकीं पहिल्या दोन निबंधांस अनुक्रमें ७५ रु. व ५० रु. याप्रमाणें १२५ चें बक्षीस विभागून द्यावें असें ठरविलें. या निबंध-लेखकांचीं नांवें अनु-क्रमें पुढीलप्रमाणें:—( १ ) प्रभाकर वासुदेव बापट बी. ए. पुणें. ( २ ) गणेश सदाशिव आळतेकर एम्. ए. एल्‌एल्. बी. कऱ्हाड. ( ३ ) श्रीनिवास नारायण बनहट्टी एम्. ए. पुणें. ( ४ ) शंकर दामोदर पेंडसे एम्. ए. एम्. ओ. एल्. पुणें. ( ५ ) श्रीपाद शंकर नवरे बी. ए. प्राज्ञ-पाठशाळा वाई. ( ६ ) काशिनाथ रघुनाथ वैशंपायन, शिक्षक टिळक विद्यालय, येवलें.

याच वेळीं टिळक-स्वराज्यसंघ-स्मारकाच्या ट्रस्टींची सभा होती. ट्रस्टच्या उद्देशांत टिळकांच्या तत्वज्ञानाचा प्रसार हा एक असल्यामुळें परीक्षक कमीटीनें हे निबंध छापून काढण्याबद्दल ट्रस्टला विनंति केली व त्याप्रमाणें ता. २२ जुलै १९२४ ला झालेल्या सभेंत ट्रस्टनें या कामा-करितां ५०० रु. मंजूर केले. अशा रीतीनें स्वतंत्रपणें निबंध छापून निघ-ण्याचीच व्यवस्था झाल्यामुळें ते केसरींत छापले नाहींत. सहाहि निबंध छापून काढण्याची शिफारस कमीटीनें केली याचें कारण असें कीं, प्रत्येक निबंधांत कांहींतरी वैशिष्ट्य आहे. उदाहरणार्थ बापट यांच्या निबंधांत टिळ-कांच्या धार्मिक मतांचा ऐतिहासिक दृष्ट्या विचार केला आहे, श्री. आळ-तेकर यांनीं टिळकांच्याच विचार सरणीस पोषक अशीं कांहीं नवीं प्रमाणें दिलीं आहेत, बनहट्टी यांची भाषासरणी सर्वोत्कृष्ट असून त्यांत जुनी शास्त्रीय दृष्टि ठेवलेली आहे, श्री. पेंडसे यांनीं बौद्ध मीमांसक व शंकरा-चार्य यांच्या दृष्टीनें टिळकांचें धार्मिक इतिहासांतील महत्त्व चांगलें दाखविलें आहे, श्री. नवरे यांची चिकित्सकबुद्धि व वैशंपायन यांची भावनाप्रधान विवेचनपद्धति यामुळें त्यांचेहि निबंध वाचनीय आहेत. यांत विषय एकच असल्यामुळें कांहीं गोष्टींची पुनरुक्ति होणें अपरिहार्य असलें तरी प्रत्येकाची विवेचनपद्धति व मांडणी निराळी असल्यामुळें त्यांचा कंटाळा येत नाहीं.

विशेष अभिमानाची गोष्ट ही कीं, हे साहाहि निबंधलेखक वयानें तरुण आहेत. धर्माचा अभ्यास तरुण लोकांनीं अवश्य केला पाहिजे; अशी इच्छा लोकमान्यांनीं गीतारहस्याचे प्रस्तावनेंत प्रदर्शित केली आहे; त्याचा परिणाम महाराष्ट्रीय तरुणांचे मनावर होत आहे असें यावरून अनुमान करण्यास हरकत नाहीं. या पुस्तकांचा आकार आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या चरित्र, आठवणी व लेखसंग्रह या टिळकविषयक ग्रंथां-प्रमाणेंच ठेविला आहे. आठवणींच्या पुस्तकांप्रमाणेंच या निबंधांचाहि चरित्र—लेखकांस पुष्कळ उपयोग होण्यासारखा असून, टिळकांचें हें एक धार्मिक चरित्रच आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

---

## ९ अरविंद बाबूंचीं आपल्या पत्नीस पत्रें

सा. न. वि. वि.

श्री. अरविंद घोष यांनीं १९०५ व १९०७ सालीं आपल्या पत्नीस लिहिलेलीं पत्रें आपण मूळ बंगालीवरून मराठी वाचकांकरितां प्रसिद्ध करीत आहां ही फार चांगली गोष्ट आहे. त्या पत्रांतून निघणारा निराशा-वाद अरविंद बाबूंच्या पुढील चरित्रक्रमावरून मनाला अधिकच दुःखद वाटतो; व अखेर त्यांची पत्नी विरहदुःखानें मरण पावली ही गोष्ट लक्षांत आली म्हणजे त्यांनीं आपल्या वैवाहिक सुखासंबंधानें केलेला भविष्यवाद दारुण खराच, तरी पण बिनचुक होता हें सहज दिसून येतें. सौ. मृणालिनीदेवी यांच्याप्रमाणें देशकार्याकरितां संसारसुखावर पाणी सोडलेल्या अनेक हिंदी तरुणांच्या स्त्रिया आजहि दुःखाग्नींत होर-पळत आहेत, व त्यांच्या पतींनीं आपल्या पत्नींच्या सुखाकडे न पाहतां स्वैरपणाचा दुसऱ्यास दुःख देणारा वेडेपणाचा स्वार्थत्याग केला, तसा करण्यास त्यांना अधिकार नव्हता, अशा अर्थानें तोंडांतून काढलेले निषे-धाचे उद्गार त्या स्त्रियांच्या कानीं जात असतील. पण अरविंद बाबूंचीं हीं पत्रें वाचलीं असतां आपल्या पत्नीवरील ममतेपेक्षां आपल्या देश-भक्तीस अधिक मान देणारे पति मनानें केवळ निष्ठूर असतात असें म्हणण्यापेक्षां त्यांचें चरित्र लोकोत्तर असतें अशी खात्री वाटून त्या भूष-

णाकरितां आपलें स्वतःचें दुःख विसरण्यास त्या तयार होतील असें वाटतें. अरविंद बाबू पत्रांत स्वतःस वेडे म्हणवून घेतात. पण जगाच्या इतिहासांत जितक्या नव्या व स्फूर्तिदायक कल्पना जन्मास आल्या, तितक्या बहुतेक धोपट मार्गानें जाणाऱ्या लोकांपेक्षां अशा लोकोत्तर वेडयांच्याच डोक्यांतून निघाल्या ही गोष्ट विसरतां येत नाहीं. कार्याची निवड करणें हा पुरुषाचा अधिकार व त्यांत त्याला साह्य देणें हा स्त्रीचा अधिकार असे दोहोंचे अधिकार वांटलेले आहेत. अरविंद बाबूंना आपल्या ब्रह्मतेजाच्या अंगीकृत कार्यास आपल्या हयातींत सिद्धि मिळणार नाहीं अशी जाणीव होती. त्यांच्या पत्नीलाहि आपल्या पतीचें वेड आपणास या जन्मांत घालवितां येणार नाहीं अशी जाणीव होती. दोघांनाहि परस्परांविषयीं प्रेममूलक दुःख होत होतें. पण अखेर दोघांनीहि आपाआपल्या उदात्त भावनांस स्मरून जन्म घालविला. हें उदाहरण हिंदुस्थानच्या राष्ट्रीय चरित्रांत आदर्शभूत होऊन बसेल यांत शंका नाहीं.

आपण पुस्तकाचें रूप देणार तीं पत्रें थोडीं व लहानच आहेत. पण कालांतरानें तें एक प्रकारचें ऐतिहासिक वाङ्मयच मानलें जाईल असें मला वाटतें. कळावें.

---

## ६ सिंहाला शाह

कांहीं कांहीं लेखक मराठी वाङ्मयांत नवीं खातीं उघडतात. रा. टिकेकर यांची कामगिरी तशाच प्रकारची आहे. त्यांनीं उघडलेलें खातें म्हणजे राजकीय प्रवासवृत्त हें होय. मराठी भाषेंत पूर्वीचीं प्रवासवृत्तें मुळींच नाहींत असें नाहीं. काशीयात्रेचें वर्णन, काश्मीर वर्णन, युरोपचा प्रवास वगैरे विषयांवर कांहीं पुस्तकें ग्रंथसंग्रहालयांतून आढळतात व त्यांतील कित्येक मनोरंजक व बोधप्रदहि आहेत. तथापि तीर्थक्षेत्रें काय किंवा काश्मीर काय, हीं हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांतच. तीर्थयात्रांचीं वर्णनें कित्येकांनीं भाविकपणें केलीं आहेत तर कित्येकांनीं थोडयाशा कुत्सित बुद्धीनेंहि केलीं आहेत.

काश्मीरच्या वर्णनांत सृष्टिसौंदर्यापलीकडे कशावरहि लक्ष गेलेलें आढळत नाहीं. युरोपखंड हें मात्र असें आहे कीं, तिकडे प्रवास करून आलेल्या माणसाला त्याचा नाइलाज असतांहि इतक्या नव्या गोष्टी पहावयास सांपडतात कीं, त्याची दृष्टि आपोआप विस्तृत झाल्याशिवाय राहातच नाहीं. पण तिकडील प्रवासवर्णनांतून राजकीय दृष्टि क्वचितच आढळते. हल्लीं पं. जवाहिरलाल नेहरू यांनीं 'सेव्हिएट रशिया' नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. किंवा २–३ वर्षांपूर्वीं शौकत उस्मानी यांनीं 'पेशावर पासून मॉस्को' पर्यंतच्या आपल्या प्रवासाचें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. हीं दोनच पुस्तकें काय तीं राजकीयदृष्ट्या लिहिलीं आहेत असें म्हणतां येईल. हीं दोन्ही पुस्तकें इंग्रजी भाषेंत लिहिलेलीं आहेत व या दोन्हीपैकीं दुसऱ्याचें भाषांतर झालें असून पहिल्याचें होत आहे. परंतु त्यांच्या मराठी लेखकांना भाषांतरें करण्याशिवाय अधिक श्रेय देतां येत नाहीं.

अशा पुस्तकांशिवाय एक वेगळें पुस्तक मराठी वाचकांना चांगलेंच परिचित आहे. तें म्हटलें म्हणजे वर्सईकर गोडसे भटजी यांनीं ५० वर्षांपूर्वीं लिहिलेलें व रा. चिं. वि. वैद्य यांनीं छापविलेलें 'माझा प्रवास' हें होय. या पुस्तकाचें नांव उघड उघड प्रवासविषयासारखें असतां, आंतील हकीकत व वर्णनें हीं १८५७ सालच्या बंडासंबंधीं व खरोखरच चांगलीं ऐतिहासिक स्वरूपाचीं आहेत. ज्या काळांत हें पुस्तक प्रसिद्ध झालें तो काळ धामधुमीचा नसता तर, रा. वैद्य यांनीं त्याला 'माझा प्रवास' असें निर्गुण नांव न देतां, उत्तर हिंदुस्थानांतील बंडाची धामधूम असें यथार्थ नांव दिलें असतें. तें कसेंहि असो. पण येथें सांगण्याचा मुद्दा हा कीं, सदर भटजींनीं दिलेली हकीकत वास्तविक बंडाची म्हणजे राजकीय असली तरी बिचाऱ्या भटजींच्या मनांत राजकारणाचा लेशहि नव्हता. नाहीं म्हणावयाला झांशीकरीण राणी लक्ष्मीबाई यांच्यासंबंधीं जो मजकुर त्यांनीं लिहिला आहे त्यांत मात्र राष्ट्रीय अभिमान खरोखरच दिसून येतो. पण भटजी मूळ निघाले यज्ञाची दक्षिणा घेण्याला, पण परिस्थितीनें त्यांच्या गळ्यांत प्रवासी बातमीदाराचें काम बांधलें. त्याचाच छाप पुस्तकावर दिसून येतो.

परंतु या सर्वांहून वेगळें असें रा. टिकेकर यांचें पुस्तक होय. तें

पुस्तक कोणत्या हेतूनें लिहिलें गेलें आहे याची मुळापासून पूर्ण माहिती मला असल्या कारणानें, मला हें निश्चितपणें सांगतां येतें कीं, या पुस्तकाचा हेतू वर्णनापेक्षां राजकीय विवेचनाचाच अधिक आहे. व या पुस्तकाला 'अफगाणिस्थानाचें वर्णन' असें चित्ताकर्षक नांव सहज देतां आलें असतें. तें न देतां, 'सिंहाला शह' असें आंतरराष्ट्रीय राजकारण-निदर्शक नांव रा. टिकेकर यांनीं दिलें. गेल्या वर्षी रा. टिकेकर हे प्रथमतः अफगाणिस्थानांत प्रवासास निघाले ते केवळ अफगाणिस्थान पाहण्याकरितां नव्हे, तर अफगाणिस्थानांतील परिस्थिति किंबहुना अफगाणिस्थान पलीकडील आम्हाला अदृश्य अशा स्थितींत चाललेल्या पूर्व-पश्चिम राष्ट्रांतील द्वंद्वाची खरी माहिती समजून घेण्याकरितां. सन १९२८ च्या आक्टोबरांत रा. टिकेकर हे मजकडे आले व म्हणूं लागले कीं, 'अफगाणिस्थानांतील परिस्थितीचा अभ्यास करण्यासाठीं तिकडे जाण्याची माझी इच्छा आहे. तसेंच काबूल येथें पुढील महिन्यांत पौर्वात्य राष्ट्रसंघाची ( एशियाटिक लीग ऑफ नेशन्स ) बैठक भरणार आहे.' तिला जमल्यास हजर राहून व ती हकीकत समक्ष पाहून इकडे आपल्या लोकांस कळवावी अशी माझी इच्छा आहे.' अर्थात् कल्पना फारच उमदी होती. पण 'तिला प्रथमच अडचण पासपोर्टाची पडणार' असें मीं त्यांस म्हणालों. तथापि कांहीं कां होईना पासपोर्ट मागून तर पाहावें असें त्यांनीं ठरविलें. पुढें लवकरच अशी बातमी प्रसिद्ध झाली कीं, काबूल येथें भरणारी परिषद् भरत नाहीं. यामुळें रा. टिकेकर यांचा पुष्कळच विरस झाला. तथापि ही परिषद् भरलेली पहावयास सांपडली असतां, ज्या पुष्कळ गोष्टींचा लाभ झाला असता, त्यांतील कांहीं थोड्यातरी नुसत्या अफगाणिस्थानची सफर केल्यानें लाभतीलच, असा विचार करून त्यांनीं काबूलला जाण्याचा पासपोर्ट मागितला; व सुदैवानें तो मिळालाहि. परंतु इतक्यांत पुनः दुर्दैव आडवें आलें. तें असें कीं, खुद्द काबूल येथें बंड होऊन अमीर अमानुल्ला याला राज्यत्याग करावा लागला. रा. टिकेकर तिकडे निघण्याची वेळ, ही ह्या बंडाची केवळ प्रस्तावनाच होती. तथापि वाहतुकीचा मार्गच बंद झाल्यावर, कोणालाहि पासपोर्टावर स्वार होऊन थोडेंच देशांतराला जातां येतें ? प्रथम एशियाटीक लीगच्या अधिवेशनाची बातमीपत्रें रा. टिकेकर यांनीं केसरीकडे पाठवावीं असें ठरलें होतें. पण तें फेडरेशन बंद पडल्यानें ज्या प्रमाणें

केसरीची निराशा झाली, त्याचप्रमाणें फेडरेशनचीं नाहीं तरी पण निदान अफगाणिस्थानचीं तरी बातमीपत्रें केसरींत घालतां येतील अशी नवी उमेद मला आली होती. पण काबूल येथील बंडानें तीहि फुकट गेली. तथापि रा. टिकेकर यांचा निश्चय अढळ असल्यानें त्यांनीं अशी नवी कल्पना सुचविली कीं, अफगाणिस्थान नाहीं तर पेशावरहून कराचीवरून मेसापोटेमियामध्यें जावें व नंतर जमेल त्याप्रमाणें इराण वगैरे देशांत सफर करावी. त्यांच्या या दृढनिश्चयाचें मला कौतुक तर वाटलेंच. पण शिवाय असेंहि वाटलें कीं, जें राजकारण अफगाणिस्थानांत आज रंगत आहे तत्सदृश राजकारण आज मेसापोटेमियांत तरी कोठें नाहीं? ब्रिटिश साम्राज्याच्या उपसर्गानें अफगाणिस्थान, हिंदुस्थान, मेसापोटेमिया, व इराण हे सर्व देश कमीअधिक प्रमाणानें समदुःखी आहेत. किंबहुना अफगाणिस्थान हा देश हद्दीला हद्द लागून असला तरी हिंदुस्थानला राजकारणांत जितका जवळ, त्यापेक्षां साम्राज्याच्या धोरणाचा बोध घेण्याच्या दृष्टीनें दूरचा मेसापोटेमिया हा अधिक जवळ असेंच मानावें लागेल. अर्थात् रा. टिकेकर यांच्या सूचनेला संमति देण्यासारखी होती. पहिल्या तोंडीं उमेद खचलेली, हिंवाळ्याला नुकताच प्रारंभ झालेला, त्या परक्या देशांतील भाषा व चालीरीती यांचें पूर्ण अज्ञान, असें असतां, रा. टिकेकर यांनीं या परदेशांतील प्रवासाचा आपला हेतू अखेर सिद्धीस नेला व तिकडे गेल्यावर त्यांनीं काय पाहिलें, कसें पाहिलें, व इकडील लोकांस तें सर्व कसें समजाविलें हें त्यांचीं केसरींतील प्रवासविषयक पत्रें ज्यांनीं वाचलीं असतील त्यांना निराळें सांगण्याचें कारण नाहीं. केसरीच्या वाचकांना देतां न आलें तरी निदान स्वतः केसरीच्या संपादकाला तरी हिंदुस्थानच्या सरहद्दीपलीकडील वस्तुस्थिति कळलेली असावी, या हेतूनें लो. टिळकांनीं कांहीं गृहस्थांना पूर्वी नेपाळ, काश्मीर, अफगाणिस्थान वगैरे देशांकडे जाण्याला मदत केली होती. पण एक तर तो काळ थोडासा विपरीत असल्यामुळें या प्रवाशांच्या ज्ञानाचा लाभ केसरीच्या वाचकांना करून घेतां आला नाहीं. पण याहून महत्त्वाची गोष्ट अशी कीं, थोडेंसें धाडस करून परदेशांत मनुष्य हिंडून आला तरी त्याला कसें लिहावें व इकडे काय कळवावें याची जाणीव असत नाहीं. किंबहुना अशा प्रवाशांपैकीं एकानें लिहिलेलें नेपाळच्या वर्णनाचें हस्तलिखित आमच्या संग्रहीं आहे. आणि म्हणूनच तुलना-

त्मक दृष्टीनें रा. टिकेकर यांच्या केसरींतील पत्रांचें व त्यांच्या पुस्तकांचें महत्त्व आम्ही विशेष मानतों. त्यांच्या पत्रांतील विषय सर्वच नवीन. त्यांतील कांहीं इंग्रजी पुस्तकांतून वाचावयास मिळण्यासारखे आहेत. तथापि पुस्तकावरून होणाऱ्या ज्ञानाचें संवेदन वेगळें व समक्ष जाऊन हिंडून-फिरून पहात असतां, प्रवाशानें लिहिलेली हकीकत वाचून होणारें संवेदन कांहीं वेगळेंच होय. मला अशी गोष्ट आठवते कीं, सुमारें ४०–४५ वर्षांपूर्वी एखादा विलायतेहून जाऊन आलेला मनुष्य पाहिला कीं, त्याच्या तोंडाकडे इतरांची नजर अशी कांहीं खिळून बसे कीं, जणूं काय त्यानें पाहिलेले परदेश व लोकस्थिति यांचें चित्र किंवा नकाशा त्याच्या तोंडावर उमटलेला आहे. अर्थात् हें कुतूहल भ्रमात्मक होय. त्यापासून मूक आश्चर्याशिवाय दुसरा कांहींच लाभ नाहीं. परंतु रा. टिकेकर यांच्या पत्रांतून वर्णनाचा जिवंतपणा इतका होता कीं, तीं वाचणाराला आपण त्यांच्याच बरोबर त्या त्या देशांतून प्रवास करीत आहों असें वाटे. आणि दर आठवड्यास त्यांचें पत्र वाचावयास मिळेल काय अशा आतुरतेनें लोक वाट पहात, असें पुष्कळांनीं मला सांगितलें आहे. असो.

प्रस्तुत पुस्तक अफगाणिस्थानासंबंधींचें आहे. वास्तविक पाहूं गेलें असतां अफगाणिस्थानासंबंधींचें वाङ्मय आमच्याकडेच पुष्कळ निर्माण व्हावयास पाहिजे आहे. अफगाणिस्थानचा व आमचा संबंध आज कालचा नव्हे. ब्रिटिश नाविकांना हिंदुस्थानचा सुगावा लागण्यापूर्वी शेकडों वर्षें आमचा व अफगाणांचा झगडा सुरू होता. अफगाणजनतेनें हिंदुस्थानच्या समृद्ध भागावर लुटालुटीसाठीं हल्ला केल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. तशींच, हिंदी अंमलदारांनीं काबूलकंदाहारमध्यें आपली सत्ता प्रस्थापित केल्याचींहि कांहीं कमी नाहींत. पण अफगाणांपासून आम्हांस उपसर्गच अधिक पोहोंचत होता, ही गोष्ट निर्विवाद आहे. अशा परिस्थितींत त्यांचा इतिहास, त्यांचें राजकारण, त्यांच्या हालचाली, त्यांच्या आकांक्षा इत्यादिकांकडे आम्ही हिंदी प्रजाजनांनींच विशेष लक्ष द्यावयास पाहिजे. परंतु आतांपर्यंतच्या अफगाणिस्थानासंबंधींच्या उपलब्ध वाङ्मयांत हिंदी दृष्टीनें लिहिलेलें असें पुस्तक एकच असावें, आणि तेंहि इंग्रजींत, ही गोष्ट आमच्या बेफिकीरीचीच निदर्शक होय. डॉ. अबदुल गनी नांवाचे एक पंजाबी मुसलमान गृहस्थ अमीर अबदुर रहमान व अमीर हबीबुल्ला

यांच्या कारकीर्दींत अफगाणिस्थानांत सरकारी नोकरीसाठीं राहिले होते. अमिरांच्या निकट सहवासाचा लाभ त्यांना मिळाला होता आणि अमानुल्ला गादीवर आला त्या क्रांतीच्या वेळीं ते बंदिवासांत होते. त्यामुळें तीन अमिरांच्या राजवटी त्यांनीं पाहिल्या व म्हणून त्यांनीं लिहिलेलें A Review of Political Situation in Central Asia हें इंग्रजी पुस्तक मध्यंतरींच्या ( १९०० – १९२० ) पर्यंतच्या इतिहासास उपयुक्त झालें आहे. परंतु त्या पुस्तकांतहि थोडीशी खिलापती दृष्टी दिसून येते. आणि विश्वबंधुत्वाचाहि कळवळा ग्रंथ लेखकास आला आहे असें वाटतें. म्हणजे शुद्ध हिंदी दृष्टीचा त्यांत पूर्ण नसला तरी बराच अभाव आहे. शिवाय तें पुस्तक म्हणजे निवळ घडलेल्या गोष्टींचें व प्रसंगांचें टिपण आहे. टीकात्मक अथवा विवेचनात्मक भाग त्यांत फारच अल्प आहे. आणि प्रथम अमिराचे डॉक्टर, नंतर शिक्षणखात्याचे सल्लागार, अशी विविध कामगिरी पार पाडणाऱ्याच्या हातून तशा प्रकारच्या चर्चात्मक ग्रंथाची अपेक्षा करणेंच चूक ठरलें असतें. सांगण्याचा मतितार्थ हा कीं, हें एकच एक असें पुस्तक देखील समाधानकारक नाहीं.

अफगाणिस्थानावरील इतर बहुतेक सर्व ग्रंथ इंग्रजी लष्करी अथवा मुलकी अधिकाऱ्यांनीं आपापल्या वेळच्या तुटपुंज्या माहितीवर लिहिलेले आहेत. त्यांची दृष्टी अर्थातच हिंदी साम्राज्य कसें टिकवावें आणि तांबड्या रंगानें भूमिप्रदेश कसे माखावे याच धोरणाची होती. शिवाय त्यांनीं वेगवेगळ्या कालखंडांचाच विचार आपल्या पुस्तकांत केला आहे. इंग्रजींत अफगाणिस्थानचा प्राचीन कालापासून आजतागायतचा इतिहास संकलित स्वरूपांत एका पुस्तकांत मिळत नव्हता. गेल्या डिसेंबर (१९२९ ) मध्येंच सर जॉर्ज मॅक्मन् या लष्करी खात्यांतल्या गृहस्थानें एक बडा जाडा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. पण त्यांत साम्राज्यवाद्यांची गुर्मीची वृत्तीच प्रामुख्यानें दिसून येते. त्यांतील अफगाण युद्धांचें लष्करी विवेचन युद्धशास्त्रविशारदांना मनोरंजक वाटेल खरें. पण साहेबमजकुरांची दृष्टि इतकी अंध झाली आहे कीं, अफगाणस्वातंत्र्य मिळविणारा अमानुल्ला त्यांना अगदीं कमी प्रतीचा वाटतो ! तें कसेंहि असो, अफगाणिस्थानासंबंधीं सांगोपांग माहिती देणारा, अफगाणांच्या राजकीय धोरणांची हिंदी दृष्टीनें छाननी करणारा आणि आजमित्तीपर्यंतचा इति-

ह्यास संकलितरूपानें एकत्र आणणारा ग्रंथ इंग्रजींत तर नाहींच; पण तो आज मराठींत प्रथम प्रसिद्ध होत आहे ही वाङ्मयवृद्धीच्या दृष्टीनें आणि हिंदी राजकारणाच्या दृष्टीनेंहि खात्रीनें अभिमानाची बाब आहे.

रा. टिकेकर स्वत: अफगाणिस्थानांत जाऊं शकले नाहींत. पण त्यांनीं त्या देशासंबंधींची जी माहिती मिळविली होती ती मला अत्यंत उपयुक्त वाटली. त्याच वेळीं अफगाणरंगभूमीवरील दृश्यें अत्यंत त्वरेनें बदलत होतीं आणि प्रेक्षकांची जिज्ञासा व कुतूहल फारच जागृत झालेलें दिसलें. म्हणून प्रथमतः अफगाणिस्थानासंबंधीं ग्रंथ लिहिण्यास मी त्यांना सांगितलें व तें काम त्यांनीं केलेंही. एखाद्या देशाचा टीकात्मक अभ्यास कसा करावा याचें हें पुस्तक उत्कृष्ट उदाहरण आहे. इतिहास, भूगोल समाजरचना व धार्मिक आचारविचारांचा पगडा या सर्वांचा परिणाम तेथील राजकारणावर कसा होतो हें पहाणें अभ्यासकांना मनोरंजक वाटतें. आणि रा. टिकेकारांनीं याच प्रकारानें अफगाणिस्थानासंबंधींची सर्व माहिती वाचकांपुढें मांडली आहे. तींतील बहुतेक भाग दुसऱ्या ग्रंथांतून घेतला असल्याचें ठिकठिकाणीं दिलेल्या आधारभूत टीपांवरून व प्रारंभीं जोडलेल्या ग्रंथांच्या यादीवरून दिसून येईलच. पण तीनहि अफगाणयुद्धांची इष्टानिष्टता, तिसऱ्या अफगाणयुद्धाचें समर्थन, अमीर हबीबुल्लांची योग्यता, अमानुल्लानें परराष्ट्रांशीं केलेल्या तहांची छाननी, त्याच्या सुधारणांचे बरेवाईट परिणाम, युरोपियन सफरीचें राजनैतिक चष्म्यांतून निरीक्षण, पुढील काळांत झटपट घडून आलेल्या फेरबदलाची कारणमीमांसा, अमानुल्लाच्या अध:पाताचीं कारणें, अमानुल्लाची योग्यता व अफगाण भवितव्यासंबंधींचे विचार इत्यादि भाग रा. टिकेकर यांनीं स्वतः विचार करून लिहिले आहेत. त्यांतील सर्वच मतें सर्वांना ग्राह्य वाटलीं नाहींत तरी, विचार करण्याची नवीन दिशा म्हणून त्या भागांस विशेष महत्त्व आहे.

माझ्या स्वतःच्या मतें तिसरें अफगाण युद्ध मुळींच समर्थनीय ठरत नाहीं. इ. स. १९१९ मध्यें हिंदी सरकारनें अवाढव्य लष्करी खर्च सोसून चालविलेली ही अल्पकाल गाजलेली लढाई केली नसती तरी चाललें असतें. आणि केल्यानंतर ती मग अर्धवट सोडणें इष्ट ठरत नाहीं. त्यावेळीं अफगाणिस्थानला मागून फूस देण्यास अथवा सहाय्य करण्यास येण्याइतकी ताकद

पुनर्जात रशियास नव्हती. मग ब्रिटिश मुत्सद्यांनीं अमानुल्लाकडून आलेलें तहाचें बोलणें तात्काळ कां स्वीकारलें? ब्रिटिशांना लढाईचा कंटाळा आला होता असें म्हणावें तर चढाईची पहिली स्वारी ब्रिटिशांनींच भरली असें रा. टिकेकरांनीं साधार दर्शविलें आहे. एवढ्यानेंच रा. टिकेकरांनीं केलेलें विवेचन व १९१९ च्या युद्धाचें समर्थन चूक आहे असें म्हणण्याचा माझा हेतु नाहीं. विचाराची दुसरीहि एक दिशा प्रस्तुत प्रश्नासंबंधीं जातां जातां मला सुचली ती मी येथें निर्दिष्ट केली इतकेंच.

अफगाणिस्थानशीं रशियानें केलेल्या दोन तहांवरील (इ. स. १९२१चा व १९२६चा) रा. टिकेकरांची टीका अगदीं समतोल बुद्धीची दिसते. नेहमींच्या अनुभवाची गोष्ट अशी कीं, ब्रिटिशांना विरोध करणारे ते सर्व चांगले, अशा विचारानें सामान्य जनांची सहानुभूति जर्मनी किंवा रशिया या देशांकडे जाते व हीं दोन राष्ट्रें करतील तें सर्वच उत्तम अशी बहुजनसमाजाची मनोवृत्ति आज देखिल दिसून येते. परंतु स्वतंत्र राष्ट्रहिताहिताच्या दृष्टीनेंच रा. टिकेकर यांनीं विचार केला असून आवश्यक तेथें रशियास दोष देण्यास व त्या 'लोकोपकारार्थ अवतरलेल्या' नव्या लोकशाही शासनसंस्थेच्या सद्धेतूबद्दल संशय घेण्यास रा. टिकेकरांनीं सबळ कारणें दर्शविलीं आहेत. मला सर्व विवेचनांत कौतुक वाटलें तें याच गोष्टीचें.

परंतु शेवटीं अफगाणिस्थानचें भविष्य वर्तविणाऱ्या ज्योतिषाची भूमिका जेव्हां रा. टिकेकर यांनीं घेतली तेव्हां अफगाणिस्थानांत बोल्शेव्हिझमचा प्रसार होणार व होणें इष्ट आहे असें त्यांनीं आपलें मत दिलें आहे. त्यामुळें हिंदुस्थानवर होणाऱ्या परिणामाचीहि थोडक्यांत आधुनिक युवकांच्या दृष्टीनें त्यांनीं चर्चा करून नव्याजुन्यांच्या लढ्यांची पूर्ति कशांत होईल तेंहि दर्शविलें आहे. बोल्शेव्हिझम चांगला कां वाईट हें निश्चितपणें ठरविण्याइतका दीर्घकाल रशियांतील नव्या प्रयोगास अद्याप झाला नाहीं. फ्रेंच राज्यक्रांति त्या वेळीं युरोपांत अपूर्व ठरली तरी तसा प्रकार अन्यत्र कोठेंच झाला नाहीं किंवा त्या क्रांतीमुळें घडून आणलेला बदल एकदम सर्व फ्रान्समध्यें कायमचा राहिला अशांतलाहि प्रकार झाला नाहीं.

रशियांत घडून आलें तेंच हिंदुस्थानांत अफगाणमार्गें घडून येईल हें रा. टिकेकरांचें विधान मला पटत नाहीं. जागतिक मजुरसंघांना विश्वबंधुत्व वाटण्या-

इतका उमाळा आला तर तो अनिष्ट किंवा वाईट मुळींच नव्हे. पण जित राहिलेलें राष्ट्र एकाएकीं ( दुसऱ्यांच्या आधारानें पाहिजे असल्यास ) उसळी मारून आंतरराष्ट्रीय भावनेच्या बाता मारूं लागतें ही कल्पना व्यावहारिक-दृष्ट्या शक्य दिसत नाहीं. विकासवाद्यांची परंपरा खरी असेल तर, परावलंबी देशानें प्रथम स्वतंत्र राष्ट्राचा दर्जा प्राप्त करून घ्यावा, स्वतंत्र भूमींतील स्वतंत्र वातावरणांतील जनता कशी राहते त्याचें स्वानुभवानें ज्ञान घ्यावें व नंतरच आंतरराष्ट्रीय एकीची भाषा बोलावी, हीच सरणि रास्त वाटते. आणि म्हणून रा. टिकेकरांचें भविष्य आहे त्याप्रमाणें बोल्शेव्हिझमचा प्रसार हिंदुस्थानांत होणार असेल तर तीहि एक महत्वाची व विचारार्ह बाब होईल.

अमानुल्लाच्या गुणवर्णनांत प्रस्तुत पुस्तकाचीं पुष्कळ पानें खर्ची पडलीं आहेत. ज्यानें ‘ सिंहाला शह ’ दिला त्या अमानुल्लाची योग्यता वाटते तितकी नव्हती हें रा. टिकेकरांनीं चांगल्या मार्मिक प्रकारें दर्शविलें आहे. किंबहुना पुस्तक वाचतांना मात्र असें दिसतें कीं, रा. टिकेकरांना देखील प्रथमतः अमानुल्ला फार मोठ्या योग्यतेचा आहे असें वाटत असावें. आणि अखेरीस सर्व विवेचनान्तीं अमानुल्लाची खरी योग्यता आपो-आपच स्पष्ट झाल्यानें स्वतः पुस्तक लेखकाचीहि निराशा झाली असली पाहिजे. पूर्वग्रहरहित वृत्तीनें हें पुस्तक लिहिलें आहे हें लक्षांत येण्यास एवढें उदाहरण पुरें आहे.

अफगाणिस्थानच्या जनतेची आक्रमणाकांक्षा अस्थानीं आहे व ब्रिटिश सरकारचें राज्य आहे तोंपर्यंत हिंदुस्थानास अफगाणांकडून उपसर्ग पोहोंचणार नाहीं असें रा. टिकेकर यांनीं आपल्या विवेचनांत दर्शविलें आहे. अफगाणांची पात्रता हिंदुस्थानावर सत्ता गाजविण्याची असो वा नसो, लुटालुटीसाठीं त्या लोकांनीं हिंदुस्थानावर आजपर्यंत अनेक हल्ले केले आहेत ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. इ. स. १९१९ ची अफगाण लढाई कराची बंदर घेण्याच्या उद्देशानें होती अशा आशयाची एक गुप्त रशियन तार हिंदी सरकारच्या हातीं लागली, ती प्रस्तुत पुस्तकांत उध्दृत केलीच आहे. **लोवेल टॉमस** नामक अमेरिकन प्रवासी लेखकानें तर काबूलमधील एका रहिवाशाचें खरेंखुरें अंतःकरण स्पष्ट करून दाखविलें आहे. त्यांतही हिंदुस्थान आक्रमणाची अफगाणांची महत्त्वाकांक्षा स्पष्टपणें

मांडली आहे. प्रो. हार्विट्झ म्हणून एक भाषाशास्त्रज्ञ हिंदुस्थानांत १९२८ मध्यें येऊन गेले. त्यांनीं अफगाणिस्थानची सफर केली नसली तरी, सरहद्दीवरील अफगाणांचें मन कराची बंदरावर किती बसलें आहे त्याची फोड 'टाईम्स ऑफ इंडियां'तून पत्र लिहून केली होती. इतकें असून रा. टिकेकरांना अफगाणांचा हल्ला शक्य कां वाटत नाहीं तें त्यांनीं आपल्या विवेचनांत दर्शविलेंच आहे. सिंध प्रांत अलग करावा या मागणींतहि अफगाण कारस्थानें असावीं असा कित्येकांचा समज आहे. रा. टिकेकरांप्रमाणेंच हे दुसऱ्या टोकाचे लोक आहेत असें मला वाटतें. कोणतेंहि राष्ट्र जिवंत रहातें याची खूण म्हणजे त्याची वर्धिष्णु प्रकृति, आणि अफगाणिस्थानला वाढण्यास अवसर हिंदुस्थानकडेच सांपडावा यांत गैर कांहींच नाहीं. हिंदभूमीचा मोह सर्वांनाच तितका पडतो. पण हिंदी जनतेच्या दृष्टीनें अफगाणांचा हल्ला शक्य झाला तर, अत्यंत हानिकारक व अपमानास्पद ठरेल. कायमच्या आक्रमणासाठीं नसलें तरी निदान लुटीसाठीं तरी अफगाण मुलखांतील लुटारू हिंदी मुलखावर हल्ला करण्यासाठीं योग्य संधि पहात असतात हें सरहद्दीवरील दरसालच्या रिपोर्टांवरून दिसून येतें.

अफगाण अमिरांची हिंदुस्थानावर हल्ला करण्याची इच्छा असो वा नसो, हिंदी सरकार मात्र वरचेवर तिकडील हल्ल्यांचा बागुलबोवा दाखवून कोट्यावधि रुपये लष्करी बंदोबस्तासाठीं खर्च करीत असतें. रा. टिकेकरांनीं म्हटल्याप्रमाणें ब्रिटिशांसारखे अट्टल कारस्थानी जोंपर्यंत हिंदुस्थानचे 'पालनकर्ते' आहेत तोंपर्यंत तरी अफगाणांची भीति हिंदी लोकांना बाळगण्याचें कारण नाहीं! हिंदी जनतेला स्वातंत्र्य दिल्यास अफगाणांची स्वारी खास होणार व हिंदी लष्कराला वायव्य सरहद्दीचें संरक्षण करितां येणार नाहीं अशीं कारणें, सरकारतर्फे नेहमीं 'लष्कराचें हिंदीकरण करा' असा प्रश्न असेंब्लींत निघतो त्यावेळीं, पुढें करण्यांत येतात. परंतु ब्रिटिश अमदानीपूर्वी हिंदी राजकर्त्यांनीं त्या सरहद्दीचें रक्षण केलें नाहीं कीं काय? शिखांनीं आपला अंमल अफगाणिस्थानांत कसा गाजविला हें इतिहासज्ञांस विदित आहेच. भिमथडीचीं तट्टें सिंधूनदाचें पाणी पिऊन अटकेपार गेलीं तीं तरी अफगाण सरदारांना मागें रेटीतच कीं नाहीं? तर मग या ऐतिहासिक गोष्टींकडे दुर्लक्ष कसें करितां येईल? आज इतकीं वर्षे हिंदी तिजोरींतील क्रोडो रुपये अफगाणिस्थानांत एकाना दुसऱ्या निमित्तानें ओतले

जात आहेत. त्यासाठीं हिंदी जनतेनें अफगाणिस्थान आपल्या प्रदेशांत असावें अशी इच्छा प्रगट केली तर ती अयोग्य ठरेल असें वाटत नाहीं. उलट अफगाणिस्थान व हिंदुस्थान यांमधील रानटी टोळयांच्या स्वतंत्र मुलखांतील उपद्रवी व उपद्व्यापी पठाणांना वठणीवर आणण्यासाठीं त्यांच्या दोन्ही बाजूंस दोन वेगळीं राज्यें नसतां, एकाच सत्ताधीशाचा अंमल असेल तर, सुलभ उपाय परिणामकारीरीत्या योजितां येतील. तेव्हां हिंदी सरहद्द सिंधूनदाची न मानतां अफगाणिस्थान देखील हिंदुस्थानांत समाविष्ट करण्याची आकांक्षा आम्ही बाळगण्यांत वावगें तें काय आहे ?

वायव्य सरहद्दीवरील बंदोबस्ताचें वर्णन रा. टिकेकरांनीं दिलें आहे. त्यांत लष्करी खर्चाच्या अजस्त्र बोजाबद्दल सरकारवर टीकाहि प्रसंगोपात त्यांना करावी लागली. पण कोणावरहि टीकास्त्र सोडणें सोपें असलें तरी त्याबरोबरच एखादी विधायक कार्यक्रमाची योजना सुचविण्याचें काम टीकाकारावर पडतें. रा. टिकेकरांच्या निरीक्षणांतून ही बाबत कशी सुटली याचें मला आश्चर्य वाटतें. ॲसेंब्लींमधून डॉ. मुंजे व बॅ. जयकर यांनीं सरकारला वारंवार बजावून सांगितलें कीं, देशांतील तरुणांना लष्करी कामगिरीसाठीं तयार करा. आणि स्वयंसेवकांची व देशी शिपायांची फौज तयार झाली, किंवा लष्करी अधिकाऱ्यांच्या निम्या जागांवर जरी हिंदी माणसांची नेमणूक केली तरी पुष्कळ लष्करी खर्च कमी होऊन स्वदेशाचें संरक्षण करण्याचें सामर्थ्य हिंदी जनतेंत येईल. पण ही साधी बाबही सरकार ऐकत नाहीं. लोकमताला मान दिला तर मग तें हिंदी सरकार कसलें ?

काबूल येथें राज्यक्रांति होऊन अमानुल्लाच्या राज्याबरोबर रा. टिकेकर यांची तिकडील प्रवासाची संधि गेली. तथापि मेसापोटेमियांतील प्रवास संपवून ते इराणांत गेले व हिंडले. इराणची सरहद्द अफगाणिस्थानला लागून राहिलेली आहे. तसेंच इराणी व अफगाणिस्थानी समाज यांच्यामध्यें जें साम्य आहे तें काबूलचा समाज व पेशावरचा समाज यांच्यामध्येंहि थोडेंफार आहे. यामुळें इराणांतील लोकांशीं बोलल्या चालल्यानें, रा. टिकेकर यांना अफगाणिस्थानच्या राजकारणासंबंधानें जी माहिती मिळाली ती जवळ जवळ अफगाणिस्थानांत जाऊन मिळविण्या-इतकीच मिळाली. शिवाय भरीला इंग्रजी पुस्तकें होतींच. या सर्वांचा

लाभ घेऊन त्यांनीं अफगाणिस्थानासंबंधीचें हें पुस्तक लिहिलें आहे. येथें फिरून सांगण्याची गोष्ट हीच कीं, त्यांना केवळ मनोरंजक प्रवासवर्णन लिहावयाचें असतें तर केसरीच्या बातमीपत्रांतून आलेला कांहीं मजकूर व त्यांत घालतां आला असता असा आवांतर पुष्कळसा मजकूर मिळून त्यांना प्रवास वर्णनात्मक ग्रंथ मेसापोटेमिया व इराण यांसंबंधीं सहज लिहितां आला असता. आतां अफगाणिस्थानच्या राजकारणावर नादिर-शहाच्या विजयानें पडदा पडल्यामुळें तिकडील राजकारणांत हिंदुस्थानच्या लोकांना फारशी मनोवेधकता उरलेली नाहीं. तरी ज्यांना हें माहीत आहे कीं, मेसापोटेमियापासून बोध घेण्यासारखा असला तरी, खरें भय असें अफगाणिस्थानापासूनच आहे, त्यांना हें पुस्तक मनोरंजक व बोध-प्रद वाटल्याशिवाय राहाणार नाहीं. शिवाय केवळ राजकारणाचा रुक्ष विषय त्यांत नसून, देशवर्णन, वस्तुवर्णन, समाजवर्णन, काबूलच्या कटां-तील व अंतरंगांतील राजकारणाचीं रहस्यें, लोभी मनानें पण तोंडावर साळसूदपणाचा बुरखा घालून अफगाणिस्थानांत येणारे प्रवासी मुत्सद्दी व राजकारणी हेर यांच्या कौशल्याच्या कारवाईच्या झटापटी अशीं अनेक मनोरंजक अंगें त्यांत आहेत. यामुळें कोणत्याहि दृष्टीनें पुस्तक वाचणा-राला मुळींच कंटाळा येणार नाहीं.

रा. टिकेकर यांना आपल्या वडिलांपासून सोपी, चटकदार भाषा लिहि-ण्याची देणगी औरस हक्कानें मिळालेली आहे. आणि तिचा ते कसा चांगल्या रीतीनें उपयोग करूं शकतात ही गोष्ट त्यांचीं केसरींतील पत्रें वाचणारांच्या लक्षांत आलेलीच आहे. त्याच भाषापद्धतीचा या पुस्त-कांत भरपूर उपयोग करण्यांत आला आहे. रा. टिकेकर यांचे वडिलहि केसरींतून लेख लिहित असत. ते चांगले लेखक असून, **धनुर्धारी** या नांवानें ते प्रसिद्ध होते. सोपी, घरगुती, ठसकदार भाषा लिहिण्यांत त्यांचा हातखंडा असे. पण त्यांचा प्रवास फारसा दूरवर न झाल्यामुळें, त्यांच्या चर्चेच्या विषयांत घरगुती संसार व बाजारपेठ या पलीकडे फारशी मजल गेली नाहीं. म्हणून अभिनंदनाची गोष्ट ही कीं, त्यांच्या चिरंजी-वांनीं भाषेचा गुण तोच ठेवून, उद्योगशीलता, प्रवासाची हौस व एक-प्रकारचें धाडस या गोष्टींची भर घातल्यामुळें त्या गुणांचा विकास होऊन, ती भाषा राजकारणासारख्या वरच्या दर्जाच्या विषयाच्या चर्चेंत उपयो-

गांत आणतां आली. शिवाय रा. टिकेकर यांनीं फोटोग्राफीची विद्या संपादन केली असल्यामुळें, आधुनिक प्रवाशाला आपल्या लेखांतून, पुस्तकांतून, प्रत्यक्ष चित्रें घालण्याचा जो फायदा मिळतो तो रा. टिकेकर यांना मिळालेला आहे. स्वत: पाहिलेली वस्तुस्थिति, स्वत: लिहिलेला लेख व स्वतः काढलेलीं छायाचित्रें हीं तीन्ही साधनें स्वत:चीं असणारा प्रवासी बातमीदार हाच खरा स्वावलंबी होय. आणि या दृष्टीनें निदान महाराष्ट्रापुरतें तरी रा. टिकेकर यांनीं अनुकरणीय उदाहरण घालून दिलें आहे असें म्हणतां येईल. सुदैवाची गोष्ट अशी कीं, या एका सफरीनें रा. टिकेकर हे थकून गेलेले नसून उलट त्या सफरीमुळें आणखी निरनिराळ्या देशांतून असाच प्रवास करावा, इकडील लोकांना बाहेरची हकीकत कळवावी, अशी वाढती उमेद रा. टिकेकर यांनीं बाळगिली आहे. आपल्या देशांतील लोकांची कूपमंडूक वृत्ति अद्यापि गेलेली नाहीं. म्हणून दरवर्षी परदेशांतून हजारों प्रवासी अनेक हेतूंनीं व अनेक वेषांनीं इकडे येऊन जातात असें पाहिलें व ऐकलें तरी त्यांच्या निश्चयी देशप्रेमावर त्याचा कांहींच आघात होत नाहीं. पण वेळ आतां अशी आली आहे कीं, जो आपल्या देशाच्या सरहद्दीवरून, उंच मान करून, पलीकडे पाहाणार नाहीं त्याचा पाय स्वदेशांतहि जागीं टिकणार नाहीं. पाश्चात्य लोकांच्या वैभवाचें आश्चर्य करितांना व क्वचित् त्याची मीमांसा करितांना जें एक मुख्य कारण लक्षांत घ्यावें लागतें त्याची अजून आपणाला प्रचिती पटलेली नाहीं. तें कारण म्हटलें म्हणजे देशांतरच काय पण देशत्यागहि करण्याची धाडसी बुद्धि. या धाडसी बुद्धीमुळें पाश्चात्य लोकांना सर्व जग हें वेदांती तत्वज्ञानाप्रमाणें नव्हे, पण संसारी स्वार्थबुद्धीनें आपलेंच आहे असें वाटतें. तें आपलें आहे असें मानणें व वाटेल त्याचा लाभ अनेक प्रकारें आपणाला मिळावा ही बुद्धि असणें, त्या पुढची पायरी होय. '**इच्छति, यतते, करोति**' या क्रमानें त्यांनीं जगांतील वाटेल त्या देशापासून मिळणारा कोणताहि फायदा आपल्या देशाला मिळवून दिलेला आहे. '**साहसे श्रीः प्रतिवसति**' या वचनांतील साहस याचा अर्थ तामस न करितां सात्त्विक किंवा राजस करितां येतो; व जगांतील इतर देशांप्रमाणें हिंदुस्थानालाहि या पुढें हेंच बोधवचन नेहमीं आपल्या डोळ्यांपुढें ठेवावें लागणार आहे.

एकंदरीनें पाहतां रा. टिकेकरांचें पुस्तक अपूर्व झालें आहे. अफगाणिस्थानासंबंधीं आणखी कांहीं सांगावयाचें राहिलें आहे असें मला तरी निदान वाटत नाहीं. शेवटच्चीं परिशिष्टें व नकाशे यांनीं भरपूर माहिती होते. इंग्रजी अधिकाऱ्यांची दृष्टी न ठेवितां स्वतःच्या विशिष्ट विचारासाठीं अफगाणिस्थानासंबंधीं पुस्तक अफगाणांनीं लिहिलेलें असें इंग्रजींत एकच आहे व तें म्हणजे सरदार **इकबाल अलीचें** 'अफगाण व अफगाणिस्थान.' त्याला देखील वर्णनापलीकडे विशेष महत्त्व आहे असें नाहीं. हिंदी राष्ट्राचा अफगाण धोरणांत दृष्टिकोन कसा असावा हें रा. टिकेकरांनीं फारच चांगल्या प्रकारानें आपल्या पुस्तकांत दर्शविलें असल्यानें त्यांनीं तेच विचार इंग्रजींतून अवश्य पुढें मांडावेत. इतर देशी भाषांतूनहि त्याचीं भाषांतरें होऊन हिंदी जनतेनें अशा महत्त्वाच्या राजकीय प्रश्नासंबंधीं विचार करण्यास शिकावें अशी माझी इच्छा आहे. इंग्रजींत लिहिण्याचा सराव रा. टिकेकरांना आहेच, तेव्हां त्यांनीं वेळ न दवडतां इंग्रजींतहि अफगाणिस्थानासंबंधीचें पुस्तक लिहून हिंदी विचारसरणी ब्रिटिश वाचकांस कळवावी असें माझें रा. टिकेकरांस आग्रहाचें सांगणें आहे.

---

## ७ यशवंत–गोमांतक साहित्य संमेलन–अंक

गोमन्तकांत भरणारें मराठी साहित्य-संमेलन हें अनेक दृष्टींनीं अपूर्व आहे. व तेथें यंदा तें भरणार याबद्दल गोमन्तककारांचें अभिनंदन अधिक करावें कीं मराठी साहित्य-संमेलनाचें करावें हें ठरविणें कठीण आहे. गोमन्तकांत पूर्वी पुष्कळ उत्सव झाले असतील व नेहमीं होत असतील. परंतु यंदा होणारा शारदोपासनेचा समारंभ हा गोमन्तकांतील लोकांना या सर्वांहून चिरस्मरणीय होईल यांत शंका नाहीं.

राजसत्ता व भाषा यांचें झुंझ जगभर चाललेलें आढळून येतें. मग युरोपांतील पोलंड किंवा अल्सेसलोरेन किंवा झेकोस्लाव्हिकिया हे प्रान्त घ्या; अथवा अशा झुंजेंत केव्हां ना केव्हां सांपडलेलें महाराष्ट्र, कर्नाटक, मोंगलाई किंवा गोमन्तकप्रान्त घ्या. या प्रत्येक ठिकाणीं परकी राजसत्ता

प्रभावी असेपर्यंत देशी भाषेला हार खावी लागली. तथापि ती सर्वस्वीं नष्ट झाली नाहीं. सोसाट्याचा वारा सुटला असतां डोकें खालीं नमवावें व वाऱ्याचा जोर कमी झाला म्हणजे पुन्हां डोकें वर काढावें अशी स्थितिस्थापकत्वाची व चिकाटीची खूण देशी भाषांनीं सर्वत्र दाखविली.

गोमांतकापुरतेंच बोलावयाचें तर या प्रान्तांतील महाराष्ट्रीयांनीं मराठी भाषेचा अभिमान बऱ्यावाईट स्थितींत उराशीं कसा बाळगून आजवर जिवंत ठेवला, हें पाहिलें म्हणजे मोठें कौतुक वाटतें. बंगळूर, मद्रासकडे गेलेल्या महाराष्ट्रीयानीं या बाबतींत जी कामगिरी केली नाहीं ती गोमन्तकांतील महाराष्ट्रीयांनीं येथें केली. तंजावराकडे शहाजीबरोबर गेलेल्या महाराष्ट्रीयांचीं कुळें मद्रास इलाख्यांत ' राव ' या आडनांवानें ओळखलीं जाणारीं पुष्कळ आहेत. पण त्यांच्यामध्यें आज कोठें मराठी भाषा जिवंत असली तर ती पुष्कळशी स्त्रियांच्या संभाषणांतून किंवा तुळशीकट्ट्यावर म्हटल्या जाणाऱ्या मराठी गाण्यांतून किंवा स्तोत्रांतून.

स्त्रिया ह्या आपल्यावरून दुसऱ्याचा स्वभाव पुरुषांपेक्षां अधिक ओळखतात; आणि स्वत:ची अब्रू व मर्यादा संभाळण्याकरितां ज्याप्रमाणें पडदपोशीची गरज रहावी असें त्यांना वाटतें, त्याप्रमाणें भाषेची मर्यादा रहावी म्हणून तिची पडदपोशी राखण्याचें काम मद्रासेकडील महाराष्ट्रीय-स्त्रियांनीं अधिक केलें. पण मद्रासेकडील महाराष्ट्रीय-पुरुष व गोमन्तकांतील महाराष्ट्रीय–पुरुष यांच्या भाषाविषयक पराक्रमाची तुलना केली असतां असें आढळून येईल कीं, गोमन्तकीयांनीं महाराष्ट्रभाषेवर अधिक प्रेम दाखविलें व अधिक प्रभुत्व ठेविलें.

कदाचित् असेंहि म्हणतां येईल कीं, " रणांगणावर सैन्य लढत असतां एखाद्या पलटणीच्या पाठीमागच्या वाटा बंद झाल्या म्हणजे शत्रूंनीं व्यापल्या, व तिला कांहीं कुमक पोंचेनाशी झाली, म्हणजे त्या पलटणीला शत्रूच्या स्वाधीन झाल्याशिवाय गत्यंतर नसतें. त्याचप्रमाणें बंगळूर–तंजावरकडे कोंडल्या गेलेल्या महाराष्ट्रीयांचे महाराष्ट्राशीं असलेले दळणवळणाचे मार्ग बुजले. यामुळें त्यांना मराठीचा ऱ्हास थांबवितां आला नाहीं. याच्या उलट गोमन्तकांतील महाराष्ट्रीयांप्रमाणें एका शेजाराला कानडीप्रान्ताचें सान्निध्य असलें तरी दुसऱ्या शेजाराला कोंकणपट्टीच्या महाराष्ट्राचें सान्निध्य, म्हणून तेथें मराठीचा बचाव अधिक झाला. "

पण याच्याबरोबर दुसरीहि एक गोष्ट जमेस धरली पाहिजे ती ही कीं, बंगळूर–तंजावरकडे परकी राज्यसत्तेनें देशी भाषेवर जितका जुलूम केला त्यापेक्षां गोमन्तकांतील परकी राजसत्तेनें तो अधिक केला !

गोमन्तकांत मराठी भाषेच्या रक्षणाला किती अडचणी होत्या याचें वर्णन प्रस्तुतच्या यशवन्तच्या अंकांत ‘ हिंदु ’ पत्राचे संपादक रा. पै यांनीं ‘ गोमन्तकीयांची महाराष्ट्र–शारदोपासना ’ या लेखांत थोडक्यांत फार चांगलें केलें आहे. जेथें ३ वर्षांत देशी भाषा मारून टाकण्याच्या प्रतिज्ञेनुसार जोरदार प्रयत्न पोर्तुगीज सरकारनें केले, जेथें सैतानाचीं मतें दडून बसलीं असतील या भीतीनें देवळें व सैतानाचीं वचनें दडून बसलीं असतील या भीतीनें ग्रंथ सरसकट फाडण्यांत व जाळण्यांत आले, जेथें वधुवरांना ‘ पोर्तुगीज ’ येत नसलें तर त्यांनीं विवाहच करितां कामा नये असें फर्मान काढलें गेलें, जेथें मराठी शिक्षणावर सरकारी संस्थांतून संपूर्ण बहिष्कार घालण्यांत आला, जेथें भाषेच्या अभिमानाकरितां येशू ख्रिस्ताचें पुराण मूळ रोमन लिपींत व पोर्तुगीज उच्चारानुसारी पद्धतीनें लिहावें लागलें, व जेथें मराठी भाषेतील हिशेब कानडी लिपींत लिहिण्याचा प्रघात पुष्कळ दिवस होता—तेथें मराठी भाषा जगली कशी याचेंच कोणासहि आश्चर्य वाटल्याशिवाय रहाणार नाहीं ! पण गोमन्तकीयांनीं भाषा नुसती जगविली एवढेंच नव्हे तर गद्यपद्यादि असे मान्य ग्रंथ लिहून तिजमध्यें भरहि घातली.

अशा रीतीनें सांभाळलेल्या व संवर्धिलेल्या मराठी भाषेच्या उत्सवाचा प्रसंग प्राप्त झाला असतां गोमन्तकीयांना किती आनंद होत असेल याची कल्पना कोणालाहि सहज करतां येईल. रा. पै यांनीं आपल्या लेखांत जी एक गोष्ट ध्वनित केली आहे ती खरी असेल तर तिजबद्दल कोणासहि खेदच वाटेल. ते लिहितात—

“ गोमन्तकाचें क्षेत्र आकुंचित नसतें आणि बृहन्महाराष्ट्रीयांनीं नुसत्या लखोट्यावरील तिकिटाकडे पाहून गोमन्तकीय गद्य-पद्यलेखकांच्या कृति आवृत करणारीं पत्रें फेंकून देण्याची अनिष्ट वृत्ति दाखविली नसती, तर त्यांची बुद्धिमत्ता व लेखनकुशलता विकास पावली असती. आणि त्याचें योग्य तें चीज होऊन मराठी वाङ्मयाच्या वाढीस थोडा तरी हातभार खात्रीनें लागला असता ! ”

आमच्या मतें गोमन्तकी पोष्टाच्या तिकिटावरील स्वतंत्रतेची मूर्ति, ब्रिटिश मुलखांतील पोष्टाच्या तिकिटावरील बादशहाच्या मूर्तीपेक्षां खचित अधिक प्रेक्षणीय आहे. यामुळें पोर्तुगीज तिकिट लावून आलेला मजकूर हा कोणी मराठी वर्तमानपत्रकार किंवा मासिककार केराच्या टोपलींत टाकीत असला तर तो संपादक मनुष्य या नात्यानें खचित सहृदय नाहीं असें आम्ही तरी म्हणूं. मग परिश्रमपूर्वक आस्थेनें पाठविलेल्या मजकुराचा उपमर्द करणें ही गुन्हेगारी तर वेगळीच ! पण अशा गोष्टी सहसा होत नसाव्या असेंच आम्हांला वाटतें.

पण कोठेंहि कोणीहि घेतलें तरी निकट परिचयानेंच प्रेम वाढतें व बृहन्महाराष्ट्रानें मराठी भाषा प्रेमानें संभाळणाऱ्या गोमन्तकाकडे अधिक आस्थेनें पहाणें हें मुत्सद्दीपणाचें व शहाणपणाचें होईल हें जरी खरें तरी पण जरूरीमुळें कां होईना, मानापमान मनांत न आणतां शक्य त्या प्रयत्नांनीं बृहन्महाराष्ट्राशीं आपला संबंध जोडणें व दृढ करणें हें गोमन्तकीय व महाराष्ट्रीयांचेंहि काम आहे. यांत व्यक्तिविषयक मानापमानाचा प्रश्न नाहीं. जें काय कोणी करील तें मराठी भाषेच्या अभिमानामुळें करील. सुदैवानें आज कांहीं वर्षें गोमन्तकांतील पुढाऱ्यांनीं तेथील उत्सवसमारंभ वगैरेंच्या निमित्तानीं महाराष्ट्रांतील पुढारी वाङ्मयसेवकांना निरनिराळ्या वेळीं निमंत्रण करून दूरदृष्टि प्रगट केली. आणि तोच उपक्रम मडगांवास भरणाऱ्या मराठी साहित्य-संमेलनाच्या प्रसंगानें पूर्ण फलद्रूप होईल अशी आशा आहे.

गोमन्तकस्थ महाराष्ट्रीयांच्या स्नेहाला जबाब म्हणून यंदा अनेक प्रमुख महाराष्ट्रीय गृहस्थ या संमेलनाला जातीलच. परंतु पुण्यांतील '**यशवन्त**' मासिकाच्या संपादकांनीं या प्रसंगाला उद्देशून जो ३०० पानांचा अंक मुद्दाम काढला आहे तो जबाब अधिक महत्त्वाचा ठरेल. आजपर्यंत झालेल्या कोणत्याहि संमेलनाच्या प्रसंगीं त्याला उद्देशून अशा प्रकारचा अंक कोणत्याहि मासिक-पुस्तकानें काढलेला नाहीं. या अंकांत मराठी भाषेच्या निरनिराळ्या अंगांचें तज्ज्ञ लोकांकडून जें समालोचन करविलें आहे तें बरेंच हृदयंगम झालेलें आहे. लघुकथा, विनोदी लेख, लोककथा, शीघ्रध्वनिलेखन, भाषाशास्त्र, संशोधक-मंडळें, साहित्य-संमेलनें, ग्रंथालयें,

नाटकें, वक्तृत्व-वाङ्मय, कादंबरी, नाट्य-गीत, नाट्यछटा, बालवाङ्मय, कीर्तनवाङ्मय, वेदान्तवाङ्मय, लेखनकला, स्त्रीलेखिका वगैरे विषयांची याद वाचली म्हणजे, व त्याच्या जोडीला धर्म, कायदा, युद्धशास्त्र, सुप्रजाजननशास्त्र वगैरे शास्त्रीय विषयांचीं नांवें लक्ष्यांत घेतलीं म्हणजे, प्रचलित वाङ्मयक्षेत्राचें समालोचन किती व्यापक रीतीनें या अंकांत झालें आहे याची कोणांसहि कल्पना येईल.

याच अंकांत साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष रा. वामनराव जोशी यांचें संमेलनांत होणारें समग्र भाषण दिलेलें आहे. यामुळें या अंकाला नुसता चित्ताकर्षकपणाच नव्हे तर संपूर्णताहि आलेली आहे. एका दृष्टीनें पहातां या संमेलनांत भाषणरूपानें कोणत्याहि विषयाची जी चर्चा होईल तिजपेक्षां विचारपूर्वक स्वस्थपणानें व साधनसामुग्री हाताशीं ठेऊन लिहिलेल्या या लेखांतून झालेली चर्चा अधिक उपयुक्त ठरेल. असें म्हटल्यानें संमेलनांतील कोणत्याहि वक्त्याचा किंवा चर्चेचा किंवा वादाचा आम्ही उपमर्द करीत आहों असें वाटत नाहीं. कारण फटाकड्या बॅरिस्टरांची भाषाशैली जरी चटकदार असली तरी त्यांच्या हातांत सॉलिसिटरनें जें लेखी टिपण किंवा 'ब्रीफ' करून दिलेलें असतें तें विषयाच्या दृष्टीनें अधिक भरीव असतें हें कोणीहि कबूल करील.

गेल्या सुमारें २५–३० वर्षांत मराठी भाषा किती निरनिराळ्या रूपांनीं अधिक नटूं लागली आहे हें पाहिलें म्हणजे तिच्या भवितव्यतेविषयीं आशा वाटून आनंदच होतो. पुण्यांत भरलेल्या एका संमेलनाच्या प्रसंगीं इतिहासाचार्य कै. राजवाडे यांनीं 'मराठी भाषा मरणार' असें बोलून दाखविलें. पण त्यांचे ते शब्द आतां व तेव्हांहि कोणी खऱ्या अर्थाचे म्हणून घेतलेच नाहींत. राजवाडे यांची वृत्ति एखाद्या तामसी तपस्याप्रमाणें असे हें प्रसिद्धच आहे. खरा तपस्वी कोणाचें अनिष्ट कधींच चिंतीत नसतो. पण तपःसाधनाच्या जरूरीमुळें समाजाविषयीं तपस्व्याची सहजच एक प्रकारें विद्वेशबुद्धि निर्माण होते. शाकुंतलाच्या पांचव्या अंकांत शकुंतलेला घेऊन ऋषीकुमार राजवाड्यांत प्रविष्ट झाला, तेव्हां तेथील सगळी गडबड पाहून त्यानें 'जनाकीर्णं मन्ये हुतइव परीतं गृहमिव' असे एकप्रकारचे अभद्र शब्द तोंडांतून काढले. तपोवनांत रहाणाऱ्या मुनीला राजवाड्यांतील सुख व ऐश्वर्य याची कल्पना कोठून येणार?

म्हणून गर्दी पाहून तो म्हणाला, " जणुं कांहीं राजवाड्याला आग लागली असावी अशी गर्दी झाली आहे!" पण एकांतवासांत रहाणारा तपस्वीच काय, तर गृहस्थाश्रमी मनुष्यहि एखाद्यावेळीं वैतागला म्हणजे तोहि अभद्र बोलतो. रागाच्या भरांत त्रासानें आईबाप मुलांना 'मेला' 'मेली' हें विशेषण लावतात. एवढेंच नव्हे तर 'मरत कां नाहींस ?' असाहि प्रश्न करतात. पण त्याचें उत्तर मुलें देतात तीं असल्या आई-बापांच्या गळ्यांत मिठी मारून व आईबाप उत्तर देतात तीं त्यांच्या पाठीवर हात फिरवून! राजवाडे यांनीं मराठी भाषेच्या भावी नाश-संबंधी जे उद्गार काढले ते याच तोडीचे होत. शाकुंतलांतील ऋषिपुत्रांना राजवाड्याला आग लागल्याचा भास झाला किंवा त्यांनीं तसें रूपक केलें. आमच्या राजवाड्यांच्या मनांत खरोखरच मात्र आग लागली होती, पण ती मराठी भाषेच्या खऱ्या निराशेनें नव्हे तर अभिमानाच्या किंवा आकांक्षेच्या अतिरेकानें ! आम्हांला तर असें वाटतें कीं, मराठी भाषेच्या नष्टचर्याचे दिवस पुरे संपले. आणि पुढें जो काळ येईल त्यांत सर्वांगीण अभिवृद्धि झालेलीच दिसून येईल.

**यशवन्त**च्या आजच्या या अंकांत निरनिराळ्या लेखांतून मराठी भाषेच्या अंगोपांगांचें जें समालोचन झालें आहे तसें करण्यास ३० वर्षां-पूर्वी कोणी बसला असता तर, त्याच्या समालोचनांतून काय बाहेर पडलें असतें याची कल्पना कोणासहि सहजच करितां येईल. मुंबईयुनिव्ह-र्सिटींत मराठीचा प्रवेश व्हावा म्हणून, कै. न्या. रानडे यांनीं भगीरथ प्रयत्न केले; व त्या प्रयत्नांतला एक प्रयत्न म्हणून मराठी भाषाभिवृद्धीचें त्यांनीं समालोचन केलेलें पुष्कळांच्या स्मरणांत असेल. पण तें वाचणा-रांच्या मनांत तेव्हांहि आल्यावांचून राहिलें नव्हतें कीं, ह्या प्रयत्नांत विषयाच्या महत्त्वापेक्षां तो वर्णन करणाऱ्याच्या बुद्धीचें कौशल्यच अधिक प्रगट झालें. हातांत मूठभर शाडूचा गोळा, व मूर्तिकाराला तर आज्ञा कीं, " मनुष्याच्या आकाराएवढा पुतळा बनीव ! " अशीच केवळ रा. ब. रानडे यांची स्थिति झाली. स्वतःच्या मोठेपणाची भर घालून त्यांनीं त्या समालोचनांत वाङ्मयविषयक लहानसहान गोष्टीदेखील मोठ्या भरदार करून सांगण्याचा प्रयत्न केला. पण तो कसा साधणार ? अर्थात् तें समर्थन इंग्रजी अमदानींतल्या ५०–७५ वर्षांच्या अवधींत प्रसिद्ध झालेल्या

मराठी ग्रंथांचें होतें. आणि युनिव्हर्सिटींत, किंवा बाहेरहि, जुन्या मराठी वाङ्मयाला विद्वत्तेच्यादृष्टीनें सामान्य लोक तेंव्हां फारसें महत्त्व देत नसत. धार्मिक वृत्तीचे लोक जें काय महत्त्व देतील तितकेंच.

पण आतां ही सगळीच स्थिति पालटली आहे. आणि आज रा. ब. रानड्यांसारखा कुशल व मातबर समालोचक लिहिण्यास बसला तर आपलें काम त्याला अधिक हौसेनें व आनंदानें करितां येईल. याचें कारण असें कीं, एकीकडून गेल्या ३० वर्षांत नवीन मराठी वाङ्मय अनेक बाजूंनीं पुष्कळ अवतरलें, व दुसऱ्या बाजूनें ऐतिहासिक कागद-पत्रांतील गद्य व जुन्या धार्मिक ग्रंथांतील पद्य या दोघांची आवड समाजांत अधिक उत्पन्न झाली असून, आहे एवढेंहि वाङ्मय जर नीट उपयोगांत आणलें तर त्याच्या आधारावर मराठी विद्यापीठाचा पाया पक्का भरतां येईल, व पुढें थोड्याच काळांत त्यावर सुंदर इमारतहि उभारतां येईल, असा आत्मविश्वास महाराष्ट्र-साहित्यसेवकांना वाटूं लागला आहे. सुदैवानें आणखी अशीहि गोष्ट घडली आहे कीं, रा. ब. रानडे यांच्या वेळीं परकीय संस्कृतीचा व राष्ट्रीयभावनेचा असा एक कूटस्थ आत्मा आमच्या विद्यापीठाच्या अंतरंगांत प्रविष्ट होऊन घर करून बसला होता, तो आतां तेथून हुसकून बाहेर निघाला आहे. किंबहुना त्याची चारी बाजूंनीं लांडगेतोड सुरू आहे. नाहीं होय म्हणतां म्हणतां जुन्या युनिव्हर्सिटीनेंहि मराठी भाषा ही आपल्या अभ्यासक्रमांत खालवर दोहों अंगांनीं प्रविष्ट करून घेतली आहे. व आतां तर काय, चालू सालापासून विद्यापीठांत लोकसत्ता साक्षात् अवतरली आहे ! या लोकसत्तेला प्रथम प्रथम लोक बेकाली म्हणतील ! तिची संस्कृति अभिजात नाहीं असें म्हणतील ! इंग्रजी विद्येंतील पंडितगिरीचा तिच्यावर तजेला दिसत नाहीं असें म्हणतील ! पण एक गोष्ट नव्या शासनमंडळाकडून निश्चित होईल ती ही कीं, शक्य असेल तितकें पाठबळ व उत्तेजन देशी भाषांना मिळेल. जुनी युनिव्हर्सिटी म्हणजे तें तरवारीचें एक म्यान असें लोकांना वाटे. व "एका युनिव्हर्सिटीनें कानडी, मराठी, गुजराथी इतक्या देशी भाषांचा पुरस्कार करावयाचा म्हणजे एका म्यानांत तीन तलवारी ठेवण्यास सांगण्यासारखें हास्यास्पद आहे," असा बहाणा तेव्हांचे युनिव्हर्सिटीचे चालक करीत. पण तरवारी सज्ज असल्या म्हणजे म्यानें हवीं तेवढीं मिळतात, किंबहुना या नित्य उप-

योगांत येणाऱ्या तलवारी म्यानांत ठेवण्याला अवधिच मिळत नाहीं. त्या तशा नंग्या कमरेला किंवा खुंटीला अडकवून सर्व व्यवहार सुरळीत चालतो, अशी नवी भावना आतां प्रगट झाली आहे. इकडे प्रान्तिक-कायदेमंडळांतून सभासद लोक, इंग्रजीचा गंधहि नसलेले, निर्भेळ मराठींत भाषणें करूं लागले आहेत. व यापुढें साहेबांचें फरडें इंग्रजी शिकण्याची आकांक्षा आम्ही न धरतां त्यानें स्वतःच करडें मराठी शिकण्याची तयारी ठेविली पाहिजे असा काळ येऊं लागला आहे.

राहतां राहिली एकच गोष्ट प्रत्यक्ष महाराष्ट्र-विद्यापीठाची स्थापना होणें ही होय. आणि आहे अशी राष्ट्रीयभावनेची प्रगति चालू राहिली— व अशी चालू राहील याविषयीं मला मुळीच शंका नाहीं—तर हें विद्यापीठ लवकरच निर्माण होईल. आणि मुख्य विद्यापीठच मराठी बनलें म्हणजे मराठीचा संचार समाजाच्या आंगोपांगांतून, सर्व प्रकारच्या व्यवहारांतून, म्हणजे खालीं शेतकऱ्याच्या शेतापासून तों वर गव्हर्नराच्या राजदरबारापर्यंत आपोआप होऊं लागेल. गेल्या ३० वर्षांत, झाडाला अनेक शाखा फुटाव्या त्याप्रमाणें, मराठी वाङ्मयाला अनेक शाखा फुटल्या आहेत असें आम्ही वर म्हटलें आहे. पण अजूनहि हें झाड एखाद्या हौशी गृहस्थानें आपल्या दिवाणखान्यांत ठेविलेल्या चिनीमातीच्या कुंडींत लावलेल्या झाडाप्रमाणें खुरटलेलें आहे. हा हौशी गृहस्थ झाड मरूं नये म्हणून त्याला पाणी घालतो. पण तें वाहून बाहेर गालिच्यावर सांडूं नये इतक्या बेतानेंच घालतो ! शिवाय झाडाच्या मुळ्यांना खालीं पसरावयाला व वर शाखा वाढावयाला तो जी माती घालतो ती वीत दोनवितीहून अधिक खोल असत नाहीं. यामुळें कुंडींतील झाडाला एखादें फूल आलेलें क्वचितच दिसेल. पण खाऊन चाखून समाधान होईल असें फळ आलेलें मात्र कधींच दिसत नाहीं. पण तेंच झाड बाहेर आणून खुल्या जमीनींत लावलें तर त्याच्या छायेखालीं शेंकडो मनुष्यें बसूं शकतात व शेकडों मनुष्यें त्याचीं फळें खाऊन संतुष्ट होतात. सामाजिक किंवा राष्ट्रीय व्यवहार हा पोसण्याला फैलावण्याला त्याला देशी भाषेचें भरपूर जीवन मिळालें पाहिजे. आणि तें समाजवृक्षाच्या मुळांत हंडा-पखालीनींहि ओतून पुरत नाहीं तर, मोटेच्या पाटानें द्यावें लागतें. हल्लीं महाराष्ट्रांत व्यवहाराला देशभाषेचें जें जीवन मिळतें तें टीचभर बाटलीं-

तून आणलेल्या डॉक्टरी औषधाइतकेंच. पण राष्ट्रपुरुषाचा देह एवढ्याशा औषधरसानें फार झाला तर श्वास धरून कसाबसा जिवंत राहील पण त्यानें चलनवलन यथाप्रमाण करावें व पराक्रम गाजवावा असें असेल तर त्याला देशी भाषेच्या रसाचें नुसतें आकंठ पानच नव्हे तर नदीच्या डोहाप्रमाणें किंवा वाहत्या पाण्याप्रमाणें स्नानही घडलें पाहिजे !

---

## ८ आर्यावर्तातील तेजस्वी रत्नें

( श्री. के. गो. गोखले. )

आमचे मित्र रा. केशवराव गोखले यांनीं हल्लीचें हें पुस्तक प्रसिद्ध करून एक उत्तम राष्ट्रकार्य तर केलेंच; पण त्यांतूनही स्वतः माझ्या मनाला आवडणारी अशीहि एक गोष्ट केली म्हणूनच मी हें माझें अभिनंदनपर पत्र या पुस्तकाच्या प्रारंभीं जोडण्यास संमति देत आहें. एरवी इतर पुस्तकाप्रमाणें त्यावर मी अभिप्राय दिलाच असता पण तो पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर.

एकाच विषयावर एकाच प्रकारचे विचार अनेकांच्या मनांत स्वतंत्रपणे येऊं शकतात. ते एकाचवेळीं येतात असें नाहीं. आगेमागें पण येतात. एकच विषयावर अनेकांच्या मनांत एकाच प्रकारचे विचार स्वतंत्ररीतीनें यावे हें सकृत्दर्शनी आश्चर्यकारक वाटतें. परंतु त्यांत फारसें आश्चर्य नाहीं. कारण मनुष्य स्वभाव हा पुष्कळांशीं एकच स्वरूपाचा असतो.

बाह्य सृष्टींतील वस्तूंचा परामर्ष शेंकडों हजारों लोकांनीं घेतला तरी त्याच्या इंद्रियांनीं दिलेला त्या वस्तुसंबंधीचा पुरावा एकाच प्रकारचा असतो. जगांतील प्रत्यक्ष सत्य म्हणतात तें अशा पुराव्यांवरच अधिष्ठित असतें; आणि अशा पुराव्यांचा मेळ इतका चांगला बसतो कीं एकाचें ज्ञान हें कोणी दुसरा आपलें स्वतःचें असें निःशंकपणें घेऊन चालतो. आणि आपलेंहि ज्ञान दुसराहि कोणी असेंच निःशंकपणें घेऊन चालत असेल हें त्याच्या मनाला पटतें.

जी गोष्ट प्रत्यक्ष वस्तुदर्शनाची तीच वस्तूच्या गुणावगुणासंबंधाच्या

परीक्षणाचीहि समजावी. म्हणूनच अनेक लोकांचीं एखाद्या वस्तूविषयींचीं किंवा मनुष्याविषयींचीं मतें एकमेकाशीं चर्चा करून, पारखून, पडताळून न पाहिलीं तरी तंतोतंत जुळतात. जी गोष्ट वस्तुज्ञानाची किंवा वस्तु गुणावगुण परीक्षणाची तीच योजना विषयाचीहि घडते.

प्रस्तुत पुस्तकांतील कल्पना मला स्वतःला प्रथम केव्हां सुचली हें मी निश्चितपणें सांगू शकेन. पण ती कल्पना मजहून इतर लोकांना स्वतंत्रपणें सुचली असल्यास त्यांत नवल नाहीं. रा. केशवराव गोखले यांना ही कल्पना स्वत्रंपणें सुचली किंवा माझ्या तोंडून एखादेवेळीं त्यांनीं ऐकली व ती त्यांच्या मनावर बिंबली हें मला माहीत नाहीं. त्यांना ती स्वतंत्रपणें सुचली असली तरी त्यांत कांहीं आश्चार्य नाहीं हें मी वर खुलासेवार म्हटलेंच आहे. पण त्यांनी ती कल्पना मजपासून घेतली असें ठरलें तरी त्यानीं मजपुढें मजल मारली यांत मात्र शंका नाहीं. कारण माझ्या मनाला ही कल्पना पटली असतांहि ती व्यवहारांत उतरविण्याचा म्हणजे असलें पुस्तक लिहिण्याचा उपक्रम मजकडून कांहींच झाला नाहीं. पण तो रा. गोखले यांनीं केला यावरून त्यानीं प्रतिभेचें ऋण माझ्यापेक्षां अधिक तत्परतेनें व कृतज्ञतेनें फेडलें असेंच मी म्हणतों. आणि म्हणूनच मी हें त्यांचें अभिनंदन करितों.

पण त्या पुस्तकांतील मध्यवर्ति किंवा प्रेरक कल्पना कोणती हें अद्यापि सांगावयाचें राहिलेंच. ती अशी कीं एखाद्या देशांत राष्ट्रकार्य करणाऱ्या लोकांचे दर्जे किंवा प्रती लागतात, म्हणजे त्या दर्जाप्रमाणें किंवा त्या प्रतीप्रमाणें त्यांची कीर्ति किंवा प्रसिद्धि असते. पण राष्ट्रभक्त या नात्यानें, त्यांच्या कार्याची किंमत, या प्रसिद्धिवरून किंवा कीर्तिवरून ठरेल तीच खरी असें मात्र म्हणतां येत नाहीं. थोडें स्पष्टच बोलावयाचें तर तें असें कीं प्रसिद्धि व कीर्ति ही कार्य गुणापेक्षां इतर आगंतुक कारणांमुळेंहि मिळूं शकते किंवा अवलंबून राहते.

पण राष्ट्रकार्याला कोणते गुण अधिक उपयोगी पडतात हें कोणी कोठें निश्चयात्मक ठरविलेलें पाहण्यांत नाहीं. विद्वत्ता, स्वार्थ निरपेक्षता, औदार्य, दानशूरता, शारीरिक धैर्य, मानसिक धैर्य, उद्योगप्रियता, विवेकक्षमता, अनुभविकता इत्यादि गुण राष्ट्रकार्याला अवश्य आहेत असें सामान्यतः म्हणतां येतें. परंतु यांतील कांहीं गुण मान्यता मिळण्याच्या कामीं दुसऱ्यावर

अवलंबून असतात. उदाहरणार्थ, स्वार्थनिरपेक्षता ही कोणा दोघा व्यक्तींत समान असली तरी विद्वान मनुष्याच्या स्वार्थत्यागाची किंमत लोक जितकी करितात तितकी अविद्वानाच्या स्वार्थत्यागाची करीत नाहींत. याचें कारण असें असावें कीं, लाभ करून घेण्याची पात्रता जेवढी मोठी त्या मानानें तो लाभ सोडून देण्याची बुद्धिची किंमत अधिक मानली जाते. एखाद्या राष्ट्रीय चळवळींत एखाद्या सुभाष बोसनें आपली आय्. सी. एस्. ची हजार रुपये मिळणारी नोकरी सोडली व त्याच चळवळींत बारा रुपये मिळवणाऱ्या कोर्टाच्या बेलीफानें नोकरी सोडली तर स्वार्थत्यागाची बुद्धि नुसती घेतली असतां या दोघांची ती बुद्धि एकाच योग्यतेची असूनहि सुभाष बाबूंच्या स्वार्थत्यागाचा जेवढा गवगवा होतो म्हणजे जेवढी कीर्ति होते तेवढी या बेलीफाची होत नाहीं. एक हजार रुपये पगार मिळणाऱ्या माणसानें दरमहा नऊशें रुपये राष्ट्रीय कार्याला दिले आणि शंभर रुपये मिळणाऱ्या माणसानें नव्वद रुपये राष्ट्रकार्याला दिले तर गणिताप्रमाणें दोघांचा स्वार्थत्याग एकाच दर्जाचा ठरावा. असें असतां लाभाची पात्रता एकाची एक हजार रुपयांनीं मोजितां येते व दुसऱ्याची ती फक्त शंभर रुपयांनींच मोजितां येते यामुळेंच एकाची कीर्ति दुसऱ्याच्या दसपट होते हें उघड सिद्ध होत नाहीं काय ? अर्थात् हा फरक अंतर्गुणापेक्षां त्या गुणाच्या बाह्य अधिष्ठानामुळेंच होतो. आणि हें बाह्य अधिष्ठान जितकें मोठें तितकी कीर्ति मोठी.

राजा तुष्टो ग्राममेकंददाति । ‘ वाणी ’ तुष्टः पिष्टमुष्टिम् ददाति ।। म्हणजे राजा संतुष्ट होऊन उदार झाला तर एक गांव देतो आणि वाणी संतुष्ट होऊन उदार झाला तर फक्त एक मूठभर पीठ देतो. या ठिकाणीं संतोष व औदार्यबुद्धि हीं दोन्ही राजा व वाणी यांचीं तत्वतः एकाच किंमतीचीं होत. पण गांव इनाम देणाऱ्या राजाचे ताम्रपट त्याची कीर्ति शतकानुशतकें पसरीत राहतात. बिचारा वाणी आणि त्याच्या मूठभर पिठानें उपकृत झालेला भिकारी, दोघेही तेव्हांच विसरले जातात. जें गणितशास्त्र गुणाची किंमत तीच असें ठरवितें तेंच गुणाच्या फलश्रुतीची किंमत अनुरोधानीं कमीजास्त ठरवितें.

भूमिती शास्त्रांतील वर्तुळ घेतलें तर तें अंगुलभर व्यासाचें असो किंवा पृथ्वीच्या म्हणजे सोळा हजार मैल व्यासाचें असो, मध्य बिंदूशीं भरणारे त्यांचे अंश ३६० च असतात. पण क्षेत्राच्या दृष्टीनें फलश्रुती पाहातां ती

समानता उरत नाहीं. वर्तुळ जेवढें मोठें तेवढा इष्टांशासमोरील परिच्छेद मोठा. असा भेद किंवा विवेक म्हणा, जर निःपक्षपाती गणीतहि करितें, तर पक्षपाती अथवा लौकिक फलश्रुतीवर दृष्टी देणारें जग करील तर त्याला नांवें ठेवून कसें चालणार ? सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं राष्ट्रमातेचे अनेक सुपुत्र अंतःकरणाच्या गुणांनीं एकाच किंमतीचे असतां, किंबहुना विशिष्ट परिस्थितींत झालेली त्यांच्या कार्याची फलश्रुती सारखीच असतां, लौकिकदृष्ट्या कांहींना कीर्तिरूप प्रसिद्धि अधिक मिळते व कांहींना फार कमी मिळते. हा अन्याय दिसतो पण तो आहे खरा. व त्याला इलाजहि नाहीं.

पण ताजव्याचीं पारडीं स्वाभाविकपणें विषम म्हणजे खालवर असलीं तर न्यायबुद्धिनें व्यवहार करणारे घेवारी व देवारी कृत्रीम उपायांनीं म्हणजे उंच व हलकें पारडें असेल, त्यांत मुद्दाम थोडें बाहेरचें वजन घालून तें दुसऱ्या पारड्याच्या बरोबरीनें जड करितात. तशीच गोष्ट कांहींशीं अप्रसिद्ध म्हणून कमी दर्जाच्या वाटणाऱ्या राष्ट्रकर्त्यांसंबंधानें आपण केली पाहिजे. म्हणजे त्यांना स्वाभाविक रितीनें प्रसिद्धि किंवा कीर्ति मिळण्यासारखी नसल्यास, ती त्यांना इतर कोणी मुद्दाम त्यांचीं चरित्रें लिहून प्रसिद्ध करून दिली पाहिजे. प्रस्तुत पुस्तकाचा उद्देश बरोबर हाच आहे. माझ्या मनांत फार दिवस खोल बिंबून राहिलेल्या गोष्टींपैकीं ही एक आहे. अशा पुढाऱ्यांचीं चरित्रें मुद्दाम लिहून प्रसिद्ध करावीं असें माझ्या मनांत बरेच वेळां येईहि. परंतु आजवर माझ्या हातून ती गोष्ट झाली नाहीं आणि रा. केशवराव गोखले यांनीं ती केली म्हणून त्यांचें मी अभिनंदन करितों.

कीर्तीच्या कसोटीनें राष्ट्रकार्य कर्त्यांचे दर्जे खालवर कां होतात हें वरील विवेचनांत नीट ध्वनित केलेंच आहे; पण त्याचा प्रत्यक्ष प्रकारहि उघड सांगतां येईल. विद्वत्ता, वक्तृत्व, संपन्नता मोठ्या शहरीं रहिवास, वर्तमानपत्रें, छापखाने अशा प्रसिद्धि-साधनांची अनुकूलता, थोरामोठ्या विभूतींचें साहचर्य, लोकोत्तर चळवळीचे प्रसंग अशा कितीतरी नैमित्तिक उपाधीभूत गोष्टी सांगतां येतील कीं, ज्यांच्या सहायामुळें एक राष्ट्रकार्यकर्ता दुसऱ्याहून अधिक प्रसिद्धि व कीर्ति पावूं शकतो.

पण मार्मिक मनुष्यें हें सर्व जाणतात, म्हणून ते मात्र राष्ट्रकार्यकर्त्यांचे लहान मोठे दर्जे लावीत बसत नाहींत. त्यांना हें माहीत असतें कीं अप्रसि-

द्धीच्या अंधारांत जो काम करणारा, तो खरा कार्यकर्ता होय. तो प्रसिद्धीची किंवा कीर्तीची अपेक्षा ठेवीत नाहीं. केवळ कार्यप्रेमानें तो कार्य करीत असतो. त्याला उदाहरण म्हटलें म्हणजे पर्जन्याचें; पर्जन्य हा तृण धान्यादिकांना जीवन देऊन समृद्ध करतो. पण मोठ्या शहरीं, लोक जेथें त्याकडे पाहून त्याचें कौतुक करितात, किंबहुना त्याचें औदार्य इंचाच्या मापानें मोजून जगजाहीर करितात, अशाच ठिकाणीं तो जितक्या कर्तव्यनिष्ठतेनें पडतो, तितकाच दऱ्याखोऱ्यांतून किंवा निर्जन अशा रानांवनांतून, अंधाऱ्या वेळीं पडून गरीब कृषीवलांचीं शेतें व बागा पिकवितो. असें असतां पावसाचे दर्जे प्राकृत मनुष्याकडून लाविले जावोत, पण सुसंकृत मनें पर्जन्य तो पर्जन्य असेंच म्हणणार व त्याला सारखीच धन्यता देणार.

कित्येक वेळां असेंहि घडलेलें आढळेल कीं, सांधिकोपऱ्यांत पडलेलीं व दिसण्यांत हलक्या दर्जाचीं माणसें टिपण साधून इतकें मोठें राष्ट्रकार्य करितात कीं, तें मोठमोठ्या शहरातील पुढाऱ्यांच्याहि हातून झालें नसतें. आणि असें होण्याचा संभव असतो म्हणूनच मोठमोठ्या राष्ट्रीय चळवळी सिद्धीस जातात. लौकिकदृष्ट्या प्रसिद्ध नावांचा आश्रय मिळून चळवळी सनाथ होवोत. पण त्यांची खरी सिद्धी, त्यांचें खरें यश, अप्रसिद्ध पुढऱ्यांच्या राष्ट्रीयबुद्धीमुळेंच लाभतें. असे बहुमोल कार्याकर्ते बहुधा प्रत्येक प्रांतांत व जिल्ह्यांत थोडथोडे असतातच. व त्यांची प्रत्यक्ष माहिती नसली तरी, अशांच्या बळावर विश्वासावरच मोठे पुढारी चळवळी सुरू करितात व चालवितात अर्थात अशा कार्यकर्त्यांचा जीवनवृत्तांत व इतिहास हा राष्ट्रचरित्राच्या इतिहासांतील एक महत्त्वाचा भाग आहे.

रा. गोखले यांच्या प्रस्तुत पुस्तकानें तो भाग अंशत: लिहिला जात आहे. आणि त्यांचें अनुकरण करून इतर प्रांतांतील मार्मिक लेखक अशा इतर कार्यकर्त्यांचीं चरित्रें प्रसिद्ध करतील अशी आशा प्रगट करून हा अभिनंदनपर लेख संपवितों.

## ९ पतिपत्नि–प्रेम

प्रस्तुतची कादंबरी हें सुप्रसिद्ध बंगाली लेखक बाबू रवींद्रनाथ टागोर यांच्या 'चोखेरबाली' नामक कादंबरीचें भाषांतर आहे. भाषांतरकार

रा. कोठारी यांनीं या पुस्तकास मीं प्रस्तावना लिहावी अशी उत्कट इच्छा प्रदर्शित केल्यावरून दोन शब्द लिहित आहें.

बाबू रविंद्रनाथ टागोर यांचें नांव या क्षणीं सर्व हिंदुस्थानांत इतकें दुमदुमून राहिलें आहे कीं, मराठी वाचकांस झालें तरी त्यांचा परिचय करून देऊं पाहणें हें अनवश्यक आणि म्हणून अप्रयोजकपणाचें होईल. तथापि, त्याजबरोबर हेंहि सांगितलें पाहिजे कीं, कांहीं थोड्याच दिवसापूर्वी बाबू रवींद्रनाथ यांचें नांव मराठी वाचकांस मुळींच परिचित नव्हतें. अर्थात् इतक्या थोड्या वेळांत इतका मोठा फरक कसा पडला, हा प्रश्न सहजच उद्भवतो. त्याचें उत्तर असें आहे, कीं, रवींद्रबाबूंचा हा जो कीर्तिवृक्ष, एकाद्या गारुड्याच्या खेळांतील झाडाप्रमाणें, पाहतां पाहतां फुलला आणि फळालाहि आला, तो त्यांच्या लेखांच्या प्रत्यक्ष परिचयानें नव्हे; तर इंग्रजी भाषेंतील वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकें यांजमधून रवींद्र-बाबूंचे जे अनेक उल्लेख येत, त्यांचें भाषांतर मराठींतच वाचून. साधारणतः असा नियम आहे कीं, एखाद्या ग्रंथकाराचे लेख लोकांच्या वाचनांत आधीं येतात, व या लेखपरिचयरूपी पुष्पाला मग हळूहळू कीर्तिरुप फळ धरतें. परंतु कालिदासानें एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें, मोठ्या लोकांच्या प्रसादानें निमित्त व नैमित्तिक अथवा कारण व कार्य यांचाही क्रम उलटाच्या पालटा होऊन जातो. म्हणजे कारणाच्या आधींच कार्य संभवतें व कार्याच्या ज्ञानानें कारणाकडे जाण्याची प्रवृत्ति मग होते. रवींद्रबाबूंच्या महाराष्ट्रांतील कीर्तीचेंही असेंच झालें आहे. त्यांचें नांव पूर्वी असलें तर इकडे फारच थोड्या लोकांस माहीत असेल. पण कित्येक मोठ्या इंग्रज लेखकांच्या स्तुतीमुळें, रवींद्रबाबू हे खरोखरच कोणी मोठे प्रचंड लेखक आहेत असें इकडे लोकांस प्रथम वाटूं लागलें. जाडे जाडे इंग्रज लेखक एकाद्या नेटिवाची स्तुति तो खरोखरच लोकविलक्षण लेखक असल्या-शिवाय उगीच कशी करतील ? इंग्रज लोक विद्येच्या प्रत्येक बाबतींत इतके पुढें सरसावले आहेत कीं, त्यांच्या डोळ्यांत आमच्या इकडील लेखक भरणें फारच कठीण. अर्थात् रे. अँड्र्यूजसारखे मिशनरी व मि. येटससारखे कवी ज्याच्या लेखांचीं भाषांतरें करतात, ज्याच्यावर व्याख्यानें देतात, ज्याचीं चरित्रें लिहितात, तो खरोखर विशेषच योग्यतेचा असला पाहिजे अशी विचारसरणी साहजिकच आहे. आजकाल हिंदी

लोकांची विद्वत्ता यूरोपांतील धर्मकांट्यावर जाऊन तेथें तोलून, पारखून, व शिक्का मारून झाल्याशिवाय आम्हांस पटत नाहीं. 'युरोपियन रेप्युटेशन' या शब्दाचा अर्थच तो आहे. हिंदी विद्वानांची अब्रू हिंदुस्थानांत वाढावयाची तर ती सर्वस्वी हिंदूंनीं वाढवून होत नाहीं; ती युरोपियनांनीं वाढविली तरच वाढते. निदान इतकें तरी खरें कीं खुद्द हिंदुस्थानांत केवळ हिंदी लोकांकडून कीर्ति वाढावयाची तर तिला जितका वेळ लागेल त्याच्या एक दशांश वेळही त्या कीर्तीस युरोपियन विद्वानांचा आश्रय मिळाला असतां लागत नाहीं. आतां हा सर्व केवळ नुसताच कालमहिमा आहे असें मात्र नव्हे; तर यांत कार्यकारणभावही थोडा आहे. हिंदुस्थानांतील लोकांच्या कानांत हिंदी मनुष्याच्या कीर्तीचा मोठा आवाज होण्यास युरोपांतील कर्ण्याला तोंड लावून फुंकलें पाहिजे हें खरें आहे, पण त्याचें कारण असें कीं, खरोखरच आजकाल हिंदुस्थानापेक्षां युरोपांत कोणत्याही बाबतींतील विद्वत्ता अधिक आहे; व अशी गोष्ट असल्यामुळें हिंदी लोकांच्या कीर्तीला असा 'द्राविडी' म्हणजे 'युरोपियनी' प्राणायाम करावा लागतो.

असो; खुद्द युरोपियन लोकांना टागोरबाबूंचे लेखक या नात्यानें गुण पटून त्यांनीं त्यांची बरीच स्तुति केली. इंग्रजी मासिकांतील लेखांनीं त्यांच्या कीर्तीची भूमिका तयार केल्यावर नुक्तेच ते स्वतः विलायतेस जाऊन आले, व तेथें त्यांचा सत्कार पुष्कळच झाला; आणि अखेर सर्व जगांतील वाङ्मयाच्या बाबतींत चालू सालच्या गुणगणनेंत सर्व जगांत त्यांचा नंबर पहिला लागून त्रिखंडप्रसिद्ध व अत्यंत मूल्यवान असें जें 'नोबल प्राईज' तें त्यांना देण्यांत आलें. हिंदी कवीनें जगांत खराखुरा दिग्विजय केलेलें हें पहिलेंच उदाहरण म्हणण्यास हरकत नाहीं! पूर्वी राजा राममोहनराय वगैरे लेखकांनीं युरोपियन लोकांकडून किर्ती मिळविली खरी, पण रवींद्रबाबूंनीं मिळविलेल्या हल्लींच्या कीर्तीच्या मानानें कांहींच नाहीं म्हटलें चालेल. तात्पर्य, रवींद्रबाबूंच्या कीर्तीनें महाराष्ट्रांतील, किंवा बंगाल्याखेरीज महाराष्ट्राप्रमाणेंच इतर प्रांतांतील लोकांचे डोळे जे अलीकडे एकदम दिपून गेल्यासारखे झाले, त्याचें खरें कारण त्यांच्या लेखांतील तेजाच्या ज्योतीपेक्षां यदृच्छेनें त्यांच्या मागें धरला गेलेला घोटीव, तुळतुळीत व सफेद असा युरोपियन कीर्तीचा 'रिफ्लेक्टर' हेंच होय. तथापि, वरील विवेचनावरून अशा या प्रकारची कीर्ती होण्याची रवींद्रबाबूंच्या लेखांची

खरी योग्यता नाहीं, असें नुमतें ध्वनितही करण्याचा आमचा उद्देश नाहीं. पण व्यक्तिविशेषांची खरी योग्यता व त्यांच्या कीर्तीचा फैलावा यांजमध्यें सप्रमाण असा नित्यसंबंध नसल्यामुळें वरील मीमांसा करावी लागली. युरोपाप्रमाणें बंगाल्यांतही रवींद्रबाबूंची पुष्कळच ख्याति आहे; पण त्या ख्यातीचा परिणाम हिंदी लोकांचे मनावर यापूर्वीच न होण्याचें कारण असें कीं, तिला आजवर युरोपियन सर्टिफिकीट नव्हतें. असो; बंगाली लोकांनीं रवींद्रबाबूंची कीर्ति गाइल्यापेक्षां ती कीर्ति युरोपियन लोकांनीं गाइल्यापासून निस्संशय एक परिणाम झालेला आहे, व तो हा कीं, रवींद्रबाबूंच्या लेखांचा परिचय भाषांतराच्या द्वारें मराठी वाचकांस आतां बऱ्याच झपाट्यानें होणार; व प्रस्तुतचें भाषांतर हें याच गोष्टीचें एक निदर्शक होय.

हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भाषांतून दरवर्षी अनेक ग्रंथ निर्माण होतात, त्यांत प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष भाषांतरें अशीं बरींच असतात; पण हीं भाषांतरें प्राय: इंग्रजी ग्रंथांचींच असतात. एका देशी भाषेंतील ग्रंथाचें दुसऱ्या देशी भाषेंत भाषांतर अशा प्रकारचे ग्रंथ फारच थोडे असतात. हें चमत्कारिक दिसतें पण खरें आहे. याचीं दोन कारणें असावीं. एक असें कीं, भाषांतर करण्याच्या लायकीचे ग्रंथ आज कोणत्याही देशी भाषेपेक्षां इंग्रजींतच निदान संख्येनें तरी अधिक भरतील यांत शंका नाहीं; व दुसरें असें कीं, कोणत्याही प्रांतांत लेखनव्यवसाय करणाऱ्या लोकांचें इंग्रजी भाषेचें ज्ञान व तिचा अभ्यास हीं कोणत्याही दुसऱ्या देशी भाषेच्या ज्ञानापेक्षां व अभ्यासापेक्षां अधिक असतात. कोणास आश्चर्य वाटेल, पण खरोखरच हजारीं पांच सुशिक्षित लोक दुसऱ्या एखाद्या देशी भाषेशीं परिचय असलेले सांपडत नाहींत. अर्थात् एका देशी भाषेंतील ग्रंथांचें दुसऱ्या देशी भाषेंत भाषांतर होण्याचें प्रमाण याच्याहूनही कमीच भरणार. हिंदुस्थानांतील राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनें ही गोष्ट उणेपणाची नाहीं असें कोण म्हणेल? वास्तविक बहुतेक देशी भाषा परस्परांना इतक्या जवळ आहेत कीं, कोणत्याही दुसऱ्या देशी भाषेचा अभ्यास कोणाही हिंदी मनुष्यास सुमारें एक वर्षांत चांगला करितां येईल. असली तर कानडीचीच गोष्ट थोडी वेगळी ठरेल, कारण, कानडी ही अवघड भाषा असून त्यांतल्या त्यांत जुनें कानडी, म्हणजे ग्रंथलेखनाचें

कानडी, बरेंच अवघड असतें. पण हिंदी, बंगाली, मराठी व गुजराथी, म्हणजे सुमारें १३–१४ कोटी लोकांच्या मिळून या चार भाषा, परस्परांना इतक्या निकट आहेत, कीं, त्यांतील कोणतीही भाषा तींतील ग्रंथाचें भाषांतर करण्याइतकी शिकण्यास एक वर्षाहून अधिक वेळ लागणार नाहीं. या चारी भाषा संस्कृत भाषारूपी एकाच जननीचीं लेंकरें असल्यामुळें त्यांच्या चेहऱ्यांत साम्य असल्यास नवल नाहीं. फार काय, पण सुसंस्कृत ग्रंथलेखनाचे सरसकट नमुने घेतले तर त्यांत या चारी भाषांना साधारण असे शेंकडा ८० शब्द सांपडतील. अर्थात् केवळ व्याकरणानें, फार काय पण भाषेच्या मोडणीनें व वाक्प्रचारानें [Idiom] हि वाचकांस अडवून धरिलें तरी फारसें अडवून धरतां येणार नाहीं. मुख्यार्थदर्शक परिचित शब्दरूपी मोठमोठे दगड परभाषेच्या प्रवाहांत एकापुढें एक टाकलेले असल्यामुळें व्याकरणाच्या पाण्यांत फारसा पाय न भिजवितां मनुष्यास वरच्यावर तात्पर्याचें परतीर गांठतां येतें. पण आधीं ग्रंथलेखनाचीच हौस आपणांस कमी, मग इतके थोडे श्रम घेऊन कां होईना, पण देशी भाषेंतील ग्रंथाचें भाषांतर करण्याची हौस कोठून येणार ?

पण या सामान्य नियमास जर कोणीं सुदैवानें अपवाद आणला असेल, तर तो एक बंगाली भाषेनें. कारण मराठींत तरी बंगाली ग्रंथांच्या भाषांतरांचा प्रघात अलीकडे बराच सुरू झालेला आहे. बंगाली भाषा मराठीला हिंदी किंवा गुजराथी याहून दूरची असतांही मराठीमध्यें झालीं तर बंगालीचींच भाषांतरें होतात. याचें कारण, बंगाली ग्रंथांची चित्तवेधकताच होय. बंगाल्यांत इतर प्रांतांपेक्षां आधुनिक शिक्षण बरेंच आधींपासून सुरू झालें आहे; इतकेंच नव्हे, तर बंगाली भाषेंतील विदग्ध वाङ्मय इतर कोणत्याही देशी भाषेंतील विदग्ध वाङ्मयापेक्षां सरस व श्रेष्ठ आहे यांत शंका नाहीं. कविता, नाटकें, काव्य व त्याहूनही अधिक कादंबऱ्या, बंगाली भाषेंत इतर कोणत्याही देशी भाषेपेक्षां अधिक सरस आहेत. विशेषतः बंगाली कादंबरीनें तर स्वतःचा असा एक नवीन सांप्रदायच बनविलेला दिसतो.

'चोखेरबाली' ही कादंबरी रवींद्रनाथ टागोर यांच्या सर्व कादंबऱ्यांमध्यें अग्रगण्य आहे किंवा कसें हें मला माहीत नाहीं. कदाचित्

... ती मानली जात नसावी. पण याहि कादंबरीवरून रवींद्रबाबूंची प्रतिभा उ[illegible]ष्ट व्यक्त होते यांत शंका नाहीं. प्रस्तुत कादंबरींतील कथानक अगदीं सा[illegible] व पात्रें तर अवघीं चारपांच. असें असतां केवळ [illegible]नुष्यस्वभावाचें ज्ञान व त्या स्वभावाचें उत्कृष्ट चित्र रंगविण्याचें ग्रंथकारांचें कलाकौशल्य, यामुळें कादंबरी फारच मनोवेधक झाली आहे. एकुलत्या एक मुलग्याचे वाटेल ते लाड करणारी आणि केवळ त्याला सुख व्हावें अशा प्रबळ इच्छेमुळें स्वाभिमानहि विसरून जाणारी आई; अशा आईच्या लाडानें स्वातंत्र्यबुद्धि बोकाळलेला आणि स्वतःच्या सत्प्रवृत्तीमध्यें फाजिल विश्वास ठेऊन त्यामुळें पश्चात्ताप पावणारा घमंडानंदन मुलगा; पतिप्रेम साध्य करण्याशिवाय जिला दुसरें कशाचेंहि ध्यान नाहीं अशी निर्मळ मनाची व सद्‌गुणी, पण तें प्रेम मिळविण्याकरितां त्या प्रेमाला विघातक अशाही गोष्टी नकळत करणारी भोळीवेडी बायको; स्वतःच्या सद्‌गुणांवर पूर्ण भिस्त ठेवून पण ईश्वराच्या इच्छेविरुद्ध प्रेमाचा घातक खेळ खेळून पाहाणारी गतभर्तृका; आणि आत्मसंयमन व आत्मयज्ञ करून मित्राचें हित साधणारा स्नेही:—या एवढ्या भूमिकांच्या परस्परसंबंधावर ही कादंबरी रचली गेली आहे. तींत अद्‌भुत गोष्टी, डोळे फिरणाऱ्या किंवा रोमांच उभे करणाऱ्या हकीगती अशा कांहींच नाहींत. तथापि, एका लहानशा कुटुंबाचें साधेंच चरित्र पण इतक्या खुबीदार रीतीनें रंगविलें गेलें आहे, कीं तिजवरून लेखकाच्या प्रतिभेची उत्कृष्ट साक्ष पटते. पुस्तक कोठेंही उघडा, त्यांतील सुटसुटीत संभाषणें व मार्मिक उत्तर-प्रत्युत्तरें वाचतांना, वाचक मनुष्यस्वभावाच्या ओघाबरोबर असा लीलेनें वाहात जातो, कीं, त्याच्या गतीचें त्याला भानच राहात नाहीं.

कादंबरीचा पहिला भाग वाचीत असतां मधून मधून लेखकाची सदभिरुची सुटत चालली आहे, व पुस्तक सर्व स्थितींतील आणि वाटेल त्या वयाच्या स्त्रीपुरुषांस वाचावयास देण्यासारखें नाहीं असें वाटूं लागतें; पण उत्तरार्ध वाचूं लागल्यावर हें मत हळू हळू बदलतें, आणि शृंगाराचें करुणरसांत पर्यवसान होत चाललेलें पाहून कादंबरीपासून घेण्याच्या बोधाचा उदय हळू हळू होऊं लागतो. अखेर एकंदर कादंबरी वाचून झाली असतां मानवी मनांतील गूढ विचारकंदावरील झिरझिरीत पापुद्रे

हलक्या हातानें सोलून काढण्यांत लेखक फार कुशल आहे अशी खात्री पटल्याशिवाय राहात नाहीं.

भाषांतरासंबंधानें एकच शब्द लिहावासा वाटतो व तो असा कीं, कांहीं किरकोळ शब्दांशिवाय, हें आपण एखाद्या ग्रंथाचें भाषांतर वाचीत आहों असें वाचकांस मुळींच वाटत नाहीं, इतकें तें चांगलें साधलें आहे. व असली सुंदर कादंबरी भाषांतरकारानें स्वतः जरी लिहिली नाहीं, तरी ती लिहिणाराच्या संसर्गानें त्याच्या मनाशीं भाषांतरकारांस समरस होतां येतें, एवढें निर्विवाद आहे; उत्कृष्ट विदग्ध वाङ्मय निर्माण करणें हें राष्ट्रीयकार्याचेंच एक अंग आहे. व रवींद्रबाबूंनीं लेखक या नात्यानें बंगाली राष्ट्राची जी सेवा केली तिचा परिचयप्रसाद रा. कोठारी यांनीं या भाषांतराच्या द्वारानें महाराष्ट्रास करून दिला याबद्दल त्यांचे आभार मानून ही प्रस्तावना पुरी करतों.

---

## १० कॅ० लिमये यांचे विनोदी लेख

विनोदाची धार ही सुरीच्या किंवा तरवारीच्या धारेप्रमाणें असते व तिच्या योगानें दुःख व खिन्नता यांचा रोग सफाईनें व भूल न देतांही कापून काढतां येतो असें एका मानसशास्त्रवेत्त्यानें म्हटलें आहे. कॅ० लिमये यांच्या हातांत सुरी व कमरेला तरवार आहेच; पण त्यांच्या लेखणींतही वरील दोन हत्यारांचा गुण आहे असें त्यांच्या 'विनोदी-लेखसंग्रहा' वरून दिसतें. फक्त त्यांच्या तरवारीप्रमाणें त्यांच्या लेखणीलाही मधून मधून सरावाचें पाणी दिलें पाहिजे, इतकेंच. लष्करी अधिकारी हा रागीट असतो असें अनुमान अपरिचित मनुष्यानें केल्यास तें फारसें वावगें होणार नाहीं. पण लष्करी अधिकाऱ्यामध्यें उद्दामवृत्तीप्रमाणें विनोदी स्वभावही असूं शकतो व कॅ० लिमये हे त्याचेंच एक उदाहरण होत. 'धि न्यू ओरिएंटल काव्य मॅन्युफॅक्चरिंग कंपनी' हा त्यांचा विनोदी लेख गतवर्षीं पाहिला व तेव्हांच मला वाटलें, कीं, सदर लेखकांत विनोदाची उपजतबुद्धि आहे. त्यानंतर हल्लीं त्यांचें छापत असलेलें

विनोदी लेखांचें पुस्तक मजकडे आलें तें पाहून माझी पूर्वीची समजूत अधिकच दृढ झाली.

लिमयांच्या लेखसंग्रहांतील उपरिनिर्दिष्ट आधुनिक झटपट कवींची थट्टा, पत्रलेखन, स्पेशःलिझम, पाहुणे व पाहुणचार, उपद्यापी पाहुणा, कपडे वगैरे पांच सहा लेख विशेष चांगले आहेत. पण इतर कित्येकांसंबंधानें तसें म्हणवत नाहीं. कांहींत फाजील कृत्रिमपणा तर कांहींत ग्राम्यपणा दिसून येतो; व या अशा गोष्टी विनोदी लेखांतूनही प्रयत्नानें टाळल्या जाव्या असें मला वाटतें. उदाहरणार्थ, १३४ पृष्ठावरील खाणावळींतील पदार्थांसंबंधानें जें वर्णन आलेलें आहे तें वाचून किळस न येईल असा हजारांतही एखादा वाचक भेटणार नाहीं. बीभत्स या संस्कृत शब्दाच्या मूळार्थाची त्यांत कमाल झाली आहे, असें मला वाटतें. विनोदी लेख झाला म्हणून त्यांतील वर्णनानें प्रत्यक्ष किळस येऊं नये, याविषयीं जपलेंच पाहिजे. शिवाय लेखकानें सर्व कांहीं अतिशयोक्तिपूर्ण भाषेनें स्पष्ट लिहिल्यानें वाचकाच्या कल्पनाशक्तीला कांहींच काम उरत नाहीं; ही साहित्यशास्त्रदृष्ट्याही मोठीच चूक आहे, असें मला वाटतें. आपल्या विनोदांत ढेंकूण चिरडण्याच्या प्रघाताला, मूर्धाभिषिक्त विनोदी लेखकांचा आधार दाखवितां येणार नाहीं असें नाहीं. पण गुरुपरंपरेचा स्वीकार करतांनाही त्याज्य गोष्टींचा त्यागच अधिक युक्त होय. कोणत्याही गोष्टींतील अंतिम विधानापेक्षां उपांत्याचें विधान किंवा अंतिम स्थितिदर्शनापेक्षां उपांत्य स्थितिदर्शन हेंच खऱ्या कलेच्या दृष्टीनें अधिक उचित व मार्मिकपणाचें असतें; असा एक सिद्धांत सुप्रसिद्ध जर्मन टीकाकार लेसिंग यानें केलेला आहे. त्याची या ठिकाणीं मला आठवण होते व तो बरोबर आहे असें मलाही वाटतें. दुसरी गोष्ट, निवळ विनोदाकरितां म्हणून लिहिलेल्या विनोदात्मक लेखांची. याविषयीं मला असें वाटतें कीं, विनोद हा जरी चांगला असला तरी नुसता विनोदच खचून भरलेला लेख सहजच कृत्रिम बनतो. साखरभातांत साखर हा जरी महत्त्वाचा घटक असला तरी नुसत्या साखरेचा भात कोणी करीत नाहीं व तो होऊंही शकत नाहीं. तीच गोष्ट विनोदाची आहे. निव्वळ विनोद करण्याच्या हेतुपेक्षां निराळ्या म्हणजे

गंभीर हेतूनें लेख लिहिलेला असून जातां जातां प्रसंगोपात्त आणि विषय-समर्थनाचें एक अंग म्हणून जर विनोद करतां आला तर त्याचा परिणाम अधिक होतो. विनोदकल्पनांमध्यें एकादें गंभीर कल्पनात्मक सुवर्णसूत्र गुंफलेलें असलें तर त्या विनोदाचा डागिना बनूं शकतो. व निवळ विनोदी लेख हा खेडवळ माणसांनीं घराच्या भिंतीस वेड्यावांकड्या लावलेल्या कांचाप्रमाणें किंवा आरशाप्रमाणें असंबद्ध ठरतो. कॅ. लिमये हे एकादी कादंबरी हातीं घेऊन तींत कथाप्रसंगानें किंवा वर्णनात्मक रीतीनें किंवा स्वभावपरिपोषाकरितां जर आपली विनोदी लेखणी चालवतील तर अधिक उपयोग होईल असें मला वाटतें.

तें कसेंही असो; स्वतःचा व्यवसाय वेगळा असतां म्हणजे लेखनात्मक नसतां कॅ. लिमये यांनीं लिहिण्याची संवय ठेवून विनोदी वाङ्मयांत चांगली भर घातली याबद्दल त्याचें मी अभिनंदन करितों. कोल्हटकर, गडकरी वगैरे लेखकांनीं विनोद वाङ्मयाचें जें बीज रोपून ठेवलें त्याचा वृक्ष वाढीला लागून वाङ्मयाच्या या नवीन खात्यांतील व्यवहार भरभराटीस लागण्याला व ही नवीन परंपरा पुढें चालण्याला कॅ. लिमये यांच्यासारखे हौशी लेखक सहजच उपयोगी पडतील व त्यांनीं हा व्यासंग असाच चालूं ठेवावा अशी त्यांना माझी सूचना आहे. प्रत्यक्ष लेखनात्मक व्यवसाय करणारे लोक एकंदर बुद्धिमान् व विनोदी मनुष्यवर्गापैकीं शेंकडा दोन किंवा तीनच निघतील. बाकीचे लोक आपण लेखन व्यवसायी नाहीं, म्हणून किंवा लिहिण्याचा कंटाळा करून मुळींच कांहीं लिहीत नाहींत; पण त्यामुळें वाङ्मयाची फार हानी होते. रोजच्या व्यवहारांत व संभाषण प्रसंगांत कितीतरी विनोद निर्माण होत असतो; पण त्याला लेखाचें स्वरूप येत नसल्यानें त्याला विस्तृत क्षेत्र मिळत नाहीं व तो फुकट जातो. म्हणून मनुष्य कोणताही विशेष धंदा करीत असला तरी थोडाबहुत लेखनव्यवसाय करणें हा आपला निसर्गसिध्द हक्क आहे असें मानून त्यानें तो बजावल्यास वाङ्मय हें अनेकांगी व बहुगुणी होईल हें सांगावयास नकोच.

---

## ११ वाग्भटकृत हरिभाऊ आपटे-ग्रंथविवेचन

मराठींतील श्रेष्ठ कादंबरीकार म्हणवून घेण्याचा मान जसा कै० हरिभाऊ आपटे यांना निर्विवादपणें मिळतो, तसाच हरिभाऊंच्या कादंबऱ्यांचे उत्कृष्ट समालोचक म्हणवून घेण्याचा मान श्री० वाग्भट देशपांडे यांनाच निर्विवादपणें द्यावा लागेल. आपटे यांचें कादंबरी लेखनाचें काम २५ वर्षांवर चालू होतें. व त्यांनीं इतक्या कादंबऱ्या निर्माण केल्या आहेत कीं, 'त्या सर्व मीं वाचलेल्या आहेत' असें छातीला हात लावून म्हणूं शकेल असा मराठी वाचक विरळा. मग त्या सर्वांचें सशास्त्र पृथक्करण करून, मार्मिक दृष्टीनें त्यांचें सार काढून, त्यांच्या गुणावगुणांची तपशीलवार चर्चा करणारा वाचक त्याहूनहि विरळा असावा यांत आश्चर्य नाहीं. श्री० देशपांडे यांचें प्रस्तुत पुस्तक वाचणारांस, तें किती साधार व त्यांतील विधानें किती सकारण केलेलीं आहेत हें पाहून त्यांच्या वाचनाचा दीर्घोद्योग आणि चरित्रविषयासंबंधानें अढळ सहानुभूति हीं दोन्हीं लक्षांत आल्यावांचून राहत नाहींत. व्यक्तिविषयक भक्तीशिवाय तन्निर्मित वाङ्मयाचें इतकें खोल व चिकाटीचें परिशीलन कोणीहि करूं शकणार नाहीं.

कादंबरी-ग्रंथ-वाचनाशिवाय, कै० आपटे यांचे परिचित स्नेही व ऋणानुबंधी यांजकडून, श्री० देशपांडे यांनीं जी अवांतर माहिती परिश्रमपूर्वक मिळविलेली आढळून येते, ती त्यांच्या चर्चेपेक्षांही आम्हांस अधिक मौल्यवान् वाटते. कोणाही लेखकाची मनोरचना त्याच्या लेखांवरून सामान्यतः अनुमानितां येतेच. पण प्रत्यक्ष कादंबऱ्यांतून दिसून येणारी आपटे यांची मनोरचना, हा सर्वांना सारखाच दृष्टीस पडणारा असा वाङ्मयरंगभूमीवरील फक्त पुढचा पडदा होय. त्या पडद्याच्या पलीकडे असलेली वस्तुस्थिति ही पात्रें रंगण्याच्या खोलीसारखी, किंवा रंगपटासारखी, विचित्र व बोधप्रद असून, श्री० वाग्भट यांनीं परिश्रमपूर्वक मिळवून दिलेल्या अंतरंगांतील माहितीमुळें त्यांच्या वाचकांना या रंगपटाचेंहि दर्शन घडलेलें आहे.

"प्रतिभाप्रवाहाचें गोड पाणी प्यालें म्हणजे झालें, त्या प्रवाहाचा उगम शोधण्याचें काय कारण ? व शोधला तरी येथें अधिक काय मिळणार ?"

असें सकृद्दर्शनीं वाटतें. परंतु मच्छलीपट्टणापाशीं कृष्णानदीचें गोड पाणी प्यावयास मिळावयाचें त्याचा अंश महाबळेश्वर येथील गायमुखापाशीं मिळतोच तथापि निसर्गसुंदर असें तें उगमस्थान पाहून नदीच्या वस्तु-स्थितीच्या साद्यंत ज्ञानाचाही लाभ वरती घडतो. प्रस्तुत उदाहरणांत, 'पण लक्षांत कोण घेतो' या कादंबरींतील नायिकेचें प्रतिभाशालाकेनें रंगविलेलें उत्कृष्ट चित्र पाहाण्याचा आनंद, हें चित्र हरिभाऊंच्या प्रत्यक्ष परिचयाच्या एका अभागी विधवेच्या करुणास्पद कहाणीनें सुचविलें गेलें हें समजल्यानें, कमी न होतां उलट द्विगुणितच होतो. जादूगार आपल्या हातांत रुपया काढून ठेवतो तो टांकसाळींतील रुपयाइतकाच वास्तविक खरा असतो. पण जादूगारानें हातावर ठेविलेला रुपया कदाचित् खरा नसेल, तो भ्रम असेल, असा संशय आल्यानें त्या रुपयाची जी किंमत वाटते, त्यापेक्षां टांकसाळींत जाऊन हातावर रुपया घेतल्यास त्याची किंमत अधिक वाटते. जादूगारानें हातावर ठेवलेला रुपया त्यानें नजरबंदीनें उत्पन्न केला हें त्याचें कौशल्य खरें; पण तो रुपया खरोखरच टांकसाळींतला आहे अशीहि त्याबरोबर खात्री पटण्यास कांहीं साधन असेल, तर जादूचा खेळ पाहाण्याची गंमत व रुपयाचे सोळा आणे मूल्य हीं दोन्ही आपणांस लाभतात.

'आजकालच्या गोष्टी' या हरिभाऊंनीं स्वतंत्र छापखाना काढून त्यावर छापल्या काय किंवा 'पुणेंवैभवां'त खंडशः छापून प्रसिद्ध केल्या काय, त्यांचें स्वारस्य तेंच असणार. पण त्या गोष्टी मूळ 'पुणेंवैभवां'त निनांवी छापल्या गेल्या ही माहिती झाल्यास त्या स्वारस्यांत भरच पडते. चित्राची शोभा चित्रांतच मुख्यत: असली, तरी त्याची चौकट तिला उपकारी होते. वाङ्मयचित्राला ग्रंथकाराची व्यक्तिविषयक माहिती ही एक प्रकारची चौकटच होय. 'आजकालच्या गोष्टी' 'पुणेंवैभवां'तून प्रसिद्ध केल्या त्यावेळीं हरिभाऊ हे अगदीं तरूण नवशिके लेखक होते. आपलें नांव प्रसिद्ध करण्याइतका त्यांना आत्मविश्वास आला नव्हता. छापखानेवाल्यानें ग्रंथकारास आर्जवावें अशी त्यांची स्थिती तेव्हां नसून, ग्रंथकारानें छापाखनेवाल्यास आर्जवावें अशीच तेव्हां त्यांची स्थिति होती. किंबहुना समाजसुधारणेचें समर्थन हें उदार तत्त्व ज्यांच्या सर्व कादंबऱ्यांतून अनुस्यूत आहे त्यांना, 'पुणेंवैभव'कारासारख्या सुधारणा-विद्वेषी प्रति-गामी व कुचेष्टेखोर वर्तमानपत्राचा आश्रय ग्रंथप्रसिद्धीकरितां करावा लागला,

असल्या बाह्य पण मनोरंजक गोष्टी कळल्यानें 'आजकालच्या गोष्टीं'तील स्वभावचित्रें किंवा वर्णनें किंवा कथानक यांना कांहींच कमीपणा येत नाहीं; उलट त्यांची मनोरंजकता एक प्रकारें वाढतेच. ही मनोरंजकता आपट्यांच्या अनेक कादंबऱ्यांना मिळवून दिल्याबद्दल वाचकवर्ग प्रस्तुत निबंधकाराचे आभारीच होतील.

वाग्भट देशपांडे यांना आपटे यांच्या कादंबरींत जितके दोष दिसतात त्यापेक्षां अधिक दोष दिसणारे वाचक बरेच आढळतील. व हें लक्षांत येऊनच कीं काय, दोषदर्शनाचा विषय देशपांडे यांनीं बहुतेक गाळला आहे. तथापि या श्रेष्ठ कादंबरीकाराच्या गुणदोषांची आणेवारी ठरविण्यापेक्षां, त्याच्या कादंबरीवाचनानें होणारा स्थूल आनंद हा जसा अधिक ग्राह्य, तसेंच त्याच्या सर्व कादंबऱ्या वाचून त्यांतून काढतां येण्यासारखें असेल तें संकीर्ण ध्येय हेंच अधिक ग्राह्य व उपयुक्त असें आम्हांस वाटतें. हरिभाऊंच्या पुस्तकांत सामाजिक सुधारणेची टवाळी नाहीं. पण सुधारणेच्या नांवाखालीं त्यांच्या काळीं कोठेंकोठें दिसून येणाऱ्या थिल्लर आचारविचारांचे गोडवे गाऊन त्यांचें स्तोमही त्यांनीं माजविलेलें नाहीं. त्यांनीं निरनिराळ्या पात्रांच्या द्वारें सुचविलेली समाजसुधारणा मध्यममार्गावलंबिनी अशीच आहे. यामुळें त्यांच्या कादंबऱ्या केव्हांही व कोणींही वाचल्या तरी जसें वाचकाचें विरोधानें पित्त भडकणार नाहीं, तसेंच सहानुभूतीचा वीटही त्याला येणार नाहीं. देशपांडे यांच्या विवेचक पद्धतीनें आपटे यांच्या कादंबऱ्यांच्या वरील वर्णनाचें समर्थन होतें असेंच दिसून येईल. तथापि मूलग्रंथवाचनानेंच ती गोष्ट अधिक पटेल; व हे मूलग्रंथ प्रत्यक्ष वाचण्याविषयीं देशपांडे यांचें विवेचन अत्यंत क्षुद्बोधक झालेलें असल्यामुळें, प्रस्तुत निबंध वाचणाऱ्या दहा वाचकांपैकीं निदान आठ तरी, त्यांनीं पूर्वीं न वाचलेल्या अशा आपटे यांच्या कादंबऱ्या वाचण्यास, एकदम प्रवृत्त होतील अशी आम्हांस खात्री वाटते. आजपर्यंत दुसऱ्या कोणत्याही मराठी कादंबरीकाराच्या ग्रंथांचें इतकें सोपपत्तिक विवरण झालेलें नाहीं तें करून देशपांडे यांनीं स्वतःचें मित्रऋण जितकें फेडलें त्यापेक्षांही वाचकवर्गावर अधिक ऋण करून ठेविलें आहे असें म्हणून हा प्रस्तावनालेख पुरा करितों.

---

## १२ जोगळेकर–मॅझिनी चरित्र

आधुनिक कल्पनेचें स्वराज्य व राजकीय स्वातंत्र्य याच्या नदाचा उगम एकोणिसाव्या शतकांत युरोपांत झाला. तेथून त्या नदीचें पाणी जगांतील इतर देशांवर पसरून त्यांतील जनतेच्या मनाची भूमी आजवर बरीच सुपीक झाली आहे. पण हें कार्य अद्यापि पूर्ण झालेलें नाहीं. निसर्गसृष्टींतील नदीचा उगम एकाद्या मनुष्याचे हातून निर्माण झाला असें पूर्ण शोधांतीं एकादे ठिकाणीं खरें ठरण्याचा संभव आहे. तें कसेंहि असो, पण मानवी स्वातंत्र्य–बुद्धीच्या नदीचा उगम तरी मनुष्य व्यक्तीनींच उत्पन्न केलेला असतो यांत मात्र शंका नाहीं. हीं मनुष्यें देखील आपली स्फूर्ति ईश्वरी चैतन्यापासूनच घेतात. तथापि स्वर्गंगा ही भगीरथाच्या प्रयत्नानें प्रथम पृथ्वीवर अवतरली व तो पुढें होऊन दाखवीत जाईल त्या मार्गानें वहात गेली; म्हणून तिला भागीरथी हें मनुष्योत्पत्तिदर्शक नांव मिळालें. तसाच प्रकार स्वातंत्र्यगंगेचाहि होय. यामुळेंच, स्वातंत्र्याची कल्पना वास्तविक अनादि असली तरी रूसो, टॉमस पेन, मॅझिनी अशा मनुष्यांच्या नांवाशींच आधुनिक लौकिक इतिहासांत ती निगडित होऊन राहिली आहे.

मॅझिनीचें कार्य युरोपांत इतकें बळावलें आहे कीं सृष्टिनियमाप्रमाणें त्याचें नांव तेथील लोक आतां विसरूंहि लागले आहेत. पण हिंदुस्थान-सारख्या मागसलेल्या देशांत त्याचें नांव निघतांच स्वातंत्र्य स्फूर्तीची ठिणगी अद्यापि पडावी यांत आश्चर्य नाहीं. हिंदुस्थानांतील इतर देशी भाषांतून मॅझिनीचीं चरित्रें पूर्वी कोणी लिहिलीं होतीं कीं नाहीं हें मला माहीत नाहीं; पण महाराष्ट्रांत राष्ट्रीय चळवळ नांवारूपाला आली तेव्हां मॅझिनीचें चरित्र मराठींत प्रथम लिहिलें गेलें, व अजूनहि त्याचीं चरित्रें निरनिराळे लेखक लिहितच आहेत. बडोद्याच्या ग्रंथमालेंतील मॅझिनीचें चरित्र आतां कोणी फारसें वाचीत नाहीं. सावरकरांचा मॅझिनी जप्तींत निघाला पण मॅझिनीचें चरित्र ऐकण्याची मराठी वाचकांची इच्छा अद्यापि तृप्त झालेली नाहीं. म्हणून हल्लीं श्री. जोगळेकर यांनीं प्रसिद्ध केलेलें हें पुस्तक सर्वत्र मोठ्या आस्थेनें व कौतुकानें वाचलें जाईल असें मला वाटतें.

मॅझिनीचा वृत्तांत खरोखरच फार अद्‌भुत आहे. त्याचें सात्विक-भावना-प्रधान मन, उच्च ध्येय, धाडसी कल्पना, पण ती सिद्धीस नेण्याची व्यावहारिक अपात्रता, कट, बंडें, हद्दपारी, फांशीची शिक्षा, जगद्विख्याति वगैरे भावना थरारून सोडणाऱ्या गोष्टी त्याच्या चरित्रांत पदोपदीं आढळतात. हल्लींच्या सुधारलेल्या काळांत देखील अशा गुणावगुणमिश्रणानें आश्चर्यकारक व भीतिप्रद स्फोट होऊं शकतात. मग शंभर वर्षांपूर्वींच्या काळीं ते झालें असल्यास नवल नाहीं. इटालीची स्थितीच या काळीं तशी चमत्कारिक होती. ऑस्ट्रीयाचें परकी राज्य व स्वदेशी संस्थानिक अशा दुहेरी वस्त्रांतून खालीं पडलेला वस्त्रगाळ मासलेवाईक जुलूम इटालियन लोकांना लाभला होता. शिवाय उज्ज्वल पूर्वपीठिका हें जें एक उद्दीपन कारण राष्ट्रीय भावनेला असतें तें इटालीइतकें दुसऱ्या कोणत्याहि युरोयियन राष्ट्राला लाभलेलें नव्हतें. यामुळें सर्व तऱ्हेचीं अद्‌भुत कारस्थानें व चळवळी इटालींतच त्या शतकांत प्रथम जन्मास आल्या. फ्रान्सच्या राज्यक्रांतीचें उदाहरण ताजे डोळ्यांपुढें होतें; पण फ्रेंच लोकांना आपण कांहींएक नवीन कृत्य केल्यावर प्रौढी मिरवितां आली तरी, इटालियन लोकांप्रमाणें, आमचें जुनें स्वातंत्र्यच आम्हीं परत मिळवीत आहों अशा पुराणपुनीत कल्पनेचें ऐश्वर्य त्यांना नव्हतें. फ्रान्समध्यें नवीन बनावट झाली पण इटालीमध्यें राष्ट्रीयभावनेचा जीर्णोध्दार झाला; व आज झालें तरी इटालींतील तरुण फॅसिस्ट पक्ष याच ऐश्वर्यात मनानें झुलत आहे.

तथापि, एक गोष्ट कबूल केली पाहिजे ती ही कीं, मॅझिनी हा प्रत्यक्षापेक्षां कल्पनागम्य गोष्टींत अधिक रमणारा ध्येयवादी होता; इतकेंच नव्हे तर खरोखर दिक्कालातीत तात्विक मानवी स्वातंत्र्याचा तो इतर इटालियन राष्ट्रभक्तांपेक्षां अधिक भोक्ता होता. कर्तृत्वापेक्षां तत्वज्ञानाची शुद्धता हाच त्याच्या अंगचा अधिक प्रमुख गुण म्हणतां येईल. या दृष्टीनें पाहतां ग्यारीबाल्डी व मॅझिनी यांच्या पिंडरचनेंतील सूक्ष्म फरक कौतुकास्पद ठरतो. पण मनाची तारांबळ उडविण्यास या दोन विभूति जणूं काय पुरेशा नाहींत म्हणूनच कीं काय कॅव्हूर व व्हिक्टर-इ-मॅन्यूएल या व्यक्ति त्याबरोबरच नजरेसमोर येतात, आणि राष्ट्रीय रसात्मक विविध भावनांच्या नाटकांत हा तत्वज्ञानी अधिक श्रेष्ठ कीं तो

वीर अधिक श्रेष्ठ, तो मुत्सद्दी अधिक श्रेष्ठ कीं तो कर्ता राजा अधिक श्रेष्ठ असे अवघड प्रश्न सुचून गोंधळ बळावतो. पण या प्रश्नांचें सविस्तर उत्तर येथें देत बसण्याचें कारण नाहीं. इतकें मात्र खास म्हणतां येईल कीं, कॅव्हूर व व्हिक्टर–इ–मॅन्युअल यांच्यापेक्षां ग्यारीबाल्डीची व ग्यारीबाल्डीहूनहि मॅझिनिची आठवण जग अधिक कृतज्ञताबुद्धीनें काढतें. आधुनिक स्वातंत्र्य-कल्पनेचें धर्ममूल मॅझिनींतच आहे असें समजलें जातें व प्रजाजनांच्या स्वातंत्र्यबुद्धीला एवढा नैतिक आधार ज्यानें मिळवून दिला त्याचा उपकार जगावर खरोखरच मोठा म्हटला पाहिजे.

असो. मॅझिनीच्या चरित्रासंबंधानें विवेचनापेक्षां त्याचें प्रत्यक्ष चरित्र वाचणें हेंच केव्हांहि अधिक चित्ताकर्षक व बोधप्रद असणार. म्हणून श्री. जोगळेकर यांनीं मराठी वाचकवर्गापुढें ठेवलेल्या चमचमित भोजनाचे आड अधिक न येतां ही प्रस्तावना पुरी करतों.

---

## १३ सावरकर यांचें चरित्र

श्री. विनायकराव सावरकर यांचें चरित्र त्यांच्या हयातींत लिहिलें जाईल असें मला वाटलें नव्हतें. परंतु तें लिहून आज छापलेंही जात आहे, इतकेंच नव्हे तर त्याची प्रस्तावना लिहिण्याविषयीं मला विनंति करण्यांत येत आहे हें मी आश्चर्यांतलें आश्चर्य मानतों. चरित्रकारांनीं देऊं केलेला हा मान नाकारणें हें मला जड कां वाटलें, व दुसरेपक्षीं प्रस्तावना लिहिणें हेंही जड कां वाटतें, याचीं कारणें मी सांगत बसत नाहीं. सावरकरांची व माझीं कांहीं कांहीं मतें न जुळण्यासारखीं त्यांची व माझी मनोरचना आहे, हें मला माहीत आहे. पण तीं जुळतात वा न जुळतात हें संभाषणांत पडताळून पाहण्यासारखा त्यांचा माझा प्रत्यक्ष संबंध ते तुरुंगांतून सुटण्यापूर्वीं कधींच आला नव्हता. माझी आठवण बरोबर असेल तर मला असें वाटतें कीं, १९०७ सालीं सार्वजनिक सभेंत भरलेल्या ज्या एका जाहीर सभेचा मी अध्यक्ष होतों, त्या सभेंत सावरकर हे एक वक्ते होते; व सभेंतून परत जातांना त्यांच्या तेजस्वी वक्तृत्वाची वाखाणणी मीं मनांत करीत असतां, परदेशी कप-

ड्याची होळी करण्यासारख्या कृत्याविरुद्ध मी बोललों याबद्दल ते मला मनांतून नांवें ठेवीत परत जात असावे. सावरकर व मी यांचें प्रत्यक्ष भाषण असें सर्व जन्मांत ते परवां तुरुंगांतून सुटून रत्नागिरीस जात असतां मुद्दाम मला भेटण्याकरितां माझे घरीं आले त्यावेळींच प्रथम झालें; व हे सावरकर असें त्यांना मी आजपर्यंत प्रत्यक्ष दुसऱ्यांनदां याच वेळीं पाहिलें!

पण सावरकरांशीं माझें पूर्वीं प्रत्यक्ष भेटणें झालें नसलें तरी त्यांची कीर्ति मी ऐकलीच होती; व त्यांचीं माझीं मतें जुळणारीं नसलीं तरी त्यांच्या धाडसी बाणेदार स्वभावाचें कौतुक करणारांपैकींच मींहि एक होतों. त्यांच्या देशभक्तीचा थाट आयरिश देशभक्तांच्या देशभक्ती-सारखा होतो. स्वतः मी आयर्लंडचा इतिहास लिहिलेला आहे. व दूरच्या आयरिश देशभक्तांचें जर आम्हीं कौतुक करितों तर जवळच्या व आपल्याच समाजांत उत्पन्न झालेल्या अशा देशभक्तांचें कौतुक आम्हीं न करणें हा गुन्हा होय असें मी पूर्वीं मानीत होतों व आजही मानतों. कै. गोखले यांना सावरकरांचा बिनसनदशीरपणाचा जुना मार्ग शंभर टक्के नापसंत होता हें सांगावयास नकोच. परंतु सावरकरांच्या इतर गुणा-बद्दल गोखले यांनींही स्वतः मजजवळ अनेक वेळां प्रशंसापर उद्गार काढ-ल्याचें मला पक्कें स्मरतें. असो; आमचा स्वभावभेद कायमचा असला, व त्यामुळें साधनाविषयीं त्यांचा व माझा पूर्वीं मतभेद असला तरी आतां तो उरलेला नाहीं. आणि पूर्वींचें त्यांच्या विषयींचें माझें कौतुक मात्र तसेंच शिल्लक आहे. म्हणूनच ही प्रस्तावना लिहिण्याचें मी कबूल केलें.

श्री. सावरकर यांच्या पूर्व चरित्रावर त्यांनींच आपल्या अलीकडील जाणत्या उद्गारांनीं पडदा टाकला असल्यामुळें, या पूर्व चरित्रास आतां पदार्थसंग्रहालयांतील कांचेच्या कपाटांतील वस्तूचें स्वरूप प्राप्त झालें आहे. प्रत्यक्ष व वर्तमान यांच्याशीं संबंध न येणाऱ्या हकीकतींकडे कोणीही निर्वि-कार मनानें पाहूं व बोलूं शकतो. पण ही मनःस्थिति अशी केवळ इतरांचीच असते असें नाहीं तर स्वतः ज्याची त्याचीही असूं शकते. मोठ्या मनुष्याला त्याच्या लहानपणच्या खोडकर स्थितींतला एखादा फोटो दाखविला तर त्याविषयीं त्याची जी भावना होईल तीच सावरकर यांची

त्यांच्या पूर्व चरित्रासंबंधानें आज असेल. समकालीन तरुण पिढीला त्यांचा देशभक्तिभरित खोडकरपणा सर्वस्वी अनुकरणीय नसला तरी स्पृहणीय वाटला खास !

पर्वताच्या माथ्यावर अशा जागा असतात कीं त्यांवर पडलेलें पावसाचें पाणी जर पूर्व समुद्राला जाऊन मिळतें, तर जवळच एका बोटाच्या अंतरावर पडलेलें पाणी पश्चिम समुद्राला जाऊन मिळतें. मनुष्याच्या उन्नत भावनांचाहि, असाच प्रकार असतो. देशभक्तीची उत्कटता तीच असतां स्वभावभेदामुळें कांहीं देशभक्त सद्यःपरिणामी क्रांतिकारक मार्गाला लागतात तर दुसरे सनदशीरपणाचा कंटाळवाणा मार्ग चोखाळीत जन्मभर अंतःकरण पिचवीत असतात. अर्थात् दोघांचीही निष्ठा एकच पण मार्ग मात्र वेगवेगळे असल्याकारणानें त्यांत अनुभवहि वेगळे; व प्रत्येकाला वेगवेगळ्या प्रकारच्या कीर्तीचें फळ मिळतें. पण त्यांतल्यात्यांत सावरकरांना मात्र दोन्ही मार्गांचा अनुभव व दोनही प्रकारचीं फळें लाभण्याचा संभव दिसतो. पहिला म्हणजे क्रांतिकारक मार्ग त्यांचा चोखाळून संपला, व हिंदुस्थानला स्वराज्याची घटना मिळाल्यामुळें यापुढें बंडाला अवसर उरत नाहीं हे उद्गार काढल्यापासून त्यांच्या दुसऱ्या मार्गाचें आक्रमण सुरू झालें. त्यांच्या एका जवळच्या मित्रानें मला नुकतेंच असें निक्षून सांगितलें कीं, प्रतियोगी सहकारितेच्या धोरणावर सावरकरांचा पूर्ण विश्वास आहे. आणि दैवालाही घटना करणेंच असेल तर तुरुंगवासामुळें त्यांना जडलेली अपात्रता (Disqualification) धुवून निघून, पुढेंमागें प्रांतिक कौन्सिलांत शिरून, मुंबई इलाख्याला प्रांतिक स्वातंत्र्य मिळाल्यावर ते प्रधानही होतील ! विलायतेंतलीं उदाहरणें घेतलीं असतां लँडलीगच्या चळवळींत तुरुंगवास भोगलेले आयरिश देशभक्त टिमथी हेली हे नव्या आयरिश स्वराज्यांत गव्हर्नर झाले. मजूर पक्षाच्या पहिल्या चळवळींत कैद भोगलेले व खडी फोडलेले जॉन बर्नस हे इंग्लंडच्या प्रधानमंडळांत प्रधानपद पावले. आणि एकोणिसाव्या शतकाच्या मध्यभागीं बंडखोरीच्या चळवळींत फांशीची शिक्षा दिली गेलेले सर चार्लस गॅव्हन डफी हे आस्ट्रेलियांत मुख्य प्रधान झाले. 'पुरुषस्य भाग्यं' ही म्हण प्रसिद्धच आहे. गॅरिबाल्डीला फांशीची शिक्षा झाली असतां कालांतरानें सिसिली बेट जिंकून राजास

अर्पण करण्याचा मान त्याला मिळाला; आणि जो गॅरीबॉल्डी पूर्वी फांसावर चढावयाचा तो पुढें इटलीचा उद्धारकर्ता म्हणून स्वराज्यविषयक मिरवणुकींत एकाच गाडींत राजाच्या डाव्या हातास बसून मिरवतो हें पाहणाराला काय वाटलें असेल? विलियम ओब्रायन या आयरिश पुढाऱ्यानेंही अशा स्थित्यंतराला अनुलक्षून आपल्या 'आयरिश आयडियाज' या पुस्तकांत खालील अनुभव लिहिला आहे.

"The ingenuity which had formerly to be employed to shake off the nightmare in the dark grey coats and rifles has now only to be applied to the more innocent, if more difficult, task of evading "the little addresses" and the "few words" with which popular hospitality will insist upon enlivening the road.

उलटे सुलटे खेळ करणें ही दैवाची लीला सुप्रसिद्धच आहे. दादाभाई नौरोजी यांनीं वयाच्या ऐंशिव्या वर्षी 'मी तरुण असतों तर बंड केलें असतें' असे उद्गार कलकत्त्यास काढले. विनायकराव सावरकरांनां बंडखोरीचा अनुभव घेऊन प्रतियोगी सहकारितेचा गौरव करण्याचा प्रसंग पसतिशीच्या सुमारासच आला.

तथापि अद्‍भुतरम्यत्वाच्या दृष्टीनें पाहतां सावरकर हे उद्यां प्रधान झाले तरी त्यापेक्षां त्यांनीं विलायतेहून परत येतांना जो पराक्रम केला तोच भावी तरुण पिढीच्या दृष्टीनें अधिक सरस वठेल यांत शंका नाहीं. प्रधान पुष्कळ होतात; पण जिवावर उदार होऊन पराक्रम करण्याचा प्रसंग थोड्यांना येतो; व आला तरी तो साधणारे त्याहूनही थोडे असतात. युद्धानंतर लीग ऑफ नेशनच्या दरबारांत हिंदुस्थानला आम्ही जागा दिली अशी बढाई सरकार मारतें. पण जहाजाच्या पोर्ट होलमधून समुद्रांत उडी टाकून, फ्रान्सच्या भूमीवर पाय ठेवून, इंटरन्याशनल लॉची तक्रार सांगून, "बोला हो बोला हो बोला हो सर्व सभ्य बोला हो" असा सवाल जगांतील सर्व राष्ट्रांना करून विनायकराव सावरकरांनींच तें स्थान हिंदुस्थानाला महायुद्धाच्या आधीं पांच वर्षे मिळवून दिलें होतें!

असो. सावरकर सुटून आले आहेत व त्यांना थोडीशी स्वतंत्रताही लाभली आहे. परंतु त्यांच्या अज्ञातवासाचीं अजून चार साडेचार वर्षे जावयाचीं आहेत. तेव्हां हेही दिवस लौकर निघून जावोत व तुरुंगवासांत

घालविलीं तितकीं तरी त्यांना या नव्या मार्गानें देशाची सेवा करण्याला मिळोत अशी आशा प्रदर्शित करून ही प्रस्तावना पुरी करितों.

## १४ गोविंदाग्रजांची कविता

माझे कै. स्नेही राम गणेश गडकरी यांच्या काव्यग्रंथाची प्रस्तावना मी लिहावी अशी विनंति मला करण्यांत आली व ती मी स्वीकारली; याचें कारण मी स्वतःला काव्यविषयांतील मर्मज्ञ समजतों असें नव्हे, तर त्या योगानें माझें स्नेहऋण अंशतः तरी फेडण्यास मला संधी मिळेल, या भावनेनें. रा. गडकरी यांच्या व माझ्या वयांत बरेंच अंतर असून त्यांचा माझा प्रथम परिचय बराच उशीरां झाला. तथापि स्नेही या नात्यानें त्यांचे माझे जे थोडे दिवस गेले त्यांत त्यांच्याशीं संभाषण, हा एक क्वचित मधून मधून मिळणारा पण मिळेल तेव्हां उत्कट आनंद देणारा, असा विषय होऊन बसला होता. कारण त्यांच्या भाषणांत त्यांचे लेख व कविता या दोहोंतील गुण एकत्रित झालेले होते. कोटिबाजपणा व विनोद यांचा चमचमीत मसाला त्यांच्या भाषणांत भरलेला असल्यामुळें तें बुद्धिजिव्हेला पक्वान्नासारखें अवीट वाटे. आणि हास्यरसाचा पूर भरविणारें असल्यामुळें तें भाषण एक प्रकारचें विश्रांतिस्थानच होऊन बसत असे. त्यांच्या भाषणाच्या विनोदीपणामुळें रंगलेली सभा किंवा रंगलेलें नाटक चाललें असतां त्यांच्या शेजारीं बसणें हें जितकें दुर्घट काम वाटे तितकेंच निर्मक्षिक स्थितींत त्यांच्याशीं संभाषण करणें याविषयीं मन मोठें उत्सुक असे. कारण गडकऱ्यांच्या कल्पनेचा अनिरुद्ध संचार या संभाषणांतून खरा पहावयास मिळे. चमत्कृतिजनक व विकृत अशाही कल्पना लोकांना ऐकविण्याच्या कामीं गडकऱ्यांइतका धाडसी व बिनमुर्वतखोर लेखक मराठी भाषेंत आजपर्यंत झाला नाहीं असें मला वाटतें. पण गडकऱ्यांना देखील शाई व कागद या सासूसासऱ्यांची मर्यादा लेखनसंसारांत जी मोडतां येत नसे ती मोडण्याला भाषणांत वाव मिळत असे. खुल्या दिलानें बोलणाऱ्या स्नेह्यांचा नैसर्गिक संकेतच असा असतो कीं, जें बोललें तें त्यानंतर विसरून जावें. पण

मनोगांभीर्याच्या चाळणींतून विसरून जाण्यासारखे वाणीचे कण गाळून टाकले तरी, निरंतर स्मरणांत जपून ठेवण्यासारखे किंबहुना एखाद्या स्मरणीच्या स्फटिकमण्यांप्रमाणें वारंवार घोळले तर सुख व शीतलता देणारे असे विचार त्या संभाषणांतून कितीतरी मज जवळ अवशिष्ट राहिलेले आहेत. नि:स्वार्थ बुद्धीनें गडकरी जें हें विचारऋण मला देऊन गेले त्याची फेड या प्रस्तावनेनें मी अंशत: करीत आहें असें मला वाटतें.

मी स्वत: जरी मध्यमवयीन आहें तरी गडकरी यांचें सर्व चरित्र माझ्या डोळ्यापुढें होऊन गेलेंहि. कॉलेजांतील विद्यार्थी, नाट्यकलेचा नादी, मासिकांतून झळकणारा विनोदी लेखक, कवि व नाटककार हीं त्यांच्या चरित्रांतील पांच स्थित्यंतरें इतक्या त्वरेनें एकामागून एक निघून गेलीं कशीं व आपल्या वयाच्या अवघ्या बत्तीसाव्या वर्षी मराठी भाषेंतील एक चांगले कवि व नाटककार अशी कीर्ति प्रस्थापून ते गेले कसे याचा अचंबाच वाटतो. पण विचार करूं गेलों असतां ही गोष्ट एका प्रसिद्ध नियमाला अपवादभूत नसून उलट पोषक अशीच ठरते. हा नियम असा कीं, खरी काव्यस्फूर्ति किंवा नाट्यस्फूर्ति मनुष्याला अल्पवयांतच होते. गडकरी आणखी जगते तर ते आणखी लिहिते हें खरें तथापि कवि व नाटककार या नात्यानें त्यांची स्फूर्ति त्यांच्या पूर्व वयांत जितकी चमकली तितकी ती उत्तर वयांत चमकली असती किंवा नाहीं हें सांगणें कठीण आहे. गुंजारव करणारा भोंवरा हा स्वत:ला आपल्या जोरदार प्रथम परिभ्रमणांनीं भूमिमध्यें व तेंहि मर्यादित कक्षेंत गाडून घेतो. तीच गोष्ट मनुष्याची बुद्धिमत्ता किंवा प्रतिभा यांचीहि होते. कवि व नाटककार यांची प्रतिभाहि कालांतरानें एकमार्गी बनते व त्यांच्या हातून उत्तरोत्तर निर्माण होणारीं काव्यें किंवा नाटकें यांतील नाविन्य नष्ट होऊन स्फूर्तिहि घड्याळांतील कमानीप्रमाणें शिथील होते. जगांतील मोठमोठे कवि व नाटककार यांच्या सर्वोत्कृष्ट कृति अशाच अल्पवयांत अवतरल्या हें त्यांचीं चरित्रें या दृष्टीनें वाचून पहाणाराला बिनतक्रार कबूल करावें लागेल. किंबहुना वृद्ध कवि किंवा म्हातारा नाटककार हे शब्द ‘वदतो व्याघाता’ चीं उदाहरणें म्हणून कोणीहि खुशाल द्यावीं. मानसशास्त्रदृष्ट्या या चमत्काराचें कारण प्राय: हेंच असावें कीं, प्रतिभा हें शरीरपरिणतीबरोबर उत्पन्न होणारें तेज असल्यामुळें तें उत्पत्तीबरोबरच

आपला प्रभाव दाखवूं लागतें व त्यावर आधिभौतिक, आध्यात्मिक, संकटमय स्थितींची एकावर एक अशीं कितीहि जाड आवरणें पडलीं तरी त्यांतून तें बाहेर झळकल्याशिवाय व आपलें गुणकार्य केल्याशिवाय राहूं शकत नाहीं. यामुळेंच दारिद्र्य, दुःख, दास्य, सेवावृत्ति, कारागृहवास अशा संकटावस्थेंतच प्रथम लोकनिदर्शनास आलेले आणि पुढें प्रतिभा-सामर्थ्यावर स्वातंत्र्य व ऐश्वर्य मिळविलेले कितीतरी कवि, नाटककार व लेखक सरस्वतीच्या मंदिरांत अढळ स्थानापन्न होऊन राहिले आहेत.

रा. गडकरी यांची हल्लीं प्रसिद्ध झालेली ही कविता इतर कित्येक कवींच्या मानानें कमी भरेल; तथापि खऱ्या प्रतिभेची कसोटी लावून जर आपण तुलना करूं लागलों तर त्यांच्या कवितासंग्रहाचें मूल्य अशांपैकीं कांहींहून अधिक भरतें असें म्हणतां येईल. नाटकांच्या बाबतींत त्यांनीं जशी रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांकडून मूळ स्फूर्ति मिळविली, तशीच काव्याच्या बाबतींत त्यांची स्फूर्ति केशवसुतांपासून मिळाली आहे हें उघड दिसतें. प्रस्तुत पुस्तकांतील पृष्ठ ७७ वर खालील स्पष्ट उल्लेख आहे.

" कुणी मनाचा असेल कच्चा
करील त्यालाही मनशूर
या गाण्याचे गाउनि सूर
केशवपुत्राचा महशूर
गोविंदाग्रज चेला सच्चा ! "

पृष्ठ १२८ वर या ' सच्चा चेल्या'नें आपला नम्रभाव खालील ओळींत व्यक्त केला आहे.

" शिवरायाच्या मागें आम्ही लाल महालीं फिरणें
तसेंच तुमच्या मागें आम्ही नवीन कविता करणें
असेंच कांहीं कांहीं करुनी जीवित त्याला गणणें
गोविंदाग्रज म्हणे असें हें आम्हां लाजिरवाणें "

पृष्ठ ३९ वर कवीनें महाराष्ट्रजनतेला केशवसुत मेले नाहीं ते फक्त गाउनि गेले, किंवा ते मेले असें मानलें तरी

" निघतील तयांचे चेले
केशवसुत कसले मेले । केशवसुत गातचि बसले "

असें भविष्यात्मक आश्वासन देऊन ठेविलें आहे. रा. कोल्हटकर यांच्या-

बद्दलचा उल्लेख ‘ भावबंधन ’ नाटकाच्या प्रारंभीं, ‘ प्रेमसंन्यासाच्या अर्पणपत्रिकेंत ’ तसेंच प्रस्तुत पुस्तकाच्या २०९ पृष्ठावर ‘ श्रीमहाराष्ट्र-गीतां’त आहे.

“ जिथें रंगली साधीं भोळीं जनाइचीं गाणीं
तिथेंच खेळे श्रीपादांची कलावती वाणी. ”

तसेंच बालकवि ठोमरे हे जरी वयानें गडकऱ्यांहून लहान व त्यांना गडकऱ्यांनीं केवळ गुरु असें मानलेलें नव्हतें तरी त्यांच्या कवितेची छाप गडकऱ्यांवर पुष्कळ पडली होती हें स्वतः गडकरी यांनींच कबूल केलेलें आहे.

पण कित्येक शिष्य थोडयाच अवधींत गुरुच्या बरोबरीनें मान मिळविण्याला पात्र होतात. मग याचें श्रेय स्वतः शिष्याकडे द्या किंवा ‘ आपणासारिखे करिती तात्काळ । नाहीं काळ वेळ तयालागीं ’ या अभंगवाणीचें उदाहरण म्हणून तें गुरूकडे द्या कसेंहि म्हटलें तरी एकच. वास्तविक एकाच शिष्यानें निदान निरनिराळे गुण अंगीं असणाऱ्या गुरूंचें शिष्यत्व करण्यासारखें हें आहे. कारण केशवसुतांच्या कवितेंत मुख्य गुण म्हटले म्हणजे कल्पनेची ऋजुता, शुद्ध सौंदर्यप्रीति व किंचित् गूढार्थप्रीति हे होत. याच्या उलट रा. कोल्हटकर यांच्या स्फूर्तींत गुण म्हटले म्हणजे वस्तुविकार दर्शनाची आवड, वक्रोक्ति, मूर्तिमंत गंभीरतेलाहि हंसविणारा विनोद हे आहेत. कोल्हटकरांच्याहि प्रतिभेच्या टांकसाळींत सुंदर कल्पनांचीं सुवर्णाचीं नाणीं पाडलीं जातात, पण हिंदुस्थानांतील टांकसाळीप्रमाणें खुद्द ‘ सरकार’ची लहर लागेल तेव्हां ! एरवीं नित्य व्यवहारांतील चलनी नाणें म्हटलें म्हणजे हास्यजनक वस्तुस्थितिविपर्यास हेंच होय. गडकऱ्यांची त्यांतल्या त्यांत आवड पाहिली तर ती कोल्हटकरांच्या प्रतिभेकडे अधिक झुकते. परंतु व्यवहाराकरितां मार्ग एकाचे व ‘ आदरार्थे ’ गुरुत्व दुसऱ्याचें असले प्रकार केवळ वाङ्मयसृष्टींतच दिसतात असें नाहीं. गडकऱ्यांच्या ‘ वाग्वैजयंती ’ तील कांहीं थोडे मणि केशवसुती घाटाचे असले तरी कोल्हटकरी घाटाच्या मण्यांची संख्याच एकंदरीनें अधिक भरेल असें मला वाटतें. वाचकाला वाचतांना हंसूं येईल किंवा चमत्कृति वाटेल अशी केशवसुतांची एकहि कविता दाखवितां येणार नाहीं. उलट प्रस्तुत कवितासंग्रहांतील गडकऱ्यांची एकहि कविता बहुधा अशी नाहीं, कीं जी

वाचीत असतां तोंडाची सुरकुती मोडणार नाहीं. विचाराच्या शुभ्र चेहे-ऱ्याला विकाराची तीट लावल्याशिवाय त्याचें खरें सौंदर्य खुलत नाहीं या मताचे गडकरी होते.

तरीहि माझ्या मतें गडकऱ्यांच्या विनोदी उच्छृंखल प्रतिभेला नाटकांतून जें स्वातंत्र्य मिळालें तें त्यांना त्यांच्या कवितांतून मिळालें नाहीं. याचें कारण उघडच आहे. नाटकांत एकच कल्पना अनेकरूप करण्याला संभाषण, नेपथ्य नाट्य व मार्मिक प्रेक्षकांच्या मनांतून उठणारा अनुरणनाचा ध्वनि इतकी सामुग्री मिळते. काव्याचें क्रीडांगणच मुळीं मर्यादित असतें; नाटक म्हणजे विनोदाला ती एक तर्फेची सतारच होय; काव्य ही केवळ विनोदाच्या दृष्टीनें एकतारी होय. एकतारी वाजवूनहि भजन करितांना समाधि लागूं शकेल, पण तर्फेच्या सतारीवरची विनोदाची रागदारी तिच्यावर वाजवितां येणार नाहीं. तरी पण या एकतारीवर आणि यमक व वृत्त यांचीं बंधनें सोसूनही गडकऱ्यांनीं आपल्या कवितांतून विनोदाचा पिंगा घातला आहे. उदाहरणार्थ:—' एक समस्या, ' ' विहिणींचा कल-कलाट, ' ' विचार,' ' काय ' करावें ? ' आंधळ्यांची माळ ' व ' हुकमे हुकूम ' या कविता वाचल्या असतां काव्यहि विनोदाच्या कार्याला कसें खेचून आणतां येतें हें दिसून येईल. इंग्रजींत हूड कवीची कविता एथून तेथून श्लेषयुक्त किंवा विनोदपर आहे. पण तुलना करावयाची तर गोविंदाग्रज व हूड यांची न करितां गंभीर व विनोदी अशी मिश्र कविता करणाऱ्या पोपचीच तुलना करावयास पाहिजे. पोपच्या डन्सिअड-प्रमाणें मराठी वाङ्मयांतील ' शंखांचा बाजार ' अशा स्वरूपाचें एक काव्य गडकरी लिहिणार होते असें समजतें. पण कदाचित् पोपइतका विद्वेषी गडकऱ्यांचा स्वभाव नसल्यामुळें म्हणा किंवा ' कवींचा कार-खाना ' या त्यांच्या विनोदी लेखांत या बाजाराचा थोडासा भाग दाख-विला असल्यामुळें म्हणा त्यांनीं हात आंखडता घेतला असावा.

पण गडकऱ्यांचें खरें कवित्व पहावयाचें तर तें या विनोदी कवितांतून जितकें सांपडेल त्यापेक्षां त्यांच्या इतर कवितांतूनच तें अधिक सांपडेल असें मला वाटतें. त्यांच्या काव्यांतील अस्सल प्रतिभाजन्य कल्पना मग त्या गोड असोत, गंभीर असोत, भीषण असोत; पहावयाच्या तर ' गोड निराशा, ' ' विरामचिन्हें, ' ' गुलाबी कोडें, ' ' घुबड ' ' भुतांचें गाणें, '

'बागेंत बागडणाऱ्या लहानग्या लाडक्यास,' व 'कधीं' वगैरे कविता वाचकांनीं वाचन पहाव्या अशाच इतरहि आणखी कांहीं आहेत.

रसाच्या दृष्टीनें पाहतां गडकऱ्यांचे काव्यवाणीत प्रेमळपणाहि ठिकठिकाणीं दिसून येतो. 'प्रेमसंन्यास' किंवा 'पुण्यप्रभाव' या त्यांच्या नाटकांत प्रेक्षकांस रडावयास लावणारे जे कांहीं प्रवेश आहेत त्यांच्याच तोडीच्या कांहीं कविता या कवितासंग्रहांत आढळतील. 'राजहंस माझा निजला' ही कविता तर लहान मुलांच्याहि तोंडीं बसली आहे; पण 'घुंगुरवाळा,' 'प्रेमाचा प्रळयकाळ,' 'मुरली,' 'अवेळीं ओरडणाऱ्या कोकिळेस' वगैरे कवितांतून केवळ करुणरसच नव्हे, पण सर्वसामान्य प्रेमळपणा दिसून येतो.

तिसरा एक विशेष प्रकार गडकऱ्यांच्या कवितेंत आढळतो. त्याला 'शाहीरशाही' हें नांव मला द्यावेसें वाटतें. गडकऱ्यांचा बखरी, पोवाडे, लावण्या वगैरेंचा अभ्यास फार करून झालेला होता. 'सगनभाऊ', 'प्रभाकर,' 'तुळशीराम' 'होनाजी बाळ' वगैरेंचा उल्लेख त्यांनीं महाराष्ट्र गीतां'त इतर कवींबरोबर केलेला असला तरी या चौघांच्या कवितेइतकें वाचन दुसऱ्या महाराष्ट्र कवींचें त्यांचें झालें नसावें. गडकऱ्यांना जुन्या मराठी भाषेचा अलीकडे विशेष नाद लागलेला असून त्यांनीं त्या भाषासांप्रदायाचें पुनरुज्जीवन करण्याचा जोराचा प्रयत्नहि चालविला होता. कांहीं वर्षांपूर्वीं गडकऱ्यांनीं आपल्या 'राजसंन्यास' नाटकांतील कांहीं प्रवेश मला वाचून दाखविले; त्यांत या नवीन सांप्रदायाचा त्यांचा अभ्यास इतका दिसून आला, कीं कांहीं कांहीं वाक्यें अर्थ समजण्याकरितां मला त्यांजकडून दोन दोनदां वाचून घ्यावीं लागलीं. रंगभूमीवर हें नाटक चालू असतां प्रेक्षकांस ही भाषेची अडचण भासल्याशिवाय राहणार नाहीं, असेंहि मी त्यांना म्हटलें. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, शाहिरांच्या काव्याचा अभ्यास त्यांनीं फार केला होता व प्रस्तुत कवितासंग्रहांतील 'प्रेम आणि मरण,' 'मुरली', 'कुंडल' वगैरे कवितांतून हें दिसून येतें. 'महाराष्ट्रगीत' ही कविता अभिमानावेशानें ओथंबलेली आहे. ही कविता अर्धवट राहिलेली असून कोणा महाराष्ट्रप्रेमी कविला

पूर्वीच्या धोरणानें पुरी करण्याची बुद्धि झाल्यास महाराष्ट्रांत सभातून वगैरे म्हणण्याला ती उपयोगी पडेल.

गडकरी यांनीं आपल्या कवितांतून कांहीं नवीन शब्दसांप्रदाय निर्माण केलेले आहेत. उदाहरणार्थ, ' अश्रूंची मोहनमाळ, ' ' फुलती दुनिया, ' ' गाणें झुळझुळणें, ' ' गाणें उधळणें, ' 'जिवाची रास, ' ' जिवाची झूल ' इत्यादि. भूगर्भांत ज्याप्रमाणें उष्णता व दडपण यांच्या योगानें ओबड-धोबड पण सतेज हिऱ्याचे दगड बनतात तसेच प्रतिभेची उष्णता व छंदोबद्धतेचें दडपण यांच्या योगानें काव्यांतहि शब्दहीरक बनतात. त्यांतूनहि गडकरी हे नवीन शब्दरचनेला न भिणारेच काय पण साधल्यास ती हटकून करण्याचा हव्यास धरणारे असल्यानें त्यांच्या कवितेंत न कापलेलें किंवा न घांसलेलें असें जवाहीर सर्वत्र उधळलेलें आढळतें.

प्रस्तुत लेख हा प्रस्तावनारूप आहे. टीकारूप नाहीं. तथापि गडकऱ्यांच्या काव्यरचनेंतील ठळक दोषहि जातां जातां सांगण्यास हरकत नाहीं. ते असे, कीं क्वचित् ठिकाणीं व्याकरणदृष्टया त्यांची भाषा अशुद्ध तर असतेच; पण क्वचित् अव्यवस्थित रचना, कांहीं ठराविक शब्दांची व कल्पनांची पुनरुक्ति, ग्राम्य शब्दप्रयोग व उत्प्रेक्षातिरेक हेहि त्यांचे हातून घडून येतात. तसेंच कांहीं कविता बऱ्याच क्लिष्ट आहेत; व सर्वसामान्यपणें मुख्य दोष सांगावयाचा तर कल्पनांची शब्दांवर जबरी, त्यामुळें येणारी कृत्रिमता व प्रसादाभाव हा होय. या दृष्टीनें रे. टिळक, ठोमरे किंवा स्वतः गडकऱ्यांनीं मानलेले गुरु केशवसुत यांची दिशा व स्वतः गडकऱ्यांची दिशा या अगदीं भिन्न वाटतात. इंग्रजी कवीची उपमा द्यावयाची तर गडकऱ्यांचें काव्य वर्डस्वर्थ किंवा टेनिसन यांपेक्षां शेले किंवा ब्राउनिंग यांच्या वळणाकडेच अधिक झुकतें.

तथापि हे दोष असूनहि कवि या नात्यानें आधुनिक वाङ्मयांत गडकऱ्यांना फार उच्च प्रतीचें स्थान मिळालें आहे यांत शंका नाहीं; व तें योग्यहि आहे. कल्पनेचें धाडस व चमत्कृति हा जर काव्याचा एक मुख्य गुण मानला तर त्या बाबतींत गडकऱ्यांची बरोबरी करणारे कवि किती निघतील, असा प्रश्न टाकण्यास मुळींच हरकत नाहीं. त्यांच्या नाटकांच्या आधारानें व स्वतंत्रहि गोविंदाग्रजांची कविता लोकांच्या जिव्हाग्रीं बसून खेळती झाली आहे. आणि ज्यांच्याकडे बोट दाखवून जुन्या नव्या कवितेचें

भांडण भांडण्याला आणि आधुनिक मराठी कवितेची तरफदारी करण्याला जोर येतो अशा कवींत गडकऱ्यांची गणना बरीच प्रामुख्यानें करितां येईल. गडकरी यांचें कविचरित्र एखाद्या धूमकेतुप्रमाणें अकल्पित व तेजस्वी होऊन गेलें. पण धूमकेतूच्या तेजापेक्षां गडकऱ्यांची काव्यकीर्ति त्यांच्या पश्चात् अधिक काळ टिकेल यांत शंका नाहीं. ‘ नवकवितेच्या जरि-पटक्याचा तुलाच अधिकार ’ अशा शब्दांनीं गडकऱ्यांनीं बालकवि ठोमरे यांना आपल्या काव्यांत भूषविलें आहे. उदारबुद्धीचें हें देणें इतर कविहि कांहीं काल गोविंदाग्रजांस देऊं इच्छितील असें मला वाटतें. कारण, सुदैवानें सरस्वतीच्या जरिपटक्याच्या मानांत तरी वतनदारी होऊं शकत नाहीं.

---

## १५ तांबे यांची कविता

कोणत्याहि प्रस्तावनेचा प्रकार व उद्देश ग्रंथपरिचय करून देण्याचाच असतो, तथापि तिच्या मुळाशीं असणाऱ्या भावना निरनिराळ्या प्रकारच्या असूं शकतात. समजा कीं, एखाद्या प्राचीन किंवा जुन्या पिढीच्या सर्वमान्य ग्रंथाला काव्याला किंवा लेखसंग्रहाला आपण प्रस्तावना लिहीत असलों तर आपली भावना कशी असते ? मला वाटतें, ती कृतज्ञतेची व अत्यंत आदराची असते. श्राद्धकर्मांतील पितृपिंडांपुढें आपल्या परिवारासह साष्टांग प्रणिपात करणाऱ्या यजमानाप्रमाणें, प्रस्तावनालेखक हा स्वत: नव्या पिढीच्या वाचकांसह, प्रस्तावनेच्या रूपानें, नमस्कार घालून ग्रंथकारांच्या गोत्रवृद्धीचा आशीर्वाद मूळ ग्रंथकाराकडून कृपाप्रसाद म्हणून मागत असतो. उलट एकाद्या तरुण होतकरू ग्रंथकाराच्या अभिनव कृतीला प्रस्तावना लिहिणाराच्या मनांत केवळ वात्सल्याची भावना असते. आपलें किंवा आपल्या इष्टमित्राचें एखादें गोजिरवाणें आनंददायक बालक हातांत धरून तें जेव्हां कौतुकानें आपण पाहुण्यापुढें उभें करून दाखवितों तेव्हां जी आपली भावना असते तीच वरील प्रकारची प्रस्तावना लिहितांना तुमची आमची असत नाहीं काय ?

पण समकालीन समवयस्क व समव्यवसायी अशा ग्रंथकाराच्या ग्रंथाला प्रस्तावना लिहितांना मनांत येणारी भावना आदरबुद्धीप्रमाणें विनयभरित

किंवा वात्सल्याप्रमाणें श्रेष्ठ भाव विशिष्ट असत नाहीं. तर या तिसऱ्या प्रकारांत बंधुभावनाच मुख्य असते. एका भावंडाची ओळख करून देतांना त्याच्या मनांत जें बरोबरीचें नातें आणि ममत्व असतें तेंच प्रस्तुत श्री० तांबे यांच्या या कविताग्रंथाला प्रस्तावना लिहितांना माझेही मनांत आहे येवढें सांगितलें असतां पुरे होईल. तांबे यांच्या कवितांचा पहिला भाग प्रसिद्ध झाला त्याच वेळीं त्याला प्रस्तावना लिहिण्याविषयीं प्रो० मायदेव यांनीं मला विचारलें होतें व मींही होय म्हटलें होतें. पण माझ्या इतर व्यवसायांच्या गर्दीमुळें तो योग आला नाहीं व ' तुम्ही मजकरितां ग्रंथप्रकाशनाला विलंब करूं नका ' असें मायदेव यांना मींच सांगितलें. त्यानंतर एका वर्षापूर्वी श्री० तांबे यांनीं माझ्या भेटीला येण्याची कृपा केली व स्वत: त्यांच्या तोंडून त्यांच्या कांहीं कविता ऐकण्याचा आनंद मला लाभला तेव्हां प्रस्तुत कवि व त्यांची कविता यांचा व माझा परिचय अधिक दृढ झाला. म्हणून हा दुसरा भाग प्रसिद्ध होण्याच्या वेळीं ' अज्ञातवासी ' यांनीं प्रस्तावना लिहिण्याविषयीं फिरून मला विचारलें, तेव्हां ती गोष्ट मीं आनंदानें मान्य केली व ती पार पाडण्याकरितां हे दोन शब्द लिहीत आहें. पूर्वीच्या भागाला प्रस्तावना लिहितांना प्रो० पटवर्धन यांनीं अशी कल्पना केली आहे कीं, तांबे यांची कविता ही नववधूप्रमाणें सासरीं जावयास निघालेली असून स्वतः त्यांची प्रस्तावना ही तिची पाठराखणी होय. पण वधू गुणवती असल्याशिवाय कोणचीही पाठराखणी तिची पाठ राखून किती राखणार ? त्यांतूनही तांबे यांची कविता–वधू त्याच वेळींही इतकी प्रौढ व सासरच्या माणसांच्या इतक्या पूर्व परिचयाची होती कीं, मला वाटतें सुनेनें गृहप्रवेश करितांच संदर गांठली असेल, व पाठराखणीला काम नसल्यानें तिला दळणकांडणाच्या सोप्यांत डाळ तांदूळ निवडीत बसावें लागलें असेल. प्रस्तुत प्रस्तावना लिहितांना मीं तांब्यांच्या कवितेशीं बंधूचें नातें लाविल्यानें तिच्याबरोबर माझाही सदरेवर प्रवेश होऊन व्याहीपणाच्या मानाचा पानविडा मिळण्याची आशा मला बाळगतां येईल. मात्र समारंभाच्या महत्त्वाला अनुसरून या नववधूकडेच सदरेवरील सर्व सभेचें लक्ष जाईल आणि तिचें कौतुक झालेलें पाहण्याचा आनंद मात्र मला मिळेल अशी मला खात्री वाटते.

प्रस्तुत कवीचें जीवनवृत्त व त्याच्या कवितांचे मुख्य गुणधर्म व मर्म

या दोनही गोष्टींचें ज्ञान प्रो० मायदेव यांनीं पहिल्या भागाच्या प्रारंभीं वाचकांस करून दिलें आहे. मायदेव हे शिष्य व तांबे हे त्यांचे गुरु असें त्यांचें नातें असल्यामुळें मायदेव यांनीं तांबे यांची कविता एकत्र करून छापण्याचा उद्योग केला तो फार स्तुत्य असून प्रो० पटवर्धन यांनीं आपल्या प्रस्तावनेंत मायदेव यांना कवितेचे छोटे 'काका' असें म्हटलें आहे तें खरोखरच योग्य आहे. तांब्यांची कविता प्रसिद्ध असली तरी तिला संग्रहाचें स्वरूप देण्याचे कामीं मायदेव यांनीं आपलेपणानें किती खटपट केली हें मला माहीत आहे. आणि ही गोष्ट मायदेव यांच्या अंगीं गुरुभक्तीप्रमाणें स्वयंभू रसिकता व सहृदयता आहे म्हणूनच घडली एरवीं ती घडती ना.

मायदेव यांनीं पहिल्या भागाला लिहिलेल्या आपल्या प्रस्तावनेंत तांबे यांच्या कवितेच्या अंतरंगांत शिरून जें विवेचन केलें आहे त्याहून मला अधिक कांहीं लिहितां येईल असें मुळींच वाटत नाहीं. माझ्या दृष्टीनें तांबे यांच्या कवितेंत प्रेमळपणा तर आहेच परंतु त्याच्याच बरोबरीनें तत्त्वसंशोधनाची जिज्ञासाही आहे. तत्त्ववेत्ता हें संशोधन नीरस अशा कार्यकारणसंबंधाच्या चर्चेनें करतो; आणि कवि तेंच कार्य मनांत एकदम स्फुरणाऱ्या सत्यतत्त्वाला काव्यवाणीच्या अल्लड उद्गारांनीं प्रगट स्वरूप देऊन करितो. तांबे यांच्या कवितेवर तत्त्वज्ञानाची झांक असली तरी स्वतंत्र प्रतिभेची झांक त्याहूनही अधिक तजेलदार आहे. शब्द तर खरोखरच फार वेचक व विषयवर्णनाला उचित असेच पडतात. कृत्रिमपणा असा कोठेंही दिसत नाहीं. शब्दांचा कानांवर पडणारा आवाज आणि मनाला वेधणारा त्यांचा अर्थ यांची सांगड त्यांनीं घातलेली अनेक ठिकाणीं दाखवितां येईल. पृष्ठ २४ यावरील 'रुद्रास आवाहन' हें त्यांतल्या त्यांत नांव घेऊन सांगण्यासारखें उदाहरण आहे. कित्येक कवितांतून गूढ विवेचन असल्यासारखें भासतें. पण अतींद्रिय गोष्टींचें आकलन मनानें करून तें प्रगट करितांना अनियमबद्ध अशी धडपड करावी लागते, आणि उद्गार अपुरे पडून प्रत्यक्ष दिसतें त्यापेक्षां कल्पनेनें ओळखण्यासारखें अधिक आहे ( अर्थात् मनुष्यशक्ति अपूर्ण व दुर्बल होय ) अशी कबुली कवीलाही द्यावी लागते, त्यामुळेंच अशा कवितांना शून्यसंशोधनाचें स्वरूप येतें. पण या शून्यसंशोधनांतही गूढ अशा गोष्टी कवीला खरो-

खरच कांहीं दिसतात कीं नाहीं, किंवा शून्यसंशोधनाचा बहाणा करून कवि उगीच कांहीं वायफळ बडबड करीत आहे कीं काय, हें चाणाक्ष वाचकाला तेव्हांच उमगतें. पिंपळाच्या पानाला तेल व काजळ लावून करपुतळीचा खेळ करणारा तेंच पान अनेकांच्या हातीं देतो. अर्थात् आंत पाहून जें ' दिसतें ' तें त्या पानांत असत नाहीं तर पाहणारा स्वतः आपल्या अंतर्ज्ञानांतूनच तें काढीत असतो. असें असतांही एखादा कर-पुतळींतील चमत्कारांचें सुसंबद्ध व सुरस असें वर्णन करतो, आणि दुसरा कुत्र्याचे पाय मांजराला लावून कांहीं तरी असंबद्ध असें बडबडतो हा अनुभव सर्वांनाच आहे.

तांबे यांची बरीचशी कविता गातां येण्यासारखी आहे. चांगला गवई कांहींही गाऊन दाखवूं शकतो हें वेगळें. तथापि त्यांतल्या त्यांत शब्द यमक व विराम यांची अनुकूलता प्रतिकूलता यांमुळें गाण्यांत फरक पडणारच. त्या दृष्टीनें पाहतां तांबे यांची कविता गवयाला अधिक सोपी जाईल असें वाटतें. अशी कविता पहिल्या भागापेक्षांही दुसऱ्या भागांत अधिक आहे. कवितेच्या शिरोभागीं अमुक एक राग लिहिला म्हणजे ती त्याच रागांत गाइली पाहिजे असा निर्बंध नसतो. तथापि या भागांत बहुधा प्रत्येक कवितेवर रागाच्या नांवाचा निर्देश केलेला आहे आणि स्वतः हा कवि, त्याचा गळा विशेष गोड नसला तरी, रागदारीच्या चाली शुद्ध स्वरूपांत म्हणून दाखवूं शकतो हें मीं पाहिलें आहे. म्हणून त्या त्या कविता त्या त्याच रागांत म्हटल्या गेल्यास कवीच्या अंतरंगांतील भावना–चित्र अधि-कांत अधिक यथार्थतेनें प्रगट होईल असें वाटतें. असो. प्रस्तावनेदाखल हे अपुरेच पण मनाला पटलेले दोन शब्द लिहून, आणि साहित्य-संमेलनाच्या प्रसंगीं तांबे यांच्या कवितेचा दुसरा खंड प्रसिद्ध करण्याचा योग श्री० ' अज्ञातवासी ' यांनीं घडवून आणला याबद्दल त्यांचें अभि-नंदन करून पुरे करतों.

---

# १६ भावतरंग

( प्रो० वा. गो. मायदेव, एम्. ए. )

प्रो. मायदेव यांच्या कवितांतील कांहीं चुटके पूर्वी मी मधून मधून ऐकले होते; पण आपल्या सर्व कविता एकत्र छापून प्रसिद्ध करण्याच्या प्रसंगानें त्यांनीं या बहुतेक सर्व कविता मला गाऊन दाखविल्या; आणि त्यांना उद्देशूनच खालील दोन शब्द लिहीत आहें. प्रो. मायदेव यांच्या कवितांचा पसारा थोडा असला तरी त्यांत विविधता पुष्कळ आहे. लहान मुलें, कुलीन स्त्रिया, ग्रामवासी स्त्री-पुरुष, शेतकरी यांपासून तों प्रेमळ तरुण व गंभीर तत्वज्ञानी या सर्वांची अभिरुचि संतुष्ट करणाऱ्या कविता या कवितासंग्रहांत सांपडतील. वृत्तांच्या बाबतींत जुनें व नवें या दोन्ही विषयीं समान प्रेम मायदेवांनीं प्रगट केलें आहे. म्हणजे कांहीं कविता अगदीं साध्या जुन्या पद्धतीच्या वृत्तांत रचलेल्या असल्या तर दुसऱ्या कांहीं गायनोपयोगी अशा नव्या चालीवरही रचलेल्या आहेत. या दुसऱ्या प्रकारच्या कवितांसंबंधानें कदाचित् एक गोष्ट अशी घडण्याचा संभव आहे कीं, मायदेव यांनीं त्या स्वतः गुणगुणत रचल्या; परंतु पुष्कळ वाचक त्या सामान्य पद्धतीनें वाचणार, यामुळें त्या गुणगुणत रचतांना जे ठसके व जे आवेशयुक्त उच्चार मायदेव यांनीं केल्यामुळें कवितेचें हृदयंगमत्व स्वतः त्यांना प्रतीत झालें तसें तें सामान्य वाचकाला होणार नाहीं. तथापि भाषा स्वाभाविक, सोपी व कर्णमधुरही असल्यानें वाचकाला वरील प्रकारची हानि फारशी भासणार नाहीं. विचाराच्या दृष्टीनें पाहतां प्रेमळपणा व शुचिर्भूतपणा आणि कलेच्या दृष्टीनें कृत्रिमतेचा अभाव हे मुख्य गुण या कवितांत मला आढळले. तसेंच प्रणयापेक्षां वत्सलता ही त्यांच्या कवितेंत एकंदरीनें अधिक भिनलेली दिसून येईल. वाचतांना मनास लज्जा उत्पन्न करणारा जसा एकही शब्द या कवितांतून सांपडणार नाहीं तसाच दुर्मनस्कता किंवा खेद उत्पन्न होईल असाही शब्द क्वचित् आढळेल. संसारांतील दुःखांना अनुलक्षून एकादी कविता असली तरी निराशा उत्पन्न न करितां ती फक्त अनुकंपाच उत्पन्न करील. विनोदी कवितांचे मासलेही फार चांगले आहेत. स्वतःच्या काव्यानंदांत गढून

गेलेल्या काव्यवेडया नवऱ्याचा उपालंभ त्याच्या नीरस पण प्रांजल स्त्रीनें जींत केला आहे ती कविता हल्लींच्या दिवसांत काव्यप्रिय तरुण पिढीनें नित्य डोळ्यापुढें ठेवण्यासारखी आहे. तसेंच आय्. सी. एस्. नवरा मिळण्याचें ध्येय डोळ्यापुढें ठेवणाऱ्या सुशिक्षित तरुणीचेंही निंदाव्यंजक चित्र चांगलेंच रंगविलें आहे. तसेंच शेतकऱ्यांच्या संबंधानें केलेलीं वर्णनें जर शेतकऱ्यांना गाऊन ऐकविलीं व त्याही पेक्षां त्यांना म्हणण्याला अनुकूल अशा लावण्यांच्या वृत्तांत तीं असल्यामुळें त्यांनाच ती म्हणावयाला शिकविलीं तर त्यांना तो एक नवा आनंदच मिळवून दिल्यासारखें होईल. कारण शेतकरी वर्गही हळुहळूं शिक्षण मिळवूं लागलेला असून ग्राम्य व नागर या वर्गांतील अंतर हळुहळूं तुटत चाललें आहे. सीता, देवकी, शबरी यांचे उद्गार गोंविलेल्या कविता स्त्रियांच्या तोंडीं भक्तिभावानें खेळण्यासारख्या आहेत. प्रो. मायदेव यांना कविवर्य तांबे यांच्या कवितांचें प्रेम फार आहे हें मला माहीत नसतें, तरी ढब व अभिरुचि यांच्या दृष्टीनें मायदेव यांची कविता त्यांच्या आवडत्या कवीच्या काव्याला जुळती आहे असेंच मी म्हटलें असतें. गाऊन दाखविण्याच्या दृष्टीनें यांतील कोणतीही कविता फार लांब नाहीं हा तिचा गुणच म्हणावासा वाटतो. तसेंच मुलांनीं म्हणण्यासारख्या कविता फार चांगल्या असून त्या प्राथमिक शाळांच्या समारंभांमधून अवश्य उपयोगांत आणल्या जाव्या. प्रो. मायदेव यांच्या कवितेंत भरारीच्या कल्पना व नवीन उपमादि अलंकार फार नसले तरी त्यांच्या काव्य रचनेंत ठाकठिकपणा असून भावना खोल असते. अशा रीतीनें या संग्रहाचें सामान्य स्वरूप वाचकांच्या निदर्शनास आणलें तरी त्यांच्या कवितांचे चांगले नमुने खालील कवितांचा विशेष रीतीनें उल्लेख करून वाचकांनीं त्या अवश्य वाचाव्या अशी मी शिफारस करितों. " गाई घरां आल्या, ' ' जगीं गरिबांचें नाहिं कुणी वाली, ' ' बाइल बाळापुन नाहीं ' ; ' बाळा व भामा ', ' खडी फोडणारा ', ' हा हिंद देश माझा, ' ' खचतो माझा धीर ', ' इरलेवाली ', ' सुंदरी ', ' गोफणवाली ', ' तिथें माझी असणार नाहिं आई ', ' अशी कशी ', ' पांखरू ', ' जरा तरी बघ हंसून ', ' आंसवें येती मन्नयनीं ', वगैरे. तथापि ज्यांना या कविता स्वत: मायदेव यांच्या तोंडून ऐकण्याला मिळण्यासारख्या असतील त्यांनीं तर ती संधी कधींही दवडूं नये, असा

इषाराही मी देतों. कारण त्यांच्या कविता नुसत्या वाचल्यानेंही जरी गोडी येईल, तरी त्यांच्या मधुर कंठांतून निघालेल्या त्या ऐकल्या म्हणजे ती गोडी दसपट वाढते.

---

## १७ संसारशास्त्र

'**संसारशास्त्र** अथवा **मानवी जीवितार्चीं सूत्रें**' हा ग्रंथ मराठी वाचकवर्गापुढें मीं मांडावा, अशी रा. वैशंपायन यांनीं इच्छा प्रदर्शित केल्यावरून मीं तें काम मोठ्या आनंदानें पत्करिलें. सदर ग्रंथाचें महत्त्व केवळ आंतील मौल्यवान् मजकुरावरून कोणाच्याहि ध्यानीं येईलच; आणि कोणत्याहि ग्रंथाचें स्वारस्य समजण्यास किंवा त्याचे गुण घेण्यास ग्रंथाविषयीं किंवा ग्रंथकाराविषयीं अवांतर बाह्य स्वरूपाची माहिती नसली म्हणून कांहीं अडत नाहीं. पण अशा प्रकारची माहिती कळली असतां ती वाचकांस प्रियच वाटते. रा. वैशंपायन यांच्या प्रस्तावनेंत मूळ ग्रंथ व ग्रंथकार यांच्याविषयीं जी माहिती आली आहे, ती ग्रंथाविषयीं एरवींहि वाटणारी आदरबुद्धि अधिकच दृढ करिते. आणि कोणा एका हिंदी ब्राह्मणानें लिहिलेला हा ग्रंथ शेंकडोंशें वर्षांनीं फिरून हिंदुस्थानास परत मिळाला, या विचारानें त्याविषयींचें कौतुक शतपट वाढतें यांत शंका नाहीं. कोणच्याहि कोशांत किंवा शरीरांत असला तरी आत्मा हा सुरक्षित व शुद्धच राहतो, त्याप्रमाणें प्रस्तुत ग्रंथांतील बोध चिनी इंग्रजी किंवा मराठी कोणत्याहि भाषेंत असला तरीं वाचकांस एकसारखाच रम्य व आनंदकारक होणार यांत शंका नाहीं.

प्रस्तुत ग्रंथ जर खरोखर हिंदी ब्राह्मणानें लिहिलेला असेल तर तो वेदान्तमताचा प्रसार होण्यापूर्वीं लिहिला असावा, व म्हणूनच त्यामध्यें धर्म व परमार्थ यांना द्यावयाचें तें महत्त्व देऊनहि संसारशास्त्राचा इतका सूक्ष्म विचार केलेला आहे असें दिसतें. जी गोष्ट रागतः प्राप्त तिचा उपदेश करण्याचें कारण नाहीं, व जी गोष्ट रागतः प्राप्त नाहीं तिचाच काय तो उपदेश करणें जरूर आहे, या तत्त्वावर आपल्याइकडे निवृत्तिपर वाङ्मयाची रेलचेल झालेली आढळते. पण संसार रागतः प्राप्त असला

तरी तो सशास्त्र करणें हें कर्म महा कठिण आहे; याकरितां केवळ संसार-यात्रेला अनुलक्षून ऐहिक गोष्टींविषयीं मनुष्याला जितका उपदेश करावा तितका थोडाच असतो. संसार हा निःसार आहे असें जन्मभर तोंडानें म्हणत पण संसारांत आसक्ति ठेवून पावलोंपावलीं आपल्याच कृतीनें आपल्या शब्दाचें खंडन करीत जन्म घालविणारे लोक इतर कोणत्याहि देशापेक्षां हिंदुस्थानांत अधिक भरतील असें मला तरी वाटतें. पण ईश्वरसृष्टींत जर खरोखर माया म्हणून कोठें असेल तर ती संसार मायामय आहे असें नुसतें तोंडानें म्हणण्यांतच आहे. पण तें कसेंहि असलें तरी संसारांत राहून आचरण कसें ठेवावें, याविषयीं प्रवृत्तिपर असे ग्रंथ आपणांस आज जरूर पाहिजे आहेत, व रा. वैशंपायन यांनीं अशा प्रकारचा एक ग्रंथ मराठी वाचकांस मिळवून दिला, याबद्दल मीं त्यांचें अभिनंदन करितों. त्यांनीं वडिलार्जित ज्ञानद्रव्याचा एक मौल्यवान् निधि परत मिळविल्यानें, एका प्राचीन पूर्वजाच्या कृतीचा उद्धार करून आपल्या अर्वाचीन बांधवांना मोठा लाभ घडविला, आणि अशा रीतीनें दुहेरी श्रेय मिळविलें यांत शंका नाहीं.

---

## १८ मयूर काव्यविवेचन

कविवर्य मोरोपंत यांजविषयीं चरित्रात्मक व चर्चात्मक असे अनेक ग्रंथ आजवर झाले आहेत. त्यांत आज एका नव्या ग्रंथाची भर पडत आहे हें पाहून मनाला अतिशय संतोष होतो. ही भर फारच मौल्यवान आहे. कारण चरित्र नव्हे पण निवळ चर्चेच्या दृष्टीनें लिहिल्या गेलेल्या मोरोपंत-विषयक कोणत्याहि ग्रंथापेक्षां हा ग्रंथ अधिक पूर्ण, भरदार, चिकित्सक व सिद्धांतसंपन्न झाला आहे असें मला वाटतें.

ग्रंथकारानें घेतलेली मूळ भूमिका बोलून चालून मर्यादित आहे. श्रीमद्भागवताच्या आधारें मोरोपंत कवीनें जीं निरनिराळीं काव्यें लिहिलीं त्यांचेंच केवळ अंतर्बाह्य निरीक्षण करणें हा ग्रंथकर्त्याचा मूळ हेतु, निदान त्यानें आखून घेतलेलें कार्य होतें. परंतु या काव्यग्रंथाचें सूक्ष्म खोल व तुलनात्मक परीक्षण करण्यास कोणीही मनुष्य प्रवृत्त झाला असतां, अनि-

च्छेनेंहि त्याची कार्यमर्यादा वाढावी व मूळ न योजिलेल्या अशाहि विषयांच्या चर्चेत त्यानें प्रथम न कळत शिरावें पण मग तेथेंच हौसेनें रमावें, असें होणें अगदीं स्वाभाविक आहे. नदीमुखानें समुद्रांत शिरण्याचाच हा एक प्रकार होय. याच्या उलटहि प्रकार वाङ्मयसेवेंत आपल्या दृष्टीस पडतात! म्हणजे आरंभीं मांड चौफेर विस्तृत मांडावयाचा. पण शेवटीं अपूर्ण एकांगीं व मोडकें तोडकें असेंच विवेचन निष्पन्न व्हावयाचें. अशा प्रकारापेक्षां प्रस्तुत ग्रंथांत आढळून येणारा प्रकार अधिक अनुकरणीय ठरेल.

ग्रंथाच्या प्रथमार्धांत चार विभागांत मिळून ग्रंथकारानें प्रारंभीं उद्देशिलेलें कार्य समाप्त केलें आहे. पैकीं पहिल्यांत भागवताची योग्यता व भागवताचे अनेक मराठी अवतार, दुसऱ्यांत भागवती काव्यांचें बाह्यांग निरीक्षण, तिसऱ्यांत भागवतविषयक काव्यें लिहितांना पंतांनीं स्वीकारलेली भूमिका व मनांत धरलेला उद्दिष्ट हेतु हे विषय आहेत; आणि चौथ्यांत मूळ संस्कृत ग्रंथ व त्याची प्राकृत काव्यमय प्रतिकृति यांचें तुलनात्मक अंतरंगनिरीक्षण स्कंधानुक्रमानें करण्यांत आलेलें आहे. भागवत ग्रंथ हा अगदीं आधुनिक आहे असा जो अपसिद्धांत कित्येकांनीं काढलेला आहे तो खोडून टाकून त्याचें प्राचीनत्व ग्रंथकारानें प्रथम विभागांत निदर्शनास आणलें आहे. नंतर भागवताला जनतेवर प्रेमसाम्राज्य कां स्थापितां आलें व त्याच्या स्फूर्तीचा उपयोग अनेक भक्तसांप्रदायाला कसा झाला हें त्यानें दर्शविलें आहे. भागवताच्या मानानें श्रीमद्‌भगवद्‌गीतेला लोक अधिक महत्व देतात ही गोष्ट ग्रंथकर्त्याला सयुक्तिक वाटत नाहीं असें दिसतें. परंतु भगवद्‌गीता हा ग्रंथ लहान असला तरी तो किती व्यापक आहे, आणि श्रीमद्‌भागवतानें पुरस्कृत केलेला भक्तिमार्ग हा गीतेनें परामृष्ट केलेल्या अनेक मार्गांपैकीं किंवा साधनांपैकीं फक्त एक साधन आहे. शिवाय गीतेनें अध्यात्म व्यवहार या दोहोंची संगति लावण्याचा केलेला प्रयत्न हा भागवतांतील केवळ भक्तिरसवर्णनापेक्षां तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें अधिक श्रेष्ठ कां ठरतो हें ग्रंथकाराचे लक्षांत सहजच आलें असतें. किंबहुना गीता व भागवत यांची भूमिका व उद्देश हे वेगवेगळेच असल्यानें, भगवद्‌गीतेला शिरीं धरून सुशिक्षित लोक भागवताला त्यापेक्षां कमी महत्त्वाचें कां मानितात याचा तुलनात्मक विचार उपस्थित होतच नाहीं असें मला वाटतें. बाकी भक्तिरसाचें प्रेमळ खुलासेवार वर्णन, सगुण हरिकथानिरूपण, व

आख्यानोपाख्यानें यांची गोडी सामान्य मनुष्याला सहजच विशेष असते या दृष्टीनें भागवताचा उपयोग प्राकृत कवींनीं गीतेपेक्षां अधिक करून घ्यावा हें स्वाभाविकच आहे.

भागवताचा उपयोग आपल्या काव्याला करणाऱ्या कवींमध्यें मोरोपंत हे अधिक श्रेष्ठ आहेत हें दुसऱ्या विभागांत ग्रंथकारानें सिद्ध केलें आहे. नंतर प्रत्येक स्कंध घेऊन मूळचा ग्रंथसंभार व तद्विषयक मोरोपंती काव्य यांचें परस्पर प्रमाण किती पडतें, व त्यावरून मूळ ग्रंथांतील तात्पर्य तर सोडावयाचें नाहीं पण त्याची प्राकृत प्रतिकृति शक्य तितकी आटोपशीर व प्रमाणबद्ध करावयाची, ही गोष्ट मोरोपंतांनीं कशी साधली हें ग्रंथकर्त्यानें दाखविलें आहे.

तिसऱ्या विभागांत भागवताच्या आधारें काव्य लिहिण्यांत मोरोपंतांचा उद्देश काय होता याचें विवेचन करितांना ग्रंथकारानें असें सांगितलें आहे कीं, तारीफ करावयाची ती मोरोपंतांनीं इतकी पुष्कळ कविता लिहिली याची करावयाची नसून त्यांच्या संक्षेपचातुर्याचीच करावी लागते. भागवत हें जरी पुराण या दृष्टीनें, व त्याची व्याख्या सार्थ होईल अशा रीतीनें, लिहिलें असलें तरी मोरोपंतांनीं आपलें काव्य लिहितांना भागवताचीं पौराणिक अंगें विशेष न नटवितां भगवद्भक्तीचें प्रतिपादन व परमेश्वराचें यशोगान हा हेतु मुख्य ठेऊन काव्यनिर्मिती व कथाकथन हे दुय्यम हेतु म्हणून त्यांनीं डोळ्यापुढें ठेविले आहेत. आपली कविता रसाळ व्हावी व आपण सांगितलेली कथा पाल्हाळिक नसावी असें धोरण त्यांनीं ठेविलें होतें यामुळें राजवंशवर्णनें, आध्यात्मविवेचन वगैरे अवांतर गोष्टी त्यांनीं संक्षेपांत आणिल्या. उलट भक्तिसुखाचा आनंद मनसोक्त मिळावा म्हणून कित्येक ठिकाणीं त्यांनीं मूळ ग्रंथांहूनहि अधिक विस्तार केला आहे. एकंदरीनें मोरोपंतांनीं कवीचा निरंकुशत्वाचा अधिकार फारसा गाजविला नाहीं. पण मूळ संभाळून मर्यादित क्षेत्रांत त्यांनीं आपली काव्यबुद्धि हवी तशी खेळविली आहे. तथापि लोक समजतात इतकें मोरोपंतांचें शास्त्राध्ययन खोल नव्हतें असा अभिप्राय ग्रंथकारांनीं व्यक्त केला आहे.

चौथा विभाग हा सर्वांत मोठा असून त्यांत स्कंधानुक्रमानें मूळ भागवतांत काय मजकूर आहे व मोरोपंतांनीं त्यांत घेतलेलें सोडलें काय

किती याचा निर्देश ग्रंथकारानें केला आहे. या विभागांत सर्व भागवताचें तात्पर्यच एक प्रकारें दिलें गेलें आहे. दशमस्कंधाची चर्चा विशेष विस्तारानें केलेली असून कवीनें मुळांतील वर्णनें वगैरे घ्यावीं तितकीं घेतलीं नाहींत व या ठिकाणीं संकोचाचा दुरुपयोग झाला असें म्हटलें आहे. "नैसर्गिक सृष्टिशोभेनें किंवा मानवनिर्मित नगरादि स्थलांच्या शोभेनें मोरोपंतांचें चित्त आकृष्ट करून घेतलें होतेसें दिसत नाहीं." मात्र याचा वचपा अलंकारादि साधनांनीं आपल्या काव्यांत पंतांनीं काढला आहे असें ग्रंथकारानें म्हटलें आहे. एकंदरीनें ग्रंथकाराच्या मूळ उद्देशाप्रमाणें चौथा विभाग हा समर्पक झाला असून भागवत व मोरोपंती काव्य या दोहोंचाहि त्यांत घ्यावा तसा परामर्ष घेतला गेला आहे.

पण पंतकाव्यांचा इतका सूक्ष्म अभ्यास ज्यानें केला त्याचें समाधान केवळ भागवतीकाव्यांचें निरीक्षण करून संपणें शक्य नव्हतें. याकरीतां ग्रंथाच्या उत्तरार्धांत त्यांने इतर अनेक दृष्टींनीं पंतांचीं एकंदर काव्यें जमेस धरून तत्संबंधीं इतर अनेक विषयांची चर्चा केली आहे. पांचव्या विभागांत पंतकाव्याचा कालनिर्णय व त्यावरून अनुमानितां येणारा पंतांच्या काव्यशक्तीचा विकास हा विषय आहे. यांत नवशिकेपणा, प्रौढावस्था, परिपक्वता, व उतारवय असे चार कालखंड कल्पून त्यांतल्या त्यांत प्रौढावस्थेचा काल हाच पंतांच्या कवित्वशक्तीच्या बहारीचा काल असें ग्रंथकर्त्यानें म्हटलें आहे; पण या विभागांतील विषय बराच वादग्रस्त असल्याचीहि जाणीव त्यानें ठेविलेली आहे. सहाव्या विभागांत प्रथम पंतांची भाषाशुद्धि व पंतभाषेचें व्याकरण हे विषय आहेत. पैकीं भाषाशुद्धीसंबंधानें ग्रंथकारानें मोरोपंतांचे जे अपप्रयोग दाखविले आहेत ते अपवादात्मक ठरून पंतांची काव्यरचना प्रायः शुद्ध असते असेंच कोणासहि म्हणावें लागेल. पंतांच्या काव्यांना व्याकरणाचे नियम लागू करतांनाहि हें लक्षांत ठेवावें लागतें कीं, मराठी भाषेचें तत्कालीन असें व्याकरण निश्चित कोणी बनविल्याचें आढळत नाहीं; यामुळें जे अनपेक्षित प्रयोग पंतकाव्यांत आढळून येतात ते विशिष्ट नियमाशीं ताडून पाहतां येणें कठीण, उलट या प्रयोगांच्या आधारानेंच त्याकालीं अमुक प्रयोग हे व्याकरणशुद्ध मानले जात, असेंच कोणीं प्रतिपादन करूं लागल्यास त्याला खोडून काढणें कठीण जाईल! सातव्या

विभागांत पंतांच्या काव्यांतील गुण व दोष या दोघांचीहि सूक्ष्म चर्चा ग्रंथकारानें केली आहे. पंतांचे मुख्य दोष म्हणजे क्लिष्टता, दुर्बोधता, अवघड संस्कृत शब्दांचा उपयोग, दीर्घसमास, दुरान्वय, संदिग्धता, कृत्रिमपणा, बोजडपणा, संस्कृत शब्दप्राचुर्य, श्रुति कटुता, यमक लालसा, मंत्रनियंत्रण, औचित्यहानि, ग्राम्यता, अश्लीलता हे होत; ही यादी बरीच मोठी आहे. यांत शंका नाहीं. तथापि दुसऱ्या बाजूस माधुर्य, पदलालित्य, ओजस्विता, संवादचातुर्य, कथाकथन कौशल्य, भाषाप्रभुत्व, अलंकारवैचित्र्य, वगैरे ठळक गुणहि पंतांच्या काव्यांत आढळतात. ही गोष्ट ग्रंथकारानें सोदाहरण व समर्पक सिद्ध केलेली असून ही चर्चा त्यानें कवीविषयीं योग्य अभिमान न सोडतां पण दोष दाखविण्यास न कचरतां केली आहे. आठव्या विभागांत काव्यतत्वाच्या दृष्टीनें पंतकवितेची चर्चा करण्यांत आलेली असून, या निमित्तानें जुन्या कवितेच्या सामाजिक परिणामाविषयीं असलेल्या प्रचलित मताची चर्चाहि ग्रंथकारानें केलेली आहे.

असो; प्रस्तावना म्हणजे परीक्षण नसल्यानें ग्रंथकाराचीं व माझीं कोणचीं मतें जुळतात व कोणचीं जुळत नाहींत हें खुलासेवार सांगण्याचें येथें कारणच नाहीं. शिवाय प्रस्तुत ग्रंथ वाचीत असतां चिकित्सकतेपेक्षांहि माझें मन कौतुकानेंच अधिक भरून गेलें होतें हें स्पष्ट नमूद करण्यास मला आनंदच वाटतो. कारण इतक्या ताज्या पदवीधरानें इतका विद्वत्तापूर्ण व विवेचक ग्रंथ लिहिलेला माझे पाहाण्यांत नाहीं. विशिष्ट विषयावर संशोधक व चिकित्सक निबंध लिहिणाराला एम्. ए. ची पदवी देण्याचा प्रघात आजपर्यंत मुंबई विद्यापीठांत नव्हता. तो तसा असता व ग्रंथकर्त्यानें हा निबंधग्रंथ त्या परीक्षेकरितां म्हणून सादर केला असता तर त्याला त्याकरितां एम्. ए. ची पदवी सहज मिळाली असती असें मला वाटतें. या ग्रंथाचें सूक्ष्म अध्ययन करणारास हें तेव्हांच दिसून येईल कीं, ग्रंथकारानें भागवत व मोरोपंतांचे ग्रंथ यांचें बरेंच खोल अध्ययन केलेलें आहे. प्रत्येक अनुमान व सिद्धांत सिद्ध करण्याला जो ग्रंथकार प्रत्यक्ष उदाहरणें देऊं शकतो त्याचा पंतकाव्याचा अभ्यास पद्धतशीर रीतीनें केला गेला असला पाहिजे. मतासंबंधानें पाहतां हंस, चिपळूणकर, पांगारकर, परांजपे, पराडकर वगैरे ज्या ज्या लोकांनीं मोरोपंतांविषयीं चर्चा केलेली आहे त्यांच्याशीं जेथें मतभेद झाला तेथें ग्रंथकारानें तो

धीटपणानें बोलून दाखविला आहे. अनादर बुद्धि न बाळगतां मतभेद सविनयपणें स्पष्ट बोलून दाखवून आत्मसमर्थन करणें हें कोणाच्याहि विवेचकबुद्धीला शोभतेंच, पण तरुण व होतकरू ग्रंथकारांना तें विशेष भूषणावह आहे. असा कोणताहि ग्रंथविभाग नाहीं कीं ज्यांत ग्रंथकारानें स्वतःचें मतस्वातंत्र्य राखलें नाहीं. असो; ग्रंथकाराच्या परिश्रमक्षमतेचें मला फारच कौतुक वाटतें. बाह्यांग निरीक्षणांत कवितांच्या ओळींची संख्या मोजण्यापासून तो अंतरंगांतील शब्दध्वनी, शब्दरीती, शब्दव्याकरण, काव्य-गुण, अलंकार इत्यादिकांपर्यंत कोणत्याहि बाबतींत बारीक पहाण्याचें ग्रंथ-कारानें सोडलें नाहीं. आणि कवि मोरोपंतांवर जें चर्चात्मक वाङ्मय आज वर प्रसिद्ध झालें आहे त्यांत या ग्रंथाला जो अग्रमान द्यावासा मला वाटतो तो वरील गोष्टीमुळेंच. शेवटीं मराठी वाङ्मयाचे भक्त व भोक्ते, विशेषतः अधिकारी विद्यापीठ, यांजकडून या ग्रंथाचा योग्य तो परामर्ष घेतला जाईल अशी आशा व्यक्त करून व ग्रंथकाराचें मनःपूर्वक अभिनंदन करून ही प्रस्तावना पुरी करितों.

---

## १९ टिळकांची कविता

महाराष्ट्र भाषेतील आधुनिक कवींपकीं एक प्रमुख कवि, श्रीयुत नारायण वामन टिळक यांच्या त्रयोदश गुच्छात्मक कवितासंग्रहास मीं उपोद्घात लिहावा अशी विनंति मला करण्यांत आली, हा मी माझा एक प्रकारचा बहुमानच समजतों. मी स्वतः कवि नाहीं, किंवा माझें काव्य-विषयाचें अध्ययनहि विशेष नाहीं. अर्थात् टिळकांसारख्या कवींच्या कृतीची ओळख महाराष्ट्रास करून देण्याची पात्रता माझ्या अंगीं कोठची? तथापि, आधुनिक मराठी कवींची तरफदारी करण्याची या रूपानें मला आणखी एक सुसंधीच मिळाली असें मानून, सदर कवितासंग्रहास उपोद्घात लिहिण्याचें मींहि कबूल केलें.

आधुनिक मराठी कवितेविषयीं माझीं मतें पुष्कळांस ग्राह्य वाटत नसलीं, तरी तीं आतां बहुतेकांस माहीत झालीं आहेत. काव्यप्रतिभेचें देणें ईश्वरानें फक्त प्राक्कालीनांसच दिलें होतें असें नाहीं; गेल्या पन्नास वर्षांत

म्हणजे 'आधुनिक' किंवा 'नव्या' मन्वंतरास सुरुवात झाल्यापासून प्रतिभासंपन्न असे कवि महाराष्ट्रांत अनेक होऊन गेले व आहेत. कालमान व ज्ञानविषय बदलल्यानें मराठी काव्यविषय बदलले, आणि कांहीं अंशीं भाषापद्धतिहि बदलली असली तरी प्रतिभागुण कमी झाला आहे असें नाहीं. पन्नास वर्षांच्या मानानें आधुनिक कवितासंग्रह कांहीं अगदींच क्षुद्र नाहीं. भौतिक सुधारणा व पाश्चात्य वाङ्मय यांच्या परिचयानें काव्यप्रतिभा बोथट किंवा मलिन न होतां ती दिवसेंदिवस तीक्ष्ण आणि सतेजच होत जाणार; आजच्या 'नवीन' कवींना समकालीनांकडून जो अन्याय होत आहे त्याची पुरी भरपाई पुढील पिढी खास करील. आणि आधुनिक महाकाव्येंहि लवकरच निर्माण होतील, त्याविषयीं कोणीं चिंता करण्याचें कारण नाहीं. असा माझा दृढ विश्वास आहे. तो पूर्वीं अनेक वेळां मीं व्यक्त केला होता, व तोच फिरून एकवार आनंदानें व्यक्त करितों.

आधुनिक कवितेचे दोष मला दिसत नाहींत असें नाहीं. या कवितेंत जुन्या पद्धतीचे अध्यात्मिक विषय नसतात हा दोष मानितां येईल कीं नाहीं हा प्रश्न वादग्रस्त आहे. तथापि, माझ्यामतें मुख्य दोष हा आहे कीं कविता इंग्रजी Lyric 'वीणाकाव्या'च्या चुकीच्या अनुकरणानें फारच त्रुटित असते. यामुळें कवीच्या प्रतिभेचें तेज चमकून गेलें तरी त्याच्या मनाचा विस्तार किंवा खोली यांची कल्पना तिजवरून होत नाहीं. एका सुवर्णकणांतील सोनें आणि सबंद सोन्याच्या लगडींतील सोनें हीं कसाला सारखींच भरतील; परंतु सोन्याची लगड पाहून त्याविषयीं जी महत्त्वबुद्धि वाटते ती कसोटीच्या दगडाच्या पृष्ठभागास चिकटलेला एकादा कण पाहून वाटत नाहीं. दुसरा दोष हा कीं, राष्ट्र आणि जनता यांच्या जीविताशीं संबद्ध असलेले किंवा त्यांशीं तादात्म्य करून देणारे विषय आधुनिक कवि फारसे घेत नाहींत. यामुळें त्यांच्या कवितेला लौकिक पठनाचें विस्तृत् अधिष्ठान मिळत नाहीं. पूर्वींच्या वेदांती कवितेस किंवा पवाड्यांस असें अधिष्ठान होतें, यामुळें तें काव्य अस्सल राष्ट्रीय असें मानलें जात असे. आजकाल पूर्वींच्या परमार्थविचारपद्धतींत फरक पडला आहे, आणि राष्ट्रीय पवाडे करून गाण्यास स्फूर्ती येण्यासारखी राष्ट्राची स्थिति नाहीं, हें कबूल आहे. तथापि, जनता-

चरित्रगंगेंत अवगाहन करणाऱ्या प्रतिभासंपन्न कवीला नवरसपरिपोषक विषय सांपडणार नाहींत असें वाटत नाहीं. आधुनिक कवींचा तिसरा दोष 'शून्यसंशोधन' किंवा ज्याला इंग्रजींत Mysticism म्हणतात तो. हें शून्यसंशोधन मोहक असतें; परंतु याचा अतिरेक झाला म्हणजे कवितेचा मनावर परिणामहि शून्यमयच होतो. बाह्यसृष्टीचा पूर्ण परिचय व परामर्ष घेऊन झाला म्हणजे मग कविमन अंतर्मुख झालें तर तें शोभतें. एरवीं तो प्रकार मुलाची सोडमुंज झाल्यबरोबर त्याला संन्यास देऊन भगवीं वस्त्रें नेसविल्यासारखा हास्यास्पद वाटतो. कित्येक आधुनिक कवींची प्रेमविषयक कविता वाचून झाल्यावर कविकल्पनांचें कसलेंच म्हणून चित्र वाचकांच्या मनावर उमटत नाहीं असा पुष्कळांचा अनुभव आहे, व हें शून्यसंशोधन लवकरच थांबेल तर बरें.

मी आधुनिक कवितेचा पक्षपाती असल्यामुळें मला न्यायबुद्धीनें त्या कवितेच्या दोषांचाहि विशेष उल्लेख करावासा वाटला; पण बाह्य सृष्टीच्या मर्माचें हल्लींहून अधिक मनन केल्यास, आपल्या विस्तृत ज्ञानाच्या साहाय्यानें आधुनिक मराठी कवि पूर्व कवींनां खचित भारी होतील, असें मला वाटतें. इतकें सुचवून मी प्रस्तुत विषयाकडे वळतों.

श्रीयुत टिळक यांची कवि या नात्यानें आज पुष्कळ वर्षांपासून प्रसिद्धी आहे, व ती यथार्थहि आहे. कविता करण्याचा त्यांचा उद्योग सुमारें तीस वर्षें चालू असून प्रस्तुत संग्रहांत प्रसिद्ध होत आहे याच्या कित्येक पट कविता त्यांच्या संग्रहीं आहे. टिळकांनीं काढलेलें 'काव्यकुसुमांजलि' मासिकपुस्तक पहिल्या पांच अंकांनंतर नामशेष झालें. तथापि, प्रस्तुत कवितासंग्रह हा महाराष्ट्रास वाहिलेला 'काव्यकुसुमांजलि' च असून तो नामशेष होणार नाहीं, व मराठी वाचकांस निरंतर आदरणीय होईल.

टिळकांच्या 'समग्र कवितासंग्रहांतील निवडक उतारे' या दृष्टीनें प्रस्तुत संग्रहखंडांतील काव्यांची निवड कशी काय झाली आहे हें, तो संग्रह समग्र पाहिल्याशिवाय, कोणास सांगतां येणार नाहीं. तथापि विषयवैचित्र्य व काव्यगुण यांच्या दृष्टीनें पाहतां झालेली निवड बरी झाली आहे. प्रेम, ईश्वरविषयक कल्पना, मानवजीवित, सृष्टिसौंदर्य वगैरे विषयांवरच्या टिळकांच्या कविता वाचतांना गोडी येते; आणि

विधर्मी दोन मनुष्यांत, समान भाषेच्या उपकारामुळें, मानवजीवित मानवचारित्र्य किंबहुना राष्ट्रभक्ति यांचीं आद्यप्रमेयें मनास पटून समरसत्व कसें उत्पन्न होऊं शकेल हें सिद्ध होतें. सदर कवितासंग्रहांत कवीच्या विशिष्ट धर्मपंथाची कोणास आठवणहि होणार नाहीं, अशा नाजुक व मार्मिक रीतीनेंच कवितांची बहुधा निवड केली गेली आहे ही गोष्ट अभिनंदनीय होय, व त्याच्या योगानें मनुष्यपण व काव्य हीं धर्मपंथातीत असतात हें तत्त्व सिद्ध होण्यास निःसंशय मदत झाली आहे.

टिळकांची कविता इतकी सोपी असते कीं, ती समजून घेण्यास वाचकाला कोणी गुरू लागत नाहीं. आणि प्रस्तुतचे उतारेहि निवडक असल्यामुळें ते सर्व वाचणें याहून कवीशीं परिचय करण्याला दुसरा फारसा प्रशस्त राजमार्ग नाहीं. तथापि, उपोद्घातलेखन या नात्यानें, कोणाची इच्छा असल्यास, त्याला मार्गदर्शन करविणें हें माझें कर्तव्य आहे असें समजून मी खालील टिपणें देत आहें.

टिळकांच्या कवितेचे माझ्या मतें मुख्य दोन गुण आहेत. एक प्रसाद व दुसरा प्रेमळपणा. हे दोनहि 'प्र'कारचे गुण कोणत्याहि चांगल्या कवितेस आवश्यक आहेत. प्रसादगुणासंबंधानें तर दुसरा कोणी आधुनिक मराठी कवि टिळकांची बरोबरी करील असें सहसा वाटत नाहीं. कवीच्याच वाणीनें, पण फक्त एका शब्दाचा फरक करून, मी म्हणतों कीं

नकळे कोठुनि येतो प्रसाद कविच्या प्रसन्न काव्याला!

आणि त्यांतल्या त्यांत विशेष हा कीं, कविताविषय सोपा असो वा कठिण असो, टिळकांच्या शब्दांचा साधेपणा व प्रांजलपणा बिलकूल ढळत नाहीं. बाह्य सृष्टींतील 'फुलांमुलां'चें वर्णन असो, किंवा अंतरंगांतील अत्यंत गूढ भावनांचें वर्णन असो, कवि तीं दोन्हीहि सारख्याच प्रसाद-युक्त वाणीनें करितो. मला असें समजतें कीं टिळक हे एके काळीं पुराण सांगत असत, त्यांनीं व्याकरणाचा बराच अभ्यास केला आहे, त्यांना पूर्वी संस्कृतकविता करण्याचा फार नाद होता, हल्लींहि कारण-परत्वें ते संस्कृत पद्यरचना करितात, आणि त्यांची संस्कृत कविता कठिण असते. या सर्व गोष्टी लक्षांत घेतां त्यांच्या मराठी कवितेंत, गूढ अवजड किंवा ओढाताणीनें केलेली रचना औषधालाहि मिळूं नये, हें खचित आश्चर्यकारक आहे. उदाहरणार्थ, सुंदरतेच्या लीलेचें वर्णनः—

रंग नभाचे कसे तरी,
कसे तरी ही मजा खरी;
किती आपुलीं
फुलें उमललीं,
कुठें लटकलीं,
चिंता नच ही वेलीला
सुंदरतेची ही लीला. (पृ. १८).

इतक्या सोप्या शब्दांनीं केलेलें माझ्या पहाण्यांत नाहीं. तीच गोष्ट 'सह-कारित्व' (पृ. १९३), किंवा 'उन्मनस्क स्थिति' (पृ. १६०), असल्या कठिण मानसशास्त्रीय विषयवर्णनाची आहे.

साधेसोपेपणामुळें येणाऱ्या भाषासौन्दर्याचे मासले वाटतील तितके दाखवितां येतील. 'प्रीतिलतिके'चें खालील वर्णन पहा—

ममत्वाचें खालतीं आलवाल,
वरुनि विरहाचें उनही विलोल;
आसवांचें जल सदा मिळत राहे,
प्रीतिलतिका जगतांत वाढताहे. (पृ. ६२).

तसेंच सुशीलेच्या मध्यमवास्थेचें हें वर्णन पहा—

यौवनाच्या देहलीवरी राहे
उभी कन्या, आंत हो काय पाहे ?
किती किल्ले ती नवे नवे बांधी,
किती कार्यें कल्पनाबळें साधी.
कंठिं बाल्याच्या ठेवुनियां हात
फिरे रमणी तारुण्यकाननांत. (पृ. ६४).

किंवा एका अमेरिकन मुलीचें पुढील वर्णन पहा—

वाटे उषाच हंसते फिरते जगांत,
कीं स्फूर्ति हीच कविची मधुरूप घेत;
अव्याजता रसिकता जणुं मूल झाली
स्वर्गांतुनी सहज भूवरि आज आली. (पृ. १४०).

'माझ्या जन्मभूमीचें नांव' (पृ. १७९), हें याच दृष्टीनें वाचण्यारखें आहे. विशेषतः खालील कडवें मला फार आवडलें:—

तुझ्या महोदार सारस्वताच्या महासागरींचा जरी मीन मी
झालों, तरी गे तृषा मन्मनाची कधींही कधींही न होणें कमी!
आई गुरुस्थान अंतीं जगाचें तुझें! यांत शंका न कांहीं जरी,
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी तसें पाहिलें मीं न कोठें तरी!

'प्रेमळपणा' विषयींचेहि उतारे असेच पुष्कळ देतां येतील.

माय माझी भेटेल मला जेव्हां,
आसवांनीं न्हाणील मला तेव्हां;
मुका बाबा घेतील कपोलांचा,
हंसुन दादा घेईल गालगुच्चा,
ताइ माई सारूनि दुरी खेळ
धावुनीयां मज मिठ्या मारितील; (पृ. ५९).

या शब्दांत प्रेमळपणा किती सांठविला आहे! 'सृष्टीची भाऊबीज' (पृ. ४५), हें काव्यहि याच दृष्टीनें वाचनीय आहे.

पण केवळ सोपी भाषा आणि प्रेमळ आलाप येवढीच काय ती टिळकांची सामुग्री आहे, असें नाहीं. त्यांची कविता अर्थपूर्ण असते, आणि तो अर्थहि गंभीर व बोधप्रद असाच असतो. कवितेंत प्रेमळपणा असूनहि कवीची प्रेमविषयक कल्पना काय आहे हा प्रश्न उपस्थित होण्यासारखा असतोच. पण या प्रश्नाचें टिळकांनीं आपल्या कवितांतून ठिकठिकाणीं विशेषतः 'सुशीला' या कवितेंत जें उत्तर दिलें आहे, तें कोणासहि पटण्यासारखें आहे:—

रूपयौवन हें काम्य, परि प्रीति
न गे यांवर निज जीव सांवरीती!
शुक्ति नलगे मज हवें खरें मोतीं!
रूप नलगे मज, हवी तुझी प्रीति.
पात्र सोन्याचें असो मृत्तिकेचें
वेड मजला आंतल्या अमृताचें. (पृ. ८२).

सर्व प्रेमाचें अधिष्ठान जें गृहसौख्य त्या गृहसौख्याचें टिळकांचें खालील वर्णन किती उज्ज्वल व आल्हादकारक आहे पहा:—

भिन्न मूर्तींमधिं चित्त एक जेथें
भोगि दुःखातें अनुभवी सुखातें;

स्वर्ग वाटे हा मर्त्य लोक जेथें
जगीं उपमा कोणती त्या गृहातें ?
मनाच्या ज्या अत्युच्च रम्य वृत्ति
अंकुरित त्या होवोनि वाढताती;
फुलें सुफळें येतात त्यांस जेथें
जगीं उपमा कोणती त्या गृहातें ?
वीर पंडित कवि संत सती यांला
सिद्ध करुनी जें देतसे जगाला;
सर्व संस्कृतिचें मूळ नांव ज्यातें
जगीं उपमा कोणती त्या गृहातें ? (पृ. ६०).

स्त्री हा महारथी, व पति हा तिचा सारथी, या उपमेंत कल्पनांची किंचित् उलटापालट झालेली दिसते; पण स्त्रीपणा म्हणजे निष्क्रिय असा लिवलिवितपणा, ही कल्पना निर्मूळ करण्यास टिळकांची 'महारथी' ही कविता बरीच उपयोगी पडेल:—

'तुला मृदुविशेषणीं कवि सदैव संबोधिती,
म्हणून दिसतें मला तवहि भीरु झाली मती;
पुरे ! त्यजुनि मोह हा समजुनी स्वरूपा निजा
स्वकार्यरत हो बघूं अनुग सारथी मी तुझा.' (पृ. ९२).

या श्लोकांतील प्रमेय स्त्रियांना कर्मयोग शिकविण्यास उपयोगी पडण्यासारखें आहे.

टिळकांच्या कवितेंतील करुणरसाचे मासले 'बापाचे अश्रु' या कवितेंत जागजागीं आढळतात. तसेंच 'केवढें हें क्रौर्य' ही सर्व कविता (पृ. १३३–३४) हि करुणरसाच्या दृष्टीनें मला फार आवडली.

कल्पनेच्या दृष्टीनें कदाचित् एक म्हणतां येईल, तें असें कीं, टिळक पूर्वकविसंकेताच्या पलीकडे फारसे जात नाहींत; निदान त्यांना कल्पनांतीरक्षांत धाडसी भराऱ्या मारणें फारसें आवडत नाहीं. तथापि, नेहमींच्याच उपमा किंवा दृष्टांत किंवा दाखले ते इतक्या गोड शब्दांनीं देतात कीं त्या आनंदांत उपमा पूर्वी कधीं ऐकलेल्या आहेत कीं नाहीं, याची छाननी करण्याचें भानच वाचकांस राहत नाहीं. याचें उदाहरण 'माझी ताई' (पृ. १२०) ही कविता होय. या लहानशा कवितेंत प्रसाद,

प्रेमळ काव्यकल्पना वगैरे टिळकांच्या कवितेंतले सगळे गुण एकत्र झाले आहेत, असा भास होतो.

'आमचे तिंबूनाना' (पृ. १४२), या मथळ्यावरून कदाचित् कोणाला ही कविता विनोदात्मक असावी असें वाटण्यासारखें आहे. परंतु विनोद हा कवीला फारसा संमत किंवा प्रिय असावा, असें दिसत नाहीं. कारण, सदर कविता वाचतांना पावलोपावलीं असें आढळतें कीं, विनोदात्मक छटा येते न येते तों कवि एकदम गंभीर होतो व विनोदाची लहरी विरून जाते.

असो. याहून अधिक उतारे किंवा उदाहरणें देणें म्हणजे बाजारांत आंबे खरेदी करण्यास जाणारानें मासला पहातां पहातां राशींतले सगळेच आंबे स्वत: कापून खाण्यासारखें होईल. याकरितां मी वाचकांस आतां अधिक गुंतवीत नाहीं.

कवि या नात्यानें टिळकांचा दर्जा पुष्कळच उंच आहे, यांत शंका नाहीं. तथापि, त्यांस 'पश्चिम हिंदुस्तानचे रवींद्रनाथ टागोर' असें जें कित्येकांनीं नांव दिलें आहे, त्याला माझी विशेष हरकत इतकीच आहे कीं, रवींद्रनाथ यांच्या कवितेंतील अवघड किंवा अपरिचित अशी शब्द-रचना टिळकांच्या कवितेंत नाहीं, आणि टागोर बाबूंच्या काव्यांतील शून्यसंशोधनाची प्रवृत्ति तर नाहींच नाहीं.

मराठी कवि या नात्यानें टिळकांची इंग्रज लोकांत फार प्रसिद्धी आहे, ही गोष्ट मात्र टागोर बाबूंची उपमा टिळकांना देण्यास साधर्म्यसंबंध म्हणून उपयोगी पडण्यासारखी दिसते. या त्यांच्या प्रसिद्धीनेंच, मला वाटतें, परवां एका विलायतेंतील पत्राच्या हातून मोठ्या मौजेची चुकी झाली. कारण, त्यानें लो. बाळ गंगाधर टिळक यांच्याविषयीं लिहितांना गीतारहस्य नांवाचा काव्यग्रंथ त्यांनीं केला असल्याचें विधान केलें आहे!!

असो. शेवटीं श्रीयुत टिळकांचे हातून अशीच काव्यरचना आणखीहि पुष्कळ वर्षें होवो व मराठी वाङ्मयांत चांगली भर पडो अशी इच्छा व्यक्त करून हा उपोद्घातलेख संपवितों.

---

# २० सुदाम्याचे पोहे

रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचे 'सुदाम्याचे पोहे' गेलीं सात आठ वर्षे खंडशः लोकांच्या हातांत पडत होते. हे विनोदात्मक लेख एकत्र करून पुस्तकरूपानें पुन्हा छापण्याचा सुप्रसंग हल्लीं रा. काशीनाथ रघुनाथ मित्र—मासिक मनोरंजनाचे संपादक—यांनीं आणिला, ही फार चांगली गोष्ट झाली. 'सदरहु पुस्तकास तुम्हीं प्रस्तावना लिहा,' अशी रा. कोल्हटकर यांनीं मला कांहीं दिवसांपूर्वीं स्नेहभावपूर्वक आज्ञा केली; परंतु ती बऱ्याच विचाराशिवाय मला मान्य करितां आली नाहीं. कारण, ज्या घाटाची मूर्ति त्याच घाटाची तिला बैठक—किंवा ज्या घाटाची तरवार त्याच घाटाची तिला मूठ—शोभेल, इतर शोभणार नाहीं, असें तेव्हां माझें मत होतें, व तें अद्यापि कायम आहे; परंतु अखेर मीं मनाशीं असा विचार केला कीं, विषम वस्तूंच्या संयोगानेंहि कित्येक वेळां जगांत कार्य साधण्यासारखें असतें. धनुष्यावरून सोडल्या जाणाऱ्या तीराचें तोंड म्हणजे लोखंडी फळ किती जड असतें, तथापि त्याचें पुच्छ म्हणजे पीस किती हलकें असतें! उलट पक्षीं, चवरीचा दांडा जड असतो पण तिचें कार्यकारि मुख केशमय अर्थात् हलकें असतें. माझ्या प्रस्तावनेनें रा. कोल्हटकरांच्या पुस्तकाचें इतर कोणतेंहि कार्य न साधलें तरी एक इटकून साधण्यासारखें आहे; म्हणजे प्रस्तावनेची जड व रुक्ष भाषा आणि खुद्द पुस्तकाची चुरचुरीत व हलकी—ह्मणजे अल्पभार आणि हंसविणारी—भाषा या एकमेकीं शेजारीं ठेवल्या गेल्यानें, रा. कोल्हटकर यांच्या भाषेची खरी मौज वाचकांस अधिक खुलून दिसेल; व रा. कोल्हटकरांच्या विनोदात्मक लेखांचें गुणग्रहण वाचकांकडून होण्यास केवळ या विरोधामुळें तरी माझी स्वतंत्र रीतीनें थोडीबहुत मदत होईल अशी मला खात्री वाटली, व म्हणूनच ही प्रस्तावना लिहिण्यास मी उद्युक्त झालों.

प्रस्तावना ही कांहीं टीका नव्हे; यास्तव सदर पुस्तकांतील लेखांचें परीक्षण करून त्यांतील गुण अगर दोष समर्पक रीतीनें दाखविणें हा प्रस्तुत माझा हेतु नाहीं. रा. कोल्हटकरांच्या विनोदात्मक लेखांच्या

योगानें मराठींत एक नवीन व इष्ट अशी लेखनपद्धति सुरू झाली, व केवळ या दृष्टीनें प्रस्तुत लेखांचें महत्त्व मी मानतों. या लेखांतील कोणताहि विषय, किंबहुना कोणताहि विचार नवीन नसेल; परंतु कदाचित् जुनेच विचार कांहीं एका नव्या लेखनसरणीनें—नव्या पद्धतीनें—मांडलेले आहेत हीच मुख्य गोष्ट होय. या पद्धतीस विनोदी पद्धति हें नांव देतां येईल. तिजमध्यें व्यंगोक्ति, वक्रोक्ति, अतिशयोक्ति वगैरे मुख्य घटक असून प्रायः हास्योत्पादन आणि तद्द्वारा करमणूक व बोध हे तिचे परिणाम होत. इंग्रजींत या पद्धतीस Humorous व Epigramatic असें म्हणतात. मार्क्ट्वेन, मॅक्स ऑरेल, चेस्टर्टन वगैरे ग्रंथकर्ते याच पद्धतीचे पुरस्कर्ते होत. इंग्रजी भाषेमध्यें पूर्वी ऑलिव्हर गोल्डस्मिथ, ॲडिसन वगैरे लेखकांच्या लेखांत विनोद असे, नाहीं असें नाहीं; परंतु तो थोडा व मधून मधून सहज नकळत ओघानें येत असे. मार्क्ट्वेन वगैरे लेखकांच्या लेखांत तो पुष्कळसा व मुद्दाम जाणून बुजून आणलेला असतो. या दृष्टीनें पाहतां हा विनोद कृत्रिम वाटेल; पण त्याची कृत्रिमता असली तरी ती फक्त हेतूंत आहे, खुद्द विनोदाच्या स्वरूपांत नाहीं. शिवाय, एखाद्या लेखकास विनोदी लिहिणें साधूं लागलें म्हणजे संवयीनें तें त्याच्या इतकें अंगवळणीं पडतें कीं, विनोदाची छटा उमटल्याशिवाय त्याला प्राय: कांहीं लिहितां येईनासेंच होतें. पण अशा रीतीनें एखाद्या गुणाचा क्वचित् अतिरेक होण्याचा संभव असला तरी तो गुणच नव्हे, असें केव्हांहि म्हणतां येणार नाहीं. ज्याप्रमाणें काव्य करण्यास त्याचप्रमाणें विनोदी लेख लिहिण्यासहि उज्ज्वल प्रतिभा लागते. कवि व विनोदी लेखक या दोघांसहि वस्तुजातांतील चित्ताकर्षक असे कांहीं विशिष्ट संबंध इष्ट असतात व सुचावे लागतात. पैकीं कवि हा संवादित्व हुडकून काढतो, त्याचें लक्ष सौन्दर्यावर असतें; उलट, विनोदी लेखक हा विसंवादित्व हुडकून काढीत असतो, त्याचें लक्ष विकृत व हास्योत्पादक गोष्टींवर असतें; परंतु दोघांचेंहि कार्य एकच—म्हणजे विषय मनावर बिंबविणें हें—असतें व तें घडून येतेंहि. कारण, जसे लेखक तसेच वाचकहि निरनिराळ्या मनोरचनेचे असतात; जो तो लेखक मुख्यतः आपल्याशीं समानधर्म अशा वाचकांसाठीं लिहितो; व जो तो वाचकहि आपापल्या मनोधर्माप्रमाणेंच वाचण्यास लेख पसंत करितो.

सरस कवितेप्रमाणें विनोदी लेख लिहितां येणें ही एक ईश्वरी देणगी आहे. तो गुण अंगीं असणारे दुर्मिळ, पण तो गुण अंगीं असतां त्याचा उपयोग न करणारे तर त्याहूनही दुर्मिळ. विनोदी लेखनपद्धति साधून तिचा अंगीकार केला असतां लेखकास विषयप्रतिपादनाला मदत कशी होते हें रा. कोल्हटकर यांचें प्रस्तुत पुस्तक निर्विकार मनानें वाचणारास सहज कळून येईल. प्रस्तुत निबंधविषयांपैकीं बहुतेक अगदीं नेहमींच्या व्यवहारांतले आहेत. तथापि, प्रत्येकामध्यें विषय प्रतिपादनाची हातोटी नेहमींच्या प्रतिपादकास न सुचणारी अशी व हास्योत्पादक आहे. 'साक्षीदारां' चे स्वभावदुर्गुण; 'कुलुपा' वरचें रूपक; 'शिमग्यां' तील घाणेरड्या चालीरीतींवरील चुरचुरीत व्याजस्तुतिपूर्ण टीका; देवांच्या विकृत मूर्तींच्या दर्शनापासून थट्टेखोर मनुष्यास सुचणाऱ्या कल्पना; 'गवई' लोकांच्या स्वभावाचा तऱ्हेवाईकपणा आणि गायनांतील चमत्कारिक प्रकार व खोडी; 'हजामती' वरील निबंधांतील केशवपनविधीसंबंधानें केलेलें मौजेचें वर्णन; 'भविष्यें' नेहमीं खोटीं कशीं ठरतात, परंतु तीं खोटीं ठरलीं असें म्हणतां येऊं नये याकरितां तीं पैशापायली विकणारे भविष्यवेत्ते काय काय युक्त्या योजतात याचें मार्मिक विवेचन; एकामागून एक अशीं अनेक लग्नें करण्याचा जणूं काय हट्ट घेतलेल्या बेमुरवती नवरदेवांवरील विनोदी टीका; जनसमाज आजवर पूर्ण भाविकपणें करीत आलेले धर्मविधि व समारंभ—म्हणजे उदाहरणार्थ लग्न, श्रावणी वगैरे—यांचा मूळ हेतु व हल्लीं रूढ असलेली त्यांची आचारक्रिया यांजमधील विसंवादित्वामुळें सूक्ष्म नजरेनें पाहणाऱ्या विचारी मनुष्याच्या मनास सुचणारे विचार; 'वर्तमानपत्र' या नांवाखालीं लेख व जाहिराती यांच्या बाबतींत भोळे, अज्ञानी अगर आपमतलबी अशा लोकांनीं घातलेला धुडगुस; 'मुंबईचें प्रदर्शन' व 'दीपोत्सव' या लेखांत केलेलें मनुष्यस्वभाववर्णन; अलीकडे जिकडेतिकडे भरणाऱ्या संमेलनांतील रूढ, 'कायम ठशांनीं छापलेल्या' औपचारिक प्रकारांची थट्टा करण्याकरितां 'चोरांच्या संमेलना'चें रूपक घेऊन केलेलें वर्णन; आज निरनिराळ्या हजारों रूपांनीं भिक्षेचा 'धंदा' करणाऱ्या लोकांसंबंधानें त्रस्त झालेल्या यजमानास प्रत्यहीं येणाऱ्या प्रसंगाचें वर्णन; स्वभावतःच विनोदविषय होऊन बसणारें—दुसरें बालपणच—असें जें 'म्हातारपण,' त्याला अंगभूत असणाऱ्या सर्वतोपरी वैगुण्याचें थट्टेखोरपणाचें

वर्णन; आणि ' चित्रगुप्ताचा जमाखर्च ' या निबंधांतील पापपुण्याच्या हास्यास्पद कल्पनांचें हास्योत्पादक रीतीनें केलेलें विवेचनः—ही वाचणारास निबंधकाराच्या अंगीं असलेली वस्तुनिरीक्षणाची दृष्टि, मार्मिकपणा, गहनविचारशक्ति, उदाहरणें देण्याची हातोटी, व सर्वांत मुख्य म्हटलें म्हणजे, कोणतीही गोष्ट हंसूं येईल व मौज वाटेल अशा रीतीनें सांगण्याची कला—या सर्वांबद्दल त्याचें अभिनंदन करावें असेंच वाटेल.

सदर निबंधांतून कित्येक दोषस्थळेंहि आढळतात. उदाहरणार्थ, निबंकारास शाब्दिक कोटयांची वाजवीहून अधिक हौस असल्यामुळें क्वचित् दुरान्वय व कृत्रिमपणा दिसून येतो; कल्पनांची ओढाताण व वेळीं अतिशयोक्तीचीहि अतिशयोक्ति होते. तसेंच भाविक समाजाच्या दृष्टीनें पाहतां या निबंधांतून कांहीं कांहीं भाग वगळले असते तर अधिक बरें झालें असतें. रा. कोल्हटकरांनीं या निबंधांत केलेली टीका जरी सर्वस्वी अयुक्त म्हणतां आली नाहीं, तरी जें बोलणें व्यक्तीला राग येण्यास कारणीभूत होतें तें समाजालाहि होईल हें लक्षांत ठेवूनच समाजावर टीका करणें योग्य आहे. निर्दयपणाची टीका ही वैद्यकांतील सजीवछेदन शास्त्रा-( Vivisection ) प्रमाणें आहे. ती एकंदर समाजाला शास्त्रीयदृष्ट्या अखेर उपयोगीं असली, तरी ती जशी आपण आपल्या स्वतःच्या तरुण मुलांबाळांवर, एवढेंचसें काय, पण वृद्ध व मरणोन्मुख झालेल्याहि मातापितरांवर करणार नाहीं, त्याचप्रमाणें शाब्दिक टीकेचीहि गोष्ट मानिली पाहिजे.

रा. कोल्हटकरांच्या या लेखावरून त्यांजवर इतरहि कित्येक आरोप लादण्यांत येत असतात. लेखांत अश्लीलता आहे या आरोपास स्वतः कोल्हटकरांनींच सदरहु पुस्तकांतील एका लेखांत उत्तर दिलें असून खुद्द टीकाकाराच्याच लेखांतील उतारे त्यांनीं दिल्यामुळें, तें समर्पक झालें आहे. रा. कोल्हटकरांस विनोदाशिवाय कांहीं लिहितांच येत नाहीं, असाहि त्यांजवर एक आक्षेप असतो; परंतु ' विविधज्ञानविस्तारां'तील त्यांचे ग्रंथपरीक्षणात्मक लेख, विशेषतः बडोद्यास भरलेल्या ग्रंथकारांच्या गेल्या संमेलनाकरितां त्यांनी लिहिलेल्या 'मराठी भाषे'वरील निबंध जो कोणी वाचील त्याला हा आक्षेप निर्मूल आहे हें तेव्हांच कळून येईल. त्यांच्या लेखांत ज्याची त्याची कुचेष्टाच आढळावयाची, असा आक्षेप घेणारांनीं

लक्ष्यांत ठेवण्यासारखी एक गोष्ट आहे; ती अशी कीं, सुदाम्याच्या पोह्यांत अगर इतरत्रहि, साधुपुरुष व सन्मान्य व्यक्ति—ज्यांच्या महानुभावित्वाविषयीं कोणाचा मतभेद नाहीं—अशांची थट्टा बाष्कळपणानें त्यांनीं केली, अगर केवळ व्यक्तिनिंदा आरंभिली, असें बहुधा कोठेंहि आढळणार नाहीं. रा कोल्हटकरांच्या विनोदाचें हत्यार कल्पनेवर पडतें; व्यक्तिवर तें उचललेंहि जात नाहीं. विधिसमारंभ वगैरेंची चेष्टा करणें व नास्तिकपणा ह्या गोष्टी समानार्थक आहेत, हें मुळींच खरें नाहीं. असें असतां नास्तिकपणाचाहि आक्षेप या लेखांवर कोणी कोणी आणतात. तथापि कोल्हटकरांच्या नाटकांतून व इतर लेखांतून ईश्वरविषयक अत्यंत उदात्त विचारांचीं पदें व वाक्यें नीट पाहणारांस हवीं तितकीं आढळतील; असो; तथापि हें सर्व शाबीत मानून जमेस धरिलें असतांहि सदरहु निबंध आदरणीय आहेत, यांत शंका नाहीं. कारण, या दोषांसंबंधानेंहि पाहतां असें ह्मणतां येईल, कीं, समाजामध्यें मतांतर होत असतां अशी टीका होणें हें अपरिहार्य आहे. यूरोपांत कॅथोलिक पंथाची सुधारणा होऊन प्रॉटेस्टंट पंथ स्थापन होण्याच्या सुमारास लेखक व्यक्ती किंवा लोकनिंदेची भीति न बाळगतां अशाच टीका करीत असत. जर्मनीमध्यें सोळाव्या शतकांत इरॅसमस व अठराव्या शतकांत फ्रान्समध्यें व्हॉल्टेअर या विनोदी लेखकांनीं समाजासंबंधानें जें लिहिलें, त्यामानानें रा. कोल्हटकर यांचें लिहिणें कांहींच नाहीं असें म्हणावें लागतें. आज कालांतरानें व्हॉल्टेअर व इरॅसमस यांनीं केलेले आघातरूपी दोष विसरले जाऊन त्यांचे ग्रंथ जसे वाङ्मयाच्या दृष्टीनें वाचनीय म्हणून मानले जातात, तशीच गोष्ट कांहींअंशीं रा. कोल्हटकर यांच्या लेखासंबंधानें कालांतरानें इकडेहि घडून येईल, यांत मला बिलकूल शंका वाटत नाहीं.

रा. कोल्हटकर यांनीं आपले 'पोहे' हल्लीं होतील तितके काळजीपूर्वक पाखडूनच वाचकांस दिले आहेत; असें असूनहि कित्येक वाचकांस त्यांचीं टोकें अद्यापिहि दुःसह वाटतील व कित्येकांस तर ते मुळींच पचणार नाहींत! तथापि, श्रीसरस्वतीच्या पाकशाळेंत तयार झालेला चुरचुरीत फोडणीचा हा मेवा 'इच्छा असेल त्याला' हवा तितका मिळण्यासारखी सोय करून 'मनोरंजनकारां'नीं रा. कोल्हटकरांप्रमाणेंच

मराठी वाचकवर्गाचेंहि मित्र–कार्य संपादिलें, याबद्दल त्यांचें अभिनंदन करून ही प्रस्तावना पुरी करितों.

## २१ महाराष्ट्र–स्त्रीगीत

महाराष्ट्र स्त्रियांचीं जुनीं देवादिकांचीं गाणीं किती योग्यतेचीं आहेत याचा विचार पुष्कळांनीं केलेला नसेल. आधुनिक सुशिक्षित स्त्रियांपैकीं फारच थोड्या स्त्रियांनीं प्राचीन स्त्रीगीतांकडे लक्ष पुरविलेलें दिसतें. पण ज्या स्त्रियांना आधुनिक शिक्षण पद्धतीचा संपर्क घडलेला नव्हता व पुराणांतील रम्यकथा किंवा व्रतादिकांच्या कहाण्या, इतक्याच ज्ञानांत ज्यांच्या संस्कृतीची परमावधि झालेली असे, अथवा थोडेसें लिहिणें वाचणें अवगत असलें तर जुन्या महाराष्ट्र भक्त कवींनीं लिहून ठेवलेलें भारत भागवतादि पद्य वाङ्मय वाचून ज्यांनीं आपल्या ज्ञानांत संस्कृत शब्दांची थोडी फार भर घातली असेल, अशा महाराष्ट्रीय गृहिणींनीं स्वयंस्फूर्तीनें देवादिकांचीं पौराणिक कथापर किंवा श्रीकृष्णाच्या लीलांचीं शृंगारपर प्रसादपूर्ण उत्कृष्ट कवनें केलेलीं पाहून कोणाहि सहृदय रसिक व संगीत-प्रेमी व्यक्तीला त्याबद्दल अभिमानपूर्वक कौतुक वाटल्यावांचून रहाणार नाहीं.

गायनकलेंत काव्य आणि संगीत यांचें परस्परपोषक असें तादात्म्य असलें तरच त्या गायनकलेनें आपलें ध्येय साध्य केलें असें म्हणतां येतें. जेथें काव्य हें प्रधान असतें तेथें संगीताची योजना त्या काव्याला उठावणी देण्याइतक्या मर्यादेची असते; व या वेळीं संगीत हें फक्त काव्यपोषक असल्यामुळें काव्याच्या तंत्रानें राहतें. अशा प्रकारचा काव्य व संगीत यांचा मिलाफ स्त्रियांच्या गाण्यांत आढळेल. साधी परंतु मोहक चाल, सहज समजणारा ताल, तानबाजी किंवा सुरांच्या लटपटी न करतां गळ्यानें सहज घेतां येण्याजोग्या स्वरांच्या मुरक्या, इत्यादि अगदीं साध्या परंतु रागमधुर–स्वरांनीं रचलेलीं रसभरित कवनें जर कोणास पहावयाचीं असतील तर त्यांनीं स्त्रियांचीं जुनीं गाणीं पहावीं.

स्त्रियांच्या जुन्या कवनांत कृत्रिम शब्दावडंबर नसून नैसर्गिक प्रतिभेचीं

सीं अगदीं स्वतंत्र काव्यें आहेत. काव्यस्फूर्ति व त्या बरोबरच स्वररचना स्फूर्ति अशा एकत्र स्फूर्तींनें तीं निर्माण झालेलीं आहेत. या गाण्यांत स्त्रियांच्या अंतःकरणांतील निःसीम प्रेम, त्यांचें पावित्र्य, त्यांची भक्ति, त्यांचें उदार चरित, मधुर ललित भावना या सर्वांची प्रचीति येते.

ज्या बिचाऱ्या गृहिणींना अलंकार, साहित्य, किंवा छंदःशास्त्र यांविषयीं कल्पनाही नसेल त्यांच्या कवनांत मधुर दृष्टांत, गोड उपमा, श्लेष, हे साहजिक आढळावे, यमक अनुप्रास सहज साधलेले असावे, प्रसादमाधुर्य ओतप्रोत भरलेलें असावें, शृंगार, करुण, हास्य ( विनोद ) या रसांचा परिपोष सरळ साध्या काव्यप्रवाहानें झालेला पहावयास सांपडावा यापेक्षां काव्यदृष्टीनें जास्त तें काय पाहिजे आहे ? संगीत दृष्टीनें स्त्रियांच्या गाण्याकडे पहातांना त्यांत मोठे राग किंवा नानालंकारांची योजना असल्या शास्त्रीय चिकित्सक पद्धतींनीं पहाणें योग्य नाहीं.

स्त्रियांचीं गीतें दादरा, धुमाळी, त्रिताल, दीपचंदी असल्या साध्या तालांत असून भैरवी, झिंझोटी, पहाडी, आसावरी, काफी, पिलू, खमाज अशा सोप्या रागांत असतात. स्त्रियांच्या जुन्या गाण्यांतील काव्याची कल्पना येण्यास पुढील उदाहरणें पहाः—

सुभद्रेनें कृष्णाची माया द्रौपदीवर जास्त आहे व मजवर कमी आहे असें नारदास सांगितलें, तें बहारीचें वर्णन पहाः—

( १ ) द्रौपदीस बंधु शोभे नारायण ॥
कधीं नाहिं हो घडलें एकांतीं भाषण ।
कधीं नाहिं हो घडलें पंक्तीस भोजन ।
कधीं नाहिं हो केली माझी बोळवण ।
कधीं पुसेना सुखी आहेस म्हणून ॥ द्रौपदीस०

यावरील चारी चरणांत स्त्री स्वभाव किती उत्कृष्ट दर्शविला आहे !

( २ ) कुंजवनीं रास असुनि रुसशि राधिके ।
हरिनें मज पाठविलें चाल तूं सखे ।
राग रंग ताल चंग दंग दश दिशा ।
पूर्ण चंद्र शुभ्रकला शांत ही निशा ।

यांत रासक्रीडेची दंगल व चांदणी रात्र यांचें काव्यमय वर्णन अगदीं

मराठी वाचकवर्गाचेंहि मित्र–कार्य संपादिलें, याबद्दल त्यांचें अभिनंदन करून ही प्रस्तावना पुरी करितों.

## २१ महाराष्ट्र–स्त्रीगीत

महाराष्ट्र स्त्रियांचीं जुनीं देवादिकांचीं गाणीं किती योग्यतेचीं आहेत याचा विचार पुष्कळांनीं केलेला नसेल. आधुनिक सुशिक्षित स्त्रियांपैकीं फारच थोड्या स्त्रियांनीं प्राचीन स्त्रीगीतांकडे लक्ष पुरविलेलें दिसतें. पण ज्या स्त्रियांना आधुनिक शिक्षण पद्धतीचा संपर्क घडलेला नव्हता व पुराणांतील रम्यकथा किंवा व्रतादिकांच्या कहाण्या, इतक्याच ज्ञानांत ज्यांच्या संस्कृतीची परमावधि झालेली असे, अथवा थोडेसें लिहिणें वाचणें अवगत असलें तर जुन्या महाराष्ट्र भक्त कवींनीं लिहून ठेवलेलें भारत भागवतादि पद्य वाङ्मय वाचून ज्यांनीं आपल्या ज्ञानांत संस्कृत शब्दांची थोडी फार भर घातली असेल, अशा महाराष्ट्रीय गृहिणींनीं स्वयंस्फूर्तीनें देवादिकांचीं पौराणिक कथापर किंवा श्रीकृष्णाच्या लीलांचीं शृंगारपर प्रसादपूर्ण उत्कृष्ट कवनें केलेलीं पाहून कोणाहि सहृदय रसिक व संगीत-प्रेमी व्यक्तीला त्याबद्दल अभिमानपूर्वक कौतुक वाटल्यावांचून रहाणार नाहीं.

गायनकलेंत काव्य आणि संगीत यांचें परस्परपोषक असें तादात्म्य असलें तरच त्या गायनकलेनें आपलें ध्येय साध्य केलें असें म्हणतां येतें. जेथें काव्य हें प्रधान असतें तेथें संगीताची योजना त्या काव्याला उठावणी देण्याइतक्या मर्यादेची असते; व या वेळीं संगीत हें फक्त काव्यपोषक असल्यामुळें काव्याच्या तंत्रानें राहतें. अशा प्रकारचा काव्य व संगीत यांचा मिलाफ स्त्रियांच्या गाण्यांत आढळेल. साधी परंतु मोहक चाल, सहज समजणारा ताल, तानबाजी किंवा सुरांच्या लटपटी न करतां गळ्यानें सहज घेतां येण्याजोग्या स्वरांच्या मुरक्या, इत्यादि अगदीं साध्या परंतु रागमधुर–स्वरांनीं रचलेलीं रसभरित कवनें जर कोणास पहावयाचीं असतील तर त्यांनीं स्त्रियांचीं जुनीं गाणीं पहावीं.

स्त्रियांच्या जुन्या कवनांत कृत्रिम शब्दावडंबर नसून नैसर्गिक प्रतिभेचीं

तीं अगदीं स्वतंत्र काव्यें आहेत. काव्यस्फूर्ति व त्या बरोबरच स्वररचना स्फूर्ति अशा एकत्र स्फूर्तीनें तीं निर्माण झालेलीं आहेत. या गाण्यांत स्त्रियांच्या अंतःकरणांतील निःसीम प्रेम, त्यांचें पावित्र्य, त्यांची भक्ति, त्यांचें उदार चरित, मधुर ललित भावना या सर्वांची प्रचीति येते.

ज्या बिचाऱ्या गृहिणींना अलंकार, साहित्य, किंवा छंदःशास्त्र यांविषयीं कल्पनाही नसेल त्यांच्या कवनांत मधुर दृष्टांत, गोड उपमा, श्लेष, हे साहजिक आढळावे, यमक अनुप्रास सहज साधलेले असावे, प्रसादमाधुर्य ओतप्रोत भरलेलें असावें, श्रृंगार, करुण, हास्य (विनोद) या रसांचा परिपोष सरळ साध्या काव्यप्रवाहानें झालेला पहावयास सांपडावा यापेक्षां काव्यदृष्टीनें जास्त तें काय पाहिजे आहे? संगीत दृष्टीनें स्त्रियांच्या गाण्याकडे पहातांना त्यांत मोठे राग किंवा नानालंकारांची योजना असल्या शास्त्रीय चिकित्सक पद्धतींनीं पहाणें योग्य नाहीं.

स्त्रियांचीं गीतें दादरा, धुमाळी, त्रिताल, दीपचंदी असल्या साध्या तालांत असून भैरवी, झिंझोटी, पहाडी, आसावरी, काफी, पिलू, खमाज अशा सोप्या रागांत असतात. स्त्रियांच्या जुन्या गाण्यांतील काव्याची कल्पना येण्यास पुढील उदाहरणें पहाः—

सुभद्रेनें कृष्णाची माया द्रौपदीवर जास्त आहे व मजवर कमी आहे असें नारदास सांगितलें, तें बहारीचें वर्णन पहाः—

(१) द्रौपदीस बंधु शोभे नारायण ॥
कधीं नाहिं हो घडलें एकांतीं भाषण।
कधीं नाहिं हो घडलें पंक्तीस भोजन।
कधीं नाहिं हो केली माझी बोळवण।
कधीं पुसेना सुखी आहेस म्हणून ॥ द्रौपदीस०

यावरील चारी चरणांत स्त्री स्वभाव किती उत्कृष्ट दर्शविला आहे!

(२) कुंजवनीं रास असुनि रुसशि राधिके।
हरिनें मज पाठविलें चाल तूं सखे।
राग रंग ताल चंग दंग दश दिशा।
पूर्ण चंद्र शुभ्रकला शांत ही निशा।

यांत रासक्रीडेची दंगल व चांदणी रात्र यांचें काव्यमय वर्णन अगदीं साध्या सरळ शब्दांनीं प्रसादपूर्ण आहे.

(३) आले वनमाळी रात्रीं सत्यभामेमंदिरीं ।
तृषाक्रांत कांहो झालां असे कोठें भागलां ।
मुखप्रभा दिसते पिंवळी कोण्यास्थळीं जागलां ।

सत्यभामेचे हे उद्गार किती नैसर्गिक निघाले आहेत व शब्दयोजना किती मार्मिक व गोड आहे?

राधिकेचे प्रेमोद्गारः-

(४) आज कुठें कमलभृंग गुंतला सये।
नाहिं सदनिं माधव मज नीजही न ये ।
मंद मंद गतिसुगंध कुंज डोलताती ।
तरुवर नभकुंजलता पवन वाहताती ।

यांत स्वाभावोक्ति व अनुप्रास फारच गोड साधले आहेत.

मुरलीच्या मधुरस्वरांचें वर्णन किती बहारीचें पहाः—

(५) खुंटला वायुचा वेग, वर्षतो, मेघ जलें स्थिर झालीं ।
गाई तृण वत्स न घेती, स्तब्ध रवि वरती । मयुरें नादावलीं ॥
हालविना धरणीधर । आत्ममस्तका ।
शिरिं धागर पाझरते ! रोमांचित तनु होते ।
मनमुरली गुंगविते । नंदबालका ॥

गोपींचें प्रेम पहा--

(६) हरीवीण दीन आम्हीं कोणा स्मरावें ।
ऐसें वाटतें किं जहर घेउनि मरावें ॥

द्रौपदीचा धांवा पहाः-

(७) यादवराया भाई येरे नको निष्ठुर होऊं ।
निढळा वरती हात ठेवुनी किती वाट पाहूं ।
जंबुकें पांच व्याघ्रां कपटानें जिंकलें ।
केसरी, द्यूत पंजरीं कोंडलें, हरी काय करुं तरि ।
बुद्धिज्ञानी स्तब्ध बैसले चित्रें भिंतीवरी ।
पहा दुष्ट दुःशासन मजला धरुनि ओढी निरी ।
धांव पाव श्रीहरी कशीरे निद्रा आली तुजवरी ।

या पेक्षां जास्त उतारे देण्याची जरूरी नाहीं. लंकेचें वर्णन, रामविरह, सीताविरह, इ० कवनें पहावीं.

स्त्रियांच्या गाण्यांतील विषय किंवा मथळा हीहि एक साधेपणाची पण ध्यानांत ठेवण्याची बाब आहे. प्रत्येक गाण्याला त्यांतील विषयास अनुसरून स्त्रियांनीं एकेक लहान नांव दिलें असतें. जसें तुरा, मुद्रिका, रास, उद्धव, अक्रुर, राधा, सीता, कीचक, धांवा, पाळणा, राम, अहिल्या, इ. इ. हीं नांवें सुटसुटीत सर्वांना प्रिय वाटणारीं आहेत.

रसिक दृष्टीनें पाहतां, संगीतकलेचा घरगुती संसारांत खराखुरा जर कोठें उपयोग झाला असेल, व्यवहारांतील नैसर्गिक भाव, क्रिया व संगीत यांची योग्य सांगड जर कोठें झाली असेल तर ती स्त्रियांच्या गाण्यांत होय.

अशीं हीं स्त्रीकवनें शोधूं गेलें असतां शेंकडोंनीं सांपडतील. तथापि या असल्या स्त्रीगीत रत्नांची सध्यांच्या वाढत्या शिक्षणप्रवाहांत हेळसांड झालेली पाहून खेद होतो. प्रचलित शिक्षणांत गायन हा विषय सामील केला गेलेला आहे. तरी त्यांतच जुन्या प्रतिभाशील स्त्री गीतांचा योग्य परामर्ष घेतला जाईल अशी उमेद आहे.

हल्लींच्या अनेकविषय--शिक्षणाच्या प्रघातामुळें सुशिक्षित स्त्रियांना या स्त्रीसंगीतांची ओळख असण्याचा प्रसंग बहुधा नाहीं. पहांटे उठून भूपाळ्या म्हणणें, चारचौघीजणी एकत्र जमून प्रत्येकींनें आपलें स्वतःचें कवन किंवा स्वतःला येत असलेलें गाणें म्हणणें, व अशा गाण्याच्या बैठकी वारंवार घडवून आणणें, व्रतादि प्रसंगीं किंवा उत्सवप्रसंगीं स्त्रियांनीं एकत्र होऊन किंवा झोपाळ्यावर बसून गाणीं म्हणणें, अशा प्रकारचे जुन्या रहाटीचे प्रसंग हल्लींच्या अनेक विषयांच्या शिक्षणामुळें व रहाटींत बदल झाल्यामुळें, येण्याचा संभव फारच कमी; यामुळें स्त्रियांची गायनस्फूर्ति भूमिति, गणित, भूगोल, परकी भाषा असल्या विषयांच्या परिशीलनांतच विरून जावी यांत नवल नाहीं.

हल्लीं संगीत नाटकांमुळें महाराष्ट्रांत संगीत कलेची अभिरुचि पुष्कळच वाढली आहे; परंतु त्या बरोबरच स्त्री-पुरुषवर्गाला हल्लींच्या नाटकांतलीं गाणीं हीच संगीतकला असें वाटूं लागलें आहे. स्त्रियांनीं गूढ शब्दरचना पाठ करीत बसावी व यांतच संगीत कलेची हौस पुरवून घ्यावी असा प्रकार घडत आहे याचें कारण हेंच कीं, आपल्याजवळ सांप्रदायिक काय आहे याकडे हल्लींच्या सुशिक्षित स्त्रीवर्गाला पहाण्याची सवड कदाचित् नसावी. वर दिलेल्या उताऱ्यांवरून सुशिक्षित भगिनींची खात्री होईल कीं, महाराष्ट्र

स्त्रियांत काव्य आणि संगीत यांची प्रतिभा यत्किंचितहि कमी नाहीं. उलट कित्येक नाटकांतील कित्येक पदांपेक्षां स्त्रीगीतें अधिक प्रसादपूर्ण काव्यें आहेत व तीं पुष्कळशीं स्त्रियांनींच बनविलेलीं असल्यामुळें त्यांचें महत्त्वहि स्त्रीवर्गास विशेष आहे.

हीं स्त्रीगीतें रक्षण करणें हें महाराष्ट्र संगीताचें पहिलें कर्तव्य होय. तसेंच स्त्रीगीतांत नवीन विषयांवर नवीन काव्यकल्पनांनीं व नवीन स्वरसौंदर्यवान् चालींनीं भरती घालणें हें यापुढें सुशिक्षित स्त्रीवर्गाचें कार्य आहे, तें सुलभ व्हावें म्हणून या छोट्याशा पुस्तकांत प्रो० मुळे यांनीं त्या दिशेनें मार्गदर्शक म्हणून अल्प प्रयत्न केलेला आहे.

आजपावेतों महाराष्ट्र संगीत–वाङ्मय नुसत्या गाथेंत पडून आहे. संगीत वाङ्मय रक्षण करण्यास नुसती गाथा ( शब्द लिहून ठेवणें ) उपयोगी पडत नाहीं. त्याचें नोटेशन ( संगीत स्वरलेखन ) केलें तरच तें रक्षण होतें. तोंडोतोंडीं ( गुरुमुखानें ) जें रक्षण होतें त्यांत उत्तरोत्तर स्वरबदल होत जाण्याचा व मुळांतली चाल गाणाराच्या इच्छेप्रमाणें बदलण्याचा नेहमीं संभव असतो. हा अनुभव संगीत नाटकांत प्रत्यक्षच आहे. जुन्या शाकुंतल सौभद्र नाटकाच्या कित्येक पदांच्या चाली हल्लीं बदललेल्या आढळतात. जुनें वळणहि बदललें आहे असें म्हणतात. असा प्रकार तोंडोतोंडी गायनाचा होणें साहजिक असतें. हिंदुस्थानी सांप्रदायिक ख्याल, ठुंबरी या गीतांचीहि स्थिति शब्दपाठभेद, अपपाठ, स्वरभेद, तालभेद होऊन मूळची बंदिस्त कशी होती याचा अंदाजहि आतां करणें कठीण होतें असें तज्ज्ञ लोक सांगतात. गीताचें स्वरलेखन केल्यानें हे दोष त्यांत शिरण्यास वाव कमी रहातो व सांप्रदायपरंपरेस आधार होतो. याकरितां ' नोटेशन ' देऊन या स्त्रीगीतांचा पायाशुद्ध प्रयत्न ग्रंथकारानें येथें केला आहे.

---

## २२ कीर्तन कुमुदिनी

श्री. बाळासाहेब साठे यांनीं ' कीर्तन कुमुदिनी ' नांवाचें पुस्तक तयार केलें त्याला मी प्रस्तावना लिहावी अशी इच्छा त्यांनीं प्रकट केली. ती मी

आनंदानें मान्य केली. याचें कारण एक तर कीर्तन हा विषय स्वतः माझ्या आवडीचा आहे. याचा अर्थ मी स्वतः कीर्तनकार आहे असें नाहीं, पण कीर्तन ऐकण्याची लहानपणापासून मला फार गोडी आहे. करमणुकी-बरोबरच ज्ञान देणाऱ्या साधनांत नाट्यप्रयोगाचा दर्जा फार मोठा आहे. तथापि चांगलें कीर्तन व चांगलें नाटक अशा तुल्यबल गोष्टी माझ्या समोर असल्या तर मी चांगल्या कीर्तनालाच अधिक मान्यता देईन. आतां, कीर्तनाला पूर्वीच्या संस्कृत भाषणासारखें स्वरूप असून एकच वक्त्यानें अनेक प्रकारचीं भाषणें बोलण्याचीं असतात, नाट्यप्रयोगाप्रमाणें व्यक्ती वेष, भाषा व अभिनय यासंबंधानें जें वैचित्र्य नाट्यप्रयोगाला लाभतें तें कीर्तनाला लाभत नाहीं ही गोष्ट खरी. तरी उलट नाट्यप्रयोगांत वेषांतर रंगलेपन व समाजानें अवमानिलेल्या इतर तशाच अनेक उपाधींचा उप-सर्ग नाटकाला लागतो तसा तो कीर्तनाला लागत नाहीं. कीर्तनांतील मुख्य विषय उच्च प्रकारची धार्मिक व तात्विक चर्चा हाच असल्यामुळें त्याला सहजच एक प्रकारें उदात्त स्वरूप प्राप्त होतें. कसेंही असलें तरी सामान्य प्रतीचें व्याख्यान किंवा प्रवचन किंवा भजनीनिरुपण यापेक्षां गायनवादन यांनीं युक्त असलेल्या कीर्तनाला श्रोतृगण अधिक मोहून जातो यांत शंका नाहीं. व्याख्याता कोठेंहि उभा राहिला म्हणजे कंबरेवर हात ठेवून एकदम बोलूं लागतो ही गोष्ट खरी, पण वक्ता कितीही रसाळ असला तरी गायनवादनादि साधनांची मदत असलेल्या कीर्तनासारखा रंग रुक्ष वक्तृत्वाला भरणें शक्य नाहीं. प्रवचन व व्याख्यान यामध्यें वक्ता उभ्यानें बोलतो कीं बसून बोलतो यापेक्षां जास्त फरक नाहीं. भजनी निरूपणाला टाळकऱ्यांच्या भजनाची मदत असते पण त्यांत एकांगीपणा पुष्कळसा असतो; कीर्तनाप्रमाणें विषय—वैचित्र्य असत नाहीं. अशा रीतीनें तुलना करितां आजच्या ह्या नव्या युगांतहि कीर्तन सांप्रदायानें आपलें वर्चस्व समाजांत अबाधित राखलें आहे ह्याचे आश्चर्य वाटत नाहीं. हा कीर्तन-संप्रदाय महाराष्ट्रामध्यें जसा सर्वांगसुंदर बनविला गेला आहे तसा तो सर्व हिंदुस्थानांत इतर कोणत्याहि प्रांतांत नाहीं असें जाणते लोक म्हणतात. पण मला त्याची प्रत्यक्ष माहिती नाहीं.

प्रत्येक उपदेशक—सांप्रदायांत स्वतःचें म्हणून कांहीं वैशिष्ट्य असतें.

परंतु उपदेश सुरू असतां श्रोतृगणामध्यें तल्लीनता प्राप्त करून देण्याच्या दृष्टीनें पहातां आमच्या इकडील कीर्तनसंप्रदायांत कांहीं असाधारण असाच गुण आहे असें मला वाटतें.

प्रत्येक संप्रदायांत हौशी सांप्रदायिक व धंदेवाईक सांप्रदायिक असा भेद सहजच पडतो. कला खेळ वगैरे मध्यें हा भेद सर्व देशांत दिसून येतो. व त्याबरोबर हेंहि दिसून येतें कीं, धंदेवाईक सांप्रदायिकामध्यें अभ्यासानें विशिष्ट गुणांचा विकास अधिक होत असला तरी उलट हौशी सांप्रदायिकाला समाजाकडून मान्यता अधिक मिळते. कारण 'धंदा' म्हटला म्हणजे त्यांत स्वार्थ येतो. याच्या उलट हौशी मनुष्यानें अल्पगुणच कां होईना पण चांगलें काम केलें तर त्याला निःस्वार्थीपणानें तजेला चढतो. तथापि धंदेवाईक हरिदास व हौशी बिनधंदेवाईक हरिदास यांच्यामध्यें सरस निरस ठरवून एकाला मान्यता कमी व दुसऱ्याला अधिक असते हें प्रतिपादन करण्याचा येथें माझा हेतु नाहीं. माझा हेतु इतकाच आहे कीं दोघांनाहि मान्यता सारखी असली तरी हौशी हरिदासांचें निदान कौतुक तरी अधिक करावें असें खचित वाटतें. आपण याच्या जोडीचें म्हणून एक उदाहरण घेऊं. श्रावणीमध्यें किंवा एरवी जानवें घालावयाचें तें घालणारानें स्वत: हातानें काढलेलें काय किंवा दुसऱ्यानें काढलेलें काय त्याला धार्मिक फल सारखेंच. तथापि जानवें घालणारानें तें स्वतःच हातानें काढलेलें असेल तर त्याला सहजच श्रेष्ठता देण्याकडे मनाचा कल असतो. स्वतः हातानें शिजविलेल्या अन्नाला धंदेवाईक आचाऱ्यानें शिजविलेल्या अन्नाइतकी कदाचित् गोडी न आली तरी निदान त्याबद्दल पवित्रपणाची भावना अधिक वाटते यांत शंका नाहीं. आजच्या नव्या मनूंतहि स्वत: हातानें सूत काढून स्वतः हातानें विणलेला कपडा घालून जर कोणी एखाद्या सभेंत आला तर इतरांच्या मानानें या एका म्हणजे स्वावलंबनाच्या मुद्यापुरती कां होईना अधिक मान्यता आपलें मनच त्याला देतें. जी गोष्ट यज्ञोपवीताची अन्नाची किंवा वस्त्राची तीच कीर्तनाचीहि समजावी. कारण घरीं सांप्रदायिक म्हणून उत्सव करणारानें धंदेवाईक हरिदास आणून कीर्तनाला उभा केला तर त्या कीर्तनाला जी गोडी येईल त्यापेक्षां घरच्या उत्सवांत कोणी स्वतःच कीर्तन करण्यास उभा राहील तर त्या कीर्तनाला गोडी अधिक येईल यांत शंका नाहीं. उत्सवाच्या दृष्टीनेंहि पहातां, जितके

उत्सव तितके कीर्तनकार मिळत नाहींत यामुळें चार कोर्टांतून कामें चालविणाऱ्या वकिलाप्रमाणें चार ठिकाणचीं कीर्तनाचीं निमंत्रणें स्वीकारणाऱ्या हरिदासांची स्थिति होते. म्हणून उत्सवाच्या कीर्तनांत खरा उत्सवानंद प्रकट होत नाहीं. अर्थात् घरी सांप्रदायिक उत्सव करणारानें, शक्य असल्यास, चार चार दिवस कार्यक्रम न करितां एखाद दुसरा दिवसच करून त्यांत शक्य तर स्वतःच कीर्तन केलें तर उत्सव अधिक यथार्थ रीतीनें साजरा होईल असें म्हणण्यास हरकत नाहीं.

श्रीमंत बाळासाहेब साठे यांनीं वरील तत्वाप्रमाणें आचरण ठेवलें आहे याबद्दल त्यांचें मी मनापासून अभिनंदन करितों. श्रीमंत बाळासाहेब मिरजकर, श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधी औंधकर यांच्यासारख्या प्रतिष्ठित संस्थानिकांनींहि अगदीं अलिकडे स्वतः उभें राहून कीर्तन करण्याचा पायंडा घातल्यानें हौशी कीर्तनकारांची थट्टा होण्याचा प्रसंगच राहिला नाहीं. सकृद्दर्शनीं नवीन अशा दिसणाऱ्या गोष्टी आचरणारांच्या अंतर्यामीं निष्ठा उद्योग प्रेम व गांभीर्य दिसून आल्यास त्यांची थट्टा होऊंच शकत नाहीं. हौशी कीर्तनकारांचीहि हीच गोष्ट समजावी. त्यांतूनहि श्री. बाळासाहेब साठे यांनीं निवळ हौसेच्या प्रदर्शनापलीकडे उडी मारली आहे हें या पुस्तकावरून आपोआपच दिसून येतें. या ‘ कीर्तनकुमुदिनी ’ पुस्तकांत एकंदर सात दलें किंवा कीर्तनसंदर्भ असून प्रत्येकांत पूर्वरंग म्हणजे तत्त्वानुसंधान व आख्यान या दोन्हींचा समावेश करण्यांत आला आहे. पूर्वरंगांत नेहमीप्रमाणें निवडक संस्कृत ग्रंथप्रबंधांतील वाक्यें व श्लोक तसेंच प्राकृत संत कवींच्या ग्रंथांतील अवतरणें यथोचित घेतलीं आहेत. आख्यानांत मोरोपंतादि कवींच्या आर्या घेतल्या आहेत. पण विशेष हा कीं स्वतः रागदारींत पद्यें रचून घातलीं आहेत. विषयानुसंधान सुसूत्र असून त्यांत कोठेंहि खंड अगर विसंगति झाली असें वाटत नाहीं. या दृष्टीनें पहातां हें पुस्तक नवीन होतकरू हरिदासांना फार उपयोगी पडेल यांत शंका नाहीं. श्री. बाळासाहेब साठे यांनीं या पुस्तकांत अनुसरलेला मार्ग मुळींच नवा नाहीं. कारण जुन्या हरिदास सांप्रदायांत अशा प्रकारचीं बाडें लिहिलीं जात असत, फक्त तीं हातानें लिहिलेलीं असून सांप्रदायिक शिष्य त्यांच्या नकला करून घेत. पण त्यामुळें तीं दुर्मिळहि असत. याच्या उलट हल्लींचें हें एक प्रकारें जुन्या पद्धतीचें बाडच म्हटलें तरी

तें छापून निघाल्यानें सर्व महाराष्ट्रभर वाटेल त्या मनुष्याला वाटेल तेथें हवें तेव्हां उपलब्ध होणारें आहे. खेड्यापाड्यांतून एखादा पुराणिक आढळतो पण हरिदास ही वस्तू त्याहून अधिक दुर्मिळ आहे. आणि उपयुक्ततेकडे नजर दिल्यास हरिदास संप्रदाय हल्लींहून गांवोगांवीं अधिक प्रसरावा अशी इच्छा कोणालाहि होईल. या दृष्टीनें पहातां श्री. साठे यांनीं हें पुस्तक छापवून कीर्तनकारांच्या भावी पिढीला उपकृत करून ठेवलें असेंच म्हणावें लागतें.

आतां कोणचेंही बाड अगर हल्लीसारखें पुस्तक सामान्य मनुष्याच्या हातीं पडल्यास त्याला त्याचा उपयोग 'बांधून नेलेल्या' शिदोरी इतकाच होणार ही गोष्ट खरी आहे. कारण जिवंत प्रतिभा-विकासाशिवाय कोणत्याहि वक्तृत्वाला रंग चढत नाहीं. आणि प्रतिभेची व्याख्याच मुळीं अशी आहे कीं, 'प्रतिक्षणनवनवोन्मेषशालिनी प्रज्ञा प्रतिभा.' आयत्या वेळीं सुचलेल्या उचित कल्पनेची सर आधीं घोटून स्मरणांत ठेविलेल्या कल्पनेला कधींहि येत नाहीं. ताजें तें ताजें व शिळें तें शिळें हा भेद केव्हांहि रहाणारच. या दृष्टीनें पहातां जुन्या पिढीच्या हरिदासांतहि दोन प्रकार पहावयास आपणास मिळाले आहेत. एका प्रकारांतील हरिदास हा केवळ साच्यांत बसविलेलें कीर्तन करणारा. तो एके ठिकाणीं जें कीर्तन करील तें त्याच क्रमानें किंबहुना जवळ जवळ त्याच शब्दानें दुसरीकडेहि करणार. ज्याप्रमाणें पूर्वी न घेतलेलें असें चित्र चित्रपटाच्या प्रदर्शनांत कधीं दिसावयाचें नाहीं त्याचप्रमाणें या प्रकारच्या कीर्तनांत हा हरिदास कल्पना शब्द सिद्धांत कोट्या गोष्टी श्लोक पदें या सर्वांची गांठून बनविलेली जपमाळ एकेक मण्यानें व ठराविक क्रमानें ओढीत असलेला आढळावयाचा. जसें कांहीं रहाटगाडग्यावरील पोहरे ठराविक क्रमानें मोजकें पाणी घेऊन एकामागून एक वर यावयाचे व ठरलेलें तितकेंच पाणी पन्हळांत ओतावयाचे किंवा बाहेर सांडावयाचे. पण उलट दुसऱ्याप्रकारचेहि कांहीं हरिदास होते व आहेत. ते असे कीं त्यांच्या कीर्तनांतील बीजभूत कल्पना किंवा संकल्प अगर सिद्धांत आधीं ठरलेला असला तरी त्याची सर्व मांडणी किंवा सर्व विकास प्रतिभेच्या सहाय्यानें प्रत्येक वेळीं नवानवाच आढळून येईल. यामुळें कीर्तनकार तोच किंबहुना अभंगहि तोच असला तरी प्रत्येकवेळीं कीर्तन मात्र नवें असा अनुभव येईल. या दुसऱ्या प्रकारच्या

कीर्तनकारांना श्री. साठे यांनीं छापलेल्या बाडाचा फारसा उपयोग होणार नाहीं हें जरी खरें, तरी उन्मेषशाली प्रतिभेलाहि प्रज्ञा म्हणजे चिकित्सकबुद्धि व तर्कानुसंधानें, आणि धारणा म्हणजे स्मरणशक्ति व ज्ञानसंग्रह ह्या गोष्टींची आवश्यकता नसतेच असें मात्र नाहीं. यामुळें अशा हरिदासांनाहि श्री. साठे यांचें पुस्तक अल्पांशानें कां होईना पण उपयोगी पडेल असें वाटतें.

शेवटीं श्री. साठे यांनीं या ' कीर्तनकुमुदिनींत ' गोंवलेल्या विषयासंबंधानें एकच गोष्ट सांगावयाची राहिली. ती ही कीं ती सर्वच्या सर्व मार्मिक असून त्यांत तळाशीं जाऊन अवगाहन व मनन करणाराला जुन्या प्रतीच्या वेदांती ज्ञानाबरोबर नव्या मनूला उपयुक्त असेंहि समाजशिक्षण आढळेल. पण या मुद्यासंबंधानें अधिक स्पष्ट विवरण करण्यापेक्षां हा मार्मिकपणा हुडकून काढून त्याचा आस्वाद घेण्याचें काम वाचकांवरच सोंपवून देऊन ही प्रस्तावना मी पुरी करितों.

## दुसऱ्या खंडावरील अभिप्राय

श्री. रा. बाळासाहेब साठे, ह्यांच्या ' कीर्तनकुमुदिनी ' ह्या हरि-कीर्तनविषयक ग्रंथाचा दुसरा खंड वांचून पाहिला. पहिला खंड नऊ वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाला त्याला मी प्रस्तावना लिहिली त्या कारणानें तो तेव्हां वाचण्यांत आलाच होता. हे दोन्ही खंड जमेस धरितां असें दिसून येतें कीं, हरिकीर्तन करणें आणि त्या कीर्तनांचे विषय प्रबंधरूपानें लिहून काढणें हा क्रम त्यांनीं अजून चालू ठेवला आहे. ह्या निष्ठेबद्दल त्यांचें अभिनंदन करावेसें वाटतें.

कोणत्याही कलेच्या उद्योगांत धंदेवाईक व हौशी असे कलावंताचे दोन प्रकार असतातच. या दोघांचाही उपयोग आपापल्यापरीनें समाजाला होत असतो. धंदेवाईक कीर्तनकार झाले तरी ते आपल्या कलाविलासांत रमत नाहींत असें नाहीं. परंतु हौशी कलावंताचा आनंद निर्हेतुक शुद्ध म्हणून अधिक सेवनीय व्हावा हें उघडच आहे. हौशी गृहस्थांनीं हरिकीर्तन मधून मधून केल्यास त्यायोगें धंदेवाईक हरिदासांच्या क्षेत्रावर आक्रमण केलें असें होत नाहीं.

हरिकीर्तनांत पारमार्थिक विचार, वक्तृत्व, संगीत, आणि मनोरंजन याच मुख्य गोष्टी असतात. आणि त्या ज्यांच्या अंगीं असतील त्यांनीं

त्यांचा नैमित्तिक उपयोग करून स्वतः आनंद घेणें आणि दुसऱ्यास करून देणें ही गोष्ट सर्वथैव इष्ट होय. प्रस्तुत पुस्तकांत सात नवीन पूर्वरंगाचे प्रबंध व आख्यानें यांची रचना पूर्वीच्याच पद्धतीनें केलेली असली तरी, त्यांत एक प्रकारें प्रगतीही दिसून येते.

प्रत्येक पूर्वरंगांत समाजोपयोगी असें मनुष्यधर्माच्या एकएक अंगाचें विवेचन केलेलें समुचित असून, कांहीं आख्यानांतून प्रचलित सामाजिक राजकीय विषयांसंबंधी गूढ अभिप्राय व उपदेश व्यंजित होतो, तर कांहीं आख्यानें प्रत्यक्ष ऐतिहासिक स्वरूपाचींच आहेत. कित्येक संदर्भात शंका-कुशंका उपस्थित करून त्यांचें निवारण करण्याचा प्रयत्न केला आहे; पण अशा स्पष्टीकरणाची कांहीं अवश्यकता आहे असें मला वाटत नाहीं.

एक तर कलेच्या दृष्टीनें पाहतां तिच्या हेतूची चर्चाच मुळीं अनुचित ठरते. शिवाय कलावंतानें आपला हेतु अमुक एक नाहीं असें स्पष्ट शब्दांनीं सांगितलें तर, त्यावर विश्वास न ठेवतां उलट अनुमानहि केल्याशिवाय कांहीं कांहीं मनांचें समाधान होत नाहीं. चित्राला अगदीं संक्षिप्त इतकेंच नांव ढोबळ समजुतीकरितां खालीं लिहितात. त्याचें वर्णन किंवा मीमांसा त्यावर लिहित नाहींत. त्याप्रमाणें पूर्वरंगाचे प्रबंध व आख्यानें कथेंत तोंडी सांगितल्याप्रमाणें छापून, संदर्भ मुळींच वगळले असते तरीहि अधिक बरें झालें असतें असें मला वाटतें.

श्री. बाळासाहेब तोंडी कीर्तन करितात. तेव्हां पुस्तकांतील या प्रबंधांतून अधिक विस्तार सहजच होत असेल. आणि असा विस्तार होत असतो त्यांतच आयत्या वेळीं सुचणाऱ्या कोट्या, मौजा, गोष्टी वगैरे वक्तृत्वाचीं कांहीं अंगें प्रकट होत असतीलच असें मी धरून चालतों. अशा गोष्टी छापील प्रबंधांत घालतां येणें शक्य नाहीं. म्हणून त्या त्यांनीं घातल्या नाहींत हें उघड दिसतें.

संगीताचें स्वर लेखन अगदीं पूर्णपणें तंतोतंत होऊं शकत नाहीं असें म्हणतात. तीच गोष्ट अभिजाद वक्तृत्वाचीहि आहे. तोंडी केलेलें वक्तृत्व आणि लिहून काढलेली त्याची आवृत्ति यामध्यें किती जमीन अस्मानाचा फरक पडूं शकतो, याचा अनुभव मला स्वतः संबंधानें व इतरांसंबंधानें नहमीं येतो. परंतु वक्तृत्व झालें तरी त्याची सर्व भिस्त अगदीं आयत्या वेळीं होणाऱ्या स्फूर्तीवर अवलंबून ठेवतां येत नाहीं.

प्रतिभेला प्रज्ञेची बैठक हवीच असते. व्याख्यात्यानें आपल्या विषयाचा विचार व मनन आधीं थोडेंबहुत करून त्यांतले मुद्दे सुसंगत रीतीनें मनाशीं ठरविल्यानें, त्याच्या नैमित्तिक स्फूर्तीला बाधा होण्याचें कारण नाहीं. म्हणून कोणाही हरिदासानें देखील ह्याच पद्धतीचा अवलंब केल्यास तें वावगें नाहीं.

श्री. बाळासाहेबांनीं रचून लिहून काढले अशा प्रकारचे प्रबंध हे कीर्तनाचें मुख्य शरीर होय. आणि शरीराशिवाय वेष भूषेची सजावट कशावर करावयाची व अलंकार कशावर घालावयाचे ?

असो. त्यांचा हा क्रम पुढें असाच चालू राहिला तर आणखीहि एक दोन खंड निर्माण होतील. तसें झाल्यास पुढील पिढीच्या कीर्तनकारांना त्यांचें मोठेंच साहाय्य होईल यांत शंका नाहीं.

---

## २३ टिळक महाविद्यालय लेखसंग्रह

प्रज्ञा व प्रतिभा हीं दोन्हीं मनुष्यामध्यें प्रायः एकदमच उदय पावूं लागतात. वास्तविक दोहोंचें स्वरूप व कार्य वेगवेगळें आहे. प्रज्ञा म्हणजे कोणत्याही विषयाचें यथार्थ ज्ञान करून घेण्याची बुद्धी. आणि प्रतिभा म्हणजे कोणत्याही गोष्टीचें ज्ञान चित्ताकर्षक होईल अशा विकृत रीतीनें मांडून त्या पासून एक प्रकारचा मनोहर असा आभास उत्पन्न करण्याची बुद्धी. प्रज्ञा म्हणजे अनेक मार्गांनीं मिळालेलें वस्तुज्ञान एकीकृत करण्याची बुद्धी, व प्रतिभा म्हणजे एका रीतीनें मिळालेलें ज्ञान अनेक रीतीनें फैलावून दाखविण्याची बुद्धी. अशा रीतीनें या दोन बुद्धी परस्पर विरोधी स्वरूपाच्या असतांही मनुष्याची बाल्यावस्था संपून तारुण्यावस्था सुरू होण्याच्या वेळीं एकदमच त्या उदय पावूं लागतात व पुढेंही एकत्र नांदतात; किंबहुना प्रज्ञेनें मिळवावें व प्रतिभेनें खर्च करावें अशा प्रकारचा विनिमय बुद्धिमान् मनुष्याचा जन्मभर चालू असतो. यामुळें तरुण विद्यार्थ्यांच्या मनांत, ते विद्यार्थी दशेंत असतांनाच, वक्तृत्व व लेखनकला यांची हौस प्रादुर्भूत होते. तसेंच मनुष्य प्राणी स्वभावतः संगतिप्रिय व संघशील असल्यामुळें विद्यार्थ्यांनाही व्यक्तिशः लेख लिहून

प्रसिद्ध करण्यापेक्षां तेंच काम आपल्या सोबत्यांच्या जुटीनें किंवा मेळानें करणें आवडतें. यामुळें वाचण्यासारखीं इतर अनेक मासिक पुस्तकें किंवा नियतकालिकें असतां आपल्या संघशक्तीनें बळावणाऱ्या प्रज्ञेचा व प्रतिभेचा निदर्शक असा स्वतःच्या लेखांचाहि एकादा संग्रह असावा असें त्यांस वाटतें. हल्लीं कोणतेंही सरकारी अगर निमसरकारी कॉलेज घेतलें तर त्याचें खास असें एकादें मासिक पुस्तक असतें. टिळक महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांनांहि लेखनाविषयीं अशीच हौस वाटणें साहजिक आहे. ती हौस पुरवून घेण्याची त्यांची रीत मात्र थोडीशी निराळी आहे. म्हणजे मासिकाच्या किंवा त्रैमासिकाच्या रूपानें नव्हे, तर वेळोवेळीं भागशः प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांच्या रूपानें, ते आपले लेख, कविता वगैरे प्रसिद्ध करणार आहेत. प्रस्तुत पुस्तक हा त्यांच्या ' लेखसंग्रहा 'चा पहिला खंड आहे. यांतील लेखांवरून व कवितांवरून या विद्यालयांतील विद्यार्थ्यांची मनोवृत्ति कशा प्रकारची आहे तें आपोआप दिसून येईल.

---

## २४ लोकनायक अणे यांचे लेख व भाषणें

वऱ्हाडचे सुप्रसिद्ध पुढारी, गेल्या सात वर्षांतील लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे एक प्रमुख सभासद, कॉंग्रेस वर्किंग कमिटीचे सभासद, यवतमाळ येथील ' लोकमत ' पत्राचे नैमित्तिक संपादक व ग्वाल्हेर येथील मराठी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष, देशभक्त माधव श्रीहरी उर्फ बापूजी अणे यांचे लेख व भाषणें एकत्रित करून प्रस्तुतचा ग्रंथ प्रसिद्ध केला जात आहे. बापूजी आणे यांची प्रसिद्धी मुख्यतः राजकीय पुढारी या नात्यानेंच असल्यामुळें, कदाचित् कित्येकांना या ग्रंथाची विशेष नवलाई वाटेल. परंतु ज्यांना त्यांचा त्याहून निकट परिचय आहे त्यांना या पुस्तकानें नवल असें कांहींच वाटणार नाहीं. कारण राजकारणाप्रमाणें संस्कृतविद्या व मराठी वाङ्मय या दोहोंतहि बापूजींचा अनिरुद्ध संचार असल्याची त्यांना पुरी जाणीव आहे. त्यांना वाईट इतकेंच वाटेल कीं, प्रस्तुत पुस्तकांत न आलेलीं अशीं रा. अणे यांचीं किती तरी भाषणें यांत आलेल्या भाषणाइतकींच स्फूर्तिदायक व तेजस्वी असतां, त्यांचा संग्रह करण्याचें साधन

प्रस्तुत ग्रंथाच्या संग्राहकाला उपलब्ध झालें नाहीं. पण हा संग्राहकाचा दोष नसून, तो विशिष्ट परिस्थितीचाच दोष होय, व ती परिस्थिति म्हटली म्हणजे, बापूजी अणे यांचें यवतमाळसारख्या कांहींशा एका बाजूस असलेल्या जिल्ह्यांतील वास्तव्य, बरींच वर्षें त्यांनीं केलेला वकिलीचा धंदा व वर्तमानपत्रांच्या निकट सान्निध्याचा अभाव. यवतमाळसारख्या ठिकाणीं असतां, त्यांचे लेख व भाषणें इतकीं तरी संग्रहित करतां आलीं हेंच कोणी कांहींसें आश्चर्य मानील !

रा. अणे यांनीं उदरनिर्वाहाचा धंदा व सार्वजनिक कार्याचें एक उपयुक्त साधन म्हणून पूर्ववयांत कायद्याची परीक्षा देऊन वकिली सुरू केली. तथापि कलकत्ता विद्यापीठाच्या परीक्षा पास होण्याकरितां त्यांनीं जे विषय घेतले होते, ते विद्या, वाङ्मय व संस्कृति यांना अनुलक्षूनच होते आणि दैवाच्या कलाटणीनें ते वकील न होतां एखाद्या कॉलेजांत प्रोफेसर झाले असते, तर त्यांचें वाङ्मयव्यासंगाचें कार्य लोकांच्या नजरेंत याहून अधिक भरण्यासारखें झालें असतें. इतकेंच नव्हे, तर सूक्ष्माभ्यासी ग्रंथकार या नात्यानें त्यांनीं खचित लौकिक मिळविला असता. पण लोकमान्य टिळक यांच्या चरित्राला स्वतः त्यांचें त्यांनाच अनपेक्षित असें वळण ज्याप्रमाणें मिळालें, म्हणजे ते विद्यापीठांतील प्रोफेसर न होतां लोकमान्य असे राजकीय पुढारी व वर्तमानपत्रकार झाले, त्याचप्रमाणें त्यांचे सच्छिष्य व परमभक्त बापूजी अणे यांच्याहि चरित्राला तसेंच अनपेक्षित वळण लागावें हें एका दृष्टीनें अनुरूपच झालें असें म्हटलें पाहिजे. पुण्यासारख्या विद्येच्या माहेरघरीं व राजकारणाच्या केंद्रांत रहावयास मिळाल्यानें लोकमान्य टिळकांना ‘ केसरी ’ पत्र हातीं घेतां आलें, व तें त्यांनीं आपल्या आवडत्या राजकारणाच्या सेवेला लावून अत्यंत यशस्वी केलें पण रा. अणे हे यवतमाळसारख्या ठिकाणीं असल्यामुळें, व त्यांतल्या त्यांत वर दर्शविल्याप्रमाणें बरींच वर्षें मुख्यतः वकिलीचा धंदा करावा लागल्यामुळें त्यांना हव्या तशा वर्तमानपत्राची जोड मिळाली नाहीं.

अशा बाबतींत स्थलमाहात्म्य हें खरोखरच विशेष रीतीनें निर्णायक ठरतें ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. पुण्या-मुंबईबाहेर महाराष्ट्रांत बुद्धिमान, अभ्यासू व वाङ्मयप्रेमी लोक नाहींत असें नाहीं. परंतु संकुचित क्षेत्राच्या धाजिल्ह्याचें नांवच वर्तमानपत्राला आपल्या क्षुद्रपणानें दूषवितें. उलट राज-

धानीच्या सांनिध्यानें व आधारानें पुष्कळ वर्तमानपत्रांना त्यांच्या योग्यतेहून अधिक प्रसिद्धि व उत्कर्ष लाभूं शकतो. तथापि रा. अणे यांनीं त्यांतल्या त्यांत 'हरिकिशोर' पत्राला मदत करून व 'लोकमत' पत्र स्वतःच्या स्फूर्तीनें नवें काढवून, वकिलीबरोबर त्याचाहि पुरा उपयोग जिल्ह्यांतील राष्ट्रीय सेवेला करून घेतला. प्रस्तुतच्या ग्रंथांत 'हरिकिशोर' व 'लोकमत' या दोन पत्रांतील बापूजींचे लेख प्रसिद्ध होत आहेत. ते वाचले असतां कोणालाहि तेव्हांच असें दिसून येईल कीं, पुण्या-मुंबईकडील पत्रांना संपादक वर्गापैकीं एक म्हणून बापूजींचा लाभ झाला असता, तर त्यांच्या ओजस्वी लेखणीनें व सद्‌विद्याभिरुचीनें त्या वर्तमानपत्रांना कीर्ति मिळाल्याशिवाय राहिली नसती. 'हरिकिशोर' पत्राचे लागोपाठ दोन संपादक राजद्रोहाकरितां तुरुंगांत गेले ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे त्या पत्राची राष्ट्रीय वृत्ति किती बाणेदार होती हें लक्षांत येईलच. बापूजी अणे यांच्या बुद्धीला कायद्याच्या सूक्ष्म ज्ञानाचा संस्कार असल्यामुळें लेखक या नात्यानें त्यांना तुरुंगांत जावें लागलें नसलें तरी, 'हरिकिशोर' व 'लोकमत' या दोनहि पत्रांतील बापूजींचे राजकीय विषयावरील लेख वाचले असतां या दोनहि पत्रांच्या बाणेदारपणाला स्फूर्ति कोठून मिळाली असेल याची कल्पना कोणासहि सहज करतां येईल. 'लोकमत' पत्राच्या मार्मिकपणाला रा. बापूजी अणे यांचें गुरुत्वच पुष्कळसें कारणीभूत आहे.

रा. अणे हे नुसताच वकिलीचा धंदा करते, किंवा नुसतीच राजकीय चळवळ करते तर त्यांच्या हातून जो वाङ्मयव्यवसाय झाला त्याहून पुष्कळच अधिक झाला असता यांत मुळींच शंका नाहीं. या दोन्ही कामांतील पुढारीपणानें व विशेषतः थोर सत्प्रवृत्ति, निरलसता, झीज लावून घेण्याची आवड व मित्रकार्यांत उडी घेण्याची हौस, यांमुळें त्यांच्या नित्य, नैमित्तिक अशा इतरहि सार्वजनिक कार्याचा पसारा एवढा मोठा नेहमींच वाढलेला होता कीं, त्यामुळें हातांत लेखणी धरण्याला त्यांना बहुधा सवडच सांपडत नसे. तथापि खनपटीला बसणारे ऋणानुबंधी लोक भेटले असतां ते वेळांत वेळ काढूनहि लिहीत हें 'श्रुतिबोध,' 'संदेश' पत्रांतून प्रसिद्ध झालेल्या व या पुस्तकांत समाविष्ट केलेल्या त्यांच्या लेखांवरून दिसून येईल. प्रस्तुत पुस्तकांत संग्रहित झालेल्या थोड्या भाषणांवरून रा. अणे यांच्या एकंदर भाषणविस्ताराची कल्पना

कोणी करील तर ती अगदीं चुकीची ठरेल. कारण दरम्यानच्या कित्येक वर्षांत त्यांनीं दर आठवड्याला निदान एक दोन भाषणें केलीं असावींत हें प्रत्यक्ष हिशेब न करतां कोणीहि सांगूं शकेल. कारण बापूजी हे जरी धंद्यानें वकील होते, तरी त्यांना एकाद्या न्यायकोर्टांत शपथेवर तुमचा मुख्य व्यवसाय काय असें विचारलें असतें तर 'राजकीय चळवळ' असेंच त्यांना प्रामाणिकपणें सांगणें प्राप्त झालें असतें. आणि त्यांनीं हा असा व्यवसाय केला म्हणूनच सर्व वऱ्हाड प्रांतांत, किंबहुना सर्व नागपूर–वऱ्हाड प्रांतांत, राष्ट्रीय चळवळ व संघटना यांच्या दृष्टीनें त्यांनीं यवतमाळ जिल्हा नमुनेदार करून दाखविला, तसा तो एरवीं झालाच नसता. शाळेंतील खेळकर मुलांना नित्यनैमित्तिक सुट्ट्यांची जशी आवड तशीच ती बापूजींनाहि होती. कारण रिकामा दिवस केव्हां मिळेल व जिल्ह्यांतील संघटनेच्या कार्याला केव्हां जाईन असें त्यांना नेहमीं होई. आणि कधीं ऊन न म्हणतां, कधीं पाऊस न म्हणतां मिळेल तें वाहन व मिळतील ते सोबती घेऊन बाहेर पडावयाचें व दूरदूरच्या मजला मारून यावयाचें असा त्यांचा नित्यक्रम कित्येक वर्षें चालू होता. या चळवळीच्या जोरांत सहानुभूति व राष्ट्रप्रेमी अशा लोकांच्या सभांतून त्यांचीं भाषणें कशीं होत असतील याची कल्पना पुणें मुंबईसारख्या शहरीं त्यांचीं जीं भाषणें राजधानीच्या लोकांना ऐकावयास सांपडलीं त्यावरून सहज करतां येईल. त्यांचीं भाषणें टिपून घेऊन प्रसिद्ध करण्याला रिपोर्टर, छापखाने व वर्तमानपत्रें यांची अनुकूल जोड मिळाली नाहीं ही गोष्ट वेगळी. पण तिचें कारण केवळ स्थलविशेष म्हणजे लेखनमुद्रणकलेच्या दृष्टीनें मागसलेला जिल्हा हेंच होय. म्हणून प्रस्तुत पुस्तक छापून प्रसिद्ध करून रा. अणे यांच्या मित्रमंडळींनीं त्यांच्या भाषणलेखनशैलीचें गुणग्राहकत्व प्रकट केल्याबद्दल जरी आम्ही त्यांचें अभिनंदनच करितों, तरी रा. अणे यांनीं एकंदरीनें केलेला भाषणव्यवसाय हा लक्षांत घेतां हें पुस्तक केवळ वानगीदाखल ठरतें, असा अभिप्राय नमूद केल्याशिवाय मात्र आमच्यानें राहावत नाहीं. बापूजींना असेंहि म्हणतांना आम्ही ऐकलें आहे कीं, हातीं लेखणी घेणें हें त्यांना संकट वाटे. पण ज्याचा जो स्वभावगुण प्रमुख असेल त्याचाच जास्तींत जास्त उपयोग करून घेण्याचा हक्क राष्ट्राला आहे. या दृष्टीनें त्यांच्या लेखणीपेक्षां त्यांच्या वाणीनें जें कार्य

केलें, तेंच लेखणीच्या कार्याइतकें किंवा त्याहूनहि अधिक उपयुक्त ठरलें आहे यांत शंका नाहीं.

प्रस्तुत ग्रंथांतील राजकीय विषय सोडून देऊन धर्म व वाङ्मय या विषयावरचे रा. अणे यांचे लेख वाचले असतां त्यांची खरी आवड व अभिरुचि कोणीकडे झुकत होती हें दिसून येईल. ग्वाल्हेरच्या साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष त्यांना निवडण्यांत आलें, तेव्हां त्यांच्या वाङ्मयव्यासंगा-संबंधानें ज्या एकदोन टीकाकारांनीं पृच्छा केली, त्यांना प्रस्तुत पुस्तकांतील ' मराठी वाङ्मयाचा जयजयकार ' हा लेख आधीं वाचावयास मिळाला असता तर त्यांनीं तशी शंका उपस्थित केलीच नसती. कारण या लेखांतील मराठी वाङ्मयाचें रा. अणे यांनीं केलेलें पर्यालोचन कोणत्याहि साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षाला शोभण्यासारखेंच आहे. हा लेख सुमारें पन्नास पानांचा असून त्यांतील विध्वंसक व विधायक अशा दोनहि टीका अत्यंत मार्मिक व सदभिरुचिदर्शक आहेत. नागपूरचे प्रसिद्ध कवि टेकाडे यांच्या काव्यसंग्रहाला रा. अणे यांनीं लिहिलेली प्रस्तावना ही देखील वेळांत वेळ काढून त्यांनीं ठेवलेल्या मराठी वाङ्मय-परिचयाची व संस्कृत शास्त्रीय ग्रंथांची ओळख पटवून देणारी आहे. तसेंच हिंदुधर्माची मीमांसा हाहि लेख अत्यंत मार्मिक आहे.

असो. रा. अणे यांची अन्यकार्यव्यापृतता लक्षांत घेतली असतां त्यांनीं वाङ्मयाच्या उद्योगांत इतकें तरी लक्ष घातलें हेंच विशेष होय; व त्याचें कारणहि हेंच कीं, सुशिक्षित सुसंस्कृत मनाला वाङ्मय हें लोकशिक्षणाचें साधन जितकें वाटतें तितकेंच तें आत्मसंतोषाचेंहि साधन वाटतें. सनातन संस्कृतीच्या भाविक मनाला, दिवसभर सर्व तऱ्हेचा ऐहिक व्यापार केला तरी, दिवसांतून केव्हां तरी एक वेळ देवदर्शन घेतल्यावाचून समाधान वाटत नाहीं. त्याप्रमाणें सुशिक्षित मनुष्याला रोज वाङ्मयाचें स्वरूप अस-णारीं चार अक्षरें वाचल्याशिवाय किंवा लिहिल्याशिवाय समाधान वाटत नाहीं. वृक्षविस्तार कितीहि मोठा असला तरी त्याच्या लहानशा फुलाफळां-तच जीवनरसाचें सार व सत्त्व मधुबिंदूच्या रूपानें उतरतें. वाङ्मय हें देखील मनुष्याच्या ज्ञानविस्तारांतून अर्करूपानें स्रवणारे मधुबिंदूच होत. आणि वृक्षाच्या गोडीची किंवा सुगंधाची परीक्षा करण्याला एखादेंहि फूल किंवा फळ पुरें होतें ! प्रस्तुत पुस्तकाचे वाचकहि त्याला अणेरूपी ज्ञान-

वृक्षाचें एक लहानसें पण नमुनेदार फळ किंवा फूल या भावनेनेंच आदरि-तील यांत शंका नाहीं.

## २६ दर्प-दर्पण

दर्पदर्पण या पुस्तकास प्रस्तावना लिहिण्याबद्दल रा. चिपळूणकर यांनीं मला सांगितल्यावरून मी दोन शब्द लिहीत आहें.

दर्प-दर्पण हें ज्या कादंबरीचें भाषांतर आहे ती-जेन ऑस्टिन् या ग्रंथकर्त्रीची Pride aud Prejudice नांवाची कादंबरी मी सन १८८९ सालीं पी. ई. क्लासांत असतां प्रथम वाचली. परंतु या कादंबरीची मला इतकी गोडी लागली कीं, त्यानंतर पुढेंहि एकदोन वेळां तींतील निवडक भाग मी मुद्दाम वाचले आहेत. चिपळूणकर यांच्या प्रस्तुतच्या भाषांतरानें ती आणखी एक वेळ मला वाचावयास सांपडली.

कित्येक टीकाकारांनीं जेन ऑस्टिन् ही ग्रंथकर्त्री मनुष्यस्वभावाचें चित्र रेखाटण्यांत खुद्द शेक्सपीअरच्या तोडीची आहे असें म्हटलेलें आहे. Pride and Prejudice ही कादंबरी जों जों अधिकाधिक वाचावी तों तों वरील विधानाचें सत्य मनाला अधिकाधिक पटूं लागतें. मूळ कादंबरींत इंग्रजी समाजाच्या एका अंगाचें चित्र जेन ऑस्टिन् इनें काढलें आहे. पण ही कादंबरी 'सामाजिक' या सदराखालीं पडण्यासारखी असतांहि ती वाचल्या-नंतर मनावर जो ग्रह शिल्लक राहतो तो इंग्रजी समाजाच्या विशिष्ट चाली-रीतींचा नसून मनुष्यस्वभाव कौतुकाचाच राहतो. समाज कोणत्याहि धर्माचा किंवा जातीचा असला तरी त्याच्या चरित्रास जें अधिष्ठान असतें तें सर्वसाधारण अशा मनुष्यस्वभावाचेंच असतें. आणि म्हणूनच प्रत्येक भाषेंतील कांहीं कांहीं ग्रंथांचा तरी आस्वाद, परकी मनुष्यास ते अगदीं स्वभाषेंतील ग्रंथ असल्याप्रमाणें घेतां येतो. Pride and Prejudice ही कादंबरी सामाजिक खरी, पण केवळ इंग्रजी समाजांतच आढळून येईल व इतर समाजांत आढळून येणार नाहीं असें या कादंबरीच्या अंतरंगांत फारच थोडें आहे. अर्थात् असली कादंबरी भाषांतर किंबहुना रूपांतर करण्यासहि सोपी जाते. आणि रा. चिपळूणकर यांना कलमाच्या थोड्याशा

फटकाऱ्यांनीं मूळ ग्रंथाचें केवळ मोकळें भाषांतर करूनहि उत्कृष्ट रूपांतर करण्याचें श्रेय कसें मिळूं शकलें आहे हें वाचकांच्या ध्यानांत येईलच.

मूळ कथानकांत पाश्चात्य समाजास असाधारण असे दोन तीन प्रकार मधून मधून आले आहेत. प्रौढविवाह अविवाहित स्त्रीपुरुषांचें अघळ पघळ खुलें बोलणें चालणें, आणि स्वत: वधुवरांनीं आपल्या आवडीनें विवाह ठरविणें हे ते प्रकार होत. पैकीं प्रौढविवाह हा आतां आपल्या हिंदू समाजास हळूं हळूं परिचित होऊं लागला आहे. आणि भाषांतर-कारांनीं पृष्ठ २४५ वर लिहिल्याप्रमाणें " लहानपणीं काय किंवा मोठेपणीं काय, केव्हांहि लग्नें केलीं तरी चांगल्या मुली त्या चांगल्या आणि वाईट त्या वाईटच " हें समाजास मान्य होऊं लागलें आहे. दुसरा व तिसरा हे प्रकार हिंदुसमाज पद्धतीस अनुरूप नसून ते केव्हांहि झालें तरी इकडे कितपत रूढ होतील याची शंकाच आहे. प्रौढ मुलास त्याची वधू दाखवून तिज-विषयीं एक प्रकारची संमति घेणें, आणि मुलीच्या भावी पतीस निदान तिच्या नजरेखालीं घालणें या गोष्टी प्रौढ विवाहास आनुषंगिक असल्या-मुळें इकडेहि आपण करूं लागलों आहों, त्या केल्यानें वडिलधाऱ्या माणसांचा मर्यादाभंग होतो किंवा वधूवर निश्चय करण्याच्या आईबापांच्या अधिकारास कमीपणा येतो असें कोणीहि मानीत नाहीं. प्रौढ वधुवरांस वाईट सरस--निरस हें कळूं लागलेलें असतें; आणि ज्यांच्या जन्माच्याच गांठीं पडावयाच्या त्यांना तत्पूर्वी डोळ्यांनीं एकमेकांस एकवार बघण्याची संधि देणें यांत आईबाप कांहीं मोठी लोकविलक्षण धाडसाची गोष्ट करि-तात असें मुळींच नाहीं. पण प्रौढ वधुवरांनीं एकांतीं बसणें, बोलणें, सहल करणें, किंवा हातांत हात घालून नाचणें या गोष्टी केवळ पुढच्या पायरी दाखल वाटल्या तरी त्या तशा नाहींत; व त्या होणें न होणें यांतच हिंदु समाजाच्या चाली रीतींच्या असाधारणतेचें मर्म आहे असें हल्लींच्या सुधारणोन्मुख काळींहि आपण मानितों. अर्थात् या बाबतींत पुरतें जेन ऑस्टिन् या ग्रंथकर्त्रीच्या कादंबरीचें निवळ भाषांतर मराठी वाचकांस रुचण्यासारखें झालें नसतें. आणि म्हणून रा. चिपळूणकर यांनीं केवळ भाषांतर न करतां रूपांतर करण्याचा प्रयत्न केला आहे व माझ्या मतें तो बरा साधला आहे.

अशा प्रकारची खबरदारी घेऊनहि विजातियत्व भाषांतरकर्त्यास सर्वस्वी

भ्रालवितां आलेंच आहे असें माझ्यानें म्हणवत नाहीं. पण मी एवढें मात्र म्हणूं शकेन कीं, रा. चिपळूणकर यांना काढतां न येऊन बाकी राहिलेला विजातियत्वाचा किंवा परकेपणाचा जो पेहराव प्रस्तुत मराठी कादंबरीवर राहिला आहे तो सर्वथा अनिर्वाह्य असाच आहे व तो तसा राहिला असला म्हणून रसहानि होत आहे असेंहि नाहीं. आपण वाचतों ही गोष्ट मूळ इंग्रजी समाजासंबंधीं आहे येवढी नुसती अस्पष्ट जाणीव वाचकाच्या मनांत असली म्हणजे त्यास चुकल्या चुकल्यासारखें वाटण्याचें कारण उरणार नाहीं. मराठी नांवांना न साजण्यासारखीं अशी अडचणीचीं ठिकाणें एकंदर ग्रंथांत फारच थोडीं आहेत. बाकीच्या ग्रंथांत वाचकास अगदीं खुल्या दिलानें आणि ग्रंथकर्त्रीच्या भावनेशीं तादात्म्य पावून, कथानकाची गोडी आणि मनुष्यस्वभावाच्या चित्रांचें सौंदर्य हीं अनुभवितां येतील असा भरवसा आहे.

या कामीं रा. चिपळूणकर यांनीं अगदीं सोपी सरळ, व्यवहारांतील, गोड आणि पात्रांस अनुरूप अशी भाषा घातल्यानें विशेष मदत झाली आहे. ज्याप्रमाणें भाषांतर लिहितांना, आपण म्हणजे एकाद्या परक्या समाजाविषयीं लिहितों आहों अशी भावना रा. चिपळूणकर यांच्या मनांतून समूळ नष्ट झालेली दिसते, त्याचप्रमाणें वाचकांसहि, आपण खरोखर आजच्या महाराष्ट्रीय समाजाविषयींची गोष्ट वाचीत आहों असा भ्रम पडल्यावांचून राहणार नाहीं असें मला वाटतें.

सामाजिक चरित्रवर्णन म्हणजे त्यांत शृंगाररस पाहिजेच अशी कित्येक आधुनिक 'सुधारकी' गोष्टी लिहिणारांची कल्पना दिसते. पण सदर पुस्तकांत प्रौढ वधूवरांच्या विवाहघटनेचेंच मुख्य कथानक असतांहि, अल्पवयी स्त्रीपुरुष वाचकांच्या हातीं पडूं नये असा एकहि भाग सदर पुस्तकांत सहसा आढळेल असें--मला वाटत नाहीं. मूळ ग्रंथकर्त्रीची सर्व कुशलता, अगदीं साध्या व्यवहाराचे प्रसंग घेऊन सोप्या संभाषणांनीं मनुष्य स्वभावाच्या खांचा खोंचांची मौज चटकदार रीतीनें वर्णन करण्यांत आहे. व भाषांतरकारांनींहि आपल्या अंगीं त्या कुशलतेचें चीज करण्याइतकें सहृदयत्व आहे हें दाखविलें आहे यांत शंका नाहीं.

ग्रंथकारानें भाषांतरास 'दर्प-दर्पण' हें जें नांव योजिलें आहे तें मूळच्या ग्रंथाचें शब्दशः भाषांतर नसलें तरी Pride nnd Prejudice या

शब्दामध्यें मानसशास्त्रदृष्ट्या जो परस्पर संबंध आहे तो त्यांतून ध्वनित होण्यासारखा आहे असें मला वाटतें.

---

## २७ लो० टिळक यांचा पोवाडा

( खानविलकर )

श्री. रंगनाथ विष्णु खानविलकर यांनीं लो. टिळकांचा हा पोवाडा रचला. त्याला प्रस्तावना लिहावी अशी विनंति मला करण्यांत आली. स्वतः टिळकांच्या चरित्राचा एक खंड मी लिहून प्रसिद्ध केला आहे, व या पवाड्यास आधारभूत म्हणून घेतलेली हकिगत पहिल्या भागापुरती माझ्या या पुस्तकावरून घेतली आहे, असें मला कळविण्यांत आलें. यामुळें त्याला प्रस्तावना लिहिणें मला नाकारतां येईना. सदर पोवाडा वाचून व ऐकून लोक त्या त्याविषयीं आपलें मत बनवितीलच. म्हणून त्या-संबंधानें मला कोणताहि अभिप्राय देण्याचें कारण नाहीं. तथापि पवाड्याचें स्वरूप जवळ जवळ तुकडे पाडलेल्या सयमक गद्यासारखें आहे असें वाटणारास एकच गोष्ट सांगावयाची आहे ती ही कीं, त्याच्या अनेक चौकांत जुन्या नामांकित पोवाड्यांच्या अनेक चाली घातल्या असल्यामुळें, तो ठेकेदार पद्धतीनें गाइल्यास अंतरंगांत तो असावा तितका काव्यमय नसल्याची उणीव भरून निघण्यासारखी आहे.

प्रस्तुत पवाड्यांत चरित्रविषयाचा वृत्तान्त शक्य तितका विश्वसनीय आहे, असें म्हणण्यांत माझ्या चरित्रग्रंथाला मी स्वतःच नसतें महत्त्व देतों असें वाटण्याचें कारण नाहीं. पोवाडा झाला तरी त्यांतील मुख्य वृत्तान्त साधार व विश्वसनीय असावा हें बरें. जुन्या मराठी पोवाड्यांत काव्यस्फूर्ति सरस व भाषापद्धति जोरदार असली तरी ऐतिहासिक दृष्ट्या अविश्वसनीय असा शेरा त्यांतील कित्येकांवर सहज मारितां येईल. अलि-कडच्या काळांतील उमाजी नाईकाचा पोवाडा ऐकूनहि अविश्वसनीयतेचा संशय मला आला होता. पण मला स्वतःला उमाजीच्या चरित्राची कांहीं स्वतंत्र माहिती नव्हती यामुळें मला उलट माझ्या आक्षेपाविषयींच शंका येई. पण तीन वर्षांपूर्वी पुण्याजवळील एका गोंधळ्यानें रचलेला पोवाडा

त्यानें स्वतः मला म्हणून दाखविला तेव्हां त्यांतील असंबद्धता पाहून मला हसूं आवरेना व जुन्या पोवाड्यापैकीं असे किती तरी असतील अशी शंका दृढ होऊन एक प्रकारें वाईट वाटलें. असो; सदर गोंधळ्याला त्याच्या पोवाड्यांतील हा दोष मी दाखविला— व त्या वेळीं माझा चरित्र-खंड तयार नव्हता म्हणून कै. गुरुजींनीं लिहिलेल्या टिळक चरित्राची एक प्रत मिळवून मी त्याला दिलीहि. पण फिरून जेव्हां त्यानें पोवाड्याचे पुढचे चौक रचून आणून मला म्हणून दाखविले तेव्हां फिरून तोच दोष घडलेला पाहून मी या शाहिराला विश्वसनीयतेच्या मार्गावर आणण्याचा नाद सोडून दिला. कारण त्याचें मतच जवळ जवळ मला असें दिसलें कीं, मनाला सुचेल व रुचेल तें न लिहावें तर पोवाडा लिहावाच कशाला ? असो. वरील हकिगत सांगण्याचें कारण इतकेंच कीं, सदर पोवाड्यांत उपरिनिर्दिष्ट दोष जवळ जवळ नाहीं हें पाहून मला समाधान झालें.

टिळकांचें एक चरित्र पूर्वीं ओंवीबद्ध असें झालें आहे. व दुसरें हें पोवाड्याच्या स्वरूपाचें. यावरून मला असें वाटतें कीं, या चरित्रविषयांतच असा कांहीं गुण असावा कीं, त्याचें आकलन व चिंतन करण्यांत पद्याचा अवलंब केल्याशिवाय मनोभावनेच्या उत्कटतेला पूर्ण वाव मिळणें शक्य नाहीं. मी लिहिलेल्या पुस्तकावर तें असावें तितकें उत्कट भावनोद्दीपक नाहीं अशी टीका कित्येक सहृदय वाचकांकडून झालेली माझ्या कानावर आलेली आहे. सुशिक्षित भक्तवृंदांची ही स्थिति, मग अशिक्षित म्हणून अधिक भावनामय असणाऱ्या मनांचें समाधान माझ्या पुस्तकानें कसें होणार ? याहि दृष्टीनें ओंवीबद्ध टिळकचरित्राप्रमाणेंच प्रस्तुत पोवाड्याचेंहि मी मनःपूर्वक स्वागत करून ही प्रस्तावना पुरी करितों.

---

## २८ महर्षि स्वामी श्रद्धानंदजी यांचें चरित्र



कोणत्याहि प्रस्तावनेचा उद्देश एकादा विषय लोकांच्या नजरेला, लक्ष लागेल अशा रीतीनें, आणणें हा असतो. एकादा विषय नवा किंवा

विचारसरणी नवी असली तर प्रस्तावना लिहिणारावर ती एक प्रकारची जबाबदारी असते. युरोपिअन समाजांत असा संकेत आहे कीं, एका मनुष्यानें दुसऱ्या मनुष्याची तिसऱ्या मनुष्याशीं प्रथम ओळख करून दिली, आणि तो दुसरा मनुष्य जर वाईट निघाला तर तिसऱ्या मनुष्याला पहिला मनुष्य जबाबदार राहतो. ओळख करून देणाराला ओळख करून दिलेला मनुष्य वाईट म्हणून माहित नसला तर त्याला व्यवहाराचें ज्ञान नाहीं म्हणून, आणि तसा तो माहित असतांहि ओळख करून दिली तर तो एक प्रकारचा वैय्यक्तिक गुन्हा त्याचे हातून घडला म्हणून, ओळख करून देणारा दोषी ठरतो. एकाद्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याची गोष्टहि अशीच आहे. आंतील विषयाची मुळींच माहिती नसतांना कोणी सहसा प्रस्तावना लिहून वाचकांना त्याची ओळख करून देत नाहीं-- आंतील विषय हटकून वाईट आहे असें त्याला माहित असलें तर ओळख करून देण्याच्या भानगडींत तो पडणारच नाहीं. आंतिल विषय मतभेद-ग्रस्त किंवा विवादित असावा; आणि तसें असेल, तर मात्र प्रस्तावना-काराचें काम खरें कौशल्याचें आणि चतुरतेचें असतें. प्रस्तुत ज्याला ही लहानशी प्रस्तावना मी लिहित आहें तें हें पुस्तक तिसऱ्या प्रकाराखालीं येईल. म्हणजे त्यांतील विषय लोकांना आवडण्यासारखा आहे, इतकेंच नव्हे तर त्यांतील माहिती समजून घेण्याची महाराष्ट्रीय वाचकांना एक प्रकारें उत्कंठाच होती असें म्हटलें तरी चालेल. कारण स्वामी श्रद्धानंद यांच्या खुनामुळें त्यांच्या चरित्राला एक प्रकारें विशेष महत्त्व आलें आहे.-- ज्या कार्याच्या यशस्वितेमुळें प्रतिपक्षाला राग येऊन त्यांचा खून करण्यांत आला, तें कार्य आणि तें कार्य करणारा मनुष्य हीं दोन्हीं लोकोत्तर असलीं पाहिजेत असें अनुमान लोक सहजच काढतात. आणि स्वामी श्रद्धा-नंदजी यांच्यासंबंधी तें अनुमान सर्वस्वीं खरेंहि आहे. ही गोष्ट या चरि-त्रांतील हकिकत वाचली असतां कळून येईल. हें श्रद्धानंदचरित्रामृत २८ अंजलींच्या रूपानें ग्रंथकारानें वाचकांना समर्पण केलें आहे. आणि ती प्रत्येक अंजलि, भाषा व आंतील उद्‌बोधक माहिती यामुळें, स्पृहणीय अशीच झाली आहे. कोणाहि लोकोत्तर पुरुषाचें चरित्र साधारणपणें लोकांना माहित असतें, परंतु तें कांहीं थोड्याशा ठळक गोष्टींमुळें किंवा प्रसंगांमुळें असतें. परंतु लोकोत्तर मनुष्याची लोकोत्तरता केवळ अशा

विचारसरणी नवी असली तर प्रस्तावना लिहिणारावर ती एक प्रकारची जबाबदारी असते. युरोपिअन समाजांत असा संकेत आहे कीं, एका मनुष्यानें दुसऱ्या मनुष्याची तिसऱ्या मनुष्याशीं प्रथम ओळख करून दिली, आणि तो दुसरा मनुष्य जर वाईट निघाला तर तिसऱ्या मनुष्याला पहिला मनुष्य जबाबदार राहतो. ओळख करून देणाराला ओळख करून दिलेला मनुष्य वाईट म्हणून माहित नसला तर त्याला व्यवहाराचें ज्ञान नाहीं म्हणून, आणि तसा तो माहित असतांहि ओळख करून दिली तर तो एक प्रकारचा वैय्यक्तिक गुन्हा त्याचे हातून घडला म्हणून, ओळख करून देणारा दोषी ठरतो. एकाद्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याची गोष्टहि अशीच आहे. आंतील विषयाची मुळींच माहिती नसतांना कोणी सहसा प्रस्तावना लिहून वाचकांना त्याची ओळख करून देत नाहीं. आंतील विषय हटकून वाईट आहे असें त्याला माहित असलें तर ओळख करून देण्याच्या भानगडींत तो पडणारच नाहीं. आंतिल विषय मतभेद-ग्रस्त किंवा विवादित असावा; आणि तसें असेल, तर मात्र प्रस्तावना-काराचें काम खरें कौशल्याचें आणि चतुरतेचें असतें. प्रस्तुत ज्याला ही लहानशी प्रस्तावना मी लिहित आहें तें हें पुस्तक तिसऱ्या प्रकाराखालीं येईल. म्हणजे त्यांतील विषय लोकांना आवडण्यासारखा आहे, इतकेंच नव्हे तर त्यांतील माहिती समजून घेण्याची महाराष्ट्रीय वाचकांना एक प्रकारें उत्कंठाच होती असें म्हटलें तरी चालेल. कारण स्वामी श्रद्धानंद यांच्या खुनामुळें त्यांच्या चरित्राला एक प्रकारें विशेष महत्त्व आलें आहे. ज्या कार्याच्या यशस्वितेमुळें प्रतिपक्षाला राग येऊन त्यांचा खून करण्यांत आला, तें कार्य आणि तें कार्य करणारा मनुष्य हीं दोन्हीं लोकोत्तर असलीं पाहिजेत असें अनुमान लोक सहजच काढतात. आणि स्वामी श्रद्धा-नंदजी यांच्यासंबंधी तें अनुमान सर्वस्वीं खरेंहि आहे. ही गोष्ट या चरि-त्रांतील हकिकत वाचली असतां कळून येईल. हें श्रद्धानंदचरित्रामृत २८ अंजलींच्या रूपानें ग्रंथकारानें वाचकांना समर्पण केलें आहे. आणि ती प्रत्येक अंजलि, भाषा व आंतील उद्बोधक माहिती यामुळें, स्पृहणीय अशीच झाली आहे. कोणाहि लोकोत्तर पुरुषाचें चरित्र साधारणपणें लोकांना माहित असतें, परंतु तें कांहीं थोड्याशा ठळक गोष्टींमुळें किंवा प्रसंगांमुळें असतें. परंतु लोकोत्तर मनुष्याची लोकोत्तरता केवळ अशा

थोड्याशा गोष्टींनीं किंवा प्रसंगांनीं समजण्यासारखी नसते. त्याच्या अखंड चरित्रांत एक प्रकारची लोकोत्तरताच असते. ही गोष्ट स्वामी श्रद्धानंदजींचें चरित्र वाचणारास पटल्याशिवाय रहाणार नाहीं. ग्रंथांतिल माहिती जशी उद्‌बोधक, मार्गदर्शक आणि परिणामकारक आहे तशी ती मनोरंजकहि आहे. लोकोत्तर पुरुषांच्या चरित्रांतहि मनोरंजक व सामान्य लोकांचें मनोरंजन करतील अशा खाजगी गोष्टी घडाव्या यांत कांहीं विशेष आश्चर्य नाहीं. कारण सामान्य माणसाचें चरित्र पाहिलें तरी, त्याच्याबद्दल स्वतः त्याला किंवा इतरांना मनोरंजन वाटण्यासारखे अनुभव व प्रसंग येतच असतात. मग ज्याच्या चरित्रांत सामान्य लोकांत नसलेले गुणहि विकसित झालेले असतात त्याचे अनुभव मनोरंजक अशा विशेष रीतीनें प्रकट होणें स्वाभाविकच आहे. प्रस्तुत पुस्तक प्रायः एकाद्या हिंदी चरित्रावरून लिहिलें असावें असें प्रथम वाटतें; पण तें तसें नाहीं. तथापि चरित्र स्वतंत्रपणें व स्वयंस्फूर्तीनें लिहिलेलें असो किंवा कांहीं अन्य साधनांवरून लिहिलें असो, त्यांतील प्रत्येक खंड हकीगतीच्या दृष्टीनें चांगलाच आहे, विवेचनाच्या आणि भाषेच्या दृष्टीनेंहि तो चांगला आहे. तारीख २३ डिसेंबर १९२६ रोजीं स्वामी श्रद्धानंद यांचा खून झाला आणि आज मे महिन्याच्या प्रारंभीं हें १२५ पानांचें पुस्तक लिहून छापून प्रसिद्ध होत आहे, यावरून रा. भोपे यांनीं याविषयीं किती परिश्रम केले असतील हें उघड दिसतें. स्वामीजींचा खून होऊन अवघे तीन महिनेहि न झाल्यामुळें त्यांच्या चरित्रवाचनाविषयींची उत्कंठा समाजांत आणि विशेषतः महाराष्ट्रीय समाजांत फार असणार यांत शंकाच नाहीं. ती प्रस्तुत चरित्रानें फार चांगली भागविली जाईलच, परंतु स्वामीजींच्या खुनामुळें ज्या शुद्धिसंघटनेच्या चळवळीस उलट विशेष जोरच आला, ती चळवळ चालू ठेवून वाढविणारांना या पुस्तकाचा फारच उपयोग होणार आहे. तात्पर्य, प्रस्तुत पुस्तक संग्रहणीय व आदरणीय झालें आहे असें मला वाटतें. म्हणून महाराष्ट्रांतील वाचक वर्ग या चरित्रग्रंथाचा परामर्ष योग्य रीतीनें घेतील अशी मला आशा आहे.

---

## २९ मराठीची सजावट

( ले० गो. गो. मुजुमदार )

मराठी भाषेच्या निरनिराळ्या अंगासंबंधानें विवेचनपर असे अनेक ग्रंथ आजवर झालेले आहेत. तथापि शक्यांत शक्य तितक्या अधिक अंगांचा परामर्ष घेऊन पण विद्यार्थ्यांच्याहि उपयोगी पडण्यासारखा, थोडक्यांत मार्मिकपणें लिहिलेला, हा पहिलाच ग्रंथ असावा असें मला वाटतें. अडीचशें पावणेतीनशें पानांचाच ग्रंथ. पण त्यांत मराठी भाषेच्या 'सजावटी' संबंधीचा कोणताहि महत्त्वाचा भाग सुटलेला नाहीं. नाहीं म्हणावयास मराठी भाषेचें प्रचलित व्याकरणच काय तें यांत दिलेलें नाहीं. व्याकरणाचें अध्ययन निदान सामान्यपणें केलेल्या वाचकानेंच हें पुस्तक वाचावयाचें आहे. व तें अध्ययन त्याचें झालेलें नसल्यास निदान पहिला भाग तरी समजून घ्यावयाला त्याला प्रथम व्याकरण शिकावें लागेल. पण अशी आपत्ति सहसा येण्याचेंच कारण नाहीं. कारण स्वत:ची काय किंवा दुसऱ्याची काय, भाषा ही शिक्षणाचें अंग म्हणून शिकवितांना, प्रथम व्याकरणच शिकावें लागतें, शिकतात व शिकवितात.

'सजावट' या रचनादर्शक शब्दांत नैसर्गिक व कृत्रिम हे दोनहि प्रकार समाविष्ट होतात. सजावट याचा अर्थ 'शोभा' असा केला तरी शोभेला नैसर्गिक रचनेचाच आधार घ्यावा लागतो. सजावट म्हणजे सोंग नव्हे. तथापि सोंगांत सुद्धां मूळ अनुकृत रचनेचें वैशिष्ट्य प्रकट करावेंच लागतें.

एकाद्या पशूच्या सोंगाचेंच उदाहरण आपण घेऊं. सामान्यत: पशूला चार पाय असतात. परंतु हत्तीचें सोंग आणावयाचें तर सोंड, उंटाचें सोंग आणावयाचें तर त्याची लांब मान व पाठीवरील मदार, गाढवाचें सोंग आणावयाचें असेल तर त्याचे लांब कान, व वाघाचें सोंग आणावयाचें असेल तर त्याचा भयंकर जबडा, या म्हणजे त्या त्या पशूच्या वैशिष्ट्याची पक्की ओळख पटवून देणाऱ्या गोष्टी दाखविल्याच पाहिजेत. नाहीं तर सोंग साधलें असें होत नाहीं. पण प्रस्तुत पुस्तकांत मराठी भाषेच्या सोंगाचा म्हणजे कृत्रिम विकृत स्वरूपाचा विचार केलेला नाहीं, तर स्वाभाविक व

शोभायुक्त सजावटीचा विचार केलेला आहे. अर्थात् असा विचार करतांना मराठी भाषेची जी शरीर घटना मूळ व्याकरणादिकांनी बनलेली आहे तिचा आधार घेणें अवश्यच आहे, व तसा तो ग्रंथकारानें घेतलेलाहि आहे. आणि या मूळ आधारभूत भाषा घटनेचा परिचय कोणाहि सामान्य मराठी मनुष्याला असतोच असें गृहीत धरून व्याकरणाचे नियम सांगण्याच्या भरीस तो पडलेला नाहीं. पण भाषेची मूळ व्याकरणबद्ध घटना थोडी असते, व तिला अशुद्ध स्वरूप येण्याइतकें न सोडतां, शिष्टसंमत व रूढ अपवाद व विकल्प यांच्या उपयोगानें भाषा विस्तार पावत असते आणि हा विस्तार पावत असतां, शोभेचे व सजावटीचे निरनिराळे प्रकार तींत आपोआप बनत असतात. अशा रीतीनें भाषेला स्थिर व चल अशीं दोन अंगें प्राप्त होतात. प्रस्तुत पुस्तकांत या स्थिर अंगापेक्षां चलनशील अंगाचाच विचार अधिक केलेला आहे.

प्रस्तुत ग्रंथाचे दोन्ही भाग एकत्र ध्यानांत घेतले, आणि मराठी भाषा हा एक मनुष्यदेह आहे असें कल्पिलें, तर, असें म्हणतां येईल कीं, ग्रंथकारानें तिची सांगोपांग शरीररचना प्रकट केली आहे इतकेंच नव्हे, तर तिचे सर्व प्रकारचे शरीरव्यापारहि प्रकट केले आहेत. एकाद्या वैद्यक शिक्षणालयांत गेले असतां, तेथें विद्यार्थ्यांना दाखविण्याकरितां उभ्या केलेल्या सांगाड्यावरून स्थिर–गुण असा मनुष्यदेह कसा असतो हें कळतेंच. पण त्याबरोबरच त्याहून महत्त्वाच्या अशा गोष्टींचे नकाशे तेथें पहावयास मिळतात. या नकाशावरून समजून येणाऱ्या गोष्टी म्हणजे खालील होत:–तुटक हाडें कशानें जोडलीं जाऊन त्यांच्यामध्यें निरनिराळ्या भागापुरतें चलनवलन होण्याची शक्ति येते? या हाडांवर मांसमज्जांचे स्निग्ध थर कसे बसतात? त्यांना नेहमीं ओलावा देणाऱ्या रक्तवाहिन्यांची रचना मधून मधून कशी केलेली असते? या वाहिन्यांतून वाहणारें रक्त मूळ कोठें कसें उत्पन्न होतें व त्याचें अभिसरण सगळ्या शरीरांतून कसें चालतें? या सर्वांना चैतन्य देणारा मेंदू कसा व कोठें असतो? त्यापासून शरीराच्या निरनिराळ्या टोंकांपर्यंत संवेदनांचे निरोप धाडून व आणवून, अनेक प्रकारचीं शरीरकार्यें घडविण्याकरितां संवेदनक्षम अशा तारांचें जाळें कसें पसरलेलें असतें? मधून मधून या तारा एकत्र करून तेथें संवेदनाधिकाऱ्यांच्या चौक्या कशा बसविलेल्या असतात? अन्न व पाणी यांचा स्वीकार,

उपयोग व परिणाम कसा होतो ? म्हटलीं तर सजीव म्हटलीं तर निर्जीव अशीं नखें व केस यासारखीं शरीरांगें कशीं उत्पन्न होतात ? आणि शरिराच्याच जड व मूर्त अशा कित्येक भागांतून चैतन्य–बुद्धि, भावना, विकार इत्यादि कसे निर्माण होतात ? मनुष्य शरीराची ही दुसरी सजावट झाली !

पण याहूनहि तिसऱ्या एका प्रकारची सजावट मनुष्यामध्यें दिसून येते. केवळ शरीर घेतलें तरी एकाचे पाय फेंगडे असतील तर दुसऱ्याच्या उभे राहण्यांत स्वाभाविक सौन्दर्य, अथवा लष्करी ऐटीनें उभा राहिल्यास कृत्रिम सौन्दर्य दिसूं शकेल. थलथलीत दंडांपेक्षां मेहनतीनें कसलेले व त्यावर गोटी उठलेले दंड अधिक शोभा देतात. नैसर्गिक साधनांचीच सजावट घडविण्याची या पुढची पायरी म्हटली म्हणजे भिवया कोरणें, मिशा कातरणें किंवा पीळदार बनविणें, किंवा कल्ले दाढी ठेऊन त्यांना निरनिराळे चांगले आकार देणें, डोक्याचे केस विशिष्ट रीतीनें कातरणें व भांग काढणें इ० येथून पुढें कृत्रिम साधनांचा आधार घेण्यास सुरवात झाली म्हणजे रंग, वस्त्रप्रावरण व अलंकार इत्यादि साधनांनीं त्याच मनुष्य देहाच्या शोभेचे किंवा सजावटीचे प्रकार किती अनंत होऊं शकतात याचा आपणांस नित्य अनुभव आहेच. पण अनुभवाला कल्पनेनेंहि भर घालतां येईल. इतका विस्तार रूपकानें करून सांगण्याचा हेतु हा कीं, प्रस्तुत ग्रंथाचें खरें स्वरूप वाचकांच्या लक्षांत यावें.

मराठी भाषेच्या मूळ घटनेचे नियम फारच थोडे आहेत, व या नियमांनीं बांधलेल्या भाषारचनेला वर एके ठिकाणीं सांगितलेल्या हाडांच्या सांपळ्याचेंच स्वरूप आहे. कर्ता, कर्म, क्रियापद, विभक्ति, विशेषण क्रियाविशेषण, अव्यय इत्यादि काय ते व्याकरणांतले मुख्य विषय होत. पण प्रस्तुतचें पुस्तक वाचणाराला हें दिसून येईल कीं, मूळ व्याकरण न सोडतां, शिष्टसंमत व रूढ अशा अपवादांनीं व प्रचारांनीं या मूलभूत गोष्टींची विचारप्रदर्शक शक्ति मराठी भाषा बोलणारांनीं व लिहिणारांनीं गेल्या कित्येक शतकांत आधींच कितीतरी वाढविली आहे. व यापुढेंहि आणखी किती तरी वाढेल. जगांतील वाढत्या व्यवहारामुळें विचाराचें अंग क्षणोक्षणीं वाढत असतें आणि त्यावरील भाषेचा आंगरखा केव्हांहि इतका आंखूड पडतो किंवा तंग होतो कीं, हातपाय हट-

उपयोग व परिणाम कसा होतो ? म्हटलीं तर सजीव म्हटलीं तर निर्जीव अशीं नखें व केस यासारखीं शरीरांगें कशीं उत्पन्न होतात ? आणि शरिराच्याच जड व मूर्त अशा कित्येक भागांतून चैतन्य–बुद्धि, भावना, विकार इत्यादि कसे निर्माण होतात ? मनुष्य शरीराची ही दुसरी सजावट झाली !

पण याहूनहि तिसऱ्या एका प्रकारची सजावट मनुष्यामध्यें दिसून येते. केवळ शरीर घेतलें तरी एकाचे पाय फेंगडे असतील तर दुसऱ्याच्या उभे राहण्यांत स्वाभाविक सौन्दर्य, अथवा लष्करी ऐटीनें उभा राहिल्यास कृत्रिम सौन्दर्य दिसूं शकेल. थलथलीत दंडापेक्षां मेहनतीनें कसलेले व त्यावर गोटी उठलेले दंड अधिक शोभा देतात. नैसर्गिक साधनांचीच सजावट घडविण्याची या पुढची पायरी म्हटली म्हणजे भिवया कोरणें, मिशा कातरणें किंवा पीळदार बनविणें, किंवा कल्ले दाढी ठेऊन त्यांना निरनिराळे चांगले आकार देणें, डोक्याचे केस विशिष्ट रीतीनें कातरणें व भांग काढणें इ० येथून पुढें कृत्रिम साधनांचा आधार घेण्यास सुरवात झाली म्हणजे रंग, वस्त्रप्रावरण व अलंकार इत्यादि साधनांनीं त्याच मनुष्य देहाच्या शोभेचे किंवा सजावटीचे प्रकार किती अनंत होऊं शकतात याचा आपणांस नित्य अनुभव आहेच. पण अनुभवाला कल्पनेनेंहि भर घालतां येईल. इतका विस्तार रूपकानें करून सांगण्याचा हेतु हा कीं, प्रस्तुत ग्रंथाचें खरें स्वरूप वाचकांच्या लक्षांत यावें.

मराठी भाषेच्या मूळ घटनेचे नियम फारच थोडे आहेत, व या नियमांनीं बांधलेल्या भाषारचनेला वर एके ठिकाणीं सांगितलेल्या हाडांच्या सांपळ्याचेंच स्वरूप आहे. कर्ता, कर्म, क्रियापद, विभक्ति, विशेषण क्रियाविशेषण, अव्यय इत्यादि काय ते व्याकरणांतले मुख्य विषय होत. पण प्रस्तुतचें पुस्तक वाचणाराला हें दिसून येईल कीं, मूळ व्याकरण न सोडतां, शिष्टसंमत व रूढ अशा अपवादांनीं व प्रचारांनीं या मूलभूत गोष्टींची विचारप्रदर्शक शक्ति मराठी भाषा बोलणारांनीं व लिहिणारांनीं गेल्या कित्येक शतकांत आधींच कितीतरी वाढविली आहे. व यापुढेंहि आणखी किती तरी वाढेल. जगांतील वाढत्या व्यवहारामुळें विचाराचें अंग क्षणोक्षणीं वाढत असतें आणि त्यावरील भाषेचा आंगरखा केव्हांहि इतका आंखूड पडतो किंवा तंग होतो कीं, हातपाय हट-

कून बाहेर दिसतात. आणि अंगरखाहि ठिकठिकाणीं फाटतो. विचाराच्या अखंड प्रसरणामुळें भाषा ही लोखंडाच्या साखळीसारखी असून भागत नाहीं. फार काय ती रबराच्या वादीसारखीहि असून भागत नाहीं. कारण रबराच्या ताणण्यालाहि मर्यादाच आहे. म्हणून प्राय: असें आढळतें कीं, भाषा ही विचारांच्या अंगावर एकाद्या जाळीदार अंगरख्याप्रमाणें बसविलेली राहाते. मात्र या जाळींतील भोंकें केवळ पारदर्शक होण्याइतकीं लहान नसतात. तर तीं एवढालीं मोठीं असतात कीं, एकादे ठिकाणीं त्यांना भोंसकेहि म्हणतां येईल. यामुळेंच व्याकरणाच्या प्रत्येक विषयाला अनेक अपवाद उत्पन्न होतात व प्रत्येक व्याकरणपद हें अनेक निरनिराळ्या प्रकारच्या शक्ती अंगीं आणतें. इतकें करूनहि भाषा ही वाढत्या व्यवहाराला अपुरीच पडते.

ग्रंथकर्त्यानें जे अनेक नवीन नियम सुचविलेले दिसतात त्यांना पूर्वीचा कांहीं आधार नसून, त्यानें परिश्रमपूर्वक केलेल्या चौकसखोर सूक्ष्म अवलोकनाचे ते परिणाम होत. या अवलोकनापूर्वी त्याला स्वत:लाहि ते नियम होते असें माहीत नसावें. पण तर्कशास्त्रांत ज्याला Inductive म्हणजे विशेषाकडून सामान्याकडे जाण्याची पद्धति म्हणतात तिचा अंगिकार त्यानें केलेला आहे व तो इतका उत्कृष्ट साधलेला आहे कीं, देखत देखत नवीन शास्त्र कसें बनूं शकतें याचें तें एक नवीन उदाहरण म्हणून दाखवितां येईल. या शास्त्रसिद्धीचीं उदाहरणें येथें देत बसण्यांत अर्थ नाहीं. कारण या ग्रंथांतील अनेक प्रकरणांतून, त्यानें तीं इतकीं सुटसुटीत व सोपीं करून दिलीं आहेत कीं वाचकानें ती नुसतीं चाळीत गेलें असतां लक्ष्यांत येतील. Inductive पद्धतीनें शास्त्रीय स्वरूपाचे नियम बनविणाराला पुढें सिद्ध होणाऱ्या नियमांची अर्धी स्थूल प्रतीति झालेली असते. पण शास्त्रसिद्धतेचा हेतु मनांत ठेऊन वाचीत गेलें असतां ती प्रतीति दृढमूल होते, इतकेंच नव्हे तर नवीन पुराव्यानें नवीनहि नियम सुचूं लागतात. वृत्तासंबंधानें प्रो. माधवराव पटवर्धन यांनीं अलीकडे प्रसिद्ध केलेलें पुस्तक वाचणाराला या आमच्या विधानाचें प्रत्यंतर मिळेल.

ज्या उदाहरणांवरून प्रस्तुत ग्रंथकारानें मराठी भाषेच्या सजावटींचे हे नियम बनविले आहेत तीं प्राय: लोकांच्या वाचण्यांत नेहमीं येण्यासारख्या लेखांतून अगर ग्रंथांतून घेतलेलीं आहेत. पण या लेखकांनीं

किंवा ग्रंथकारांनींहि जे वाक्प्रचार योजले किंवा अपवाद उपयोगांत आणले, त्यांतील कांहीं कदाचित् त्यांना न कळत त्यांचे हातून प्रथमच घडले असले तरी इतर बहुतेक त्यांच्याहि पूर्वकाळीं रूढच होते व सशास्त्र मानले गेले होते. व म्हणूनच त्यांनीं ते उपयोगांत आणले. ती त्यांची जाणून बुजून बंडखोरी नव्हती. याचा अर्थ असा कीं, आज कैक वर्षें हे प्रचार सिद्ध झाले असतां, ते कांहीं नियमांत बसूं शकतात अशा दृष्टीनें त्यांजकडे कोणीं पूर्वी पाहिलें नव्हतें.

पण प्रसिद्ध लेखकांच्या लेखांतील शुद्ध किंवा रूढ प्रचारांचीं जशीं उदाहरणें दिलीं आहेत तशींच एखादें स्वतंत्र प्रकरण करून, आजच्या दृष्टीनें ठरणाऱ्या त्यांच्या चुकांचीं म्हणजे अशुद्ध प्रयोगांचीं व अप्रयोगांचीं उदाहरणेंहि दिलीं असतीं तर बरें झालें असतें. शिष्ट मानलेल्या लेखकांच्या चुकांचा एखादा पाठ शुद्धीकरणाकरितां विद्यार्थ्यांना दिला असतां त्यांना त्याची मोठी मौज वाटली असती. थोर लोकहि स्खलनशील कसे असतात हें त्यांना कळलें असतें, व त्याचा परिणाम त्यांच्या मनावर अधिक झाला असता. एरवीं शिष्ट लेखकांचे अवगुण तेहि पुढच्या पिढींत गुण ठरावयाचे !

प्रस्तुत पुस्तक मराठी भाषेच्या अभ्यासाकरितां शाळांतून लावण्यासारखें आहे व तें लावलेंहि जाईल. परंतु या बाबतींत एक भीति अशी वाटते कीं, हें पुस्तक शिकवितांनाहि शिक्षक जुनी व्याकरण शिकविण्याची पद्धत पत्करतील म्हणजे उदाहरणें विद्यार्थ्यांपुढें मांडून त्यांच्याच बुद्धीनें त्यांतील वैशिष्ट्य हुडकावयास लावून नियम बांधण्याकडे त्यांची प्रवृत्ति न करितील, आणि आधीं त्यांजकडून नियमच वाचून घेतले जातील, तर तें पायाऐवजीं डोक्यावर उभे राहण्यासारखें होईल. मराठी शाळेंत पूर्वी ज्यांनीं व्याकरणाचे नियम घोकले, किंवा हायस्कूलांत डॉ. भांडारकर यांच्या संस्कृत क्रमिक पुस्तकांतील इंग्रजी भाषेंतून लिहिलेले नियम पाठ केले किंवा इंग्रजी सातव्या इयत्तेंत प्रो. कुक् यांच्या ॲस्ट्रॉनमीच्या पुस्तकांतील व्याख्या परीक्षेकरितां पाठ केल्या, त्यांना अमूर्त तात्विक स्वरूपाच्या व्याख्या व नियम यांचा मुलांच्या बुद्धीवर किती ताण पडतो व एकंदरीनें त्यांच्यावर किती जुलूम होतो हें आठवत असेल; म्हणून या पुस्तकांतील नियम हे प्रायः विद्यार्थ्यांकरितां नाहींत ते फक्त शिक्षका-

रितां आहेत, असें मात्र समजावें. शिक्षकांना नियमांचा उपयोग असा कीं, ग्रंथकारानें जर त्याखालीं एक उदाहरण दिलें असेल, तर त्यांनीं आपल्या शोधानें प्रत्यंतरादाखल तोच नियम सिद्ध करून देण्यासारखीं इतर आणखीहि उदाहरणें काढावीं, व असें झाल्यास म्हणजे निरनिराळ्या शिक्षकांनीं अशीं उदाहरणें जमविल्यास त्यांचीं टिपणें कदाचित् पुढें मागें एकत्र करतां येतील व प्रस्तुत ग्रंथकारानें बनविलेल्या शास्त्रांत आणखीहि भर पडेल. पाठावलीसंबंधानें स्वतः ग्रंथकारानें जें केलेलें नाहीं तें मात्र शिक्षकानें केलें पाहिजे. म्हणजे त्यांतील प्रत्येक उदाहरणावरून कोणता नियम सिद्ध होतो हें मुलांना हुडकून काढण्यास शिकविण्याकरितां त्यांतील वैशिष्ट्य काय आहे याचें दिग्दर्शन शिक्षकानें किंचित् करून दिलें पाहिजे.

असो. प्रस्तावनेच्या रूपानें या पुस्तकासंबंधानें अधिक कांहीं लिहावयास नको. मी पूर्वी दर्शविल्याप्रमाणें, मराठी भाषेचें सूक्ष्म अवलोकन व विशेषावरून सामान्य हेरण्याच्या तर्कपद्धतीनें बनविलेलें नवें शास्त्र, या दृष्टीनें हा ग्रंथ अपूर्व आहे. आणि रा. मुजूमदार यांनीं प्रगट केलेली उद्योगशीलता, मार्मिक दृष्टि व सूक्ष्म अवलोकनशक्ति या तीनहि गुणांबद्दल त्यांचें जितक अभिनंदन करावें तितकें थोडेंच होणार आहे.

---

## ३० लाला लजपतराय किंवा नवयुगाचा पूर्वरंग

आमचे मित्र रा. बाबासाहेब फडके, पनवेलचे सुप्रसिद्ध वकील, यांनीं कांहीं वर्षांपूर्वी हिंदुस्थानांतील ब्राह्मधर्म–पंथांसंबंधाचा ग्रंथ प्रसिद्ध केला, तो त्याची भाषासरणी व त्यांत दिसून येणारी विवेचक बुद्धि यांनीं वाचकवर्गाला पुष्कळच आवडला. त्यानंतर त्यांच्या हातून दुसरा एखादा ग्रंथ असाच व्हावा व त्यांच्या लेखनशैलीचा आस्वाद पुनः घेतां यावा, अशी वाचकवर्गाची इच्छा होती. मग ती स्वतः त्यांचीहि असली तर त्यांत काय नवल ! लिहिण्याच्या आवडीची गोष्ट ही अशीच आहे. ती आवड लेखकाला सहसा स्वस्थ बसूं देत नाहीं.

रा. फडके यांनीं त्यानंतर लिहिलेलें दे. भ. लाला लजपतराय यांचें

चरित्र हल्लीं प्रसिद्ध होत आहे. वास्तविक तें सुमारें दीडदोन वर्षांपूर्वीच प्रसिद्ध व्हावयाचें. कारण रा. फडके यांनीं या चरित्राचीं साधनें मिळविण्याची खटपट लालाजींच्या मृत्यूच्या दिवसापासूनच सुरु केली होती. परंतु अखेर ती सर्व माहिती हवी तशी मिळून ३०० पानांचा ग्रंथ लिहून, छापून बाहेर पडण्यास सहजच विलंब लागला. मोठ्या शहराबाहेर असणाऱ्या हौशी लेखकांना पराधीनता ही अशीच पदोपदीं नडते, त्याला इलाज नाहीं. शिवाय एक वर्षभर पनवेल येथें जी राजकीय चळवळ झाली व तिच्या अनुषंगानें उत्पन्न झालेले फौजदारी मुकदमे यांचीहि इतकी गर्दी उसळली होती कीं, बाबासाहेबांसारख्या शांत स्वभावाच्या मनुष्यालाहि अशा गर्दींत लेखनव्यवसाय सुचण्यासारखा नव्हता. कसेंहि असो, याबद्दल वाचकांच्या प्रमाणेंच स्वतः त्यांचेंहि अभिनंदन करणें जरूर आहे. कारण कालावधि झाली तरी चरित्रें लिहिण्यासारख्या मनुष्यांचीं चरित्रें सर्व लिहून होतातच असें नाहीं. याविषयीं कै० नामदार गोपाळराव गोखले यांच्या चरित्राचें उदाहरण देतां येईल. असो. लाला लजपतराय यांच्या चरित्रासंबंधानें माहिती जुळवण्याचें काम किती कठीण झालें असेल याची कल्पना मला स्वतःला आहे. कारण रा. फडके यांनीं विचारल्यावरून पंजाबांतील कांहीं स्नेह्यांना मी पत्रें लिहून माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला होता; परंतु तिकडून माहिती मिळावी तितकी मिळाली नाहीं. अर्थात् इतर अनेक छापील ग्रंथ लहान पुस्तकें वर्तमानपत्रें वगैरेवरून रा० फडके यांनीं बरीच माहिती मिळविली. तथापि लालाजींच्या खास परिचयाचे त्यांना तरुणपणापासून ओळखणारे घरगुती ऋणानुसंबंधाचे किंवा निकट स्नेहाचे असे जे त्यांचे अनेक स्नेही व आप्त यांचेकडून खाजगी चरित्रसंबंधींची माहिती मिळाली असती तर ती विशेष महत्त्वाची ठरली असती. पण दुसरे पक्षीं स्वतः लालाजींनी लिहिलेले आत्मचरित्र खंड यांचीं दुसऱ्यानीं लिहिलेलीं लहानसहान चरित्रें हीं बरीचशीं उपलब्ध असल्यामुळें माहितीच्या दृष्टीनें अगदीं पहिल्या प्रतीचा नसला तरी निदान दुसऱ्या प्रतीचा तरी ग्रंथ रा. फडके यांना लिहितां आला व आहे त्या माहितीवरूनच त्यांनीं हा ग्रंथ किती चटकदार केला आहे हें वाचकांना तो वाचतांना कळून येईल.

लालाजी हे नुसते प्रांतिक पुढारी नसून अखिल भारतवर्षीय

पुढारी होते. कमींत कमी तीस वर्षें त्यांनीं देशसेवा इतक्या एकाग्रतेनें पण तितक्याच विविध रीतीनें केली कीं त्यांचें नांव हिंदुस्थानांत आबालवृद्धांच्या तोंडीं सहजच झालें. या दृष्टीनें हिंदुस्थानच्या एका मोठ्या सुप्रसिद्ध परप्रांतीय पुढाऱ्याचें जीवनचरित्र पुस्तकरूपानें एकत्र वाचावयास मिळत आहे. याबद्दल तर वाचकवर्ग रा. फडके ह्यांचा ऋणी होईलच. हें चरित्र विशेष उपयोगी पडेल. पंजाब प्रांत फार दूर असून तिकडील माहिती इकडे थोडी. एखादी कांहीं लोकोत्तर गोष्ट तिकडे घडेल तेव्हांच इकडे कळावयाचें; किंवा व्यक्तिपरिचय व्हावयाचा. तथापि गेल्या तीस पस्तीस वर्षांत हिंदुस्थानचा जो राजकीय इतिहास बनला त्यांत पंजाबचा यथाप्रमाण भाग आहे. इतकेंच नव्हे तर सर्व हिंदुस्थानच्या राजकारणाला अणुकुचिदारपणा आणण्यासारखे कांहीं विशेष प्रसंग पंजाबांतच घडलेले आहेत. त्यामुळें या चरित्रानें खुद्द लाला लजपतराय यांची व्यक्तिदृष्ट्या माहिती मिळेलच. परंतु हिंदुस्थानच्या राजकारणाशीं पंजाबचा कसकसा संबंध आला हेंहि व्यापक रीतीनें कळेल. याशिवाय आणखी एक गोष्ट वाटते. ती अशी कीं, लजपतरायांचे अंगीं विविधता पुष्कळच होती. त्यांच्या बुद्धीला व मनाला अनेक पैलु पडलेले होते. यामुळें त्यांच्या हातून इतर कित्येक भारतीय पुढाऱ्यांपेक्षां अनेकांगी विधायक असेंहि कार्य झालें. राजकारण धर्म, समाजसुधारणा, शिक्षण, परोपकार, वाङ्मय, परदेशाची वकीली, नित्य उद्योगाच्या व अभ्यासाच्या संस्था अशा किती तरी अंगांनीं त्यांनीं देशसेवा आमरण केली, व तें पाहून देशाखातर, समाजाखातर काय करूं व काय न करूं असा हौसेनें हपापलेला मनुष्य देशभक्त कसा असतो याचें चित्र लजपतरायांच्या चरित्रावरून दिसून येतें. कार्याची इतकी विविधता फार थोड्यांच्या अंगीं असते. लालाजींचे कांहीं व्यक्तिगुण अर्थात् जन्मसिद्ध होते म्हणजे त्यांचें धैर्य, त्यांची बुद्धिमत्ता, त्यांची परोपकारबुद्धि या गुणांचें अनुकरण प्रयत्नानें मनुष्याला करितां येणार नाहीं. त्या गोष्टी उपजतच असाव्या लागतात. परंतु त्यांनीं देशाकडे किती दृष्टींनीं पाहिलें व किती निरनिराळ्या प्रकारांनीं त्यांची सगुणोपासना केली हें पाहून मनुष्याचें मन उदात्त, विकसित व व्यापक होण्याला कांहीं हरकत नाहीं. असो.

लालाजींच्या मृत्यूपासून तीनच वर्षांच्या आंत माहितीनें भरलेलें व

लेखनकौशल्यानें नटलेलें असें त्यांचें चरित्र आज वाचकांचे हातीं पडत आहे. व त्याचा वाचकवर्गाकडून योग्य परामर्ष घेतला जाईल अशी मला आशा आहे.

---

## ३१ कॉलेज विहार

रा. मोरेश्वर गोविंद सोमण यांनीं त्यांच्या 'कॉलेज विहार' नामक पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याविषयीं कांहीं दिवसांपूर्वी मला विनंति केली. कॉलेज–विहार हें नांव ऐकतांच मनानें एकदम चाळीस बेचाळीस वर्षे मागें गेलों व प्रस्तावना लिहिण्याची विनंति बाजूस राहून मनांत एकदम उद्भवलेल्या माझ्या कॉलेजच्या दिवसांच्या आठवणीमध्येंच मी कांहीं वेळ दंग होऊन गेलों. इतक्या वर्षांनंतरहि कॉलेज या नांवाची मोहनी माझे मनावर अजून शिल्लक राहिली आहे. आठवणींच्या या तंद्रींतून बाहेर पडल्यावर केवळ सहानुभूतीनें मी सोमण यांना प्रस्तावना लिहिण्याचें कबूल केलें. पण फिरून मनांत असा विचार आला कीं, माझ्या वेळचें, चाळीसपंचेचाळीस वर्षांपूर्वीचें, कॉलेजांतील जीवन व आजचें कॉलेजांतील जीवन यांमध्यें जमीनअस्मानाची तफावत पडलेली असणार ! आणि प्रस्तावना लिहितांना ग्रंथविषयाशीं मी समरस न झालों तर तें बेसुरेल गायन ठरावयाचें. तथापि 'पुस्तक छापून झाल्यावर तें वाचून योग्य वाटल्यास प्रस्तावना लिहिन.' असें मी फिरून त्यांना सांगितलें; आणि हल्लीं त्यांचें पुस्तक वाचून झाल्यावर मी ही प्रस्तावना लिहित आहें.

अदमासाप्रमाणें, या दोन काळांतील कॉलेजच्या वृत्तांतांतील विसंवादित्व प्रकट झालेलें मला पुस्तकांतून दिसून आलेंच. तरी पण कॉलेजच्या मुलांच्या बाह्य परिस्थितींत कितीहि फरक पडला तरी, अंतर्यामीं मूलपणा, म्हणजे विद्यार्थीदशा, ही मनुष्यस्वभावाच्या दृष्टीनें कोणत्याहि काळीं सारखीच. कारण तेव्हांचा कॉलेजचा विद्यार्थी काय किंवा आजचा काय, दोघांच्याहि मनाची उल्हसित वृत्ति, निरुपद्रवी खेळकरपणा, विनोदशीलता, निष्कपटपणा, व साध्या गोष्टीहि गमतीच्या करून त्यांतच नवानवा

ताजाताजा आनंद अनुभवण्याची पात्रता, या गोष्टी सारख्याच आहेत. फरक पडलाच असेल तर तो बाह्य परिस्थितीमुळें, असें मी म्हणतों.

याचें प्रत्यंतर मला या पुस्तकांत अनेक ठिकाणीं आढळलें. कॉलेजांतील खर्च आजच्यापेक्षां तेव्हां बराच कमी येई. तरीपण मध्यम वर्गांतील आईबापांवरील खर्चाचें संकट, व तो खर्च करितांना मुलांची बेपर्वाई, या गोष्टी तेव्हां व आतां सारख्या असतांहि, मुलांचे खर्च कां वाढले हें पाहून मात्र फारसें आश्चर्य वाटत नाहीं. हल्लींची राहणी थोडी अधिक महागाईची झाली आहे हें खरें. परंतु मेजवान्या, फराळ, चहा, कॉफी, खेळ, नाटकें, सिनेमा व पोषाखांच्या नवलाई इत्यादि गोष्टी वाढल्या असून, त्या आतां 'फॅशनेबल' म्हणजे अनिर्वाह्य होऊन बसल्या आहेत. हल्लींप्रमाणें तेव्हांचाहि कॉलेज विद्यार्थी फक्त दोन सह्या करून लागतील तेवढे पैसे मिळवी! अर्थात् दोन सह्या म्हणजे मनिऑर्डरीवरच्या! कदाचित् हल्लींचीं मुलें आईबापांकडून तारेच्या मनिऑर्डरीनें पैसे मागवित असतील तर, कदाचित् त्यांचें एका सहीवरहि भागत असेल! पण पूर्वीच्या खर्च करण्याच्या एक दोन वाटांच्या जागीं आतां आठ दहा वाटा निर्माण झाल्या आहेत.

माझे वेळीं कॉलेजांतील मुलगा घरचा श्रीमंत असला तर फार झाल्यास स्टॉकिंग बूट व घरचाच वडिलार्जित जरीचा रुमाल एवढ्यावरून त्याची श्रीमंती दिसावयाची! डेक्कन कॉलेजांतून आम्हीहि गावांत एखाद्या वेळीं नाटकाला किंवा क्रिकेट मॅच पाहावयाला येत होतों; पण त्या वेळची फॅशनच गाडींत बसण्यापेक्षां टोळ्या करून पायानें चालत येण्याची होती; आतां सायकलच्या संवयीनें मुलांचे पाय गेल्यासारखेच झाले आहेत. यामुळें सायकल नसली तर घोड्याच्या गाडीशिवाय त्यांचें चालत नसावें. आमच्या वेळीं चहा हा नित्य संवयींपैकीं नव्हता. रविवारीं आचारी गावांत बाजार करावयास गेल्यामुळें जेवावयाला एक वाजावयाचा. त्यामुळें सकाळीं क्लबरूममध्यें चहाची फीस्ट आठवड्यांतून फार तर एकदां व्हावयाची! दुधाचे रतीब मात्र पुष्कळांचे असत. सिनेमा नव्हताच व इतर खेळही फारसे नव्हते. जिमखाना नांवाला असे. पण क्रिकेट मॅचच्या राखींव पिचवरचें गवत, खूप तेलें औषधें लावूनहिं उगवणाऱ्या टकल्या डोक्यावरील केसा इतकेंच तुरळक असे.

बॅटी मोडक्याच, पण त्यांचा वचपा उल्हासानें भरून निघे. जिमखाने नसल्यामुळें निवडणुकी, कॅन्व्हासिंग या गोष्टी नव्हत्या. अशा अनेक रीतीनीं आजच्यापेक्षां तेव्हांचा जीवनक्रम कदाचित् अधिक निरस होता असें म्हणतां येईल. बाकी प्रोफेसरांची थट्टा, फेलोजची चेष्टा, बाथरूम-मधील गयनाचे कॉन्सर्ट, एखाद्या भोळसर मुलाला बनविण्याचे खेळ, आणि कधीं न संपणारे व बीट न येणारे वाद विवाद या गोष्टी आतां-सारख्याच होत्या.

पण या दोन कालांत एक फरक फारच मोठा पडलेला आहे. आणि त्यानेंच कॉलेज-विद्यार्थ्यांच्या जीवनक्रमांत, विचारांत व विशेषत: थट्टा-मस्करींत आणि विनोदांत, जो फरक पडला तो या पुस्तकांत सर्वत्र दिसून येतो. ती गोष्ट म्हणजे तरुण विद्यार्थ्यांबरोबर हल्लीं कॉलेजांतून होणारें तरुण विद्यार्थिनींचें सहशिक्षण. मुलगा नवीन कॉलेजांत जावयाचा असतां त्याची उमेद, त्याच्या महत्त्वाकांक्षा, त्याच्या आईबापांच्या आशानिराशा व चिंता, कॉलेजांतील मुलांच्या बाललीला यांचें वर्णन Verdant Green नांवाच्या इंग्रजी पुस्तकांत वाचावयास मिळतें. तें विलायतेंतील पब्लिक स्कूल्स आणि कॉलेजें यांच्या स्थितीचें दर्शक असून आमच्या वेळीं कॉलेजांतील मुलें तें वर्णन वाचून स्वतःच्या अनुभूतीनें त्याशीं समरस होत. आणि तें वर्णन आजच्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांनाहि तसेंच लागूं पडेल. परंतु तरुण उपवर मुली कॉलेजांतील एकाच क्लासांत मुलांबरोबर बसून शिकण्याचा जो एक नवा उपक्रम सुरू झाला आहे, त्यानें मुलगे व मुली या दोघांच्याहि मनासंबंधी कौतुकाचा आनंदाचा असा एक वेगळा नवाच प्रकार दिसून येऊं लागला आहे. या सहवासांतून प्रत्यक्ष विवाह किती निष्पन्न होतात हें माहित नाहीं. परंतु विवाहापूर्वी कोणताहि तरुण मुलगा कोणत्याहि तरुण मुलीचा भावी नवरा कल्पनेनें असूं शकतो. या स्वाभाविक संके-ताच्या स्थितींत, विवाहाची आकांक्षा नसतांहि, स्त्रीपुरुषसान्निध्यानें उत्पन्न होणाऱ्या मित्रत्वाची एक नवीन भावना कॉलेजच्या विद्यार्थ्यांत प्रकट होऊं लागली आहे. आणि तिनें कॉलेजच्या विद्यार्थ्यांचीं संभाषणें, थट्टा-मस्करी व वाङ्मय हीं सर्व आपल्या वळणावर खेंचून नेलेलीं आढळतात.

प्रस्तुतच्या 'कॉलेज--विहार' या पुस्तकांत स्त्रीपुरुष-प्रेम व मैत्री यांवर

अधिष्ठित झालेलीं रूपकें, मधून मधून अनेक वेळां दृष्टीस पडतात व तीं फार चांगलीं साधलीं आहेत. या पुस्तकाच्या पहिल्या भागाचा मथळा 'गणगोत्र जुळलें' हा आहे व शेवटच्या भागाचा मथळा 'सासुरवासाला सुरवात' हा आहे. या आद्यन्तांवरूनच नव्हे, तर मधल्या अनेक भागांतूनहि हें रूपक वरचेवर डोकावून बघत असलेलें आढळेल. पुण्या-मुंबईच्या दरम्यान अनेक वेळां फेऱ्या घालणाऱ्या प्रवाशाला जसा तोच तोच कंडक्टर दृष्टीस पडतो, त्याप्रमाणें या पुस्तकांतून होणाऱ्या वाचकाच्या प्रवासांत त्याला कॉलेजांतील मुलांमुलींच्या सहवासाच्या कल्पनेनें उत्पन्न झालेला नाजुक विनोद मधून मधून पण पुष्कळ वेळां दृष्टीस पडल्यावांचून रहाणार नाहीं.

असो; रा. सोमण यांचें पुस्तक नेहमींच कोणालाहि आल्हादकारक वाटणाऱ्या कॉलेजांतील जीवनक्रमाविषयीं असल्यामुळें, तें आल्हादकारक वाटतेंच. पण त्यांतील विचारसरणी मोठी मार्मिक व अत्यंत विनोदी असून तें वाचण्याकरितां कोठेंहि उघडलें तरी कंटाळा येतच नाहीं. समवयस्क मुलेंच आपल्या सोबत्यांचीं मर्में ताडण्याला व रंगवण्याला योग्य असतात. तेथें प्रौढ किंवा वृद्ध माणसांचें कांहीं काम नाहीं. पण समवयस्क मुलें एका बाजूला बसून आपआपणांमध्येंच हास्यविनोद करतील, तरच तें बंधन नीट घालतां येईल. पण या पुस्तकांत ग्रंथकर्त्यानें आपल्या समवयस्कांची केलेली थट्टा छापून जगभर वाटण्याला निघाली; तेव्हां तिचा खाजगीपणा सहजच उरत नाहीं. रंगभूमीवरचें स्वगत भाषण प्रेक्षकांनीं ऐकूं नये, किंवा ऐकलें तरी ऐकलें असें न समजावें म्हणून हसूं नये, असें म्हटलें तर कसें चालेल? या पुस्तकांतील विचारहि अशा रंगभूमीवरील स्वगतासारखेच आहेत. शिवाय मी त्याकडे केवळ वाङ्मयदृष्टीच्या पडदपोशीनेंच पहात असल्यामुळें, अशा पुस्तकाला प्रस्तावना लिहूनहि मी वेगळा तो वेगळाच, असें मला मानतां येतें. प्रतिभेची नाजुक कुजबुज कानावर येत असतां, कानांत कापसाचे बोळे मुद्दाम कोण घालील?

---

बॅटी मोडक्याच, पण त्यांचा वचपा उल्हासानें भरून निघे. जिमखाने नसल्यामुळें निवडणुकी, कॅन्व्हासिंग या गोष्टी नव्हत्या. अशा अनेक रीतीनीं आजच्यापेक्षां तेव्हांचा जीवनक्रम कदाचित् अधिक निरस होता असें म्हणतां येईल. बाकी प्रोफेसरांची थट्टा, फेलोजची चेष्टा, बाथरूम-मधील गयनाचे कॉन्सर्ट, एखाद्या भोळसर मुलाला बनविण्याचे खेळ, आणि कधीं न संपणारे व वीट न येणारे वाद विवाद या गोष्टी आतां-सारख्याच होत्या.

पण या दोन कालांत एक फरक फारच मोठा पडलेला आहे. आणि त्यानेंच कॉलेज-विद्यार्थ्यांच्या जीवनक्रमांत, विचारांत व विशेषत: थट्टा-मस्करींत आणि विनोदांत, जो फरक पडला तो या पुस्तकांत सर्वत्र दिसून येतो. ती गोष्ट म्हणजे तरुण विद्यार्थ्यांबरोबर हल्लीं कॉलेजांतून होणारें तरुण विद्यार्थिणींचें सहशिक्षण. मुलगा नवीन कॉलेजांत जावयाचा असतां त्याची उमेद, त्याच्या महत्त्वाकांक्षा, त्याच्या आईबापांच्या आशानिराशा व चिंता, कॉलेजांतील मुलांच्या बाललीला यांचें वर्णन Verdant Green नांवाच्या इंग्रजी पुस्तकांत वाचावयास मिळतें. तें विलायतेंतील पब्लिक स्कूल्स आणि कॉलेजें यांच्या स्थितीचें दर्शक असून आमच्या वेळीं कॉलेजांतील मुलें तें वर्णन वाचून स्वतःच्या अनुभूतीनें त्याशीं समरस होत. आणि तें वर्णन आजच्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांनाहि तसेंच लागू पडेल. परंतु तरुण उपवर मुली कॉलेजांतील एकाच क्लासांत मुलांबरोबर बसून शिकण्याचा जो एक नवा उपक्रम सुरू झाला आहे, त्यानें मुलगे व मुली या दोघांच्याहि मनासंबंधी कौतुकाचा आनंदाचा असा एक वेगळा नवाच प्रकार दिसून येऊं लागला आहे. या सहवासांतून प्रत्यक्ष विवाह किती निष्पन्न होतात हें माहित नाहीं. परंतु विवाहापूर्वीं कोणताहि तरुण मुलगा कोणत्याहि तरुण मुलीचा भावी नवरा कल्पनेनें असूं शकतो. या स्वाभाविक संके-ताच्या स्थितींत, विवाहाची आकांक्षा नसतांहि, स्त्रीपुरुषसान्निध्यानें उत्पन्न होणाऱ्या मित्रत्वाची एक नवीन भावना कॉलेजच्या विद्यार्थ्यांत प्रकट होऊं लागली आहे. आणि तिनें कॉलेजच्या विद्यार्थ्यांचीं संभाषणें, थट्टा-मस्करी व वाङ्मय हीं सर्व आपल्या वळणावर खेंचून नेलेलीं आढळतात.

प्रस्तुतच्या 'कॉलेज-विहार' या पुस्तकांत स्त्रीपुरुष-प्रेम व मैत्री यांवर

अधिष्ठित झालेलीं रूपकें, मधून मधून अनेक वेळां दृष्टीस पडतात व तीं फार चांगलीं साधलीं आहेत. या पुस्तकाच्या पहिल्या भागाचा मथळा 'गणगोत्र जुळलें' हा आहे व शेवटच्या भागाचा मथळा 'सासुरवासाला सुरवात' हा आहे. या आद्यन्तांवरूनच नव्हे, तर मधल्या अनेक भागांतूनहि हें रूपक वरचेवर डोकावून बघत असलेलें आढळेल. पुण्या-मुंबईच्या दरम्यान अनेक वेळां फेऱ्या घालणाऱ्या प्रवाशाला जसा तोच तोच कंडक्टर दृष्टीस पडतो, त्याप्रमाणें या पुस्तकांतून होणाऱ्या वाचकाच्या प्रवासांत त्याला कॉलेजांतील मुलांमुलींच्या सहवासाच्या कल्पनेनें उत्पन्न झालेला नाजुक विनोद मधून मधून पण पुष्कळ वेळां दृष्टीस पडल्यावांचून रहाणार नाहीं.

असो; रा. सोमण यांचें पुस्तक नेहमींच कोणालाहि आल्हादकारक वाटणाऱ्या कॉलेजांतील जीवनक्रमाविषयीं असल्यामुळें, तें आल्हादकारक वाटतेंच. पण त्यांतील विचारसरणी मोठी मार्मिक व अत्यंत विनोदी असून तें वाचण्याकरितां कोठेंहि उघडलें तरी कंटाळा येतच नाहीं. समवयस्क मुलेंच आपल्या सोबत्यांचीं मर्में ताडण्याला व रंगवण्याला योग्य असतात. तेथें प्रौढ किंवा वृद्ध माणसांचें कांहीं काम नाहीं. पण समवयस्क मुलें एका बाजूला बसून आपआपणांमध्येंच हास्यविनोद करतील, तरच तें बंधन नीट घालतां येईल. पण या पुस्तकांत ग्रंथकर्त्यानें आपल्या समवयस्कांची केलेली थट्टा छापून जगभर वाटण्याला निघाली; तेव्हां तिचा खाजगीपणा सहजच उरत नाहीं. रंगभूमीवरचें स्वगत भाषण प्रेक्षकांनीं ऐकूं नये, किंवा ऐकलें तरी ऐकलें असें न समजावें म्हणून हसूं नये, असें म्हटलें तर कसें चालेल? या पुस्तकांतील विचारहि अशा रंगभूमीवरील स्वगतासारखेच आहेत. शिवाय मी त्याकडे केवळ वाङ्मयदृष्टीच्या पडदपोशीनेंच पहात असल्यामुळें, अशा पुस्तकाला प्रस्तावना लिहूनहि मी वेगळा तो वेगळाच, असें मला मानतां येतें. प्रतिभेची नाजुक कुजबुज कानावर येत असतां, कानांत कापसाचे बोळे मुद्दाम कोण घालील?

---

## ३२ मुलांचें बंड अथवा प्रतिज्ञाभंग

मराठी वाङ्मयांत 'बायकांचें बंड' प्रथम जन्मास आलें. त्यानंतर 'पुरुषांचें बंड' झालें आणि हल्लीं हें मुलांचें बंडहि झाल्यानें आतां बंड करण्याला मानवी कुटुंबांत कोणी उरलें नाहीं, असेंच म्हणणें प्राप्त येतें. पण या तिन्ही पुस्तकांतील बंडें अखेर अयशस्वी ठरून मोडलीं, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. कुणाला ठाऊक, हिंदुस्थान ही बंड कायम रुचण्याची व फळाला येण्याची भूमीच नसेल. बायकांचें बंड मोडण्याचें कारण असें दिसतें कीं, स्त्रिया जात्या कमकुवत व प्रेमळ असल्यामुळें स्त्रियांना पुरुषांपुढें स्वत्त्व व स्वाभिमान विसरून जाणें हेंच प्राप्त, असें ग्रंथकर्त्याचें मत होतें. पुरुषांचें बंड मोडण्याचें कारण असें दिसतें कीं, स्त्रियांची मदत न घेतल्याकारणानें राज्यहि चालणें अशक्य होतें असें मत ग्रंथकर्त्रीस मान्य असल्यामुळें कथाभाग तसा घडून आला आहे. 'मुलांचें बंड' व 'पुरुषांचें बंड' यापैकीं एक कादंबरी व दुसरें नाटक असलें तरी उभय ग्रंथकर्त्रींची मनोरचना वर्णित विषयासंबंधानें तंतोतंत जुळणारी आहे. दोहोंतहि लग्न न करण्याचा उपदेश करणारा एककल्ली वैराग्यशील पुरुष असून उपदेश केला गेला तो भाविक शिष्यवर्गाला. फरक इतकाच कीं, एकांतला उपदेश विवाहित प्रौढ पुरुषाना केला गेला असून दुसऱ्यांतील उपदेश अविवाहित तरुण विद्यार्थ्यांना केला गेला. दोहोंमध्यें बंड अखेर एकाच उपायानें मोडलें गेलें, म्हणजे स्त्रियांनीं केलेल्या उपयुक्त सामाजिक सेवेचें पुरुषवर्गाच्या मनांत आदर व कौतुक उत्पन्न झाल्यानें. पुरुषांच्या बंडांत नांवें, गांवें काल्पनिक घेतलेलीं असून कथाभाग रोमँटिक असल्यामुळें एकाद्या जुन्या काळीं घडला असें मानलें तरी चालण्यासारखें आहे. याच्या उलट 'मुलांचें बंड' ही गोष्ट नवल-कथा या सदराखालीं पडणारी असली तरी तिला रिॲलिस्टिक स्वरूप असून पुणें, मुंबई, टिळक, गांधी, फर्ग्युसन कॉलेज वगैरे अगदीं चालतीं-बोलतीं नांवें असलीं तरी त्यामुळें त्यांतील नवल कमी होत नाहीं.

सौ. यशोदाबाई यांना कोणतीहि गोष्ट सोप्या, सुटसुटीत भाषेंत व स्वाभाविक पेहरावांत लिहिण्याची हातोटी साधली असल्यामुळें प्रस्तुत

कादंबरी बरीच मनोरंजक झाली आहे. हल्लीं कॉलेजांतील मुलांची प्रवृत्ति उशिरानें लग्न करण्याची असली तरी सर्वस्वी अविवाहित राहण्याच्या मताचा जोराचा पुरस्कार कोठें झाल्याचें फारसें आढळत नाहीं. तथापि कोणत्याहि मताची किंचित् अतिशयोक्ति झाल्याशिवाय त्याच्या खऱ्या स्वरूपाची ओळख पटत नाहीं म्हणूनच कीं काय त्यांनीं अविवाहित राहण्याच्या बंडाचा आरोप मुलांवर केला आहे. पण वाङ्मयाच्या राज्यांत ग्रंथकार बहुरूपी ईश्वराप्रमाणें फिर्यादी, आरोपी, न्यायाधीश, साक्षीदार वगैरे सर्वांच्या रूपानें स्वतः आपणच अवतरत असल्यामुळें अपेशी बंडाला जगांत प्रायः मिळणारी कडक शिक्षा न मिळतां गुन्हेगाराला उलट बक्षिसच दिलें आहे. ज्याचें बंड फसलें त्याला चतुर्भुज व्हावेंच लागतें; पण कैद केलेल्या बंडखोराला सुंदर सद्गुणी नवरी बक्षीस मिळावी हेंच वाङ्मयराज्यांतील न्यायाधिशाच्या दयार्द्रतेचें खरें लक्षण होय.

प्रस्तुत कादंबरींत स्त्रियांच्या कर्तृत्वाचा उच्च दर्जा जरी एका स्त्रीनें वर्णिलेला असला तरी तो पुरुषवर्गासहि पटेल असाच वर्णिलेला आहे. राजकारणाच्या मोठ्या संसारांतील भागीदारी स्त्रियांना देण्याचा ठराव मुंबई कायदे कौन्सिलांत नुकताच मंजूर झालेला आहे. तेव्हां धाकट्या म्हणजे सामाजिक संसारांतील भागीदारी स्त्रियांपासून हिसकावून घेण्याच्या प्रयत्नाचें मुलग्याचें बंड स्त्रियांच्या सत्याग्रहाच्या प्रतिरोधानेंच मोडलें असें जें या कादंबरींत दाखविलें आहे तें सर्वस्वीं यथायोग्य नाहीं असें कोण म्हणेल?

---

## ३३ साहित्य तोरण

मी आज ह्या 'साहित्य–तोरणा' ला प्रस्तावना लिहिण्यास बसलों तों, अपूर्व असाच एक अनुभव मला आला. तो हा कीं, नेहमींप्रमाणें पुस्तकाच्या नांवावरून लक्ष घसरून तें त्यांतील विषयविवेचनांत एकदम घुसावयाचें, तसें न होतां माझें लक्ष या पुस्तकाच्या नांवावरच कितीतरी वेळ खिळून बसलें. याचें कारण खरोखरच 'साहित्य–तोरण' हें नांव

मोठें मनोहर आहे. असल्या पुस्तकांना नांवें दिलीं जातात तीं, प्रायः मुलांच्या बारशाला ठेवलेल्या नांवासारखीं, केवळ आईबापांच्या शब्द-माधुर्याच्या अभिरुचीचीं द्योतक असतात. म्हणजे तीं सहसा सार्थ किंवा सूचक नसतात. मुलांचीं नांवें सार्थ नसतात याचें कारण उघडच आहे. कां कीं, नांव ठेवलेल्या मुलाचे गुण प्रकट होऊन, त्या गुणांच्या विकासानें त्या मुलाच्या जीवनाचा बनाव बनावयाचा तो पुढेंच असतो. नांवाचा व गुणांचा मेळ कितपत पडला, हें मुलाची जीवनयात्रा समाप्त होण्याच्या वेळींच खरें ठरावयाचें ! बरें, नांव सूचक असावें म्हटलें तरी अडचणच. आईबापांना मुलगा सर्वगुणसंपन्न असावा असें वाटतें. पण त्यांतला कोणता गुण त्याजमध्यें विशेष प्रकट होईल, याचें भविष्यज्ञान त्यांना नसतें. आणि सर्व सद्गुण सारख्याच मोलाचे असल्यामुळें त्यांतला कोणता निवडून पसंत करावा याचीहि त्यांना पंचाईतच पडणार. म्हणून एका जुन्या लोकभ्रामक समजुतीप्रमाणें तो मुलगा जगावा, वांचावा एवढयाच बुद्धीनें म्हणजे त्याच्या आयुष्याचा एक प्रकारें विमा उतरण्याचा भोळा श्रद्धाळूपणाचा तोडगा करण्याकरितां, ' दगडया ' ' धोंडया ' असलें वाईट नांवहि ते मुद्दाम ठेवतात. किंवा सर्व भार देवावर टाकल्यासारखें करून एकाद्या आवडत्या देवाचें तरी नांव ठेवतात. तात्पर्य, अशा दुहेरी कारणांमुळें पाळण्यांत ठेविलेलीं मुलांचीं नांवें सार्थ किंवा सूचक असूं शकत नाहींत.

पण प्रस्तुत पुस्तकाला ठेवण्यांत आलेलें ' साहित्य—तोरण ' हें नांव व त्यांतल्या त्यांत ' तोरण ' हा शब्द, सार्थ व सूचक अशा दोन्ही प्रकारचा साधला आहे. निदान मला तरी तें नांव तसें भासतें, मग योजकांचा विचार कसाहि असो. तोरण या शब्दांत मंगलमय भावना खेंचून भरलेल्या आहेत. घरीं शुभकार्याकरितां मंडप घाला न घाला, प्रवेशद्वाराशीं तोरण हें बांधलेंच पाहिजे आणि मग सर्व कार्य होईपर्यंत, कार्यसिद्धीला नेण्याला व त्यांत अंशभागी होण्याला जमलेल्या सर्व स्त्रीपुरुषांनीं आबालवृद्धांनीं, त्या तोरणा खालूनच जावयाचें असतें. तोरणांच्या रचनेंत शोभेच्या व सुखानंदाच्या कल्पनांकडे दृष्टि दिलेली असते. शहर गांवांतील तोरणें केव्हां जरतारी तर केव्हां मखमली असतात. केव्हां तीं निव्वळ आरसपानीं असतात, तर केव्हां त्यांत चित्रांचा कुशलपणानें उपयोग केलेला असतो. केव्हां त्यांत मुग्धार्थव्यंजक वेलबुट्टी असते तर केव्हां त्यांत स्पष्टार्थदर्शक बोधवचनें

किंवा आशीर्वचनें लिहिलेलीं असतात. याच्या उलट बिचाऱ्या खेडेगांवां-तल्या तोरणांना असल्या श्रीमंतीचीं किंवा संस्कृतिदर्शक अशीं साधनें कोठून मिळणार ? म्हणून तेथील तोरणें केव्हां निव्वळ केळीच्या खांबांचीं, तर केव्हां पालेदार उसाचीं; केव्हां गव्हातांदळांच्या लोंब्यांचीं तर केव्हां नुसत्या आंब्याच्या फळाटहाळ्यांचीं असतात. पण हीं दुसऱ्या प्रकारचीं तोरणेंहि पहिल्या प्रकारच्या तोरणांना हार जाणारीं नव्हत. कारण पहिलीं तोरणें केवळ डोळ्यांना आनंद देणारीं असलीं, तर हीं दुसरीं प्रथम डोळ्यांना आनंद तर देतातच पण त्यांचें तें कार्य संपल्यावर जिव्हेलाहि आनंद देतात. असो. मुद्दा इतकाच कीं, तोरण म्हटलें म्हणजे ती आनंद व सौख्य देणारी अशीच एक वस्तु आहे.

तोरण या नांवाचें दुसऱ्या एका दृष्टीनें औचित्य वाटतें तें असें कीं, तोरण उभें करण्यास कारणीभूत झालेल्या मंगलप्रसंगीं जसे अनेक प्रकारचे लोक एकत्र जमलेले दिसतात व तोरणाखालून जातात, तसेंच या पुस्तकांत अनेक प्रकारचे लेखक एकत्र येऊन कार्यव्यापृत झालेले आढळत आहेत. मंगलकार्याचा प्रकारच असा असतो कीं, तें साजरें करणारांची हौस, शक्य तितके आपले आप्त, इष्ट, स्नेही व ऋणानुबंधी एकत्र केल्याशिवाय भागत नाहीं. असतील नसतील ते नात्यागोत्याचे संबंध या वेळीं आठवतात. आणि उलट हे संबंधीहि असेंच मानितात कीं, ही वेळ अशीच आहे कीं जेव्हां आपण जाऊन हजर राहून, आणि यथाशक्ति अहेर करून, मंगलकृत्य उभें करणाराचा आनंद वृद्धिंगत करावा. आपलेपणाची भावना केव्हांहि कोणीहि प्रकट केल्यास उभयपक्षीं बरेंच वाटतें. प्रस्तुत पुस्तकाला आधार आपलेपणाच घेतलेला असून, त्या आधारावर त्यांतील सर्व लेखक अधिष्ठित झाले आहेत. मात्र हा आधार नांवाचा नसून स्थानाचा आहे, व हें स्थान म्हणजे भोर संस्थान हें होय. फार जुन्या काळीं कुल व गोत्र हीं आपलेपणाची मर्यादा असे. स्थान मर्यादा ही त्यानंतरची होय. पण हल्लींच्या व्यापक दृष्टीनें कुलाभिमानापेक्षां देशाभिमान हाच अधिक प्रशस्त, व्यवहार्य व श्रेयस्कर असा मानण्यांत येतो. या पुस्तकांत पांच-पन्नास आडनांवांचे लेखक आहेत. त्यांचीं एकंदर गोत्रें अर्थात् कमी भरतील. कारण त्यांत एकेका गोत्राचे अनेक असतील. पण जें समानाधिष्ठान नांवाला किंवा गोत्राला इतक्यांना पुरवितां आलें नसतें तें देशानें

पुरविलें आहे. " कां हो, भोर संस्थान हें तुमचें कसें ? " असा प्रश्न या अनेक लेखकांना केला तर त्यांचीं निरनिराळीं उत्तरें मिळतील. अर्थात् हीं इतकीं उत्तरें म्हणजेच भोर संस्थान उत्पन्न करूं शकतें असे हे निरनिराळे संबंध होत. असे प्रश्न व अशीं उत्तरें होण्यास दुतर्फी आपलेपणाची भावना लागते; व या पुस्तकाचे योजक व त्यांतील लेखक या दोघांनींहि ती दाखविल्यामुळें हें पुस्तक सिद्ध झालें आहे. भोर संस्थानचे अधिपति व युवराज यांना इतक्या अनेक रसिक व विद्वान् लोकांनीं आपलेपणाच्या भावनेचा व प्रेमाचा जो हा करभार दिला, तो त्यांच्या राजकीय प्रजेनें दिलेल्या नित्य किंवा नैमित्तिक करभारापेक्षां खचित अधिक स्पृहणीय वाटेल !

या पुस्तकाच्या नांवांतील 'तोरण' या नांवानें आणखीहि एक कल्पना सुचते. म्हणून तिचाहि उल्लेख करितों. ती अशी कीं, तोरण हें नांव 'तोरणा' या सुप्रसिद्ध किल्ल्याच्या नांवारून सुचलें असावें. तसें असल्यास सहृदयत्वाबद्दल ग्रंथयोजकांचें अभिनंनच केलें पाहिजे. आणि तसें नसलेंच तरीहि मी सुचविलेली कल्पना अप्रयोजक ठरत नाहीं. तोरणा किल्ला हस्तगत करून श्रीशिवाजीमहाराजांनीं आपल्या स्वराज्यस्थापनेची मुहूर्तमेढ रोंविली असें इतिहास सांगतो. आणि त्याला जुन्या कागदोपत्रीं स्पष्ट आधार मिळत नसला तरी, ती गोष्ट सर्वस्वी संभाव्य अशीच आहे. कारण आधीं तोरणा घेऊन मग राजगड घेण्याऐवजीं आधीं राजगड घेऊन मग महाराजांनीं तोरणा घेतला असेल इतकाच काय तो फरक. पण दोन्ही किल्ले इतके जवळ जवळ आहेत कीं महाराजांनीं आगेमागें कां होईना ते हस्तगत केले होते यांत शंका नाहीं. राजगड किल्ला ही तर शिवाजीमहाराजांनीं स्थापलेल्या स्वराज्याची पहिली राजधानीच होती ! आणि खचित भोर संस्थानचें भाग्य थोर म्हटलें पाहिजे; कां कीं, या संस्थानच्या मुलुखांतच हिंदवी स्वराज्याचें पहिलें तोरण बांधलें गेलें व पहिली राजधानी स्थापिली गेली.

मराठी स्वराज्याप्रमाणें भोर संस्थानचा मराठी साम्राज्याशींहि संबंध पोंचतो. कारण भोरकर हे स्वराज्यांतल्या प्रधानमंडळातले सचिव होते व भोरकर हेच पुनः दिल्लीच्या बादशहापासून शाहूमहाराजांना चौथाई सरदेशमुखीच्या सनदा मिळवून देण्याच्या कामीं यशस्वी मध्यस्थ झाले.

शहाजीमहाराजांची जुनी जहागिर कांहीं भोर संस्थानच्या हद्दींत होती. तसेंच रामदासांच्या तपोनुष्ठानाची घळहि याच हद्दींत आहे. तात्पर्य, जुन्या व स्मरणयोग्य अशा मराठीस्वराज्याचा संबंध भोर संस्थानशीं कितीतरी रीतींनी निगडित झालेला आहे. म्हणून तोरण्याची आठवण करून देणारा तोरण हा शब्द या पुस्तकाच्या नांवांत चांगला पडला आहे असें मला वाटतें.

असो. या लेखसंग्रहांतील सर्व लेख वाचनीय आहेत. ज्यानें त्यानें आपला लेखविषय हौसेनें निवडलेला दिसतो व त्याचें विवेचनहि परिश्रमपूर्वक केलेलें आहे. कांहीं स्थलवाचक, कालवाचक, नामवाचक प्रसंग साधून वाङ्मय-खंड-संग्रह छापण्याची टूम अगदीं अलिकडे निघालेली असली तरी ती चांगली फैलावली आहे. तिजमुळें साहित्यासंबंधीं उपसंमेलनाचें काम होतें. मराठी वाङ्मयाचा व्याप दिवसेंदिवस वाढत असल्यामुळें, दरवर्षी कोठेंतरी सर्व महाराष्ट्राचें मिळून एक साहित्य संमेलन भरण्यानें त्या व्यापाचा निर्वाह लागणें शक्य नाहीं. अर्थात् अधिकारविभागणीप्रमाणें कार्यविभागणी झालीच पाहिजे. मी तर या 'साहित्य-तोरण' ग्रंथाच्या रूपानें हें एक पंड साहित्य-संमेलनच भोर येथें भरत आहे असें समजतों व तें यशस्वी होवो अशी प्रार्थना श्रीरामचरणीं करितों.

---

## ३४ श्री शिवभारत

( लेखांक पहिला )

श्री. 'शिवभारत' हा ऐतिहासिक काव्यग्रंथ नुकता प्रसिद्ध झाल्याचें आम्ही वाचकांस गेल्याचे मागील अंकीं विदित केलेंच आहे. तथापि हा ग्रंथपरिचय वाचनाच्या भुकेचा उद्बोध करविणाऱ्या औषधाप्रमाणें होईल. भूक भागविणारें खाद्य तें नव्हे. म्हणून या ग्रंथाच्या विस्तृत माहितीचें खाद्यहि आम्ही द्यावें अशी वाचकांची अपेक्षा असणार याबद्दल शंका नाहीं. पण या ग्रंथाचें महत्व असें आहे कीं, हें खाद्य एकदोन लेखांत आम्हीं दिलें तरी, खाद्य खाण्याविषयींची मनुष्यमात्राला सहज असलेली वृत्ति वाचकांमध्यें जाग्रत झाल्याशिवाय राहणार नाहीं. ही

वृत्ति म्हणजे कोणतेंहि खाद्य लोकांच्या हातून न खातां तें आपल्याच हातांत घेऊन खाणें. आणि याहि पलीकडची एक स्वाभाविक वृत्ति म्हटली म्हणजे, खाद्य आपल्याच हातानें तर खावेंच, पण तेंहि शक्य तर आपल्या मालकी हक्काचें असावें. अन्नसत्रांतील अन्न आपण आपल्याच हातानें जेवलों, व कदाचित् तें अन्न पौष्टिकहि असलें, तरी स्वाभिमानी मनुष्याच्या अंगाला तें खाल्लेलें अन्न लागत नाहीं. त्याप्रमाणें, ‘ शिवभारताची ’ जी माहिती आम्हीं देण्याचें योजिलें आहे ती वाचून ज्यांच्या खिशांत खर्चण्याला सहा रुपये असतील ते हा ग्रंथ विकत घेऊन, सत्तेचा एक गृहालंकार म्हणून आपल्या ग्रंथसंग्रहांत ठेवतील आणि हे सहा रुपये खर्चण्याची पात्रता दुर्दैवानें ज्यांच्या अंगीं नसेल असे मराठी वाचक निदान आपापल्या टापूंतील ज्या कोणाकडे हा ग्रंथ मिळण्यासारखा असेल त्याच्याकडे धांव घेऊन तो वाचल्याशिवाय राहणार नाहींत याविषयीं आम्हांला शंका वाटत नाहीं.

आतां ग्रंथाआधीं ग्रंथसंपादकांचा थोडासा परिचय करून देणें योग्य होईल. हे संपादक म्हणजे सदाशिव महादेव दिवेकर हे होत. हे कल्याण येथील एक रहिवासी असून मुंबईस व्यापार करितात. तथापि पुणें येथील इतिहाससंशोधक मंडळाचे ते एक अत्यंत जिव्हाळ्याचे व उपकारी सभासद आहेत. कारण इतिहाससंशोधनाविषयीं त्यांच्या मनांत तसेंच निस्सीम प्रेम आहे. मनुष्यानें निर्वाहाचा उद्योगधंदा सोईचा म्हणून कोणताहि केला तरी त्याची सर्व अभिरुचि उपजीविकेच्या धंद्यानें प्राय: समाधान पावत नाहीं. यामुळें उपजीविकेचा धंदा एक आणि खऱ्या आवडीचा व्यासंग दुसरा अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. सरकारी नोकरी किंवा राजकारण यांत पडलेले अनेक लोक जसे खऱ्या मनानें पाहिलें असतां वाङ्मयाचे भोक्ते आढळतात त्याप्रमाणें इतर व्यवसायांतहि ते आढळतात; मग कोणाला शुद्ध वाङ्मयाची आवड असो, कोणाला इतिहासाची आवड असो, किंवा कोणाला संशोधनाची आवड असो. युरोपियन लोकांतहि अशा गोष्टी घडतातच. आपल्या इकडील युरोपियन सिव्हिलियन लोकांपैकीं मि. जॅकसन व मि. फ्लीट यांच्यापैकीं पहिल्याला संस्कृत भाषेच्या अभ्यासाची आणि दुसऱ्याला शिलालेख व ताम्रपट यांच्या वाचनाची आवड स्वतःच्या सरकारी कामापेक्षांहि अधिक होती ही गोष्ट

प्रसिद्ध आहे. तसेंच आपल्याकडील विनायक लक्ष्मण भावे यांनीं व्यापार मिठाचा केला व तो यशस्वी रीतीनेंहि केला. तथापि त्यांचा उरलासुरला वेळ, किंबहुना धंद्याची नजर चुकवून एक प्रकारच्या सात्विक चौर्य वृत्तीनें त्यांतून मिळविलेला वेळ, त्यांनीं मराठी भाषेंतील जुने कवी व ग्रंथकार आणि महानुभाव ग्रंथसंग्रह यांच्या संशोधनांतच घालविला.

सदाशिवराव दिवेकर यांचीहि गोष्ट अशीच आहे. संसाराचें साधन म्हणून त्यांना दिवसभर व्यापारांत खपावें लागतें. तरी या कामांत वेळ व बुद्धि यांच्या गुणाकारानें निर्माण होणारी त्यांची तन्मयता व्यापारांत जितकी दिसून आली किंवा उपयोगी पडली त्यापेक्षांहि इतिहाससंशोधनाच्या कामीं त्यांची तन्मयता अधिक भरली. कारण येथें वेळ थोडा असला तरी व्यापाराच्या मानानें त्यांनीं या कामीं बुद्धि अधिक खर्चिली आहे. कॉलेजाचा अभ्यास पुरा करण्याची त्यांना सवड असती तर ते युनिव्हर्सिटीची पदवी घेऊन संशोधक म्हणून पुढें येऊं शकते. अशा पदवीचें अधिष्ठान संशोधकाला अर्थातच अधिक उपयोगी पडतें. परंतु युनिव्हर्सिटीच्या पदवीपेक्षांहि ग्रंथकार या नात्यानें मिळणारी पदवी, तो ग्रंथ लोकांना मान्य होण्यासारखा असल्यास, अधिक भूषणास्पद आहे यांत शंका नाहीं. दिवेकर यांनीं या ग्रंथाच्या उपोद्घातामध्यें आपला स्वतःचा या दृष्टीचा परिचय वाचकांना थोडासा करून दिला आहे. सरकारी नोकरींत असतांनाहि आवडीचें काम म्हणून तें करणारे कै. रावबहादूर काशिनाथपंत साने यांच्या काव्येतिहास संग्रहानें दिवेकर यांना प्रथम इतिहासवाचनाची गोडी लागली व त्यांतूनच संशोधनाची गोडी निघाली. तें संशोधन आजपर्यंत २५।३० वर्षें त्यांनीं चालविलें आहे.

दिवेकर लिहितात—"कोणत्याहि प्रसंगानें परमुलखीं अगर परगांवीं गेलों म्हणजे उद्योगाचें काम उरकून संशोधनाचेंहि शक्य तितकें काम, कागदपत्रें मिळण्याचीं स्थळें धुंडाळून, करीत गेलों व आजमितीपावेतों शक्त्यनुसार पैसा खर्चून ऐतिहासिक सामुग्री संपादण्याची खटपट मीं चालविली आहे." कै. राजवाडे यांना त्यांनीं अनेक ऐतिहासिक कागदपत्र फार वर्षांपूर्वी पुरविलें. त्यांतील कांहीं राजवाड्यांनीं आपल्या चौथ्या खंडांत छापलेहि आहेत. उपोद्घाताचें पृष्ठ ३ वरील त्यांनीं मिळविलेल्या ऐतिहासिक साधनांची यादी पाहिली म्हणजे दिवेकर यांच्या

निघालीं. तीं मोडी लिपींत छापलीं होतीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे! इतक्या जुन्या काळीं झालेलीं भाषांतरें मराठी भाषेच्या दृष्टीनें किती हेंगाडीं असतील याची कल्पना सहज करतां येईल. मिशनरी मराठीची थट्टा पुष्कळांच्या कानीं सोदाहरण असेलच. परंतु "या जुन्या बायबलाच्या भाषांतरासारखी विकृत व हास्यास्पद भाषा लिहून दाखवा आणि पांचशें रुपये घ्या" अशी पैज कोणीं मारली तरी ती कोणीहि प्रतिभावान नकलाकार जिंकूं शकेल असें वाटत नाहीं. असो. बायबलच्या मराठी भाषांतराचा सर्व इतिहास सांगण्याचें कारण नाहीं. त्यावरून असें दिसतें कीं जुनें भाषांतर गचाळ होतें तरी त्यांत फारसा फरक न करण्याविषयीं जुन्या युरोपियन मिशनरी लोकांचा आग्रह जसा दिसून येतो, तशीच एतद्देशीय ख्रिस्ती लोकांची ईर्षा, तें बायबलचें भाषांतर शक्य तितकें सुधारून चालू मराठी भाषेस जुळतें करावें, अशाविषयीं दिसून येते. सुमारें १०० वर्षांनीं म्हणजे १९२४ सालीं बायबलसोसायटीनें बायबलच्या मराठी भाषांतराचा फारच मोठा उद्योग केला. लाख सवा लक्ष रुपये खर्च करून, केवळ इंग्रजी ग्रंथावर भिस्त न ठेवतां, मूळ ग्रीक वगैरेहि बायबलच्या प्रती डोळ्यापुढें ठेवून सुबक मराठींत भाषांतर करण्याचा बराचसा यशस्वी असा प्रयत्न झाला. त्याचें श्रेय प. वा. केळुसकर यांना बरेंच आहे. या पूर्वींचीं जुनीं भाषांतरें करतांनाहि मराठी भाषेंतील प्रवीण लोकांची मदत घेतली होतीच. परंतु मदत मिळाली ती जुन्या संस्कृत पंडितांची. यामुळें एका बाजूस युरोपियन मराठी, आणि दुसऱ्या बाजूस संस्कृत पंडितगिरीचें मराठी, यांचा संगम होऊन, हेंगाडेपणाची कमाल झाली होती. पण चालू शतकांतील भाषांतरांच्या वेळीं उत्कृष्ट मराठी भाषेचे नमुने डोळ्यापुढें असल्यामुळें, केवळ जुन्या भाषांतराच्या नव्या आवृत्त्या न काढतां अर्वाचीन उज्ज्वल मराठीच्या पेहरावांत बायबलचें भाषांतर व्हावें हा एतद्देशीय ख्रिश्चन विद्वानांचा आग्रह सिद्धीस गेला. रेव्ह. टिळकांसारखा मराठी कवी निपजल्यावर हेंगाड्या मराठींतील बायबल हातांत धरावेंसें कोणासही वाटणें शक्य नव्हतें. पण काम मोठें खर्चाचें, आणि युरोपियन मिशनऱ्यांचें दडपण दूर सारून शुद्ध मराठीचा आग्रह धरणें कठीण. यामुळें हवें तें घडून येण्याला पुष्कळ काळ लागला. १९२४ च्या भाषांतरानंतर गतवर्षीं प्रसिद्ध झालेलें न्यू टेस्टमेंटचें भाषांतर

रा. ब. आठवले यांनीं केलें, व तें अत्यंत रसाळ व शुद्ध झालें आहे याकरितां आम्ही आठवले यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. "प्रचलित मराठी वाङ्मयाच्या वाचनाचा ज्यांना नाद आहे असे आमचे खिस्ती बंधु जुन्या भाषांतराला स्पर्श करीत नाहींत. आणि कारण विचारल्यास ते साफ असें उत्तर देतात कीं, आम्हाला आमचें मराठी बिघडावयाला नको." असा प्रवाद १९२४ च्या भाषांतराबद्दलहि कांहींस होता. परंतु "आपलें मराठी न बिघडवितां" मराठींतून बायबलाचें भाषांतर आनंदानें व उत्साहानें वाचण्याचें साधन आठवले यांनीं आतां निर्माण करून दिलें आहे. पण आम्ही प्रारंभींच म्हटल्यामाणें हा लाभ महाराष्ट्रीय खिस्ति लोकांनाच झाला असें नसून, खिस्ति नसणाऱ्या अशा समग्र मराठी वाचकवर्गालाहि झाला आहे. आठवले यांनीं या भाषांतरांतील शब्दान्शब्द तपासून घासून पुसून इतका लखलखित केलेला आहे कीं मार्मिक वाचकहि सहसा कोठें अडखळत नाहीं. खिस्तितर मराठी ग्रंथकारहि मराठीच्या शुद्धतेविषयीं क्वचितच इतके परिश्रम घेत असतील !

आतां कित्येक ठिकाणीं मूळ बायबलांतच अर्थाची क्लिष्टता आढळते, ती तशीच या पुस्तकांतहि आढळते. परंतु अशीं क्लिष्टतेचीं उदाहरणें कोणत्याहि महाग्रंथांत क्वचित् आढळणारच. प्रस्तुत पुस्तकांतील क्लिष्टतेचा सर्व दोष भाषांतरकर्त्याकडे येऊं शकत नाहीं. पुस्तकांत अवघीं दहापांचच स्थळें मला अशीं दिसलीं कीं, ग्रंथकारानें शब्दांचा इतर कांहीं पर्याय योजिला असता तर वाक्यार्थाचा नीटसपणा अधिक साधला असता. पण दोष काढतां येईल अशीं स्थळें खरोखरच इतकीं थोडीं मोजकीं आहेत.

उत्कृष्ट इंग्रजी भाषा व अर्थगांभीर्य या दृष्टीनें बायबल हें वाचनीय असतांहि मी तो ग्रंथ पूर्वी केव्हांहि संपूर्ण असा वाचला नव्हता. मधून मधूनच वाचला होता. पण हें पुस्तक हातीं पडल्यावर, मी तें अथपासून इतिपर्यंत शब्दशः वाचलें. मात्र याचें श्रेय माझ्या अभ्यासू बुद्धीला मी देत नाहीं. तर मातृभाषा हीच बोधभाषा असावी या सिद्धांताच्या अबाधित सत्यालाच मी तें श्रेय देतों !

या पुस्तकांत प्रथमच उणीव मला दिसली, ती भाषांतरकर्तृत्वाच्या दृष्टीनें नव्हे तर संपादकत्वाच्या दृष्टीनें ती उणीव ही कीं, पुस्तकांत दिल्या याहून पुष्कळच अधिक टीपा द्याव्या त्या दिल्या नाहींत. त्याहून मोठी उणीव उपो-

द्धाताची. याविषयीं एकदोन मुद्दे सांगावयाचे तर ते असे. इंग्रजी बायबलांतील विशेषनामांचा उच्चार या मराठी भाषांतरांत प्राय: वेगळा आढळतो. म्हणून तसा फरक कां केला हें सांगणें अवश्य होतें. दुसरा एक अधिक महत्त्वाचा खुलासा हवा होता तो असा कीं, नव्या करारांत एकच खिस्तचरित्र अनेकांच्या तोंडून वेगवेगळें वदविलें जातें. त्यांत बेसुमार पुनरावृत्ति होऊन, पुढें पुढें वाचावयास कंटाळाहि येतो. तेव्हां ते सर्व निरनिराळें वृत्तांत, आहेत तसेच संपूर्ण, देण्यांत स्वारस्य कोणतें ? ऐतिहासिकदृष्ट्या अथवा सांप्रदायिकदृष्ट्या तें करणें अवश्य होतें तर, त्याचें समर्थन कशा रीतीनें करावें याविषयीं ग्रंथकारानें वाचकांची समजूत करून द्यावयास पाहिजे होती. बायबलाचें पृथक्करण करून, कोणाच्या श्रद्धेला धक्का लावण्याचा हेतु न बाळगतां, उच्च प्रतीच्या टीकापद्धतीचा अवलंब करून, त्याचें स्वारस्य सांगणारे अनेक ग्रंथ खुद्द इंग्रजींतहि आहेत. तशा प्रकारचा एखादा ग्रंथ मराठी वाचकांकरितां लिहिण्याचा आठवले यांचा संकल्प पुढें मागें असेल तर गोष्ट वेगळी. पण तेवढी जबाबदारी अंगावर घ्यावयाची इच्छा त्यांना नसेल, तर एखादा सविस्तर उपोद्घात तरी लिहून, त्यांनीं बायबल ग्रंथाविषयीं व येशू खिस्ताविषयीं अवांतर तात्त्विक विवेचन थोडें-बहुत केलें असतें तर बरें झालें असतें.

असो. शेवटीं पुस्तकांतील विषयासंबंधानें दोन शब्द लिहून हें केवळ ऐच्छिक अशा प्रकारचें परीक्षण पुरें करतों.

पहिली गोष्ट ही कीं, हें पुस्तक वाचून येशू खिस्त हा एक श्रेष्ठ साधु पुरुष कां मानला जातो, व त्या मताची यथार्थता किती आहे, हें कळून येतें. येशू खिस्त हा इतर अनेक साधुसंतांसारखाच असतां, त्याच्या सांप्रदायाचा एक स्वतंत्र धर्मच कां बनला ? व त्याचा विस्तार इतका अवाढव्य कां झाला ? याचीं कांहीं कारणें अर्थातच नैमित्तिक आहेत. परंतु ही गोष्ट लक्षांतून वगळली असतांहि, म्हणजे केवळ साधु व संत या दृष्टीनेच येशू खिस्ताकडे पाहिलें असतांहि, त्याच्या चरित्राचा उदात्तपणा मनावर ठसल्याशिवाय राहत नाहीं. संतलीलेचें पर्यवसान बुवाबाजींत होऊन त्याला विकृत स्वरूप कसें येतें, हें प्रसिद्धच आहे. परंतु ज्यांच्या लीलेचें पर्यवसान असें बुवाबाजीच्या विकृत स्वरूपांत झालें नाहीं, असेहि

कांहीं साधुसंत वेगवेगळ्या धर्मांचे अनुयायी म्हणविणाऱ्या समाजांत आजवर आढळले. तोच प्रकार येशू ख्रिस्ताचाहि आहे.

येशूचें ऐतिहासिक चरित्र थोडयाच काळांत संपलें, पण 'नवा करार', म्हणजे अनेक ख्रिस्त शिष्यांनीं लिहिलेलीं त्याचीं चरित्रें व प्रेषितांचीं व शिष्यांचीं पत्रें, हीं सर्व मिळून एक संतलीलामृतच बनतें. त्यांत एकहि गोष्ट अशी सांगितलेली आढळत नाहीं कीं, जी वाचली असतां, श्रद्धाळूपणाचा कडेलोट झाला असें वाटत नाहीं. परंतु व्यक्ति या दृष्टीनें कोठेंहि स्वतः येशू ख्रिस्ताच्या कृत्यांपासून मनाला उद्वेग वाटत नाहीं. उलट त्याच्या तोंडीं घातलेलीं व खरोखर त्याचींच होतीं अशीं मानलेलीं अनेक वचनें एकत्र घेतलीं तर, त्याची आत्मनिष्ठा, ईश्वरनिष्ठा व भूतमात्रावरील प्रेम हीं उदात्त कोटीला गेलेलीं आढळतात. हा साधु पुरुष व्यवहारापासून, म्हणजे लौकिक संसारापासून, ऐश्वर्याच्या योगें मिळणाऱ्या सुखापासून, अत्यंत निवृत्त व अलिप्त होता हें तर दिसतेंच. पण लोकांत अप्रियता सोसूनहि, व त्याचे परिणाम भयंकर होतील हें दिसत असतांहि, त्याच्या मनानें मानलेल्या धर्मांतील सर्व प्रकारच्या कर्मठपणापासून तो अलिप्त होता. मात्र तो सात्त्विक उन्मादानें कांहींसा विक्षिप्त बनलेला दिसतो. साध्या व्यवहारांत देखील विक्षिप्तपणा प्रगट करणारे लोक आपण पाहतोंच. स्वतः यहुदी असतां तत्कालीन आडमुठ्या हट्टी यहुदी समाजाच्या धर्माचाराचें खंडन व निंदा करणें, आणि त्याला नवा स्वतंत्र धर्मच शिकविणें, याविषयीं उमेद ज्यानें बाळगिली त्याचें डोकें खरोखरच वैतागाने किती फिरलेलें असेल, व विक्षिप्तपणाचें दिसणारें असें आचरण त्याच्या हातून कसें घडत असेल, याची कल्पना सहजच करतां येते.

## येशू ख्रिस्त

बायबल हें पुराण असलें तरी येशू ख्रिस्त हा एक ऐतिहासिक पुरुष होऊन गेला. येशूचा जन्म नाझारेथ येथें झाला. म्हणून त्याला 'नाझारीन' असें एक नांव आहे. तथापि त्याचा जन्म 'बेथेलहेम' येथें झाला असें पुढें भासविण्यांत येऊं लागलें. याचें कारण असें. "यहुदी लोकांचा आद्यपूर्वज 'अब्राहाम' याचा अठ्ठावीस पिढयानंतरचा वंशज येशू हा होय; आणि यहुदी लोकांचा राजा होण्याचा त्याचा कायदेशीर हक्क आहे" असें त्याच्या अनुयायांना प्रस्थापित करावयाचें होतें. त्याचा

बाप 'योसेफ.' परंतु येशू हा 'दाविदाचा' मुलगा असें त्याच्या हयातींतच म्हणूं लागले. वास्तविक 'दाविदा'च्या कुलशाखेचा क्षयच झालेला होता. परंतु ज्यू लोकांमध्यें अवतरणारा भावी 'मेसाया' हा 'दाविद' याच्या पोटीं जन्मास येईल, व तो 'बेथलेहेम' येथें जन्म घेईल, असें एक भविष्य ज्यू लोकांमध्यें कोणी वर्तविलेलें वावरत होतें. येशूनें प्रथम हें भलतें पुत्रपद नाकारलें. परंतु स्वतःस 'दाविदाचा पुत्र' असें म्हणूं दिल्याने आपल्या नूतन धर्मप्रसाराच्या कामाला मदत होते असें पाहून, त्या गोष्टीला त्यानें पुढें पुढें फारसा प्रतिकार करण्याचें सोडून दिलें. येशूची आई 'मारिआ' इच्या विषयीं बायबलांत असें विधान आहे कीं, तिचा नवरा जो योसेफ त्याच्याशीं तिचा वाग्निश्चय झाल्यानंतर, पण प्रत्यक्ष विवाह होण्यापूर्वीच, ती गर्भवती झाली. हें पाहून हें ठरलेलें लग्न मोडण्याचा योसेफने विचार केला. परंतु देवदूताने त्याला स्वप्नांत दृष्टांत देऊन सांगितलें कीं "तुझ्या स्त्रीच्या पोटांतील गर्भ हा पवित्र आत्म्याच्या प्रभावाचा आहे; व तिला मुलगा होईल त्याचें नांव 'येशू' असें ठेव. आपल्या स्त्रीचा अंगीकार कर. कारण त्या पुत्राच्या हातून पातकी जगाचा उद्धार व्हावयाचा आहे." मग 'योसेफ'नें तसें केलें. पुढें 'मागी' लोकांपैकीं कांहीं ज्ञानी पुरुष येऊन त्यांनीं येशूला हुडकून काढलें. आणि त्याच्या आईबापांना असा सल्ला दिला कीं, यहुद्यांचा राजा 'हेरोद' हा येशूला नेऊन त्याचा घात करूं इच्छितो; तरी तुम्ही येशूला घेऊन मिसर देशाला पळून जा. त्याप्रमाणें त्यांनीं केलें. इकडे हेरोदनें बेथलहेमांतील दोन वर्षांच्या आंतील सर्व मुलें मारविलीं, व त्यांत येशूहि मारला गेला अशी त्याची समजूत झाली. कालांतरानें हेरोद वारल्यावर योसेफ मिसर देशाहून परत आला; पण हेरोदच्या मुलाच्या भीतीनें तो बेथलहेम येथें गेला नाहीं, तर 'नाझारेथ' येथें जाऊन राहिला.

या सुमारास 'योहान' नांवाचा एक साधु यहूदीयेच्या रानांत प्रगट होऊन, लोकांना असा उपदेश करूं लागला कीं "जन हो! आतां स्वर्गाचें राज्य भूमंडलावर लवकरच येणार आहे. तरी आपलीं पापें आठवून, सात्विक पश्चात्तापानें शुद्ध व्हा. आणि ईश्वराचें राज्य स्थापण्यास येणाऱ्या अवताराचा मार्ग नीटनेटका करा." हें ऐकून येशू हा त्याचे हातून बातिस्मा घेण्यासाठीं यार्देन नदीवर गेला. तेव्हां 'योहानानें'

येशूला ईश्वराचा पुत्र म्हणून ओळखलें. आणि म्हटलें कीं, "हें भलतेंच काय? तूंच मला बाप्तिस्मा द्यावा अशी तुझी योग्यता. तो मी तुला बाप्तिस्मा कसा देऊं? सामान्य लोकांना देतों हें ठीक आहे." तेव्हां येशू म्हणाला "तें कांहीं नाहीं. धर्माचार हे परंपरेप्रमाणें पाळण्यांतच आपणास भूषण आहे." मग तो बाप्तिस्मा झाला. आकाशाचीं दारें उघडलीं गेलीं. आणि पवित्र आत्मा एका खबूतराच्या रूपानें खालीं अवतरला. हें पाहून सैतानाला भय वाटलें. त्यानें येशूला उचलून डोंगराच्या माथ्यावर नेलें; व माझें ऐकशील तर तुला जगांतलें सर्व वैभव आणि राज्य मिळवून देईन असा लोभ दाखविला; पण येशू त्याला बळी पडला नाहीं.

नंतर 'बाप्तिस्मे' देऊन नव्या धर्माचें बंड उभारणाऱ्या योहानाला राजदूतांनीं कैदेंत टाकलें. तेव्हां यशू 'कपर्णहूम' नांवाच्या गांवीं जाऊन राहिला. तेथें मासे मारण्याचा धंदा करणारे गरीब सालस व शांतताप्रिय असे कोळी लोक समुद्रकांठीं राहत होते. त्यांना बाप्तिस्मा देऊन धर्मोपदेश करण्याला येशूनें सुरवात केली. पुढें खुद्द जाणत्या यहुदी समाजांत जाऊन लोकांचीं दुखणीं बरीं करावीं व त्यांना धर्मोपदेश करावा असा क्रम येशूने सुरू केला. तो नुसते रोग बरे करी, इतकेंच नव्हे तर वेड काढी, व पिशाच्चांना 'गति' देऊन त्यांजकडून छळल्या गेलेल्या लोकांची तो सोडवणूक करी. त्यामुळें त्याच्या मागें लोकांच्या झुंडीच्या झुंडी येऊं लागल्या. त्यांना घेऊन तो पर्वतावर गेला; व तेथें खिस्ताच्या नांवानें प्रसिद्ध असलेला व जगांत अमर राहील असा, 'दशवचनात्मक' उपदेश त्यानें केला. कालांतरानें त्याच्याजवळ पुष्कळ शिष्य जमले. त्यांत त्यानें बारा निवडून घेऊन, अतिमानुष किंवा दैवी उपचार करण्याची आपलीं शक्ति म्हणजे मंत्र किंवा सामर्थ्य त्यांनाहि दिलें. खिशांत एक पैसाहि न ठेवतां, केवळ भिक्षेवर किंवा अतिथिधर्मानें यतीप्रमाणें संचार करून, अगदीं शांतपणाचें आचरण ठेवून, उपदेशाच्या कामाला जोरानें प्रारंभ करण्यास येशूनें आपल्या शिष्यांना सांगितलें. सामान्य लोकांना काय सांगावें, कसें सांगावें, हें त्यांना नीट समजावून दिलें. ही सर्व हकीकत बंदीशाळेंत असलेल्या योहानाला कळली. तेव्हां आपला कार्यक्रम मागें चालू राहिला, हें पाहून त्याला समाधान वाटलें.

शांततेच्या आचरणाचा उपदेश म्हणजे युक्तिवादांत किंवा सदुपदेशांत पडतें घेणें नव्हे हें मात्र येशूनें स्वतःच्याच उदाहरणानें सिद्ध केलें. कारण परंपरा मूढ यहुदी जनाना टाकून बोलण्याला त्यानें कमी केलें नाहीं. त्यांचें प्रत्येक रूढाचाराचें कृत्य घेऊन, त्याची चिकित्सा करून, ते भलत्या मार्गानें कसे जात आहेत हें त्यानें परोपरीनें सांगितलें. हें करीत असतां त्यानें आपलें चमत्कार चालू ठेवले होते. पण आपला उपदेश लोकांच्या गळीं उतरावा याकरितां तो लौकिकांतलेच असें कांहीं सोपे सुंदर दृष्टांत देई व गोष्टी रचून सांगे कीं, श्रोते लोक तल्लीन होऊन जात व त्यांची पुरी खात्री पटे. त्याची कीर्ति ऐकून त्याचे भाऊ त्याजकडे आले. त्यानें त्यांना परक्या सारखेच पण ममतेनें वागविलें. पुढें तो खुद्द ज्यू लोकांच्या राजधानीकडे वळला, आणि यहुदी लोकांच्या बालेकिल्ल्या-वरच आपल्या उपदेशाचा हल्ला चढविण्याचें त्यानें ठरविलें. हें करतांना किती धोका येणार आहे, स्वतःला त्याचे परिणाम किती भोगावे लागणार आहेत, हें तो जाणून होता. म्हणून त्याच्या शिष्यांनीं त्याला परावृत्त कर-ण्याचा प्रयत्न केला तरी, उलट त्यांनाच निर्भयतेचा उपदेश करून, आणि सत्याकरितां प्राण देण्याची तयारी करा असें सांगून, त्यांना बरोबर घेऊन तो निघाला. तेव्हां अनेक दैवी साक्षात्कार झाले. तो पुढील कार्याचा शुभशकुनच होता.

नवीन धर्माचा उपदेश करणारा येशू आला असें पाहून यहुदी लोकांनीं त्याला गोत्यांत कसें आणतां येईल याचा विचार सुरू केला. ' यरूशलेमें'त जातांच तो थेट ईश्वराच्या मंदिरांत गेला. आणि तेथें चाललेला स्वार्थी व्यापार उदीम, सट्टेबाजी, यांचा त्यानें निषेध केला. पुष्कळ प्रेक्षकांना ही गोष्ट मनापासून आवडली. लहान मुलें व तरुण लोक यांचा घोळका त्याच्याभोंवतीं जमला, तेथील याजक व महाजन हे रागावून म्हणाले, "तूं हें करतोस तें कोणत्या अधिकारानें!" पण असल्या प्रश्नांना त्यानें उत्तरेंच दिलीं नाहींत. फक्त अनेक दाखले व दृष्टान्त देऊन, 'परुषी' म्हणजे परंपरामूढ यहुदी लोकांना त्यानें नवीन धर्ममताचा उपदेश सुरू केला. कर्मठ लोक व कोरडे शास्त्री यांचा निषेध त्याजकडून सुरूच होता. त्यांचा दांभिकपणा, त्यांची दुष्ट स्वार्थी कृत्यें यांचें अविष्करण त्यानें करून चालविलें. खरी ईश्वराची भक्ति न

करतां धर्माचाराचें थोतांड फुकट आहे, असें त्यानें त्यांना बजाविलें. आंतून तुमचीं मनें थडग्यासारखीं व त्यांतील कुजक्या प्रेतासारखीं असतां बाहेरून मात्र त्या थडग्यांना चुना फासावा त्याप्रमाणें तुम्ही धर्माचाराची शुचिर्भुतता दाखवितां ! तर संभाळा, तुमचा सत्यानाश दूर नाहीं. तुम्हांवर ईश्वराचा कोप झाला आहे. यरूशलेमेचा विध्वंस झाल्यावाचून राहाणार नाहीं. असें बजावून तो देवळांतून बाहेर पडला व जैतूनाच्या डोंगरावर जाऊन बसला.

पुढें यहुद्यांचा ‘ वल्हांडण ’ नांवाचा सण आला. तेव्हां, आपल्या मरणाची वेळ जवळ आली असें त्यानें आपल्या शिष्यांना सांगितलें. आणि सणाच्या पहिल्या दिवशीं गांवांत जाऊन आपल्या शिष्यासमवेत त्यानें भोजन केलें. तें जवळ जवळ सगळ्यांचें मिळून शेवटचेंच भोजन अशा बुद्धीनें केलें. येशू आयता हातीं सांपडला असें पाहून यहुद्यांचे मुख्य याजक व गांवांतली शिष्टसभा यांनीं पाठविलेले कांहीं गुंड हातांत तरवारी व सोटे घेऊन आले. परंतु बारा तेरा असामींतील येशू कोण हें त्यांना माहीत नव्हतें. पण त्या शिष्यांतलाच एकजण म्हणजे ‘ यहुदा इस्केरिओत ’ नांवाचा एक होता. त्याला पैसे देऊन आधींच वश करून घेतलेला असल्यामुळें त्यानें विश्वासघात केला. आणि भक्तिभावानें गुरुमुखाचें चुंबन केलें असें वरकरणीं दाखवून, त्यांतला खरा येशू कोण हें त्या गुंडांना दाखवून दिलें. त्यांनीं येऊन येशूच्या अंगावर हात टाकला. उलट येशूच्या भक्तांपैकीं एकानें त्याच्या रक्षणार्थ तरवार उपसली. पण "तूं वाईट कां वाटून घेतोस ! माझें जें व्हावयाचें ठरलें आहे तेंच होणार आहे " असें म्हणून येशूनें त्यालाच निवारलें. गुंडांनीं येशूला धरून वरिष्ठ याजक व शास्त्री यांच्या सभेंत नेलें. ही मंडळी येशूवर दोषारोप करून त्याला ठार कसें मारितां येईल याचा विचार करीत होती. त्यांना कोणीहि साक्षीदार खोटा पुरावा देण्याला मिळेना. शेवटीं दोघेजण कसेबसे तयार झाले. मग त्या सभेंतील लोकांनीं येशूला आडवेतिडवे प्रश्न विचारून गोत्यांत आणण्याचा प्रयत्न केला. त्यांना येशूनें निर्भयतेनें ठसठशीत उत्तरें दिलीं. तेव्हां हा देहान्त शिक्षेस पात्र आहे असें ठरवून, त्या नगरींत रोमन लोकांचा सुभेदार ‘ पिलात ’ नांवाचा होता, त्याजपुढें नेऊन उभें केलें. आपल्या विश्वासघातामुळें येशूवर प्राणसंकट ओढवलें

हें पाहून ' यहुदाला ' पश्चात्ताप झाला व त्यानें गळफांस लावून घेऊन प्राण दिला.

सुभेदारापुढें अशी तक्रार मांडण्यांत आली कीं येशू हा स्वतःला यहुद्यांचा राजा म्हणवितो परंतु त्या किंवा इतर अनेक दोषारोपांना येशूनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. हें पाहून सुभेदाराला आश्चर्य वाटलें. आणि येशूला यहुद्यांच्या स्वाधीन करावा लागणार, हें पाहून त्याला वाईट वाटलें. परंतु तो काय करणार ? त्यानें एक युक्ति करून पाहिली, तेथील एक चाल अशी होती कीं, सणाचे दिवशीं यहुदी लोक म्हणतील त्या एका कैद्याला सुभेदारानें सोडून द्यावें. तेव्हां त्याचा फायदा घेऊन, " मी येशूला सोडून देऊं कां ? " असें त्यानें जमलेल्या लोकांना विचारलें. परंतु त्यांनीं तुरुंगांत असलेल्या एका दरवडेखोरालाच सोडून देण्याची मागणी केली ! आणि येशूला सुळीं देऊन अंगाला खिळे मारून प्राण घ्यावा असें सांगितलें. तेव्हां नाइलाज होऊन ' पिलातानें ' येशूला फटके मारवून लोकांच्या स्वाधीन केलें. त्यांनीं येशूची थट्टा करण्याकरितां त्यांच्या अंगांत तांबडा झगा घातला. डोक्यावर कांटेरी वेलीचा मुकूट चढविला. उजव्या हातांत एक वेताचीं छडी दिली. आणि त्याची ' छी थू ' करण्याकरितां अनेक यहुद्यांनीं त्याच्यापुढें येऊन लवून खोटे मुजरे करून " कां यहुदी लोकांचे राजेसाहेब, आतां कसें काय ? " असें म्हणून वेडावले. वधस्तंभाच्या जागेवर नेऊन त्यांनीं त्याला कडू विषार अशा मद्याचा पेला प्यावयास दिला त्याचीं आंगचीं वस्त्रें फाडून आपापसांत वांटून घेतलीं. सुळाच्या, खांबावर त्याला खिळयांनीं टोंचून चिकटवून ठेवून, स्तंभावर " यहुद्याचा राजा म्हणविणारा हा येशू याची कशी गत झाली पहा ! " अशा शब्दांची चिटी लाविली आणि त्या स्तंभाजवळ पाहरेकरी ठेवून लोक निघून गेले. अशा तऱ्हेनें आपल्या शत्रूवर विजय मिळवून ते परत जातांना मोठमोठ्यानें म्हणूं लागले, " हा ईश्वराचा पुत्र म्हणविणारा, जुनें धर्ममंदिर पाडून तीन दिवसांत नवें उभारणार, आणि सगळ्या जगाला तारणार ! मग त्यानें क्रुसाखालीं उतरून संदेह मुक्ति घेऊन स्वर्गाला कां जाऊं नये ? " अर्थात ही सर्व उपरोधी भाषा होती.

इकडे येशू गतप्राण झाला तेव्हां एकदम अंधार पसरला. देवळांतील पडदे

फाटले. भूकंप झाले. खडक फुटले. थडगीं उघडलीं गेलीं, मृतसाधुसंतांचें पुनरुत्थान झालें. येशूबरोबर वधस्थानीं, त्याची मावशी 'मारिआ मग-दालीया' व इतर कांहीं श्रद्धाळू व ममताळू स्त्रिया आल्या होत्या. त्यांनीं सुभेदाराकडे अर्ज करून येशूचें प्रेत मागून घेतलें.आणि तें एका थडग्यांत ठेवून देऊन दाराशीं धोंडा लोटून त्या भजन करीत बसल्या. येशू विषयीं असें एक भविष्य पूर्वीं वतविण्यांत आलें होतें कीं,त्याच्या वधानंतर तीन दिवसांत त्याचें प्रेत नाहीसें होऊन तो पुन्हां सजीव होऊन गुप्तसंचार करूं लागेल. हें माहीत असल्यामुळें यहुद्यांनीं थडग्याजवळ कडक पाहारा ठेविला. परंतु मोठा धरणीकंप होऊन एक देवदूत खालीं उतरला. त्यानें तो तोंडचा धोंडा बाजूला सारला. आणि " येशू पुनरुज्जीवित होऊन स्वर्गाला गेला, व तुम्ही काळजी करूं नका, " असा शुभ संदेश मारिआ प्रभृति स्त्रियांना त्यानें सांगितला. तें ऐकून त्यांनीं थडग्यांत जाऊन पाहिलें तों तेथें येशुचें प्रेत नव्हतें ! ही बातमी गांवांत यहुदी लोकांनाहि कळली. ती ऐकून त्यांना ईश्वराची भीति वाटली. पण त्यांनीं अशी वदंता उठविली कीं, पाहारेकऱ्यांना झोप लागली असतां, येशूच्या शिष्यांनीं त्याचें प्रेत चोरून नेलें.

अशारीतीनें येशूचा शेवट झाला. पण त्याचे शिष्य ठरल्याप्रमाणें पुनरुत्थित गुरुची भेट घेण्याकरितां गालीलांतील पर्वतावर गेलें, तेव्हां येशू त्यांना प्रत्यक्ष भेटला. मग त्यानें त्यांचें सांत्वन करून त्यांना अशी आज्ञा केली कीं, " तुम्ही आतां जगभर संचार करा व माझा नवा धर्म लोकांना शिकवा. युगाच्या समाप्तीपर्यंत मी अमर असा पृथ्वीवर राहीन. त्याप्रमाणें पुढें त्याच्या मुख्य शिष्यांनीं संचार करण्यास सुरुवात केली. त्यांनीं प्रथम यहुदी लोकांहून इतर अशा लोकांना, व शेवटीं ग्रीक व रोमन लोकांनाहि, नवीन धर्माची दीक्षा दिली. पण हट्टी यहुदी लोकांनीं मात्र तो धर्म अखेरपर्यंत स्वीकारला नाहीं. ते 'ज्युडेइझम' म्हणजे याहुदी पुराण धर्माचेच अनुयायी अद्यापि आहेत. येशू ख्रिस्ताचा जन्म रोमन बादशहांच्या कारकीर्दींत झाला. यामुळें पहिलीं दोनतीनशें वर्षें येशूचे दूत व प्रेषीत यांना फार कष्टाचीं काढावीं लागलीं. त्यांना पड खाऊन गुप्तपणें धर्मप्रसार करावा लागला. पण तिसऱ्या शतकापासून ख्रिस्ती धर्मप्रसाराला उर्जित दशा येऊन त्यानें पृथ्वीवर आतां केवढा ताबा मिळविला आहे हें लोक जाणंतातच !

## ' नवा करार ' ग्रंथ

नव्या कराराच्या पहिल्या चार भागांत येशू ख्रिस्ताचें चरित्र चौघां लेखकांनीं लिहिलेलें आहे. हे लेखक म्हणजे मत्तय, मार्कस्, लूक व योहान हे होत. एकाच चरित्राच्या या चार आवृत्त्यांमध्यें कमीजास्त काय आहे व तें कशामुळें, हें फक्त सूक्ष्म संशोधकालाच आढळून येईल. मात्र ते श्रम घेण्यापासून उपयोग त्यालाच काय तो होणार. सामान्य वाचकांच्या दृष्टीनें या चार आवृत्तींत जवळ जवळ एकच मजकूर असून तो वाचीत असतां पुनरुक्ति कंटाळवाणी होते. पण बायबलसारखा धर्मग्रंथ हा संक्षेपाचा विषय होऊं शकत नाहीं. तसें होते तर या चारींपैकीं एक सर्वांत चांगला असा वृत्तांत मुख्य धरून तो तेवढा छापून बाकीच्यांत कमीजास्त असलेलें टीपांच्या रूपानें देऊन भागलें असतें. शंदीडशें पानें वांचवितां आलीं असतीं. परंतु तशी सूचना करणें हें अप्रयोजकपणाचें समजलें जातें! मोठा मनुष्य वारल्याबरोबर, त्याचा निकट परिचय असलेल्या अनेकांकडून, आठवण ताजी आहे तोंपर्यंत, त्याचा समग्र वृत्तांत लिहून काढणें हा चरित्रलेखनाचा एक मोठा उपयुक्त प्रकार असतो. शिवाय जेथें चरित्राविषयीं शंका घेणारे असतील, व त्यांची खात्री पटविण्याकरितां मिळेल तितका स्वतंत्र प्रत्यंतर पुरावा देणें अवश्य भासत असेल, तेथें ही पुनरुक्त वर्णनाची पद्धति बिनतोडच होय.

केवळ मराठी वाचकांच्या दृष्टीनें आम्ही ' मत्तय ' याच्या शुभवर्तमानाचा चरित्ररूप जो त्रोटक सारांश वर दिला आहे तो पुरेसा आहे. परंतु नव्या करार ग्रंथांत पुढें प्रेषितांची कामगिरी व येशूच्या चार दोन शिष्यांचीं पत्रें दिलीं आहेत तीं मनोरंजक असून, ख्रिस्तानंतर त्याच्या नवीन धर्माचा प्रसार कसा व किती झाला याची बोधप्रद कल्पना त्यावरून होते. या पत्र लिहिणारांत पॉल, याकोब, पेत्रस, योहान, यहुदा इतक्यांचीं पत्रें आहेत. परंतु ह्या सर्वांत पॉल हा एकटा जबरदस्त मतप्रसारक दिसतो. ख्रिस्ताच्या बारा शिष्यांपैकीं मतप्रसार करण्याचे कामीं कांहीं मारले गेले, अनेक तुरुंगांत पडले, व बहुतेक सर्वांचाच छळ झाला. परंतु हीं सर्व संकटें सोसून त्यांनीं आपलें कार्य अत्यंत यशस्वी केलें, व ' येशूचे सच्छिष्य ' असें जगाकडून म्हणवून घेतलें.

वास्तविक स्वतः येशू ख्रिस्तानें ' धर्मवेडांत शहाणपण ' म्हणावें

त्याप्रमाणें एक मोठें चाणाक्षपणाचें धोरण ठेविलें होतें. तें असें कीं, होतां होईतों राज्यकर्त्यांच्या गुन्हेगारींत सांपडावयाचें नाहीं. " देवाचें देणें तें देवाला द्यावें. राजाचें राजाला द्यावें. राजाचें देणें म्हणजे नुसते करच नव्हेत तर कोणत्याहि कायद्याचें रीतसर परिपालन. " वरील महामंत्र येशूच्या धोरणाची गुरुकिल्ली होती. तो महामंत्र त्याच्या शिष्यांनीहि उत्तम प्रकारें सांभाळला. ही गोष्ट केवळ राजदंडाला भिऊन त्यांनीं केली असें म्हणवत नाहीं. कारण राजाची गुन्हेगारी सिद्ध झाली तरी देहान्तप्रायश्चित्त सहसा मिळत नसे. उलट गुन्हेगारी राजाची न ठरतां लोकांची ठरली तर अपराध्याला अधिकारी शिक्षा न करतां लोकांच्या स्वाधीन करीत, आणि मग देहांतप्रायश्चित्त हें जवळ जवळ ठरलेलें. पण येशू व त्याचे शिष्य यांनीं हा दुसरा संभव पतकरला. याचें कारण त्यांत शिक्षा अधिक भयंकर असली तरी धार्मिक तत्त्वनिष्ठा तरी साधण्यासारखी होती. येशूचा अवतार रोमन साम्राज्याविरुद्ध बंड उभा करून राज्यक्रांति करण्याचा नव्हता. त्यालाहि एका अर्थानें राज्याची क्रांति हवी होती; पण ती सर्व जगावर एकदम ईश्वराचें राज्य प्रस्थापित होण्याची ! हा ग्रीस, हें रोम, हा एशिया मायनर अशा लहान मापांनीं जग व राज्य मोजण्याला तो तयार नव्हता.

पॉलचीं पत्रें दोन प्रकारच्या लोकांना उद्देशून लिहिलेलीं आहेत. एक, जे लोक ख्रिस्ति धर्म स्वीकारण्याला मनानें अर्धवट तयार झाले आहेत; व दुसरे, म्हणजे जे लोक धर्मांतराचें साहस करून चुकले आहेत व त्याचे चांगलेवाईट परिणाम भोगीत आहेत. पहिल्या लोकांशीं बोलतांना पॉल हा स्वत:ला ईश्वरापासून तिसऱ्या पिढीचा अवतार असा अभिनिवेश मनांत आणून, आपल्या वाणींत अधिकाराचें तेज जितकें कांहीं घालतां येईल तितकें घालतो. पहिली पिढी म्हणजे ईश्वर, दुसरी पिढी म्हणजे येशू ख्रिस्त, व तिसरी पिढी म्हणजे स्वत: पॉल ! ईश्वरानें व येशूनें आपणास सद्धर्मप्रसार करण्याचा विशेष अधिकार दिला आहे, असें तो ज्यांना पत्रें लिहितो त्यांना बजावितो. यहुदी समाज कसा हीन निकृष्ट अवस्थेला पोचलेला आहे. याचें बीभत्स चित्र तो रंगवितो. जुन्या धर्मशास्त्रांतील वचनांचा आणि भविष्यांचा खरा अर्थ काय, हीं सर्व येशू ख्रिस्ताला लागू कशीं पडतात, व यहुदी समाजाचें चारित्र्य त्यापासून किती दूर व भिन्न आहे, हें

तो खुलवून सांगतो. येशूच्या नवीन धर्माचा स्वीकार करणें हा एकच तरणोपाय आहे असें तो उपदेशितो. आणि प्रसंगच सांपडेल तेथें आपल्या छळाचा हालअपेष्टांचा उल्लेख करून, आपल्या उपकारी कृतीचा भार त्यांचे मनावर घालतो. खिस्ती धर्मांत सामील झालेल्या लोकांना लिहितांना ह्याचे शब्द आश्वासनपर असतात. या समाजाने नित्यनैमित्तिक वर्तन कसें ठेवावें, आपसांतील कलह मिटवून बंधुभाव वाढवून एकजीव होऊन आपलें बळ वाढवून प्रतिपक्षाला तोंड देण्याला समर्थ कसें व्हावें, हें तो त्यांना परोपरीनें सांगतो. नव्या समाजाची शिस्त सुटल्याचें ऐकून त्याला खेद होतो. त्यांतील विशेष व्यक्तीविरुद्ध कोणी चहाड्या केल्या असतां त्यांची ओळख देतो. शिवाय ख्रिस्तानुयायी झालेल्या नव्या समाजाच्या मनांत अनेक बिकट प्रश्न व शंकाकुशंका येतात त्या सर्वांचें समाधान तो करतो. संसारांतील निरनिराळ्या नात्यांनीं जोडलेल्या लोकांचीं परस्परांविषयीं कर्तव्यें काय? स्त्रीधर्म, विधवाधर्म, पतिधर्म, पत्नीधर्म कोणते? नीति म्हणजे काय? धर्माधिकाऱ्यांनीं कसें वागावें? तरुणांनीं कसें वागावें इत्यादि विषयांवर तो त्यांना उपदेश करतो. त्याच्या लिहिण्यांत दोन गोष्टी मूलभूत दिसतात. एक, मनुष्याची श्रद्धा हेंच त्यानें अनुसरण्याचें धर्म-शास्त्र; आणि दुसरी ही कीं, खिस्ताचें पुनरुत्थान हाच त्याच्या अवतारित्वाचा खरा पुरावा. प्रत्यक्ष सुरू असलेल्या आपल्या बंदिवासाचा उल्लेख त्यानें अनेक पत्रांतून केला आहे. एका पत्रांत तर तो असें स्पष्ट लिहितो कीं, "माझ्या जीविताचें बलिदान होण्याची तयारी दिसत आहे. माझा प्रयाणकाळ जवळ येऊन ठेपला आहे. नांवाजण्याजोगी शर्यत मारून मी आपली धाव संपविली आहे. मी ख्रिस्त-निष्ठा अढळ राखिली आहे. आतां पुढची गोष्ट म्हणजे, मजसाठीं ठेवलेला नीतिमत्त्वाचा किरीट प्रभु (जो नीतिमान न्यायाधीश आहे तो) त्या दिवशीं मला देईल."

पॉल हा स्वतः पूर्वायुष्यांत देवनिंदक, उपद्रवी, व परद्रोही असा होता! ख्रिस्तावर त्याचा विश्वास नव्हता. परंतु कोणाची मतपरिवर्तनाची वेळ कशी व केव्हां येईल हें कोणी सांगावें? म्हणून केवळ ईश्वराची कृपा म्हणूनच ख्रिस्ताचें शिष्यत्व पतकरण्याची आपल्याला प्रेरणा झाली असें तो म्हणतो. आणि इतरांनींहि हाच बोध घेऊन हें उदाहरण

पाहून ख्रिस्तानुयायी व्हावें असें तो सांगतो. तेव्हां त्याचें सांगणें आत्मानुभवाच्या अधिकाराचें आहे असें सहजच वाटतें. एक गोष्ट मात्र त्यानें चाणाक्षपणें केलेली दिसते. प्रभूचा दिवस कधीं उगवेल याविषयीं तो नक्की भविष्य करण्याचें टाळतो! फक्त इतकेंच दर्शवितो कीं, अशी गोष्ट सांगूनसवरून वेळापत्रकानें घडत नसतें. वेळापत्रक हें ईश्वराला लागू कसें होणार? याविषयीं तो एक उपमा देतो तींत अनौचित्य असलें तरी समर्पकता आहे. तो म्हणतो "रात्रीं जसा चोर अचानक येतो, तसा प्रभूचा दिवस येईल. प्रसूत व्हावयास टेकलेल्या स्त्रीला वेदना होऊं लागतात त्याप्रमाणें पापी लोकांना विनाश काल हा अकस्मात् गांठील." तसेंच तो दिवस येण्याविषयीं उतावीळ झालेल्या लोकांना कंटाळा येऊन अश्रद्धा वाटेल ती वाटूं नये, म्हणून तो असेंहि सांगतो कीं, प्रभूचा दिवस जवळ येऊन ठेपला आहे खरा. तरी तो प्रत्यक्ष उगवण्याला संपूर्ण तयारी म्हणून पहिल्यानें अधर्म माजण्याची पराकाष्ठा झाली पाहिजे! मूर्तिमान दुराचार असा जो दुर्गतिचा पुत्र त्याचें खरें स्वरूप बाहेर पडलें पाहिजे! भविष्य तर करावें पण शब्दांत तर सांपडूं नये. हें जें भविष्यवाद्यांचें खरें कौशल्य तें पॉल याच्या अंगीं पूर्णपणें दिसतें. तो उत्साहपूर्ण असला तरी त्याची सावधगिरी व विवेकबुद्धि त्याला सोडून गेलेली नाहीं.

लौकिक दृष्टीनें पाहतां खुद्द येशू ख्रिस्ताच्या चरित्रापेक्षां त्याच्या शिष्यांच्या पत्रांवरून प्रगट होणारें त्यांचें चरित्र अधिक बोधप्रद वाटतें. येशूचें चरित्र हें आकाशांतून तुटून पडलेल्या ताऱ्याच्या तेजासारखें डोळे दिपविणारें वाटतें; तर त्याच्या शिष्यांचें चरित्र सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत लोकव्यवहार सुरक्षित व व्यवस्थित करण्यास मदत देणाऱ्या प्रकाशमान दीपाप्रमाणें वाटतें. ख्रिस्तचरित्र हा सोसाट्याचा वारा किंवा वावटळ, तर त्याच्या शिष्यांचें चरित्र हें उष्णकालीं मधून मधून मनुष्याला कामाला पुनरुत्तेजित करणारी गार वाऱ्याची झुळूक! येशूनें वावटळीप्रमाणें जुन्या यहुदी धर्माचा वृक्ष पाळामुळांसह गदगदा हालविला. त्याच्या शिष्यांनीं हिवाळ्यांतील वाऱ्याप्रमाणें त्या वृक्षाचीं जुनीं पानें झाडून टाकून त्यांचे ठिकाणीं सर्वत्र नवी पालवी फुटण्यास सहाय्य केलें. म्हणून येशूच्या उपदेशांत जो व्यावहारिक उपदेश फारसा दिसत नाहीं, तो त्याच्या शिष्यांच्या उपदेशांत दिसतो. तो उपदेश सामाजिक जीवनाच्या सर्वांगांना स्पर्श करणारा आहे.

## येशु खिस्ताचें तत्त्वज्ञान

येशू खिस्ताचें तत्त्वज्ञान इतकें उदात्त, व कोणाच्याहि मनावर परिणामकारक, होण्याचीं कारणें थोडक्यांत अशीं देतां येतील : तो स्वतः अगदीं सामान्य कुळांत जन्माला आला. त्याचा बाप सुताराचा धंदा करी. तसेंच त्याला शिक्षण म्हणतात तें कांहींच नव्हतें. गरिबीमुळें साधेपणा हा त्याला अगदीं सहज असा प्राप्त झाला होता. कलाविलासाची आवड अशी त्याला कोणतीच नव्हती. यामुळें शारीरिक किंवा मानसिक सौख्याच्या उपभोगाला हें हवें, तें हवें, असा हव्यास त्याला मुळींच नव्हता. घराची एक खोली हीच निजण्याबसण्याची, खाण्यापिण्याची, व कामधंद्याची अशी त्याची जागा होती. त्यांतच तो व त्याचीं भावंडें राहत. अशा स्थितींतला मनुष्य एकदम उठून ईश्वरभजनीं लागतो, किंबहुना ईश्वरभजनाला लागल्यामुळें त्यानंतर प्राप्त होणारें दैवी संपत्तीचें ऐश्वर्य आधीच लाभल्याप्रमाणें, जगाला नवीन धर्मतत्त्वें एकदम शिकवूं लागतो, या गोष्टीचें आश्चर्य त्याच्या सभोंवतालच्या लोकांना वाटल्याशिवाय कसें राहील ? पण अशिक्षित मनुष्य अशीं उदात्त धर्मतत्त्वें कशीं सांगूं शकेल याचें आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. कां कीं, धर्मतत्त्वाचा संबंध खऱ्या अंतःकरणाशीं जितका असतो तितका सुशिक्षित व्यवसायात्मक बुद्धीशीं नसतो.

## येशूचे पहिले अनुयायी

येशूसारखे अशिक्षित लोक त्याच्या बरोबरच्या समाजांत कांहीं थोडे-थोडके नसतील. पण येशूसारखी अंतःकरणाची दिव्य देणगी देवानें त्यांना अर्थातच दिली नव्हती. उलट त्याच्या काळीं विद्वान म्हणविणारे पढिक शास्त्री, पंडित, याजक, कर्मठ, याज्ञिक, असे यहुदी लोकांत पुष्कळ होते. पण या सर्व गोष्टींनीं खरी धार्मिक भावना प्रदीप्त होत नाहीं; तर विस्तवावर माती लोटावी त्याप्रमाणें ती दडपून किंबहुना विझूनहि जाते. अशा लोकांशींच प्रथम गांठ घालून येशूनें हमरीतुमरी केली असती तर, त्याच्यावर कालांतरानें मरण ओढवलें तें आधीच ओढवलें असतें ! आणि इतर अनेक सद्धर्मप्रचारक, प्रसिद्धी लाभल्याशिवाय, जगांतून नाहींसे होतात तसेंच येशूचेंहि झालें असतें. पण सुदैवानें धर्मोपदेश करण्यास त्याला जे

लोक प्रथम लाभले ते त्याच्या सारखेच—म्हणजे गरीब, सालस, सात्त्विक, पापभीरू असे मिळाले. हे लोक म्हणजे 'टायबेरिअस' सरोवराच्या आसपासचे कोळी. त्यांना धर्माचाराच्या दांभिक खटाटोपाचा उपसर्ग मुळींच लागला नव्हता. ईश्वराविषयीं अद्‌भुत असा उपदेश, साध्या सरळ सोप्या शब्दांनीं अगदीं त्यांच्यांत मिसळून, करणारा असा येशू हाच त्यांना प्रथम भेटला असावा. आणि माणसाने माणूस जुळतो या रीतीनें येशूच्या अनुयायांच्या भरतीला सुरुवात झाली.

## दांभिकांपेक्षां अज्ञानी बरे

धार्मिक संप्रदायांत शिष्यपरंपरा कशी फैलावते, आणि पट्टशिष्य म्हणविले जाणारे कसे लाभतात व तयार होतात, हें प्रसिद्धच आहे. इतर कोणत्याहि वैभवाची ज्याला हौस नाहीं अशाहि सत्पुरुषाला, शिष्य व अनुयायी मिळाल्याचा आनंद व अभिमान वाटल्याशिवाय राहत नाहीं. कारण अशा सत्पुरुषांचें कार्यच मुळीं, माणसें जोडून त्यांना आपल्या आवडत्या तत्त्वांचें शिक्षण देणें, हेंच काय तें या जगांत असतें. येशूचे पहिले शिष्य बहुतेक सगळे कोळीच होते. स्वतंत्र बुद्धीचें बळ त्यांच्यामध्यें नव्हतें. पण आपल्या गुरूविषयीं प्रेम, भक्ति व आदर हीं पराकाष्ठेचीं होतीं. भ्रम अज्ञान वगैरे कारणांनीं ते दैवी चमत्कार मानणारे व भुताखेतांवर विश्वास ठेवणारे होते. भुताखेतांवरहि ज्याचा अंमल चालतो, व असाध्य मानल्या जाणाऱ्या रोगांवरहि ज्याचें मंत्रौषध चालतें, त्याला अशा लोकांनीं पृथ्वीवरचा देवच मानल्यास नवल नाहीं. गुरूनें प्रवचनांत सांगितलेलें 'ईश्वराचें राज्य' म्हणजे काय याची खरी कल्पना त्यांना नव्हती. आणि या दृष्टीनें आपल्या उपदेशाचें मर्म त्यांना खरोखर कळलें आहे असें स्वतः येशूलाहि वाटलें असेलसें नाहीं. पण वितंडवादी व दांभिक दुराचारी यांच्यापेक्षां ठोंबे श्रद्धाळू बरे, असें त्याला वाटलें असल्यास मात्र तें योग्यच होतें.

## भोळे पण प्रामाणिक

येशूच्या शिष्यांना मधून मधून देवदूत दिसत, व त्यांनीं कांहींबाही कानांत सांगितल्याचा भास होई. पण एखाद्या निर्मळ सरोवराच्या कांठीं, स्वच्छ उघडया हवेंत, निरभ्र आकाशांत, चांद व चांदण्या यांजकडे टक लावून पाहत, निष्काळजी व शुद्ध मनाने जे लोक रात्रीच्या रात्री घालवीत,

त्यांच्या कल्पनेवर अद्‌भुत रसाचें रोगण येशूसारख्याच्या हलक्या हातानें लावल्यावर, त्या जादूच्या करपुतळींत येशू सांगेल तें तें सर्व किंवा न सांगेल तेंहि दिसलें तर काय आश्चर्य ? शिवाय चिल्लर भुताखेतांतून काढून घेऊन, त्यांच्या मनाची दुर्बीण येशूने थेट स्वर्गापर्यंत ईश्वराच्या सिंहासनाशींहि नेऊन भिडविली होती. भुताखेतांवर ज्यांचा विश्वास असतो त्यांचा विश्वास ईश्वरावर बसविण्यास मुळींच जड जात नाहीं. ईश्वराविषयीं व देवदूतांविषयीं कानानें ऐकलेलें विचार व कल्पना डोक्यांतून सहजच बाहेर पडावयाच्या. ईश्वराविषयीं व सद्धर्माविषयीं कल्पना आणून देण्याच्या कामीं येशू हा जरी या लोकांना मध्यस्थासारखा होता, तरी धार्मिक सांप्रदायांतील मध्यस्थाप्रमाणें तो दलालीचा धंदा करणारा मध्यस्थ नव्हता ! येशूचा निःस्वार्थीपणा त्यांना अगदीं उघड दिसत होता.

## शिष्यांकडून गुरूचा पाठलाग

शिवाय एकाला एक असे अनुयायी जुळत गेल्याने सहवासाची क्रिया–प्रतिक्रिया त्यांच्या मनावर सहजच झाली. मनुष्य एकटाच कांहीं काम करीत असतां त्याच्या अंगीं जें बळ नसतें तें बळ, त्याने तेंच काम समुदायांत उभे राहून केल्यास त्याच्या अंगीं येतें. हा साध्या लौकिक चळवळींतलाहि अनुभव आहे. मग धार्मिक चळवळींत तो येणारच. एका दृष्टीनें आपल्या मतांचा प्रसार व्हावा म्हणून येशू अशा लोकांना जवळ करी. पण केव्हां कंटाळा येऊन लोकांच्या गर्दीपासून दूर निघून जाऊन भजन किंवा ईश्वरचिंतन करावें असेंहि त्याला वाटे. तरी लोक त्याची पाठ सोडीनासे झाले. यामुळें होडींत बसून निघाला असतां, किंवा दूर पर्वतावर जाऊन बसला असतां, लोकांना उपदेश करण्याचें प्रसंग त्याला येत.

## येशूचें त्वरित दान

त्याचे शिष्य व जवळचे अनुयायी सोडले तरी, इतर लोकांनाहि पटण्यासारखेंच शुभवर्तमान येशू लोकांना सांगे. तो लोकांशीं तात्त्विक नीतिचिकित्सा करीत बसला असता तर ती फुकट जाती. तीच गोष्ट शुष्क तात्त्विक धर्मचर्चेची. असल्या विहिरी शेंकडों हात खोल खणल्या तरी त्यांना पाणी लागत नाहीं. पण “मी बरोबर पाणी आणलें आहे तें तुम्हाला प्यावयाला देतों, तुम्ही नुसती ओंजळ करा म्हणजे झालें !”

असल्या त्वरित दानांत लोकांना महापुण्य सहजच वाटणार. येशू जें ईश्वराचें राज्य जगावर अवतरणार असें सांगे, तें अशा त्वरित दानासारखें असे. " तें राज्य इतक्या जलदीनें खालीं अवतरणार आहे कीं, तुम्ही त्याकडे वर मान करून पाहण्याला किंचित् विलंब केला तर तें तुमच्या डोक्यांवर येऊन आदळेलहि ! " येशूच्या या उपदेशांत अप्रामाणिकपणा नव्हता. असला तर किंचित् लाक्षणिकपणा मात्र असा असे कीं, तो साध्या-भोळ्या मनाला एकदम उकलणार नाहीं. परंतु तो सांगतो त्याप्रमाणें ईश्वराचें राज्य येणार, इतकेंच नव्हे तर तें आलेलें खुद्द आपल्या डोळ्यांना पाहावयाला सांपडणार ! अशी जादू करून दाखविण्याची जो हमी घेतो, त्याचा निदान खेळ तरी पाहण्याची संधि त्याला एकवार द्यावी असें भाविक मनाला कां वाटणार नाहीं ? ताज्या अनुभवाचें एक लौकिक उदाहरण ध्यावयाचें तर तें असें कीं, कांहीं वर्षांपूर्वी अहमदाबाद येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेच्यावेळीं, म. गांधी यांनीं स्वराज्य मिळविण्याविषयीं ग्वाही दिलेली एक वर्षाची मुदत भरली तेव्हां, तो दिवस उजाडतांच तें राज्य मिळालें असें समजून तें कसें काय आहे हें पाहण्याला राष्ट्रीय सभेच्या मंडपाकडे गरीब भाविक लोकांच्या झुंडी लोटत होत्या त्या आपण पाहिल्याचें कित्येक लोक सांगतात. जगावरच्या स्वराज्याविषयीं जर ही अपूर्वाई, तर प्रत्यक्ष ईश्वराच्या राज्याविषयीं ती किती वाटावी !!

## याच देहीं याच डोळां

येशूच्या धार्मिक प्रवचनांपैकीं कांहीं वचनांचा उलगडा 'त्वरित दान महापुण्य' या म्हणीनेंच होण्यासारखा आहे. ईश्वराचें राज्य जगावर येणार त्याबरोबर प्रत्यक्ष ईश्वरहि येणार; व तो येणार नाहीं तर त्याचें राज्य कसलें ? बरें, तो राज्य घेऊन आला तरी स्वतः लौकिक राजाप्रमाणें जुलुमी किंवा स्वतःच्या सुखाकरितां ऐश्वर्य भोगणारा राजा नव्हे. तो राजा नांवाचा. पण कृतींत प्रत्यक्ष प्रेमळ पिताच म्हणाना ! आपल्या मुलांनीं स्वतःच्या गरजा सांगण्याच्या आधींच त्या त्याला कळतात, व तीं जें काय मागणार तें त्यांनीं मागण्याच्या आधींच देण्याच्याहि तयारीनें तो येणार. असें असल्यावर लौकिक संसार वाहण्याची चिंता आपण कां करावी ? तो जें घेऊन येणार तें जसें प्रिय तसेंच श्रेयस्करहि असणारच. आणि चिरंतनहि असणार. मग जगांतील नश्वर तक-

रुपी ऐश्वर्य मिळविण्याचा व सांभाळण्याचा हव्यास आपण व्यर्थ कां करावा? या जन्मीं स्वार्थत्यागरूपी यज्ञ केला तर त्याचें स्वार्थी फळ केव्हां तरी पुढच्या जन्मांत मिळेल असें कोणी सांगो, व तें सांगणारा कदाचित् विश्वास ठेवण्याला पात्रहि असो. पण आपण पडलों स्वार्थी. इतका धीर आपणाला कोठून निघणार? म्हणून मिळेल तें सुख भोगून घ्या असें सांगणाऱ्या 'चार्वाका'चा उपदेश लोकांना पटण्याला उशीर लागला नाहीं. पण येशू मात्र याच्या अगदीं उलट सांगत असतां त्याचा उपदेश लोकांना पटे. याचें कारण असें कीं आपले मनोरथ याच जन्मीं आपल्या हातानें पुरवून घेण्याची संधि मिळणार! शिवाय त्या मनोरथप्राप्तीला चार्वाकी दूषणहि नाहीं. कारण स्वत: ईश्वरच येऊन त्याच्या हातानें तो आमच्या इच्छा तृप्त करणार.

### ईश्वराचें राज्य सर्व कांहीं देणार!

अशा स्थितींत हव्यास हीच उपाधि ठरते. आपल्या ओंठावरील जांभूळ तोंडांत ढकलणारा कोणी येणार अशी खात्री असल्यावर तें ढकलण्याला स्वत:च्या हाताला कोणी श्रम कां द्यावे? हा हव्यास सोडला म्हणजे सत्कर्म करण्यालाच सगळा वेळ मिळणार. म्हणून पैसा मिळविण्याची खटपट कां करा? तो पैसा लागेल तितका ईश्वराच्या राज्याबरोबर येणारच आहे, व त्याच्याच खजिन्यांतून हवा तेवढा मिळणार आहे, म्हणून घरच्या पेट्या-कपाटें पैशानें आडवून व्यर्थ अडगळ कां माजवा? "ईश्वरा आजची भाकर आज मिळावी. फिरून उद्याची मिळण्याबद्दल काळजी करणारा तूं आहेसच!" अशी प्रार्थना शुद्ध अंत:करणानें करावी म्हणजे काम झालें. ब्राह्मणानें आपल्या घरांत तीन दिवसांहून अधिक बेगमी करूं नये असें मनुस्मृतींत सांगितलें आहे; खिस्ताच्या उपदेशाप्रमाणें तर मनुष्यानें उद्याच्या भाकरीचीहि काळजी आज करण्याचें कारण नाहीं. क्षुधाशांतीची आजची आपत्ति भागली, काम भागलें! शिवाय स्वर्गाचें राज्य जर लवकरच खालीं आलें तर पुढच्या पिढीची काळजी करण्याचेंहि कारण उरलें नाहीं. ज्या पंक्तींत मुलें घेऊन जेवावयाला बसावयाची परवानगी नाहीं, तींत जेवणारा प्रेमळ बाप निम्मे अन्न स्वत: खाऊन निम्मे पदरांत बांधून मुलांकरितां नेईल. पण ईश्वराचें राज्य अवतरल्यावर झडणाऱ्या मेजवान्यांत, आपल्या सगळ्या मुलांना जवळ घेऊन जेवायला

बसण्याची परवानगी मिळणार तर लाडू बांधून नेण्याला पदर खरकटा कां करा? ज्यांना पुढची पिढी लाभलेली आहे त्यांना ही व्यवस्थाहि लाभली. पण ती पिढी लाभण्यापूर्वीच जर स्वर्गाचें राज्य खालीं आलें तर कामच झालें!

## ईश्वराचे लाडके गरीब

संसारी बुद्धीच्या लोकांना व विशेषत: श्रीमंतांना हा उपदेश पटण्यासारखा नव्हता. पण गरिबांना मात्र तोच पटण्यासारखा होता. शिवाय येशू आपल्या प्रवचनांत असें 'स्पेशल' शुभ वर्तमान सांगे कीं, "ईश्वर खालीं येणार तो एका विशेष प्रतीच्या व स्थितीच्या लोकांकरितां येणार आहे. हा एकतर्फी प्रकार पण तो अन्याय नसून खरोखरी न्यायच आहे. कारण आधीं गरिबांजवळ जें नाहीं तें त्यांना दिलें म्हणजे ताजव्याचा पासंग नीट बसेल. श्रीमंत गरिबांचीं पारडीं प्रथम सारखीं करणें हाच खरा न्याय होय." येशूचें हें शुभ वर्तमान ऐकून आपणच काय ते ईश्वराचे लाडके असें गरीब लोकांना वाटल्यास तें स्वाभाविकच होतें. कोणतीहि क्रांति प्रथम समाजांतील गरिबांना पटते याचें कारण हेंच आहे. श्रीमंती, विद्या कला व सुखोपभोग हे सर्व एका वर्गाला, व दुसऱ्या वर्गाला कांहींच नाहीं, असें घडत असतेंच. उद्या श्रीमंताचा गरीब होईल व गरीबाचा श्रीमंत होईल हें निराळें. पण आज जो गरीब आहे त्याला स्वत: श्रीमंत होण्याला नसेना कां, पण श्रीमंत असलेला गरीब होऊन आपल्या पदवीला येऊन पोहोचण्याला—म्हणजे मत्सरबुद्धि समाधान पावण्याला क्रांति हें एकच साधन जलद काम करणारें असतें. क्रांति यशस्वी न झाली तरी त्या गडबडींत व दंगलींत ज्याचें कांहीं आहे त्याचें तें तरी नाहीसें होईल; पण ज्याचें कांहीं नाहींच त्याचें काय नाहीसें होणार? राजकीय क्रांतीला ही उपपत्ति लागू पडते. धार्मिक क्रांतीलाहि हेंच कारण असतें. कां कीं, ईश्वराला सर्व सारखे व सर्वांना ईश्वर सारखा असें वास्तविक असतां, लौकिक धर्माच्या राज्यांत कृत्रिम श्रेष्ठ-कनिष्ठ भाव निर्माण झालेला असतो. यामुळें या बाबतींतील गरिबांना धर्मक्रांति प्रिय असते. कांहीं कण चाकाच्या तळीं व कांहीं चाकाच्या माथीं अशा स्थितींत "चाक फिरूं लागावें कीं नाहीं?" असा प्रश्न विचारला असतां, खालचे कण होयच म्हणणार व वरचे नकोच म्हणणार.

## पतित हेच उद्धाराला योग्य

समाजामध्यें जसे जन्मतः निर्धन लोक असतात, तसे प्रथम निर्धन नसतां आयुष्यक्रमांत आपल्या दुर्वर्तनानें, चुकीच्या धोरणानें, बिनहिशेबी-पणानें किंवा ईश्वरी आपत्तीमुळें निर्धनता प्राप्त झालेलेहि लोक असतात. पहिल्या वर्गाच्या लोकांना एकाच प्रकारचा अनुभव जन्मतः असल्यामुळें ते फारसे दुःखी होत नाहींत. पण दुसऱ्या प्रकारच्या लोकांना त्यांचें दुःख परिस्थितीच्या विषमतेमुळें अधिक जाणवतें. दुःखानंतर सुख याचा आनंद जसा विशेष, तसेंच सुखामागून दुःख याचें दुःख विशेष. सुख व धन यांचे अर्थ व्यापक घेतले असतां, या दोनहि प्रकारचे लोक येशू खिस्ताचे अनुयायी होण्याला योग्य ठरत. कारण इश्वराला गरीब निर्धन हे अधिक जवळचे व प्रिय आहेत अशी ग्वाही तो देई. आणि ईश्वर हा जर 'उद्धार' करणारा, तर पतितांचा उद्धारच त्याला विशेष प्रिय असावा. मात्र 'पतित' म्हणजे खरा अनुताप पावलेले पापी लोक. पापमार्गच ज्यांना रुचला, ज्यांचें पाऊल त्यांतून बाहेर निघत नाहीं, व ज्यांना पश्चात्ताप होत नाहीं, त्यांचा उद्धार ईश्वर काय म्हणून करील? त्यांच्याकरितां नरक राखून ठेविलेलाच आहे. परंतु धर्मशास्त्राचा काय किंवा नीतिशास्त्राचा काय एक मूलभूत प्रश्न असा असतो कीं, एकदा जो पापी किंवा पतित ठरला, त्याला त्या पापाची निष्कृति करून पुनः पुण्यमार्गावर येण्याची आशा आहे कीं नाहीं? या बाबतींत यहुदी शास्त्री-पंडितांचें उत्तर 'नाहीं' 'नाहीं' असें होतें. पण असें झालें तर मग देवाची म्हणून जी दया ती काय उरली? स्वतः येशूचें मत यहुदी शास्त्री-पंडितांप्रमाणें नव्हतें. 'अनुताप' हेंच खरें प्रायश्चित, आणि या प्रायश्चित्तानें ज्याची निष्कृति होत नाहीं असें पापच जगांत नाहीं, अशी येशूची भावना असल्यामुळें तो पतितांना आश्रय देई. मात्र त्याला खरा अनुताप झाला आहे अशी आधीं खात्री करून घेई. येशूच्या परिवारांत असे पतित लोक पुष्कळ दिसून येत.

## पतित-पावनावर आक्षेप

मग यहुदी समाजांतील शिष्ट लोक त्याजकडे अंगुलिनिर्देश करून म्हणत, "हा पाहा ईश्वराचा दूत म्हणविणारा व त्याचें राज्य खालीं आणविणारा! परिवाराप्रमाणेंच परिवारीहि समजावा!" पण सनातनी

यहुदी शास्त्रीपंडित कांहींहि म्हणाले तरी येशूला त्याची पर्वा नव्हती. शिष्ट समाजानें कायमचे दूर लोटलेले असे दुःखी अनुतापी जीव सहजच येशूचे अनुयायी बनत, व यामुळें पुढें येणाऱ्या धर्मक्रांतीला मदत होई. क्रांति म्हणजेच एका वर्गाचें वर्चस्व जाऊन, त्या ठिकाणीं दुसऱ्या कोणा वर्गाचें वर्चस्व स्थापित होणें. आणि येशूच्या आवडत्या परिवारांत शुद्ध निर्विकार मनाचीं बालकें, मुलासारखेच ऋजु सरळ निष्पाप असणारे अशिक्षित ग्रामवासी लोक, जगानें अव्हेरलेले पण अनुतापी असे पापी पतित चांडाळ अस्पृश्य लोक, श्रेष्ठ व वरिष्ठ यांच्या अहंकाराच्या उन्मादानें कस्पटासमान मानलेले हीन व कनिष्ठ जातीचे लोक, जुन्या धर्मांचा म्हणजे त्यांतील अयुक्तिक कर्मठपणाचा व सांप्रदायिकत्वाचा कंटाळा आलेले खऱ्या धार्मिक बुद्धीचे लोक, पाखंडी लोक, वावदूक लोक, परोपकार हाच खरा धर्म व नीति मानणारे उदारचरित लोक—या सर्वांचा घोळका येशूच्याभोंवती जमलेला पाहून, तिऱ्हाइताला तो देखावा मौजेचा किंवा बोधप्रदहि वाटला असेल.

## राजाच्या मेजवानीची गोष्ट

हें कां व कसें घडतें याचें कारण गोष्टीच्या रूपानें स्वतः येशूच सांगे. तो म्हणे कीं, "एकदां एका राजानें मेजवानीचा बेत करून, भोजनाचीं निमंत्रणें कांहीं बड्या लोकांना पाठविलीं. पण त्या उन्मत्त लोकांनीं त्या निमंत्रणाचा अव्हेर केला. तेव्हां राजानें दूत पाठवून जे सांपडतील ते इतर लोक आणून पंक्तीला बसविले. अर्थात् अशा लोकांमध्यें दरिद्री, भिकारी, मुके, आंधळे, पांगळे यांचीच भरती विशेष झाली. तें पाहून राजाला कौतुक वाटलें, व त्यानें त्यापुढें निश्चयच केला कीं या उन्मत्त लोकांना पुनः जेवावयाला बोलवावयाचेंच नाहीं." येशू म्हणे, "ईश्वराचाहि आतां असाच हुकूम सुटला आहे. यापुढें त्याचा कृपाप्रसाद फक्त हीन-दीनांनाच मिळावयाचा. श्रीमंताच्या वांट्याला तो यावयाचा नाहीं." हें लोकांच्या मनावर ठसविण्याकरितां त्यानें स्वतःला "हीन–सेवक" हें नांव लावून घेतलें, व लोकहि त्याला अजून "हीनतारक" असेंच म्हणतात. श्रीमंतांना मिळावयाचें तें मिळूनच चुकलें आहे. त्यांना आतां काय द्यावयाचें ? जे आज हंसत आहेत त्यांना आनंद मिळूनच चुकला आहे.

तेव्हां जगांतला उरला आनंद ईश्वरानें अशांकरितां राखून ठेवला आहे कीं, ज्यांना पूर्वी तो कधींच लाभला नाहीं.

### समतावाद

समतावादाचें हें एक उदात्त प्रतिपादन होय. वास्तविक ज्यू यहुदी लोकांच्या धर्मकल्पनांमध्यें ही साम्यवादाची कल्पना ठळकपणें होती. 'जुन्या करारामध्यें' ती दिसून येते. त्या पुस्तकांतील 'एनॉफ' या प्रकरणांत चैनबाजी हा गुन्हा आहे, पाप आहे, असें स्वच्छ सांगितलें आहे. राजे लोकांना नरकाबाहेर गति नाहीं असेंहि सांगितलें आहे! ज्यू लोकांचे आद्यपूर्वज खरोखरच मोठ्या साध्या राहणीचे लोक होते. पण पुढें राजे लोकांनीं राजवाडे बांधून चैन केली इतकेंच नव्हे, तर ते वाडे बांधतांना मजुरांच्या अश्रूंनीं व घामानें कालविलेला चिखल दरएक विटे-गणिक व दगडागणिक लाविला! तेव्हां भवितव्यता त्यांच्या वाड्यांची वीट ना वीट, दगड ना दगड, निखळून उध्वस्त केल्याशिवाय राहणार नाहीं असें भविष्य जुन्या करारांतच आढळतें! पण येशूच्या समकालीन यहुदी समाजाला हें भविष्य पटलेलें नव्हतें.

### दरिद्र–नारायण

यामुळें 'क्रियेइतकीच प्रतिक्रिया प्रबळ असते' या न्यायानें हीन–दीन सेवा ही लोकप्रिय झाली; आणि महात्मा गांधींनीं ज्याप्रमाणें 'दरिद्र–नारायण' हें नांव घेतलें तसेंच येशूच्या हीन–दीन-सेवक पंथाच्या तत्त्वाला Ebionism ( एबिऑनिझम् ) हें नांव मिळालें, व तें पुष्कळ दिवस रूढ राहिलें. Ebion या शब्दाचा मूळ अर्थ 'गरीब' असा आहे. येशूनें दुखणाइतांना बरें केलें, रोग्यांना निरोगी केलें, पिशाच्च-ग्रस्तांच्या अंगांतून पिशाच्चें काढलीं. परंतु कोणाहि गरिबाला पैसे मिळवून देऊन त्यानें श्रीमान केलें नाहीं! कारण ईश्वराच्या राज्यांत 'श्रीमंती' हा पदार्थ व 'श्रीमंत' हें नांव नाहीं. त्याच्या राज्यांत 'श्री' व 'ऐश्वर्य' हीं आहेत. पण तीं सात्विक विभूतिरूपी आहेत. मी स्वतः निर्धन असूनहि ईश्वराला जवळचा कसा वाटतों हें येशू लोकांना सांगे.

### कायदा जुना अर्थ नवा

पण या एकाच बाबतींत काय, तर इतर अनेक बाबतींतहि येशूनें वास्तविक जुन्या यहुदी कायद्याचा धिक्कार किंवा अव्हेर केला नव्हता.

" तर त्या कायद्याचा अर्थ तुम्ही बरोबर करीत नाहीं व जो अर्थ बरोबर करीतां त्याप्रमाणें वागत नाहीं " हीच मुख्य तक्रार तो ज्यू लोकांविरुद्ध करी. आपणाला हवें तें जुन्या धर्मग्रंथांच्या वचनांतूनच काढतां येईल असें त्याला वाटे. ज्यू शास्त्रीपंडितांनीं स्पृश्यास्पृश्यभेदाचें स्तोम फार माजविलें होतें. आणि येशू पाहावा तर त्याच्या पंक्तीला कोणीच वर्ज्य नाहीं ! ज्यांना त्याच्या पंक्तीचा हा बहुमान मिळे ते भावी क्रांतीला सहजच वश होत. तसेंच जुन्या धर्मग्रंथांतील तत्त्वांविरुद्ध शास्त्रीपंडितांनीं कर्मठपणाचा मोठा बाजार मांडला होता. सार्वजनिक बलिदान, सार्वजनिक उपासना व प्रार्थना, सार्वजनिक उपोषणें, यांतच त्यांचा सर्व धर्म येऊन बसला होता.

## येशूचें सात्विक कपट

ईश्वराला व त्याला प्रिय असलेल्या सात्त्विक सदाचाराला व परोपकाराला ते विसरून गेले होते. त्याविरुद्ध येशूनें प्रतिक्रिया आरंभिली. तो म्हणे ' यमनियमांचें हें भारुड उभारून तुम्ही लोकांना पापाचरण घडण्याचे प्रसंग नसते उत्पन्न करतां. आणि फिरून त्यांच्या हातून पापाचरण घडलें असें म्हणून त्यांना बहिष्कृत करतां हा कुठला न्याय ? ' पण यहुदी लोक धर्मशास्त्राचा खरा अर्थ मानण्यास तयार नाहींत असें पाहून, त्यानें क्रांतीच्या पुढच्या पायरीवर पद ठेविलें. आणि जुनें धर्मशास्त्रच मी मानीत नाहीं जा ! ईश्वर येणार तो आतां नवें धर्मशास्त्रच घेऊन येणार आहे. फक्त शहाण्यांना शब्दांचा मार; पण टोणप्यांच्या पाठींत टोणपेच घातले पाहिजेत असें म्हणून जुनी विनयाची भूमिका सोडून, तो स्वतःला ईश्वराचा पुत्र एवढेंच नव्हे तर मनुष्याचाहि पुत्र असें म्हणवूं लागला. पण यांत थोडी खोंच होती. कारण हा मनुष्य म्हणजे " दाविद ", आणि ज्या दाविदाशीं जुना यहुदी राजवंश संपला असें मानण्यांत येई त्या दाविदाचा येशू हा मुलगा, अशी भूमिका भाविक अनुयायांनीं उठविली; आणि सनातनी यहुदी समाजावर आघात करण्याचें तें एक उत्तम साधन म्हणून त्यानेंहि ती स्वीकारिली. त्यालाहि ती आपल्या कार्याच्या यशाची गुरुकिल्ली वाटली.

## ईश्वर-पुत्र तोच मानव-पुत्र

पूर्वी पवित्रोदकानें बाप्तिस्मा घेण्याचे विधीवर त्याचा विश्वास नसतां

'जॉन दी बाप्तिस्त' याजपासून त्यानें तो स्वीकारला. त्याचप्रमाणें दाविदाचा मुलगा येशू ही पदवी देखील त्यानें लोकांना ती प्रिय म्हणूनच घेतली. 'अज्ञ लोकांचा बुद्धिभेद करूं नये' या म्हणीचा येशूनें तारतम्यानें उपयोग केला; प्रतिपक्षी यहुदी शास्त्रीपंडितांच्या मगरमिठींतून सोडविण्याकरितां तदुपदिष्ट रूढ कर्मसंघापासून त्यानें अज्ञ जनांना परावृत्त करण्याचा बुद्धिभेद केला; पण आपण आरंभिलेली धर्मक्रांति यशस्वी होण्याकरितां आपल्या अज्ञ अनुयायांनीं 'दाविदाचा मुलगा येशू' अशी जी दंतकथा पिकविली तिच्यापासून त्यांना परावृत्त करण्यास लागणारा बुद्धिभेद मात्र त्यानें केला नाहीं. हें नांव स्वीकारणें म्हणजे आपली पूर्वजांची सगळी वंशावळ बदलून दुसरी स्वीकारणें, असा अर्थ उघडच होता. परंतु 'दाविदाचा पुत्र' हें नांव त्यानें भौतिक रक्तसंबंधाच्या अर्थानें न स्वीकारतां, केवळ तात्पर्यानें तें स्वीकारलें असावें असें वाटतें. कित्येक लोक त्याला पुढें ईश्वराचा अवतार असें म्हणूं लागले. त्याचाहि स्वीकार त्यानें तात्पर्यार्थानेंच केला. कारण तो स्वतःला ईश्वरच नाहीं तरी अतिमानुष कोटींतील समजे. ईश्वराला जो कोणी आपला पिता म्हणेल तोहि अतिमानुष ईश्वरपुत्रच होईल. आणि मी ईश्वराला जर पिता म्हणतों तर स्वतःला ईश्वराचा पुत्र म्हणवून घेण्याला कां भ्यावें ? लक्षणेनें येशू हा स्वतःचा पिता व ह्याच पित्याचा पुत्र असें हवें तें म्हणतां येण्यासारखें होतें ! कारण येथें प्रत्यक्ष देहाचा कांहीं संबंध नसून सर्व भाषा त्यांतील आत्म्यासंबंधाची होती.

## चमत्कार-मीमांसा

हे असत्य शब्दप्रयोग येशूनें चांगल्या हेतूनें कां होईना पण चालूं दिले. मोडून काढले नाहींत. त्यांच्या प्रतिषेधाचा आग्रह धरला नाहीं. हें त्याचें कृत्य अप्रामाणिकपणाचें होतें, असा त्यावर एक आक्षेप आहे. ह्याच्या जोडीचाच दुसरा आक्षेप म्हटला म्हणजे त्यानें केलेल्या चमत्कारांसंबंधींहि आहे. तो असा कीं, "येशू आपले ठिकाणीं कांहीं अतिमानुष शक्ति आहे असें समजण्याचें कारण नसतां, त्यानें ती आहे असें लोकांस भासविलें. आणि वास्तविक आपल्या शक्तिप्रभावानें चमत्कार घडले नाहींत ( किंवा ते खरोखर घडलेच नाहींत ) असें माहीत असतां त्यानें तसा भास उत्पन्न केला किंवा राहूं दिला." पण या आक्षेपांत फारसा

अर्थ नाहीं. चमत्कारासंबंधानें आज विसाव्या शतकांत झालें तरी लोकांत ऐकमत्य आहे काय ? आजहि सुशिक्षित समाजामध्यें चमत्कारांवर विश्वास ठेवणारे अनेक लोक आढळतातच. जे गुरूंच्या भजनीं लागतात ते त्यांच्या अतिमानुष शक्तीवर खरी निष्ठा व विश्वास असल्यामुळेंच. एरवीच्या व्यवहारांत कसोशीनें तारतम्य पाळणारे लोक, केसाइतकी बारीक चिकित्सा करणारे लोक, हेहि धार्मिक बाबतींत सारासार विचाराला तिलांजली देणारे आढळतात कीं नाहीं ? आणि अज्ञानी मनुष्य सोडून दिला तरी सर ऑलिव्हर लॉज, सर हेन्री क्रूक्स यांसारखे पहिल्या प्रतीचे भौतिक शास्त्रज्ञ हे, परलोक व त्या संबंधांत घडून येणारे अद्‌भुत चमत्कार प्रत्यक्ष प्रयोगांसारखेच विश्वसनीय मानतात कीं नाहीं ? शास्त्रीय वैद्यक उपचारपद्धतीला व वैद्यक तत्त्वज्ञानाला अनेकांगी मानसोपचार पद्धतीनें आजहि अपवाद निर्माण केलेच आहेत कीं नाहीं ? मग दोन हजार वर्षांपूर्वी लोकभ्रमाची तीच किंवा त्याहून अधिक गहनस्थिति असल्यास काय नवल ?

### यथा यक्षः तथा बलिः

येशूच्या हातून रोग बरे करून घेणारे, भूतें काढन घेणारे लोक त्याच्या दैवी शक्तीवर विश्वास ठेवीत होते यांत मुळींच संशय नाहीं. अप्रामाणिकपणाचा किंवा भोंदूपणाचा लाभ त्यांना काय होणार ? लाभ असलाच तर या चमत्कारापासून स्वतःचें स्तोम माजविणारा येशू व त्याचे शिष्य यांना ! पण त्यांच्यावरहि भोंदूगिरीचा आरोप करण्याचें कारण दिसत नाहीं. तो व त्याचे शिष्य हे चमत्कार खऱ्या समजुतीनें व प्रामाणिकबुद्धीनें करीत असत. पण चमत्काराचा परिणाम अनुभवाला येणाराचें सर्टिफिकेट तेंच खरें ! आणि या बाबतींत येशू व त्याचे शिष्य यांच्याहून त्यांचा उपयोग करून घेणारी जनताच अधिक श्रद्धाळू असल्यामुळें, चमत्कार खरोखर घडला कीं नाहीं याच्या सर्टिफिकिटाची जबाबदारी लोकांवरच अधिक होती.

### श्रद्धेचा प्रभाव

तथापि येशू देखील पूर्वी चमत्काराविषयीं झालेलीं भविष्यें आपणासंबंधानेंच झालेलीं आहेत असें मानी यांत शंका नाहीं. येशूपूर्वी एलिझा व एलिशा, सायमन, प्लॉटीनस वगैरे अनेक लोकांनीं असे चमत्कार केले अशी दृढ समजूत होती. आणि आपल्या धर्मप्रसाराला चमत्कार करून दाखविण्यानें मदत होणारी आहे असें दिसून आल्यावर, आत्म-

श्रद्धेनें शक्य तितके चमत्कार करून दाखवून त्याचा फायदा आपल्या कार्याला करून घ्यावा असें येशूला वाटल्यास नवल नाहीं. आजहि जर भौतिक शास्त्रानें मानसिक शक्तीचा ठाव घेतलेला नाहीं, तर त्या काळीं तिजवर विश्वास ठेवणारे सर्वच भोंदू होते असें म्हणतां येत नाहीं. ईश्वराचें राज्य सत्वर खालीं येण्याची ग्वाही देणारा मनुष्य थोडाबहुत लोकविलक्षण असणारच. तोच लोकविलक्षणपणा चमत्कारांवरील श्रद्धेंतहि दिसून येतो. चमत्कार हे आज श्रद्धेपेक्षां अश्रद्धेलाच अधिक कारण होतात. कां कीं, भौतिक शास्त्रावरील विश्वास दिवसेंदिवस वाढत चालला आहे. पण अजूनदेखील हातगुण, पायगुण, नजरेचा गुण, जिभेचा गुण, असे अकल्पित गुण आपण मानतोंच. इतर परिस्थिति तीच असतां एकाला यश यावें एकाला अपेश यावें हा भेद, असला कांहीं तरी विशेष व्यक्तिगुण मानल्याशिवाय, मनाला कसा पटेल ?

## मानसोपचारी वैद्यक

दुसरें असें कीं, मुळांत रोगाचीं कारणें भौतिक नसून, रोग हे पापाचींच फळें होत असा ज्यांचा विश्वास, त्यांना ते रोग बरे करण्याचा हटकून उपाय म्हटला म्हणजे दैवी शक्ति असें कां वाटूं नये ? हें कबूल केल्यास रोगचिकित्सेचें व औषधोपचाराचें स्थान भौतिक शास्त्रांतून निघून एकदम अध्यात्म शास्त्रांत येऊन बसतें. कमींत कमी असें समजूं कीं येशू चमत्कार करी त्यांवर त्याचा स्वतःचा विश्वास नव्हता. तरी पण भोळ्या भावानें कां होईना, " माझ्या डोक्यावर तुम्ही हात ठेवा म्हणजे मला बरें वाटेल, तुमच्या अंगावरील वस्त्राला मला स्पर्श करूं द्या म्हणजे मला बरें वाटेल, किंवा तुमची पायधूळ उचलून ती मस्तकावर ठेविल्यानें मला बरें वाटेल तरी ती थोडी द्या " अशी कोणी विनंति केल्यास, परोपकाराचें हें सोपें व्रत आचरण्याला येशूनें कां माघारें घ्यावें ? निदान त्यांत पाप तरी खास नव्हतें. अंगांतील भूतें काढण्यासंबंधींहि तीच गोष्ट समजावी. खि. पू. ४५० वर्षें होऊन गेलेला 'हिपॉक्रीटस ' यानें वैद्यकशास्त्रावर ग्रंथ लिहिला त्यांत या विषयाची बरीच चिकित्सा केली आहे. तसेंच ' विक्षिप्ताला विक्षिप्तच वश करूं शकतो.' या न्यायानें येशूनें खुळींवेडीं माणसेंहि भानावर आणलीं असल्यास तो देखील चमत्कार मानण्याचें कारण नाहीं. आणि सर्वांत शेवटली गोष्ट ही कीं, येशूनें केलेल्या कृत्यांचें

वर्णन स्वत: त्यानें आत्मचरित्रांत लिहून ठेविलेलें नाहीं ! त्याच्या चमत्कारांविषयीं भाविक लोकांनीं जर अतिशयोक्ति केली असेल तर त्यांत त्याच्याकडे दोष कसा येतो ?

## ईश्वरी राज्याचें अवतरण

ईश्वराचें राज्य अवतरणार असा येशू ख्रिस्ताचा दृढ विश्वास होता. आज थिऑसॉफिस्ट लोक नवा अवतार होणार असें मानतात, त्या बाबतींत स्वतःला भविष्यवादी समजतात, व अवताराची पूर्व तयारी म्हणून विश्वासानें कित्येक गोष्टी करा म्हणून लोकांना सांगतात. तीच गोष्ट येशूचीहि समजावी. मग हें राज्य खालीं येणार तें विद्यमान सृष्टि बुडवून नष्ट करून तिच्या जागीं येणार ? किंवा आहे हेंच जग हातीं घेऊन ईश्वर फक्त त्याची सुधारणा करणार ? जग बुडणार असें येशू सांगत असल्याचें आढळत नाहीं. जग बुडणार असें भविष्य पूर्वी इलीयास, जेरेमिया वगैरे भविष्यवाद्यांनीं केलें होतें. पण ते केवळ निराशावादी होते म्हणून ! कारण नुसतें 'जग बुडेल' हा संदेश खेदकारक भीतीप्रद ठरतो. उलट येशू ख्रिस्ताचा संदेश आशावादी होता. म्हणजे शब्दशः जग बुडो वा न बुडो, आगामी स्थिति पुण्यकारक सुखदायक व आनंदमय होणार असा उपदेश तो करीत असे. ईश्वराच्या राज्याचें मुख्य रक्षण जीवमात्रानें, प्रत्येक आत्म्यानें, स्वतःची सुधारणा व शुद्धी करणें हें होय असें येशू सांगत असे. आतां 'स्वराज्य' शब्दाच्या व्याख्या करतां करतां प्रजाजनाची आत्मतुष्टि, किंवा राज्यकर्त्यांचा दृष्टिकोण बदलणें, याहून दुसरें म्हणजे पार्थिव किंवा भौतिक स्वराज्य म्हणून कांहीं नाहीं, असें राजकीय महात्मे लोकांनीं म्हटलेलें हल्लींच्या युगांतच प्रसिद्ध आहे. ईश्वराच्या राज्याकडे पाहण्याची दृष्टि भौतिक सुखवाद्याची वेगळी व अध्यात्मसुखवाद्याची वेगळी असणारच. एकाला जें कल्पनामय वाटतें, तेंच दुसऱ्याची स्वानुभूति होऊं शकते.

## येशूचीं बोधवचनें

असो. शेवटीं हा विवेचनात्मक भाग संपवून 'नव्याकरारां'त येशूच्या तोंडचीं म्हणून जीं वचनें दिलीं आहेत त्यांच्या स्वरूपाची ओळख वाचकांना पटावी म्हणून तीं या खालीं उद्धृत करितों. त्यांव-

रून, वर केलेलें विवेचन फारसें चुकीचें नाहीं, असें वाचकाला आढळून येईल.

( १ ) जें आपलें आध्यात्मिक दैन्य जाणणारे, शोकाकुल, लीन, नीतिमत्तेचे भुकेलेले दयावंत, अंतरीं निर्मळ, शांततावादी, साधुवृत्त, सहिष्णु, क्षमाशील, तितिक्षासंपन्न असतील ते धन्य होत. त्यांनाच ईश्वरप्राप्ति होईल.

( २ ) ‘ मानुषता ’ हें पृथ्वीचें मीठ म्हणजे सत्त्व आहे. जगताचा प्रकाश आहे म्हणून मानुषतेची दिवटी पेटवून जगाला प्रकाश द्यावा. त्यांतच ईश्वराची साक्ष पटेल.

( ३ ) श्रेष्ठ प्रतीची धर्मशीलता असल्याशिवाय स्वर्गात प्रवेश होणार नाहीं.

( ४ ) वध अत्याचार वगैरे करूं नये.

( ५ ) मनुष्यानें अनृणी राहावें. त्याशिवाय मुक्तता नाहीं.

( ६ ) व्यभिचाराकडे प्रवृत्त करणारीं इंद्रियें डोळे इत्यादि वाटेल तर काढून टाकावीं पण तें पाप करूं नये. पापापेक्षां विकलांगित्व बरें.

( ७ ) सहधर्मिणी स्त्री ही आजन्म सहधर्मचारिणी मानावी. व्यभिचाराशिवाय इतर गोष्टीकरितां तिला सोडचिठ्ठी देऊं नये.

( ८ ) माणसानें शपथ वाहूं नये. शपथ वाहिल्यानें खरें अधिक खरें ठरत नाहीं किंवा खोटें कमी खोटें ठरत नाहीं. दुष्टपणाचा खोटेपणाचा हेतूच शपथ घेण्याचा मोह पाडतो.

( ९ ) अन्यायाला अन्यायानें प्रतिकार करूं नये. कोणी एका कानशिलांत चपराक मारली तर दुसरी दुसऱ्या कानशिलांत मार म्हणावें.

( १० ) कोणीं वेठीला धरून एक कोस नेईल तर आपण होऊन आणखी एक कोस जावें.

( ११ ) उसनें मागणाऱ्याला कधीं नाहीं म्हणूं नये. आपल्या शेजाऱ्यावर तर प्रेम करावेंच, पण वैऱ्यावरहि प्रेम करावें.

( १२ ) जो आपला छळ करील त्याच्या बऱ्याकरितांच उलट ईश्वरापाशीं प्रार्थना करावी.

( १३ ) आपलें धर्मकार्य गुप्तपणानें करावें. दिखाऊपणानें किंवा लोकांकडून वाहवा मिळविण्याकरितां करूं नये.

( १४ ) प्रार्थना गुप्तस्थळीं करावी व दानहि गुप्तपणें द्यावें.

( १५ ) प्रार्थना करावी ती अशा आशयाची कीं, ' ईश्वरा, तुझें नांव पवित्र मानलें जावो, तुझें राज्य पृथ्वीवर अवतरो. तुझी इच्छा असेल तसेंच घडो. आमचा योगक्षेम तूं चालीव. आमची सत्त्वपरीक्षा पाहूं नको. आम्हांला सैतानांच्या तावडींत सापडूं देऊं नको.

( १६ ) मनुष्यानें इहलोकीं धनसंचय करूं नये. धनसंचय करणें तो स्वर्गांत करावा म्हणजे दैवी संपत्तीचाच करावा.

( १७ ) दोन धन्यांची चाकरी चांगली होत नाहीं म्हणून ईश्वराची तेवढी करावी, आणि देह, संसार व लौकिक यांची सोडून द्यावी.

( १८ ) ईश्वरावर श्रद्धा ठेवून वागावें उगीच काळजी करीत बसूं नये.

( १९ ) मनुष्याच्या गरजा स्वतः त्याच्यापेक्षां ईश्वरालाच अधिक कळतात.

( २० ) आपल्या डोळ्यांतील मुसळ न पाहातां दुसऱ्याचे डोळ्यांतील कुसळ पाहून गवगवा करणें हें दांभिकपणाचें लक्षण होय. गुणदोषांचे बाबतींत आत्मौपम्य बुद्धीनेंच जगाकडे पहावें.

( २१ ) कोणाला काय द्यावें काय सांगावें याविषयीं ज्याची त्याची पात्रता पाहावी. कुपात्रीं दान किंवा कृपाप्रसाद करणें हें डुकरापुढें मोती टाकण्यासारखें आहे.

( २२ ) श्रद्धा असेल तर मागीतलें तें मिळतें, शोधलें तें सांपडतें, व बंद दारेंहि नुसत्या धक्कयानें उघडतात.

( २३ ) विनाशाकडे नेणारा दरवाजा रुंद व मार्ग मोठा असतो. सात्त्विक जीवनाकडे नेणारा दरवाजा अरुंद व मार्ग संकुचित असतो.

( २४ ) दैवी संदेश म्हणून जे सांगतात, त्याची कसून परीक्षा करावी. मनुष्य बरा वाईट हें त्याच्या कृत्यावरून ओळखावें.

( २५ ) ईश्वर दयेची अपेक्षा करितो. यज्ञयागाची करीत नाहीं.

( २६ ) उपासतापास फारसे करूं नयेत.

( २७ ) नवरदेवाच्या बरोबर जाणाराला मेजवानीच मिळावयाची. तसें ईश्वरसान्निध्याचें आहे. तो जवळ नसेल तर मग उपासच.

( २८ ) नवीन मतांना नवीन आचारच योग्य. ताजा द्राक्षासव ठेवण्याला नवा कोरा बुदलाच योग्य.

( २९ ) जगांत सद्गुण व पुण्य यांचें कापण्यासारखें पीक पुष्कळ आहे. पण कामकरीच थोडे पडतात.

( ३० ) धर्मोपदेशकाला गांठीं सोनें काय करावयाचें ?

( ३१ ) माणसानें सर्पासारखें धूर्त राहावें; पण खबूतरासारखें साळसूद असावें.

( ३२ ) न्यायसभेपुढें गेलें असतां काय बोलावें याची चिंताच करूं नये. बोलविता धनी ईश्वर असतो, तो योग्य तें बोलविलच.

( ३३ ) सदुपदेश हा गुप्तदानाप्रमाणें अंधारांत करूं नये. तो उजेडांत आणावा. त्याचे डंके चौघडे बेलाशक वाजवावे.

( ३४ ) देहाची भीति बाळगूं नये. कारण वध हा देहाचा होतो, आत्म्याचा होत नाहीं.

( ३५ ) सद्धर्मोपदेश हा शांतता लाभूं देणार नाहीं. कारण मनुष्य सत्याचा अभिमानी झाला म्हणजे तो आई, बाप, भाऊ हें ओळखीत नाहीं. सत्याकरितां घरचा वैरी झाला तरी पुरवेल.

( ३६ ) माझ्याप्रमाणें माझ्याबरोबर आपत्ति भोगण्याला जे तयार होतील, तेच माझे शिष्य होण्याला लायक ठरतील. आणि शिष्य होण्याची ज्यांची योग्यता नाहीं असे अनुयायी घेऊन काय कामाचे ?

( ३७ ) पश्चात्ताप झाला त्यानें तरट नेसून अंगाला राख फासण्यास तयार झालें पाहिजे.

( ३८ ) परोपकार व पुण्यकृत्य करण्याला कोणताच दिवस निषिद्ध नाहीं.

( ३९ ) कोणत्याहि पापाची क्षमा होऊं शकते; पण फक्त पवित्र आत्म्याविरुद्ध बोलण्याची क्षमा होत नाहीं.

( ४० ) आपण बोलतों त्या प्रत्येक शब्दाबद्दल ईश्वराजवळ आपल्याला जाब देणें आहे असें समजावें.

( ४१ ) ज्याजवळ कांहीं आहे त्यालाच ईश्वर तें आणखी देतो, व ज्याजवळ जें नाहीं तेंच ईश्वर काढून घेतो. ही देवाच्या घरची उलटी खूण समजण्याला खरें ज्ञान लागतें.

( ४२ ) चांगल्याबरोबर थोडेंबहुत वाईटहि होत असतें. त्याची चिंता

करूं नये. चांगलें पिकून कापून पदरांत घेण्याची वेळ येईल तेव्हां वाईट सहजच काढून टाकतां येईल. देवाला एक दिलें तर देव दहा देतो.

( ४३ ) ईश्वराची कृपा मिळवावयाची तर त्याकरितां इतर काय वाटेल तें द्यावें. एखाद्या शेतांत गुप्त धन पुरलेलें असलें, किंवा मोत्याच्या पुरचुंडींत एखादाच दाणा विशेष पाणीदार दिसला, तर त्यावर उडी टाकून आपण वाटेल ती किंमत त्याला देतों. तसेंच ईश्वरी कृपेचें समजावें.

( ४४ ) तोंडांतून आंत जाणारें कोणतेंच अपवित्र नाहीं. बाहेर येणारें मात्र अपवित्र खरें.

( ४५ ) मनुष्य आभाळाच्या रंगाच्या खुणा ओळखतो; पण काळाच्या रंगाच्या खुणा ओळखीत नाहीं.

( ४६ ) ' अरक्षितं ' देवबलेन रक्ष्यते । सुरक्षितं दैवबलेन नश्यति ' ।

( ४७ ) श्रद्धा असेल तर ती डोंगरहि फेकून देईल.

( ४८ ) ठेंगण्या दारांतून प्रवेश करतांना वांकलेंच पाहिजे. नाहीं तर डोकें सडकतें. त्याप्रमाणें स्वर्गांत प्रवेश हवा तर जीवानें बालकासारखें नम्रच झालें पाहिजे.

( ४९ ) सन्मार्गावर असणाऱ्या मेंढरांना वळायला नको, भटकणारें मेंढरूंच काय तें वळवून आणलें पाहिजे.

( ५० ) जितेंद्रियाला स्वर्ग मिळेल; पण सर्वांनाच जितेंद्रिय असें राहतां येणार नाहीं. म्हणून त्यांनीं अन्य योग्य तो मार्ग स्वीकारावा.

( ५१ ) धनवानाचा प्रवेश स्वर्गाच्या राज्यांत होणें कठीण आहे.

( ५२ ) ईश्वराच्या राज्यांतला उलटा क्रम आहे. शेवटल्याला पहिला नंबर मिळतो, व पहिल्याला शेवटचा नंबर मिळतो.

( ५३ ) श्रेष्ठ होऊं इच्छिणारानें आधीं कनिष्ठ झालें पाहिजे.

( ५४ ) गवंडी निकामी म्हणून जो दगड फेकून देतात तोच कित्येक वेळां देव म्हणून गाभाऱ्यांत पूजला जातो.

( ५५ ) दगडावर आपण आपटलेलें बरें; पण आपणावर दगड आपटेल असें करूं नये. तें फार वाईट.

( ५६ ) या जगांत ज्याचें देणें तें त्याला द्यावें. देवाचें देवाला द्यावें, राजाचें राजाला द्यावें.

( ५७ ) देव हा मृतांचा आहे असें समजतात तें चूक. तर तो खरोखर जिवंतांचा देव आहे.

( ५८ ) भांडें आंतून घासावें. बाहेरून एक वेळ न घासलें तरी चालेल.

( ५९ ) घरधनी चुकून घरीं आला असतां नोकर आपलें काम योग्यपणें करीत आहे असें त्याला आढळलें तरच तो सेवक भाग्यवान्. त्याप्रमाणें ईश्वराच्या तगाद्याशिवाय माणसानें सत्कर्म करीत राहिलें पाहिजे.

( ६० ) गौरीहर पूजावयाचा तर नवरीनें झोंपी जातां कामा नये. कारण नवऱ्याची मिरवणूक दाराशीं केव्हां येऊन थबकेल हें कोण सांगेल ?

( ६१ ) ईश्वराच्या घरचें राज्य हें गरिबांचें आहे, श्रीमंतांचें नाहीं. मुलांचें आहे, थोरांचें नाहीं.

---

## ३६ काव्यालोचन

( लें० द. के. केळकर, बी. ए. हिंदु हायस्कूल, पांचगणी. )

( लेखांक पहिला )

प्रस्तुत पुस्तक हें ' विजयसाहित्य ' ग्रंथमालेचें नववें पुष्प होय. त्यांतील कांहीं विषय पूर्वी ' केसरी ', ' विविध–ज्ञानविस्तार ' व ' रत्नाकर ' यांतून प्रसिद्ध झालेला होता. परंतु इतर कोठें न छापलेला असाहि बराच भाग हल्लीं प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत प्रथमच आलेला आहे. यामुळें पुस्तक जुनें न वाटतां त्याचा नवीनपणा कायम राहिला आहे. शिवाय समग्र पुस्तक वाचल्यानें त्यांतील विषयासंबंधानें समर्पक बोध होऊन लेखकाचें हृद्गत कळतें तसें, निरनिराळ्या वेळीं प्रसिद्ध झालेल्या लेखांवरून केव्हांहि होऊं शकलें नसतें हें अगदीं उघड आहे. या पुस्तकाविषयीं प्रथमच सूत्ररूपानें आमचा अभिप्राय सांगावयाचा तर तो असा कीं " वाङ्मयविषयक टीके " संबंधानें एवढा मोठा, इतका समर्पक व इतक्या सहृदयतेनें लिहिलेला मराठींतील हा पहिलाच ग्रंथ होय. वाईट इतकेंच वाटतें कीं अशा सुंदर पुस्तकाचें बाह्यांग असावें तसें चांगलें नाहीं. ग्रंथलेखक व ग्रंथप्रकाशक ही व्यक्ति एकच असली म्हणजे बाह्यांगाची अशी हेळसांड होते नाहीं. पण लक्ष्मी सरस्वती यांचें वैर संपेल तेव्हांच ग्रंथलेखकांना स्वतःची

पुस्तकें स्वतःच्या खर्चानें छापून काढतां येतील, व मग 'मूल एक आणि आया दोन' असें झाल्यानें हल्लींसारख्या पुस्तकाच्या सजावटींत सावत्र भावनेचा जो निष्काळजीपणा दिसतो तसा दिसून येणार नाहीं. मात्र समाधान असें वाटतें कीं हें पुस्तक जो वाचील त्याच्या मनांत शेवटचा ठसा त्याच्या गरिबीच्या बाह्यांगाविषयीं न राहतां आंतील विद्वत्तापूर्ण व मार्मिक अशा शास्त्रीय विवेचनाचाच राहील.

या ग्रंथाच्या नांवासंबंधानें हें सांगणें अवश्य आहे कीं, त्याच्या सूत्र-रूप संक्षेपानें वाचकाचा प्रथम गैरसमज होण्याचा संभव आहे. निदान ग्रंथाचें नुसतेंच नांव ज्याच्या डोळ्यापुढें येईल त्याची तर दिशाभूल हटकून होईल. कारण 'काव्यालोचन' या शब्दावरून हें एखाद्या विवक्षित काव्याचें किंवा फार तर एखाद्या काव्यसमूहाचें परीक्षणात्मक आलोचन असावें असें वाटतें. पण वस्तुत: तशी गोष्ट नाहीं. तर काव्यासंबंधीं अनेक ग्रंथांचा परामर्ष घेऊन त्या शास्त्रासंबंधानें विचारपूर्वक ठरविलेले सिद्धांत या पुस्तकांत आढळ-तील. इंग्रजी भाषेंतील कांहीं पुस्तकांप्रमाणें याला "A book about books about books" असें म्हणतां येईल. म्हणजे कोणत्याहि विवक्षित काव्य-ग्रंथापासून हें पुस्तक तिसऱ्या पिढीइतकें दूर आहे असें म्हणतां येईल. आणि खरोखर नक्की मोजदाद केली तर या पुस्तकांत मराठी संस्कृत व इंग्रजी या भाषांतील जितक्या प्रत्यक्ष काव्यग्रंथांच्या नांवाची गणना होईल तिज-पेक्षां, या तीनहि भाषांतील मिळून काव्यावरील टीकाग्रंथ हेच गणनेंत अधिक भरतील. काव्यशास्त्रालोचनाला इंग्रजींत 'Literary criticism' असा प्रतिशब्द मानतां येईल व प्रस्तुतचें पुस्तक हें या दोहोंपैकीं कोणा-चेंहि उदाहरण आहे असें म्हटलें तरी चालेल.

'क्रिटिसिझम' या शब्दाला मराठींतील टीका या शब्दापेक्षां अधिक खोल व व्यापक अर्थ आहे. संस्कृतांत टीका या शब्दाचा सामान्य अर्थ केवळ अर्थस्पष्टीकरणार्थ विवेचन इतकाच होतो. टीका, मग ती कोणत्याहि ग्रंथावर असो, ती गुणदोषविवेचनात्मक असलेली संस्कृतांत प्रायः सांपडणारच नाहीं. टीकाकार अन्वय लावील, अर्थ देईल, अभि-प्राय फुगवून सांगेल, आपल्या व्याकरण-साहित्यशास्त्रादिकांच्या ज्ञानाचें प्रदर्शन अस्थानींहि करील, आणि जो अर्थ कदाचित् मूळ ग्रंथकाराच्या मनांत नाहीं तोहि स्वतःच्या मनानें किंवा बुद्धिबलाच्या जोरावर बसवून

दाखवील. पण हें सर्व करीत असतां मूळ ग्रंथकारासंबंधानें त्याची पूज्यबुद्धि इतकी असते कीं, पुस्तकांत कोठें दोष असेल असें तो मनांत कधींहि वागविणार नाहीं, गुणपरमाणूचा पर्वत करील, व 'एकोहि दोषो गुणसंनिपाते निमज्जतींदोः किरणेष्विवांकः' या मार्मिक कविवचनांतील तत्त्व प्रामाण्यबुद्धीशीं विरोधक वाटल्यानें, तो आपला टीकाविषयक ग्रंथ हा निष्कलंक चंद्र असेंच मानील. तात्पर्य, प्रामाण्यबुद्धीच्या अतिरेकामुळें संस्कृतांत गुणदोषदर्शक अशी टीका सांपडणार नाहीं.

पुढें मराठींत टीका या शब्दाचा अर्थ अधिक विस्तृत झाला. पण तो इतक्या उलटया दिशेला वाहवला कीं, टीका म्हणजे प्रायः कुत्सित बुद्धीनें केलेलें दोषैकदृष्ट विवेचन असा त्या शब्दाला विपरीत अर्थ येऊन बसला आहे. मराठींत दोषप्रदर्शनापेक्षां एकाद्या ग्रंथाचें गुणग्रहणच अधिक असेल तेव्हां, वाचकांची विपरीत कल्पना कदाचित् होईल ती न व्हावी म्हणून, तो आपल्या लेखाला टीका हा शब्द न लावतां अनुकूलतादर्शक असा म्हणजे परीक्षण, आलोचन, समालोचन असला कांहींतरी सौम्य शब्द लावील. असें करतांना तो मुख्य खबरदारी ही घेतो कीं, "मीं दोष न दाखविण्याची शपथ वाहिलेली नाहीं किंवा मी योग्य असतील ते दोष दाखवीनही; पण माझा कल दोष दाखविण्यापेक्षां गुण घेण्याकडेच अधिक आहे." पण लिटररी क्रिटिसिझम् हा शब्द उच्चारला म्हणजे कोणताहि एक किंवा अनेक मूलभूत वाङ्मय ग्रंथ डोळ्यापुढें येत नाहींत; किंवा विवक्षित ग्रंथांवरील विवक्षित टीकाहि लक्षांत येत नाहीं. तर वाङ्मयशास्त्र व वाङ्मयपरीक्षणशास्त्र अशा दोन शास्त्रांचा बोध मनाला होतो.

प्रस्तुत पुस्तक हें या दोन्ही शास्त्रांचा परामर्ष घेणारें आहे; पण त्याच्या नांवांत फक्त 'काव्य' हा एकच शब्द आलेला आहे, शास्त्र हा शब्द-आलेला नाहीं, म्हणून त्याला 'काव्यालोचन' यापेक्षां 'काव्यशास्त्रालोचन' असें नांव दिलें असतें तर आंतील विषयाचा बोध अधिक बिनचूक झाला असता. हा विषय स्वतः ग्रंथकारानें ११ व्या प्रकरणांत विवेचिला आहे. वर टीका या शब्दाचे संस्कृतांतील व मराठींतील रूढार्थ यांतील भेद आम्हीं दाखविला तसा ग्रंथकारानें दाखविलेला नाहीं. फक्त 'टीका' या शब्दाचा मराठींतील रूढार्थ तेवढाच घेऊन, त्यानें कवि व टीकाकार

पुस्तकें स्वतःच्या खर्चानें छापून काढतां येतील, व मग ' मूल एक आणि आया दोन ' असें झाल्यानें हल्लींसारख्या पुस्तकाच्या सजावटींत सावत्र भावनेचा जो निष्काळजीपणा दिसतो तसा दिसून येणार नाहीं. मात्र समाधान असें वाटतें कीं हें पुस्तक जो वाचील त्याच्या मनांत शेवटचा ठसा त्याच्या गरिबीच्या बाह्यांगाविषयीं न राहतां आंतील विद्वत्तापूर्ण व मार्मिक अशा शास्त्रीय विवेचनाचाच राहील.

या ग्रंथाच्या नांवासंबंधानें हें सांगणें अवश्य आहे कीं, त्याच्या सूत्र-रूप संक्षेपानें वाचकाचा प्रथम गैरसमज होण्याचा संभव आहे. निदान ग्रंथाचें नुसतेंच नांव ज्याच्या डोळ्यापुढें येईल त्याची तर दिशाभूल हटकून होईल. कारण 'काव्यालोचन' या शब्दावरून हें एखाद्या विवक्षित काव्याचें किंवा फार तर एखाद्या काव्यसमूहाचें परीक्षणात्मक आलोचन असावें असें वाटतें. पण वस्तुत: तशी गोष्ट नाहीं. तर काव्यासंबंधीं अनेक ग्रंथांचा परामर्ष घेऊन त्या शास्त्रासंबंधानें विचारपूर्वक ठरविलेले सिद्धांत या पुस्तकांत आढळतील. इंग्रजी भाषेंतील कांहीं पुस्तकांप्रमाणें याला " A book about books about books " असें म्हणतां येईल. म्हणजे कोणत्याहि विवक्षित काव्य-ग्रंथापासून हें पुस्तक तिसऱ्या पिढीइतकें दूर आहे असें म्हणतां येईल. आणि खरोखर नक्की मोजदाद केली तर या पुस्तकांत मराठी संस्कृत व इंग्रजी या भाषांतील जितक्या प्रत्यक्ष काव्यग्रंथांच्या नांवाची गणना होईल तिज-पेक्षां, या तीनहि भाषांतील मिळून काव्यावरील टीकाग्रंथ हेच गणनेंत अधिक भरतील. काव्यशास्त्रालोचनाला इंग्रजींत ' Literary criticism ' असा प्रतिशब्द मानतां येईल व प्रस्तुतचें पुस्तक हें या दोहोंपैकीं कोणा-चेंहि उदाहरण आहे असें म्हटलें तरी चालेल.

' क्रिटिसिझम ' या शब्दाला मराठींतील टीका या शब्दापेक्षां अधिक खोल व व्यापक अर्थ आहे. संस्कृतांत टीका या शब्दाचा सामान्य अर्थ केवळ अर्थस्पष्टीकरणार्थ विवेचन इतकाच होतो. टीका, मग ती कोणत्याहि ग्रंथावर असो, ती गुणदोषविवेचनात्मक असलेली संस्कृतांत प्रायः सांपडणारच नाहीं. टीकाकार अन्वय लावील, अर्थ देईल, अभि-प्राय फुगवून सांगेल, आपल्या व्याकरण—साहित्यशास्त्रादिकांच्या ज्ञानाचें प्रदर्शन अस्थानींहि करील, आणि जो अर्थ कदाचित् मूळ ग्रंथकाराच्या मनांत नाहीं तोहि स्वतःच्या मनानें किंवा बुद्धिबलाच्या जोरावर बसवून

दाखवील. पण हें सर्व करीत असतां मूळ ग्रंथकारासंबंधानें त्याची पूज्य-बुद्धि इतकी असते कीं, पुस्तकांत कोठें दोष असेल असें तो मनांत कधींहि वागविणार नाहीं, गुणपरमाणूचा पर्वत करील, व 'एकोहि दोषो गुणसंनिपाते निमज्जतींदोः किरणेष्विवांकः' या मार्मिक कविवचनांतील तत्त्व प्रामाण्यबुद्धीशीं विरोधक वाटल्यानें, तो आपला टीकाविषयक ग्रंथ हा निष्कलंक चंद्र असेंच मानील. तात्पर्य, प्रामाण्यबुद्धीच्या अतिरेकामुळें संस्कृतांत गुणदोषदर्शक अशी टीका सांपडणार नाहीं.

पुढें मराठींत टीका या शब्दाचा अर्थ अधिक विस्तृत झाला. पण तो इतक्या उलटया दिशेला वाहवला कीं, टीका म्हणजे प्रायः कुत्सित बुद्धीनें केलेलें दोषैकदृष्ट विवेचन असा त्या शब्दाला विपरीत अर्थ येऊन बसला आहे. मराठींत दोषप्रदर्शनापेक्षां एकाद्या ग्रंथाचें गुण-ग्रहणच अधिक असेल तेव्हां, वाचकांची विपरीत कल्पना कदाचित् होईल ती न व्हावी म्हणून, तो आपल्या लेखाला टीका हा शब्द न लावतां अनुकूलतादर्शक असा म्हणजे परीक्षण, आलोचन, समालोचन असला कांहींतरी सौम्य शब्द लावील. असें करतांना तो मुख्य खबरदारी ही घेतो कीं, "मीं दोष न दाखविण्याची शपथ वाहिलेली नाहीं किंवा मी योग्य असतील ते दोष दाखवीनही; पण माझा कल दोष दाखविण्यापेक्षां गुण घेण्याकडेच अधिक आहे." पण लिटररी क्रिटिसिझम् हा शब्द उच्चारला म्हणजे कोणताहि एक किंवा अनेक मूलभूत वाङ्मय ग्रंथ डोळ्यापुढें येत नाहींत; किंवा विवक्षित ग्रंथांवरील विवक्षित टीकाहि लक्षांत येत नाहीं. तर वाङ्मयशास्त्र व वाङ्मयपरीक्षणशास्त्र अशा दोन शास्त्रांचा बोध मनाला होतो.

प्रस्तुत पुस्तक हें या दोन्ही शास्त्रांचा परामर्ष घेणारें आहे; पण त्याच्या नांवांत फक्त 'काव्य' हा एकच शब्द आलेला आहे, शास्त्र हा शब्द-आलेला नाहीं, म्हणून त्याला 'काव्यालोचन' यापेक्षां 'काव्यशास्त्रालोचन' असें नांव दिलें असतें तर आंतील विषयाचा बोध अधिक बिनचूक झाला असता. हा विषय स्वतः ग्रंथकारानें ११ व्या प्रकरणांत विवेचिला आहे. वर टीका या शब्दाचे संस्कृतांतील व मराठींतील रूढार्थ यांतील भेद आम्हीं दाखविला तसा ग्रंथकारानें दाखविलेला नाहीं. फक्त 'टीका' या शब्दाचा मराठींतील रूढार्थ तेवढाच घेऊन, त्यानें कवि व टीकाकार

यांच्यांतील अहिनकुलवत वैरसंबंधाचें सुरस वर्णन केलें आहे, त्यांत मराठी, इंग्रजी व संस्कृत या तीनहि भाषांतील टीकाकारांचीं उदाहरणें देऊन हें कविटीकाकार–युद्ध असेंच नेहमीं चालावयाचें असेंहि दर्शविलें आहे. पण लगेच तत्त्वज्ञानांत शिरून, त्यानें या युद्धाचें कारण ग्राम्य अनादर-बुद्धि किंवा मत्सर एवढेंच नसून इतरहि कांहीं खोल असूं शकतें असें सांगितलें आहे.

पैकीं एक कारण " काव्यकलेचे नियम त्रिकालाबाधित असतात अशी मनाची समजूत टीकाकारानें करून घेणें " हें होय. ही चूक सुप्रसिद्ध इंग्रजी कवि–चरित्रकार डॉ. जॉनसन यानें केलेली प्रसिद्ध आहे. आपल्या इकडील पंडित कवींनीं संतकवींवर आक्षेप घेतले ते याच कारणानें. मराठींतील जुन्या कवींचे अभिमानी नव्या कवींवर, आणि नव्या कवींचे अभिमानी जुन्या कवींवर आक्षेप घेतात त्याचेंहि हेंच कारण. तात्पर्य, गुणांची कल्पना ठराविक किंवा दोषांची कल्पना ठराविक असें झाल्यामुळें खरी निर्लेप टीका होत नाहीं. पण हा गुणदोषविवेचनाचा विचार मुख्य न मानतां, कवींच्या काव्यांचें मर्म सहृदयतेनें व सूक्ष्म अभ्यासानें ठरवून घेऊन जें विवेचन होतें तेंच खरें काव्यशास्त्रबीज होय. हें बीज जितक्या अधिक संस्कारांनीं शुद्ध होईल तितकें त्याला फळ चांगलें येईल. म्हणून संस्कार अनेक व विविध झाले पाहिजेत. आणि असे संस्कार होण्याला परामृष्ट वाङ्मयग्रंथांची संख्या पुष्कळ व त्यांचे प्रकार विविध असावे लागतात. अशा रीतीनें, म्हणजे इंग्रजींत ज्याला इंडक्टिव्ह ( विशेषापासून सामान्याकडे जाण्याची ) तर्कपद्धति म्हणतात त्या पद्धतीनें काव्यशास्त्र बनविण्याचा एक व मुख्य प्रकार आहे.

ही विषयस्पर्शी (ऑब्जेटिव्ह) पद्धति स्वीकारली म्हणजे काव्यवस्तूंकडे गुणदोषविवेचनाच्या दृष्टीनें न पाहातां आहे तेंच घेऊन त्यावरून फक्त सामान्य नियम बनविण्याची मनाची तयारी होते. प्रस्तुत ग्रंथकारानें म्हटल्याप्रमाणें " कोणत्याहि काव्यांतील गुण किंवा दोष यांजकडे आदरणीय किंवा अनादरणीय अशा दृष्टीनें न पाहतां फक्त अपरिहार्य अशा विशिष्ट व्यक्तिगत प्रतिभेचीं तीं उदाहरणें " इतकेंच तो मानतो. उदाहरणार्थ, गंधकाचा उग्र वास हा दोष न मानतां तो फक्त त्या पदार्थाचा सहज धर्म मानावयाचा, आणि त्याची जरूर असेल तेथें त्याचा औषध म्हणून उपयोग

करावयाचा; किंवा प्राचीन काव्यांत अपाणिनीय शब्दप्रयोग आढळल्यास ती चूक असें न म्हणतां त्याला नुसते आर्ष प्रयोग या सदराखालीं घालावयाचे.

पण इंडक्टिव्ह शास्त्राप्रमाणें डिडक्टिव्ह ( म्हणजे सामान्याकडून विशेषाकडे जाण्याचेंहि एक ) शास्त्र असतें, व या प्रकारच्या वाङ्मय टीकाशास्त्राचे कांहीं नियम अपरिहार्य किंवा त्रिकालाबाधित असें समजून ते लावून केलेलें विवेचन हेंहि काव्यशास्त्रांत समाविष्ट होतें. प्रस्तुत ग्रंथांतच काव्याचा आनंद, काव्यविषयक सदभिरुची, काव्यध्येय, काव्यांतील सत्य वगैरे उपविषयांच्या विवेचनांत ग्रंथकारानें जे नियम अनुसरले आहेत किंवा सिद्धांत काढले आहेत, त्यांतील कांहीं दुसऱ्याच्या आधारावर दिलेले असले तरी कांहीं त्यानें स्वतःच्या अंतरंगांतून काढलेले आहेत. काव्याच्या अंगापैकीं अलंकाराचें शास्त्र हें पुष्कळसें इंडक्टिव्ह म्हणजे विषयनिष्ठ शास्त्राचें उदाहरण होईल. पण रसांचें विवेचन हें डिडक्टिव्ह म्हणजे आत्मनिष्ठ काव्यशास्त्राचें उदाहरण म्हणतां येईल.

प्रस्तुत पुस्तकांत या दोनहि प्रकारच्या शास्त्रांचा विचार केलेला आहे. पण ग्रंथकाराचा खरा उद्देश किंवा मनोभूमिका सांगावयाची तर ती अशी:-- " पौर्वात्य व पाश्चात्य काव्यशास्त्राच्या संगमावर उभें राहिलें असतां उदयोन्मुख मराठी काव्यानें या दोन वाङ्मयरूप तेजःप्रवाहांतील कोणकोणत्या रंगछटांचें मिश्रण करावें म्हणजे तें रमणीय दिसेल " हें या काव्यालोचनांत आहे. तसेंच प्रतिभा ही दैवी शक्ति, किंवा मेंदूची विकृति, नसून फक्त उज्ज्वल कल्पनाशक्ति आहे. काव्याचें मुख्य नियामक तत्त्व रस हेंच असून फक्त कांहीं प्रकारच्या भावनेला सरस ही पदवी यथार्थतेनें लावितां येते. करुण रसास्वादानेंहि आनंद उत्पन्न होतो तो कसा व काय म्हणून ? अलंकाराचें अलंकारत्व कशांत आहे ? परकीय अलंकार स्वीकारतांना त्याजवर कोणता संस्कार करणें इष्ट ? काव्यांतील सत्य म्हणजे काय ? व नुसत्या सत्यानें काम न भागतां काव्य हें आल्हादजनकहि कां झालें पाहिजे ? काव्यादि वाङ्मय लिहिणारावर सामाजिक व नैतिक जबाबदारी आहे कीं नाहीं ? आणि काव्यशास्त्र व तत्त्वज्ञान हीं परस्परविरोधी आहेत कीं परस्पर पोषक होऊं शकतात ? इत्यादि गोष्टींची मार्मिक चिकित्सा या

पुस्तकांत केलेली आहे. म्हणून पुढील लेखांत यांतील कांहीं मुद्दे घेऊन त्यांची चिकित्सा करण्यांत येईल.

---

## काव्यालोचन

( लेखांक दुसरा )

प्रस्तुत पुस्तकांत त्याच्या लेखकानें प्रथम मराठी, संस्कृत व इंग्रजी या तीनहि भाषांतील काव्यशास्त्रांचा परिचय करून घेऊन, नंतर आपले शास्त्रीय सिद्धांत मांडण्याला सुरूवात केली आहे. यांपैकीं कोणत्याहि एका शास्त्राचा अनुवाद असा त्यानें केलेला नाहीं फक्त आपल्या सिद्धांताला साधकबाधक गोष्टी या शास्त्रांतून कोणत्या आढळतात हें पाहून त्या त्या गोष्टींचा यथोचित उपयोग त्यानें केला आहे. यांपैकीं मराठी भाषेंत काव्य-शास्त्र असें नाहीं म्हटलें तरी चालेल. तुकारामाखेरीज बाकीचे बहुतेक कवी मूळचे संस्कृत पंडित होते. पण सभोंवारची जनता लक्षांत घेतां, त्यांची कीर्तिविषयीची लालसा किंवा कर्तव्यबुद्धीचें समाधान संस्कृत पंडित-गिरीनें होण्यासारखें नव्हतें. म्हणून ज्ञानेश्वरांनीं घालून दिलेला मराठी काव्यरचनेचा पायंडा त्यांनीं गिरविला; तथापि काव्यविषयक शास्त्रीय कल्पना त्यांच्या डोक्यांत असतील त्या त्यांनीं संस्कृत ग्रंथांतून घेतलेल्या होत्या. पण मराठी काव्याला असें महत्त्व आलें नव्हतें कीं, त्यांचा आधार काव्यशास्त्रविवेचनाला कोणाहि चिकित्सकानें घ्यावा. हल्लीं मराठी गद्य व पद्य हीं इतकीं फैलावलीं आहेत, व नामांकितहि झालीं आहेत, कीं एकाद्या शास्त्रीय ग्रंथकारानें या गद्यपद्यांतील उदाहरणेंच हुडकून काढून तीं द्यावयाचें मनांत आणलें असतां त्याला मुळींच वाण पडणार नाहीं. आणि वृत्त अलंकारादि बाह्यांगेंच काय पण रस, औचित्यचर्चा, काव्यानंद, काव्यध्येय इत्यादि काव्याच्या आध्यत्मिक किंवा आंतरंगिक विषयांची चर्चा मराठी गद्यपद्यांतील उदाहरणें देऊन करतां येण्यासारखी आहे. मराठी जुन्या काव्याकडे तत्कालीनांचीहि दृष्टि उदारपणाच्या उपेक्षेची होती. उघड रीतीनें तिचा आदर किंवा गुणग्रहण करण्याची नव्हती.

## संस्कृत पंडितांचें मराठीविषयीं दाक्षिण्य

श्रीमंतानें गरिबाला किंवा उच्चवर्णीयानें हीन वर्णीयाला घरांतल्या इतर माणसांप्रमाणें एक माणूस म्हणून वागवून घेण्यांत जें फक्त दाक्षिण्य असतें तेंच संस्कृत पंडितांनीं मराठीविषयीं दाखविलें. परक्या मनुष्याला घरच्या मनुष्याची ओळख करून देण्याची वेळ आली असतां दरिद्री नातलग किंवा हीनवर्णीय शागीर्द यांना जरी दाराबाहेर घालवून देण्यांत येत नाहीं तरी करांगुलीनें किंवा नामोच्चारानें स्वकीय असा त्यांचा निर्देशहि पण होत नाहीं. मग कुटुंबवृक्ष रंगवावयाची किंवा वर्णावयाची वेळ आली असतां हीं माणसें वगळलीं जावयाचीं हें उघड आहे. याच रीतीनें काव्यशास्त्र चर्चेंत मराठी कवी व काव्य यांचे उल्लेख, आधार म्हणून तर नव्हेच पण उदाहरणें म्हणूनहि कोणी केलेले आढळत नाहीं. बरें या मध्ययुगीन कालांत इकडे काव्यशास्त्र चर्चा होत नव्हती असें मात्र नाहीं. कारण मंमट, विश्वनाथ, अप्पाय्या दीक्षित, जगन्नाथ इत्यादि काव्यशास्त्राचे आचार्य याच कालांत होऊन गेले. स्वतः ज्ञानेश्वरापासून रामदासापर्यंत संत कवींनीं आपापल्या ग्रंथांतून शारदास्तवनाच्या रूपानें किंवा वागीश्वरी-वंदनाच्या प्रसंगीं काव्याचें महत्त्व परोपरीनें वर्णिलें आहे. रामदासांनीं तर कवित्व कसें असावें व कवित्व कसें नसावें याविषयीं थोडक्यांत पुष्कळच छाननी केली आहे. परंतु दैवी म्हणून मानलेल्या काव्यप्रतिभेच्या चरणीं वाहिलेला तो करभार होय. त्याला काव्यशास्त्राची चर्चा म्हणतां येणार नाहीं.

## मुलांपेक्षां नातवंडांवर अधिक प्रेम

तात्पर्य, वेदांत विषयावरचे गंभीर काव्यग्रंथ, पुराणेतिहासविषयक वर्णनपर रसालंकारविशिष्ट ग्रंथ, व लावण्या पोवाडे यासारखे सामान्य जनतेच्या अंतरंगांत शिरून काव्यरस ओतणारे ग्राम्यकाव्य ग्रंथ अशा तऱ्हेची विविध व प्रचुर काव्यसंपत्ति मराठींत असतां तिचा उपयोग काव्यशास्त्रलेखनाकडे करून घेणारे मराठी ग्रंथकार निर्माण झाले नाहींत. यामुळें या नव्या युगांत मराठीमध्यें लिहिणारा कोणी काव्यशास्त्र ग्रंथकार निघाला तर, आधारभूत ग्रंथांच्या दृष्टीनें त्याला मराठी काव्यग्रंथांवरून उडी मारून संस्कृत काव्यशास्त्र ग्रंथांकडे एकदम धांव घ्यावी लागते. संस्कृत काव्यशास्त्राची सामुग्री मात्र आपणास भरपूर उपलब्ध आहे, व

ती सुमारें दोन हजार वर्षांवर वांटली गेलेली आहे. आणि बहुधा असें म्हणतां येईल कीं, काव्यशास्त्रविषयाचें असें एकहि अंग नाहीं कीं, ज्यावर या अवधींतील साहित्याचार्यांनीं कांहींना कांहीं तरी लिहिलेलें नाहीं. एकाद्या कुटुंबांत आजा कर्तृत्ववान व द्रव्यार्जनाच्या कामीं यशस्वी होऊन जातो, पण त्याचें आपल्या मुलांपेक्षां आपल्या नातवंडांवर अधिक प्रेम असतें, व आपली जिनगी नातवांच्या उपयोगी पडावी म्हणून तो ती त्यांच्याकरितां म्हणून राखून ठेवितो. आधुनिक मराठी काव्यशास्त्र-चिकित्सकांना हें जुनें वाङ्मय अशा रीतीनें उपयोगी पडत आहे. मराठी काव्यशास्त्र ग्रंथ लिहितांना संस्कृत साहित्य वाङ्मयांतले सिद्धांत व तात्त्विक चर्चा ही तर उपयोगी पडतेच, पण त्यांतील परिभाषा ही तर बिनमोलच ठरते. किंबहुना या परिभाषेच्या साहाय्याशिवाय साहित्य चर्चेचा ग्रंथ लिहिणें निव्वळ मराठी भाषेवर अवलंबून राहाणाराला अशक्यप्राय आहे. त्याहून सूक्ष्म उपयोग हा कीं, अशा लेखकाला इंग्रजी भाषेंतील काव्य-शास्त्र वाचीत असतां अनेक नवीन गोष्टी सुचतात. पण त्या व्यक्त कर-ण्याला समानार्थक अशी संस्कृत परिभाषा हाताशीं न मिळती तर मोठा कठीण प्रसंगच होता.

तिसरें साधन पाश्चात्य काव्यशास्त्राचें. इतर खात्यांतलें इंग्रजी वाङ्मय जसें प्रचंड तसेंच या शास्त्रांतलेंहि आहे. आमच्या इकडे बुद्धीची तीक्ष्णता कमी नाहीं. संस्कृत काव्यशास्त्रांतहि पृथक्करणाचा अतिरेक इतका झाला आहे कीं, नुसता एकेक अलंकार घेतला तर त्याचे शेंकडों भेद करून दाखविण्यांत येतात. विश्वनाथ या लेखकानें ध्वनिभेदांची संख्या ५३०४ अशी सांगितली आहे. व मंमटानें ती संख्या पुनः दुप्पट केली आहे. पण इंग्रजींत एकटा शास्त्रकार इतकें सूक्ष्म पाहणारा न मिळाला तरी निरनिराळ्या ग्रंथलेखकांची संख्या शेकड्यांनीं भरेल. काव्यालोचनकर्तें म्हणतात त्याप्रमाणें "केंब्रिज विद्यापीठानें प्रसिद्ध केलेल्या नुसत्या इंग्रजी वाङ्मयाच्या इतिहासाचेंच लिखाण महाराष्ट्र ज्ञानकोशाएवढें भरेल. आणि नुसत्या शेक्सपियरवरील टीकाग्रंथांना एक सबंध कपाट पुरणार नाहीं." तें कसेंहि असो. आधुनिक काव्यशास्त्रचर्चा करणाराला या तीनहि भाषांतील ग्रंथभांडार उपलब्ध आहे. व या एकाच विषयाचा कोणीं जन्मभर व्यासंग केला तरी तो संपणारा नाहीं. शास्त्रविचारांत शिरलें

म्हणजे भाषा ही गौण ठरते व तत्त्वज्ञान हें मुख्य ठरतें. आणि त्यांतूनहि जो कोणी तुलनात्मक पद्धतीनें लेख लिहूं पाहतो त्याला हीं तीनहि शास्त्रें म्हणजे घरांतल्या एकाच किल्लीनें उघडणाऱ्या एकाच कपाटांतले तीन खण असे सहजच वाटतात. या तीन खणांत ठेवलेल्या संपत्तीचे प्रकार स्वरूपतः वेगवेगळे असतील. परंतु स्वरूप वेगळें झालें तरी उपयोगाच्या दृष्टीनें प्रतीत होणारा त्यांचा आत्मा एकच होय असें अनुभवास येतें.

स्वतः काव्यालोचनकारांनीं या तीनहि भाषेंतील मुख्य मुख्य ग्रंथांचा चांगला अभ्यास केला असावा हें, मधून मधून त्यांनीं जे संदर्भ किंवा आधार दिले आहेत किंवा अवतरणें घेतलीं आहेत त्यावरून दिसून येतें. परंतु अंतिम सिद्धांत मांडतांना त्यानें कोणाहि एका ग्रंथकाराचें किंवा संप्रदायाचें अनुयायित्व स्वीकारलेलें नसून स्वतःचे सिद्धांत स्वतंत्र बुद्धीनें मांडले आहेत.

मागील लेखांत सांगितल्याप्रमाणें प्रस्तुत ग्रंथांत विशिष्ट काव्यग्रंथाची गुणदोष चिकित्सा नाहीं. तर काव्यग्रंथ—परीक्षण करावयाचें असल्यास तें करताना कोणत्या गोष्टी लक्षांत ठेवाव्या हें शिकविण्याचा काव्यालोचन-कारांचा हेतु दिसतो. एखाद्या ट्रेनिंग कॉलेजमध्यें शिक्षण हाच मुळीं शिक्षणाचा विषय असतो. आणि अशा ट्रेनिंग कॉलेजाला प्राथमिक शाळा जोडलेली असली तरी तिचा हेतु, त्या शाळेंतील विद्यार्थ्यांना इतर ठिकाणीं शिक्षण मिळत नाहीं म्हणून तें मिळवून देण्याची सोय करावी असा नसून शाळेचा उपयोग आपल्या कामांत प्रयोग—शाळेसारखा करण्याचा असतो. रसायनशास्त्र शिकविणाराला जशी रसायन—प्रयोगशाळा, किंवा ज्योतिर्गणित शिकविणाऱ्या शाळेंत जशी वेधशाळा तशी शिक्षण हाच विषय शिकविण्याकरितां ही प्राथमिक शाळा असते. ट्रेनिंग कॉलेजांत प्रथम वरिष्ठ शिक्षक हे भावी शिक्षक होऊं घातलेल्या विद्यार्थ्यांना, मानस-शास्त्रादि विषय शिकवितात व शिक्षण विषयाचीं मूलतत्त्वें शिकवितात; आणि नंतर ते प्रौढ विद्यार्थी त्या प्राथमिक शाळेंत जाऊन आपल्या शिक्ष-कांदेखत अल्पवयी मुलांना इयत्तांचे धडे शिकवितात. त्याचप्रमाणें काव्य-शास्त्रकार हा काव्यचिकित्सा करणाराला सामान्य तत्त्वें शिकवील पण एखाद्या विवक्षित काव्य ग्रंथाला तीं तत्त्वें लावून तपशिलाची टीका करणें हें काम स्वतः टीकाकाराकडे राहतें. टीकाकाराच्या अंगीं मुख्य गुण निःप-

क्षपातीपणा हा असावा लागतो. तो काव्यशास्त्रकारामध्यें जितका संभवतो तितका तो टीकाकारांत संभवत नाहीं. आणि निःपक्षपातीपणा असल्याशिवाय परीक्षण यथान्याय होत नाहीं. निःपक्षपातीपणा अंगीं असल्यावर मग टीकाकारानें लावलेले टीकेचे नियम एकवेळ चुकीचे असले तरी चालतील. सरकारी न्यायखात्यांत देखील हेंच मर्म आहे. आणि न्यायाधीशाची बदनामी कशानें होते, कशानें होत नाहीं, हें पाहूं गेलें असतां असें दिसतें कीं, न्यायाधिशाला कायदा कळला नाहीं म्हटलें तर ती त्याची बदनामी होत नाहीं. पण त्यानें पक्षपात केला म्हटलें तर ती त्याची बदनामी होते. टीकाकाराचा मुख्य भर फक्त विवक्षित ग्रंथाला बरेंवाईट म्हणण्याचा असतो. पण काव्यशास्त्रकाराचा मुख्य भर कोणत्याहि विशिष्ट काव्याला बरेंवाइट म्हणण्याचा नसून, काव्य ग्रंथाचा उपयोग गुणदोषदर्शनाकडे त्याला करावा लागला तरी त्याचा मुख्य भर सर्वव्यापक असे सिद्धांत व नियम ठरविण्यावरच असतो. म्हणून पक्षपात त्याला फारसा शिवूं शकत नाहीं. असो. यानंतर आतां काव्य लोचनकारांनीं कोणते मुख्य सिद्धांत मांडले आहेत ते थोडक्यांत पाहूं.

---

## काव्यालोचन

( लेखांक तिसरा )

काव्यतत्त्वाचें आलोचन करतांना प्रथमच कविप्रतिभेचा विचार करावा लागतो. कवी व त्याची प्रतिभा हें नेहमींच एक मोठें प्रस्थ होऊन बसलेलें असतें. प्रतिभा ही एक अस्सल दिव्य ईश्वरी देणगी असून, तिचें तेजोवलयावगुंठित पार्सल थेट ईश्वराच्या हातून मोहोरबंद होऊन सुटतें, तें अदृश्य रूपानें कवीच्या हृदयांतच खोललें जातें, अशी कित्येक भाविकांची समजूत असते. आधुनिक काळांत स्वच्छतेचें प्रस्थ माजविणारे कांहीं कांहीं कारखानदार आपल्या कारखानदारीच्या पदार्थांचें वर्णन हस्तस्पर्शरहित (Untouched by hand) असें करीत असतात. म्हणजे यंत्रसाहाय्यानें कारखान्यांत माल तयार होऊन तो परस्पर बाटलींत भरला जावयाचा, गिऱ्हाइकानें चिमट्यानेंच बूच काढून टाकावयाचें

च पदार्थ तोंडांत वरचेवर ओतून घ्यावयाचा! त्याप्रमाणें 'मानवी हस्त-स्पर्श' न होतां किंवा पार्थिव उपाधीचा संपर्क न लागतां प्रतिभा ही, विजेच्या लोळाप्रमाणें, स्वर्गांतून निघते ती थेट कवीच्या हृदयांत शिरते!! या कल्पनेमुळें कवि म्हटला कीं त्याच्याकडे भाविक माणसें मोठ्या कुतूहल दृष्टीनें पाहूं लागतात. मनुष्यमात्राचा हा स्वेच्छेनें दिलेला करभार मिळूं लागतांच कवीनांहि वाटूं लागतें कीं, आम्ही म्हणजे कोणी मोठे राजे आहोंत, आणि बहुमानाचा हा करभार आमच्या प्रजेनें आम्हाला दिलाच पाहिजे. "जे न देखे रवी तेहि देखे कवि" अशा म्हणी स्वतः कवीच बनवूं लागले. "कवी सूर्यमंडळाचा भेद करतो. कवी मृत्यूला जिंकतो. कवी हा प्रतिब्रह्मदेव आहे. तो प्रतिसृष्टी निर्माण करूं शकतो." इ. तात्पर्य कविभक्तांनीं व स्वतः कवींनीं, कोणीं कांहीं म्हणावें, कोणीं कांहीं म्हणावें, असें होतां होतां कवींनीं स्वतःची भरमसाट स्तुति करावी व कवी म्हटला म्हणजे त्याच्या परीक्षणाचें धाडस कोणीं करूं नये अशी संवय लागून राहिली व संकेत बनला.

## प्रतिभा ही मानवी शक्ति आहे

पण काव्यतत्त्वाचें शास्त्रीय रीत्या पृथक्करण करूं लागल्यास मनाचा हा भोळेपणा टाकून देऊन प्रतिभा ही खरोखर काय चीज आहे यांतील खरी गोष्ट तत्त्वज्ञाला जगास सांगावीच लागते. व ही खरी गोष्ट कवि-संप्रदायाची अवकृपा किंवा अप्रियता सोसण्याचें धाडस करून 'काव्या-लोचनकारां'नीं सांगितली आहे. त्यांनीं मोठ्या नाजुक व कुशल हातानें कवि व प्रतिभा यांच्या अंगावरचें झगझगीत गिलीट किंवा मुलामा अगदीं खोलपर्यंत जाऊन खरडून काढला आहे, व असें सांगितलें आहे कीं, काव्यस्फूर्ति ही गोष्ट दैवी हा शब्द लावण्यास योग्य नाहीं. ती एक इतर शक्तींप्रमाणें मानवीच शक्ति आहे. मनुष्य हाच ईश्वरनिर्मित, म्हणून मनुष्यालाच देवाची देणगी ज्या अर्थानें म्हणतां येईल त्याच अर्थानें व तितक्याचपुरती कवित्वशक्ति दवी ठरेल. मात्र त्याहून अधिक नाहीं. कवीला ज्या प्रतिभेची देणगी असते त्याच प्रतिभेची देणगी, ज्या अचाट शास्त्रसंशोधकांनीं कल्पनातीत अशा गोष्टी हुडकून काढल्या त्यांनाहि होती व आहे असें म्हणण्यांत काय चूक? वाफेच्या योगानें चहादाणीवरचें हलकें झांकण अंतराळीं नाचूं लागलें असें पाहा-

णारा वॅट हा कवि असता तर, आपल्या प्रतिभेच्या जोरावर झांकणाचें वर्णन काव्यमय वाणीनें करूं शकला असता; व स्वर्गावतरण करून आलेली ही एक अप्सरा किंवा परी किंवा देवता असें कांहीं तरी त्यानें म्हटलें असतें! मात्र कवीच्या प्रतिभेचा ग्रंथ येथेंच संपला असता. पण वॅट यानें या काव्यमोहांत न सांपडतां, चहादाणीच्या तोंडावरचें झांकण कोणीं हात न लावतां अंतराळीं कसें उडालें याचें खरें कारण लक्षांत आणलें, व वाफेंतील गुप्त शक्ति ओळखून त्यानें जीं इंजिनें बनविलीं त्यांनीं पुढें आगगाड्या चालू लागून जगाची उलथापालथ करून सोडली. मग ती काव्यप्रतिभा बरी कीं ही शास्त्रप्रतिभा बरी? आगगाडी उपयोगी पडली व रोमान्सहि शिल्लक राहिलें!

## प्रतिभेची वांटणी

प्रतिभा ही याच अर्थानें फार तर अलौकिक म्हणतां येईल कीं, ती सारख्या प्रमाणांत सर्वांना उपलब्ध होत नाहीं. जशी बुद्धि ही ईश्वरानें सर्वांना सारखी दिली नाहीं तशीच ही प्रतिभेचीहि वांटणी झाली आहे. म्हणजे प्रत वेगळी पण प्रकार वेगळा नव्हे. तसेंच प्रतिभेला कोणी कोणी वेडेपणाची लहर असें म्हणतात, आणि केवळ आपण अलौकिक आहों असें दाखविण्याकरितां कित्येक छांदिष्ट कविहि आपल्या पोषाख-पेहेरावांत, वागणुकींत व बोलण्या-चालण्यांत लहरीपणाची विक्षिप्तपणाची किंबहुना वेडसरपणाची झांक जाणूनबुजून आणतात! यांत ते स्वतःचा गौरव करीत नसून स्वतःला व्यर्थ दूषण मात्र आणतात. या विषयाचा निष्कर्ष म्हणून ग्रंथकारानें पृष्ठ ४८ व ४९ यावर प्रथम प्रतिभेवर थट्टेनें केलेलीं अनेक काव्यरूपकें वाचनीय आहेत! पण हीं रूपकें त्यानें इतक्याचकरितां केलीं कीं, कोणीं मनांत आणलेंच तर प्रतिभेचें वर्णन तो असें काव्यमय करूं शकेल. पण ते अलंकार तिच्या मालकीचे नसून तिच्या अंगावर कोणी क्षणभर कौतुकानें नटविण्याकरितां घातलेले आहेत. असो; शेवटीं एक--दोन मार्मिक वाक्यांत ग्रंथकारानें समारोप केला आहे.

तो म्हणतो, "काव्यदेवीचें वाहन अनादिकालापासून कोणतें मानण्यांत येतें यावरूनच या प्रश्नाचा निकाल होतो. तें वाहन गरुड नव्हे, वृषभ नव्हे, मूषक नव्हे तर हंस हें तिचें वाहन आहे. व हंसाचें हंसत्व नीर-क्षीरविवेकांतच असतें." अर्थात् नीर म्हणजे असत्य किंवा टाकाऊ तत्त्वें

व क्षीर म्हणजे सत् किंवा ग्राह्य तत्त्वें. कविप्रतिभा ही मुळांत थोडीशी असली तरी चांगल्या कवीच्या ठिकाणीं ती परिश्रमानें अधिक तेजस्वी झालेली आढळेल व या परिश्रमांना तपस्या हें उदात्त नांव दिलें असतां सहजच मोठें कार्य होतें. या तपस्येमध्यें बुद्धीचा कसून उपयोग, तसेंच विद्वत्ता, व्युत्पन्नता, बहुश्रुतता, बाह्यसृष्टिनिरीक्षण व तिचें मनन, साहित्यशास्त्रपरिचय इत्यादि अनेक गोष्टी येतात; व या अनेक गोष्टी मिळून होणारी तपस्या बहुधा प्रत्येक महाकवीनें केलेली आहे असेंच आढळेल.

## कवीचा अभ्यास

अगदीं कोऱ्या करकरीत मनाचा कवि बहुधा अशक्य होय. सर्वांत कमी विद्वान असा कवि तुकाराम घेतला तरी त्यानेंहि "कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें, विश्वासें आदरें धरोनिया" असें स्वतःविषयीं सांगितलें आहे. त्याचें मर्म उघड आहे. ज्यानें जुन्या कवींचा किंवा काव्यमय वाङ्मयाचा अभ्यास केला नाहीं, किंवा ज्यानें सृष्टिनिरीक्षण केलें नाहीं, असा कवि महाकवि होऊं शकतच नाहीं. आणि जे कवी केवळ स्फूर्तीच्या--प्रतिभेच्या जोरावरच कवी झाले असें वाटतें, त्यांच्या काव्याची छाननी केली असतां त्यांच्या प्रतिभारूपी आरशांत स्वतः त्यांच्या आत्म्याबरोबर इतर किती तरी आत्मे किंवा सृष्टपदार्थ यांचीं प्रतिबिंबें पडलेलीं दिसतील! पढिक किंवा बहुश्रुत कवी हा कदाचित् लोकांच्या उष्ट्या कल्पना रंगविणारा असतो अशी शंका येणें साहजिक आहे. पण "There is nothing new under The Sun" किंवा "All knowledge is but remembrance" या इंग्रजी म्हणी लक्षांत घेतल्या असतां वरील शंकेचा परिहार होतो. प्लेटोच्या ज्ञानविस्ताराचें वर्णन करण्याकरितां असें म्हणण्याची रीत आहे कीं, प्लेटोनंतरच्या सगळ्या तत्त्वज्ञान्यांनीं त्याचेंच ज्ञानोच्छिष्ट भक्षण केलें आहे. आपल्या इकडे 'व्यासोच्छिष्टं जगत् सर्वम्' अशी त्याच अर्थाची म्हण आहे. व्यास कवी हे महाकवी होऊन गेले हें खरें; परंतु त्यांच्या मागून आलेल्या कवींनीं जसें त्यांचें उच्छिष्ट भक्षिलें तसेंच स्वतः व्यासांनींहि कितीतरी पूर्वकालीन कवींचें उच्छिष्ट भक्षिलें असेल याची सहज कल्पना करतां येते. असो.

बहुश्रुतपणाप्रमाणें बुद्धीचाहि उपयोग प्रतिभेला फार असतो. चांगला कवी आणि तो बुद्धिवान नव्हता ही गोष्टच असंभाव्य, किंबहुना असेंच आढळेल कीं ज्या कवींनीं आपली प्रतिभा बुद्धीच्या सहाणेवर कसून

घासली ते कवि आपल्या कल्पना निर्बुद्ध कवींपेक्षां अधिक चांगल्या रंगवूं शकले. पुण्याच्या किर्लोस्कर थिएटरांत रंगभूमीच्या दर्शनी मंडपावर एका आधुनिकानें रचलेला श्लोक लिहून ठेवलेला आहे त्यांत 'प्रज्ञाविघृष्ट-प्रतिभामणिदीपप्रकाशितं' असें म्हटलें आहे. तें यथार्थ असल्याचें कबूल करावें लागेल. तेज झळकविण्याचा प्रतिभा–रत्नाचा धर्म आहे, पण हें रत्न जितकें अधिक ठिकाणीं प्रज्ञेच्या निकषावर घासलेलें असेल तितके अधिक तेजकिरण त्यांतून निघूं शकतील. सृष्टिज्ञानासंबंधानें अशीच गोष्ट आहे. निदान अलंकार ही काव्याची बाजू लक्षांत घेतली असतां कवीचें सृष्टिज्ञान जितकें अधिक तितक्या अधिक उपमा रूपकें त्याला सुचतात, ही गोष्ट भौतिक शास्त्रें उदयास येण्याच्या पूर्वींचे कवी व त्यानंतरचे कवी यांच्या काव्याची तुलना केली असतां सहज सिद्ध करतां येते.

यानंतर काव्यालोचनकर्त्यांनीं काव्यतत्त्व या भागांत, रस हाच काव्याचा खरा आत्मा आहे, आणि रीति, ध्वनि, अलंकार, वक्रोक्ति इत्यादि गोष्टी या काव्याला बाह्य शोभा आणणाऱ्या होत ही गोष्ट चर्चा करून सांगितली आहे. या चर्चेंत नवे असे फारसे सिद्धांत नाहींत. परंतु रस व अलंकार या दोनहि संबंधानें जुन्या संस्कृत साहित्यकारांशीं आपला दाट परिचय त्यांनीं प्रगट केलेला असून, ठिकठिकाणीं मार्मिक विधानें केलेलीं आहेत. तथापि या विषयावर विशेष न थांबतां 'काव्यानंदमीमांसा' व 'काव्यध्येय' या भागांत त्यानें जे विचार मांडले आहेत ते सर्व मननीय व कांहीं अगदीं नवीन असे असल्यामुळें त्यांचा विचार पुढील एका लेखांत करून हें परीक्षण संपविणार आहों.

---

## काव्यालोचन

(लेखांक चवथा)

काव्यानंदाची मीमांसा करतांना ग्रंथकर्त्यानें लौकिक व अलौकिक आनंद असे प्रथम दोन भेद केले आहेत. हे भेददर्शक शब्द अगदीं असावे तसे नाहींत. पण पुढें त्यांचे जे मुख्य दोन प्रकार वर्णिले आहेत ते बरोबर आहेत. एक इंद्रियजन्य अशी अनुकूल संवेदना व दुसरा

आकांक्षा-परिपूर्ति. नृत्यगीतादि ललितकलांचा आनंद हा ग्रंथकारानें पहिल्या प्रकारांत घातला आहे. पण या बाबतींत आमचा त्याच्याशीं थोडा मतभेद आहे. कान नसतील तर कोणालाहि गाणें ऐकूं येणार नाहीं हें खरें. पण कान असणाऱ्या अनेक मनुष्यांना एकच गाणें ऐकून अनेक प्रकारचा आनंद होऊं शकतो, व त्या आनंदांत मानसिक किंबहुना आध्यात्मिक आनंदाचाहि अंश असूं शकतो. कालिदासानें शाकुंतलांत मधुर शब्द ऐकल्यानें आनंद होतो त्याचें कारण "तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वम् भावस्थिराणि जननांतरसौहृदानि" असें दिलें आहे. अन्य जन्मींचें स्मरण होणें हा मधुर शब्द ऐकल्याचा परिणाम खरोखर होत असेल तर तो केवळ इंद्रियजन्य परिणाम म्हणतां येत नाहीं. कर्णेंद्रिय हें एक साधन असेल, पण समाधान झालें ते आत्म्याचें झालें. जें मधुर शब्दाविषयीं तेंच कदाचित् सुंदर चित्राच्या दर्शनाविषयींहि म्हणतां येईल.

अशा रीतीनें ललितकलांचा आनंद हा आध्यात्मिकहि म्हणावा लागेल. अपेक्षापूर्तीनें आनंद होतो तो तितका उच्च प्रतीचा आनंद नव्हे. तथापि तो इंद्रियजन्य नव्हे हें मात्र खरें आहे. काव्यानंद हा ग्रंथकाराच्या मताप्रमाणें केवळ कल्पनेचा आनंद होय. त्यांत इंद्रियांचें समाधान नाहीं किंवा स्वार्थी अपेक्षेची पूर्ति नाहीं. तो आनंद केवळ आध्यात्मिक असून त्याला ' ब्रह्मास्वादसहोदर ' असें साहित्याचार्यांनीं म्हटलें आहे, तसलेंच कांहींसें वर्णन करून स्वस्थ बसणें भाग आहे. फरक इतकाच कीं, ब्रह्मानंद हा निर्विकल्प समाधीच्या स्वरूपाचा असतो व काव्यानंद हा सविकल्प समाधि उत्पन्न करतो. ब्रह्मानंदांत तल्लीनता असते व काव्यानंदांतहि तल्लीनता असते. पण खरा ब्रह्मानंद अद्वैत--सिद्धीपासूनच होतो. यामुळें एकाहून अधिक ज्ञानसंवेदना त्या समाधींत असत नाहींत. पण काव्यानंदांत द्वैताची जाणीव खपूं शकते, इतकेंच नव्हे तर ब्रह्मानंदासमान असला तरी त्यापासून वस्तुत: वेगळ्या असणाऱ्या काव्यानंदांत ही द्वैताची जाणीव हेंच आनंदाचें खरें अधिष्ठान आहे.

## काव्यानंदाचीं कारणें

काव्यवाचनानें योगसमाधि लावल्याप्रमाणें एकदम ब्रह्मानंदच प्राप्त

झाला तर फारच चांगलें. पण काव्यानंद हा दुय्यम प्रतीचा असल्यामुळें त्यांत द्वैतभाव व सविकल्प समाधि हींच आनंदाचीं कारणें होऊं शकतात. काव्य वाचून ब्रह्मानंदीं टाळी लागणारा मनुष्य क्वचित. परंतु काव्यामध्यें इतकी मात्र शक्ति आहे कीं, आत्म्यानें स्वतःची भूमिका न सोडतां क्षणमात्र त्याला दुसऱ्याची भूमिका घेतल्याचा आभास लाभूं शकतो व हा आभासहि स्वप्नसृष्टींतील नव्हे, तर अगदीं जागतेपणीं. 'डोळां घालिता आंगुळी, एकाची ती दोन झाली' या तुकारामाच्या दाखल्या-प्रमाणें काव्याची अंगुलि मनश्चक्षुंत घालतांच, आपलेपणाची भूमिका शिल्लक राहूनहि कविकल्पनेनें उत्पन्न केलेल्या प्रसंगांत (तो प्रसंग आत्मसंबंधीं आहे अशा भावनेनें) त्या दुसऱ्या भूमिकेवर आत्म्याला जाऊन उभें राहतां येतें, किंबहुना आवडतेंहि.

शंकराचार्यांनीं वादामध्यें एके प्रसंगीं उत्तरें देण्याला मुदत मागून घेऊन परकायाप्रवेश केला, व त्या परकायेच्या आश्रयानें अन्य प्रकारचें ज्ञान मिळण्यासारखें होतें तें घेऊन फिरून स्वकायेंत प्रवेश केला. या उदाहरणांत दोन काया एकाच आत्म्याला एकाच वेळीं होत्या असें दिसतें; व त्या एका आत्म्याचा त्या दोन कायांशीं इतका जिव्हाळ्याचा संबंध होता कीं, आचार्यांची पहिली काया शिष्यांना संरक्षण करून संभाळून ठेवावी लागली होती. याच दाखल्याप्रमाणें सहृदय काव्यवाचक काव्य वाचीत असतां एक प्रकारचा परकाया प्रवेशच करीत असतो.

## स्वायत्त व सविकल्पक समाधि

काव्याच्या उत्तमत्वांतले जितके घटक, तीं सर्व काव्यानंद उत्पन्न करून देण्याचीं साधनेंच होत. संस्कृत साहित्य-ग्रंथकारांनीं या संबंधानें केलेलें विवेचन आंग्ल पाश्चात्य साहित्यशास्त्रापेक्षां अधिक खोल व समर्पक आहे असें आम्हांला वाटतें व आमच्या साहित्याचार्यांनीं तादात्म्याची उपपत्ति काव्यानंदाचे बाबतींत जशी योजून लावून दाखविली आहे तशी पाश्चात्यांनीं लावलेली नाहीं. तादात्म्य उत्पन्न करण्याच्या शक्तीच्या दृष्टीनें जी उपपत्ति एका रसाला तीच नऊ किंवा अनेक रसांना लागू पडते. तादात्म्य तेंच, परंतु प्रस्तुत ग्रंथकाराच्या मतें तें तादात्म्य सविकल्प म्हणण्यापेक्षां स्वायत्त म्हणणें हें अधिक योग्य आहे. कदाचित् असेंहि म्हणतां येईल कीं, या तादात्म्यामध्यें स्वायत्तपणा व सविकल्पकता हे

दोनहि घटक अवश्य असल्यामुळें, " स्वायत्त व सविकल्प अशी समाधि हें काव्यानंदाचें कारण होय " असें म्हणून विरोधपरिहार करण्यासारखा आहे.

बाह्य सृष्टीशीं किंवा आत्मेतर भूमिकेशीं सन्निकृष्ट किंवा एकरूप झाल्यानें आत्म्याला आनंद कां होतो या प्रश्नाचें उत्तर सोपें नाहीं. पण तें उत्तर प्रतिप्रश्नानें देण्यासारखें आहे; तो प्रश्न असा कीं, द्वैतांतून अद्वैत सिद्धी झाल्यानें तरी आनंद कां होतो ? व्यष्टिरूप जीवात्मा व समष्टिरूप परमात्मा असा भेद मानला तर या दोहोंतलें जें अंतर तें जीवात्म्याला आक्रमण करण्याचें क्षेत्र असें सहजच मानतां येतें. हें आक्रमण करणें म्हणजे जीवात्म्यानें क्रमाक्रमानें परमात्म्यापर्यंतच्या मधल्या सर्व भूमिका आक्रमण करणें हें होय. किंवा असली फाजील महत्त्वाकांक्षा सोडून दिली तर निदान असें म्हणतां येईल कीं, कल्पनेवर आरूढ होऊन अमर्याद अशा अंतराळांत पक्ष्याप्रमाणें भ्रमण करून परत जाग्यावर येणें या गोष्टींतहि आत्म्याला आनंद होत असेल.

काव्यानंदाच्या स्वरूपाविषयीं हें झालें. पण हा आनंद उत्पन्न होण्याला कांहीं गोष्टी काव्यामध्यें अवश्य असतात. पैकीं एक गोष्ट म्हणजे काव्य हें जरी कल्पनामय असलें तरी त्यांत सत्य तत्त्व म्हणून असावें लागतें. हें सत्य म्हणजे शास्त्रांतील सत्य नव्हे. तर पुष्कळसें सांकेतिक व कल्पनामर्यादित सत्य होय. पण तें तरी कवीनें पाळलेंच पाहिजे. स्वप्नामध्यें जरी आपण व्यवहार करीत असलों तरी, स्वप्नांत जी भूमिका आपण आपली ठेवतों तिला धरूनच सर्व व्यवहार व्हावे लागतात. स्वप्नांत आपल्यामागें मारकी गाय लागली आणि पळणें प्राप्त झालें तर जागृतीप्रमाणें पायानेंच पळलें पाहिजे. तें स्वप्न म्हणून डोक्यानें पळतां येत नाहीं. किंवा स्वप्नामध्यें सावकारीचा व्यवहार केला तर दोन व दोन चार अशीच बेरीज होईल, पांच होणार नाहीं. स्वप्नांत आपल्या परिचयाचे सहचारी किंवा नातेवाईक यांचा संबंध आला तर जागत्या सृष्टींतील जे संबंध व जीं नातीं तीं स्वप्नांतहि रहातीलच. रूपक, उपमा किंवा इंग्रजी अलंकार Personificaton हे घेतले तर त्यांत आपल्या भावनेनें असा आभास आपण उत्पन्न करतों कीं तो भौतिक शास्त्राचे नियम म्हणजे अनुभविक ज्ञानाचे नियम नष्ट करून सोडतो व कविसंकेत हे तर बोलूनचालून मिथ्याज्ञानावरच अधिष्ठित झालेले असतात. तेव्हां काव्यां-

तलें सत्य म्हणजे भौतिक शास्त्रांतलें सत्य असें न मानतां तें कांहींएक वेगळ्याच प्रकारचें सत्य आहे असें मानावें लागतें. तथापि तें सत्य पाळणें हें मात्र काव्याला अवश्य आहे व तें न पाळलें तर त्या काव्य–वाचनापासून आनंद उत्पन्न होणार नाहीं.

जें शास्त्रीय सत्याविषयीं तेंच ऐतिहासिक सत्याविषयींहि समजावें. तसेंच नुसतें सत्य सांभाळूनहि चालत नाहीं. तर काव्यविषय चित्तवेधक असला पाहिजे. अर्थात् काव्यविषय किंवा काव्यवर्णन सद्वस्तुस्वरूपाचें असून शिवाय त्या, दोहोंत कांहीं नैसर्गिक सौंदर्यहि असलें पाहिजे. जगांतील प्रत्येक वस्तू ही सत्यस्वरूपी आहे. पण प्रत्येक वस्तू सुंदर असते असें नाहीं. सारेच ध्वनी, पण त्यांत फक्त कांहींच सुस्वर असतात. त्याचप्रमाणें सर्व सृष्टि सत्यस्वरूप पदार्थांनीं भरली असली तरी त्यांतहि कुरूप व सुरूप हा भेद असतोच. अर्थात् सुरूप पदार्थांच्या दर्शनानें जो आनंद उत्पन्न होतो तो कुरूप पदार्थांच्या दर्शनानें होत नाहीं. काव्यसृष्टि व लौकिकसृष्टि यांचे यथार्थ संबंध दाखवितांना पृष्ठ २०६–२०७ वर काव्यालोचनकारांनीं जो दोन बहिणींचा दाखला घेतला आहे तो फारच समर्पक आहे व त्यानें या मुद्याचा समारोप चांगला झाला आहे.

## काव्याचें ध्येय

यापुढें काव्याचें ध्येय काय? हा विषय उपस्थित करून त्यांत नीतिवाद, आल्हादवाद, उपदेशवाद वगैरे जे अनेक वाद येतात त्यांचा विचार करून ग्रंथकर्त्यानें आपलें असें मत दिलें आहे कीं, आल्हाद व उपदेश हीं दोनच काव्याचीं मुख्य ध्येयें उरतात. आमच्या मतें या दोहोंत आल्हादवाद हाच अधिक खरा आहे. कारण आल्हाद उत्पन्न होण्याला सत्य, सौंदर्य, प्रमाणबद्धता, औचित्य इत्यादि बंधनें जर अवश्य आहेत, व तीं अवश्य आहेत असें आम्हीहि मानतों, तर उपदेश किंवा नीति या दोन दृष्टींतून उत्पन्न होणाऱ्या इतर अनेक गोष्टी चांगल्या काव्यांतून सहज निष्पन्न होणाऱ्या आहेत. सदभिरुचीचा आल्हाद काव्यांत निर्माण झाला तर उपदेश हा त्यांतून आपोआपच निष्पन्न होतो. तो उपदेश या नात्यानें वेगळा सुद्दाम स्पष्ट सांगावा लागत नाहीं. 'काव्यांत आल्हादक्षमता आणि तत्वप्रतिपादन हीं दोनहि असलीं तरी या

दोहोंपैकीं, जें नष्ट झालें असतां काव्याचें काव्यत्व नष्ट होईल तेंच त्याचें अनन्य कारण व ध्येय मानलें पाहिजे आणि हें वैशिष्ट्य आल्हादक्षमता होय ' हें जें ग्रंथकर्त्याचें मत तेंच आम्हांलाहि मान्य आहे.

## अश्लीलता

शेवटचा मुद्दा काव्याच्या जबाबदारीसंबंधानें. काव्य आनंददायक होण्याला बहुतांशीं निर्दोष असलें पाहिजे हें कोणीहि कबूल करील. ढोबळ दोष हे आल्हाद-विघातक असतात. आतां काव्याच्या जबाबदारीचा विचार करतांना अश्लीलता वगैरेंचा विचार काव्यालोचनकारांनीं केलेला आहे व ती टाळणें अवश्य आहे. वास्तविक अश्लीलता ही सहृदय मनुष्याच्या सुसंस्कृत मनाचा रसभंग करणारी असल्यामुळें, उद्वेग उत्पन्न करणारी असल्यामुळें, अश्लीलता काव्यदोषाच्या सदरांतच पडेल. तें विशिष्ट प्रकारचें अनौचित्य होय. असें असतां काव्यालोचनकारांनीं या विषयाची स्वतंत्र चर्चा करण्याचें कारण असें कीं, अलीकडे काव्यनाटकादिकांतून अश्लीलता ही इतकी उजळ माथ्यानें वावरूं लागली आहे कीं, तिचा वेळींच योग्य निषेध न झाल्यास तिला दोषाचें स्वरूपच नाहीं असें परप्रत्ययनेयबुद्धी लोक म्हणूं लागण्याचा संभव आहे. म्हणून वेळींच ही खबरदारी घ्यावी लागते. या बाबतींत कित्येक जुने संस्कृत कविहि दोषास्पद ठरतात. नीतितत्त्वाचा उपदेश करणें हें काव्याचें ध्येय नसेल, म्हणजे असण्याचें कारण नाहीं. पण कांहीं एका मर्यादेपलीकडे अश्लीलता काव्यांत न येऊं देणें हें मात्र कवीचें कर्तव्य ठरतें. जुन्या काळच्या फौजदारी कायद्यांतील शिक्षा जशा आजच्याहून अधिक कडक होत्या तशीच अश्लील कल्पना किंवा शब्दप्रयोग यांच्या संबंधाचीं बंधनें आजच्याहून जुन्या काळीं अधिक ढिलीं होतीं. अश्लीलता व अनीति हीं सर्वस्वी समानार्थक नाहींत. अश्लील शब्द तोंडांतून कधींहि न उच्चारणारे लोक अनीतिमान असूं शकतील, व अश्लील शब्द तोंडांतून काढणारे लोक आचरणांत नीतिमान असलेलेहि आढळतील. काव्यचर्चेत अनैतिक आचरणाचा संबंध येत नाहीं. अश्लील म्हटल्या जाणाऱ्या शब्दांचा व त्यावरून सुचणाऱ्या कल्पनांचा संबंध येतो. पण अशा प्रकारची केवळ शब्दगत किंवा कल्पनागत अश्लीलता ही प्रत्यक्ष अनीति नसली तरी सदभिरुचीला ती विरोधी आहे यांत शंका नाहीं.

असो. अशा रीतीनें काव्यालोचन या ग्रंथांतील मुख्य मुख्य मुद्द्यांचा आम्ही विचार केला. ग्रंथांतील विधानासंबंधानें क्वचित् कोणाचा मतभेद होण्यासारखा असला तरी एकंदरीनें पाहतां विचारसरणी व मुख्य सिद्धांत यांत मतभेदाला फारशी जागा नाहीं असें आम्हांला वाटतें. विशेषत: ही गोष्ट मनाला पटते कीं हा ग्रंथ अतिशय विचार करून लिहिलेला असून त्यांत दिसून येणारा संस्कृत साहित्य–ग्रंथांचा परिचय विशेष वाखाणण्यासारखा आहे. हल्लीं विद्यापीठांतून मराठी या एकंदर विषयाला आणि प्रत्यक्ष मराठीं वाङ्मयनिर्मितींत काव्याला अधिकाधिक महत्त्व येत असल्यामुळें अशा ग्रंथांची उपयुक्तता पुष्कळच आहे. एम्. ए. च्या परीक्षेला ठेवण्यासारखा हा ग्रंथ असून, अशा प्रौढ विद्यार्थ्यांनाहि तो वरवर वाचून खरा समजेल कीं नाहीं याची शंका वाटते इतकें त्यांतील विवेचन ठाशीव व भरदार आहे. म्हणून असा ग्रंथ वाचकांच्या हातीं पडल्याबद्दल त्यांचें व तो लिहून छापून प्रसिद्ध करतां आला म्हणून ग्रंथकर्त्यांचें अभिनंदन करून आम्हीं हें ग्रंथपरीक्षण पुरें करतों.

---

## ३७ छंदोरचना

रविकिरणमंडळ, पुणें, याचे एक सभासद माधवराव पटवर्धन, एम्. ए. ह्यांचा ‘छन्दोरचना’ हा नवा ग्रंथ पुणें येथील ‘आर्यसंस्कृति मुद्रणालया’नें नुकताच प्रसिद्ध केला आहे. त्यांत पटवर्धन यांनीं पूर्वीं अन्य ठिकाणीं प्रसिद्ध केलेले कांहीं निबंध पुनः छापलेले असून कांहीं भाग नवा लिहून घातलेला आहे. या विषयांवर स्वतंत्र नवें पुस्तक एकदमच लिहावयास बसल्यानें जशी एकसूत्रता आली असती तशी पूर्वीं लिहिलेले निबंध एकत्र केल्यानें आलेली नाहीं. तथापि ‘कांहीं साहित्यविषयक विचार’ असें ह्या ग्रंथाचें संग्राहक नांव मानिलें असतां वरील उणीव भासत नाहीं. छन्दःशास्त्रावर आजपर्यंत गोडबोले, चिपळूणकर, राजवाडे, रड्डी, जोशी इत्यादिकांनीं लिहिलेल्या सर्व ग्रंथांचा परामर्ष घेऊन हें पुस्तक लिहिलेलें आहे. परंतु तें केवळ अनुवादात्मक नसून त्यांत विचारस्वातंत्र्य पुष्कळच दिसून येतें. पटवर्धन यांची प्रसिद्धी आतां-

पर्यंत कवि या नात्याचीच होती. पण हल्लींच्या पुस्तकानें हें निखालस सिद्ध केलें आहे कीं, कवि झाला म्हणजे त्याला चिकित्सक बुद्धि नसावी किंवा नसते असें नाहीं. एकाच राज्यांत १८ विविध कारखाने असतात किंवा परस्परविरोधी अशा न्यायदान व मुत्सद्देगिरी हीं खातीं असतात. त्याचप्रमाणें बुद्धिवान मनुष्यांमध्येंहि कवित्व व चिकित्सक बुद्धि यांनीं वास केल्यास खरोखर काय हरकत? पटवर्धन यांनीं त्या ग्रंथांत चिकित्सक बुद्धि कसून चालविली आहे इतकेंच नव्हे, तर छन्दः—शास्त्राचा विषय अत्यंत परिश्रमपूर्वक तळापासून ढवळून काढला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. गोडबोले चिपळूणकर हे बिचारे जुन्या काळांत म्हणजे फक्त जुन्या कवितेच्या काळांत जन्मले; व त्यांनीं संस्कृत, प्राकृत छन्दापलीकडे फारशी मजल मारली नाहीं. आणि राजवाडे यांनीं नवी करामत करून दाखविली असतांहि, पटवर्धन यांनीं त्यांच्यावर ताण केली आहे याचें कारण हेंच कीं, राजवाडे यांनीं पुष्कळसा मनाचाच मामला केला. पण त्यांच्या नेहमींच्या तुच्छताबुद्धीनें आधुनिक कवितासंग्रहाशीं त्यांनीं परिचय केला नव्हता. उलट पटवर्धन यांनीं त्यांना कविता विषयाची अत्यंत आवड असल्यामुळें, बहुतेक आधुनिक कविता व पद्यसंग्रह यांचा सहानुभूतिपूर्वक व संशोधनपूर्वक अभ्यास केल्याचें उघड दिसतें. म्हणून त्यांचा ग्रंथ जसा विवेचक तसा सुरसहि झाला आहे. ग्रंथाच्या नांवाप्रमाणें त्यांत छन्दःशास्त्राचा विशेष विचार करूनहि शिवाय त्यांनीं सातव्या व आठव्या प्रकरणांत, पद्यांतील व्याकरणविशेष व पद्यभाषा हीं जीं दोन प्रकरणें लिहिलीं आहेत तीं तर आमच्या दृष्टीनें फारच मौल्यवान आहेत. आणि त्याच्या योगानें साहित्यविचाराला सर्वसाधारणरीत्या मार्गदर्शक पद्धतीची विशेष मदत होणार आहे.

## वृत्त, छंद व जाति

प्रथम यमक, गण व अक्षर यांचा विचार करून नंतर त्यांनीं वृत्तविचार व छन्दोविचार केला असून, स्वतः त्यांनीं म्हटल्याप्रमाणें छन्द व जाति यांच्या विस्ताराची जी रचना केली ती खरोखरच स्वतंत्र व शास्त्रीय अशी कामगिरी होय. वृत्त, छन्द व जाति असे तीन वेगळे प्रकार त्यांनीं मानले आहेत. परंतु यासंबंधानें आमचें मत असें आहे

कीं, हें वर्गीकरण फारसें समर्पक नाहीं. स्वतः त्यांनीं म्हटल्याप्रमाणें ताल हा पद्याला अवश्य आहे असें मानलें असतां ह्या, तिहींनाहि एकच नांव व कदाचित् वृत्त हेंच नांव पुरेल असें वाटतें.

कोणताहि एक ताल घेतला असतां त्याला अनुसरून पद्यकार स्वतः-करितां एक ठराविक किंवा नवा स्वतंत्र सांचा बनवितो. आणि तो सांचा अक्षरगणयुक्त किंवा मात्रागणयुक्त अशा शब्दसमूहानें भरून काढतो. ज्याला ताल नाहीं अशा पद्याचा विचार पटवर्धन यांना कर्तव्य आहे असें दिसत नाहीं. पण तालात्मक अशा पद्यांचा त्यांना विचार करावयाचा आहे असें म्हटलें तर मग कोणताहि सांचा हें एक वृत्त असें मानलें म्हणजे कार्यभाग होईल. पद्यांत किती चरण असावेत, किंवा ध्रुपद व अंत्रा मिळून त्याचे किती व कसे तुकडे पाडावेत, हें पद्यकारांच्या इच्छे-वर अवलंबून राहील. मात्र गृहीत केलेल्या तालाला अनुसरून एक किंवा अनेक आवर्तनांनीं सम साधली म्हणजे झालें. समावर्तन साधलें म्हणजे मग त्या समेंत बसणारा सर्व शब्दसमूह मिळून एक संपूर्ण सांचा, किंवा पद्यकोटींतील अणु किंवा इंग्रजींत ज्याला यूनिट (Unit) म्हणतात तो तयार होतो. मग फरक राहिला तो फार थोडा. फक्त अक्षरगणांचें बंधन किंवा मात्रागणांचें बंधन कवि स्वतःला घालून घेतो इतकाच विचार उरतो. आणि तोहि पद्यकाराच्या इच्छेवरच अवलंबून राहील. अर्धीं किंवा दिडकीं अक्षरें जोंपर्यंत मान्य झालेलीं नाहींत व जोंपर्यंत अशा अक्षरांना वेगळ्या खुणा मिळालेल्या नाहींत, तोंपर्यंत अक्षर म्हटलें कीं, ऱ्हस्व किंवा दीर्घ असेल तसेंच उच्चारिलें किंवा लिहिलें पाहिजे हा निर्बंध टळत नाहीं. आणि हा निर्बंध राहील तोंपर्यंत ऱ्हस्व अक्षरांचा उच्चार सोईकरितां दीर्घ व दीर्घाचा ऱ्हस्व केला तरी ती चूकच मानली पाहिजे. मग ती चूक विद्वानहि करो. चुकीला चूक म्हणूनच तिचा निर्देश केला पाहिजे. जुन्या गद्यांत किंवा नवीन कवितेंतहि अशा सवलती पद्यकार घेत आले आहेत. म्हणून त्या चुकारूपी अपवादांना नियमांचें स्वरूप देणें बरोबर होणार नाहीं. लघु किंवा गुरु अक्षरें हीं जशीं लिहिलीं जातात तसाच त्यांचा उच्चार करणें हें शुद्ध व विहित मानलें तर अक्षरगण किंवा मात्रागण यांच्याशिवाय तिसरा गण संभवत नाहीं. आणि या दोन गणांपैकीं, कोणताहि स्वीकारून, कोणत्याहि एका स्वीकृत तालांत समे-

पासून समेपर्यंत जो पद्यात्मक शब्दप्रबंध केला तें वृत्त असें म्हटल्यानें कार्यभाग होऊं शकतो. तथापि आधुनिक कवितांना जाति या सदराखालीं घालून त्यांचेहि सनियम सनिर्बंध असे सांचे बनवितां येतात. ही जी नवीन दृष्टि पटवर्धन यांनीं वाचकांना दिली ती अभिनंदनीय होय.

जातिविस्तार प्रकरणांत निरनिराळीं पदें घेऊन किंवा निरनिराळे आधुनिक पद्यप्रबंध व नाटकांतील वगैरे पदें घेऊन त्यांना मात्रांच्या संख्येनें नियमबद्धता आणलेली असते. निरनिराळ्या चालींचीं पद्यें किंवा पदें घेतली असतां, त्यांचा थोडयाफार फरकानें विनिमय होण्याजोगा असतो. विविधांमध्यें साम्य हुडकून काढतां येतें व एकाचें रूपांतर फार थोडया फरकानें दुसऱ्यांत करतां येतें, हें उदाहरणें घेऊन दाखविण्याचा पटवर्धन यांनीं जो प्रयत्न केला आहे तो विशेष अभिनंदनीय होय व त्यांत त्यांची चौकसबुद्धि विशेष दिसून येते. पुष्कळ वेळां तितक्याच गणसंख्येचीं पद्यें असतांहि केवळ चाल वेगळी म्हणून वेगळीं वाटतात. पण चाल ह्या शब्दांत नुसता ताल नसून संगीत स्वररचनादि असते यामुळें वेगळेपणा दिसतो. पण तो खरा नव्हे. एकच अभंग निरनिराळ्या रागांत म्हटला असतां तीं निरनिराळीं वृत्तें असल्याचा चुकून भास होतो. पण तो आभासच असतो. मात्र रागदारीच्या म्हणण्यांत आलापाची भर पडल्यानें मात्रांची संख्या बदलते तेथें तेवढा तो सांचा किंवा तें वृत्त खरोखरच वेगळें ठरतें. पण पद्यरचना करतांना पद्यकार कोणत्याहि एका रागदारींत आपल्याशीं गुणगुणत असला तरी, तें पद्य हा विशिष्ट मात्रागणसंख्येचा किंवा अक्षरगणसंख्येचा एक संपूर्ण यूनिट (Unit) होय इतकीच प्रतीति अपरिचित वाचकाला होते. पटवर्धन यांच्या विवेचनांतून इतकाच बोध घ्यावयाचा कीं, पद्यकाराला आपल्या इच्छेप्रमाणें किंवा आवडीप्रमाणें किंवा सोईप्रमाणें, वाटेल तो सांचा घेऊन त्याला त्यांत पद्य बसवितां येईल, मात्र त्यानें स्वीकारलेलें गणबंधन बरोबर पाळल पाहिजे. मग म्हणणारा तें कोणत्याहि रागांत म्हणो.

या नवीन हुडकून काढलेल्या जातींना नांवें हवींत म्हणून पटवर्धनांनीं तीं प्रचलित पद्यांतील प्रमुख शब्दांचीं नांवें घेऊन एक नवीनच वृत्तमाला तयार केली आहे. पण हा प्रयत्न पुष्कळसा फुकट जाईल असें आम्हाला कष्टानें म्हणावें लागतें. कारण पटवर्धनांनीं उदाहरणाकरितां कविता

घेतल्या त्या सर्व आधीं लोकांच्या तोंडीं आहेतच असें नाहीं. यामुळें वृत्त-दर्पणांतल्या थोड्याशा कविता पाठ करून वृत्तांचीं नांवें व चाली हीं जशीं ध्यानांत राहतात तशीं पटवर्धन यांनीं बनविलेलीं वृत्तें किंवा जाती लक्षांत राहतील असें वाटत नाहीं. जुन्या वृत्तकारांनीं इच्छेला येतील तींच नांवें दिलीं आहेत. त्या दृष्टीनें पाहतां पटवर्धनांनीं नवीन वृत्तें हुडकून दाखवून दिल्यावर त्यांनींहि आपल्या आवडीचीं नांवें कां देऊं नये? पण फिरून असें म्हणावेसें वाटतें कीं, या सर्व प्रयत्नांपेक्षां, तालांचीं मूलतत्वें (व तींहि फार थोडीं आहेत) तीं समजावून देण्याचे प्रयत्न कोणी तालज्ञानें केला आणि तीं समजून घेण्याचे परिश्रम पद्यकारांनीं केले तर, पटवर्धनांचीं जातिनामें लक्षांत ठेवण्यापेक्षां आपलीं आपणच तालाचीं कोष्टकें मांडून पद्यकारांनीं पद्यें रचल्यास त्यांचें काम अधिक सुलभ होईल. व पद्य म्हटलें कीं तें तालांत बसलें पाहिजे हा जो निर्बंध तोहि आपोआप पाळतां येईल.

### माझा भरत देखिला काय?

पटवर्धनांच्या हौशी सृष्टिनिर्मितीनें कसे प्रकार घडतात हें दोनतीन उदाहरणांवरून कळून येईल. 'माझा भरत देखिला काय-कुणि तरि साङ्गा हो' हें पद आणि चाल प्रसिद्ध आहे. आणि लघु गुरु हे भेद समजणाराला त्याचें ध्रुपद व अंत्रा मिळून किती मात्रांचा सांचा तयार होतो हें सहज ठरवितां येईल. या पदाच्या 'जाती'ला पटवर्धनांनीं 'भरत' हें नांव दिलें आहे. पण ही जाति कशी सिद्ध होते तें पाहा. "उपचंद्रकान्ताच्या परंतु साधारणत: दीर्घस्वराङ्कित सवृत्त अक्षरान्त अशा तीन पडिक व चौथी उपचंद्रकान्त मिळून कडवें होतें. ध्रुपद उपचन्द्रकान्त व विचन्द्रकान्त मिळून होतें." (पृष्ठ १८६). आतां हें वर्णन कोणाला कसें समजणार, व कोण किती लक्षांत ठेवणार? त्याच्या ऐवजीं 'माझा भरत देखिला काय, कुणि तरी सांगा हो' हें पद दोन तीन वेळां ऐकणारालाहि, मात्रा वगैरेंचा प्रपंच न कळला तरी तें लक्षांत ठेवतां येईल, व त्याबरहुकूम पद्यरचना करतां येईल व त्यांतल्या मात्रा मांडून घेतल्या तर कामच झालें. दुसरें उदाहरण 'मुद्रिका' ही 'जाति' बायकांच्या तोंडांतील 'मुद्रिका' या गाण्यावरून पटवर्धनांनीं घेतली आहे. पण त्याचा खुलासा पटवर्धनांच्या भाषेनें असा आहे कीं, "मंजरी, उद्धव आणि प्रविसूर्यकान्त या तीन पंक्ति मिळून

ही जाति होते. दुसरी व तिसरी पंक्ति मिळून एक समजून एका रेषेंत लिहितात तसें समजल्यास ती जोडपंक्ति द्वितीय पद्यांत द्विमात्रिक विराम असलेली प्रसूर्यकान्त मात्रावलि होईल." (पृष्ठ १८८).

तिसरें उदाहरण:—'कृतान्तपुरुषा असा होशी निष्ठुर तूं बा कसा' ही होय. ही पुष्कळांच्या तोंडीं असेल. पण ह्या 'जाती'चें पटवर्धनांचें नांव 'मनी' कां तर " गुणी आणि अवगुणी अशी ही । द्वाड आमुची। मनी" अशी एक ओळ 'अज्ञातनाद' नामक पद्यसंग्रहांत यांना आढळली आहे. पण सामान्यतः ह्या 'मनी' पेक्षां हा 'कृतान्तपुरुष' च लोकांच्या अधिक परिचयाचा असतो; म्हणून ह्या जातीला 'कृतान्त' हें नांव दिलें असतें तर अधिक बरें झालें नसतें काय ? बरें, ह्या साध्या भोळ्या मनीचें वर्णन किती विकट आहे पाहा " पादाकुलकाच्या दोन व तीन पंक्ती आणि सूर्यकान्त व सूर्यकला वा विसूर्यकान्त मिळून ही जाति सिद्ध होते." निरनिराळ्या जातींमध्यें विनिमय कसा होऊं शकेल व त्यांत मूलभूत सारखेपणा कसा असतो हें दाखविण्याच्या शास्त्रीय दृष्टीनेंच हा सर्व अपरिचित व्याख्यांचा प्रपंच पटवर्धनांनीं केला आहे ही गोष्ट कोणीहि कबूल करील. पण या चर्चेपासून विधायक असें साहाय्य फारसें कोणास होणार नाहीं इतकीच आमची तक्रार आहे. नवीन शास्त्र शिकवावयाचें झालें तर त्यांतील पारिभाषिक शब्द तरी होतां होईं तों सोपे परिचित असावेत असा नियम आहे. पण सिद्धान्त नवा आणि परिभाषाहि सगळीच्या सगळी अपरिचित व नवसंघटित असें झाल्यास बोध कसा व्हावा ? खेंचराची जाती माहीत नसणाराला " घोडा व गाढव मिळून खेंचर बनतें " असें सांगितलें तर कांहीं तरी कळेल. कारण त्याला खेंचराची कल्पना नसली तरी गाढव व घोडा यांच्या स्वरूपाचीच असते. पण पटवर्धनांच्या या विवेचनांत मूळ घटकहि अपरिचित.

असो. टीकास्पद हा विषय इतकाच सोडून देऊं. परंतु यानंतर 'पद्याची भाषा' व 'पद्यांतील व्याकरणविशेष' या दोन प्रकरणांत पटवर्धन यांनीं जे नियम किंवा सिद्धान्त दिले आहेत ते आम्हाला एकंदरीनें फारच पसंत वाटतात हें आम्ही मोठ्या आनंदानें नमूद करतों. या प्रकरणांतील चर्चा फारच मार्मिक झालेली आहे. संस्कृत शब्द पद्यकारांनीं कितपत व कसे वापरावेत, मराठी भाषेंतील जुन्या शब्दभांडा-

राचें मूल्य पुष्कळ असतां त्याची आपण हयगय किती करतों, परभाषेंतील शब्द कोठपर्यंत टाळावेत व कोठपर्यंत घ्यावेत, याविषयीं पटवर्धन यांचें विवेचन फारच समर्पक आहे. ते स्वतः आपल्या कवितेंत उर्दू, पर्शियन वगैरे शब्द फार घालतात असा त्यांच्यावर आक्षेप आहे. तो खरा असला तरी निदान त्यांचें 'श्रेयस्' हें त्यांच्या 'प्रेयसा' हून वेगळें आहे ह्यांत शंका नाहीं. पृष्ठ २१७-१८ यावर भाऊसाहेबांच्या बखरींतील एक उतारा देऊन त्यांतील अनेक परकी शब्दांऐवजीं संस्कृत किंवा मराठी शब्द घातले तरी हानि कशी होत नाहीं हें त्यांनीं दाखविलें याबद्दल सावरकरांप्रमाणें आम्हीहि त्यांचे आभारी आहों. पण याहिपुढें जाऊन पृष्ठ २१८ च्या शेवटीं जीं ५--७ वाक्यें लिहिलीं आहेत तीं आम्हाला फारच आवडलीं. तो उतारा नसून तीं त्यांचीं स्वतःचीं वाक्यें आहेत आणि पटवर्धन हे इच्छा असल्यास फारसी शब्द वगळून व जुने मराठी शब्द घालून उत्कृष्ट गद्य कसें लिहूं शकतात याचा तो एक उत्तम मासला म्हणून देण्यासारखा आहे. यावनी शब्दांमधील दांडगेपणाच्या अर्थाचा सहवास आमच्या फार दिवसांच्या परिचयाचा झाल्यामुळें केवळ यावनी शब्दांबाहेर आवेश नाहीं अशी आमची समजूत होऊन गेली. पण ही चूक आहे. आवेश हा शब्द--स्वरूपापेक्षां शब्दार्थांत अधिक असतो आणि अर्थाच्या दृष्टीनें संस्कृत किंवा मराठी भाषेंतील शब्द कमी आवेशयुक्त नाहींत. फक्त ते आवेशाच्या अर्थानें ऐकण्याची आपली संवय गेली इतकाच त्याचा अर्थ. पर्शियन शब्दांच्या या कोशकारांनीं, यावनी शब्दांची रेलचेल आपल्या कवितेंत करणाऱ्या या कवीनें मराठी भाषेला दिलेली ही थोरवी विशेष अभिनंदनीय होय. पटवर्धनांच्या ग्रन्थांत विनोदाला एरवीं जागा नव्हती. पण आपल्या पर्शियन भाषेच्या ज्ञानामुळें राजवाड्यांच्या ज्या चुका त्यांनीं पृष्ठ २०० वर दाखवून दिल्या आहेत त्या वाचल्यां म्हणजे फार मौज वाटते.

एका वाक्यांत ग्रंथपरामर्ष करावयाचा तर आम्ही असें म्हणूं कीं, साहित्यशास्त्रासंबंधानें मराठींत जे कांहीं ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांत या ग्रंथानें मौल्यवान भर घातलेली असून, विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत चालू करण्यासारखें पुस्तक मराठींत नाहीं असें म्हणणाऱ्यांना पटवर्धन यांनीं या ग्रंथानें सक्रिय असें उत्तर दिलें आहे. पटवर्धन यांच्या काव्याप्रमाणें

त्यांचे गद्य ग्रंथहि असेच आणखी निर्माण होवोत अशी इच्छा प्रदर्शित करून हें पुस्तकपरीक्षण संपवितों.

---

## ३८ प्रतापगडचें युद्ध

प्रतापगडचें युद्धः— ( ले. कॅप्टन गणेश वासुदेव मोडक, ग्वाल्हेर आर्मी, ग्वाल्हेर, प्र. एन्. एन्. दातार ॲण्ड सन्स ७२ बुधवार पेठ, पुणें शहर. )

हिंदवी लष्करी इतिहासांतलें हें पहिलें पुस्तक ग्वाल्हेरच्या लष्करांतले एक तज्ज्ञ अंमलदार कॅप्टन मोडक यांनीं लिहिलें आणि तें पुण्याचे दातार ॲण्ड सन्स यांनीं प्रकाशित केलें याबद्दल लेखक व प्रकाशक या उभयतांचे मनःपूर्वक आभार मानणें हें पहिलें कर्तव्य होय. मराठी वाङ्मयांत लष्करी इतिहासावर आजपर्यंत एकहि ग्रंथ लिहिला गेला नव्हता. तो लिहिण्याचें महत्कार्य कॅप्टन मोडक यांनीं अनेक वर्षें परिश्रम करून सिद्धीस नेलें आणि दातार आणि मंडळी सारखे हौशी व धाडसी प्रकाशक या ग्रंथाला लाभले म्हणूनच हा ग्रंथ अशा मनोवेधक स्वरूपांत आज वाचकांच्या दृष्टीसमोर येत आहे.

हिंदुस्थानाचा राजकीय व सामाजिक इतिहास आपल्याच लेखकांनीं लिहिण्याचें भाग्य लाभण्यासच किती तरी वर्षें लागलीं. मग आपल्या वाङ्मयांत लष्करी इतिहासाचा आजपावेतों अभावच असावा यांत नवल तें काय ? ब्रिटिश सरकारनें ज्या वेळीं हिंदी प्रजेला निःशस्त्र केलें त्याच वेळीं हिंदी लोक लष्करी ज्ञानास पारखे झाले. अशा स्थितींत एका हिंदी कप्तानानें हिंदुस्थानांतील एखाद्या लढाईचें लष्करी तज्ज्ञाच्या दृष्टीनें अध्ययन करून त्या लढाईचा लष्करी इतिहास लिहिणें अशक्यच होतें. पण सुदैवानें हिंदुस्थानांतलीं कांहीं संस्थानें ब्रिटिशांच्या सर्वभक्षक दाढेंतून बचावलीं आहेत, म्हणूनच असला एखादा तरी ग्रंथ लिहिण्याचा योग येऊं शकला. अगदीं अलीकडे ब्रिटिश सरकारनें विलायतेंतील सँढर्स्टसारख्या लष्करी कॉलेजाचा दरवाजा हिंदी लोकांना किंचित् उघडून दिला आहे. तेव्हां त्यांतून आधुनिक लष्करी शिक्षण संपादून हिंदी

लष्करी अधिकारी तरबेज होतील व त्यांच्या हातून भावी काळांत असली लष्करी इतिहासलेखनाची कामगिरी होण्याचा संभव आहे. पण तत्पूर्वीच कॅप्टन मोडक यांनीं आघाडी मारली याचें कौतुक करावें तितकें थोडेंच आहे.

पण केवळ लष्करी इतिहासावरील हा पहिलाच ग्रंथ आहे व तो इतक्या दीर्घ परिश्रमानें पद्धतशीर मांडणी करून लिहिला गेला येवढ्याचकरितां आम्ही या ग्रंथाचें कुतूहलपूर्वक स्वागत करीत नसून त्या ग्रंथाची योग्यता जाणूनच ग्रंथकारास धन्यवाद देत आहों. अर्थातच आमच्या मतें कॅप्टन मोडक यांचा हा प्रयत्न फारच चांगला साधला आहे. या पुस्तकाबरोबर ११ नकाशांची जी पिशवी मिळते तींतील नुसत्या नकाशांचेंच जरी निरीक्षण केलें तरी तेवढ्यावरून देखील कॅप्टन मोडक यांच्या दीर्घोद्योगाची आणि पद्धतशीर मांडणीची वाचकांना कल्पना येईल. एखादा भाडोत्री लेखक असता तर त्यानें फार तर एखादा सटरफटर नकाशा देऊन तेवढयावर वाचकांची बोळवण केली असती; पण हें पुस्तक लिहिण्यांत कॅप्टन मोडक यांचा उद्देश अत्यंत उदात्त असल्यामुळें त्यांनीं हा लष्करी इतिहास तरुण वाचकांना शक्य तितका बोधप्रद व स्फूर्तिदायक व्हावा या हेतूनें तो शक्य तितका अधिक सजविला आहे. ग्रंथकारांनीं आपला हा हेतु प्रस्तावनेंत व्यक्त केला आहे तो असा—

" बुद्धिगत बहुतेक सर्व शाखांमधून आमचे गणितज्ञ आतां चमकूं लागले आहेत. त्यांच्यामध्यें आमच्या देशांतील जगविख्यात सेनापतीची भर पडावी असें माझ्या शिपाईबाण्याच्या अंतःकरणाला वाटतें आणि अशा भावी शिकंदरांना स्फूर्ति मिळावी म्हणून मी माझ्या महाराष्ट्राच्या नेपोलियनाचें यशोगान मोठ्या प्रेमानें केलें आहे. तें वाचकांनीं मान्य करून घ्यावें व आपल्या तरुणांना अशी स्फूर्ति मिळावी म्हणून लष्करी शिक्षण विश्वविद्यालयांतून मिळण्याकरितां झटून खटपट करावी. " या उद्गारांत ग्रंथकाराची जी कळकळ व्यक्त होते तीच त्यांच्या या ग्रंथरचनेंत पदोपदीं व्यक्त होत असल्यामुळें हा ग्रंथ इतका आदरणीय झाला आहे.

अफझुलखान व शिवाजीमहाराज यांच्यामध्यें जी झटापट झाली तिला अफझुलखानाचा वध किंवा खून असें नांव देऊन परकीय इतिहासकारांनीं

या मोहिमेच्या रहस्याचा पूर्ण विपर्यास केला होता. कॅप्टन मोडक यांनीं त्या प्रसंगास ' प्रतापगडचें युद्ध ' हें नांव देऊन त्याचें यथार्थ स्वरूप वाचकांपुढें उभें केलें आहे. शिवाजीच्या हातून खानाचा मृत्यु होणें ही त्या युद्धाची केवळ प्रस्तावना होती, आणि शिवाजीमहाराजांनीं आपल्या अपूर्व रणकौशल्यानें खानाची अफाट सेना गारद करण्याचा जो व्यूह रचला होता तो जर सिद्धीस गेला नसता तर खानाच्या वधाला कांहींच महत्त्व राहिलें नसतें. अर्थातच खानाचा वध हा प्रतापगडच्या युद्धांतील केवळ पहिला डाव होता. आणि त्याच्या जोरावर शिवाजीनें त्या युद्धांत अखेरचें यश संपादन केलें. तरी तेवढ्यामुळें प्रतापगडच्या युद्धाचें महत्त्व नाहींसें होऊं शकत नाहीं. पण पूर्वीच्या इतिहासकारांच्या कांगावखोर-पणामुळें असो, किंवा भ्रामक समजुतीमुळें असो, खानाच्या वधावांचून प्रतापगडच्या युद्धांत दुसरा कांहीं विचारार्ह असा भागच नाहीं, अशीच वाचकांची आजवर समजूत होऊन गेली होती. कॅप्टन मोडक यांनीं ही भ्रामक समजूत पार उधळून लावून प्रतापगडच्या युद्धांतील सर्व प्रसंगांना यथोचित महत्त्व व योग्य स्थान दिलें आणि त्या युद्धाची यथार्थ रूपरेषा साकल्येंकरून वाचकांपुढें मांडली ही पहिली मोठी कामगिरी होय.

हें कार्य करीत असतांना ग्रंथकारानें इतिहासाचा विपर्यास केला कीं काय याचा विचार करणें जरूर आहे. ऐतिहासिक कादंबरी म्हटली तरी तींत देखील इतिहासांतील मूलभूत ठळक गोष्टींचा विपर्यास केलेला खपत नाहीं, मग लष्करी इतिहासांत विपर्यास कसा खपेल ? म्हणून ग्रंथकारानें तसा विपर्यास केला असता तर हा ग्रंथ कुचकामाचा ठरला असता. सुदैवानें तसा प्रकार झाला नाहीं. उलट ग्रंथकार कॅप्टन मोडक हे इतिहाससंशोधनांत सगळा काळ घालविणारे इतिहासप्रेमी गृहस्थ नसून, त्यांचा सगळा काळ लष्करी वाङ्मय अभ्यासण्यांत व लष्करी हालचाली करण्यांत जात असतां त्यांनीं शिवकालीन ऐतिह्याचा इतका सूक्ष्म अभ्यास केला आणि एखाद्या सरावलेल्या इतिहासज्ञाप्रमाणें त्याचा उपयोगहि या ग्रंथरचनेंत केला हें खरोखरच कौतुकावह आहे. पण त्यांच्या असल्या साधार व प्रमाणबद्ध लेखावर इतिहासाच्या विपर्यासाचा आक्षेप घेण्यांत येतो हें आश्चर्य नव्हे काय ? कॅप्टन मोडक यांनीं जीं विधानें केलीं आहेत त्यांना ठिकठिकाणीं आधार नमूद करण्यास ते विसरले नाहींत.

हे आधारभूत ग्रंथ सगळेच एकसारखे प्रमाणभूत असतील असें नाहीं. तरी पण जेथें त्यांच्या विधानाला प्रत्यक्ष विरोधकारक वचन आढळत नसेल तेथें त्यांनीं दिलेला आधार बखरीचा असला तरी तो खरा मानून चालण्यास हरकत नाहीं. तसेंच जेथें त्यांना प्रत्यक्ष आधार सांपडला नाहीं, पण तर्कपद्धतीनें कांहीं अनुमान बसविणें जरूरीचें वाटलें, तेथें तसें अनुमान आपण कशावरून बांधितों याचीं कारणें त्यांनीं नमूद केलीं आहेत. आणि ऐतिहासिक आधारावरून केलेलीं विधानें कोणतीं व अनुमानानें ठरविलेलीं विधानें कोणतीं यांचा वाचकांस घोटाळा पडूं नये म्हणून त्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत ३१ व्या पृष्ठावर तर्क विशिष्ट विधानें आंकडेवार दिलीं आहेत. इतकी काळजी ग्रंथकारानें घेतली असून देखील कांहीं टीकाकार त्यांच्यावर निराधार लेखनाचा किंवा विपर्यासाचा आरोप करतात यांतला हेतु काय असावा बरें? ग्रंथकारानें तर्काच्या पायावर रचलेलीं इमारत ढांसळून टाकावयाची असल्यास त्यांची तर्कपद्धति कोठें चुकली आहे तें दाखवावयास हवें. पण टीकाकारांच्या लेखांत तसा प्रकार मुळींच आढळत नाहीं!

मूळ आधारग्रंथांत जें विधान केलेलें नाहीं तें तर्काच्या जोरावर करण्याची आपणास जरूर कां भासली याचाहि खुलासा ग्रंथकारानें पृष्ठ ३२ वर केला आहे तो असा—

" शास्त्रीय तर्कपद्धतीनें युद्धशास्त्रांतील प्रमेयें काढतां येतात आणि तीं महत्त्वाच्या कागदोपत्री आधारावरून खरीं ठरतात ही गोष्ट भावी अभ्यासकांना खरोखर उत्तेजन देईल. " तसेंच प्रस्तावना पृष्ठ ४ वर ते लिहितात:— " युद्धभूमीवरील पडदा बाजूला सारून तेथें चाललेला प्रसंग वाचकांच्या नजरेसमोर प्रत्यक्ष उभा केला आहे. युद्धभूमि म्हणजे केवळ रक्तपात आणि हाणामारी, अशा समजुतीनें कित्येकांची नजर भूतदयेमुळें युद्धापासून परावृत्त होत असली तरी तेथें बराच भाग सेनानायकांनीं प्रगट केलेल्या बुद्धिबळाचा आहे हें दिसून आल्यावर तरी त्यांचें मन युद्धांचा अभ्यास करण्याकडे कौतुकानें वळेल अशा आशेनें सर्व अंगांचें व उपांगांचें सोपपत्तिक विवेचन करण्याचा येथें प्रयत्न केला आहे. तो वाचून युद्ध म्हणजे तीन—चतुर्थांश राजकारणच आहे हें समजूं लागेल आणि अनभ्यासामुळें किंवा पूर्वग्रहामुळें झालेले गैरसमज दूर

होऊन इतिहासांतील युद्धशास्त्र आणि प्रत्यक्ष युद्धें याकडे दुर्लक्ष करण्याची प्रवृत्ति नष्ट होईल."

असा दुहेरी हेतु डोळ्यासमोर ठेवून हा ग्रंथ लिहावयाचें ठरविल्या-मुळें कॅ. मोडक यांनीं शिवाजीमहाराजांच्या सैन्यांच्या हालचाली हल्लींच्या युद्धशास्त्रांतील पद्धतीशीं किती तंतोतंत जुळतात हें दर्शविण्याकरितां हल्लींच्या युद्धशास्त्रविषयक शब्दांचें स्पष्टीकरण करून मराठ्यांच्या सैन्याच्या कोणत्या हालचाली तत्सदृश आहेत तें सांगितलें आहे. या-वरून कित्येकांची अशी समजूत झालेली दिसते कीं, कॅ. मोडक यांनीं आपल्या लष्करी ज्ञानाचें प्रदर्शन करण्याकरितां आणि मराठे सैनिकांनीं आधुनिक लष्करी शास्त्रांतून हिकमती लढविल्या होत्या हें सिद्ध करून त्यांची योग्यता वाढविण्याकरितां हा खटाटोप केला असावा. पण हा तर्क साफ चुकला आहे. कॅ. मोडक यांना स्वतःच्या ज्ञानाचेंहि प्रदर्शन करावयाची उत्सुकता नाहीं आणि मराठे सरदारांनीं विसाव्या शत-कांतील युद्धशास्त्रांतील नक्कल केली असें म्हटल्यानें त्यांची योग्यता वाढते, नाहींतर ती अजिबात लोपते असं मानण्याइतके ग्रंथकार कांहीं बालिश नाहींत. ही तुलना करण्यांत कॅ. मोडक यांचा एकच उद्देश आहे व तो हाच कीं, अर्वाचीन लष्करी शास्त्र म्हणजे कांहीं तरी अगम्य चीज असल्यामुळें पूर्वींच्या किंवा आजच्याहि अज्ञानी हिंदी सेनापतींना तसले डावपेंच साधावयाचे नाहींत असली जी आमची भ्रामक समजूत राज्यकर्त्यांच्या भाईबंदांनीं करून दिली आहे व जी आमच्यांतीलच कित्येकांनीं वेदवाक्याप्रमाणें उराशीं बाळगली आहे ती साफ खोटी आहे असें दाखवून द्यावें. लढाईचीं मुख्य तत्त्वें त्रिकाला-बाधित असतात; साधनांत फरक होत जातो, पण तेवढ्यानें तत्त्वें बदलत नाहींत आणि जो कोणी खरा चतुर व धाडसी सेनापति असेल त्यानें युद्धशास्त्रावरील एकहि पुस्तक चाळलें नसलें तरी देखील त्याच्या हालचाली साहजिकच युद्धशास्त्राबरहुकूम होतात, हेंच कॅ. मोडक यांना सांगाव-याचें आहे. व तें त्यांनीं उत्कृष्ट विवेचनानें सिद्ध केलें आहे. शिवाजीमहा-राजांचें युद्धकौशल्य प्रशंसनीय ठरण्यास अर्वाचीन लष्करी पद्धतीच्या कसोटीवर तें घासून पाहण्याचें कांहींच कारण नाहीं. उलटपक्षीं आधुनिक

युद्धकलेचे पुस्तका डावपच शिवाजीमहाराजांच्या रणपद्धतीस विरोधक आढळतील तर त्यांच्याच युक्तायुक्ततेविषयीं शंका घ्यावी लागेल इतकी महाराजांची योग्यता आहे. 'ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति' ही जी सिद्ध पुरुषांची कोटि तसल्याच तोडीच्या लष्करी सिद्ध पुरुषांच्या कोटींतले शिवाजीमहाराज हे अग्रेसर आहेत. अर्थातच 'वाचमर्थोऽनुधावति' या तत्वाप्रमाणेंच शिवाजीमहाराजांनीं आधीं डावपेंच लढविले व त्यांना अनुसरून लष्करी शास्त्रनिर्मात्यांनीं शास्त्र लिहून ठवलें असेंही म्हणतां येईल इतकें पूर्ण सादृश्य त्या दोहोंत आहे. असे प्रतिभासंपन्न वीर पूर्वीं आपल्यांत होऊन गेले असल्यानें अर्वाचीन युद्धशास्त्र हें कांहीं अगदींच आपल्या अवांक्याबाहेरचें नाहीं ही गोष्ट स्पष्ट झाल्यानें तरुणांच्या अंतःकरणांत लष्करी विद्येचें अध्ययन करण्याची स्फूर्ति उत्पन्न व्हावी हाहि एक ही तुलना करण्यांत हेतु संभवतो. आपल्याकडे शास्त्रें लिहून ठेवण्याची कला रूढ नसली तरी त्या त्या शास्त्रांतले तज्ज्ञ आपल्यांत होऊन गेले नाहींत व त्यांची परंपरा आपल्यांत जिवंत नाहीं असें नाहीं. उदाहरणार्थ, पोहण्याची किंवा अश्वारोहणाची विद्या घ्या. या शास्त्रावर आपल्या भाषेंत भाराभर पुस्तकें नसलीं तरी पोहण्याची किंवा घोड्यावर बसण्याची कला आपल्यांत नाहीं असें कोण म्हणेल ? आणि कै० बाबासाहेब आपट्यांसारखा एखादा अश्वारोहणपटु घोड्यावर बसून फेरफटका करीत असतां एखाद्या आधुनिक विद्वानानें Horse riding वरचें एखादें इंग्रजी पुस्तक हातांत घेऊन घोड्याच्या या गतीला या पुस्तकांत अमुक म्हटलें आहे असें सांगितलें तर जिवंत विद्येपेक्षां त्या पुस्तकी विद्येला तो अधिक मान देतो असेंहि ठरत नाहीं. कॅ. मोडक यांनीं आपल्या पुस्तकांत प्रतापगडच्या युद्धाचें वर्णन अर्वाचीन लष्करी भाषेंत लिहून दाखविलें आहे व तें तसें दाखविण्यांत युद्धशास्त्राचे मूलभूत सिद्धांत त्रिकालाबाधित असतात, शिवाजी महाराजांनीं अंतःस्फूर्तीनें त्यांचा अवलंब केला आणि हल्लींचे लष्करी तज्ज्ञ या शास्त्राचा जो एवढा बाऊ करून दाखवितात व हिंदी लोकांची लष्करी हुद्देदारीवर नेमणूक करतांना जी साशंकवृत्ति दाखवितात ती चुकीची असून आपले मावळे सरदार ही सर्व विद्या कोळून प्याले होते, तेव्हां आज त्या शास्त्राचें नांव ऐकतांच आमच्या अंगाचा कांहीं थरकांप होण्याचें कारण नाहीं इत्यादि गोष्टी वाचकांच्या मनावर त्यांना बिंबवावयाच्या

आहेत व तें कार्य त्यांच्या पुस्तकानें उत्तम साधेल अशी आम्हांस खात्री वाटते.

## प्रतापगडचें युद्ध

( उत्तरार्ध )

प्रतापगडच्या युद्धांत शिवाजीमहाराजांनीं योजिलेले सर्व डावपेंच आणि दर्शविलेलें युद्धकौशल्य, अगदीं अर्वाचीन युद्धशास्त्रांतील संग्रामशास्त्राला धरून कसें आहे हें कॅप्टन मोडक यांनीं साधार विवेचनानें सिद्ध केलें आहे. हें विवेचन करीत असतां आधुनिक रणनीतीशीं शिवाजीच्या डावपेंचांचा मेळ बसण्यासाठीं म्हणून ग्रंथकारानें खऱ्या इतिहासाचा विपर्यास केला आहे कीं काय हें पाहिलें पाहिजे. असा विपर्यास केलेला आढळेल तर तो एक मोठाच दोष मानावा लागेल. पण तसा विपर्यास केलेला आढळत नाहीं. कांहीं आक्षेपकांनीं कॅप्टन मोडक यांच्या विवेचनांतील वैगुण्य म्हणून जीं स्थळें निर्दिष्ट केलीं आहेत त्यांत देखील ऐतिहासिक माहितीला विसंगत असें कोणतेंच वर्णन नाहीं.

अफझुलखानाचें सैन्य किती होतें याविषयीं काय तो थोडासा मतभेद होऊं शकेल. पण कॅप्टन मोडक यांनीं ज्या आधारावरून खानाच्या फौजेची संख्या ३४००० ठरविली आहे, ते आधार चुकीचे व अविश्वसनीय आहेत असें जोंपर्यंत आक्षेपकांनीं सिद्ध केलें नाहीं तोंपर्यंत कॅप्टन मोडक यांचे आंकडे चुकीचे ठरत नाहींत. आणि ते बरोबर आहेत असें सिद्ध करण्याच्या पुराव्याचा बोजा कॅप्टन मोडक यांच्यावर राहात नाहीं. अफझुलखान पैजेचा विडा उचलून शिवाजीला तो असेल तेथून पकडून आणण्याकरितां चढाईच्या संकल्पानें निघाला होता. आणि या अरिष्टांतून आपला व आपल्या राज्याचा बचाव कसा करावा या विवंचनेंत महाराज होते, व आपल्या बचावास अनुकूल अशी परिस्थिति प्राप्त करून घेण्याकरितांच ते प्रतापगडच्या टापूंत जाऊन राहिले. तें कळतांच खानहि आपला पुण्याचा रोख बदलून प्रतापगडावर चालून गेला. यावरूनच खानाचें सैन्य शिवाजीच्या सैन्यापेक्षां पुष्कळच मोठें असलें पाहिजे असें अनुमान निघतें. खानाचें

सैन्य महाराजांच्या सैन्याच्या दुप्पटतिप्पट असल्याशिवाय तो प्रतापगडच्या डोंगराळ मुलुखांत शिरण्यास धजलाच नसता. आणि ज्याअर्थी तो बिन-दिक्कत चालून आला त्याअर्थी त्याचेजवळ तशीच मातबर फौज असली पाहिजे.

## चार ठिकाणच्या झटापटी

प्रतापगडाजवळच्या या युद्धांत चार ठिकाणीं झटापट झाली असें कॅप्टन मोडक यांनीं सूक्ष्म निरीक्षण करून ठरविलें आहे. आणि त्यांनीं चारहि झटापटींचीं स्थळें निश्चित केलीं आहेत. कोयनापार व जावळी या दोन ठिकाणच्या युद्धाविषयीं मतभेद नाहींच. वाई येथें खानाच्या सैन्याचा मुख्य तळ होता, व खानाचें घोडदळ व बहुतेक तोफखाना तेथेंच होता. अशा गोटांवर नेताजी पालकरानें हल्ला करून गोटाचें सामान, हत्ती, उंट, खजिना वगैरे सर्व कांहीं लुटलें, हें टीकाकारांनाहि कबूल आहे. पण ही लूट त्यास लढाई केल्याशिवाय मिळाली असें ते लिहितात. मोड-कांनीं दिलेल्या लढायांची संख्या खोटी पाडण्याकरितां, अफझुलखानाच्या सैन्यास इतकें नामर्द ठरविण्याला टीकाकारांना दिक्कत वाटली नाहीं. घोडदळ व पायदळ मिळून दहावीस हजारांची छावणी वांईस पडली होती, व तिच्या संरक्षणाकरितां तोफखानाहि सज्ज होता. अशी छावणी लढाई करून शत्रूला नामोहरम केल्याशिवाय लुटणें शक्य आहे काय ? ह्याचें उत्तर कोणीहि खरा लष्करी तज्ज्ञ नकारार्थींच देईल. अर्थातच टीकाकारांना ही वांईची लढाई मान्य करावीच लागणार. राहतां राहिली जनीटेंबची लढाई. आणि ज्याअर्थीं खानानें आपल्या बरोबर आणिलेले १५०० शिपाई कोठें उभे होते, हें टीकाकार सांगूं शकत नाहींत, त्याअर्थी कॅप्टन मोडक यांनीं समक्ष जाऊन टेहेळणी करून ठरविलेली जनीटेंबची जागाच चौथ्या लढाईचें रणक्षेत्र मानिलें पाहिजे. अर्थातच यांत कॅप्टन मोडक यांनीं इतिहासाचा विपर्यास केला नसून त्यांना चूक ठरविणारे टीकाकारच घोटाळ्यांत पडत आहेत.

## नेताजीचा छापा

नेताजी पालकरानें वाईच्या छावणीवर हल्ला करून खानाचा सगळा गोट लुटला हें जर सिद्ध आहे तर नेताजीनें हा छापा अचानक घातला असला पाहिजे. नाहीं तर आपल्या सैन्याहून संख्येनें अधिक, तोफांनीं

संरक्षित व प्रतिकाराकरितां सज्ज अशा सैन्याची नेताजीला इतकी दाणादाण उडवितां आली नसती. म्हणूनच नेताजीनें हा हल्ला रातोरात केला असला पाहिजे असा कॅ. मोडक यांचा तर्क आहे व तोच संभवनीय दिसतो. टीकाकारांना मोडकांची कल्पना चुकीची वाटत असल्यास त्यांनीं नेताजी हा दुसरे दिवशीं दिवसाढवळ्या वांईनजीकच्या खानाच्या गोटावर चालून आला व लढाई करण्याचा प्रसंग न येतां नेताजीनें खानाची छावणी लुटली असें विधान आपल्या लेखांत करावें व तें वाचकांना कितपत पटतें तें पाहावें.

प्रतापगडाच्या युद्धांत तोफांचा उपयोग कितपत झाला हा एक वादाचा प्रश्न आहे. या संबंधांत निश्चित विधान करण्याला कॅ. मोडक यांस आधार आढळला नाहीं म्हणूनच त्यांनीं आपली सगळी कल्पना तर्काच्या पायावर उभारिली आहे. निश्चित असें विधान सहसा कोठें केलें नाहीं म्हणून टीकाकारांचा या संबंधींचा ऊहापोह अनाठायीं आहे. त्याचप्रमाणें हल्लींच्या सैन्यांत सॅपर्स व मायनर्स जें काम करतात तसलें काम करणारे बेलदार लोक त्या वेळीं सैन्यांत असत हेंहि कॅ. मोडक यांचें विधान यथार्थच आहे. पण कित्येक टीकाकारांनीं मोडकांच्या विधानांचा विपर्यास करून मोडकांच्याच पदरांत विपर्यासाचा दोष बांधण्याचा हास्यास्पद प्रकार केला आहे, याबद्दल त्यांची कींव करावी तितकी थोडीच आहे.

कॅ. मोडक यांच्या विवेचनावर आणखी एक मोठा आक्षेप असा आहे कीं, त्यांनीं शिवाजीमहाराजांच्या कर्तबगारीचें श्रेय समर्थ रामदासस्वामींना उगाच दिलें आहे. या संबंधांत टीकाकारांचें अज्ञान फारच शोचनीय आहे. त्यांची सगळी भिस्त काय ती प्रिन्सिपाल भाटे यांच्या लेखांवर; पण ज्या वेळीं प्रिन्सिपालसाहेबांना शिवाजी व रामदास यांच्या भेटीच्या कालासंबंधानें व इतर साहाय्यासंबंधानें अनेक आधार दाखविण्यांत आले त्यावेळीं स्वत: प्रिन्सिपाल भाटे यांनीं असें कबूल केलें कीं, मी हें सगळें समर्थकालीन वाङ्मय वाचलेलें नाहीं, यास्तव हें सर्व वाचून मग मी आपलें मत पुन: ठरवीन. अशा रीतीनें स्वतः भाटेच जोंपर्यंत आपलें मत निश्चितपणें सिद्ध करूं शकले नाहींत, तोंपर्यंत त्यांचा डळमळीत आधार घेऊन प्रतिपक्षावर हल्ला करणें हें अश्लाघ्य होय. श्री-

समर्थ व शिवाजी यांचा परस्परांशीं संबंध अशा स्वरूपाचा होता कीं, त्या-योगानें उभयतांच्याहि मनांतील उद्दिष्ट साध्य होण्यास उत्कृष्ट साहाय्य झालें, पण त्यांत कोणालाही कमीपणा येण्यासारखा कांहींच प्रकार नाहीं. उभयतांचे पराक्रम एकमेकांस पोषक असेच असले तरी त्यांचीं कार्यक्षेत्रें इतकीं पृथक् पृथक् होतीं कीं त्यांच्यांतील संबंध हा तज्ज्ञासच ओळखतां येईल. कॅ. मोडक यांनीं तो यथार्थपणें जाणला आहे, पण त्याचें मर्म जाणण्याइतकी पात्रता व सदिच्छा ज्यांच्या अंगीं नसेल त्यांनीं कॅ. मोडक यांजवर आग पाखडावी यांत कांहीं नवल नाहीं.

### शिवाजीचे डावपेंच

अफजुलखान विजापुराहून कोणत्या मार्गानें व रोंखानें निघाला आणि त्याचें उद्दिष्ट काय होतें व तें साधण्यासाठीं त्यानें आपला रोंख कसा-बदलला याविषयींचें सूक्ष्म विवेचन करून, कॅ. मोडक यांनीं असें ठर-विलें आहे कीं, शिवाजीमहाराजांनींच खानाला आपलें रणक्षेत्र बदला-वयास भाग पाडलें. याच्या उलट खान आपण होऊन जावळीच्या जाळींत शिरला अशी कल्पना करणें हें इतिहासाच्या व युद्धशास्त्राच्याहि अज्ञानाचें निदर्शक आहे. जिकडे शिवाजीमहाराज जातील तिकडे जाणें खानाला प्राप्त होतें. व हें ओळखूनच महाराजांनीं जाळें टाकून हें सावज कचाटींत पकडलें. शिवाजीमहाराज जावळीनजीक गेले नसते तर, केवळ जावळी घेण्याकरितां खान तिकडे वळला नसता. पण महाराजांनीं त्याच्या-वर अशी मोहनी टाकली कीं, महाराज सांगतील त्या प्रमाणें नाचण्यास तो तयार झाला, आणि अर्थातच भस्मासुराप्रमाणें बेफामपणें खानानें आपल्या हातानें आपला नाश करून घेतला.

आपण पसरून ठेविलेल्या जाळ्यांत शत्रूला चकवून आणणें व आपल्या योजनेप्रमाणें सगळे डावपेंच साधून शत्रूचा निःपात करणें यांत पराकाष्टेचें रणकौशल्य आहे. आपण योजून ठेविलेल्या ठिकाणीं शत्रु आला कीं, त्याचा हमखास पराभव झालाच असें नेपोलियन मानीत असे. आणि बहुतेक मोठ्या लढाया त्यानें याच पद्धतीनें जिंकल्या. वॉटरलूच्या लढा-ईत मात्र नेपोलियनला वेलिंग्टननें योजून ठेविलेल्या रणांगणावर लढाई द्यावी लागली व तिचा परिणाम जो व्हावयाचा तोच झाला! अर्थातच रणक्षेत्राची निवड स्वतः करून शत्रूला तेथें यावयास भाग पाडणें यांतच

सेनापतीची करामत आहे. प्रतापगडाच्या युद्धांत शिवाजीमहाराजांनीं अशी करामत दाखवून सर्वांस आश्चर्यचकित करून सोडलें हें खरें आहे. तरी-पण खान हा जर इतका घमेंडखोर नसता किंवा त्यानें कसेंहि करून शिवाजीला पकडणें हेंच आपलें उद्दिष्ट ठरविलें नसतें तर तो इतका अचा-नकपणें खड्यांत पडला नसता. यांत खानानें आपली नालायकीच दाख-विली. पण तेवढ्यानें शिवाजीमहाराजांनीं रचलेल्या व्यूहाचें महत्त्व कमी होत नाहीं.

या सर्व मुद्द्यांचा कॅप्टन मोडक यांनीं सविस्तर परामर्ष घेतला आहे. आणि शिवाजीमहाराजांनीं जी रणनीति लढवून अलौकिक यश संपादन केलें त्या रणनीतीचें यथास्वरूप शब्दचित्र रेखाटून वाचकांना उपकृत करून ठेविलें आहे.

## महाराजांचें युद्धशास्त्र

सारांश, कॅ० मोडक यांनीं या लढाईचें युद्धशास्त्रदृष्टीनें परीक्षण करून शिवाजीमहाराजांनीं योजिलेल्या सर्व हालचाली युद्धशास्त्राबरहुकूम कशा होत्या हें अतज्ज्ञ वाचकांसहि अगदीं सुलभतेनें समजावून दिलें आहे, हेंच या पुस्तकाचें वैशिष्ट्य होय. प्रतापगडाच्या युद्धासारखीं आणखी पांच पंचवीस पुस्तकें तयार होतील तर महाराष्ट्रीय वाचकांना युद्धशास्त्र व लष्करी डावपेंच हे परिचित होतील. युद्धशास्त्राचा नुसता पुस्तकी परिचय होण्यापासून कांहीं विशेष लाभ घडत नाहीं. तथापि लष्करी विद्येचा हल्लींच्या विद्यार्थ्यांस प्रथमपासूनच परिचय घडत गेल्यास त्यांच्या मनांत दडून बसलेली भीति दूर होईल आणि लष्करी विद्येचा अनुभव पाहाण्याचीहि त्यांना स्फूर्ति होऊं लागेल. आणि त्या स्फूर्तीला अनुसरून त्यांचा प्रत्यक्ष लष्करांत प्रवेश झाल्यास त्यांना आढळून येईल कीं, ज्या लष्करी विद्येस भिऊन आपण दूरदूर पळत होतों ती लष्करी विद्यादेखील आत्मसात् करणें फारसें अवघड नाहीं. या विद्येंत आपण मन घालूं तर तिच्यांतहि आपली प्रगति झपाट्यानें होऊं शकेल. तरुण विद्यार्थ्यांत अशी भावना उत्पन्न होऊन त्यांनीं या शास्त्राकडे अधिक लक्ष पुरवावें आणि अशा रीतीनें शेंकडो विद्यार्थी लष्करी ज्ञानांत तरबेज झालेले पाहा-तांच या विषयाचा युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमांत समावेश करणें सीने-टला अवश्यक वाटावें व विद्यार्थ्यांना तो विषय घेण्याची तीव्र इच्छा

व्हावी. हाच हेतु प्रस्तुत पुस्तक लिहिण्यांत कॅ. मोडक यांचाहि असावा व तो सिद्धीस जाण्यासाठीं त्यांनीं हें पुस्तक लिहिण्याचा एवढा आटोकाट प्रयत्न केला असावा. या दृष्टीनें 'प्रतापगडचें युद्ध' हें पुस्तक लिहून कॅ. मोडक यांनीं मोठीच कामगिरी बजाविली आहे यांत शंका नाहीं. आक्षेपकांच्या निराधार टीकेस न जुमानतां त्यांनीं आपला हा उपक्रम असाच चालू ठेवावा अशी त्यांस आमची शिफारस आहे.

---

## ३९ मध्ययुगीन भारत

( भाग ३ रा; हिंदु भारताचा अंत )

श्रीयुत चिं. वि. वैद्य यांनीं मध्ययुगीन भारत या ग्रंथाचा हा तिसरा खंड हल्लीं प्रसिद्ध केला आहे. ह्या ग्रंथाचा पहिला खंड १९२० च्या डिसेंबरांत प्रसिद्ध झाला, दुसरा फेब्रुवारी १९२३ मध्यें प्रसिद्ध झाला, व तिसरा गेल्या जानेवारींत प्रसिद्ध झाला आहे. अशा रीतीनें ह्या ग्रंथप्रकाशनाचें काम आज ६ वर्षें चालू आहे व लेखनाचें काम १९२० च्या पूर्वींहि कांहीं वर्षें चालू होतें. अर्थात् श्रीयुत वैद्य यांचा गेल्या १० वर्षांतील मुख्य विद्याव्यासंग या त्रिभागात्मक व सुमारें १५०० शें पृष्ठांच्या ग्रंथानें फलित झाला आहे. पण या अवधींत ग्रंथकर्त्याला या विषयासंबंधानें केवळ प्रकाशनाचेच श्रम पडले असें नाहीं तर, या ग्रंथाची सामुग्री जमविण्याकरितां दूर देशीं प्रवास व संशोधन करावें लागलें. उतार वयांत असलें महत्कार्य हातून घडण्याला विद्येच्या अभिरुचीहून दुसरें कांहीं एक प्रभावी असें कारण देतां येण्याजोगें नाहीं. श्रीयुत वैद्य यांचा विद्याव्यासंग, विशेषतः ग्वाल्हेर संस्थानांतील नोकरी त्यांनीं सोडल्यापासूनचा, किती दांडगा आहे हें रामायण भारतादि इतिहास काव्यांवरील त्यांच्या ग्रंथांवरून लोकांस दिसून आलेंच आहे. परंतु प्रस्तुतचे हे तीन खंड मिळून बनलेला मध्ययुगीन भारताचा इतिहास त्यांच्या विद्वत्तेप्रमाणें त्यांच्या इतिहासनिष्ठेची व परिश्रमक्षमतेची अधिक साक्ष पटवील असें आम्हांस वाटतें. भारत रामायण हे ग्रंथ मूळ इतिहासात्मक असले तरी त्यांना पुष्कळसें काव्याचें स्वरूप आहे. त्या ग्रंथांत वर्णन केलेल्या काळासंबंधानें अस्सल ऐतिहासिक पुरावा मिळणें शक्यच नाहीं. परंतु

रामायणावरील टीकात्मक निबंध, भारताचा उपसंहार, रामचरित्र व कृष्ण-चरित्र इत्यादि ग्रंथांच्या द्वारें वरील काव्यग्रंथांतून जितकें अनुमानिक ऐतिहासिक सत्य, पारा हा सोनें शोषून घेतो त्याप्रमाणें शोषून घेतां आलें तितकें वैद्यांच्या मार्मिक बुद्धीनें मराठी वाचकवर्गापुढें ठेविलेंच आहे. संस्कृत वाङ्मयाचा इतिहास या ग्रंथांतहि त्यांनीं ऐतिहासिक दृष्टीच ठेविली आहे. परंतु त्यांत संस्कृत ग्रंथविषयक सामान्य माहिती हाच विशेष असून वैद्यांच्या ऐतिहासिक बुद्धीला त्या ग्रंथांत हवा तेवढा वाव मिळाला नाहीं. त्यांनीं लिहिलेली 'दुर्दैवी रंगू' ही कादंबरी नांवानें कल्पित असली तरी तींतहि त्यांनीं आपलें इतिहासावरील प्रेम व्यक्त केलेलें आहे. पण, प्रस्तुत ग्रंथांनीं त्याच्या इतिहासविषयक प्रेमाला व चिकित्सक बुद्धीला जितकें क्षेत्र मिळालें तितकें एरवी केव्हांहि मिळालें नाहीं. 'भारत इतिहास मंडळांतील' मराठ्यांच्या इतिहासाच्या संशोधनांत श्री. वैद्य हे मधून मधून भाग घेत असतात. तथापि या ग्रंथांत, त्यांनीं केलेलें 'भारत' इतिहास संशोधन हें नांव सार्थ करणारें संशोधन आलें आहे. या ग्रंथानें विवेचन केलेला काळ असा आहे कीं, त्या संबंधानें इतिहासाची भूक प्रत्यक्ष कागदपत्र मिळून भागण्यासारखी नाहीं. अर्थात्, ताम्रपट, शिलालेख, मुसलमानी व इतर परदेशीय ग्रंथकारांचे ग्रंथ, इंग्रज ग्रंथकारांचे ग्रंथ व दंतकथा हेंच या ह्या कालांतील इतिहासाचें साधन आहे. पण ह्या सर्व साधनांचें एकीकरण करून विवेचनात्मक ग्रंथ आजवर मराठी भाषेंत कोणीहि लिहिला नव्हता. तो लिहून श्री. वैद्य यांनीं मराठी वाचकवर्गावर अत्यंत मोठा उपकार करून ठेवला आहे.

'मध्ययुगीन' काल म्हणजे संधिप्रकाशाचा काल. या कालांत म्हटलें तर डोळ्यास दिसतें म्हटलें तर दिसत नाहीं. अर्थात्, इतिहास लेख-काला या कालाचा इतिहास लिहितांना चाचपडत जावें लागतें. तथापि श्री. वैद्य यांनीं इ. स. ६०० ते १२०० शें पर्यंतच्या कालाचे जवळ जवळ सारखे तीन भाग पाडून हिंदुराज्यांची उत्पत्ति, उत्कर्ष, व लय या अवस्थात्रयीची माहिती, मार्गावर मधून मधून दिवे लावावे त्याप्रमाणें, वाचकांस समजून सांगितली आहे. इ. स. ६०० पूर्वींहि हिंदूलोकांचे पूर्वजच येथें राज्य करीत होते. परंतु तो काल आर्यकाल व आर्यबुद्धकाल या नावांनीं उल्लेखून सन सहाशेंच्या पूर्वीचा इतिहास सोईसाठीं श्री. वैद्य

यांनीं त्यापुढील काळाच्या इतिहासापासून वेगळा सोडविला आहे. सन बाराशेंच्या पुढच्या काळांतहि प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या तीन खंडांतील इतिहाससूत्र पुढें चालूंच आहे. आणि श्री. वैद्य यांच्या संकल्पाप्रमाणें त्यांनीं या पुढील काळांतील इतिहास लिहून एखादा चौथा खंड प्रसिद्ध केला तर तो हवाच आहे. कारण, देवगिरीच्या यादव राजांच्या नाशापासून बहामनी राजांच्या मुसलमानी बादशहांनीं तालिकोट येथें विजयनगरच्या राज्याचा नाश करीपर्यंतचा कालहि त्याविषयींच्या अज्ञानामुळें, जवळ जवळ मध्ययुगीन या सदरांत ढकलण्यासारखाच आहे. यानंतर, महाराष्ट्रांत मुसलमानी अमलाविरुद्ध प्रतिक्रिया सुरू झाली व कालांतरानें ती यशस्वीहि झाली. अर्थात्, सतराव्या व अठराव्या शतकांतील महाराष्ट्राचा इतिहास हा इकडील मुसलमानी राज्यसत्तेच्या उपशमाचा काळ असल्यामुळें त्याचाहि एखादा ५ वा भाग वैद्य यांनीं लिहिला असतां आम्हांस बरें वाटेल. कारण इतिहास व त्यांतल्या त्यांत मानवी उत्कर्ष हा सरळ रेषात्मक नसून लाटांकृति असतो म्हणजे चढ व उतार हीच ऐतिहासिक प्रकृति होय; एकजात चढ किंवा उतार नव्हे. हेंच खरें ऐतिहासिक सत्य असून हिंदुस्थानासंबंधानें त्याची सशास्त्र मांडणी व्हावयाची तर, महंमद गझनीच्या स्वारीपासून प्रारंभ झालेला इतिहास सन १८०३ पर्यंत म्हणजे इंग्रजांनीं दिल्ली ही तिच्या बादशहा सकट मराठ्यांच्या हातून घेईपर्यंतचा एक समजून लिहिला पाहिजे. इंग्रजी राज्य हिंदुस्थानांत स्थापन झाल्यावर त्या कारणानें जसा हिंदु राज्यांचा इतिहास तसा मुसलमानी राज्यांचाहि इतिहास संपला. इंग्रज गेल्यावर मुसलमान हिंदूंना जिंकणार कीं हिंदू मुसलमानांना जिंकणार हा पुढचा प्रश्न आहे. पण तो एका नव्या अशा लाटेचा प्रारंभ होईल व या नव्या इतिहासानंतर काल हा नव्या इतिहास–लेखकांनाहि जन्मास घालील. त्याची काळजी करण्याचें आम्हांस कारण नाहीं. पण श्री. वैद्य यांना हा चवथा व पांचवा खंड लिहिण्याचें सुचविण्याचें आमचें कारण हेंच कीं, ह्या पांच खंडांत मिळून हिंदूंच्या उत्कर्षा–अपकर्षाप्रमाणेंच हिंदुस्थानांतील मुसलमानांच्याहि उत्कर्षा–अपकर्षाचा इतिहास लोकांना एकत्र व सुसूत्र असा वाचकांना वाचावयास मिळेल.

मुसलमानी राज्यांचा अपकर्ष झाल्यावर हिंदू राज्यानें हिंदुस्तानांत

डोकें वर काढलें, एवढेंच नव्हे तर, हिंदूपैकीं मराठ्यांनीं सर्व हिंदुस्थानभर हिंदुपदपादशाही स्थापण्याचें योजिलें होतें. ही गोष्ट वैद्य यांच्या इतिहासाची एक अवश्य पुरवणी होय; व या दृष्टीनें अलीकडे प्रसिद्ध झालेलें श्री. विनायकराव सावरकर यांचें हिंदूपदपादशाही या नांवाचें इंग्रजींत लिहिलेलें पुस्तक वाचकांचे नजरेसमोर सहजच येतें. सदर पुस्तकांत त्यांनीं शिवाजी महाराजांच्या जन्मापासून सन १८१८ पर्यंतच्या महाराष्ट्राच्या इतिहासाचें सिंहावलोकन केलें आहे. त्यांतील सर्व वर्णनांचा रोख आम्हीं वर दर्शविल्याप्रमाणें मुसलमानी साम्राज्याचा पाडाव मराठी सत्तेनें क्रमानें कसा पूर्णतेस नेला हें दाखविण्याचाच आहे. हिंदूपदपादशाही हा ग्रंथ वैद्य यांच्या ग्रंथाप्रमाणें विवेचक स्वरूपाचा नसून उद्बोधक स्वरूपाचा आहे. तथापि तो लिहितांनाहि इतिहासाच्या मदतीचा अव्हेर सावरकर यांनीं केलेला नाहीं. पानपतच्या युद्धानंतर पंचवीसच वर्षांनीं गोविंदराव पुरुषोत्तम पेशव्यांना लिहितो कीं, "जैसें साताऱ्याचें संस्थान आपले स्वाधीन आहे तैसें दिल्लीचें संस्थान आपले स्वाधीन राहे ऐसा समय आहे." पानिपतानंतर अबदालीनें दिल्ली पाहिली नाहीं. आणि १७८६ सालींच पेशव्यांचा वकील पेशव्यांना वरीलप्रमाणें लिहूं शकला. यावरून पानपतास पराभव मराठ्यांचा झाला तरी कायमचा पराभव मुसलमानांचाच झाला ही गोष्ट सिद्ध होते. हें सर्व लिहिण्याचा हेतू इतकाच कीं, श्री. चिंतामणराव वैद्य यांचे हातून मुसलमानांच्या चढत्या काळांतील मध्ययुगीन हिंदुस्थानाचा व हिंदू राज्यांच्या अपकर्षाचा इतिहास लिहून झाला, तसाच यापुढील मुसलमानी राज्याच्या पडत्या काळांतील अपकर्षाचा व मराठ्यांच्या हिंदूपदपादशाहीच्या धोरणाच्या उत्कर्षाचा इतिहासहि त्यांचेच हातून लिहून व्हावा अशी आमची इच्छा आहे व ती पूर्ण होवो.

प्रस्तुतच्या तिसऱ्या खंडांत गझनीच्या महमुदाच्या पहिल्या स्वाऱ्यांपासून अजमीर, कनोज, दिल्ली, बनारस यांच्या उच्छेदापर्यंतची हकीकत दिलेली आहे. त्यांत क्रमानें भाटीया, मुलतान, नगर कोट्टें, मुलतान, ठाणेश्वर, कनोज, कालेंजर, सोमनाथ वगैरे वरील स्वाऱ्या, निरनिराळीं रणक्षेत्रें, राजपुताना, बुंदेलखंड, अन्हिलवाडा, बंगाल, महाराष्ट्र, तंजावर वगैरे ठिकाणचीं हिंदूराज्यें, राजवंश, मांडलिक घराणीं वगैरेंची माहिती

दिली आहे. तसेंच मधून मधून शंकास्थानांच्या चर्चेचीं टिपणेंहि आहेत. मुख्य विवेचक भाग म्हटला म्हणजे साहाव्या पुस्तकांतील पंजाब-काबूलचा उच्छेद आणि सातव्या पुस्तकांतील उत्तर हिंदुस्तानचा उच्छेद या विषयीं असून, एवढीं हिंदु राज्यें इकडे असतां बोलून चालून परदेशाहून येणाऱ्या कांहीं थोड्या परधर्मी लोकांचा पाय येथें कसा रोंवला गेला याची श्री. वैद्य यांनीं केलेली मीमांसा लक्षांत ठेवण्यासारखी आहे. या ग्रंथाचे तीनहि खंड लिहून होत असतां या मीमांसेचा प्रश्न ग्रंथकाराच्या डोळ्यापुढें निरंतर उभा असून प्रत्येक खंडांत त्यांनीं एतद्विषयक चर्चा थोडीबहुत केलेली आहे. सूक्ष्म दृष्टीनें पाहणारांस चर्चेतील कार्यकारणभाव कोठें किंचित् डळमळल्यासारखे दिसतात. पण कोणच्याहि ऐतिहासिक ग्रंथांत खऱ्या हकिगतीला जितकें प्राधान्य असतें तितकें अनुमानात्मक चर्चेला असत नाहीं. ऐतिहासिक सत्य एकच असतें, पण ऐतिहासिक अनुमानें अनेक असूं शकतात. असो. कृतज्ञतेची व्याख्या अधिक उपकारांची अपेक्षा अशी मार्मिक लोक करतात. तिला धरून श्री. वैद्य यांनीं हा ग्रंथ पुरा केला याबद्दल वाचकवर्गातर्फे आम्हीं यांचेविषयीं कृतज्ञ आहों असें म्हणतों याचा अर्थ आम्हीं वर दर्शविल्याप्रमाणें यापुढील दोन भाग त्यांनीं पुरे करावे अशी विनंति करतों हाच होय.

---

## ४० मध्ययुगीन भारताचा इतिहास

श्री. नानासाहेब वैद्य यांनीं नुकताच तीन भागांत संपूर्ण केलेला मध्य-युगीन भारताचा इतिहास इतिहासप्रेमी व हिंदुधर्माभिमानी लोकांकरितां मुदतीची सवलत देऊन तीनहि भाग घेणारास थोडक्या किंमतीस (७॥ रु.) देण्याची व्यवस्था केली आहे ही गोष्ट अभिनन्दनीय आहे. कारण हा इतिहास हिंदुस्थानाच्या राजकारणाचा व हिंदुधर्माचा अभ्यास व विचार करणाऱ्या लोकांस अत्यंत महत्त्वाचा आहे. प्रत्येक भागाचे वेळीं आम्ही त्याचें परीक्षण केलेंच आहे तरी तीनहि भागांतील मध्ययुगीन काळाच्या इतिहासाचें महत्त्व किती आहे हें दाखविण्यासाठीं त्यांचें एकत्र समालोचन करणें अवश्य आहे. हिंदुस्थानाच्या इतिहासाचें मध्ययुग म्हणजे श्रीहर्षा-

नंतर बौद्ध धर्मास उतरती कळा लागून प्रथम कुमारिल भट्टानें व नंतर श्रीशंकराचार्यांनीं त्या धर्मास नामशेष केलें व हिंदुधर्माची हल्लींच्या स्वरूपांत स्थापना झाली तेव्हांपासून तों मुसलमानांनीं हिंदुस्थान पादाक्रांत केल्यापर्यंतचा काळ होय. या काळाचा इतिहास ज्या अनेक निरनिराळ्या कोरीव लेखांत विखुरलेला होता, ते लेख एकत्रित करून हिंदुस्थानचा समष्टिदृष्टीनें राजकीय, सामाजिक व धार्मिक इतिहास श्री. वैद्यांनीं मोठ्या परिश्रमानें परकीय अशा चिनी व अरबी विद्वान प्रवाशांनीं लिहून ठेव-लेल्या हकिकतीशीं मेळ घालून तयार केला हें काम फारच महत्त्वाचें झालें आहे. मुसलमानांपूर्वी व अलेक्झांडरानंतर आपल्या देशांत कोण कोण राजे झाले हें आपल्या लोकांसही माहीत नाहीं. असा हा अंधकारांत पडलेला इतिहास श्री. वैद्य यांनीं उजेडांत आणला याबद्दल त्यांचे खरोखर आभार मानले पाहिजेत.

या इतिहासाची कल्पना त्यांस गिबनच्या इतिहासावरून सुचली असें त्यांनीं प्रस्तावनेंत म्हटलें आहे. आणि गिबनप्रमाणेंच त्यांनीं विवेचक बुद्धि आणि वृत्त व हेतु यांचा निश्चय करतांना न्यायाधिशाची समतोल दृष्टि उपयोगांत आणली आहे. इतिहासकारास एक प्रकारची दृष्टि असावी लागते व ती वैद्यांस आहे असें विद्वान पाश्चात्य लेखकांनींहि मान्य केलें आहे. लंडनमधील इंडिया ऑफिसचे मुख्य लायब्रेरियन डॉक्टर टॉमस पहिल्या भागाविषयीं लिहितात, " The book is full of careful information and displays good historical judgment" " हर्ष आणि त्याचा काळ यांच्या संबंधानें इतक्या किंमतीचा एकहि ग्रंथ हल्लीं नाहीं, आणि हा ग्रंथ या काळच्या इतिहासाच्या अभ्यासकांस केवळ अपरिहार्य आहे " असें त्यानें आणखी म्हटलें आहे. तिसऱ्या भागासंबं-धानें टाईम्समधील परीक्षणांत ग्रंथकाराच्या निःपक्षपातीपणाबद्दल यथायोग्य स्तुति केली आहे. तात्पर्य, इंग्रज लेखकहि इतिहासकारांस अवश्य असलेले गुण, ऐतिहासिक विवेचकबुद्धि व न्यायाधिशाचा समतोलपणा या इतिहासांत दिसत असल्याचें मान्य करतात आणि म्हणूनच मध्ययुगीन काळाचा हा इतिहास गिबनचा 'रोमन साम्राज्याचा ऱ्हास" या इतिहासासारखा हिंदुस्थानासंबंधानें झाला आहे असें म्हटल्यास अति-शयोक्ति होणार नाहीं.

गिबनच्या इतिहासांत वर्णिल्याप्रमाणें ज्या आरब व तुर्क लोकांनीं रोमन साम्राज्यास हाणून पाडलें, त्याच लोकांनींहि हिंदुस्थानांतील साम्राज्यास कसें हाणून पाडलें हें या इतिहासांत साधार व साद्यंत वर्णिलें आहे. हे मुसलमानांचे धक्के तीनदां किंबहुना पांचदां बसले. प्रथम ७१२ इसवींत सिंध पडलें आणि अरबांनीं सिंध काबीज करून मुसलमानी राज्य तेथें स्थापिलें. दुसऱ्यांदा तुर्कांनीं इ.स. १०११त पंजाब जिंकून आपली सत्ता व आपला धर्म तेथें कायम केला. तिसऱ्या वेळीं अफगाण व तुर्क यांनीं पृथ्वीराजाचा पराभव पानपतावर करून उत्तर हिंदुस्थान जिंकलें. चौथ्या वेळीं अल्लाउद्दीन खिलजीनें इ. स. १३०० च्या सुमारास महाराष्ट्र खालसा केलें आणि पांचव्या वेळीं इ. स. १५६५ त बाहामनी राजांनीं एकवटून विजयनगरावर हल्ला करून दक्षिणचें शेवटचें हिंदु राज्य उध्वस्त केलें. वैद्यांनीं उत्तर–हिंदुस्थानांत मुसलमानी अम्मल इ. स. १२२५ चे सुमारास स्थापन झाल्यापर्यंतचा इतिहास लिहिला आहे. पण आम्ही पूर्वी म्हटल्याप्रमाणें हिंदुस्थानच्या इतिहासाचें कॉन्स्टांटिनोपल दिल्ली न मानतां विजयनगर मानलें पाहिजे आणि आणखी एक चौथा भाग लिहून वैद्यांनीं आपल्या इतिहासाची पूर्तता केली पाहिजे. विजयनगरच्या विध्वंसाचा इतिहास जरी प्रसिद्ध व लिहिला असला तरी महाराष्ट्रास मुसलमानांनीं कसें व कां पादाक्रान्त केलें हा इतिहास अद्याप कोठें विवेचिलेला नाहीं आणि तो वैद्यांनींच आपल्या पद्धतीनें लिहिला पाहिजे.

रोमन साम्राज्य इसवी सनाच्या पांचव्या शतकांत कळसास पोंचून उतरणीस लागलें तें इ. स. १४५३ त कॉन्स्टांटिनोपल तुर्कांनीं घेतलें तेव्हां नष्ट झालें. या सुमारें १००० वर्षांच्या अवधींत निरनिराळ्या युरोपांतील देशांत निरनिराळे नामांकित राजे कसे झाले याचा सविस्तर वृत्तान्त गिबननें दिला आहे. त्याचप्रमाणें वैद्यानींहि हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत कोण कोणते नामांकित राजे झाले याचा साधार इतिहास दिला आहे. तो हिंदु लोकांस खरोखर अभिमानास्पद आहे. या सर्व राजांची माहिती वाचकांस बहुतेक नवीन आहे. पहिला नामांकित राजा मेवाडचें राज्य स्थापन करणारा बाप्पा रावळ होय. यानें सिंधमधून पुढें येऊं पाहणाऱ्या आरब जेत्यांस प्रथम ठोकर देऊन पराभूत केलें. जशी पश्चिमेकडे जाणारी आरबी विजयाची लाट चार्लस मार्टेल या फ्रँक सेना-

पतीच्या शौर्यरूपी खडकावर फुटली त्याचप्रमाणें पूर्वेकडे वाढणारी आरबांची लाट बाप्पा रावळानें तोडली आणि त्यामुळें हिंदुस्थान पांचशें वर्षें मुसलमानांच्या ताडाक्यांतून वांचलें. बाप्पा रावळ यांस सर्व रजपूत मान देतात याचें कारण हेंच. रजपूत या वेळेपासून हिंदुस्थानच्या रंगभूमीवर दिसूं लागतात याचें कारण त्यांचा हिंदुधर्माभिमान आणि त्यांनीं केलेला मुसलमानांच्या स्वाऱ्यांचा विरोध असें जें वैद्यांनीं म्हटलें आहे तें बरोबर आहे. आमच्या मतें अजूनहि हिंदूधर्माचा पूर्ण अभिमान रजपूतांसच आहे आणि हेच रजपूत हिंदुधर्माचे संरक्षक आहेत. रजपुतांत शिवाजीच्या मराठ्यांचाहि अन्तर्भाव होतो हें सांगणें नको.

बाप्पा रावळानंतर झालेल्या अनेक नामांकित हिंदु राजांनीं हिंदुस्थानांत राज्य केलें व मुसलमानांस पुढें येऊं दिलें नाहीं. पण सिंध किंवा पंजाबमधून मुसलमानांस त्यांस बाहेर घालवून देतां आलें नाहीं याचें आश्चर्य वाटतें. हा इतिहासहि रोमन साम्राज्याच्या इतिहासासारखाच आहे. शेंकडो शूर खिस्ती राजांनीं आपलें पुण्यक्षेत्र जेरूसलेम, आरबांनीं पहिल्या तडाक्यांत कबजांत घेतलेलें, सोडविण्याचा अनेक क्रूझेडस्मध्यें प्रयत्न केला व जानजान पछाडली पण त्यांस तें घेतां आलें नाहीं. त्याचप्रमाणें शूर हिंदु राजांनींहि हिंदुस्थान मुसलमानांच्या हातून सोडविण्याचा प्रयत्न केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं. कनोजचा प्रतिहार सम्राट भोज याची मनोरंजक गोष्ट आरब प्रवाश्यांनींच लिहून ठेवलेली वैद्यांनीं दिली आहे ती येथें देण्यासारखी आहे. मुलतान मुसलमानांच्या ताब्यांत असून जेव्हां जेव्हां प्रतिहार सम्राट त्यावर चाल करून जाई त्या त्या वेळीं आरब प्रतिकार करण्यास समर्थ नसल्यानें तुम्ही पुढें याल तर मुलतान येथील प्रसिद्ध सूर्याची मूर्ति आम्ही फोडून टाकूं अशी धमकी घालीत आणि त्यामुळें हिंदु लोक परतून जात. दक्षिणेकडे आरबांची लाट कच्छ–गुजराथ ओलांडून दक्षिणापथ जिंकण्याच्या उद्देशानें पुढें आली तेव्हां तिचा जबरदस्त पराभव दक्षिणेच्या मराठ्यांनीं, पुलकेशीनें स्थापिलेल्या गुजराथेंतील वंशांत उत्पन्न झालेल्या एका राजानें, नवसरी येथें इ. स. ७३७ त केला आणि सर्व दक्षिण देश यामुळें आणखी सहाशें वर्षें स्वतंत्र म्हणूनच राहिला. "दारितोदित–सैन्धव–कच्छेल्ल—चावोटक—मौर्य—गुर्जरादिराज्ये, निःशेष दाक्षिणात्यक्षिति-

प्रतिजिगीषया दक्षिणापथप्रवेशे प्रथममेव नवसारिकाविषयप्रसाधनाय आगते समरशिरसि विजिते ताजिकानीके " असें पुलकेशीच्या नवसारी येथें सांपडलेल्या ताम्रपटांत वर्णन आहे (भा. १ पा. १६७). तात्पर्य, उत्तरेकडील व दक्षिणेकडील रजपुतांनीं या वेळीं पुढें सरसावून आपल्या शौर्यानें व हिंदुधर्माभिमानानें आरबांशीं लढून देशाचें स्वातंत्र्य पांच–सहा शतकें कायम ठेविलें हें त्यांस भूषण आहे.

या मध्ययुगाच्या सहाशें वर्षांच्या अवधींत अनेक शूर व विद्याप्रिय राजे निरनिराळ्या भागांत झाले. त्यांचा समग्र नामनिर्देश करणें शक्य नाहीं. पण काश्मीरचा ललितादित्य, कनोजचा राजा भोज प्रतिहार, गोविंदचंद्र गाहडवाल, धारचा भोज, गुजराथ अनहिलपाटणचा जयसिंह; महाराष्ट्राचा पुलकेशि चालुक्य गोविंद राष्ट्रकूट व विक्रमादित्य चालुक्य, कांचीचा राजसिंह नरहरिवर्मन्, तंजावरचा राजराज चोळ, बंगालचा बल्लाळ सेन वगैरे राजांचीं नांवें उल्लेखण्यासारखीं आहेत. यांनीं पाटण, कांची, तंजावर, जगन्नाथ वगैरे ठिकाणीं बांधलेलीं देवळें त्यांच्या वैभवाची अद्याप साक्ष देत आहेत. त्यांनीं केलेले किंवा करविलेले संस्कृत ग्रंथ त्यांची विद्वत्ता अद्याप जगापुढें दाखवीत आहेत. दक्षिणेंतील विक्रमादित्य चालुक्याचा मंत्री विज्ञानेश्वर यानें केलेला मिताक्षरा ग्रंथ हल्लींहि कायदेपंडित वंद्य मानतात. भोज परमाराचें काव्य, योग इत्यादि शास्त्रांवरचे ग्रंथ अजून प्रमाणभूत मानले जातात. अशा रीतीनें हे शूर व विद्वान राजे प्रजेस न्यायानें वागवून व उत्तम बंदोबस्त ठेवून लोकांस सुख देत. काठेवाडापासून बिहारपर्यंत पसरलेल्या प्रतिहाराच्या कनोजच्या राज्यांत वाटसरू लुटले जात नाहींत असें आरबी प्रवाश्यांनीं लिहून ठेविलें आहे. याप्रमाणें अनेक विद्वान, शूर व लोकप्रिय राजे रजपूत घराण्यांत होत असतां शेवटीं मुसलमानांनीं रजपूत हिंदु राजांचा विध्वंस कसा केला हा एक महत्त्वाचा ऐतिहासिक प्रश्न आहे. हजार–आठशें वर्षे झगडा चालवून युरोपांतील राजांनीं शेवटीं युरोपच्या बाहेर (स्पेन व बल्गेरिया वगैरेंतून) मुसलमानांस घालवून दिलें. याच्या उलट पांच–सहाशें वर्षे नेटानें लढून रजपुतांनीं मुसलमानांस थोपवून धरिलें असतां शेवटचा हिंदु सम्राट पृथ्वीराज याचा पराभव झाल्याबरोबर हिंदुस्वराज्याचा कसा विध्वंस झाला याचा विचार ऐतिहासिक विवेचन करणा-

ऱ्यास पडतो. तो विचार वैद्यांनीं तीन वेळां केला आहे. प्रथम सिंध पडलें तेव्हां, दुसऱ्यांदां पंजाब गझनीच्या महंमुदानें जिंकलें तेव्हां, तिसऱ्यांदां कुतुबुद्दिनानें दिल्ली वगैरे उत्तर–हिंदुस्थान जिंकलें तेव्हां. वैद्यांनीं केलेली ही भिन्न भिन्न कारणमीमांसा मननीय आहे. आणि तीपासून भावी राजकारणाचा विचार करणाऱ्यांनीं बोध घेण्यासारखा आहे.

गिबननें पश्चिमेकडील रोमन साम्राज्य म्लेंच्छांनीं कसें बुडविलें याची कारण मीमांसा करतांना अहिंसा प्रधान ख्रिस्ती धर्माचा रोमन राज्यांत प्रसार हें एक त्याचें कारण मानलें आहे. वैद्यांनीं सिंधचा पाडाव, किंबहुना पुढील सर्व हिंदुस्थानाचा पाडाव अंशतः तरी (बौद्ध व हिंदुधर्मातील) अहिंसातत्त्वानें झाला असें विवेचन केलें आहे. हा प्रश्न जरी अत्यंत महत्त्वाचा आहे आणि आधुनिक कित्येक हिंदी विद्वानहि अशा मताचे आहेत तरी ही गोष्ट वादग्रस्त आहे. पण एवढी गोष्ट निर्विवाद आहे कीं, युरोपांतील राष्ट्रें हल्लीं अहिंसा प्रतिपादणाऱ्या ख्रिस्ती धर्माचीं असलीं तरी आपल्या हिंसासामर्थ्यानेंच इतर खंडांतील लोकांस आपल्या ताब्यांत ठेवीत आहेत. तेव्हां अहिंसा तत्त्व प्रसृत करणें जसें मानवी प्रगतीचें लक्षण आहे तसें हिंसाबल कायम ठेवणें हेंहि एक राजनीतिचें व शांतीचेंहि प्रधान अंग आहे. असो, अहिंसा प्रश्न रजपुतांस बाधक होत नाहीं आणि रजपुतांचें शरीरबल आणि शौर्य मुसलमनांहून कधीहि कमी नव्हतें. रजपुतांच्या पराभवाचें कारण त्यांच्यांतील बेबनाव हेंच होय. महंमुदानें सोमनाथावर स्वारी केली त्यावेळीं कुशल सेनापतीप्रमाणें त्यानें एका अकल्पित मार्गानें चालून येऊन गुजराथेवर धाड घातली व पाटणच्या सोळंखी राजास पळविलें. पण त्याच वेळीं धारच्या भोज परमारानें त्यास साहाय्य करून महंमुदावर चाल केली असती तर निदान सोमनाथाची लूट घेऊन जात असतां महंमुदाचा त्यास पराभव करतां आला असता. पृथ्वीराज चव्हाणावर स्वारी करण्यास जयचंद राठोरानें मुसलमानांस बोलविलें नाहीं असें वैद्य म्हणतात, तें खरें धरलें तरीं जयचंद तटस्थ न बसतां पृथ्वीराजाच्या मदतीस गेला असता तर भावी हिंदुस्थानचा इतिहास निराळा झाला असता. किंबहुना शेवटच्या पानपतच्या लढाईंत रजपुत व बुंदेले

उदासीन न राहते तर मराठ्यांचा खास विजय झाला असता. तात्पर्य फूट हेंच रजपुतांच्या नाशाचें कारण आहे.

हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या भागांत या सहाशें वर्षांत जीं निरनिराळीं रजपुतांचीं राजकुळें राज्य करीत होतीं त्यांचें सविस्तर वर्णन वंशावळी व राज्य कालाच्या मित्या यासह मोठ्या परिश्रमानें तयार करून वैद्यांनीं तीनहि भागांत दिलें आहे. व या रीतीनें महाराष्ट्र, मद्रास, बंगाल, मध्यदेश, राजपुताना, मावळा, गुजराथ व मध्यप्रांत याचा ६०० ते १२०० इ. पर्यंत तपशीलवार इतिहास वाचकांस बहुतेक अज्ञात असलेला वाचावयास मिळाला आहे. त्याबरोबरच कित्येक विद्वानांत जे वादग्रस्त प्रश्न उपस्थित झाले आहेत त्यांचा उहापोह टिप्पणींत केलेला आहे व तो संशोधकांना अवश्य वाचनीय आहेच पण सामान्य वाचकानांहि मनोरंजक वाटेल. उदाहरणार्थ, महंमुदाची व आनंदपाळाची शेवटची लढाई कोठें झाली या प्रश्नाचा विचार करून वैद्यानीं पंजाबांत जाऊन हजरोचें मैदान प्रत्यक्ष पाहून तेथें ही लढाई झाली हा सिद्धांत मान्य करून त्याचा नजरी नकाशाहि दिला आहे. अशी कित्येक ठिकाणची माहिती प्रत्यक्ष दक्षिणेंत व उत्तरेंत फिरून त्यांनीं मिळवून पुस्तकांत दिली आहे.

पण या इतिहासाचा सर्वांत अत्यंत महत्त्वाचा भाग म्हणजे आमच्या मतें प्रत्येक भागांत केलेलें हिंदुस्थानाचें सामाजिक, धार्मिक, राजकीय सामान्य निरीक्षण हें होय. या सहाशें वर्षांच्या अवधींत मूळ वैदिक धर्माचें रूपान्तर होऊन हिंदुधर्माचा उदय कसा झाला व तो हळूहळू हल्लींच्या स्थितींत कसा आला याचें विवेचन शिलालेख, ताम्रलेख व धार्मिक ग्रंथ यांच्या आधारें, तसेंच परकीय विद्वानांनीं लिहिलेलीं वर्णनें, यावरून ग्रंथकर्त्यानें केलें आहे. प्रारंभींचें ह्युएनत्संग या चिनी प्रवाशाचें प्रवासवर्णन हिंदु समाजाची व धर्माची स्थिति कशी होती हें ठरविण्यास उपयोगी पडतें. नवव्या शतकांतील इब्नखुर्दादबा वगैरे आरब प्रवाशांनीं लिहिलेलीं वर्णनें मध्यकाळाची स्थिति ठरविण्यास उपयोगी आहेत. आणि इ. स. १००० च्या सुमारास हिंदु समाजाची व धर्माची स्थिति अल्बेरुणी या विद्वान् संस्कृत शिकलेल्या आरबी लेखकानें लिहून ठेवलेली आधारास घेतली आहे. हा विवेचनाचा भाग हिंदुधर्माच्या हल्लींच्या स्वरूपाचें ऐतिहासिक दृष्ट्या संशोधन करणाऱ्यास अतिशय महत्त्वाचा

आहे. या भागावरून हें निःसंशय होत आहे कीं, हल्लीं हिंदूंच्या संघटनेस ज्या बाबी विशेष नडतात त्या अगदीं अलीकडे म्हणजे इ. स. १०००च्या नंतर उत्पन्न झाल्या आहेत. पोटजातींची उत्पत्ति, शुद्धीची बंदी, क्षत्रिय–वैश्यांच्या अभावाची कल्पना, ब्राह्मणांचा इतर जातींशीं अन्न-व्यवहाराचा त्याग इत्यादि हिंदु समाजाचे तुकडे करणाऱ्या गोष्टी जुन्या नसून अर्वाचीन आहेत हें ऐतिहासिक प्रमाणांनीं सिद्ध होत आहे, याजविषयीं विस्तृत चर्चा अन्य प्रसंगानें करतां येईल. पण हिंदूंच्या व मुसलमानांच्या झगड्यांत जर हिंदूंना आपला मान व हक्क कायम ठेवावयाचा असेल तर हिंदूंनीं आपली संघटना या नवीन अडचणीच्या बाबी काढून टाकून मजबूत केली पाहिजे. असा प्रयत्न आणि त्या दिशेनें विचार करणाऱ्यांस श्री. वैद्यांनीं दिलेली ही ऐतिहासिक माहिती फार उपयोगी पडेल. तात्पर्य, हा मध्ययुगीन भारताचा इतिहास हिंदुस्थानाचें राजकारण, धर्मकारण इत्यादिकांचा अभ्यास करणाऱ्यास फारच उपयोगी आहे. श्री. वैद्यांनीं हे तीनहि भाग लोकमान्यांच्या प्रिय व पूज्य स्मृतीस अर्पण केले आहेत. ही गोष्ट या ग्रंथाच्या महत्त्वास साजेशीच आहे.

## ४१ ऐतिहासिक लेखसंग्रह भाग १४ वा

( लेखांक १ ला )

सुप्रसिद्ध इतिहास संशोधक कै० वासुदेवशास्त्री खरे यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या चिरंजिवांनीं प्रसिद्ध केलेला हा दुसरा व एकंदर मालेचा चौदावा भाग होय. या भागाचें शेवटचें पान ७९७६ असें आहे. यावरून या ग्रंथमालेच्या एकंदर विस्ताराची कल्पना सहजच लक्षांत येईल. यापैकीं सुमारें साडेपांचशें पानांचा तेरावा व सुमारें ६०० पानांचा हा चौदावा हे दोन भाग रा. यशवंत वासुदेव खरे यांनीं काढले, म्हणजे सुमारें हजार बाराशें पृष्ठें काढण्याचे श्रम घेतले, यावरून वडिलांचें काम पुरें करण्याची चिरंजीवांची हौसेची चिकाटी व्यक्त होते.

यासंबंधानें विशेष सांगण्यासारखे दोन मुद्दे. पहिला मुद्दा असा कीं, या ग्रंथसंपादनाच्या कामीं यशवंतराव यांनीं केवळ आयत्या पिठावर रेघा

ओढलेल्या नाहींत, तर वडिलांप्रमाणें स्वतः मळेकर पटवर्धनी दप्तराचें संशोधन करून शेकडों पत्रांच्या नकला हातानें करून घेतल्या, व त्यांच्या तारखा वगैरे ठरविण्याचा स्वतःच्या बुद्धीनें प्रयत्न केला.

या तेराव्या व चवदाव्या भागांतील पत्रें अखबारनवीस कारकुनांनीं लिहिल्यासारखीं म्हणजे सांगीव ऐकीव हकीकतीचीं कांहींशीं आहेत. पण यांत रा. यशवंतराव यांचा दोष नसून इतिहासाचाच दोष होय. म्हणजे ज्या काळांतील हीं पत्रें होत त्या काळांत पटवर्धन सरदारांच्या मुलूखगिऱ्या व त्यामुळें पराक्रम कमी होऊन, केवळ सरंजाम संभाळून रहाणें व तोलामोलानें पडेल तें व सांगितलेलें काम करणें अशी त्यांची पुष्कळ अंशीं स्थिति झाली होती. ही गोष्ट स्वतः कै. वासुदेवशास्त्री खरे यांनाहि जाणवली होती. म्हणून त्यांनीं १० व्या भागाच्या स्वतः संपादिलेल्या खंडांतच अशी सूचना देऊन ठेविली आहे कीं, " या पुढें तसल्या (पहिल्या प्रतीच्या महत्त्वाच्या) प्रकारचीं पत्रें पटवर्धनी दप्तरांत पुष्कळशीं सांपडण्याचा संभव कमी. " बाजीरावींत पटवर्धनांचें व नानांचें महत्त्व नाहींसें होऊन कारभार भलत्याच लोकांच्या हातीं गेला. वास्तविक परशरामभाऊ कैद झाले व नाना फडणवीस महाडाकडे पळून गेले, येथेंच पटवर्धन घराण्याचा वैभवसूर्य क्षितिजाजवळ जाऊन टेकला असें म्हणण्यास हरकत नाहीं. यापुढेंहि परशरामभाऊची सुटका होऊन पेशव्यांकडून त्यांचा सरंजाम मोकळा झाला; त्यांनीं सातारा व कोल्हापूर इकडे स्वाऱ्या केल्या; व शेवटीं पट्टणकुडीस रणमैदानावरच त्यांना मरण आलें ही गोष्ट खरी. तथापि, याहि पराक्रमांतील हकीकतींचें तेज मावळत्या सूर्याच्या तेजासारखेंच सौम्य वाटतें आणि परशरामभाऊ मेल्यानंतर तर पटवर्धन सरदारांच्या पराक्रमांचा ग्रंथच गुंडाळून ठेवल्यासारखा झाला. यापुढें रामचंद्रपंत आप्पा व चिंतामणराव आप्पा यांचीं नांवें अधूनमधून वाचावयास सांपडतात, परंतु त्यांत फारसें स्वारस्य नाहीं.

## संपादन कार्याचें महत्त्व

वरील हकीकत लक्षांत घेतल्यास १० ते १२ या खंडांतील पत्रांना जो गौणपणा चिकटला आहे तोच यशवंतराव यांनीं संपादिलेल्या पत्रांना असेल; त्याहून अधिक नाहीं. परंतु त्याबरोबर हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे कीं, केवळ अखबारनवीसवजा पटवर्धनी कारकुनांनीं लिहिलेल्या या

पत्रांना दुय्यम स्वरूपाच्या पुराव्याचें कां होईना पण प्रामाण्य भरपूर आहे. व मनोरंजकपणांत तर तीं पत्रें कोणच्याहि रीतीनें कमी नाहींत. प्रत्यंतरादाखल आम्ही असें सांगतों कीं, यापुढील धामधुमीच्या काळीं प्रत्यक्ष वावरणारे सरदार-मुत्सद्दी यांपैकीं बाळोजी कुंजर वगैरे लोकांनीं लिहिलेलीं कांहीं पत्रें अलीकडे प्रसिद्ध झालीं आहेत, तीं वाचलीं असतां कीती शुष्क वाटतात ! याचें कारण एक तर जुन्या सरदारांना मोडून पुढें आलेले बाजीरावींतले सरदार बहुतेक नादान, अप्रबुद्ध व आडमुठे असे होते. यामुळें अशा लोकांनीं, किंवा त्यांच्या हाताखालच्या तशाच लोकांनीं लिहिलेलीं पत्रें समुद्रांत उभा राहून कोरडा ठरणाऱ्या दैवहत मनुष्याच्या लाभाप्रमाणेंच निष्फळ ठरणार. न्यायकोर्टांतून पुष्कळ वेळां असें आढळून येतें कीं, प्रत्यक्ष पुराव्यापेक्षां अनुमानिक दुय्यम पुरावा हाच अधिक मनोरंजक असतो. तसाच कांहींसा प्रकार दरबारच्या एकाद्या कोपऱ्यांत बसून, पण कानोसा घेऊन मजकूर जमवून सजवून, लिहिलेल्या कारकुनी हकीकतीच्या या पत्रांचा झाला आहे.

यशवंतराव खरे यांच्या संपादनासंबंधीं सांगावयाची दुसरी गोष्ट अशी कीं, वडिलांनीं घालून दिलेला संपादनपद्धतीचा कित्ता त्यांनीं उत्कृष्ट गिरविला आहे. ही गोष्ट तेराव्या खंडाप्रमाणें चौदाव्या खंडांतील त्यांच्या प्रकरणविषयक लिहिलेल्या सविस्तर प्रस्तावना वाचून कोणाच्याहि ध्यानांत तेव्हांच येईल. 'पुत्रात् इच्छेत् पराजयम्' ही म्हण मार्मिक असेल; व मुलांच्या हातून आपल्याच कलेंत आपला पराभव झाल्यास बापालाहि वैषम्य न वाटतां आनंदच होईल. पण 'पुत्रात् इच्छेत् पराजयम्' या म्हणीपेक्षां 'पुत्रात् इच्छेत् प्रसाधनम्' ही म्हणच कोणाच्याहि दृष्टीनें अधिक चांगली ठरेल. विशेषतः पितापुत्रांच्या कामगिरीची तुलना बाप हयात असतांना करण्यापेक्षां, तो वारल्यानंतर त्याचें काम मुलानें कसें काय चालविलें यांत विशेष पाहण्यासारखी असते. कारण कार्यांत खंड पडणार तो बापाच्या मृत्युमुळें. याकरितां मरणकाळीं शेवटचे शब्द म्हणून, किंवा उत्तर क्रियेच्या वेळीं पिंडाला कावळा शिवविण्याकरितां इतरांनीं तोंडांतून काढलेले म्हणून किंवा एकाद्या परलोकविद्याप्रवीणानें प्लँचेटवर लिहून मागविलेले संदेशाचे शब्द म्हणून, आपल्या कामासंबंधानें मृतदेही सजीव आत्मा जें सांगेल व जें घडून आलेलें

पाहिलें असतां त्याला (परलोकांत विकारभावना असतील तर) आनंद होईल, असें काम मुलानें केलें तर तोच खरा सुपुत्र होय. व या दृष्टीनें रा. यशवंतराव खरे यांनीं खर्चलेली शाई या लेखांत श्राद्धांत सोडलेल्या तिलोदकांहून अधिक ग्राह्य अशीच त्यांच्या वडिलांना वाटेल. निदान मृताची किर्ति परलोकांत जात नसून ती इहलोकांतच राहावयाची असते. तेव्हां ती राहण्याला यशवंतराव यांचें हें वाङ्मयस्वरूपाचें वडिलांचें श्राद्ध पिंडोदक श्राद्धांपेक्षां अधिक उपयोगी पडेल यांत शंका नाहीं. या दोन्ही खंडांची मांडणी व विशेषतः त्यांतील प्रस्तावना पाहून त्यांच्या वडिलांच्या तोंडून 'शाबास' असे शब्द निघाले असते. कारण भाषा, मजकुराची जुळणी, विषयविल्हेवारी, अनुमानपद्धति, इतिहासांच्या अंतरंगाचा परामर्श या सर्व गोष्टी थेट त्यांच्या वडिलांसारख्याच साधल्या आहेत. आणि खुणेची गोष्ट म्हणूनच सांगावयाची तर आम्ही असें म्हणूं कीं, वासुदेवशास्त्री हे जसे मार्मिकपणानें व विनोद बुद्धीनें एकाद्या शब्दानें किंवा वाक्यानें सहज कोपरखळी मारून वाचकांना गुदगुल्या करीत, तसेंच यशवंतराव खरे यांनाहि कांहीं ठिकाणीं साधलें आहे. असो.

प्रस्तुतच्या चौदाव्या खंडांत सन १८०२ ते १८०४ या तीनच वर्षांतील ऐतिहासिक प्रसंग आहेत, पण ते एका दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचे होत. कारण या सालांतच वसईचा तह घडून आला. म्हणजे पगारी मैत्रीच्या पद्धतीचा तह करून बाजीराव पेशवे हे इंग्रजांचे हस्तक बनले. यामुळें या तहाच्या दिवशींच पेशवाई खरी गेली, व मराठी राज्य बुडालें, असें कित्येक इतिहासकारांचें मत आहे. तसेंच खुद्द वासुदेवशास्त्री खरे यांचेंहि मत होतें. वसईच्या तहाबरोबरच शिंदे व भोसले यांच्याशीं झालेल्या इंग्रजांच्या युद्धाच्या हकीकतीहि या चौदाव्या खंडांत आहेत. ही गोष्ट देखील कांहीं कमी महत्त्वाची नाहीं. कारण होळकर व इंग्रज या दोघांनीं (मिळून नव्हे तर स्वतंत्र रीतीनें) दौलतराव शिंदे मोडून काढले, म्हणजे मराठी दौलतीचा आधारस्तंभच उलथून पाडला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणून वसईचा तह हें जसें मराठेशाही बुडाल्याचें प्रत्यक्ष एक लक्षण, तसेंच या तहाचा राग येऊन इंग्रजांशीं लढण्याला उठलेल्या शिंद्याचा कायमचा पराभव होणें हें मराठ्यांच्या राज्यनाशाचें दुसरें व अप्रत्यक्ष लक्षण होय.

## काळपुळीवरील करट

स्वत: पेशवे नादान ठरून इंग्रजांच्या हातीं गेले याबद्दल जसा बाजीराव जबाबदार, त्याप्रमाणें एकांडेपणाच्या भरीला भरून आपली कुवत न ओळखतां युद्धाला उभे राहून, दौलतराव शिंद्यांनीं आपलें राज्य राखलें पण मराठ्यांचें राज्य मात्र कायमचें बुडविलें असें म्हणतां येण्यासारखें आहे. कसेंहि असो, अन्वय-व्यतिरेकानें मराठेशाहीची समाप्ति या चौदाव्या खंडांत वर्णिलेल्या पत्रांतून दिसून येते. ती पाहिली म्हणजे वाचकांचें मन उदास झाल्यावांचून राहात नाहीं. कारण मराठशाहीच्या निरनिराळ्या काळीं जीं कुलक्षणें एकेकटीं दिसून आलीं तीं सर्व या तीन वर्षांत एकवटलेलीं दिसून येतात! सातारचे राजे म्हणजे पहिल्या प्रतीची मध्यवर्ती सत्ता, ती दुबळी झाल्याला बराच काळ लोटला होता. पण त्या सत्तेचा ( कित्येकांच्या दृष्टीनें ) अपहार करणारे पेशवे तरी खंबीर होते, व त्यांनीं मध्यवर्ती सत्तेच्या दुबळेपणाचा दोष झांकून टाकला होता. पण पेशव्यांच्या भयानें सातारच्या किल्ल्यावर कैदेंत पडलेला दौलतीचा धनी, आणि इंग्रजांच्या निशाणांनीं भूषविलेल्या तरांड्यांत बसून त्यांच्याकडे संरक्षण मागण्यास जाणारा मुख्य प्रधान, ही जोडी पाहिली म्हणजे काळपुळीवर करट उठल्याप्रमाणें मराठेशाहीची रुग्णावस्था प्रतीत होते!

## वाईटाचें एकीकरण

धनी व मुख्य प्रधान हे दोनहि अशा रीतीनें नादान ठरल्यावर एकच आशा, व ती म्हणजे सरदारांनीं तरी गादीचा अभिमान धरून एकवटून इंग्रजाविरुद्ध हत्यार उपसावयास पाहिजे होतें. ही व कल्पनाच केली तर अशी रम्य कल्पना करतां येते कीं, " या मराठी सरदारांच्या संघानें इंग्रजांचा पराभव करून बाजीराव पेशवा हातीं परत घेतला, पण त्याला पदच्युत करून दुसऱ्या कोणा कर्तबगार सरदाराच्या नांवें प्रधान पदाचीं वस्त्रें आणविलीं, आणि प्रधानांनीं धन्याला केलेली अटक सोडवून तो नादान म्हणून त्यालाहि एखादा तरतरीत मुलगा दत्तक देऊन धनी व प्रधान यांची उमदी जोडी जमवून पुन: राज्यकारभार थाटला! " पण अशा कल्पना करून काय उपयोग? त्या इतिहासाच्या कपाटांत न आढळतां केवळ कल्पनावश मनाच्या अजबखान्याच्या गळाठ्यांतच सांठविलेल्या आढळून यावयाच्या. मात्र ही गोष्ट केवळ मराठी इति-

हासाचीच आहे असें नाहीं. प्रत्येक राष्ट्रावर असे प्रसंग येऊन गेलेलेच आहेत. असो. अशा रीतीनें मध्यवर्ती सत्तेचा नाश, जुन्या कर्तबगार इमानी सरदारांचा पाडाव, त्यांच्या जागीं नेमलेल्या नव्या सरदारांची नादानी, श्रेष्ठ कनिष्ठ अधिकाराच्या जाणिवेचा नायनाट, बरोबरीच्या सरदारांतील चुरस, समाजांतील लोकांचा छळ व बेअब्रू, निरंतर शांतताभंग व द्रव्यापहरण, स्वकीयांच्या वैभवाचा सर्व दृष्टीनें एकेक कलेनें लोप व परकीयांचा उत्कर्ष, या सर्व गोष्टी या तीन वर्षांत जितक्या एकवटलेल्या पाहावयास सांपडतात तितक्या सगळ्या मराठी इतिहासांत इतरत्र केव्हांहि पाहावयास सांपडत नाहींत.

पूर्वीच्या इतिहासांत संभाजीच्या वधाचा काळ हा असाच एका दृष्टीनें वाटतो. परंतु तेव्हां मध्यवर्ती सत्ता प्रत्यक्ष नष्ट झाली तरी, सदरांतून विखुरलेली सत्ता व शहाणपण व राष्ट्रभक्ति हींच इतकीं प्रबळ ठरलीं कीं, संभाजी जिवंत असता तर कदाचित् जे पराक्रम मराठ्यांच्या हातून घडले नसते ते त्याच्या अभावीं इतर सरदारांनीं करून दाखविले! संभाजीच्या शिरच्छेदानें मराठी राज्याचा वृक्ष तोडला गेलासा दिसला तरी, जिवट वृक्षाच्या रीतीप्रमाणें तोडींतूनच बेसुमार नवी फूट निघाली. पण इंग्रजांच्या कुऱ्हाडीनें जो मराठी वृक्ष पुढें तोडला गेला तो आंतून पोखरला गेलेला असल्यामुळें, कदाचित कालांतरानें तो ' तोडला ' म्हणण्यापेक्षां ' वठला ' म्हणण्याची पाळी त्याच्यावर आपोआप आली असती. या कामीं दक्षिणेंतील एक थोडके मराठी राज्य सोडलें असतां हिंदुस्थानभर इतर देशी राजेरजवाडे कांहीं थोडे नव्हते. पण त्यांच्यावर घाव न पडतांच ते जसे नामशेष झाले, व झाडावर बांडगूळ लागून कालांतरानें बांडगुळाचेंच झाड उरावें व मूळचें दिसतां दिसतां जागच्या जागीं नाहींसें व्हावें, तशी स्थिति मराठेतर राज्यांची झाली, ही स्थिति देखील दुःख वाटण्यासारखीच. परंतु मराठ्यांचा साम्राज्यवृक्ष हिंदुस्थानच्या सर्व भागांतून पसरलेला असून, वसईच्या तहाच्यापूर्वी पांचचार वर्षेंपर्यंत टवटवलेला व फुललेला असा दिसत असतां, १८०२।०३ च्या सुमारास तो वसईच्या तहानें एकदम जीर्ण झालेला व वठलेला दिसावा असा चमत्कार घडला. यामुळेंच हा अधःपात डोळ्याला अधिक ढळढळीत भासतो, म्हणून त्याचें दुःख अधिक. असो.

यशवंतराव खरे यांनीं संपादिलेल्या या १४ व्या खंडांतील कांहीं माहिती व त्यावरून सुचणारे विचार वाचकांपुढें मांडण्यासारखे आहेत, पण ते पुढील लेखांत देऊं.

---

## ऐतिहासिक लेखसंग्रह भाग १४ वा

( लेखांक २ रा )

मनुष्याला अशी एक उपजत खोड असते कीं, स्वतः न्यायाधीश असल्याप्रमाणें, जो दिसेल तो वादी किंवा प्रतिवादी कल्पून त्याच्या वर्तणुकीवर तो न्याय निवाडे म्हणून मतें प्रकट करीत असतो! या उपद्व्यापांत स्वतःच्या बरेवाईटपणाकडे त्याची दृष्टि कधीं जात नाहीं, म्हणजे तो अंतर्मुख कधीं होत नाहीं हें निराळें. पण समाजांत जशीं कांहीं कांहीं नातीं फुकाचीं म्हणून प्रसिद्ध आहेत, तसेच कांहीं कांहीं अधिकारहि फुकाचे असतात. गांवकाका, गांवमामा, गांवसासु हीं या फुकट नात्यांचीं उदाहरणें होत. त्यांत प्रत्यक्ष पुतण्या, भाचा, सून, नसलीं तरी चालतात. तसेंच कांहीं कांहीं गांवांतून फुकट रावसाहेब, फुकट फौजदार, फुकट शिलेदार आढळतात. त्यांतच फुकट न्यायाधीश या नांवाच्या अधिकाऱ्याचाहि समावेश केला पाहिजे. आणि हा अधिकार 'इतिहासवाचक' जितका आपणाकडे घेतो तितका दुसरा कोणी क्वचितच घेत असेल. या फुकट न्यायाधीशाला बसावयाला खुर्चीशिवाय किंवा बैठकीशिवाय न्यायमंदिर लागत नाहीं. त्याच्या पुढील पुरावा हा तर कागदीच असतो यांत नवल नाहीं. कारण खऱ्या न्यायकोर्टांतहि कागदी पुराव्याला जी किंमत ती तोंडी पुराव्याला नाहीं. पण त्याला शिक्षा सांगण्याला व ती बजावण्यालाहि तोंडच्या शब्दाशिवाय दुसरें कांहीं लागत नाहीं. पुष्कळांना तर असें वाटतें कीं, इतिहासाचा उपयोगच दुसऱ्यावर टीकेचे शेरे मारणें हा होय. आणि स्वतः न्यायाधीशाला गुन्हा माफ असतो असेंहि त्याला वाटत असावें. ऐतिहासिक विवक्षित प्रसंगीं तुम्हीं स्वतः काय केलें असतें, कसे वागलां असतां, असें कोणीं त्यांना विचारलें असतां ते ताबडतोब ठासून उत्तरें देऊं शकतील. पण त्यांना हें माहीत नसतें कीं, इतिहास ही

गोष्ट कांहीं पूर्वी एका काळीं संपून गेली असें नव्हे. तर वर्तमानकाळीं घडणाऱ्या गोष्टींनाहि कालांतरानें इतिहासाचेंच स्थान व महत्त्व येणारें आहे. तेव्हां पुढची पिढी मागच्या पिढींतील लोकांविषयीं अशीच सरसकट मतें प्रकट करील. पण आपणाला ती फारशी भूषणास्पद असतील असें नाहीं. पुढें आपल्याविषयीं जीं प्रतिकूल मतें बनविलीं जाणार त्यासंबंधीं, आमचा डिफेन्स आम्हांला कोणीं विचारण्याची संधि दिली, तर आम्ही आपली बाजू जगापुढें कांहीं मांडूंच. कारण आपल्याहि वर्तनांत परिस्थितीमुळें क्षम्य असें बरेंच असूं शकेल. पण हें सर्व आज घडलें तरच त्याचा कांहीं फायदा. पण हल्लींच्या कांहीं ट्रायब्यूनल्सप्रमाणें आमचा न्याय उद्यां आमच्या गैरहजेरींतच लोक करणार ! ऐतिहासिक न्यायनिवाड्यांचीहि अशीच स्थिति आहे.

## मराठशाहींतील बजबजपुरी

वरील विवेचन करण्यांत मुख्य हेतु हाच कीं ऐतिहासिक ले. सं. चा १४ खंड वाचतांना आपल्या डोळ्यापुढें अनेक गुन्हेगार येणार तेव्हां त्यांचा न्याय करून त्यांच्यावर शेरे मारतांना आपण आत्मौपम्यानें थोडेसें पाहिलें पाहिजे. सकृत् दर्शनीं हें खरें आहे कीं या खंडांत वर्णिलेल्या इतिहासांत मराठेशाहीमध्यें सर्वच बजबजपुरी माजलेली दिसून येते. आणि या बजबजपुरींतहि भाग घेणाऱ्या सर्वांनीं एकजुटीनें वागून इंग्रजांना विरोध केला असता तर त्यांचा पाय मराठेशाहींत इतका लवकर तरी खचीत रुजता ना. पण आज सवाशें वर्षांनंतर इंग्रजांविरुद्ध एकी करून, राज्य राखण्याचा नसला तरी राज्य मिळविण्याचा प्रसंग आहेच. आणि राज्य राखणें व मिळविणें या दोन्ही गोष्टी सारख्याच अवघड होत असें घेऊन चाललें तरी, पूर्वीच्या इतकीच आजहि एकीची गरज नाहीं काय ? आज लंडन येथें हिंदू व हिंदी मुसलमान यांच्यांतील बेबनावाची इंग्रज लोक रोज इतकी आठवण करून देत आहेत कीं, त्याची शरमच वाटावी. पण कळत असून न वळण्याचा प्रकार सवाशें वर्षांपूर्वी घडला तोच आजहि घडत आहे, नव्हे काय ? पण घडत असून देखील हिंदु किंवा मुसलमान कोणीहि पडतें घेण्याला तयार नाहीं, याचा जवळजवळ अर्थ असा होतो कीं मुसलमानांना भिणाऱ्या हिंदूंचें रक्षण इंग्रजच करणार, किंवा हिंदूंना भिणाऱ्या मुसलमानांचें रक्षण इंग्रजच

करणार, आणि दोघेहि आपआपल्या परीनें तें रक्षण स्वीकारणार व त्याकरितां आजचें स्वातंत्र्य उद्यांवर गेलें तरी हरकत नाहीं असेंच जवळजवळ म्हणणार. हें लिहिण्याचा आमचा हेतू हिंदूंचें किंवा मुसलमानांचें समर्थन करण्याचा नाहीं; तर कित्येक वेळां अवघड परिस्थितींत गोष्टी नाइलाजानें कशा घडत असतात हें दर्शविण्याचा आहे.

## बाजीरावानें चूक केली काय ?

प्रस्तुत विषयाकडे वळून विचार केला असतां बाजीरावानें इंग्रजांशीं पगारी मैत्री केली ही चूक केली कीं बरोबर केलें हा मुख्य प्रश्न या ऐतिहासिक ले. सं. च्या १४ व्या खंडांत वाचकापुढें एकसारखा डोकावतो. आणि तत्कालीन परिस्थितीचा गोंधळ पाहिला म्हणजे बाजीरावानें केलें तें बरोबर केलें कीं चूक केलें याचा निर्णय देणें मोठें कठीण होऊन बसतें. ही गोष्ट लक्षांत येण्याकरितां किंचित याहि काळाच्या थोडें मागें वळून पाहिलें पाहिजे. व तसें पाहिलें असतां असें दिसून येतें कीं, थोरल्या माधवराव पेशव्यांच्या वेळेपासून मराठेशाहींत, निदान पेशव्यांच्या घराण्यांत, बेबनावाची जी चीर पडली किंवा तडा गेला तो एकसारखा वाढत जाऊन त्याचाच अखेर परिणाम वसईच्या तहांत झाला. प्रथम माधवराव व रघुनाथराव या दोन बाजू निर्माण झाल्या. पण माधवरावानें चुलत्यावर अखेर जिंकली. तेंच भांडण पुढें नारायणरावाच्या कारकीर्दींत निघालें. त्याचा खून झाल्यामुळें रघुनाथरावाचा पाय गादीला कधींहि न लागू देण्याच्या शपथा घेण्यापर्यंत दुफळी झाली, व सर्व मातबर सरदार सवाई माधवरावाच्या व नानाफडणीसाच्या बाजूला राहिल्यानें, राघोबानें, वसईच्या तहाचीच आधींची आवृत्ति तेव्हां काढली, म्हणजे इंग्रजांशींच मैत्री करून त्यांच्या सैन्याच्या सहाय्यानें आपल्या शत्रूंचा मोड करण्याची इच्छा धरली. पण रघुनाथराव गादीचा धनी नव्हता, तर एक प्रकारें फितूर बंडवाला होता. आणि दुसरी महत्त्वाची गोष्ट ही कीं, गादीच्या धन्याच्या बाजूला बहुतेक सगळे मोठे सरदार तेव्हां होते, यामुळें इंग्रजांशीं रघुनाथरावानें एक प्रकारें पगारी मैत्रीचा तह केला तरी तो फळाला आला नाहीं इतकेंच काय तें. पण वसईच्या तहाची कल्पना त्या तहापूर्वी सुमारें २५ वर्षें रुजत घातली होती. आणि जें बापाच्या हातून तडीला गेलें नाहीं तें मुलानें तडीला नेलें. फरक इतकाच कीं,

रघुनाथरावाच्या बाजूला शिंदे नव्हते ते बाजीरावाच्या बाजूला म्हणजे त्याचें संरक्षण करण्याला तयार होते.

असो; नाना फडणिसाचा पक्ष त्याच्या मृत्यूपर्यंत खंबीर होता व पुरंदरच्या तहाला सालबाईच्या तहानें जरी किंचित गौणपणा आला, तरी पेशवे व इंग्रज यांच्या परस्पर स्थितींत फारसें अंतर पडलें नाहीं. पण नानाफडणीस वारल्यावर या दोन पक्षांतील चुरस पूर्वीपेक्षांहि वाढली व विशेष हें कीं केवळ धन्याकरितां पूर्वीं जो पक्षाभिमान असे त्याच्या ठिकाणीं आतां स्वार्थच अधिक प्रभावी झाल्यानें पक्षाभिमान हा परम दुस्तर झाला. पूर्वी रघुनाथरावांविरुद्ध शिंदे व होळकर हे दोघेहि होते. पण महादजीच्या मरणानंतर शिंदे व होळकर यांच्यांतलाच बेबनाव बाजीराव व अमृतराव यांच्यांतील बेबनावापेक्षां अधिक घातक ठरला. तसेंच शिंदे व अमृतराव यांचें वैमनस्य, भोंसले व अमृतराव यांचें वैमनस्य घाटगे व कुंजर यांचें वैमनस्य, घाटगे व पटवर्धन यांचें वैमनस्य, पटवर्धन व करवीरकर यांचें वैमनस्य, खुद्द शिंद्याकडील लोकांतच एकीकडे दौलतराव व दुसरीकडे शेणवीमंडळ व बाया यांचें वैमनस्य, असे विरोधी गट निर्माण झाले होते व यांच्या परस्पर भांडणांत बाजीराव हा केवळ निमित्तमात्र होऊन बसला होता.

## आपसांतील बेबनाव

रा. यशवंतराव खरे यांनीं हीच म्हणजे आपापसांतील बेबनावासंबंधाची गोष्ट पृष्ठ ७६५५ यावर निराळ्या हेतूनें वर्णिली आहे. ते म्हणतात "प्रत्येक सरदार आपल्या भोवतालच्या लहानमोठ्या सरदारांशीं लढण्यांत इतका गर्क होऊन गेला होता कीं मराठी राज्याचें पुढें काय होणार इकडे लक्ष देण्यास त्याला फुरसत नव्हती. प्रत्येकजण दुसऱ्याला लुबाडून आपलें ऐश्वर्य वाढविण्याच्या उद्योगांत होता. आणि तो प्रयत्न करतां करतां शेवटीं आपले स्वतःचेंच वैभव कसें शाबूत राहील याच्या फिकीरींत पडला होता. घटप्रभा आणि कृष्णा या नद्यांच्या कांठीं बापू गोखले हा एकीकडे पटवर्धनाशीं आणि दुसरीकडे रास्त्यांशीं एकाच वेळीं लढत होता. धारवाड प्रांतांत, धारवाडचा किल्लेदार बापूजी शिंदे विरुद्ध गोखले, गोखले विरुद्ध कित्तूरकर देसाई, कित्तूरकर देसाई विरुद्ध बापूजी शिंदे असें तिहेरी युद्ध होतें. विंचूरकर, राजे बहाद्दर वगैरेंच्या

सरदाऱ्या आपापसांतील भांडणामुळें पूर्वीच नष्टप्राय झाल्या होत्या. पानशे, पुरंदरे वगैरे सरदारांचें दिवाळें वाजल्यामुळें त्यांनीं आपापल्या फौजांना रजा देऊन बेरड रामोशी पदरीं बाळगिले होते, आणि त्यांच्या साहाय्यानें रस्तेलूट करून द्रव्योपार्जन करण्याचा त्यांचा उद्योग राजरोस सुरू होता.''

## इंग्रजांनीं कार्य साधलें

याच्या उलट तेव्हांच्या इंग्रजांची स्थिति पहा. १८०२ सालीं इंग्रज व फ्रेंच यांचा तह झाला. व डच पोर्तुगीज हे आधींच निकालांत निघाले असल्यानें, इंग्रजांना हिंदुस्थानांत कोणीच प्रतिपक्षी उरला नाहीं. फ्रेंच व इंग्रज यांच्या तहाकरितां आनंदप्रदर्शन म्हणून बाजीरावानें २० तोफा उडविल्या. पण जाणणारे जाणत होते ! याच गोष्टीला उद्देशून पुण्यांतील पटवर्धनांचा यःकश्चित कारकून लिहितो "सारांश चहूंकडून राज्यावर इंग्रजांचा गलफ झाला. पुढें ईश्वर काय घडवील तें पाहावें !" ठीकच आहे. दक्षिणेकडे टिपूचें निर्दालन झालें. निजामानें तर वसईचे तहाचे आधींच इंग्रजांशीं पगारी मैत्री जोडली. उत्तरेस मोंगल बादशहा शिंद्याच्या खाकेंतून निघून इंग्रजांच्या खाकेंत गेला होता, व खुद्द शिंद्यांच्या हातांतून इंग्रजांनीं अलीगड वगैरे ठाणीं हिसकून घेतलीं होतीं. उत्तर हिंदुस्थानांतला त्यांचा पहिला स्नेही व नंतरचा प्रतिपक्षी महादजी शिंदे हा मेल्यावर दौलतराव शिंद्याचें लक्ष उत्तर सोडून दक्षिणेकडे लागल्यामुळें इंग्रजांना आयतें रान मोकळें झालें. इंग्रजाइंग्रजांत पूर्वी वॉरन हेस्टिंग्ज व त्यांचे कौन्सिलर यांच्यामध्यें जी चुरस थोडी तरी होती ती किंवा मराठ्यांशीं झालेल्या पहिल्या युद्धाचे वेळीं मुंबईकर व कलकत्तेकर इंग्रज यांच्यांत जो बेबनाव थोडा तरी दिसून आला तो, आतां सर्वस्वीं नाहींसा होऊन एका दोरींत गोवलेल्या मण्यांप्रमाणें इंग्रजांची राज्यसूत्रें एकीकृत होऊन सुरळीत चालू होतीं. अर्थात् त्यांची पुढची उडी मराठ्यांवरच पडणार हें उघड होतें. पण मराठेशाहींतील सर्व सरदारांना उघडपणें शांततेचा व सलोख्याचा उपदेश करीत व आपणांकडे सर्वस्वी भलेपणा घेत घेत त्यांना आपलें कार्य साधतां आलें. व तें आपापसांत भांडणाऱ्या मराठे सरदारांनींच साधून दिलें !

शिंदे व होळकर हेच मराठ्यांच्या दौलतीचे मुख्य दोन आधारस्तंभ-

पण त्यांच्यांतील बेबनाव पानपतापूर्वीपासून धुमसत होता. सवाई माधवरावाचे वेळीं नानाच्या हयातींतच शिंदे-होळकर यांचीं सैन्यें लाखेरीस लढलीं, आणि महादजी मृत्यु पावून इकडे दौलतराव व तिकडे होळकर घराण्यांत तुकोजीच्या मरणोत्तर मल्हारराव, यशवंतराव व विठोजी यांसारखे लढवय्ये पण विक्षिप्त आणि काशीरावांसारखे वेडसर लोक निर्माण झाले. तेव्हां वैमनस्याला ऊत आला असेल यांत काय नवल? शिंद्यांनीं मल्हारराव होळकर मारला व बाजीरावानें विठोजी होळकर ठार मारला! असे दोन खून पडल्यानंतर शिंदे-होळकर यांचें प्रत्यक्ष युद्ध जुंपणारच होतें. तें सर्व उत्तर हिंदुस्थानांत झालें असतें तर वसईचा तह झाला नसता. पण शिंदे होळकर दोघेहि पुण्याकडे आले व परोपरीनें दोघांच्याहि हातून बाजीरावाला इतके तडाखे बसले कीं, तो इंग्रजांकडे पळून गेला नसता तरच आश्चर्य. वाड्याला मधमाशांचे मोहळ लागलें म्हणून ज्यानें वाडा सोडला, त्यानें दौलतीला अशा या आग्या गांधीलमाशांचें मोहळ लागल्यामुळें दौलत सोडून पळून जावें हें स्वाभाविकच होय. किंबहुना अशीहि उपमा साजेल कीं, गांधीलमाशा उठल्या असतां पाण्यांत बुडी मारणें येवढाच उपाय जीव वांचवायाला जसा शिल्लक राहतो, तसाच बाजीरावानें या सरदारी चावऱ्या माशांपासून रक्षण होण्याकरितां बाणकोटच्या खाडींत 'जळचरांच्या' इंग्रज जहाजांत उडी घेतली. सरदारीचा वारस हातीं ठेवून झुंज लावणें ही गोष्ट जशी शिंदे-होळकरांनीं परस्परांशीं केली तिचीच मोठी आवृत्ति इंग्रजांनीं काढली. त्यांनीं मुख्य गड्ड्यालाच हात घालून गादीचा वारसच आपल्या हातीं घेतला, मग त्यांना यश आलें यांत काय नवल?

## बाजीराव व यशवंतराव

वास्तविक शिंदे काय, होळकर काय, व इतर सरदार काय, कोणालाच बाजीरावानें इंग्रजांच्या आश्रयाला जाण्याची गोष्ट पसंत नव्हती. पैकीं शिंद्यांची सरशी होळकरावर झाली असती तर वसईचा तह झाला नसता. पण होळकराचा जय शिंद्यावर झाला. व लोक जरी असें म्हणूं शकते कीं बाजीरावाला कोणाच्या तरी आश्रयाला किंवा कैदेंतच राहावयाचें तर इंग्रजापेक्षां होळकरांची कैद काय वाईट? पण तरी बाजीरावानें विठोजी होळकराचा क्रूरपणानें खून केल्याचीं वर्णनें वाचलीं म्हणजे बाजीरावाचें

मनच त्याला कसें खात असेल तें लक्षांत येतें. होळकर आपल्याकडून मोठमोठ्यानें बाजीरावाला सांगत होता कीं तुम्हीं मला म्हणजे आपल्या पदरच्या सरदाराला कां भितां? पण बाजीरावाच्या भित्रेपणाला यशवंतराव होळकराच्या लहरी स्वभावाची जोड असल्यामुळें त्याच्यावर बाजीरावाला विश्वास ठेववेना असें वाटतें. पण बाजीरावाला नुसती आपल्या प्राणाचीच भीति नव्हती. कारण अमृतरावाला हातीं धरून बाजीरावाचे जागीं गादीवर बसविण्याचें कारस्थान अजून विझलें नव्हतें तर चांगलें धुमसतच होतें. होळकराचे बेत अतर्कित रीतीनें पुढें फसले ही गोष्ट वेगळी असो.

या सर्व गोष्टी खऱ्या. तथापि वसईच्या तहाची जबाबदारी बाजीरावावरच पडते ही गोष्टहि कांहीं खोटी नाहीं. जितकें स्थान मोठें तितका त्याचा दोषहि मोठा हें ओघानेंच प्राप्त होतें. अपकृत्याच्या संबंधीं इंग्रजी कायद्यांत (Law of Torts) एक सिद्धांत आहे तो असा कीं; कांहीं अपकृत्यें हयगयीच्या स्वरूपाचीं असतात. व शेवटलें कृत्य घडण्यापूर्वीं दुतर्फी चुकीच्या गोष्टी एकामागून एक मुद्दाम किंवा चुकून घडून येत असतात. पण अखेर परिणाम वाईट होतात ते कांहीं चुकत नाहींत. मग त्याबद्दल जबाबदार कोणाला धरावयाचें? या प्रश्नाचें उत्तर कायदेपंडितांनीं सिद्धांतरूपानें असें ठरविलें आहे कीं, अगदीं अखेरचें पण टाळतां येण्यासारखें हलगर्जीपणाचें किंवा चुकीचें कृत्य ज्याचे हातून घडलें तोच खरा जबाबदार; बाकीच्यांचे दोष माफच न झाले तरी त्यांजकडून हिस्सेरशीनें नुकसान भरून घेतां येत नाहीं. याला Law of contributary negligence असें म्हणतात. म्ह. उदाहरणार्थ कोणी दुसऱ्याचें लहान मूल रस्त्याच्या मध्यभागीं ठेवणें हें रस्त्याच्या उपयोगाच्या दृष्टीनें अपकृत्य होय. पण हें अपकृत्य त्याजकडून घडलें तरी गाडीवाला किंवा मोटरवाला यानें किंचित् गैरसोय सोसूनहि तें मूल टाळून जरा बाजूनें गाडी हाकली पाहिजे. तसें तो न करील तर वाटेंत मूल ठेवणारा जबाबदार न होतां गाडीवाला जबाबदार ठरतो. कारण एकाची चूक झाली खरी पण शेवटीं तीं दुसऱ्याला सावरतां आली असती. हेंच तत्त्व वसईच्या तहाला लावतां येईल व तें असें—

## बाजीरावावरील जबाबदारी

शिंदे–होळकरांनीं गादीला उपद्रव होण्यासारखा कलह माजवावयाचा नव्हता हें खरें, पण तो माजविला. बाजीरावाविरुद्ध अमृतरावाला उभा करून त्याला गादीवर बसविण्याचा कट कांहीं सरदारांनीं करावयाचा नव्हता हें खरें पण तो केला. नंतर कटवाला विठोजी होळकर हातीं सांपडला तरी बाजीरावानें त्याला जिवें मारावयाचें नव्हतें हें खरें पण तें मारलें. त्याचा सूड घेण्याकरितां होळकरानें पुण्याचा विध्वंस करून बाजीरावाला दहशत उत्पन्न करावयाची नव्हती हें खरें. पण ती त्यानें केली. पण अपकृत्यांची ही परंपरा घडून आल्यावरहि बाजीरावानें इंग्रजांकडे जाऊन त्यांच्याशीं पगारी मैत्री करावयाची नव्हती व ती केली हीच अखेर चूक झाली असेंच इतिहासकार म्हणणार व त्यालाच जबाबदार धरणार. कारण हें शेवटचें कृत्य टाळतां येण्यासारखें असतां त्यानें तें टाळलें नाहीं. समजा, बाजीराव इंग्रजांकडे गेला नसता तर जास्तींत जास्त काय झालें असतें? होळकरानें बाजीरावाचा वध खचित केला नसता. फार तर त्याला गादीवरून काढून अमृतरावाला बसविलें असतें. स्वत: होळकर घराण्यांतला कोणी मुलगा पंतप्रधान झाला नसता. व अशा रीतीनें इंग्रजांचें संकट टळून एकंदरीनें पाहतां पंतप्रधानपद-संरक्षक गुप्तमंडळाचें म्हणून जें कारस्थान सुरू होतें तें यशस्वी झालें असतें. म्हणजे कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें असतां गादीपेक्षां व्यक्तीला महत्त्व कमी असें मानून सर्व चाललें असतें तर इंग्रजांचें संकट टळलें असतें. या वेळीं सर्व मराठे सरदार इंग्रजांशीं तह करूं नये असेंच म्हणणारे होते मग ते आपआपसांत लढोत किंवा बाजीरावाचें वैर करोत. थोरल्या माधवराव पेशव्यावर बाजीरावाच्या बापाच्या म्हणजे रघुनाथरावाच्या स्पर्धेनें असाच प्रसंग आला होता. पण त्यानें आपला पक्ष कमजोर आहे असें पाहून कांहीं वेळ नमतें घेतलें व लीनता दाखविली, आणि पुढें राक्षसभुवनची लढाई जिंकून आपलें वर्चस्व प्रस्थापित केलेंच कीं नाहीं? गादीच्या वारसाईची अशी थोडीबहुत घालमेल होतच असते. म्हणून त्याकरितां बाजीरावानें इंग्रजांच्या पाशांत जाऊन पडणें योग्य नव्हतें असा निर्णय कोणाहि सुज्ञाला द्यावाच लागेल. मग त्याला शिंद्यांची महत्वाकांक्षा किंवा होळकरांचा आततायीपणा यांचा कितीहि राग येवो.

# ४२ कौटिलीय अर्थशास्त्र

( पूर्वार्ध )

[ कौटिलीय अर्थशास्त्र पूर्वार्ध मूळ व भाषांतरासह. भाषांतरकार ज. स. करंदीकर पुणें व ब. रा. हिवरगांवकर नगर. प्रकाशक ग. र. मुळे कर्जत जि. कुलाबा.]

वरील सुप्रसिद्ध संस्कृत ग्रंथाचा पूर्वार्ध, मूळ व भाषांतर मिळून, या ग्रंथांत दिला आहे. सदर भाषांतर जनार्दन सखाराम करंदीकर व बळवंत रामचंद्र हिवरगांवकर यांनीं मिळून केलेलें असून, कर्जत येथील गजानन रघुनाथ मुळे यांनीं छापून प्रसिद्ध केलें आहे. मूळ ग्रंथाचें नांव प्रसिद्ध आहे. परंतु तो अलीकडेच लोकांना उपलब्ध झाला आहे आणि त्याचें श्रेय शामशास्त्री व गणपतिशास्त्री ह्या दक्षिण-हिंदुस्थानांतील पंडितांनाच दिलें पाहिजे. ग्रंथाचा कर्ता कौटिल्य किंवा कौटल्य ह्यांपैकीं कोणत्या तरी एका नांवाचा होय. पण त्याचें व्यक्तिनाम विष्णुगुप्त असें असून मौर्य-वंशांतील प्रसिद्ध राजा चंद्रगुप्त ह्याचा तो गुरु होता. चाणक्य ह्या नांवानें तो त्या संबंधांत प्रसिद्ध आहे. नंदवंश समूळ खणून काढून त्यानें आपला मानसपुत्र चंद्रगुप्त याला राज्यावर बसविलें, आणि त्याचा पुढें कांहीं दिवस कारभारहि केला. ह्या दृष्टीनें विजयनगरचा विद्वान् व राज-कारणी पुरुष माधवाचार्य याच्याशीं त्याची सहजच तुलना होते. दोघेहि अत्यंत विद्वान, स्वाभिमानी, संसारविन्मुख व राजकारणधुरंधर असेच होऊन गेले. माधवाचार्यांचे अनेक ग्रंथ उपलब्ध आहेत. चाण-क्याचेहि प्रस्तुत ग्रंथाशिवाय इतर कित्येक ग्रंथ असण्याचा संभव आहे. पण तो फार प्राचीनकाळचा. यामुळें ते नष्ट झाले असावेत. आणि सर्वांत अधिक प्रसिद्ध व मान्य म्हणून अर्थशास्त्र हा ग्रंथ मात्र उरला असें अनुमान निघतें. प्रस्तावनेंत भाषांतरकारांनीं चाणक्य ऊर्फ कौटिल्य हाच या ग्रंथाचा खरा कर्ता होय ही गोष्ट सप्रमाण सिद्ध केली आहे. तथापि मूळ ग्रंथाच्या शेवटीं, दोन श्लोकांत, ग्रंथकाराचें वर्णन आलें आहे तें स्वत: कौटिल्यानेंच लिहिलें असेल असें वाटत नाहीं. मूळ

ग्रंथाची प्रत करतांना, प्रारंभीं किंवा शेवटीं, अशी भर त्यांची प्रत करणारा घालतो किंवा इतर लोक घालतात आणि मग तो भाग मूळ ग्रंथांतला असें समजून त्याचें कर्तृत्वहि ग्रंथकाराकडे दिलें जातें. पण प्रमाण म्हणून मांडतांना ह्यांत थोडा धोका असतो. मृच्छकटिक नाटकाचा कर्ता शूद्रक आहे असें मानितात. आणि ह्या नाटकाच्या ज्या प्रती छापिल्या जातात त्यांत शूद्रकासंबंधाचा जो श्लोक प्रारंभीं दिला आहे तोहि ग्रंथाचा भाग समजला जातो, पण त्या श्लोकांत शूद्रकाचें गुणवर्णन आहे; इतकेंच नाहीं तर ' शूद्रकोऽग्निप्रविष्टः ' असा त्याचा मृत्युपर उल्लेख आहे. अर्थात् हा श्लोक स्वतः शूद्रकानें लिहिलेला नव्हे. असो. हें प्रमाण सोडलें असतां, भाषांतरकारांनीं बाकीचीं प्रमाणें दिलीं आहेत तीं समर्पक वाटतात.

ग्रंथाची छपाई उत्कृष्ट झालेली असून मूळ संस्कृत भाग व भाषांतर हीं दोनहि दिल्यामुळें अभ्यासकाला फारच साहाय्य झालें आहे. कारण मूळ ग्रंथाच्या सूक्ष्म अध्ययनापासून अजून किती तरी सिद्धान्त निष्पन्न होण्यासारखे आहेत. ह्या सूक्ष्म अध्यनाला भाषांतरानें चांगलें चलन मिळेल यांत शंका नाहीं. पण ग्रंथाचें भाषांतर ताडून पाहाणें हें काम महत्त्वाचें असल्यामुळें डाव्या पानावर संस्कृत व उजव्या पानावर मराठी असा हा ग्रंथ छापला असता तर अधिक बरें झालें असतें असें वाटतें. किंवा निदान जागा फुकट जाऊं नये म्हणून वर संस्कृत व खालीं मराठी असें छापिलें असतें तर अधिक सोय झाली असती.

हें काय नुसतें संस्कृताचें मराठी भाषांतर, ह्या वरवरच्या दृष्टीनें हा ग्रंथ करण्याला विशेष मेहनत पडली नसेल असा सामान्य वाचकांचा समज कदाचित् होईल. पण ती मात्र मोठी चूक होईल. कारण ह्या भाषांतराचें स्वारस्य शब्दाला प्रतिशब्द देऊन, अर्थ सांगण्यांतच खरें आहे आणि हे प्रतिशब्द देतांना प्रत्येक शब्दाची सूक्ष्म छाननी करावी लागली आहे; शिवाय मूळ सूत्रें सामान्य वाङ्मयात्मक म्हणजे इतिहास किंवा वर्णन किंवा संभाषण अशा स्वरूपाचीं नाहींत तर तीं पारिभाषिक आहेत. म्हणून त्यांच्या खऱ्या अर्थाची छाननी करणेंच प्राप्त आहे. ह्या दृष्टीनें हें भाषांतर करण्यास भाषांतरकाराला फारच परिश्रम पडले असतील यांत शंका नाहीं. ग्रंथ सूत्ररूप असल्यामुळें त्यांत अर्थपूर्ण शब्द खेंचून

भरलेले आहेत. व्याकरणानें सोडविण्याचे असे प्रश्न त्यांत क्वचितच येतात. कित्येक शब्दांच्या भाषांतरांत मतभेद होण्याचा संभव उघडच आहे. आणि त्या ग्रंथांचा जसजसा अधिक अभ्यास विद्वान लोक कर-करतील तसतसे हे मतभेद अधिक प्रगट होतील. पूर्वीं ह्याचीं जीं दोन भाषांतरें झालेलीं आहेत त्यांचा योग्य फायदा भाषांतरकारांनीं घेतलाच आहे. पण त्यांनीं आपली अशी स्वतंत्र बुद्धीहि चालवून अर्थ बिनचूक देण्याची पराकाष्ठा केली आहे. आणि ही गोष्ट पृष्ठ १९ ते २१ वर ' कांहीं वादग्रस्त स्थलांचें विवेचन ' म्हणून दिलें आहे. त्यावरून उघड दिसून येते.

मूळ ग्रंथाचें नांव ' अर्थशास्त्र ' असें आहे. त्यावरून इंग्रजींत ज्याला Political Economy ' म्हणतात त्यांत असणारे विषय यांत असतील असें कोणाला सकृद्दर्शनीं वाटेल. पण तें अर्थशास्त्र वेगळें व हें वेगळें. इंग्रजींतला Political Economy हा शब्द तरी त्यांतील विषयांशीं कित-पत जुळतो आहे ? शास्त्राला नांव देतांना केव्हांहि अशीच अडचण पडते; आणि त्याचें एक कारण असें कीं, अतिव्याप्ति व अव्याप्ति टाळ-ण्यासारखा एकच व सुटसुटीत असा शब्द मिळणें कठीण असतें. वेद-विद्या, तर्कशास्त्र, अर्थशास्त्र ( वार्ता ) व दंडनीती अशा चार विद्या जुन्या लोकांनीं मानिलेल्या आहेत. पैकीं वेदविद्या ह्या ग्रंथांत मुळींच नाहीं. आणि ग्रंथकारांनीं तर्कशास्त्राला सर्वविद्याप्रदीप असें मानलें आहे. तरी तर्क-शास्त्राचा विचार त्याला ह्या ग्रंथांत कर्तव्य नाहीं. तथापि नांव अर्थशास्त्र असतांहि, दंडनीतीचीं कांहीं प्रकरणें ह्या ग्रंथांत आहेत. अशा रीतीनें अर्थ, अनर्थ, नय, अनय ह्या चोहोंचाहि विचार या अर्थशास्त्रांत आढ-ळतो. म्हणून ह्याला अर्थशास्त्र आणि दण्डनीतिशास्त्र असेंहि कदाचित् यथार्थपणें मानतां आलें असतें.

प्रस्तुत पूर्वार्धांत ९० अध्याय आलेले आहेत, आणि ते वाचले असतां या ग्रंथाचा उत्तरार्ध लवकरच प्रसिद्ध व्हावा अशी वाचकाला उत्कंठा लागल्याशिवाय राहात नाहीं. स्वतः चाणक्यानें ग्रंथासंबंधानें असें लिहिलें आहे कीं, तो समजण्याला सुलभ व त्यांतील शब्द, अर्थ व तत्त्वें हीं निःसंदेह आहेत. स्वतः ग्रंथकाराच्या दृष्टीनें या सर्वच गोष्टी खऱ्या अस-तील; परंतु आज शेंकडों वर्षांनंतर, संस्कृत भाषा सामान्यतः अवगत

असली तरी पारिभाषिक शब्द पुष्कळसे प्रचारांतून गेल्यामुळें अर्थ समजावयाला पंचाईत पडते. शिवाय तत्त्वांच्या दृष्टीनें मूळ ग्रंथकाराच्या वेळीं तरी ती निःसंदेह मानली गेली होती कीं नाहीं ह्याची खात्री काय ? पण ग्रंथकार स्वतः तरी निःसंदेह असावा लागतो; आणि हा तसा होता हें मात्र खरें. कारण प्रस्तुत ग्रंथांत, त्यापूर्वींच्या ग्रंथकारांचे अशा विषयावरील समग्र ग्रंथ विचारांत घेऊन, त्यांची चिकित्सा करून, पूर्वाचार्यांनीं असें मत दिलें आहे, पण माझें मत तसें नाहीं, वेगळें आहे असें ग्रंथकारानें अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. इंग्रजींत ज्याला डायजेस्ट असें म्हणतां येईल तशा प्रकारचा हा ग्रंथ आहे. कारण त्याला रूढी, आचारविचार व वस्तुवर्णन ह्यांच्या संग्रहाचें स्वरूप आहे. केवळ मनानें कल्पिलेल्या गोष्टींच्या प्रबंधाचें स्वरूप नाहीं. बऱ्याच ठिकाणीं चाणक्यानें आपली बुद्धि चालविली असावी. तथापि त्याच्या बहुतेक लिहिण्याला प्रचलित आचारविचारांचा स्वतंत्र आधार असला पाहिजे असें उघड दिसतें.

या ग्रंथांतील मजकुराचे दोन भाग करतां येतात. एकामध्यें राज्यकारभार, त्याचीं अंगें, उपांगें, विद्यमान संस्था, लोकप्रवृत्ति, धर्म-अधर्म, नय-अनय यांचे नियम, विधि, निषेध, प्रायश्चित्त किंवा शिक्षा व निरनिराळ्या उद्योगधंद्याच्या वहिवाटीचे नियम हे आहेत. पण दुसऱ्या भागांत स्वतःची बुद्धि चालविण्यासारखा व चालविलेला असाहि मजकूर आहे. राजनीतीसंबंधानें पुष्कळसा मजकूर दुसऱ्या भागांत येईल. पहिल्या भागांतील रूढी व आचार हे आजच्या समाजांत अनुभवाला सर्वस्वी येणारे नाहींत, कारण शेंकडो वर्षांनंतर सर्वच परिस्थिति बदलते. फार काय पण एकाच काळांत शेजार–शेजारच्या राष्ट्रांतहि एकाच प्रकारच्या संस्था आणि एकाच प्रकारचे आचारविचार असत नाहींत. परंतु ह्या दुसऱ्या भागांतील विचार सर्वस्वी मनुष्य स्वभावाशीं संगत असेच असल्यामुळें, हजारों वर्षांपूर्वी ते जसे होते तसेच ते आजहि आहेत. आणि आज ते जसे आहेत तसेच आणखीं हजारों वर्षे राहतील ह्यांत शंका नाहीं. भारतांतील कणिकनीति किंवा भीष्मपर्वांत सांगितलेली नीति हीच प्रायः आजहि तत्त्ववेत्त्यांना संमत आहे व पुढेंहि राहील. कारण धर्मवृत्ति व कपटवृत्ति हीं दोन मनुष्यांच्या मनाचीं अंगें

जवळ जवळ त्रिकालाबाधित आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. साम, दाम, दंड, भेद यांच्या संबंधानें प्राचीन भरतखंडांतील कणिकनीति किंवा इतिहासकालीन चाणक्य ग्रंथांतील राजनीति हीं मध्ययुगांतील इटाली देशांतील मॅकेव्हेलीनें लिहिलेल्या ‘ Prince ’ ह्या ग्रंथांतील राजनीतीशीं जुळते, हें तो ग्रंथ वाचून पहाणाराला सहजच कळून येईल. परंतु एखादें राष्ट्र सुधारलें आहे कीं नाहीं याचा विचार हल्लीं केवळ भौतिक दृष्टीनें करतात. मानसशास्त्राच्या दृष्टीनें तो करण्यांत येत नाहीं. ॲरिस्टॉटलचें तत्त्वज्ञान प्रणीत झालेल्या ग्रीस देशापेक्षां आज यंत्रविद्येंत प्रसिद्धीस आलेल्या जर्मनीलाच अधिक सुधारलेला मानतात. म्हणून राजनीतीपेक्षां राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें आजच्या कालाला या ग्रंथाचें महत्त्व अधिक आहे. कारण त्यावरून एक गोष्ट निर्विवाद रीतीनें सिद्ध होते कीं, हजारों वर्षांपूर्वीं राज्यकारभाराची व नागरिक समाजाचीं अंगें, उपांगें आर्य समाजांत इतकीं परिणतावस्थेला गेलेलीं होतीं कीं, आजच्याशीं त्यांची तुलना केली असतांहि लाजेनें खालीं मान घालण्याचें आम्हांस बिलकुल कारण नाहीं.

---

## कौटिलीय अर्थशास्त्र

( उत्तरार्ध )

व्हिन्सेंट स्मिथ वगैरे इतिहासकारांनीं प्राचीन भरतखंडांत राज्यव्यवस्था कशी होती ह्याचें थोडेंबहुत वर्णन दिलें आहे तें फार त्रोटक आहे. परंतु हल्लींचा ग्रंथ वाचला म्हणजे राजकीय व सामाजिक संस्था निर्माण करण्यांत व त्या चालविण्यांत आपल्या पूर्वजांनीं किती बुद्धि खर्च केली होती हें सूक्ष्म व तपशीलवार कळून येतें. आतां हल्लींच्या काळीं एकेक शास्त्रच इतकें परिणत झालें आहे कीं एकांतून दहा शास्त्रें निघालेलीं असतात. आणि वडाच्या झाडाच्या पारांब्या वरून खालीं येऊन भूमींत रुजून फिरून त्यांचे वृक्ष होऊन वर जावे त्याप्रमाणें शास्त्रांच्या शाखांचा व भाषेचा विस्तार झाला आहे. असे विस्तार पूर्वकालीं नव्हते. समाजाचें तें बालपण होतें. म्हणून त्या वेळीं व्यवहारहि

संकुचित होता. हें तत्त्व लक्षांत घेतलें म्हणजे कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत आलेल्या निरनिराळ्या अनेक विषयांचा संग्रह व विवेचन एकत्र कसें झालें असेल ह्याची कल्पना येते. कारण ह्या ग्रंथांत, आधुनिक दृष्टीनें बोलावयाचें तर, धर्मशास्त्र येतें, सामाजिक शास्त्र येतें, व्यवहारशास्त्र येतें, प्रायश्चित्तशास्त्र येतें, दायभागशास्त्र येतें, न्यायशास्त्राचें मूलतत्त्व येतें, मुलकीखात्याचा कारभार येतो, दिवाणी काम चालविण्याचा कायदा येतो, फौजदारी काम चालविण्याचा कायदा येतो, पिनल कोड येतें, स्थानिक स्वराज्याचीं तत्त्वें येतात, व्यापारी संघाचें शास्त्र येतें, मजूर-संघाचें शास्त्र येतें, म्युनिसिपालिटीचा कायदा येतो, ग्रामसंस्था येते, एव-ढेंच नव्हे तर निरनिराळ्या धंद्यांतील कारागिरीचीं मूलतत्त्वेंहि येतात. अलीकडे वाढलेला समाजव्यवहार लक्षांत घेतला असतां इतक्या सर्व गोष्टींचा एकत्र संग्रह व विचार करणारा ग्रंथ कोणत्याच भाषेंत मिळूं शकणार नाहीं. पण कालांतरानें, विशेषत: भौतिक सुधारणा व विद्या-भ्यासाच्या ज्ञानाचीं साधनें वाढल्यामुळें, असा फरक पडणारच.

असो. ह्या ग्रंथांतील मजकूर किती मनोरंजक आहे व तुलनात्मक दृष्टीनें तो किती बोधप्रद आहे याची यथार्थ कल्पना, प्रत्यक्ष ग्रंथ वाच-ल्याशिवाय, वाचकाला करून देणें अशक्य आहे. कांहीं दिवसांपूर्वी महाराष्ट्रांतील राज्यव्यवस्थेसंबंधीं रामचंद्रपंत अमात्य ह्यांचा एक लहानसा जुना ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्याचें कौतुक आपण किती तरी करतों. पण असे १०--२० ग्रंथ भरतील इतका उत्कृष्ट आणि विशेषत: प्राचीन म्हणून कौतुकास्पद असा मजकूर या 'अर्थशास्त्र' ग्रंथांत उपलब्ध झालेला आहे. स्थलसंकोचामुळें आम्हाला द्यावा वाटतो इतका तपशील ह्या परीक्षणा-त्मक लेखांत ह्या ग्रंथाचा देतां येत नाहीं. तथापि कांहीं कांहीं गोष्टींचा उल्लेख केल्यावांचून आम्हाला राहावत नाहीं. पहिल्या अधिकरणांत म्हणजे २१ अध्यायांत राजे लोकांचें कर्तव्य व व्यक्तिश: त्यांनीं करण्याचा कारभार यांचीं तत्त्वें सांगितलीं आहेत तीं फारच मनोरंजक आहेत. अमात्य व मंत्री यांची नेमणूक कशी करावी, त्यांची निष्ठा कशी पारखावी, हेर कोण कसे नेमावे, त्यांचा उपयोग कसा करावा, राजनिष्ठ व फितूर ह्या लोकांशीं राजानें कसें वागावें, दूतांची व हेरांची योजना कशी करावी, राजपुत्राशीं संबंध कसा ठेवावा, राजाची दिनचर्या कशी असावी इत्यादि

विषयांचें विवेचन वाचलें म्हणजे राजनीतींत ह्या मनुष्याचें मन किती शिरलें होतें हें कळून येईल.

यांतील कांहीं कांहीं भाग अर्थात् हास्यास्पद असा वाटतो. पण त्याविषयीं आम्हांला इतकेंच सांगावयाचें कीं, तो कागदावर लिहिला म्हणून कदाचित् तसा वाटो. पण प्रत्यक्ष राजे लोकांचें चारित्र्य व दिनचर्या ह्यांची ज्यांना माहिती आहे किंवा त्याची कल्पना ज्यांना आहे त्यांना तो हास्यास्पद वाटणार नाहीं. राजे लोकांच्या मनांतून येऊन जाणाऱ्या विचारांनाच येथें नियमांचें स्वरूप दिलें आहे. ते विचार तेथें गूढ असतात. ह्यांत ते प्रगट केले आहेत इतकेंच काय तें. कपट हें नेहमीं गूढ असावें अशी समजूत असल्यानेंच कपटाचरणाचा उघड व नियमबद्ध उपदेश हास्यास्पद वाटतो. कटवाले एकांतांत कट करतात म्हणून कटवाल्यांची भाषा ही सार्वजनिक भाषा होऊं शकत नाहीं. परंतु समजा, एखादा कट चालला असतांना, कटवाल्यांना न कळत जर फोनोग्राफ लावला व त्याच्या तबकड्या लावून सर्व संभाषण एखाद्या मोठ्या सभेपुढें प्रगट करून दाखविलें तर तें ज्या कारणाकरितां हास्यास्पद वाटेल त्याच कारणाकरितां कौटिल्याच्या कपटनीतीचा लेखहि हास्यास्पद वाटेल. अमात्याच्या निष्ठेची परिक्षा कशी करावी याविषयींचे नियम बालिश स्वरूपाचे आहेत असें भाषांतरकारांनीं म्हटलें आहे. पण कित्येक आधुनिक राजे लोकांच्या कारस्थानाच्या कृतींचीं खेळांचीं वर्णनें जीं तुम्हीं आम्ही ऐकलेलीं आहेत त्यांहून कौटिल्याचें वर्णन अधिक अद्‌भुत म्हणवत नाहीं. दुसरें असें कीं, या मजकुराला जर बालिश म्हणावयाचें तर इतर अनेक प्रकरणांतून अशा बालिश गोष्टी कितीतरी आढळतात. पण एका काळांतील लोकांनीं दुसऱ्यांना हंसावें इतकाच त्याचा अर्थ. प्रत्येक राष्ट्रांत जुन्या काळीं अशाच बालिश गोष्टी किती तरी रूढ होत्या. पण त्या कालानुसार त्यांना प्रौढपणाच होता. इतिहासकार लेके यांचा ‘History of Rationalism’ हा ग्रंथ जो वाचील त्याला युरोपखंडांत मध्ययुगीन सामाजिक चालीरीति कशा होत्या याचें चित्र पाहावयास सांपडेल. पण त्या चालीरीतींना त्या काळचे प्रौढ प्रतिष्ठित लोकहि मान देत, म्हणून त्यांना बालिश म्हणतां येत नाहीं.

दुसऱ्या अधिकरणापासून सामाजिक व्यवस्था व राज्यव्यवस्था हे

विषय लागतात. ते वाचले असतां, ज्याला आपण खात्यांचा कारभार म्हणतों तो तेव्हां किती परिणतावस्थेला पोंचला होता हें दिसून येईल. यासंबंधांत वाचकांना अध्याय २२ गांवव्यवस्था, अध्याय २५ किल्ल्यांतील नगररचना, अध्याय २७ फडणिशी कारभार, अध्याय ३१ आज्ञापत्र–पद्धति, अध्याय ३७ पण्याध्यक्ष, अध्याय ४० वजनें–मापें, अध्याय ४२ शुल्काध्यक्ष, अध्याय ४४ सूतकाम, अध्याय ५६ जमाबंदी, अध्याय ५७ नगरव्यवस्था, अध्याय ६६ गायरानें शेतें वगैरे, अध्याय ७० मजूर व कामगार, अध्याय ७१ सहकारी मंडळाचे नियम, अध्याय ७८ समाजकंटकांचा बंदोबस्त, अध्याय ७९ व्यापाऱ्यांपासून प्रजेचें रक्षण वगैरे हे अध्याय वाचण्याची आम्ही शिफारस करतों. अध्याय ५७ वाचला असतां हल्लींच्या कोणत्याहि म्युनिसिपल ॲक्टाची आठवण झाल्याशिवाय राहात नाहीं. गांवच्या लोकांची खानेसुमारी नोंदवावी, आल्यागेल्याची वर्दी द्यावी, वैद्य लोकांनीं आपल्या माहितींतल्या रोग्यांची व रोगाची वर्दी द्यावी, उन्हाळ्यांत आगीचा बंदोबस्त करावा, ओसाड जागा, कारखाने, गुत्ते, भडभुंजांचीं दुकानें, हलवायांचीं दुकानें खाटिकांचीं दुकानें वगैरेंची तपासणी करावी, गांवांत गवती छपरें राहूं देऊं नये, आगीचा बंदोबस्त न ठेवील त्यास दंड करावा, भलत्या ठिकाणीं प्रेतें पुरूं नयेत, सार्वजनिक जागीं घाण करूं नये, ती करणारास दंड करावा, प्रेतें अमुक पद्धतीनें बाहेर न्यावीं वगैरे नियम ह्या पद्धतींत दिले आहेत. एका नियमाविषयीं विशेष उल्लेख करावासा वाटतो तो हा कीं, रस्त्यावर कचरा टाकणाऱ्याला एकअष्टमांश पण दंड करावा. असो. याचप्रमाणें कौतुकाच्या म्हणूनहि कांहीं गोष्टी सांगतां येतील. उदाहरणार्थ, खोटीं नाणीं तोडून टाकण्याचे नियम यांत आहेत. आणि पाळीव कबूतरांच्या गळ्यांत मोहोरबंद लखोटा बांधून त्यांना उडवून दूरच्या राजाला बातमी द्यावी ही विद्याहि यांत सांगितली आहे. १८७० सालच्या पॅरिस शहराच्या वेढ्यांत ही युक्ति अमलांत आणण्यांत आली तिचें कौतुक झाल्याचें प्रसिद्ध आहे. कौटिल्याच्या वेळींहि ही विद्या रूढ होती असें दिसतें.

असो. अशीं उदाहरणें कित्येक दिलीं तरी संपणार नाहींत. पण आम्हीं एवढेंच सांगतों कीं, तुलनात्मक दृष्टीनें अभ्यास करणाराला सामाजिक रचना, नगरकारभार, राज्यव्यवस्था, दायभाग, व समाजांतील

निरनिराळ्या भागांचें परस्पर महत्त्व या विषयांच्या संबंधानें संशोधन करून जुनें कसें होतें? नवें काय आहे? दोहोंत फरक कोणता? तो कशानें पडला असेल? वगैरे गोष्टींचा अभ्यास करण्याला किती तरी वाव आहे. पण ह्या कोरड्या अभ्यासापेक्षां आणखी एक फायदा या ग्रंथाचा असा आहे कीं, ह्या ग्रंथांत उपयोगांत आणण्यासारखें अमूल्य शब्दभांडार आहे. इंग्रजी शिक्षणानें कल्पना नव्या आल्या. परंतु जुन्या संस्कृत ग्रंथाचा अभ्यास नष्ट झाल्यानें, पारिभाषिक शब्दांची अडचण पडूं लागली हा अनुभव सर्वांनाच आहे. ह्या दृष्टीनें पाहतां, ह्या ग्रंथांतील शब्द हल्लींच्या वस्तुस्थितीला जुळण्यासारखे असतील ते घेऊन व पुढें आणून प्रचलित केले, तर नव्या–जुन्या सामाजिक स्थितीचा सांधा आयता जुळविल्या-सारखें होईल. आणि या फायद्याच्या दृष्टीनें भाषांतरकारांना आमची अशी सूचना आहे कीं, दुसऱ्या भागांत कांहीं पानें खर्चीं पडलीं तरी तीं खर्चीं घालून, त्यांनीं या सबंध ग्रंथांतील पारिभाषिक शब्दांच्या अर्था-संबंधाचा कोश द्यावा.

असो. ऐतिहासिक व सामाजिक दृष्ट्या अतिशय महत्त्वाचा असा हा संस्कृत ग्रंथ मराठी वाचकांना उपलब्ध करून दिल्याबद्दल सर्व मराठी वाचक वर्ग भाषांतरकारांचा सदैव ऋणी राहील इतकें सांगून हें ग्रंथ-परीक्षण पुरें करतों.

---

# कौटिलीय अर्थशास्त्र

( लेखांक पहिला )

कौटिलीय अर्थशास्त्र, या संस्कृत ग्रंथाच्या भाषांतराचा पहिला भाग १९२७ सालीं प्रसिद्ध झाला त्या वेळीं त्याचा परिचय वाचकांना आम्हीं करून दिलाच होता. हल्लीं या ग्रंथाचा उरलेला दुसरा भाग प्रसिद्ध होऊन तें काम पुरें झालें, याबद्दल भाषांतरकार व प्रकाशक या दोघांचेंहि आम्ही मन:पूर्वक अभिनंदन करतों. पण त्याबरोबर मराठी वाचकवर्गाचेंहि अभि-नंदन केल्याशिवाय राहावत नाहीं. कारण भरत खंडांतील प्राचीन विद्या विद्वत्ता व सुधारणा यांच्याविषयीं ज्या ग्रंथांच्या जोरावर आपणाला साधार

व सकारण असा अभिमान बाळगतां येतो त्यांतील श्रेष्ठ ग्रंथांमध्यें या ग्रंथाची गणना अवश्य करावी लागते. परंतु मूळ ग्रंथ संस्कृतांत, व त्यांतूनहि सूत्ररूपानें म्हणजे होतील तितके शब्द वांचवून म्हणजे कापडाचे धागे ठासून विणतात त्याप्रमाणें, लिहिलेला असल्यामुळें, सामान्य वाचकांस तो उपलब्ध झाला तरी त्यांतील सर्व मर्म कळणें अशक्यप्राय होतें. परंतु तोच ग्रंथ आतां प्रस्तुत भाषांतराच्या रूपानें प्रकाशित झाल्यामुळें खासगी व सार्वजनिक मराठी ग्रंथसंग्रहांहून त्याला कायमचें स्थान मिळेल. आणि अभ्यास करण्याची उमेद किंवा निदान कुतूहलबुद्धि यापैकीं कोणत्याहि हेतूनें तो वाचण्याची इच्छा धरणारास तो आतां सहज वाचतां येईल. म्हणून आर्यविद्याभिमानी असे हजारों मराठी वाचक तो ग्रंथ वाचून, भाषांतरकारांच्या व प्रकाशकांच्या श्रमांचें चीज करून त्याबरोबर आपली आकांक्षाहि तृप्त करतील याविषयीं आम्हांस शंका वाटत नाहीं.

या ग्रंथाचे प्रकाशक, मुळे यांनीं या दुसऱ्या खंडाच्या प्रारंभीं जें स्वतःचें हृद्गत सांगितलें आहे तें बोधप्रद आहे. मुळे यांचें शिक्षण जुन्या समर्थ विद्यालयांत श्री. तात्यासाहेब करंदीकर यांचे हाताखालीं झालें. व त्यानंतर सुप्रसिद्ध महाराष्ट्र पत्राचे संपादक श्री. ओगले यांचेजवळ मुळे यांनीं दोन वर्षें खासगी शिक्षण घेतलें. या दोन सन्मार्गदर्शक शिक्षकांनीं मुळे यांच्या मनांत जें सत्प्रवृत्तीचें बीज निर्माण केलें तें फलप्रद झालें यांत शंका नाहीं. कारण विद्यार्जन संपल्यानंतर वडिलोपार्जित पुस्तकविक्रीचा व प्रकाशनाचा धंदा त्यांनीं पुढें चालविला; आणि रोजनिशा पंचांगें व किरकोळ धार्मिक पुस्तकें छापून विकून उदरनिर्वाह होत असतांहि, त्याहून विशेष प्रतीचें व राष्ट्रोपयोगी असें आपल्याच धंद्यांतलें एखादें कार्य करावें असें त्यांना वाटलें. आणि चित्रमय जगताच्या एका अंकांत कौटिलीय अर्थशास्त्राचे कांहीं उतारे प्रसिद्ध झाले होते ते वाचून या महत्त्वाच्या ग्रंथाकडे त्यांचें लक्ष वेधलें, व कितीहि खर्च आला तरी हा समग्र ग्रंथ भाषांतरासह प्रसिद्ध करून मराठी वाचकांच्या हातीं द्यावा असा निश्चय त्यांनीं केला. यावरून चांगल्या शिक्षकांशीं सहवास घडल्यानेंच मुळे यांच्या मनांत सत्प्रवृत्तीचें बीज रुजलें व तें दृढ निश्चयानें फळाला आलें असें जें आम्ही वर म्हटलें तें खरेंच आहे हें कोणीहि मान्य करील.

मुळे यांनीं गेली १० वर्षें हा निश्चय मनांत कायम ठेवला हें त्यांना

भूषणावह आहे. परंतु त्यांचा हा निश्चय कायम सिद्धीस जाण्याला फिरून त्यांचे शिक्षक करंदीकर हेच उपयोगी पडले. कारण या ग्रंथाचें सर्व भाषांतर करून देण्याच्या कामाला स्वतः करंदीकर यांना जरी भरपूर वेळ नव्हता तरी, 'हस्तें नाहीं तर परहस्तें या न्यायानें त्यांनीं नगरचे विद्याभिलाषी गृहस्थ बळवंतराव हिवरगांवकर यांना विनंति करून हें भाषांतर करविलें व नंतर तें स्वतः पाहून तपासून प्रकाशनाचें काम हल्लीं पुरें केलें. या अत्यंत परिश्रमाच्या कार्यांत मुख्य भाग हिवरगांवकर यानींच उचलला खरा. कारण सर्व भाषांतर त्यांनीं करून शिवाय दुसऱ्या खंडाला जोडलेली मोठी विवेचनात्मक प्रस्तावनाहि लिहिली. तथापि भाषांतर रूजू पाहाणें व वेगळी आणखी एक विवेचनात्मक प्रस्तावना लिहिणें हीं कामेंहि परिश्रमाचींच होतीं, व तीं करंदीकर यांच्या उद्योगप्रियतेमुळें व निष्ठेमुळें पार पडलीं. परंतु हिवरगांवकर हे भाषांतर पूर्ण करून निम्मी अधिक प्रस्तावना झाल्यावर दुर्दैवानें निवर्तले, व हा ग्रंथ वाचकांच्या हातीं संपूर्ण व सांगोपांग पडलेला पाहण्याचा आनंद अनुभविण्यास ते राहिले नाहींत, त्याबद्दल मुळे व करंदीकर यांच्याप्रमाणें आम्हालाही मोठी हळहळ वाटते. या ग्रंथाला कारणीभूत झालेल्या या त्रिवर्गाचा उल्लेख अशा आदर बुद्धीनें व विस्तृत करण्याचें कारण हेंच कीं, असले ग्रंथ तयार करण्याचें काम किचकट, तें छापण्याला खर्च फार, व मराठी वाचकांची स्थिति पाहावी तर त्यांनीं उदार आश्रय देऊनहि प्रकाशनाचा खर्च भरून निघण्याचीहि मारामार म्हणून असे ग्रंथ प्रसिद्ध होण्याला विशेष प्रकारची राष्ट्रीय अभिमानाचीच दृष्टि लागते. असो. आतां राष्ट्रीय अभिमान जागृत करणाऱ्या अशा या ग्रंथाकडे वळूं.

या ग्रंथाच्या पहिल्या भागाचें समालोचन आम्ही केलें तेव्हां या ग्रंथाच्या योग्यतेविषयीं दोन शब्द लिहिलेच होते त्याविषयीं द्विरुक्ति न होतां परीक्षण लिहिण्यासारखा विषय या दुसऱ्या भागांत कांहीं अधिक आलेला आहे. पण कांहीं बाबतींत थोडीशी द्विरुक्ति झाली तरी ती हवीच आहे. कारण असे महत्त्वाचे ग्रंथ वरचेवर प्रसिद्ध होत नाहींत. म्हणूनच त्यांच्याविषयीं कांहीं निमित्तानें पुनरुक्ति करण्याचा योग आल्यास तो आनंददायकच वाटतो. कौटिलीय अर्थशास्त्र हा ग्रंथ २२शें वर्षांपूर्वी लिहिला गेला असें मानण्यास हरकत नाहीं. पण युरोपियन चिकित्सक पंडितांना अशी

एक संवय आहे कीं, कोणताहि संस्कृत ग्रंथ घेतला असतां तो होतां होईतों आधुनिक ठरविण्याचा प्रयत्न करावयाचा. ग्राम्य शब्दांनीं बोलावयाचें तर त्यांना ही वर्षे चोरण्याची किंवा हरण करण्याची, संवय किंवा खोड आहे असें म्हणतां येईल. लो. टिळकांनीं लिहिलेला वेदकालनिर्णायक ग्रंथ पुष्कळांनीं वाचला असेल. म्हणून त्याचा निर्देश येथें करून आम्ही वाचकांना असें सांगतों कीं, युरोपियन पंडितांना ही खोड कशी लागून गेलेली आहे, व तो केवळ सत्यान्वेषी चिकित्सक बुद्धीचा परिणाम नसून त्यांत खरोखर मानसिक दोष आहे, हें टिळकांनीं खोडून काढलेल्या युरोपियन पंडितांच्या अनुमानावरून कोणासहि सहज दिसून येईल. टिळकांप्रमाणें भांडारकर तेलंग वगैरे विद्वानांनाहि हाच अनुभव आल्याचें त्यांच्या ग्रंथांतून दिसतें. मग चिकित्सक बुद्धीचे म्हणविणाऱ्या युरोपियन पंडिताना दुसऱ्याच्या संस्कृतीचीं वर्षें चोरून ती आधुनिक ठरविण्याची खोड असावी याचें कारण काय? याचें कारण हेंच कीं, "विद्या व संस्कृति यांचा जगांतील उगम खिस्त युगानंतरचा आहे, निदान ग्रीस व रोमन खेरीजकरून जगांतील इतर भागांत खिस्तापूर्वी संस्कृतीचा उगम नव्हता" अशी समजूत त्यांच्या मनानें करून घेतलेली आहे. अर्थात् स्वाभिमानाच्या अतिशयोक्तीचाच हा परिणाम होय.

प्रो. मॅक्समुल्लरसारख्यांनीं वेदवेदांगाचा कसून अभ्यास केल्यामुळें, हिंदुस्थान युरोपियन राष्ट्रांना काय शिकवूं शकेल याची योग्य कल्पना त्यांना आली; व ती त्यांनीं कृतज्ञतेनें व प्रांजलपणानें कबूलहि केली आहे. शिवाय त्यांना हेंहि कबूल करावेंच लागलें कीं, खिस्त युगापूर्वी व त्यानंतरच्या कांहीं शतकांत इकडे हिंदुस्थान संस्कृतिमय असतां इंग्लंड जर्मनी यासारख्या देशांतील तत्समकालीन समाज रानटी स्थितींत होते. अर्थात् भारतीय संस्कृत ग्रंथांचीं वर्षें होतील तितकीं कमी करण्यांत त्यांना इंग्लंड जर्मनी या देशांची संस्कृति आधींची असें ठरवावयाचें नव्हतें व ठरवितां आलेंहि नसतें. मॅक्समुल्लरादि पंडितांच्या पण खोडीचें कारण घरच्यापेक्षां आजोळच्या विद्यासंपत्तीच्या अभिमानामुळें उत्पन्न झालेलें होतें. खिस्तयुगापूर्वीहि लॅटिन व त्यापूर्वी ग्रीक संस्कृति हीच काय ती सगळ्या जगांतील संस्कृति! आणि त्या व्यतिरिक्त जगांत इतर कोठें खरी संस्कृति अशी नव्हती असा त्यांचा समज! पण सुदैवानें अलीकडे पुराणवस्तुसंशो-

धन खात्यानें जो उद्योग चालविला आहे त्यामुळें खिस्ति शकामागील दोन हजार वर्षांपूर्वींहून दोन हजार किंवा अधिक वर्षांच्या आर्य संस्कृतीचा पुरावा हिंदुस्थानांत किंवा बाहेर त्यालगत उपलब्ध होऊं लागला असल्यामुळें, या युरोपियन पंडितांचीं भ्रममूलक अनुमानें भराभर ढांसळून पडूं लागलीं आहेत.

वरील इतकें विवेचन करण्याचें कारण हेंच कीं 'कौटिलीय अर्थशास्त्रा' संबंधानेंहि युरोपियन पंडितांनीं ही खोड प्रगट केली आहे. तथापि सुदैवाची गोष्ट ही कीं या ग्रंथासंबंधानें त्यांना ६०० वर्षांपेक्षां अधिक वर्षांची चोरी करतां आली नाहीं ! त्यांच्या मतें या ग्रंथाचा काल खिस्तपूर्व चौथ्या शतकाचा नसून खिस्तोत्तर चौथ्या शतकाचा आहे. या अनुमानाचें खंडन हिवरगांवकर यांनीं आपल्या प्रस्तावनेंत समर्पक रीतीनें केलें आहे तें मुळांत कोणीहि वाचावें. केवळ मराठी वाचकांना या ग्रंथाचा सामान्यपणें परिचय करून देणें हाच या लेखाचा मुख्य उद्देश असल्यामुळें याहून अधिक विवेचन आम्ही येथें करीत नाहीं. आम्हीं इतकेंच म्हणतों कीं, या युरोपियन पंडितांच्या मताप्रमाणें हा ग्रंथ २२ शें वर्षांपूर्वींचा नसून १६ शें वर्षांपूर्वींचाच आहे असें जरी घेऊन चाललें तरी ग्रंथाच्या महत्त्वाची हानि कांहीं होत नाहीं. कारण ग्रीस व रोम सोडून दिले असतां, या ग्रंथाच्या तोडीचा त्या कालाचा ग्रंथ सगळ्या युरोप खंडांतील वाङ्मयामध्यें कोणालाहि काढून दाखवितां येणार नाहीं हा मुद्दा सर्वस्वी अबाधित राहातो; व युरोपियन पंडितांच्या पदरांत त्यांच्या मत्सरबुद्धीचें पाप मात्र पुरें पडतें. या ग्रंथाचा कर्ता आर्य चाणक्य हा चंद्रगुप्त मौर्याचा शिक्षक व मुख्य राजमंत्री होता, आणि स्वतः चंद्रगुप्त हा सुप्रसिद्ध अलेक्झांडर याशीं समकालीन होता, अशी जी अनुमानसिद्ध व ऐतिहासिक पुराव्यावरून बनणारी समजूत आहे तीच वाचकांनीं घेऊन चालावें.

आतां या ग्रंथांतील विषयासंबंधानें पाहतां, त्या विषयींचा अभिमान आपणाला वाटतो तो केवळ त्याच्या प्राचीनत्वामुळें नसून त्यांत प्रगट झालेलें बुद्धिचातुर्य, परिणत संस्कृति, व उत्कर्षपूर्ण देशस्थिति यावरूनहि तो अभिमान बाळगण्यास भरपूर जागा आहे ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे. हीं तीनहि वर्णनें किती खरीं आहेत हें मूळ ग्रंथ वाचून पाहणाराला

तेव्हांच दिसून येईल. कारण या ग्रंथाला ' अर्थशास्त्र ' असें जरी थोडेसें एकांगी नांव आहे तरी त्यांत अनेक प्रकारचें मानसिक तत्त्वज्ञान व अनुभवसिद्ध विद्या असल्याचें स्पष्ट आहे. स्वतः कौटिल्यामतें अर्थशास्त्र म्हणजे पृथ्वी किंवा भूमि जिंकणें व तिचें यशस्वी रीतीनें परिपालन करणें यांविषयींचें शास्त्र होय. अर्थशास्त्र या शब्दाला समानार्थक इंग्रजी शब्द ' पोलिटिकल इकॉनमी ' असा आधुनिक विद्वानांना सहजच सुचतो. परंतु त्या दोन शब्दार्थांची व्याप्ति एकच नाहीं. आधीं कोणतेहि शब्द हे कोणत्याहि विषयाचा अर्थ तंतोतंत प्रगट करण्याला समर्थ नसतात. त्यांत अतिव्याप्ति किंवा अव्याप्ति हा दोष नेहमीं घडतो. शिवाय, पोलिटिकल इकॉनमी हा शब्द घेतला तरी त्यांतहि हा दोष आहेच. कारण मूळ ज्या ग्रीक शब्दावरून तो शब्द निघाला त्यानें दर्शविलेला अर्थ आज २० व्या शतकांत ' पोलिटिकल इकॉनमी ' या शब्दाचा नाहीं. इतर सर्व गोष्टीबरोबर अर्थशास्त्राचा विषय एका बाजूला वाढत जाऊन, मूळच्या समाजशास्त्र विषयापैकीं फक्त एका भागाला तो हल्लीं चिकटून राहिला आहे हें अर्थशास्त्राचा इतिहास वाचणारांना कळून येईल. आणि दिवसेंदिवस तो अर्थ अधिकाधिक संकुचित होत चालला आहे. म्हणून या ग्रंथाच्या उसन्या परभाषांतरित नांवावरून त्याची कल्पना करणें बरोबर होणार नाहीं.

मूळ ॲरिस्टॉटल याचा अर्थशास्त्र नामक ग्रंथ घेतला तरी त्यांत असे किती तरी विषय गोवलेले आढळतात कीं ते त्याच नांवाच्या आजच्या युरोपियन किंवा अमेरिकन ग्रंथांत आढळत नाहींत. याचें कारण हेंच कीं, ॲरिस्टॉटलच्या ग्रंथाप्रमाणेंच हा ग्रंथहि व्यापक पद्धतीनें लिहिलेला आहे. ज्ञानविषयांची तर्कशास्त्रानुसार विभागणी हल्लीं करतात तशी ती पूर्वी करीत नसत. जुनी पद्धति वेगळी होती. जुनी ग्रंथकर्तृत्वाची पद्धतीहि अशी होती कीं, कोणी एखादा ग्रंथ लिहिला तर त्यांत ग्रंथकाराला असलेलें बहुतेक सर्व ज्ञान संगृहीत करावयाचें. या पद्धतीला एनसायक्लोपीडिक ( Encyclopaedic ) पद्धति म्हणतां येईल. निदान ' कौटिलीय अर्थशास्त्र ' हा ग्रंथ तत्कालीन समग्र समाजस्थितीला उद्देशून लिहिलेला असल्यामुळें, आजच्या दृष्टीनें एकत्र न यावे असे अनेक विषय त्यामध्यें आलेले आहेत. हें सांगण्याचें कारण असें कीं मूळ ग्रंथ बाजूला राहून, व अर्थशास्त्र हा शब्दहि बाजूला राहून ग्रंथाचा जो कर्ता चाणक्य त्याच्याविषयीं कपटी मुत्सद्दी अशी जी कल्पना परंपरेनें व रूढीनें

लोकांच्या मनांत उतरली आहे तितक्यापुरतीच या ग्रंथाविषयीं लोकांची कल्पना सामान्यतः असते. कारण कोठेंहि दोन गोष्टींत कांहीं साम्य दिसलें म्हणजे त्यांचा दाखला एकमेकांना देण्याची रीतच आहे. आणि आधुनिक विद्वानांना इटालियन ग्रंथकार मॅकॅव्हिली याचें नांव व त्याच्या कुप्रसिद्ध कपटनीतीइतकीच ग्रंथाची स्थूल माहिती असल्यामुळें, मॅकॅव्हिलीच्या 'प्रिन्स' या ग्रंथाप्रमाणें चाणक्याचें अर्थशास्त्र हा केवळ कपटी राजनीतीचा एक ग्रंथ असेल अशी पुष्कळांची सहजच समजूत असते. पण ही समजूत किती खोटी आहे व या पुस्तकांत तत्कालीन समाजस्थितिदर्शक व संशोधनाला योग्य अशी इतर किती माहिती आहे हें मूळ ग्रंथ जो वाचील त्याला तेव्हांच दिसून येईल. तात्पर्य, केवळ रूढ कल्पनेनें या ग्रंथाविषयीं कोणीहि अनुमान बांधण्याचें धाडस करूं नये. तर संशोधक व अभ्यासक बुद्धीनेंच त्याचा परामर्ष घ्यावा. असो. अशा रीतीनें प्रस्तावना रूपानें या ग्रंथाचा परिचय करून दिल्यावर त्याचें खरें महत्त्व कळून येण्याकरितां त्यांतील विषयांचें जें परीक्षण करावयाचें तें पुढील लेखांत करूं.

---

## कौटिलीय अर्थशास्त्र

( लेखांक दुसरा )

कौटिलीय अर्थशास्त्राला व्यापक म्हणजे Encyclopaedic म्हणजे एखाद्या ज्ञानकोशासारखें स्वरूप आहे हें आम्ही गेल्या अंकांत दर्शविलेंच आहे. याविषयींचीं पहिल्या भागांतील उदाहरणें दोन वर्षांपूर्वी पुस्तकाचें परीक्षण केलें तेव्हां दिलींच आहेत. म्हणून आतां दुसऱ्या भागांतील कांहीं उदाहरणें देऊं. यांतील मुख्य विषय राजा, राजमंडळ, राजपरिवार, राज्यकारभार, राजाचे मित्र व राजाचे शत्रू आणि या सर्वांचे परस्पर संबंध हा असल्यामुळें त्याचें सविस्तर विवेचन तर ग्रंथांत आहेच. पण अवांतरहि अनेक विषय यांत आहेत. व 'राज्यकारभार' या व्यापक सदराखालीं ते येतात असें मानूनच त्यांची सुसंबद्धता स्वीकारतां येते. पहिल्या प्रकरणांत मनुष्यांना असणाऱ्या सामान्य व्यसनांचा विचार आहे व काम क्रोधादि षड्रिपूंची चिकित्साहि आहे. उदाहरणार्थ, "वाईटाचा स्वीकार

म्हणजे काय आणि चांगल्याचा छळ म्हणजे काय ? काम व क्रोध या दोनहि विकारांपासून अनेक अनर्थ उद्‌भवतात, म्हणून हे वाईट समजले जातात, म्हणून मनुष्यानें आध्यात्मिक बल संपादन करावें, पोक्त व अनुभवी माणसांचा सहवास ठेवावा, इंद्रियांचें दमन करावें आणि सर्वस्वहरण करण्यास व अनेक अनर्थ उत्पन्न करण्यास कारणीभूत होणाऱ्या कामाचा व क्रोधाचा त्याग करावा." हा उपदेश सर्वसामान्य आहे व राजाला तो उपदेश केला याचें कारण राजाला मनुष्यस्वभावाचा म्हणजे निरनिराळ्या वृत्तीच्या मनुष्यव्यक्तींचा जितका संबंध येतो तितका इतर कोणालाहि येत नाहीं, अशी उपदेशकाची समजूत आहे असें धरून चालावें लागतें. पण असले अवांतर विषय दुसऱ्या भागापेक्षां पहिल्या भागांतच अधिक आहेत.

### मंत्र तंत्र प्रयोग

मंत्र, तंत्र, प्रयोग, हें प्रकरण असेंच आहे. या प्रकरणांत या दोन साधनांनीं धर्मबाह्य लोकांना कसें मारावें किंवा त्रास द्यावा हें सांगितलें आहे. ही गोष्ट चातुर्वर्ण्यव्यवस्थेच्या रक्षणाकरितां आहे असें म्हटल्यानें राजाच्या कर्तव्याशीं त्याचा संबंध येऊन पोंचतो. पण हा बराचसा द्राविडी प्राणायाम आहे. निदान मंत्र–तंत्र–प्रयोगाचा जो बेसुमार तपशील दिला आहे तो पाहिला म्हणजे या प्रकरणांत राजाला उपदेश करण्यापेक्षां ग्रंथकर्त्याला या विषयाचें जें ज्ञान होतें, किंवा तत्कालीन ग्रंथांतून मिळण्यासारखें होतें, तें सर्व एकत्र मांडण्याचाच त्याचा हेतु अधिक दिसतो. शत्रुनाश हा राजाला इष्ट असला तरी या प्रकरणांत सांगितलेले उपाय स्वतः राजा तर राहोच, पण राजाच्या नोकरांनाहि करावे लागतील असें मानण्याला कल्पना फारच ताणावी लागते. प्राणी मारण्याला किंवा त्याचीं इंद्रियें विकल करण्याला उपयोगी पडणाऱ्या ज्या औषधांच्या यादी किंवा Prescriptions या अध्यायांत दिलीं आहेत तीं वाचून मौज वाटते. आणि त्यांतील पुष्कळशीं अनुभवसिद्ध नसून परंपरागत आलेल्या भोळ्या समजुती व निवळ कल्पना यांवर त्यांची रचना थोडीबहुत झाली असावी असें वाटतें. यांत ताप आणण्यापासून, पिण्याचें पाणी दूषित करण्यापासून, तों मनुष्य मारण्यापर्यंत सर्व प्रकारचे उपाय सांगितले आहेत. उदाहरणार्थ, "विजेनें पेटलेला अग्नि किंवा वीज पडून जळलेल्या झाडाच्या लांकडा-

पासून केलेले निखारे घेऊन त्यांत कृत्तिका किंवा भरणी नक्षत्रीं रौद्र विधीनें होम केला असतां तो अग्नि कधींहि विझतच नाहीं. " " लोहाराच्या घरचा अग्नि आणून त्यांत मधाचा होम करावा. कलालाच्या घरच्या अग्नींत मद्याचा होम करावा. एकपत्नीव्रतस्थ पुरुषाच्या घरच्या अग्नींत फुलांच्या माळांचा होम करावा. वेश्यांच्या घरच्या अग्नींत मोहऱ्यांचा, बाळंतिणीच्या घरच्या अग्नींत दह्याचा, अग्निहोत्र्याच्या घरच्या अग्नींत तांदुळाचा, चांडाळाच्या घरच्या अग्नींत मांसांचा, चितेच्या अग्नींत माणसांचा, याप्रमाणें अग्नींत पृथक् पृथक् होम करून नंतर ते अग्नि एकत्र करून त्यांत बोकडाच्या चरबीचा, माणसाचा आणि वडाच्या व राजवृक्षाच्या समिधांचा होम अग्निमंत्रानें करावा म्हणजे हा अग्नि विझविला जात नाहीं व जो कोणी त्याजकडे पाहील त्याच्या डोळ्यांना भूल पडते "!!

## विलक्षण उपाय

शत्रूच्या डोळ्यांना भूल पाडण्याकरितां सांगितलेला हा उपद्व्याप पाहून, सोपीं साधनें अवघड करून सांगण्याची विद्या या ग्रंथकाराला किंवा तत्कालीन वैद्य मांत्रिक तांत्रिक यांना माहीत होती असेंच म्हणावें लागतें. राजकारणांतील शत्रूला कसें फसवावें किंवा आपल्या लोकांत अद्भुत शक्ति कशी उत्पन्न करावी याविषयींचा अध्यायहि असाच अद्भुत आहे. १५ दिवस भूक न लागावी तर औषध कोणतें? महिनेच्या महिने उपवास सोसण्याला औषध कोणतें? मनुष्य व जनावर यांना विद्रूप करण्याला औषध कोणतें? केंस पांढरे होण्याला औषध कोणतें? कुष्ठरोग उत्पन्न होण्याला औषध कोणतें? शरीर ज्वालाग्राही करण्याला औषध कोणतें? पाण्यांत पदार्थ जळावा, वाऱ्यांत विस्तव न विझावा, शंभर योजनें न थकतां चालतां यावें, उल्कापाताचे देखावे कसे उत्पन्न करावे या सर्वांचे उपाय यांत दिलेले असून, त्यांतील कांहीं वाचून हसूंच येतें. या विषयासंबंधाचे अनेक अध्याय वाचून करमणूक होते यापेक्षां त्याविषयीं अधिक कांहीं लिहितां येत नाहीं. पण प्रश्न असा कीं चाणक्यासारख्या कुशाग्रबुद्धीच्या विद्वानाला हे सर्व उपाय खरे वाटून ते उपयोगांत आणले जातात किंवा उपयोगांत आणतां येण्यासारखे आहेत असें खरोखरच त्याला वाटत असावें काय? पण न

जाणो जारण–मरण, मंत्र–तंत्र, विषप्रयोग इत्यादिविषयीं जुन्या काळच्या सर्वच लोकांच्या कल्पना अशा प्रकारच्या असतील. आणि तार्किक बुद्धि व भलत्या गोष्टीवरील भोळा विश्वास हीं एकाच ठिकाणीं नांदूं शकत होतीं असें अनेक समाजांच्या जुन्या इतिहासावरूनहि दिसून येतें. युरोपियन राष्ट्रांतील मध्ययुगांतल्या भोळ्या समजुती कशा होत्या, किंवा खुद्द इंग्लंडांत परवां परवांपर्यंत चेटकीणीचें अस्तित्व कसें मानीत असत हें लक्षांत घेतलें म्हणजे अर्थशास्त्रांतील या अध्यायाचें आश्चर्य वाटत नाहीं. पण ग्रंथस्वरूपाच्या दृष्टीनें आमचा सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, त्यांतील सर्व सिद्धांत, प्रमेयें, वचनें, विधानें व उपदेश हें अनुभवसिद्धच लिहिलें गेलें असें म्हणणें अशक्य आहे. तर एखाद्या विषयावरील जी काय माहिती मग ती लिहिणारा ज्ञानी असो वा अज्ञानी असो, धूर्त असो वा भोळा असो, संशोधक असो किंवा तारवटलेल्या स्थितींत असो, कोणीहि लिहिलेली सांगितलेली म्हणून प्रचलित असेल ती सर्व एकत्र देण्याची पद्धत या पुस्तकांत अनुसरली आहे.

आणि खुद्द राज्यव्यवहारासंबंधानें जो विषय या भागांत किंवा पूर्वींच्याहि भागांत आलेला आहे त्याबद्दलहि वरील प्रकारचेंच विधान थोडेसें करावें लागतें. सामान्यत: असें म्हणावेसें वाटतें कीं, कांहीं प्रकरणांतील माहिती निवळ ऐकीव किंवा निवळ काल्पनिक अशीहि असली पाहिजे. राजानें मित्र कसे संभाळावे, शत्रू कसे निर्दाळावे व राज्यरक्षण यशस्वी कसें करावें किंवा राज्य कसें वाढवावें हा प्रश्न सोडविण्याकरितां म्हणून घेऊन, तर्कपद्धतीनें त्या विषयाचे जितके विभाग करतां येतील तितके करून, त्याचें वर्णन, विवेचन किंवा उपाययोजना हीं निवळ डोळे मिटून कल्पनेच्या तंद्रींत लिहिलीं असण्याचा संभव आहे. एखादा नाटककार किंवा कादंबरीकार एखाद्या कथेचें संविधानक मनानें तयार करतो आणि मग त्यांतील प्रवेश, देखावे, संभाषणें यांचें वर्णन कल्पनेनें रंगवतो त्याप्रमाणें या ग्रंथकारानें पुष्कळ अंशीं केलें असावें असें वाटतें.

## कपटविद्येचे डावपेंच

चाणक्य हा स्वत: चंद्रगुप्ताचा गुरु व त्याच्या राजकारणाच्या स्फूर्तीचा उगम होता असें मानलें तरी राजाचे मित्र व शत्रु यांच्याशीं वागण्याचे जे शेंकडों प्रकार, प्रसंग, उपाय, साधनें वगैरेंचें वर्णन ग्रंथांत केलें आहे

त्या सर्वांचा अनुभव किंवा प्रत्यक्ष ज्ञान त्याला किंवा कोणाहि एका माणसाला असणें शक्य नाहीं. किंवा अनेकांनीं तें केवळ अनुभवानें लिहून ठेवलेलें होतें असेंहि म्हणवत नाहीं. बुद्धिबळाच्या खेळांतील प्रोफेसर स्वतः पुष्कळ प्रकारचे डाव खेळलेला असतो परंतु खेळलेल्या डावापेक्षां तो आपल्या कल्पनेनेंच किती तरी अधिक डाव नवीन बनवीत असतो तशीच ही चाणक्याची गोष्ट समजण्यास हरकत नाहीं. दूत, हेर, कपटी, कारस्थानी हस्तक, गुप्तपणें नाश करण्याची विद्या, फशी पाडण्याचे कपटप्रयोग, मित्रांचे मित्र व शत्रूंचे शत्रू यांच्याशीं वागण्याच्या रीति किंवा आडाखे यांचा तपशील या ग्रंथांत इतका दिला आहे कीं, त्यांतल्या शतांशाचाहि अनुभव स्वतः या बुद्धिबलसंपन्न गुरूला किंवा त्याच्या पराक्रमी शिष्याला आला नसेल. तात्पर्य, यशस्वी राजकारण हा विषय बुद्धिबळांतील खेळांप्रमाणें किंवा सुभाषितांतील कूटप्रश्नाप्रमाणें किंवा चित्रकाव्यांतील प्रबंधाप्रमाणें किंवा Cross word puzzle प्रमाणें, किंवा पत्त्यांच्या ब्रिजच्या डावाप्रमाणें, किंवा वर सांगितल्याप्रमाणें एखाद्या कादंबरींतील प्रवेशाप्रमाणें, तो उद्देशच घेऊन लिहिण्यास बसलेल्या बुद्धिवान पुरुषाला लिहितां येण्यासारखा आहे. व तशाच प्रकारचा या ग्रंथांतील पुष्कळसा भाग आहे.

## तत्कालीन राज्यव्यवस्था

पण आज राष्ट्रीय दृष्ट्या या ग्रंथाचें जें महत्त्व आहे असें आम्ही समजतों तें वर लिहिलेले मंत्र तंत्र प्रयोग किंवा राजकारणांतील कपटनीतीची ही कादंबरी यांच्या दृष्टीनें नव्हे, तर त्यांतील जीं वर्णनें किंवा विधानें तत्कालीन राज्यव्यवस्था, देशस्थिति, समाजस्थिति यांच्यावर प्रकाश पाडणारीं आहेत असें निःसंशय वाटतें त्यांच्यामुळेंच. राजकीय व सामाजिक व्यवहार यांच्या अनेक अंगांसंबंधानें पहिल्या व दुसऱ्या भागांत पुष्कळच माहिती आहे व त्यांतील बरीचशी माहिती अनुभवसिद्ध किंवा प्रचलित किंवा शास्त्रसंमत पद्धतीनें जितक्या प्रमाणानें अनुमान बांधणें युक्त तितक्या प्रमाणांत अनुमानात्मक अशीच आहे असें आम्हाला वाटतें. व या दृष्टीनें हिवरगांवकर व करंदीकर या दोघांनीं लिहिलेल्या प्रस्तावना व समालोचनें हीं वाचकांनीं लक्षपूर्वक वाचलीं असतां फार बोधप्रद होतील. उदाहरणार्थ, साम्राज्याची कल्पना त्या वेळीं काय होती? राज्यव्यवस्था कशी होती? राज्यांतील कर वसूल कसा व किती केला जात

असे ? न्याय व मुलकी राज्यव्यवस्था कशी होती ? शेतकी खातें कसें चालविलें जात असे ? न्यायपद्धति कोणती होती ? लष्करी व्यवस्था कशी असे ? परराष्ट्रीय संबंधांची कल्पना कशी असे ? इत्यादि गोष्टी तत्कालीन स्थितीविषयीं प्रमाणभूत मानून चालण्याला हरकत नाहीं.

करंदीकर यांनीं दिलेल्या परिशिष्टांपैकीं, अर्थशास्त्रांतील कांहीं तुलना हें प्रकरण घेतलें असतां, कौटिल्यानें उपस्थित केलेले तुलनाविषयक प्रश्न व त्यांचीं त्यानेंच दिलेलीं उत्तरें याला केवळ मानसिक व्यापाराचा खेळ म्हणतां येईल. परंतु त्याच परिशिष्ट–संग्रहांत सरकारी वसुलाच्या बाबी, करांच्या आकारणीचीं प्रमाणें, नाण्यांचीं कोष्टकें व उतरती भांजणी, अश्वविद्येचा विषय, दागिन्यांचे प्रकार, किल्ले कोट बांधण्याच्या सूचना, सेनेचा व्यूह रचण्याचे प्रकार, तहनाम्यांचे प्रकार, गुन्ह्यांचे प्रकार व त्यांना सांगितलेल्या शिक्षा या गोष्टींना बरेंचसें वस्तुस्थितीचें अधिष्ठान व तत्कालीन प्रामाण्य होतें. यामुळें हिंदुस्थानांतील आजची समाजस्थिति व त्या वेळची समाजस्थिति यांची तुलना करणें हें संशोधकांना उद्योग करण्याला आणि शास्त्रीय कल्पना व बुद्धिचातुर्य खर्चण्याला फार मोठें क्षेत्र आहे. या संशोधनानें किंवा तुलनेनें काय सिद्धांत निघतील किंवा काढावयाचे हा येथें मुख्य प्रश्न नाहीं. शास्त्रीय पद्धतीनें जें त्यांतून निघेल तेंच खरें. मग त्यांतील कांहीं त्या कालाला अनुकूल किंवा हल्लींच्या काळाला अनुकूल किंवा प्रतिकूल जें निघेल तें निघेल. कारण सत्याचा विधिनिषेध कोणी मानीत नाहीं.

या तुलनेसंबंधानें दुसरीहि एक गोष्ट सांगावयाची ती अशी कीं, कोणत्याहि काळांतील समाजस्थिति गुणदोषमिश्रितच असते व असावयाचीच. त्याला कोणत्याहि एका ठराविक प्रमाणानें मोजून चालावयाचें नाहीं.

कौटिलीय अर्थशास्त्रामध्यें गुन्ह्यांचे प्रकार व शिक्षा यांची माहिती दिली आहे. परंतु चाणक्यकालीन पिनल कोड व मेकॉलेचें पिनल कोड हातांत घेऊन–हें दुसरें आज हिंदुस्थानांत प्रचारांत असल्यानें आमच्या परिचयाचें आहे तेवढ्यावरून चाणक्याचे पिनल कोडावर मत प्रगट करणें बरोबर होणार नाहीं. याचें कारण कोणत्याहि दोन देशांचें पिनल कोड एकाच काळचें घेतलें तरी त्यांतील गुन्ह्यांच्या व्याख्या व शिक्षांच्या मर्यादा या सारख्या आढळणार नाहींत. चोरांच्या गुन्ह्याला कांहीं वर्षांपूर्वीं

विलायतेंत फांशीची शिक्षा असे. आज चोरांच्या गुन्ह्यालाच काय पण एकंदर फौजदारी कायद्यांतूनच फांशीची व फटक्यांची शिक्षा रद्द करावी असें मत जोरानें प्रचलित होत आहे. पण २२०० वर्षांपूर्वी फौजदारी कायदे बजावतांना गुन्ह्याच्या प्रकारांत तरतमभाव किती सूक्ष्म चालविला जात होता व गुन्ह्यांना शिक्षा सांगितल्या त्या किती सकारण आहेत हें पाहिलें म्हणजे कौतुक वाटतें. जी गोष्ट पिनल कोडाची तीच किंवा त्याहून अधिक प्रमाणानें दिवाणी कायदा व राज्यघटना यांचीहि असली पाहिजे. तथापि येथें त्या काळच्या व आजच्या स्थितींतील फरक हा मुख्य मुद्दा नसून त्या काळीं भरतखंडांतील मुलकी राज्यव्यवस्था सुधारलेली होती हा आहे, व राज्ययंत्राचा कारभार लोकांच्या सुखसोयी लक्ष्यांत घेऊन केला जात असे हीच मुद्द्याची मुख्य गोष्ट होय.

## तत्कालीन सुधारणा

या कालचीं राज्यें लहान लहानच असत. हल्लींएवढीं मोठीं राज्यें तेव्हां नव्हतीं. युरोपांतहि सिटी स्टेटस् होतींच म्हणजे एका शहराचें एकेक राज्य असाहि प्रकार होता. ज्यूरी, मतदारसंघ व कायदेमंडळ, हीं जवळ जवळ समव्याप्त असून तीं इतकीं लहान असत कीं, आरोपी म्हणून अगर उमेदवार म्हणून कोणाला भाषण करावयाचें झालें तर तें या वर्गातील सर्वांना ऐकूं जाईल इतकीं तीं लहान असत. भरतखंडांतील राज्यें यापेक्षां अधिक मोठीं होतीं. म्हणून राज्यव्यवस्थाहि अनेक खात्यांवर विस्तारलेली व खोल विचारानें बनविलेली अशीच होती. इतकेंच नव्हे तर ज्या सुधारलेल्या गोष्टी या नव्या काळांत प्रथम उत्पन्न झाल्या असें वाटतें, अशाहि कांहीं गोष्टी या जुन्या काळांत अमलांत होत्या. उदाहरणार्थ, जुन्या काळीं ग्रामाधिकारी असत व तेथून वरपर्यंत एकावर एक असे निरनिराळे अधिकारी असून राज्याचा वसूल हिशेबानें घेतला जाई व हिशेबीपणानें खर्चला जाई यांत आश्चर्य नाहीं. पण त्या काळीं जन्ममृत्यूची नोंद, गांवांची खानेसुमारी, जनावरांच्या संख्येची नोंद प्रॉपर्टी रजिस्टर, कोर्ट ऑफ वॉर्डस्, पाटबंधाऱ्याची व्यवस्था, सार्वजनिक इमारतींची व्यवस्था, ड्रेनेज, टाऊन प्लॅनिंग, काढते घालते पूल, वजनें मापें बिनचूक ठेवण्याची व्यवस्था, शहरांतील सुधराई सफाई, स्मशानांची व्यवस्था, आग विझविण्याची व्यवस्था, आरोग्यबाधक पिकांना प्रतिबंध,

धान्य फळें फुलें यांच्या निवडक बीजांचें संरक्षण वगैरे गोष्टी आपल्याला केवळ आधुनिक अशा वाटतात. पण त्याहि चाणक्याच्या ग्रंथांत आढळतात.

वास्तविक अशा गोष्टी जुन्या काळीं आढळतात म्हणून आश्चर्य प्रगट करणें म्हणजे जुन्या काळच्या लोकांचा उपमर्द करणें असेंच होय. कारण आश्चर्य करणारा प्रथम अशी गोष्ट गृहीतच धरतो कीं, जुन्या काळीं मनुष्यामध्यें आजच्याइतकी बुद्धि, कल्पकता, योजना वगैरे गोष्टी नव्हत्या. पण ही गृहीत गोष्ट मुळांत खरी कोठें आहे? म्हणून हें आश्चर्य सकारण न ठरतां वेडेपणाचें व ग्राम्य ठरतें. कांहीं लोक इतके भोळे असतात कीं जुन्या काळीं माणसांचा देह हल्लींच्या माणसारखा होता असें म्हटलें तरी त्याचेंहि त्यांना नवल वाटतें. पण हल्लीं शोधकांना १०-१० हजार वर्षांपूर्वींचे मुडद्यांचे सांगाडे सांपडतात. त्यांतील देहरचना हल्लींच्या मनुष्याच्या देहरचनेसारखीच असते हें पाहून त्यांचा नाइलाज होतो इतकेंच.

असो; याहून अधिक तपशिलांत जातां येत नाहीं. पण आम्ही इतकेंच सांगतों कीं, कौटिल्याच्या ग्रंथाचें हें मराठी भाषांतर जो समग्र वाचील त्याला प्रत्येक अध्यायांतच काय पण प्रत्येक ओळींतहि जुन्या काळच्या लोकांची बुद्धि, प्रगल्भता, त्यांची विद्वत्ता, त्यांची कल्पना व अनुभवाचें वर्गीकरण करून त्यांतून संघटित शास्त्र बनविण्याची पात्रता वगैरे गोष्टी दिसून येतील. हा ग्रंथ Encyclopaedic म्हणजे सर्वसंग्रहाच्या रूपाचा आहे हें पूर्वीं सांगितलेंच आहे. कारण कौटिल्याला प्रत्यक्ष राजकारणाचा व राज्यव्यवस्थेचा परिचय असला तरी, एका बाजूस लष्करी फौजेचा व्यूह बनविणें व दुसऱ्या बाजूस रत्नादिकांची परीक्षा करणें या गोष्टी स्वतः चाणक्याला प्रत्यक्ष परिचयाच्या होत्या किंवा त्यांत तो वाकबगार होता असा अर्थ नाहीं. तर अर्थशास्त्रांत जितके विषय पडतात तितक्यांची माहिती देण्याचा त्याचा निश्चय दिसतो; मग ती माहिती त्याची स्वतःची असो किंवा इतर साधनांनीं मिळविलेली असो.

## ४३ धर्मकोश अर्थात् सनातन-धर्म-शास्त्र-संग्रह



( लेखांक १ ला )

वांई येथील प्राज्ञपाठशाळेच्या चालकांनीं प्रस्तुत कोशाचें काम हातीं घेतलें असून, त्यासंबंधीचें उद्देशपत्रक आम्हीं पूर्वीं केसरींत छापलेंच आहे. तथापि या नवीन ग्रंथाच्या महत्त्वाकडे लोकांचें लक्ष अधिक जावें व त्यांच्या कार्याला अधिक मदत मिळावी, म्हणून त्याविषयीं मुद्दाम आज दोन शब्द लिहिण्याचें योजिलें आहे.

हिंदुस्थानच्या संस्कृतीचा अभ्यास करूं इच्छिणारांनीं हिंदुधर्मशास्त्राचा अभ्यास प्रथम केला पाहिजे. कारण सर्व प्रकारच्या हिंदु संस्कृतीचा संबंध या धर्मशास्त्राशीं येतो. धर्मशास्त्राचा अभ्यास म्हणजे तो केवळ धर्मशास्त्र-विषय ग्रंथांतील विषयांचा अभ्यास इतकेंच नसून या ग्रंथांच्या इतिहासाचा अभ्यासहि अवश्य आहे. कारण श्रद्धाशील लोकांचें समाधान केवळ विषय–प्रतिपादक वचनांनीं होण्यासारखें असलें तरी, चिकित्सक अभ्यासकांचें काम तेवढ्यानें होत नाहीं. श्रद्धाशील अभ्यासक असें मानतात कीं, "श्रुति, स्मृति, पुराणें, सूत्र–ग्रंथ, निबंध–ग्रंथ या सर्वांचा अंतरात्मा एकच असून त्यांच्या विषय–प्रतिपादक वचनांत परस्पर–विरोध कोठें दिसला तरीहि तो खरा नाहीं, आणि प्रत्यक्ष मीमांसा–शास्त्रानें नसला तरी मीमांसा–पद्धतीच्या तर्कशास्त्रानें त्या सर्वांची एकवाक्यता करतां येते." यामुळें सर्व श्रद्धाशील अभ्यासकांना एकाच वर्गांत घालतां येईल. कारण ते शब्दप्रामाण्यवादी व एकवाक्यतावादी आहेत.

पण चिकित्सक अभ्यासकांमध्यें दोन वर्ग पडतात. पहिला वर्ग अशा चिकित्सक अभ्यासकांचा कीं, जे शब्दप्रामाण्य व एकवाक्यता यांचा संकेत मान्य करितात. मात्र इतर निबंधकारांप्रमाणें आपणासहि बुद्धि-स्वातंत्र्य आहे, आपण त्यांच्याप्रमाणेंच आपलें बुद्धिचातुर्य चालविलें व निर्विकार मनानें धर्मशास्त्र–प्रतिपादन म्हणजे स्पष्टीकरण केलें, तर आपण धर्माशीं अराजनिष्ठ ठरत नाहीं, तर इतर निबंधकारांइतकेच धर्मनिष्ठ म्हणवून घेण्यास पात्र राहतों, असा हक्क ते सांगतात.

पण चिकित्सक अभ्यासकांचा दुसरा एक वर्ग असा आहे कीं, ते निव्वळ शब्दप्रामाण्य संकेतानेंहि मानीत नाहींत, तर प्रामाण्य हा शब्द प्रेमार्थी, आदरार्थी, विवेचक अनुकरणार्थी, आत्मीयत्वार्थी लावतात. "श्रुतीपासून निबंधकारांपर्यंत सर्वांच्या सर्व वचनांची एकवाक्यता होऊं शकते असें मानणें हें निवळ ढोंग आहे, अप्राणिकपणा आहे," असें तें उघड म्हणतात आणि धर्मशास्त्रवचनांचाच आधार घेऊन वचन-धर्मापेक्षां आचार-धर्माला ते अधिक प्रामाण्य देतात. धर्मग्रंथांचें बाह्यांगनिरीक्षण करणें त्यांच्या प्रणेत्यांचीं चरित्रें उपलब्ध करणें, त्यांचे परस्पर कालक्रम ठरविण्याचा प्रयत्न करणें, तात्पर्य, जिला ऐतिहासिक पद्धति म्हणतात त्या पद्धतीनें धर्मग्रंथांचा अभ्यास करणें, हें अधिक श्रेयस्कर व सत्यालाहि धरून असतें असा त्यांचा कटाक्ष असतो. असो; श्रुतीपासून निबंधग्रंथापर्यंत सर्वांना ते हिंदुसंस्कृतिमूल असें मानून त्यांच्याकडे प्रेमादरानें पहाणाऱ्या लोकांतहि मुख्य दोन वर्ग व त्यांतील एका वर्गांत फिरून दोन उपवर्ग, कसे पडतात हें वर दर्शविलें आहे.

तथापि, या तिघांनाहि धर्मग्रंथांचा अभ्यास इष्ट व अवश्य वाटतो यांत शंका नाहीं. आणि या तिघांच्याहि उपयोगी पडण्याचा एकच मार्ग म्हणजे, स्वतःच्या पदरचें कांहीं न घालतां किंवा कमीजास्त न करतां, निरनिराळ्या विषयांसंबंधीं उपलब्ध अशा यच्चयावत् धर्मशास्त्रवचनांचा पद्धतशीर प्रकरणवार संग्रह करणें हा होय हें कोणीहि कबूल करील. अर्थात् अशा वचनांचा संग्रह म्हणजेच तो धर्मकोश होय. आपण पाहतोंच कीं, शब्दकोशकार हा सर्वस्वी निर्विकार असतो. सुटे शब्द हे स्वतः निरर्थक नसले तरी व्याकरणपद्धतीनें इतर शब्दांच्या संगतीनें त्यांची वाक्यें बनल्याशिवाय शब्द कोणताहि व्यवहारक्षम असा अर्थ प्रतिपादन करूं शकत नाहींत. अर्थात् शब्दकोशकार हा जसा निर्विकार, निरभिमानी, निःपक्षपाती, तसाच धर्मवचनकोशकार हाहि मानला पाहिजे व असणारच. म्हणून असे कोशकार दोन प्रकारचें कार्य एकदम साधूं शकतात. एक कार्य धर्म-शास्त्राची सेवा व दुसरें अभ्यासकांचा उपयोग.

या कोशाचा पहिला हप्ता म्हणून, नमुना म्हणून, आदर्श म्हणून, एक खंड धर्मकोशकारांनीं प्रसिद्ध केला आहे. त्यावरून आमच्या वरील विधानांची यथार्थता लक्षांत येईल. या खंडांत १६३ वचनें संग्रहित केलीं

आहेत. तीं सर्व एकट्या विवाहकालसंबंधीं आहेत. हीं वचनें तुटक पण संपूर्ण दिलेलीं असून, खालीं तळटीपेंत त्या त्या वचनांचीं उगमस्थानें दिलीं आहेत. तसेंच पाठभेद आढळले तेहि दिले आहेत. उरलें काम अभ्यासकांचें—श्रद्धाशील अभ्यासकांचें व चिकित्सक अभ्यासकांचें. या दोघांनींहि या वचनांचें आलोडन करून त्यांतून जे सिद्धांत सप्रमाण म्हणून ठरतील ते ठरवावे. धर्मकोशकारांची त्याला हरकत नाहीं; एवढेंच नव्हे तर अभ्यासकांना असे सिद्धांत प्रतिपादन करण्याला उपयुक्त साधन व्हावें म्हणूनच किंबहुना हा कोश तयार करण्याचे परिश्रम त्यांनीं घेतले आहेत.

हे सिद्धांत काढतांना कोणी आपण मीमांसेनेंच अर्थ काढला व संगति लावली असे म्हणो, कोणी तर्कसाधनानेंच पण शास्त्राविरोधी तर्कसंधान ठेवलें व निव्वळ अर्थ लावला ( मीमांसा लावली नाहीं ) असें म्हणो, किंवा कोणी निवळ चिकित्सक बुद्धि व ऐतिहासिक दृष्टि लावली असें म्हणो. सर्वांनीं आपापल्या परीनें काढलेले सिद्धांत हे धर्मशास्त्रांत तितकी गति नसलेल्या वाचकांना धर्मशास्त्राध्ययनाचें साधन म्हणून सारखेच उपयोगी पडतील. कारण कांहीं असलें तरी शेवटीं जो तो वाचक आपली बुद्धि चालवूनच ग्राह्याग्राह्य ठरविणार. तो या बाबतींत स्वतंत्र आहे. त्याला कोणी बंधन घालूं शकत नाहीं. आणि अशा रीतीनें एक प्रकारच्या स्वतः प्रामाण्य बुद्धीनें ठरलेल्या ग्राह्याग्राह्य शास्त्रसिद्धांतावरच सामाजिक आचारांची मांडणी व त्यांचा फैलाव होतो. म्हणून केवळ निष्क्रिय म्हणजे तात्त्विक संशोधन करण्याची इच्छा असणारा धर्मसंशोधक, किंवा आधुनिकांतला आधुनिक बनून सरकारी विधिमंडळाच्या सत्तेनें सुधारणा घडवून आणूं इच्छिणारा सक्रिय बुद्धीचा चिकित्सक, या दोघांनाहि हा धर्मकोश सारखाच उपयोगी आहे.

---

## धर्मकोश अर्थात् सनातन-धर्म-शास्त्र-संग्रह

( लेखांक २ रा )

आमच्यापुढें असलेला धर्मकोशखंड पाहिला असता तेवढ्यावरून हल्लीं वादग्रस्त असलेला विवाहकाल या विषयावर बराच प्रकाश पडण्यासारखा

आहे. या विवाहकालासंबंधानें कोणताहि एक सिद्धांत मांडण्याची आमची इच्छा नाहीं; पण इतर रीतीनें जें दिसतें तें स्थूलरूपानें एकंदर १६३ वचनांपैकीं अवघीं पांचच वचनें प्रत्यक्ष वेदांतून उपलब्ध झालेलीं दिसतात. सुमारें ४५ वचनें गृह्यधर्मसूत्रांतून उपलब्ध झालेलीं आहेत. सुमारें १७ वचनें निबंधोक्त स्मृतिसदृश संग्रहग्रंथांतून उपलब्ध झालेलीं आहेत. सुमारें २७ वचनें पुराणांतून उपलब्ध झालेलीं आहेत व बाकीचीं स्मृतींतून उद्धृत केलेलीं आहेत. यावरून एक गोष्ट प्रथमच निदर्शनास येते ती ही कीं, सशास्त्र विवाहकाल ठरविण्याला प्रत्यक्ष वेदवचनें फारच थोडीं सांपडतात. त्यांहून अधिक पण एकंदरीनें थोडींच वचनें सूत्रग्रंथांत सांपडतात व शास्त्रवचनांचा मुख्य आधार म्हटला म्हणजे स्मृती याच होत. पण स्मृती या अनेक असल्यामुळें व निरनिराळ्या स्मृतींतून विरोधी वचनें आढळत असल्यानें शेवटीं निबंधकारांनीं वेदशब्दप्रामाण्याऐवजीं स्वतःचें बुद्धिचातुर्य व तारतम्य चालवूनच निर्णय दिलेले आहेत. हे निर्णय निरनिराळ्या प्रांतांत, निरनिराळ्या परिस्थितींत, दिलेले असल्यामुळें मूळ स्मृतिकारांना काय हवें होतें यापेक्षां त्यांच्या निकटवर्ती समाजाला काय हवें होतें हें लक्षांत घेऊन व या अपेक्षेचा परिणाम कळत किंवा न कळत मनावर होऊन निबंधकारांनीं आपले निर्णयरूप सिद्धान्त प्रस्थापित केलेले आहेत.

अशा रीतीनें स्वतःचें बुद्धिबल व बुद्धिचातुर्य चालवीत असतां आपण स्मृतिकारांना अभिप्रेत अशाच गोष्टी सांगत असल्याचा बहाणा हे निबंधकार करतात; पण याशिवाय स्मृति–विरोध परिहार करण्याला लुप्त वेदांचाहि आधार त्यांना उपयोगी पडतो ! मौज अशी आहे कीं, लुप्त वेद म्हणजे श्रद्धाशील वावदूकांचें अखंड व कधीं न ओसरणारें असें गुप्त धनच होय. जमिनीच्या पोटांत बहुधा सर्वत्र पाणी आहेच. ज्याला ती विद्या अवगत असेल त्यांनीं ती फक्त पुरेइतकी खोल ढुंबडी लावून तें वर काढावयाचें असतें; किंवा लुप्त वेद हे नुसत्या सह्या करून ठेवलेल्या ब्लँक चेकांचें बुक आहे; चेक वटवण्याच्या प्रामाण्याला साक्ष मालकाची सही. मग इष्ट रक्कम चेक वटविणारानें आपल्या हातानें हवी ती लिहून घ्यावी ! त्याप्रमाणेंच शब्दप्रामाण्याच्या निष्ठेवर रचलेली समर्पक लुप्तवेदांची कल्पना ही निबंधकाराला आधार म्हणून उपयोगी पडते.

हे लुप्त वेद अर्थात् अनुमित करावयाचे व आहेत म्हणून घेऊन चालावयाचें असें ठरलेलें असल्यामुळें, दाखवा कोठें आहे तें श्रुतिवचन, असें कोणी विचारीत नाहीं व तें काढून दाखविण्याची गरज उरत नाहीं. अशा प्रकारचे लुप्त वेद असलेच पाहिजेत असें म्हटल्यानें काम भागतें. प्रस्तुत लेखकाच्या परिचयाचा एक लहान पण हजरजबाबी मुलगा होता. त्याला तुम्ही त्याच्या कोणत्याहि कृत्याचें कारण विचारा तो तें सर्व कारण एका ठराविक शब्दांत सांगून टाकी. तो शब्द 'म्हणून' हा होता. 'तूं कां धावतोस' याचें उत्तर म्हणून असें तो देई, व 'तूं कां धावत नाहींस?' असें विचारलें तरीहि तो 'म्हणून' या शब्दानेंच उत्तर देई. त्या मुलाला असें वाटे कीं, मी म्हणून हा शब्द उच्चारला म्हणजे माझ्या वर्तनाचें समर्थन आपण केलें. 'म्हणून' या व्याकरणपदाचा अर्थ व उपयोग त्याला समजला होता. त्याला जें येत नव्हतें तें इतकेंच कीं, म्हणून या शब्दामागें मला हवें होतें, मला आवडलें, माझी तशी लहर लागली हे शब्द घालावयाचे. त्या बिचाऱ्याला श्रुति-शब्द-प्रामाण्याचें महत्त्व शास्त्रीलोक किती मानतात हें कळलें असतें तर तूं उडी कां मारलीस किंवा उडी कां मारली नाहींस यालाहि तो एकच उत्तर देता कीं लुप्त वेदांनीं, लुप्त श्रुतीनें तसें सांगितलें म्हणून!

पण ही विनोदाची भाषा सोडून अगदीं भाबडेपणानें सरळ बोलावयाचें तर असें म्हणावेंच लागतें कीं, प्रत्येक काळांत शास्त्राप्रमाणें आचरण करण्याचा बाहाणा करणारा हिंदु नाइलाज झाला तेव्हां लुप्त वेदांनाच शरण गेला आहे. याविषयीं आम्ही एक पटण्यासारखें उदाहरण देतों. अन्नंभट या पंडितानें वैशेषिक दर्शन व न्यायदर्शन यांचें ज्ञान तरुण विद्यार्थ्यांना करून देण्याकरितां तर्कसंग्रह ग्रंथ रचला. त्यांतील पहिलेंच वाक्य असें आहे कीं, "शंकराचें ध्यान करून, गुरूंना वंदन करून, बालांना अनायासानें बोध होण्यासाठीं मी हा तर्कसंग्रह ग्रंथ करीत आहे.' वास्तविक हें वाक्य केवळ मंगलवचन आहे; त्यांत इष्ट देवतेला नमस्कार करण्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं. पण या तर्कसंग्रहावरील दीपिकेंत एक अनवश्यक प्रश्न उपस्थित करून त्याचें गमतीदार उत्तर दिलें आहे ते प्रश्नोत्तर असें:—"ग्रंथारंभीं मंगल करावेंच असें कोठें सांगितलें आहे? तर याचें उत्तर असें कीं, शिष्ट लोक आजपर्यंत तें करीत आले. तेव्हां

मंगल करावें असें जिच्यांत सांगितलें आहे अशी श्रुति कोठें तरी असली पाहिजे असें त्यांच्या आचारावरूनच अनुमान निघतें. मंगल केलेंच पाहिजे याला प्रमाण काय? तर शिष्ट लोकांच्या आचारावरून जें अनुमानानें सिद्ध होतें तशी श्रुतिच याला प्रमाण होय. ग्रंथारंभीं मंगल करावें असें वेदांनीं सांगितलेलें असलेंच पाहिजे. कारण असा शिष्ट लोकांचा आचार पडलेला आहे; हा आचार अलौकिक आणि अनिंदित आहे. व जो जो अलौकिक आणि अनिंदित अशा शिष्टाचाराचा विषय असतो तो तो वेदानें करावा म्हणून सांगितलेलाच असतो!"

आम्हांला इतकेंच सांगावयाचें कीं, श्रुतिप्रामाण्याच्या एकजिनसी, एकरंगी, अखंड पार्श्वभूमिकेवर जें डोळ्यांत भरण्यासारखें खरें चित्र म्हणून वेगळ्या रंगाचें असतें तें या वरील युक्तिवादांत दिसून येणारें आहे. तर्कसंग्रहाची ही दीपिका लिहिली गेली त्या वेळीं नव्या स्मृतीचा वाद नव्हता. विधिमंडळांकडून हिंदुधर्मशास्त्रांत सुधारणा करून घेणारे सुधारक अवतरले नव्हते. त्या वेळचें सर्वच हिंदुजग श्रद्धाशाली होतें. चिकित्सक म्हणून नास्तिक या नांवानें दूषित झालें नव्हतें. अशा वेळीं पूर्ण निर्विकार मनःस्थितींत आचारधर्माच्या श्रेष्ठत्वाविषयीं किंवा निदान गमकत्वाविषयीं दीपिकाकारानें काढलेले शब्द खऱ्या हिंदू मनाचे द्योतक कां मानू नयेत? सुधारणा या शब्दाचा आवाज कानीं पडल्याबरोबर श्रद्धाळूपणानें हटवादी बनलेले आमच्याहि काळांतले शास्त्रीपंडित शब्दप्रामाण्याच्या अभेद्य किल्ल्यांत जाऊन बसतात. बाहेरच्या कोणच्याहि पदार्थाचा वारा लागला कीं लाजाळू नांवाची वेल आहे ती आपले पल्लव अधोमुख करितें व मिटून घेते. किंवा गोगलगाय कशाचाहि स्पर्श झाला कीं आपलीं शिंगें आंखडते; इतकेंच काय पण सगळा देहचा देह घेऊन शिंपल्यांत दडून बसते. तशीच गति हल्लींच्या शास्त्री-पंडितांची झाली आहे. विवेकाचा स्पर्श किंवा वाराहि लागतांच ते कूर्माप्रमाणें सर्वांग संकुचित करून बसतात! इतकेंच ते करते तरी पुरवतें पण निबंधकाराच्या पद्धतीनें आपली बुद्धि चालवून जर कोणी शास्त्रार्थ विशद करूं लागला तर त्यांचा राग अनावर होतो आणि मग मागें पळतां पळतां साळू नांवाचा प्राणी आपलीं पिसें तीराप्रमाणें मानीव शत्रूवर फेकून त्याला जखमी करूं पाहातो किंवा पेंगूळ हा प्राणी स्पर्श झाल्याबरोबर

घाणीचे फवारे सोडतो त्याप्रमाणें शास्त्रीपंडित, प्रतिपक्षी हा आमच्यासारखें शब्दप्रामाण्य मानणारा नाहीं, आमच्यासारखा दयाळू नाहीं म्हणून तो नास्तिक आहे अशी त्याची निंदा करीत सुटतात. असो.

लुप्तवेद हवे तितके हवे त्यानें हवे तेव्हां अनुमित करावे. पण धर्मवचन कोश लिहावयाचा म्हणजे त्यांत प्रकट श्रुतिवचनांचाच संग्रह करावयाचा असतो व आदर्शभूत धर्मकोशखंडांत विवाहकालासारख्या महत्त्वाच्या विषयावर प्रकट श्रुतिवचनें किती थोडीं आढळतात व पुढें अनुमित श्रुतींच्या आधारानें सूत्रकार, स्मृतिकार व निबंधकार शास्त्र कसे फैलावीत जातात ही एकच गोष्ट प्रस्तुत धर्मकोशखंडानें सिद्ध केली तरी तिनें मोठेंच कार्य केलें असें आम्ही म्हणूं. पण जुन्यानव्या मतवाल्यांचीं युद्धें श्रुतीच्या बालेकिल्ल्यावर जाऊन होतात अशीं थोडींच. त्यांचें मुख्य रणक्षेत्र स्मृतिवचनें व त्यांतूनहि निबंधकारांचे अभिप्राय हेंच होय. पण केवळ त्याहि बाबतींत धर्मकोशाचा फार उपयोग होणारा आहे कारण सामान्य लोक स्मृतिग्रंथांतून आचाराकडे न येतां मध्येंच निबंधकारांच्या तडाख्यांत सांपडतात व ते तसे सांपडले म्हणजे त्यांनीं बुद्धिकौशल्यानें व वावदूकपणानें निर्माण केलेल्या चक्रव्यूहांतून किंवा भुलभुलायींतून बाहेर पडणें अशक्यप्राय होऊन बसतें. म्हणून अवांतर पाश तोडून टाकून निवळ शास्त्रवचनें तुटक पण प्रामाणिकपणें उद्धृत केलेलीं अशीं वाचकांपुढें संग्रहित करून ठेवल्यास सत्याभिलाषी संशोधकाला फार मदत होण्यासारखी आहे. पण हें काम तज्ज्ञ असून निर्विकारी अशाच माणसांच्या हातून होण्यासारखें असतें व तें हातीं घेतल्याबद्दल वे. शा. सं. नारायणशास्त्री मराठे प्रभृति संशोधकांचें आम्ही अभिनंदन करितों.

भारतीय समाजशास्त्राच्या अभ्यासकांकडून या ग्रंथाच्या आधारें कांहीं नवी मांडणी होवो वा न होवो; परंतु जुनी मांडणी झाली तरी खरोखर काय व कशी आहे हें तरी या ग्रंथानें त्यांना चांगलें कळेल. दुसऱ्याहि एका दृष्टीनें या ग्रंथाचा उपयोग आहे तो असा कीं निबंधकारांनीं जीं सर्व शास्त्रवचनें म्हणून दडपून दिलेलीं आहेत तीं खरीं स्मृतिग्रंथांतून किती आहेत याचीहि चिकित्सा व्हावयास पाहिजे. ती होईल. उदाहरणार्थ, आनंदाश्रमांत छापलेल्या देवलस्मृतींत एकंदर ९० श्लोक आहेत ! पण देवलांच्या नांवानें निबंधकारांनीं ठिकठिकाणीं मिळून ९०० 

पेक्षां अधिक वचनें उद्धृत केलेलीं आहेत! तेव्हां मूळ शुद्ध सुवर्ण किती व प्रक्षिप्ताची भेसळ किती हें ठरलें पाहिजे. किंवा हीं सर्व वचनें खरींच देवलस्मृतीचीं असें एकदां ठरलें म्हणजे देवलस्मृतीची नवी आवृत्ति काढली पाहिजे किंवा जुन्या भाषेनें बोलावयाचें तर देवल-स्मृतीचा नवा संहिताग्रंथ तयार केला पाहिजे. नवी स्मृति हा शब्द ऐकल्याबरोबर संतापणाऱ्या लोकांना या वरील मर्यादित अर्थानें तरी नवी स्मृती हा शब्द स्वीकारण्याला हरकत वाटणार नाहीं. नवी स्मृती याचा अर्थ प्रथम तरी संशोधनात्मक, जुन्याच संहिताखंडाचा नवा प्रबंध असा अभिप्रेत असतो.

आज अगदीं नवीन ग्रंथ लिहिणें म्हणजे निराधार अशा सर्वस्वी नव्या कल्पनांना अनुष्टुप श्लोकांच्या कोंडाळ्यांत बसवून नवा ग्रंथ करणें असा अर्थ सहसा अभिप्रेत नाहीं. निर्विकार दृष्टीनें बोलणाराला व ऐकणाराला नवी स्मृति हा शब्द वितळलेल्या लोहरसाप्रमाणें वाटणार नाहीं किंबहुना नव्या स्मृतीचा वाद म्हणून निघाला असतां पूर्वी सांगितलेल्या कूर्मांगसंवरणपद्धतीनें जे लोक सर्व १०८ स्मृती मिळून एकच अखंड ग्रंथ किंबहुना त्या सर्व आधींमागें झाल्या नसून एकदमच अवतीर्ण झाल्या असेंहि म्हणून संकटपरिहार करूं पाहातात, तेच स्वतः निराळ्या परिस्थितींत लिहावयास बसून हिंदुसमाजांतील आचारवैचित्र्याचें समर्थन करूं पाहतात किंवा ग्रंथ लावून दाखवूं इच्छितात, तेव्हां नवीन स्मृति या शब्दाचा उपयोग ते स्वतःहि करितात. याचें उदाहरण रा. चिंतामण विनायक वैद्य यांच्या मध्ययुगीन भारताच्या पहिल्या भागांत पृष्ठ ७७ व ७८ येथें पहावयास सांपडेल. तेथें त्यांनीं कालक्रमाला उद्देशून पुढील स्मृतिकार व मागील स्मृतिकार असा भेद केला आहे व जुन्या स्मृतींचें वैशिष्ट्य दाखविण्याकरतां नवीन स्मृती हा शब्द योजिलेला आहे आणि असें केल्याशिवाय त्यांना गत्यंतर नव्हतें. कारण जातिनिर्बंध व असवर्ण यांचें बाबतींत एका काळीं बंधन दृढ होतें, दुसऱ्या काळीं तें सैल होतें असे उल्लेख केल्यावर अशाहि आचारवैचित्र्याचें समर्थन शब्दप्रामाण्यबुद्धि न सोडतां करावयाचें तर स्मृतीमध्येंहि जुनी नवी हा भेद व ग्राह्याग्राह्यविवेक करणें आणि शब्दप्रामाण्याचे हातपाय दुमडून त्याला आचारप्राधान्याच्या चौकटींत बसविणें या गोष्टीं अनिर्वाह्यच ठरतात.

असो. अशा रीतीनें या धर्मकोशाचा उपयोग रचनापर, टीकापर किंवा विधायक व विध्वंसक अशा दोन्ही स्वरूपाचा असल्यामुळें आम्ही त्याचें मनःपूर्वक स्वागत करितों व आम्ही अशीहि आशा करितों कीं, सर्व धनिक लोक या ग्रंथाच्या प्रसिद्धीला अवश्य हातभार लावतील.

---

## ४३ त्रिखंडात्मक चरित्र.

### ( श्रीमंत सयाजीराव यांचें )

[ ले० व प्र०–दाजी नागेश आपटे बी. ए. एल्एल्. बी. वकील बडोदें ]

( केसरी ८ डिसेंबर १९३६. )

प्रस्तुत चरित्रग्रंथ सुमारें तेराशें पानांचा झाला असून सोयीकरितां त्याचे तीन खंड करण्यांत आले आहेत. पहिल्या ४०० पानांच्या खंडांत सन १८८७ पर्यंतची, दुसऱ्या ४०० पानांच्या खंडांत १९०९ पर्यंतची व तिसऱ्या ५०० पानांच्या खंडांत चालू सालपर्यंतची अशी विभागणी केली आहे. चरित्रविषयक बडोद्याचे विद्यमान संस्थानाधिपती; लेखक दाजी नागेश आपटे, मुद्रक मुंबईचे मंगेशराव कुलकर्णी ( कर्नाटक प्रिंटिंग प्रेस ) असा तिहेरी मेळ पडल्यावर, पुस्तकाचें आंतलें व बाहेरचें अशीं दोनहि अंगें किती चित्ताकर्षक झालीं असतील याची कल्पना कोणासही करतां येईल. सर्वच बाजूंनीं या ग्रंथाला नुसता राजाश्रयच नव्हे तर राजैश्वर्यहि लाभल्यामुळें, तो एखाद्या ग्रंथालयांत ठेवला असतां, नुसत्या नजरेनें डोळयांत भरण्यासारखा देखणा बनलेला आहे. महाराष्ट्रांतील संस्थानिक, मोठीं ग्रंथालयें, त्यातल्या त्यांत सधन वाचक वर्ग, यांच्या संग्रहांत या पुस्तकाचा प्रवेश होईल यांत शंका नाहीं. तथापि ग्रंथाच्या ऐश्वर्याप्रमाणें त्याची किंमतहि विशेष असणार हें उघड दिसतें. ती किती आहे हें आम्हाला माहीत नाहीं. पण ती सामान्य वाचकाच्या शक्तीपलीकडे असणार. म्हणजे हा ग्रंथ सामान्य वाचकाला संग्रहीं ठेंवतां येण्यासारखा नाहीं. म्हणून आम्हाला अशी सूचना करावीशी वाटते कीं, या तीनहि खंडाचा मिळून साध्या कागदावर एकच मोठा खंड छापून

काढल्यास तो मध्यम वर्गाच्या वाचकांना विकत घेता येण्याइतक्या किंमतींत निघूं शकेल.

## सामान्य माणसाचें असामान्य कर्तृत्व

श्रीमंत सयाजीराव महाराज हे एक आदर्शभूत देशी संस्थानिक होऊन राहिले आहेत यांत शंका नाहीं. त्यांच्यामध्यें मनुष्यस्वभावानुसार कांहीं अवगुण किंवा व्यंगें, इतर कोणाहिप्रमाणें, असल्यास नवल नाहीं. पण नवल आहे तें हें कीं, सतत ६० वर्षें जातीनें राज्यकारभार करून, इतक्या व्यवस्थितपणें आपलीं धोरणें परिणत करून, तीं व्यवहारांत उतरविण्याचा प्रयत्न केलेले संस्थानिक फार थोडे पहावयास मिळतात. यांतच त्यांचें आदर्शत्व येतें. राजा व राजदरबार यांच्याविषयीं ज्या कुत्सित कल्पना करतां येतात, आणि ज्या पुष्कळदां खऱ्याहि असतात, त्यांना अनुसरून लिहिलेलीं राजेलोकांचीं यथार्थ चरित्रें छापलीं जाणें शक्य नाहीं, किंबहुना तीं न छापलीं गेलेलींच बरीं! पण राजेलोकांच्या अंगांमध्यें जो चांगुलपणाचा भाग असतो त्याला त्यांच्या स्थानविशेषामुळें इतर कोणाहिपेक्षां अधिक महत्त्व सहजच येतें. हातीं अधिकार आला असतां सामान्य जनतेलाच एक मनुष्य त्याचा उपयोग कसा करतो हें समजणें तर विशेष बोधप्रद आणि आश्वासनपरहि ठरतें. या दृष्टीनें पाहतां सयाजीरावमहाराज यांचें प्रस्तुतचें चरित्र सर्वसामान्य वाचकांच्याहि हातीं पडणें अवश्य आहे. त्याचें पुनर्मुद्रण करणें स्वतः ग्रंथकार किंवा एखादा छापखानेवाला प्रकाशक यांना शक्य असून लाभाचेंहि होईल असें वाटतें.

## स्वस्त आवृत्ति काढा

पण याहिपलीकडे जाऊन आम्हीं असें म्हणतों कीं, स्वतः बडोदें संस्थानच्या योग्य त्या खात्यानेंच या ग्रंथाची स्वस्त आवृत्ति कां काढूं नये? हीं खातीं एरव्हीं लक्षावधि रुपये आपल्या कामाकरितां खर्च करतात, त्या मानानें या नव्या आवृत्तीचा खर्च कांहींच नाहीं म्हटलें तरी चालेल. स्वतः श्रीमंत सयाजीराव महाराज यांनाहि आपलें हें चरित्र सामान्य वाचकाच्या हातीं पडावें आणि त्यानें तें वाचावें अशी हौस मनांत बाळगणें हें योग्यच होईल. त्यांचीं पुरीं-अपुरीं चरित्रें इंग्रजी भाषेंत लिहिणारांना महाराजांकडून द्रव्यलाभ किती व कसा झाला असेल याची कल्पना आम्हाला करतां येते. त्या मानानें या ग्रंथाची स्वस्ती आवृत्ति

काढण्यास महाराजांना येणारा खर्च लक्षांत घेतां घेण्याइतकाहि नाहीं. इंग्रजी चरित्रें परकीयांनीं वाचल्यानें महाराजांना जी कीर्ति मिळाली असेल तशाच प्रकारची कीर्ति मराठी चरित्र वाचलें गेल्यानेंहि त्यांना मिळणारी आहे.

## आत्मचरित्राची आवश्यकता

असो. प्रस्तुत चरित्र माहितीच्या दृष्टीनें उत्तम लिहिलें गेलें आहे. मात्र त्यांतील बराचसा भाग श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्या राज्य-कारभारावर प्रकाश पाडणारा आहे. व्यक्तिचरित्रांवर प्रकाश पाडणारा चरित्रग्रंथ याहून फार वेगळ्या प्रकारचा असतो. या दृष्टीनें आत्मचरित्र सर्वांत उत्तम. आणि सयाजीरावमहाराज इतके उद्योग करतात त्याप्रमाणें त्यांनीं एखादा लेखक हाताशीं घेऊन, फावल्या विश्रांतीच्या वेळीं त्याला माहिती सांगून आत्मचरित्रच लिहविलें असतें किंवा अद्यापि लिहवितील तर तो ग्रंथ आम्हीं पहिल्या प्रतीचा समजूं. प्रथम पुरुषी लिहिलेल्या चरित्रांत कांहीं विशेष गोडी, सौंदर्य आणि मार्मिकपणा प्रगट होतो. अशाहि ग्रंथांत मजकुराची सावधगिरी बाळगतां येत नाहीं असें नाहीं. आणि असें असूनहि लिखाणांत प्रत्यक्ष जातिवंत जिव्हाळा जो निर्माण होतो तो दुसऱ्या कोणी चांगल्या ग्रंथकारानेहि पण तृतीय पुरुषीं लिहिल्यानें उत्पन्न होऊं शकणार नाहीं हें उघड आहे. हिटलरमुसलोनी यांनीं आपलीं आत्मचरित्रें लिहिलीं आहेतच कीं नाहीं? त्यांच्यासारखा अधिकार जर महाराज चालवितात, आणि त्यांच्यासारख्याच स्तुतिनिंदेला महाराजांना सिद्ध व्हावेंच लागतें, तर त्यांच्यासारखेंच आत्मचरित्र लिहून आपलें व्यक्तित्व महाराजांनीं कां प्रगट करूं नये? अयोग्य अहंकार-प्रदर्शन किंवा आत्मस्तुति टाळून यथार्थस्वरूप असें आत्मचरित्र लिहितां येतें.

असो. अशा आत्मचरित्राच्या अभावीं रा. आपटे यांनीं जो चरित्र-ग्रंथ लिहिला तो मान्यच करावा लागतो. कारण या ग्रंथांत महाराजांसंबंधीं जितकी साधार व सुव्यवस्थित हकीकत एकत्र आली आहे तितकी आजपर्यंत दुसऱ्या कोठेंहि वाचावयास मिळालेली नाहीं. आधार-ग्रंथांची यादी रा. आपटे यांनीं पुष्कळ मोठी जोडली आहे. तथापि हा ग्रंथ

छापण्यापूर्वी स्वतः महाराजांच्या दृष्टीखालून गेला असलाच पाहिजे असें आम्हांला वाटतें; आणि असें असेल तर हाच आपटे यांना सर्वांत मोठा आधार म्हणतां येईल. मात्र चरित्रविषय विद्यमान आहे, आणि त्यांच्याच आश्रयानें व संमतीनें ग्रंथ प्रसिद्ध व्हावयाचा होता, यामुळें अशा पुष्कळ हार्दिक गोष्टी या ग्रंथांत लिहिण्याच्या राहिल्या असल्याच पाहिजेत कीं त्या बडोद्याबाहेरचाच एखादा स्वतंत्र ग्रंथकार त्याच माहितीवरून लिहूं शकता. प्रस्तुतचा आपटे यांचा ग्रंथ फार जपून लिहिला आहे. पण तसें होणें अपरिहार्यहि होतें.

## अस्तनींतील विंचू

रा. दाजी आपटे हे महाराष्ट्रांतील वाचकांच्या अत्यंत परिचयाचे लेखक असल्यामुळें त्या दृष्टीनें त्यांचे वेगळे गुणगौरव येथें करण्याचें कारण नाहीं. म्हणून ग्रंथांतील जीं प्रकरणें आम्हांला विशेष वाचनीय वाटलीं त्यांचाच तेवढा उल्लेख करतों. पहिल्या खंडांतील महाराजांचें राज्याभिषेकापर्यंतचें पूर्तवृत्त मनोरंजक व बोधप्रद आहे. हा जुना इतिहास फार थोड्या लोकांना माहीत असतो. महाराज आणि त्यांचे दिवाण यांचे खरे संबंध बरेच गुंतागुंतीचे असतात. म्हणून त्यांच्या खऱ्या स्थितीची माहिती मनोरंजकच असणार. पण ती बाहेर कशी येणार ? दिवाणपदस्थ पण अंतःशत्रु अशा अनेक व्यक्तींशीं महाराजांना निभावून घ्यावें लागलें हें उघड आहे. महाराज जसे मोठे तशा त्यांच्या अडचणीहि मोठ्याच ! पण अनेक वेळां स्वाभिमान गिळावा लागला असला तरी महाराजांनीं अडचणींतून आपलेंच डोकें वर काढलें हें बापटप्रकरणासारख्या कित्येक प्रसंगांवरून दिसून येतें. पिलवाई ओखा मंडळ येथील दंगे या महाराजांच्या खऱ्या अडचणी नव्हत. कारण ते दंगे उघड होते. पण महाराजांना खरा मनःस्ताप झाला असेल तर तो छद्मी दुतोंडे अधिकारी आणि स्वतः त्यांच्या विस्तृत कुटुंबांतील मंडळी यांजपासूनच झाला असावा. हे म्हणजे बुट्यांतले खडे किंवा अस्तनींतले विंचू !

## इंग्रज सरकाराचें नियंत्रण

साम्राज्यसरकार व सयाजीरावमहाराज यांचे संबंध नेहमी भानगडीचे असावे असें दिसून येतें. त्यावरून संस्थानिक हे तुम्हा–आम्हा लोकांना राजे पण इंग्रज सरकारचे अंकित कसे असतात किंवा ठेवण्याचा प्रयत्न

होतो हें १९११ सालच्या दिल्लीदरबारच्या प्रसंगानें कळून येतें. जे दागिने अंगावर घातल्याकरितां हिंदी राजेरजवाड्यांची युरोपियन चेष्टा करतात, ते दरबारच्या प्रसंगीं एखाद्या महाराजानें अंगावर घातले नाहींत, किंवा बादशहाला वंदन करून परत जातांना पाठीचा कोन किती दाखविला व चेहऱ्याचा किती शिल्लक ठेवला एवढ्यावरून संस्थानिकांचा राजद्रोह ठरविला जातो. त्या मानानें पिनल कोडच्या १२४ अ कलमावरून ज्या आमचा राजद्रोह ठरविला जातो ते आम्ही साधे लोक राजेरजवाड्यांहून दसपट अधिक सुखी व सुरक्षित नव्हे काय ? पीनल कोडांतील शब्द व्यापकपणामुळें घातक असोत. पण आरोपिताला स्वाभिमान तरी राखतां येतो. मित्रानें मित्राला कोठेंहि भेटणें याला तरी तुम्हा आम्हाला सरकारची परवानगी नको. पण संस्थानिकांना मित्र म्हणूनहि एकमेकांना भेटण्याची चोरी ! संस्थानिकांनीं आपल्या राज्यांत सुधारणा केली नाहीं तर मनांतून तें एक प्रकारें बरेंच वाटत असतां, सुधारणा न केल्याबद्दल सरकार राजे लोकांना उघड दोष देणार! बरें सुधारणा पुष्कळ केल्या तर आपल्या राज्यकारभाराशीं तुलना होते म्हणून तिकडूनहि मत्सरबुद्धि मनांत जळतच असते ! मात्र आजपर्यंत अशा रीतीनें भोगलेल्या अज्ञातवासाचें उट्टें या फेडरेशनच्या संधीमुळें संस्थानिक कसें काढून घेत आहेत हें पाहून, केव्हां गाड्यावर नाव तर केव्हां नावेवर गाडा ही म्हण प्रत्ययास येते !

## सुखदुःखांचा विचार

महाराजांचे परदेशांतील प्रवास व त्यांनीं राज्यांत केलेल्या सुधारणांची माहिती हीं प्रकरणें सामान्य वाचकाला रुक्ष वाटतात. कारण प्रवासाची माहिती केवळ स्थूलवर्णनानें भरलेली असून ती माहिती पूर्वपरिचित असते. युरोपांतील वास्तव्यप्रसंगीं महाराजांना घडलेल्या युद्धकालीन एखाद्या प्रसंगाची हकीगत चित्ताकर्षक वाटते, परंतु मनोरंजक वाटण्यासारखे इतर शेंकडों खासगी अनुभव महाराजांना तिकडे खचित आले असतील. राजकीय सुधारणांची माहिती राजकीय दृष्टीच्या माणसाला मात्र बोधप्रद वाटेल. खाजगी पत्रांत देखील महाराज 'मार्जिनल नोट' (समासांतील मथळे) घालीत हें लक्षांत आलें म्हणजे या लहानशा गोष्टीवरून महाराजांची एकंदर विचारपद्धति किती आंखीव, रेखीव, सूत्रबद्ध आहे हें दिसून येतें. महाराज राजे न होतां कवळाण्यास राहून आपलें आयुष्य

घालविते तर ते अधिक सुखी झाले असते, किंवा राजेपणांत काढलेल्या आयुष्यांत ते अधिक सुखी झाले हें कोण सांगू शकणार ? पण दारिद्र्याचें गुणवर्णन तत्त्वज्ञानी कसेंहि करोत, श्रीमंती व राज्याधिकार यांच्यामुळें मनुष्याचें आत्मप्रसाधन होण्याला किती तरी पट अधिक साहाय्य मिळेल यांत काय संशय ? आणि आत्मप्रसाधनाची संधी ज्याला लाभते त्याला आपलीं दुःखें व संकटें हींहि एकप्रकारें सुखेंच वाटत असतील यांत काय संशय ? सुख–दुःख–विचार हा सर्व जीवनाचा हेतु जसा मानावा त्यावर अवलंबून राहणार.

---

## ४९ नवयुग-धर्म

[ ले० व प्र० सदाशिव कृष्ण फडके, वकील पनवेल, जि० कुलाबा.]

( पूर्वार्ध )

इतिहास म्हणजे कांहीं केवळ राजकीय घडामोडीचा वृत्तांत नव्हे. लोकव्यवहार अनेकविध, बहुशाख व नानारूपी आहे. आणि त्यांतील प्रत्येक शाखेची प्रगति किंवा परिवर्तन सारखें सुरूच आहे. अर्थात् या सर्व लोकव्यवहाराचा वृत्तांतहि त्यासारखाच बहुशाख असणार. कोणतेंहि शास्त्र किंवा कला घेतली तरी तिला इतिहास हा आहेच. कोणतीहि व्यक्ति घेतली तरी तिला पूर्वज व वंशज हे आहेतच. त्याचप्रमाणें वर्तमानकालची कोणतीहि घडामोड घेतली तरी तिला भूतकालीन इतिहासाचा दुवा आहे व भविष्यकालच्या अज्ञात घडामोडींचा दुवा पुढें जोडला जाणार आहे. आणि जोंपर्यंत मानवाला जीवितकोडें सुटलें नाहीं, जगताचें गूढ उमगलें नाहीं, मरण टळलें नाहीं, व मरणोत्तर काय हा प्रश्न सुटला नाहीं तोंपर्यंत धर्मविचार हा त्याच्या जीवनांतला एक प्रमुख व महत्त्वाचा भाग राहणार व तो त्याच्या आचाराला व व्यवहाराला वळण देत राहणार हें निश्चित होय. आणि हिंदुस्थान ही तर जुनी धर्मभूमी. येथील धर्मविचारांचा उगम सर्व जगापेक्षां जुना व धार्मिक कल्पनांचा लोकाचारावर पगडाहि अतिशय. यामुळें येथील राजकीय घडामोडींच्या इतिहासापेक्षां धार्मिक घडामोडीचा इतिहास हाचअधिक गुंतागुंतीचा व लोकव्यवहाराचा अधिक निदर्शक असा मानावा लागतो.

युरोपांतील धार्मिक चळवळींच्या इतिहासाचें विवेचन करतांना मेकॉलेनें असें म्हटलें आहे कीं, परमार्थ हें कांहीं भौतिक शास्त्राप्रमाणें प्रगमनशील शास्त्र नव्हे. कारण भौतिक शास्त्राचे शोध कितीहि लागले तरी परमार्थाविषयीं जें जुन्या रानटी स्थितींतील मनुष्याचें ज्ञान किंवा अज्ञान तेंच आजच्या अनेक भौतिक शोधांनंतर जसेंच्या तसेंच कायम आहे व पुढेंहि भौतिक शोध चालू राहिला तरी तें तसेंच राहणार. धार्मिक इतिहासासंबंधीं हें मेकॉलेचें मत युरोपांतहि कित्येक विद्वानांना मान्य होण्यासारखें नाहीं; आणि हिंदुस्थानांत तर तें मुळींच मान्य होणार नाहीं. कारण येथें धार्मिक विषयाचें संशोधन आत्मचिंतन, ध्यानधारणा इ. अनेक साधनांनीं ऋषीमुनींनीं केलें. अनेक देवतांपासून एका परमेश्वरापर्यंत व त्याच्याहि पलीकडे निर्गुण निराकार दिक्कालाद्यनवच्छिन्न अशा परब्रह्मापर्यंत याच साधनांनीं ऋषीमुनी पोंचले. देवतार्चनानें ऐहिक उपभोग मागण्यापासून तों इच्छा किंवा मन हीं मारून जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्ति मिळून ब्रह्मांत विलीन होण्यापर्यंतचा मार्ग याच साधनांनीं त्यांनीं आक्रमण केला. आणि पुढील पायरी पोंचल्यावर मागील पायरी नष्ट न करतां पुढिलांकरितां अधिकारानुरूप हा सर्व क्रम कायम ठेवला.

## थिऑसफी व सायकिक रिसर्च

आतां पश्चिमेकडेहि थिऑसफी किंवा सायकिक रिसर्च इ. मार्गांनीं या आमच्या पूर्वजांनीं करून ठेवलेल्या धर्मसंशोधनाचा ओनामा गिरविण्याचें काम चालू आहे. शिवाय अखंड प्रगति असली तरच इतिहास होतो असें नाहीं. परावर्तन असलें म्हणजे इतिहासाला जागा झाली. इतर भौतिक शास्त्रांची प्रगति ही सरळ रेषेसारखी असली तरी धार्मिक घडामोड ही एखाद्या वेटोळ्या- (Spiral) प्रमाणें असेल. तरीहि तिचा इतिहास मनोरंजक उद्‌बोधक व उपयुक्त आहे. राजकीय घडामोडीच्या इतिहासांत तरी लोकसत्ता बेबंदशाही पुनः राजसत्ता पुनः मंडळसत्ता असें चक्र किंवा वेटोळें चालूच आहे कीं नाहीं? धार्मिक बाबतींतहि विचाराची अखंड प्रगति नसली तरी अशाच प्रकारचें परिवर्तन चालू आहेच. आणि परिवर्तन चालू आहे तोंपर्यंत इतिहास हा आहेच. मराठींत हिंदुस्थानच्या प्राचीन राजकीय इतिहासाप्रमाणें धार्मिक इतिहास अजून विस्तृत रीतीनें लिहिला गेला नाहीं. तो लिहिला गेल्यास अत्यंत उद्-

बोधक व उपयुक्त होण्यासारखा आहे. लो. टिळकांनीं आपल्या मनांत योजिलेल्या अनेक ग्रंथांत हिंदुस्थानचा धार्मिक इतिहास हा विषय होता हें प्रसिद्धच आहे.

हा प्राचीन धार्मिक इतिहास केव्हां लिहून होईल तेव्हां होवो. पण अर्वाचीन धार्मिक इतिहासाला एक अत्यंत योग्य असा लेखक लाभला असेंच नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या पनवेलचे वकील श्री. सदाशिव कृष्ण फडके यांच्या "नवयुगधर्म किंवा आधुनिक धार्मिक चळवळीचा विवेचक इतिहास" या पुस्तकाच्या पहिल्या खंडावरून कोणालाहि वाटेल व आनंद झाल्याशिवाय राहणार नाहीं. अर्वाचीन काल हा त्यांतल्यांत्यांत इंग्रजी राज्य हिंदुस्थानांत आल्यापासूनचा काल होय. हिंदुस्थानांत इंग्रज येण्यापूर्वी झालेल्या राजक्रांत्या व इंग्रजांनीं केलेली राज्यक्रांति यांत फार मोठा भेद आहे. पूर्वीच्या राज्यक्रांत्या म्हणजे इंग्रजी राज्यक्रांतीच्या मानानें अगदीं वरवरच्या ठरतात. कारण हल्लींच्या इंग्रजांच्या राज्यपद्धतीच्या मानानें पूर्वी राजसत्तेचा लोकव्यवहाराशीं संबंध अगदीं थोडा व जरूरीपुरता असे. तरीहि 'यथा राजा तथा प्रजा' किंवा 'राजा कालस्य कारणम्' हीं वचनें रूढ झालीं. पण तीं रूढ झालीं त्या वेळेपेक्षां आतां तीं शतपटींनीं किंवा सहस्रपटींनीं खरीं आहेत. इंग्रजी राजसत्तेचा संबंध व्यवहारांतील प्रत्येक बाबतींत येऊं लागला. इंग्रजांबरोबर खिस्ती मिशनऱ्यांचा धर्मप्रचार, इंग्रजी वाङ्मय, इंग्रजी इतिहास, पश्चिमेकडील सुधारणा, पश्चिमेशीं चढतें वाढतें दळणवळण, इंग्रजी संस्था, रीतिरिवाज इ. गोष्टी आल्या; अथवा थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे इंग्रजी संस्कृतिच हिंदुस्थानांत अवतरली. आणि धर्मविषयक बाबतींत राणीच्या जाहिरनाम्यान्वयें सरकार तटस्थ राहिलें तरी या सर्वांगीण सांस्कृतिक संघट्टनाचा परिणाम धर्मावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. इतकेंच नव्हे तर तसा तो होण्यास हा तटस्थपणा उपकारकच झाला. आधींच धामधुमीच्या व मुसलमानी परचक्राच्या प्रभावानें हिंदुधर्माचें बाह्य व प्रचलित सामाजिक स्वरूप मलिन झालेलें होतें. त्यांत खिस्तीधर्म राजसत्तेचें अप्रत्यक्ष पाठबळ घेऊन हिंदुस्थानांत अवतरला.

अर्थात् त्या वेळीं प्रथम इंग्रजी शिक्षण घेतलेल्या पिढींतील बहुतेकांस तो धर्म आदरणीय वाटूं लागला व आपल्या धर्मकल्पना अशिष्ट वाटून

त्याबद्दल खंती किंवा लाजहि वाटूं लागली. नवी मोटार पाहिली कीं जुनी खटारगाडी जितकी टाकाऊ वाटते तितकाच नव्या खिस्ती धर्मापुढें आपला धर्म टाकाऊ वाटूं लागला. आपल्या धर्मातील प्रत्येक गोष्ट "साहेबानें ती पाहिली तर तो काय म्हणेल ?" या एका कसोटीनें पारखली जाऊं लागली. आपला धर्म आतां टिकत नाहीं, नव्या भौतिक साधनांच्या प्रभावानें जुनीं साधनें जशीं नामशेष झालीं तसाच हा धर्महि जाणार असें कित्येकांस वाटून, बुडत्या जहाजांतून उड्या टाकणाऱ्या उंदरांप्रमाणें कित्येक पटापट खिस्ती झाले. कित्येकांनीं नवे पंथ काढले व कित्येक जुन्या धर्मांतच सुधारणा करण्याच्या प्रयत्नास लागले. इंग्रजी राज्याचा प्रसार बंगाल मद्रासकडे मुंबईपेक्षां अगोदर म्हणून तिकडे इंग्रजी युगाचा प्रसारहि अगोदरच झाला. पण मद्रासेपेक्षां बंगाल्यामध्यें धार्मिक खळबळ उडवून देण्यास अधिक अनुकूल परिस्थिति लाभली. कारण तेथें आगाऊच धर्मशैथिल्य माजलेलें होतें. श्री. फडके यांनीं या खंडाच्या पहिल्या भागांत त्या परिस्थितीचें अगदीं यथातथ्य असें वर्णन केलें आहे. १८२८ सालीं राजा राममोहन राय यांनीं ब्राह्मो समाज स्थापला. त्याचा पुढील वर्षी शतसांवत्सरिक उत्सव व्हावयाचा आहे. श्री. फडके यांनीं योजलेले चार खंड मिळून या शंभर वर्षांत सर्व हिंदुस्थानांत मिळून ज्या धार्मिक चळवळी झाल्या त्याचा इतिहास यावयाचा आहे; त्यांत आर्यसमाज प्रार्थनासमाज, थिऑसफी इ. पंथ, रामकृष्ण परमहंस, विवेकानंद, रामतीर्थ, इ. साधू, संत, उपदेशक या सर्वांचा परामर्ष घेऊन अखेरच्या भागांत लेखक आपल्या मताप्रमाणें सर्वांचा निष्कर्ष काढणार आहे. प्रत्यक्ष लेखकानेंच आपल्या ग्रंथाच्या स्वरूपाचें रूपकात्मक वर्णन उपोद्घातांत केलें आहे तें असें—

### धर्मरक्षक सुधारक व प्रवर्तक

" हिंदुस्थान ही धर्मभूमि आहे. येथें धर्मचर्चेकरितां आजपर्यंत अनेक सभा झाल्या असतील; परंतु आधुनिक कालांतील धर्मरक्षक, सुधारक व प्रवर्तक ह्यांचें ह्या ग्रंथरूपानें होणारें संमेलन वाचकांस अपूर्व वाटेल असा भरंवसा आहे. या संमेलनासाठीं सनातनी हिंदु, ब्राह्मसमाजी, प्रार्थनासमाजी, आर्यसमाजी, श्रीरामकृष्ण-विवेकानंदी, थिऑसफिस्ट, देवसमाजी इत्यादि प्रमुख अशा सर्व पंथांचे प्रतिनिधि यावयाचे आहेत.

परंतु एका दरोडेखोरानें दुसऱ्यास निरुत्तर केल्यानें कोणऱ्याहि दरोड्याचें समर्थन झालें, असें मात्र नाहीं. दरोडेखोरीच्या गुणावगुणासंबंधाचा निवाडा वादी व प्रतिवादी यांच्या परस्परकोटिक्रमावरून करावयाचा नसतो, तर न्यायनीतीच्या सनातन कायदेकानूंवरूनच लावावयाचा असतो. जें जात्या वाईट तें वाईटच. उमाजी नाईकानें मनांत मोठी आकांक्षा धरली होती, हें जरी खरें असलें तरी त्यानें ज्या लोकांस द्रव्य मिळविण्याचे कामीं विनाकारण गांजलें, लुटलें व मारलें त्यांनीं त्याचा असा कोणता अपराध केला होता ? व त्यांस छळण्याचा त्याला काय अधिकार होता !

व्यक्तिश: उमाजी नाईकाच्या गुणावगुणांचा येथवर विचार झाला. तथापि त्याचाच पोवाडा आजवर लोकांनीं कां म्हणावा ? इतर दरोडेखोर काय थोडे झाले ? त्यांचा पोवाडा कां झाला नाहीं ? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, आम्हीं प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें, ह्या दरोडेखोराच्या शौर्याची व कर्तृत्वाची त्याच्या समकालीन लोकांच्या मनावर फार विलक्षण छाप पडलेली असली पाहिजे. कालांतरानें या छापेचा परिणाम असा होतो कीं, दुष्टकृत्यें विसरलीं जातात; व मनुष्यमात्रांत साधारणत: शौर्यादि गुणांचा उत्कर्ष कमी असल्यानें, हे गुण ज्यांच्यामध्यें आहेत असल्या व्यक्तीबद्दल त्यांचा आदर मात्र शिल्लक राहून त्यांचे पोवाडे बनतात. असले पोवाडे सर्वत्र देशांत आढळून येतात. 'रॉबिनहुड' याचें नांव माहीत नाहीं असा एकहि इंग्रजी वाचक सांपडणार नाहीं. खरा रॉबिनहुड ह्या असाच कोणी तरी उमाजी रामोशासारखा दरोडेखोर असावा. तो विनोदी, शूर, थट्टेखोर, परोपकारी व प्रेमळ असा असून, गरीबांवर दया करणें, श्रीमंतांची फजिती करणें वगैरे उदारमनस्कतेच्या दर्शक अशा कित्येक गोष्टींमुळें त्याची लोकप्रियता इतकी वाढली कीं, आज सातशें वर्षेंपर्यंत त्याचे पोवाडे इंग्लंडांत चालत असून लहान मुलांच्या पुस्तकांतून देखील त्याजविषयींचे धडे आढळून येतात ! रॉबिनहुडचा ज्यामध्यें संचार असे तें 'शेरवुड' नांवाचें अरण्य, त्याची प्रियतमा मेड मेरियन, त्याचे विनोदी व जिवाचे दोस्त फ्रायर टक व लिटल जॉन वगैरे सर्व मंडळी इंग्रजांत अत्यंत लोकप्रिय आहेत. प्रख्यात कादंबरीकार सर वाल्टर स्कॉट यानें आपल्या 'आयव्हॅनो' नांवाच्या कादंबरींत व 'रोकबी' नांवाच्या

कादंबरीमध्यें दरोडेखोरांच्या अद्‌भूतरसपूर्ण चरित्राचें उत्कृष्ट चित्र काढलेलें इंग्रजीच्या वाचकांस आठवत असेलच. तसेंच, इटाली व स्पेनमधील दरोडेखोकर—दर्याकिनाऱ्यावरील जकात चुकवून माल पळवून नेणारे व चांचेपणाचा धंदा करणारे—वगैरे लोकांसंबंधानेंहि त्यांच्या दुर्गुणांकडे दुर्लक्ष करून, रसिक जनता त्यांच्या शूर कृत्यांचे पोवाडे गाण्यास कशी तयार असते, याचा इंग्रजी मासिक पुस्तकें वाचणारांस नित्य अनुभव आहेच. फार लांब कशाला ? मि० किंकेड यांनीं आपल्या एका ग्रंथांत काठेवाडांतल्या प्रमुख दरोडेखोरांच्या (Outlaws) च्या चरित्राचें रसभरित वर्णन केलेलें आहे, हें पुष्कळांस माहीत असेलच. मुलांस रात्रीं दारें लावून घेऊन व अंथरुणावर पडून भुतांच्या गोष्टी ऐकाव्याशा वाटतात; आणि मोठीं मनुष्येंहि अद्‌भुतरसाच्या कामीं मुलांसारखींच असतात, असें म्हणण्यास हरकत नाहीं. उमाजी रामोशाचा आत्मा आपल्या दुष्कृत्यांचा झाडा यमदरबारांत देत असतां, मृत्युलोकीं त्याचे पोवाडे व्हावे व त्याचीं चरित्रें लिहिलीं जावीं, हेंहि वरील चमत्कारिक मनुष्यस्वभावास अनुसरून आहे, एवढेंच म्हणतां येईल.

---

## ४८ मराठी राज्याचा उत्तरार्ध

( खंड १ ला )

( ले० कै. वासुदेव शास्त्री खरे. प्रकाशक यशवंत वासुदेव खरे, मिरज ) हें सुमारें पावणेतीनशें पानांचें पुस्तक प्रसिद्ध करून श्री. यशवंतराव खरे यांनीं आपल्या कै. पित्याच्या वाङ्मयस्मारकाचें एक मोठें कार्य केलें यांत शंका नाहीं. सामान्यतः मराठ्यांच्या ऐतिहासिक कागदपत्रांवर कालाच्या लीलेमुळें जो प्रसंग गेल्या दोन शतकांत आला तितका दुर्निवार नसला तरी कांहींसा त्याच जातीचा प्रसंग इतिहासभक्त कै. वासुदेवशास्त्री खरे यांच्या ऐ. लेखसंग्रहावरहि हळूहळू येऊं लागला होता. कारण हा लेखसंग्रह छापील असला तरी त्याचे कांहीं भाग दुर्मिळ झाले आहेत व त्यांचें पुनर्मुद्रण खर्चाच्या अडचणीमुळें, अशक्यप्राय झालें आहे. तथापि या लेखसंग्रहाचीं सहा—साडेसहा हजार पत्रें पुनः केव्हां छापलीं जाऊन

त्यांची द्वितीयावृत्ती उपलब्ध होईल ती होवो, परंतु या महा-साडेसहा हजार पृष्ठांच्या सारभूत अशा ज्या प्रस्तावना किंवा जे सारांश ऐ. लेख-संग्रहाच्या बारा तेरा भागांतून शास्त्रीबोवांनीं वाचकांच्या सोईकरितां व समजुतीकरितां मधून मधून घातले तेच आज एकत्रित करून स्वतंत्र पुस्तकरूपानें छापून प्रसिद्ध करण्यांत यशवंतराव यांनीं चांगल्या प्रकारची योजकता दाखविली असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण अशा रीतीनें त्यांनी एकांत दोन कार्यें साधलीं. छापण्याचा मजकूर पुष्कळच कमी होऊन केवळ पावणेतीनशें पानांत मुद्द्याचा मजकूर आला व जेथें मूळच्या ऐ. लेखसंग्रहाच्या तेरा भागांची प्रत्येकीं किंमत सुमारें तीनचार रुपये असे तेथें त्यांचें हें सार अवघ्या दीड रुपयाला वाचकांना उपलब्ध होत आहे.

पण अशा पुस्तकाची शिफारस एका वेगळ्या व स्वतंत्र रीतीनेंही होऊं शकते ती अशीं कीं, खरेशास्त्री यांनीं आपल्या प्रस्तावनांतून पुढील अनेक पत्रांचें सार थोडक्यांत दिलें असलें तरी प्रथम प्रस्तावना व तप-शीलवार समग्र पत्रें व पुनः प्रस्तावना असा क्रम मूळ ग्रंथांत अनुसरावा लागला. यामुळें प्रत्येक सुटें प्रकरण घेतलें असतां त्यांची सांगता व पूर्व-तयारी प्रस्तावनेनें करून दिली हें जरी खरें तरी समुच्चयानें या प्रस्ता-वनांपासून सुसूत्र इतिहासाचा जो व जसा बोध व्हावयास पाहिजे तसा तो होऊं शकत नाहीं. आमच्या शास्त्रकारांनीं शब्दार्थाची मीमांसा करतांना एके ठिकाणीं असा पूर्वपक्षरूप सिद्धांत मांडला आहे कीं कोणत्याहि शब्दांतील प्रत्येक अक्षर वेगवेगळें उच्चारावयाचें असल्यामुळें एकंदर शब्दापासून जो अर्थबोध होतो त्याचें श्रेय निरनिराळ्या अक्षरांना नाहीं. उदाहरणार्थ घट हा एक सार्थ शब्द मानला तरी वास्तविक जेव्हां आपण 'घ' उच्चारतों तेव्हां ट उच्चारीत नाहीं व जेव्हां 'ट' उच्चारतों तेव्हां घ उच्चारीत नाहीं. अर्थात् घट या शब्दापासून जो संयुक्त अर्थबोध होतो त्याचें खरें कारण घ किंवा ट हीं अक्षरें नसून कांहीं दुसरी वेगळीच शक्ति हें असलें पाहिजे. हा वाद बोलून चालून मौजेचा असला तरी त्यांतील स्वारस्य कै. खरेशास्त्री यांच्या लेखसंग्रहाच्या बारातेरा भागां-मधून विखुरलेल्या प्रस्तावना आणि यशवंतराव खरे यांनीं प्रस्तुत ग्रंथांत एकत्र व बिनखंड छापलेल्या त्या प्रस्तावना यांचा तुलनात्मक उपयोग

पाहिला म्हणजे कोणाच्याहि सहज लक्षांत येण्यासारखें आहे. शिवाय स्वतः यशवंतराव यांनीं आपली स्वतःची बुद्धि चालवून मूळच्या प्रस्तावनांतील विस्तार कमी करण्याकरितां कांहीं मजकुराची छाटाछाट केली व सांधेजोड करण्याकरितां थोडथोडा मजकूर मधूनमधून घातला यामुळें या स्वरूपांत या प्रस्तावना काढण्याचा हेतु अधिकच सिद्धीला गेला आहे.

प्रस्तुतचें पुस्तक चाळणाराला आपण एकाच विषयावरचें पुस्तक किंबहुना त्यांतील एकाच भागावरची माहिती वाचीत आहों असें वाटतें. पण त्याचें कारण मुळांतच असें आहे कीं ऐ. लेखसंग्रहांतील कागदपत्र एकाच दप्तरांतून निघालेले आहेत व तेहि एकाच घराण्यांतील पुरुषांसंबंधानें आहेत. हें दप्तर मळे संस्थानांतील होय व हें घराणें पटवर्धन संस्थानिकांचें आहे. पटवर्धन घराण्याचे मूळ पुरुष हरभटबाबा यांच्यापासून पुढील अवघ्या चार पिढ्यांत जे पुरुष पेशव्यांच्या नोकरींत शिरले व निरनिराळ्या कामगिऱ्यांवर नमूद झाले, त्यांनीं स्वतः लिहिलेलीं किंवा त्यांना लिहिलेलीं किंवा त्यांचे कारभारी आश्रित आप्त यांनीं किंवा यांना लिहिलेलीं अशींच पत्रें या संग्रहांत असल्यामुळें, उत्तर-हिंदुस्थानांतील स्वारी असो किंवा कर्नाटकांतील स्वारी असो किंवा पेशव्यांच्या दरबारांतील कांहीं कारस्थान असो किंवा एखाद्या प्रतिस्पर्धी सरदारघराण्यासंबंधीं मजकूर असो, एखाद्या पूज्य गुरूसंबंधानें किंवा सत्पुरुषासंबंधानें मजकूर असो किंवा कौटुंबिक किंवा खाजगी असें ज्याला म्हणतां येईल असा मजकूर असो, त्या सर्वांत एकाच मुख्य घराण्याचा उद्योग, कर्तृत्व, धोरण, हिताहित, शुभाशुभ, असल्यानें—तात्पर्य सर्व प्रकारें जिव्हाळ्यानें व एक प्रकारच्या आप्तलेपणानें गुंतागुंत झालेल्या हकीकतींचा हा मेळ असल्यामुळें त्यांत सुसूत्रपणा फारच येतो व ऐतिहासिक सत्याच्या दृष्टीनें यांत जसा कांहीं दोषहि मानतां येईल तसाच ऐ. साधनांच्या इतर पुस्तकाच्या अंगीं नसणारा एक विशेष प्रकारचा गुणहि दुसरे पक्षीं या साधनग्रंथांत आहे हेंहि कबूल करावें लागेल.

असो आम्हीं वर दर्शविल्याप्रमाणें ऐ. ले. संग्रहांतील कागदपत्र एकाच घराण्यासंबंधाचे मुख्यतः असले तरी ज्याचा यांत यत्किंचितहि संबंध आलेला नाहीं असे पेशव्यांच्या राजकारणांतील प्रसंग क्वचितच असतील. आणि खरेशास्त्री यांनींहि तो तो प्रसंग साधून वाचकांच्या समजुतीकरितां

प्रत्यक्ष या पत्रांतून ग्रथित न झालेली अशीहि अवांतर माहिती बरीच दिलेली आहे. यामुळें या प्रस्तावनांना संगतवार इतिहासाचें स्वरूप येत असून त्यांतून तुटकपणाचा दोष बराचसा निघून गेला आहे. खरेशास्त्री यांची मनोरचना धिमेपणाची होती. केवळ बुद्धिगम्य विषयांतहि ते उतावळी किंवा धाडस करीत नसत. जें लिहावयाचें तें नीट पाहून तपासून पारखून असें लिहावयाचें. ज्ञानमार्गांत शंकास्थान आढळलें हें संकट किंवा स्वतःला दूषण मानण्याची त्यांची प्रवृत्ति नसे. यामुळें आपल्या शंकांचा निर्वाह त्यांनीं अविचारानें कधींच केला नाहीं. शिवाय मुळापासून जन्मभर प्रत्यक्ष शिक्षकाचें काम केल्यामुळें वाचक हा खरोखर इतिहासाचा विद्यार्थी व अभ्यासक आहे या भावनेनेंच त्यांनीं त्याला हाताशीं घेऊन पढविल्याप्रमाणें प्रस्तावना किंवा टिपणें यांच्या रूपानें माहिती दिली आहे. भाषेच्या सरसतेसंबंधानें तर सांगावयास नको. कारण अभ्यासानें आलेली व्युत्पति व बहुश्रुतपणा यांच्या जोडीला त्यांची नैसर्गिक रसिकता असल्यामुळें त्यांच्या भाषेंत चित्ताकर्षकता पुष्कळच असते. म्हणून त्यांच्या प्रस्तावना कधींहि कोणास रूक्ष वाटल्या नाहींत. अशा प्रकारच्या या प्रस्तावनांचा पहिला खंड छापला गेल्यानें सन १७६१ ते सन १७७३ या बारा सालांतील मराठेशाहीचा इतिहास बराचसा या पुस्तकांत वाचावयास मिळतो. आमच्या समजुतीप्रमाणें या ग्रंथाचे आणखी दोन खंड असेच निघण्यासारखे आहेत व यशवंतराव खरे यांनीं तेहि यथाक्रम प्रसिद्ध करावेत अशीं आमची त्यांना सूचना आहे.

---

## ४९ खरेशास्त्री यांचें चरित्र व ग्रंथपरिचय

(ले. व प्र. दामोदर मोरेश्वर भट, मिरज.) १९२४ सालीं लौकिक जगांतील खरेशास्त्री वारले, व नंतर आज पांच वर्षांनंतर फिरून त्यांचा पुनर्जन्म होत आहे. या पुनर्जन्मांत आणि पूर्वी लौकिक जगांत त्यांच्या झालेल्या जन्मांत फार फरक आहे. पूर्वी त्यांचा जन्म एका भट कुळांत झाला. आज त्यांचा पुनर्जन्महि एका भट कुळांतच होत आहे. लौकिक जगांत त्यांचें मातृपद एका स्त्रीनें घेतलें होतें, पण त्यांच्या या पुनर्जन्मांत

तें पद एका पुरुषानें स्वीकारलें आहे. पुरुष कमी प्रेमळ असें म्हणतात, पण आई आपल्या मुलाचें जितकें प्रेमानें, काळजीनें, कष्टानें संगोपन करते तितक्याच काळजीनें, या नवीन आईनें त्यांचें संगोपन केलें आहे. वृत्तीनें विदेही असले तरी देह धारण करूनच जन्म घालवावा लागल्यामुळें शास्त्रीबुवांच्या आयुष्याला मृत्यूची मर्यादा पडली होती, पण या पुनर्जन्मांत त्यांना मृत्यूच नाहीं, कारण यशाला किंवा कीर्तीला मरण कोठें आहे ?

प्रस्तुत चरित्राचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे भाग पाडण्यांत आले असून पहिल्या दोनशें पानांत शास्त्रीबुवांची चरित्रविषयक माहिती व पुढील सुमारें दोनशें पानांत त्यांच्या विविध शाखांतील ग्रंथकर्तृत्वाचा परिचय व वैशिष्ट्य वर्णन करण्यांत आलें आहे. शास्त्रीबुवांच्या कार्याचा परिचय महाराष्ट्रास चांगलाच आहे; परंतु त्यांच्या खासगी आयुष्याचा परिचय यत्किंचितहि नाहीं असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. या दृष्टीनें हा पूर्वार्ध बहुमोल होय. त्यांतील सर्व माहिती लेखकानें मोठ्या परिश्रमानें व सहृदयतेनें जमविलेली असून ती चांगली विश्वसनीय अशीच आहे. शास्त्रीबुवांचा व चरित्र लेखकाचा साक्षात संबंध पुष्कळच आला होता. शाळेंत शास्त्रीबुवांच्या शिष्यत्वाचा मान त्याला मिळाला होता, व पुढें तर तो त्यांच्या इतिहाससंशोधनाच्या कार्याचा एक मदतनीस म्हणूनच हौसेनें कार्य करीत होता. यामुळें चरित्रनायकाचें चरित्र व कार्य यांचें फार बारकाईनें त्याला निरीक्षण करतां आलें आहे. तीस-चाळीस रुपयांवर रखडणारा एक शाळामास्तर मराठी इतिहासावरची वेदश्रुति बनतो, या एकाच गोष्टीवरून शास्त्रीबुवांच्या असामान्यतेचें अनुमान सामान्य मनुष्यालाहि करतां येतें. परंतु असामान्य मनुष्याचें असामान्यत्व त्याच्या बारीकसारीक गोष्टींतहि कसें प्रकट झालेलें असतें हें या चरित्र वाचनानें ढळढळीत दिसून येणार आहे. मनुष्य मोठा झाल्यानंतर त्याच्या बाळपणाचा बारीकसारीक कृतींतहि मोठेपणा पाहूं जाणें यांत श्रद्धेचा भाग कदाचित् असेल; परंतु हजारों शाखांनीं विस्तारलेल्या प्रचंड वटवृक्षाखालीं प्रत्यक्ष उभे असतां त्याच्या बीजांत वृक्ष पहाणें यांत तरी चूक काय आहे ? आणि चरित्रकारांनीं परिश्रमानें शास्त्रीबुवांचें जें

चरित्र मांडलें आहे त्यावरून एकच गोष्ट स्पष्ट होते ती ही कीं, शास्त्रीबुवांच्या पुढील कर्तृत्वानें त्यांच्या पूर्वायुष्यांतील गोष्टी अलौकिक झाल्या असें नव्हे तर पूर्वायुष्यांत कर्तृत्व दाखविलें म्हणूनच ते पुढें अलौकिक ठरले.

## शास्त्रीबुवांचीं स्थित्यंतरें

बाळपणांत शास्त्रीबुवांनीं दांडगेपणा कसा व किती केला, त्यांच्या वडिलांना व आजोबांना सदैव घोरांत कसें पाडलें, बारा वर्षांच्या वयांतहि घरच्या माणसांवर राग काढून एक दिवस मुसळधार पावसांत नदी पोहून आपले आतेच्या गांवीं ते कसे पळून गेले, घरांतून बाहेर पडून दिवसभर उनाडक्या करतांनाच निसर्गाशीं त्यांची बाळमैत्री कशी झाली व तेव्हांपासूनच काव्यशक्तीचा अंकुर कसा प्रकट होऊं लागला, आजोबांच्या अभ्यासाच्या कटकटीला कंटाळून फिरून एकवार त्यांनीं ५०।६० मैलांची रोमँटिक मुशाफरी सफर कशी केली, एक दिवस अनुतापानें दग्ध होऊन शिकून नांव काढण्याची प्रतिज्ञा त्यांनीं कशी केली व घराला राम राम कसा ठोकला, प्रवासांत आपल्या शीघ्र कवित्वाच्या जोरावर त्यांनीं पोटास कसें मिळविलें व श्रीमंत कागलकरांकडून शालजोडी अंगावर कशी घालून घेतली, सातान्यास गजेंद्रगडकरशास्त्र्यांचें शिष्यत्व पत्करून ते विद्येंत प्रवीण कसे झाले, १८७६ सालीं तेथल्या "महाराष्ट्र" मित्राचे गुप्त संपादक कसे झाले, नंतर पुण्यास शाळामास्तराचे जागेवर १५ रुपयांवर कसे रुजू झाले, तेथें काव्येतिहाससंग्रहाशीं प्रथम संबंध कसा जुळला व कै. विष्णुशास्त्रयांच्या गैरहजेरींत त्या मासिकाच्या संस्कृत भागाचें संपादन त्यांनीं कसें सांधेजोड केलें, सार्वजनिक काकांचीं स्वदेशी कीर्तनें त्यांनीं कशीं केलीं, न्यू इंग्लिश स्कूलच्या स्थापनेचे दिवशीं शिक्षक म्हणून ते कसे रुजू झाले, केसरीशीं त्यांचा संबंध कसा आला, नंतर १८८० सालीं पटवर्धनी दप्तराच्या मोहानें दरमहा ७५ रु. ची नोकरी नाकारून मिरजेस कायमचे ३० रु. वर ते कसे स्थिर झाले वगैरे त्यांच्या पहिल्या पंचविशींतील गोष्टी पाहिल्या म्हणजे त्या सामान्य नाहींत अशीच भावना दृढ होते. ऐतिहासिक लेखसंग्रहाला वाहून घेतल्यामुळें शास्त्रीबुवा सार्वजनिक कार्यांत पडले नाहींत. गिरिकंदरांत कठोर तपाचरण करून त्या तपाच्या पुण्याचें उदक जनतेच्या हातावर सोडावयास तेवढें प्रकट व्हावें त्याप्रमाणें ऐति. ले. संग्रहाच्या

भागांच्या रूपानें शास्त्रीबुवा जनतेची भेट घेत तेवढीच काय ती. बाकीचा सर्व काळ त्यांचा या तपांतच जाई. अशा तपस्व्यांचें पूर्वायुष्य जसें कष्टाचें व असामान्य असतें तसेंच शास्त्रीबुवांचें होतें. आणि म्हणूनच या चरित्राबद्दल महाराष्ट्र जनता रा. भट यांची सदैव ऋणी राहील.

उत्तरार्धांत शास्त्रीबुवांच्या साहित्यसेवेचा स्वतंत्रपणें विस्तृत परिचय करून दिलेला आहे. शास्त्रीबुवांची धारणा जशी जलद आणि दृढ होती. त्याचप्रमाणें त्यांची प्रतिभा आणि कल्पनाशक्ति याहि फार प्रबळ होत्या. त्यांच्या बुद्धीची वाढ एकांगी नव्हती. अज्ञात इतिहास—समुद्राच्या तळाचा ठाव काढण्याची शक्ति तिच्यांत जितकी होती तितकेंच प्रतिभेच्या आकाशांत उड्डाण करण्याचें सामर्थ्यहि तिच्यांत असे. इतिहाससंशोधन म्हटलें म्हणजे कांहीं तरी निर्मम कठोर लालित्यशून्य काम अशीच कल्पना डोळ्यापुढें उभी राहते आणि ती सर्वथा खोटीहि नाहीं. किंबहुना प्रसिद्ध इतिहाससंशोधकांकडे दृष्टि फेकल्यास ती दृढच होते, असें म्हटल्यास हरकत नाहीं. अशा लोकांना साहित्यविषयक किंवा ललितविषयक गोष्टींचें बहुधा वावडेंच असलेलें दृष्टीस पडतें. तशी गोष्ट शास्त्रीबुवांची नव्हती. काव्य, नाट्य आणि गायन या ललितकलांची त्यांना खरीखुरी हौस होती. शास्त्रीबुवांचा जन्म चरित्रकारांनीं अत्यंत सहृदयतेनें चित्रित केलेल्या गुहागरासारख्या एका निसर्गमनोहर खेड्यांत झाला व त्यांचें अनिर्बंध बाळपण खरोखरच निसर्गाशीं बागडण्यांत गेलें. त्यांची वास्तविक मनःप्रवृत्ति कोणीकडे झुकत होती, याचें गमक तेथेंच सांपडतें. तें म्हणजे त्यांची कविता करण्याकडे झालेली प्रवृत्ति होय. शास्त्रीबुवांच्या बाळपणाच्या चिमुकल्या धाडसांत या कवित्वशक्तीवरच त्यांनीं एकदोनदां परमुलखांत पोटास मिळवून दुपार निभावल्याची मजेदार हकीकत सांपडते. व पुढेंहि अन्यत्र एका गृहस्थांनीं यांना मोठ्या प्रेमळपणानें जवळ घेऊन बाबारे, कविता करून पोट भरणार नाहीं, असा उपदेश केला व तसा अनुभवहि येऊं लागला. तेव्हांच त्यांनीं कवित्वाचा नाद सोडला अशी एक आठवण आहे.

सांगण्याचें तात्पर्य, शास्त्रीबुवांचा खरा ओढा ललितकलेकडेच दिसतो. जी गोष्ट काव्याची तीच नाट्याची व संगीताची. शास्त्रीबुवांनीं बाळपणीं निरपेक्ष हौसेनें नाटकें रचिलीं हें तर असो. परंतु उतारवयांत यशस्वी

नाटककार म्हणून कीर्ति मिळविली ती नाट्यविषयाची मनापासून गोडी असल्यावांचून हें कसें शक्य आहे? गायनाच्या बाबतींत तर गाणें त्यांना ऐकण्याला आवडत होतें असेंच नव्हे तर ते स्वतःच गायला शिकले होते! या बाबतींत राजवाडे आणि खरे या इतिहासाचार्यांचा विरोध मोठा लक्षांत राहण्यासारखा आहे. राजवाड्यांना संगीताचा द्वेष औरंगजेबाइतकाच वाटे. प्रत्यक्ष अर्जुनालाहि बृहन्नडा करून टाकील अशी ही संगीतकला आहे, असा स्पष्ट अभिप्रायच एका लेखांत त्यांनीं व्यक्त केला आहे! उलट याच संगीताचा उपयोग आपल्या नाटकांच्या रूपानें समाजाला उदात्त तत्त्वें शिकविण्याकडे शास्त्रीबुवांनीं केलेला आढळतो. शास्त्रीबुवांची प्रतिभा एकांगीं नसून ती अष्टपैलू होती. आम्ही तर असेंहि म्हणतों कीं, शास्त्रीबुवांच्या इतिहासलेखनाला एकंदरींत जो घोटीवपणा, बांधेसूदपणा आणि निरोगी गोंडसपणा प्राप्त झाला आहे त्याचें बरेचसें श्रेय त्यांच्या वरील मन:प्रवृत्तीलाच द्यावें लागेल. सत्य आणि सौंदर्य यांचा जो प्रीतिसंगम त्यांच्या हरएक ऐतिहासिक लिखाणांत भरपूर पसरलेला दिसतो, त्याचें बीज वरील गोष्टींतच सांपडणार आहे.

### कामगिरी

पण अष्टपैलू बुद्धिमत्ता असूनहि पुष्कळांच्या हातून प्रत्यक्ष कार्य कांहींच घडत नाहीं. पण शास्त्रीबुवांचा हाच विशेष कीं, अंगीकृत कार्याव्यतिरिक्त इतर विषयांतहि नांव उरण्यासारख्या कृती त्यांनीं निर्माण करून ठेवल्या. या दृष्टीनें त्यांच्या काव्यांचा, नाटकांचा, निबंधांचा, चरित्रांचा, लेखांचा व ऐतिहासिक लेखसंग्रहाचा चरित्रकारानें स्वतंत्र परामर्ष घेतला आहे, हें फार ठीक झालें. पण शास्त्रीबुवांच्या काव्यांचें नाटकांचें चरित्रकारानें विस्तारानें विवेचन केलें आहे. त्या मानानें त्यांच्या ऐतिहासिक लिखाणांचें सर्वांगीण विवेचन झालें आहे असें मात्र आम्हांस वाटत नाहीं. त्याचप्रमाणें मराठी इतिहाससंशोधकांत व इतिहास लेखकांत शास्त्रीबुवांचा दर्जा काय, त्यांच्या इतिहास लेखनपद्धतीचें वैशिष्ट्य काय, निरपेक्षता किंवा निस्पृहपणा या मुख्य इसिहासकाराच्या कसोटीवर ते कितपत व कसे टिकतात. वगैरे अनेक मुद्द्यांचें सोदाहरण व समर्पक विवेचन चरित्रकाराला सहज करतां आलें असतें व तें आवश्यकहि होतें. तसेंच शास्त्रीबुवांच्या भाषापद्धतीसंबंधीहि स्वतंत्र विवेचन अवश्य असावयास

पाहिजे होते. ऐतिहासिक कागदपत्रांच्या चिरपरिचयानें शास्त्रीबुवांच्या लेखनशैलीला लाभलेली श्रीमंती कांहीं निराळीच होती. त्या वाङ्मयांत खचून गेलेली जुनी शब्दसंपत्ति त्यांच्याइतकी कोणीच उकरून काढलेली नाहीं. त्यांच्या ऐतिहासिक लेखनसंग्रहांतील प्रस्तावना वाचल्या म्हणजे उत्कृष्ट जुन्या शब्दांचा आणि वाग्विशेषांचा त्यांनीं किती सहज पण कुशलतेनें उपयोग करून घेतला आहे, तें स्पष्ट दिसून येतें. विषयाशीं तद्रूप होऊन असल्या भाषेनें शास्त्रीबुवा इतिहास लिहूं लागले म्हणजे त्यांतले प्रसंग प्रत्यक्ष पाहिल्यासारखे ढळढळीत व कादंबरीसारखे मनोरंजक होतात. कित्येक वेळां तर अशी मौज पाहावयास सांपडते कीं, त्या त्या प्रसंगांत भाग घेणाऱ्या प्रमुख व्यक्तींनीं जीं पत्रें लिहिलीं आहेत, तीं वाचून जें चित्र मनःश्चक्षूंपुढें उभें राहावें त्यापेक्षां त्याच पत्रांवरून खरेशास्त्र्यांनीं जो सारांश लिहिला आहे त्यावरून तें चित्र अधिक स्पष्ट, अधिक ठळक व अधिक मनोहर दिसूं लागतें. नमुन्याकरितां कर्नाटक मोहिमांतील मोती तलावाची लढाई, गोपाळराव पटवर्धन व मुरारराव घोरपडे यांवरील हैदराचा छापा किंवा अधिकारयोगांतील मोरोबांचें बंड यांचीं वर्णनें व मुळांतील पत्रें वाचकांनीं वाचून पाहावींत. सारांश खरेशास्त्र्यांची वर्णनशैली व भाषापद्धति अशा स्वतंत्र मथळ्याखालीं बरेंचसें लिहितां येण्यासारखें आहे व पुढील आवृत्तीचा सुयोग आल्यास चरित्रकारानें त्याचा अवश्य विचार करावा, अशी आमची शिफारस आहे.

---

## ५० धी वर्ल्ड क्रायसिस

(ले. एस्. डी. चितळे प्र. इं. नॅ. बुकसर्व्हिस पुणें नं. ४.)

पुणें येथील एक तरुण अभ्यासू गृहस्थ रा. श्रीकृष्ण दत्तात्रय चितळे यांनीं 'जगावरील गंडांतर व शांततारक्षणाची उपाययोजना' या विषयावर एक पुस्तक इंग्रजींत लिहिलें, व तें पुणें येथील 'इंटरनॅशनल बुकसर्व्हिस मंडळी'नें प्रसिद्ध केलें आहे. हा विषय मोठा, म्हणजे खरोखरच एका दृष्टीनें जगव्यापक आहे. तथापि अशा विषयावर अनेक पुस्तकें व तज्ज्ञांचे लेख वाचून, त्यांतील सार थोडक्यांत संकलित करून, रा. चितळे

यांनीं चांगल्या इंग्रजी भाषेंत हें पुस्तक लिहिलें आहे. त्यांची विचारसरणी अशी आहे कीं, जगांतील प्रमुख राष्ट्रें साम्राज्यस्थापनेच्या धोरणांत फार वर्षांपासून गुंतलीं आहेत. औद्योगिक चळवळ व चढाओढ हें या धोरणाचें मूलस्थान होय. त्यानंतर त्यांतून राष्ट्राराष्ट्रांतील युद्धें, महायुद्धें, व त्याकरितां राष्ट्रांतील मित्रसंघ, शत्रुसंघ वगैरे घटना होतात. या दृष्टीनें जर्मनी, फ्रान्स, रशिया, अमेरिका या राष्ट्रांनीं काय केलें हें सांगून, इंग्लंडच्या साम्राज्यविषयक धोरणावर ग्रंथकर्त्यानें विशेष भर दिला आहे.

### इंग्लंडचें पातक

कारण इंग्लंड हें राष्ट्र साम्राज्यदृष्टीनें सर्वांत अत्यंत लोभी आहे व यशस्वीहि झालें आहे. यामुळें परदेशांत दास्य निर्माण करून त्यांचा सांपत्तिक ऱ्हास करण्याचें पाप इंग्लंडच्या हातून जितकें घडलें तितकें दुसऱ्या कोणाहि राष्ट्राच्या हातून घडलें नसेल. पण महायुद्धांत एकटें इंग्लंड सांपडलें नसून जर्मनीविरुद्ध जो मित्रसंघ बनला त्यांत इंग्लंड हें फक्त एक होतें. या मित्रसंघानें अखेर जय मिळविला; पण तह करतांना एकट्या जर्मनीवरच नव्हे तर पर्यायानें सगळ्या जगावर आपत्ति आणली. व्हर्साईलस् येथें जो तह झाला त्यांतून प्रचंड विषवृक्ष निर्माण झाला; व आतां सावकाशपणें फुरसतीच्या वेळीं, व विशेषतः सांपत्तिक आपत्ति सर्वच जगाला भोवूं लागल्यामुळें, त्या विषवृक्षाच्या शाखा हळूहळू तोडण्याला सर्वच राष्ट्रें पुढें सरसावलीं आहेत. पण त्या तोडतांना स्वतःचें स्थान मात्र कसें हटकून सुरक्षित राहील याचाहि विचार प्रत्येक राष्ट्राच्या मनांत प्रमुखपणानें जागृत असल्यामुळें तो वृक्ष फारसा तुटतच नाहीं. जर्मनीकडून वसूल करण्याची खंडणी आणि निरनिराळ्या राष्ट्रांनीं केलेल्या कर्जाची फेड ही गुंतागुंत सुटतां सुटत नाहीं. वरचेवर परिषदा भरवून केवळ शब्दांचा कीस पाडण्यांत येतो व सद्धेतूचा व परस्पर आशीर्वादांचा फक्त उच्चार करण्यांत येतो.

ही स्थिति कशी सुधारेल ही काळजी सर्व जगालाच लागून राहिली आहे. व विचारी अभ्यासू मनुष्यांच्या हातीं जगाची स्थिति सुधारण्याचें नसलें तरी, त्यांना आपलें विचार सहजच बोलून दाखवावेसें वाटतात. तसेंच रा. चितळे यांनीं या पुस्तकांत केलें आहे. विषय मोठा व्यापक असतांहि त्यांनीं तो प्रकरणवार सुसंगत करून थोडक्यांत व सोप्या भाषेंत

लिहिला आहे. त्यावरून या प्रश्नाची अनेक बाजूंची माहिती थोडक्यांत एकत्र वाचकांना मिळते हा या पुस्तकाचा मोठा उपयोग आहे असें आम्ही समजतों; व अशी अभ्यासू वृत्ति दाखवून परिश्रमपूर्वक पुस्तक लिहिल्याबद्दल आम्ही रा. चितळे यांचें अभिनंदन करतों.

## लेखकाचा भोळेपणा

तथापि त्यांनीं आपल्या पुस्तकांतील ११ वा भाग मुळींच लिहिला नसता तर अधिक बरें झालें असतें. कारण त्यामध्यें जगांत शांतता प्रस्तापित करण्याच्या ज्या सूचना म्हणून केल्या आहेत त्यांत कांहींच अर्थ नाहीं असें आम्हांला वाटतें. किंबहुना रा. चितळे यांनीं या बाबतींत लहान तोंडीं मोठा घांस घेतला असेंहि आम्हांला म्हणावेसें वाटतें. त्यांची सूचना अशी कीं, जगांत शांतता नांदण्याकरितां एक शांततामंडळ स्थापावें, न्यायाधीशांचेंहि एक मंडळ स्थापावें. त्यांत जगप्रसिद्ध लोकांची नेमणुक व्हावी व वादाचे प्रश्न वेळोवेळीं त्यांच्याकडे सोंपवून राष्ट्रांनीं निकाल करून घ्यावा व मानावा. पण जेथें 'लीग ऑफ नेशन्स' सारख्या संस्थेनें हात टेकले तेथें रा. चितळे यांनीं सुचविलेल्या न्यायाधीश-मंडळाला कोण कबूल होणार व विचारणार? या ११ व्या विभागांतील सर्व व त्यापूर्वींच्या विभागांतील शेवटचें विवेचन व कांहीं विधानें हीं आम्हांला अगदीं भोळेपणाचीं किंबहुना नवशिक्या तरुणानें विचार न करतां केलेलीं अशीं वाटतात.

पहिली गोष्ट ही कीं, चितळे यांनीं पुस्तक लिहिलें तरी प्रथम पुरुषी सर्वनामाचा उपयोग त्यांनीं दहाव्या विभागांत केला आहे तो चांगलासा नाहीं. उदाहरणार्थ ते लिहितात. "जगाची अशी स्थिति असतां मला डोळे मिटून बसवत नाहीं! भावी उत्पात, अधःपात व विश्वसंकट येणार, लवकर येणार, असें दिसतें. म्हणून हातांतील भयसूचक घंटा जोरानें वाजविल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं. या पुस्तकाच्या द्वारें मी असें अपील, अशी विनंति, जगाला करतों कीं, हें चालून येणारें युद्ध त्यानें मी सांगतों म्हणून थांबवावें. मी निराश होत आहें व मला खेदानें विचारावें लागतें कीं राष्ट्रसंघा! तूं कोठें आहेस? चालला आहेस कोणीकडे? आणि या विचारानें मन ग्रस्त होऊन व या प्रश्नाचें उत्तर पुष्कळ विचारांतीं ठरवून, मी शांतता मंडळ व न्यायाधीश मंडळाची सूचना सुचवीत

आहे." एके ठिकाणीं प्रथम पुरुषी एकवचन सुटून अनेक वचन घालण्यांत आलें आहे पण तें अधिकच हास्यास्पद वाटतें. कारण तें ग्रंथकर्ते घालतात तसें अनेकवचन नसून, जणूं कांहीं तेथें अमेरिकन जनतेच्या शरिरांत शिरून ग्रंथकार लिहितो असा भास होतो. कसें तें पाहा. तो म्हणतो, "या महायुद्धांत एक कोटि लोकांची कत्तल करण्याकरितां 'आम्हीं' जवळ जवळ २० शे कोटी 'डॉलर्स' खर्च केले." यांतले 'आम्ही' हे कोण? व हिंदी विद्यार्थ्याला पुस्तकांत लिहितांना डॉलर्सची भाषा कशी सुचावी, हें कळत नाहीं. अर्थात् तें वाक्य त्यानें एखाद्या अमेरिकन लेखकाचें जसेंच्या तसें घेतलें असावें असा संशय येतो.

याहिपेक्षां हास्यास्पद प्रकार वाटतो तो हा कीं, शांतता मंडळानें कार्य कसें करावें याचे नियम म्हणून दिले आहेत! त्यांत वैशिष्टय म्हणून कांहींच नसून साध्या सार्वजनिक सभांना किंवा मंडळांना जे नियम लागू होतात, व जे सामान्य माणसांनाहि माहीत असतात, तसेच ते आहेत. उदाहरणार्थ, शांतता मंडळाचें कोरम किंवा गणसंख्या किती असावी व मतें सारखीं पडलीं असतां अध्यक्षाला 'कास्टिंग व्होट' म्हणजे निर्णायक मत असावें असाहि नियम देऊन, असल्या नियमांच्या आधारावर 'मी या योजनेची सर्व साधारण रूपरेषा सुचविली आहे' असें लेखक म्हणतो तें वाचून हसूं येतें! तसेंच शांततामंडळ व न्यायाधीशमंडळ यांना असा उपदेश केला आहे कीं, त्यांनीं निर्विकार बुद्धीनें आपल्या पुढें येणाऱ्या प्रश्नांचा विचार करावा व जो राष्ट्र न्यायाधीश मंडळाचा निर्णय न मानील त्याच्यावर व्यापारी व राजकीय बहिष्कार घालून त्याला वठणीस आणावें!

## झांकली मूठ उघडली

आम्हांला तर असें वाटतें कीं, दहाव्या विभागांतील भोळेपणाचीं अहंकारयुक्त विधानें, व सबंध अकरावा विभाग, पुस्तकांतून गाळून टाकण्याची खबरदारी ग्रंथकर्त्यानें घेतली असती तर बरें झालें असतें. कारण पहिल्या दहा विभागांतील साधार विवेचन व माहिती वाचून वाचकांचा जो ग्रह होतो तो या शेवटच्या भागानें सर्वस्वी नष्ट होतो. तरुण मनुष्य भावनाप्रधान असेल, व नव्या ज्ञान संपादनानें आपणांला मोठा लाभ झाला असें त्याला वाटेल तर तें योग्य आहे. पण एवढयाशा लाभावर त्यानें प्रथम पुरुषी सर्वनामाचा संसार थाटण्याचें कारण नाहीं. सर्व जगासंबंधानें

बोलण्याच्या विषयांत जग जितकें मोठें तितक्या उलट प्रमाणानें लेखकानें स्वतः विनयशील असलें पाहिजे व भीतभीतच लिहिलें पाहिजे. त्याच्या उलट प्रकार या पुस्तकांत दिसतो. शिवाय जग सुस्थितीवर आणण्याकरितां ग्रंथकारानें जो उपाय म्हणून सुचविला तो वाचला म्हणजे तर, लेखकानें शहाणपणाची झांकली मूठ विनाकारण उघडली असें म्हणावेसें वाटतें.

### अप्रिय पण पथ्यकर

आमचा हा अभिप्राय ग्रंथकर्त्याला कडू वाटेल हें आम्ही जाणून आहों. परंतु तो खऱ्या मनानें दिलेला आहे. आणि जाहीर रीतीनें देण्याचें कारण, पुस्तकच मुळीं जाहीर आहे. तेव्हां आम्हांला वाटतो तो खरा अभिप्राय न दिला, तर वाचक हे लेखकाबरोबर आमच्याविषयींहि प्रतिकूल ग्रह करतील. कारण ग्रंथकर्त्याचें सर्वच लिहिणें आम्हांला पसंत आहे असा त्यांचा ग्रह होईल. रा. चितळे हे अभ्यासू वृत्तीचे असून परिश्रमपूर्वक ग्रंथ लिहून जगापुढें येण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा सर्वस्वी स्तुत्य आहे; व त्याला जितक्या बाजूंनीं मदत होईल तितकी अवश्य व्हावी. पण प्रस्तुत ग्रंथ-कर्त्यानें इतर ग्रंथहि अशाच मोठ्या विषयावर लिहिण्याचे योजले आहेत असें समजतें. म्हणून आमचा कांहीं अभिप्राय अप्रिय होण्यासारखा असला तरी वेळींच ग्रंथकर्त्याला कळावा म्हणून दिला आहे, व याबद्दल ते आमच्यावर रागावणार नाहींत अशी आमची आशा आहे. वर दर्शविलेला दोष वगळला तर माहितीच्या दृष्टीनें त्यांचा ग्रंथ वाचनीय झाला असून, अशा विषयांचा विचार करणाऱ्या गृहस्थांनीं संग्रहीं ठेवण्यासारखा आहे यांत शंका नाहीं.

तरुण पिढीची भावना हें राष्ट्राचें भांडवल होय. पण ती भावना निर-निराळ्या विषयांच्या अभ्यासावर घासून निघाली तर अधिक तेजस्वी व प्रभावी होईल अशी आमची खात्री आहे. म्हणून उत्तेजनाबरोबर सावध-गिरीची सूचनाहि तरुण अभ्यासू लेखकाला करणें हें आम्ही आपलें कर्तव्य समजतों.

---

## ५१ ‘ हिंदुसमाज समर्थ कसा होईल ’ ?

प्रस्तुत पुस्तक वांई येथील एक शास्त्री व हिंदुधर्मप्रचारक महादेवशास्त्री दिवेकर यांनीं लिहिलेलें आहे. त्याची प्रथमावृत्ति तीन वर्षांपूर्वी निघाली, व हल्लीं ही दुसरी आवृत्ति निघत आहे. या एका गोष्टीवरून हें पुस्तक लोकांना किती आवडलें याची कल्पना आपोआप येईल. या लोकप्रियतेला आमच्या मतें दुतर्फी कारणें आहेत. म्हणजे एक लेखकाचे गुण व दुसरें विषयाचे गुण. हिंदु समाजासंबंधानें लोकांचीं आजवर असलेली उदासीन वृत्ति लोपून त्यांना तो जिवंत कसा राहील व समर्थ कसा होईल, याची चिंता वाटूं लागली आहे. यामुळें या दोनहि प्रश्नांचीं उत्तरें एखादा विचारी व चिकित्सक मनुष्य देण्यास निघाला तर तीं ऐकून घ्यावीं, व समजून घ्यावीं असें त्यांना वाटूं लागलें आहे. दुसरे पक्षीं दिवेकरशास्त्री यांचे लेख अत्यंत सुगम, ओजस्वी आणि विचारांना उद्बोधक व चालना देणारे असल्यामुळें, जो वाचक हें पुस्तक वाचावयास घेतो त्याला तें पुस्तक संपविल्याशिवाय खालीं ठेववत नाहीं.

आमच्या जुन्या पिढीचा ‘शास्त्री’ म्हटला म्हणजे तो आंधळा, आणि आमच्या जुन्या पिढीचा ‘सुधारक’ म्हटला म्हणजे तो अंगभर डोळे फुललेला असें एका टीकाकारानें कांहींसें चेष्टेखोरपणानें वर्णन केलें आहे. पण तें बरेंचसें खरें आहे. जुन्या पिढीचा शास्त्री आंधळा अशाकरितां कीं, या शास्त्र्याला भावी काळांतील समाजाची कांहीं एक कल्पना असत नाहीं. इतकेंच नव्हे तर आपल्या पायाखालची चालती वाटहि त्याला नीट उमगत नाहीं; फक्त मनानें प्रामाणिकपणें तो असें घेऊन चाललेला असतो कीं, माझ्या पायाखालचा मार्ग हाच अनादि व सनातन आहे. इतकेंच नव्हे तर तोच मार्ग अनंत कालपर्यंत असाच सरळ—फाटे न फुटतां, किंवा वळण न घेतां—जाणारा आहे यामुळें तो आपण होऊन नवी गोष्ट कोणतीहि घेणार नाहीं, व घेतली तरी ती नवी म्हणून कबूल करणार नाहीं. याच्या उलट जुन्या पिढीचा सुधारक म्हटला म्हणजे, तो पाहील तिकडे त्याला नवीच गोष्ट दिसेल, व ती नवीन म्हणूनच तो कौतुकानें स्वीकारील. या दोन विसंवादी गोष्टींमुळें शास्त्री व सुधारक हे एकमेकांना आपले शत्रु समजत. व उभयतांत व्यक्तिविषयक

प्रेम, आदर किंवा अगत्यबुद्धि असल्यास, ते एकमेकांना निदान हिंदु समाजाचे शत्रु असें तरी मानीत.

सुदैवानें ही स्थिति आतां पालटली आहे. म्हणजे जो पूर्वी अंध होता त्याला डोळे आले; व ज्याच्या अंगभर डोळे होते त्याचे बाकीचे डोळे जाऊन फक्त दोनच उरले. आणि अशा रीतीनें दोन डोळे असले तरी दृष्टि एक त्याप्रमाणें दोन व्यक्ती असल्या तरी विचारसरणी एक असा मेळ पडला आहे यामुळें दिवेकरशास्त्री यांना ' सुधारक शास्त्री ' असें सजोड नांव प्राप्त झालें आहे. पण त्याचें त्यांना वाईट वाटण्याचें कारण नाहीं. कां कीं, सुधारक म्हणविणाऱ्या कित्येक लोकांमध्येंहि हल्लीं प्रतिक्रिया झालेली असून, पूर्वीचे सुधारकी विचार अगदींच एककल्ली म्हणून सुधारणा म्हटली तरी ती होतां होईल तों जुन्या परंपरेला धरून करावी अशी बुद्धि त्यांच्यामध्यें उत्पन्न झाली आहे. याचीं एकदोन उदाहरणें द्यावयाचीं तर एका बाजूला दिवेकरशास्त्री किंजवडेकरशास्त्री व दुसऱ्या बाजूला कै. गो. म. चिपळूणकर व न्यायमूर्ती माडगांवकर यांचीं देतां येतील. वरील दोघांहि शास्त्र्यांचें शिक्षण जुन्या पद्धतीनें झालें. असें असतां दिवेकरशास्त्री यांनीं व्यावहारिक हिंदुधर्माच्या बाबतींत, आणि किंजवडेकरशास्त्री यांनीं हिंदुधर्मसंस्कार आणि हिंदुधर्मशास्त्र यांच्या बाबतींत एखाद्या प्रतिनिविष्ट सुधारकाप्रमाणें प्रगतिप्रियता दाखविली आहे ! दुसरे पक्षीं कै. गो. म. चिपळूणकर यांनीं स्त्रीशिक्षणासंबंधीं जें एक पुस्तक त्यांच्या मृत्युपूर्वी थोडे दिवस लिहिलें त्यांत आगरकरी मतांपासून किती तरी उलट खाल्लेली दिसेल आणि न्या. माडगांवकर हे सुधारक आतांहि हिंदुधर्मशास्त्राची ( हिंदू लॉची ) सुधारणा करतांना जुन्या समाजाचें मन न दुखविण्याविषयीं इतकी आस्था दाखवितात कीं, कित्येक म्हणूं लागले, हिंदु लॉची सुधारणा यांच्या हातून ती काय होणार? पण खऱ्या सुधारणेचा तोच मध्यबिंदु समजावा कीं, ज्यावर उभें राहिलें असतां शास्त्र्याला सनातनी लोकांकडून सुधारक म्हणवून घ्यावें लागेल, आणि सुधारकांनाहि प्रगतिप्रिय लोकांकडून पुराणप्रिय म्हणवून घ्यावें लागेल.

असो. दिवेकरशास्त्र्यांनीं प्रस्तुतचें पुस्तक हें हिंदुसंघटनेच्या चळवळीच्या दृष्टीनें मुख्यत: लिहिलें आहे. म्हणून त्यामध्यें तात्त्विक धर्मचर्चा

फारशी नसून, प्रतिस्पर्धी अशा इतर समाजांच्या हल्ल्यांतून हिंदु समाज कसा वांचेल—किंबहुना कोणत्या उपायांचा अवलंब केला असतां तो कायमचा निर्भय होईल, व खऱ्या हिंदु संस्कृतीचा जगभर प्रसार करण्याला पात्र होईल—या दृष्टीनें प्राप्त होणारी व्यावहारिक धर्मचर्चाच त्यांत केलेली आढळेल. पण व्यावहारिक दृष्टि ठेवणाऱ्या मनुष्यालाहि वरवर चार गोष्टी उडत्या सांगून भागत नाहीं, तर समाजाच्या अंतरंगांत चौकसपणानें खोल कसें शिरावें लागतें हें पाहावयाचें तर, उत्तरार्धांतील १२८ ते १३२ या पृष्ठांवर हिंदुसंघटनेला उपयुक्त म्हणून जीं सूत्रें ग्रंथकारानें दिलीं आहेत तीं कोणीहि वाचून आकलन करावीं.

सनातनी हिंदु आणि हिंदु—महासभेचा अभिमानी हिंदु हे दोघेहि हिंदूच असले तरी दोघांचें ध्येय व विचारांची दिशा हीं एकच नसतात. दोघेहि वेदांच्या ठिकाणीं प्रामाण्यबुद्धि मानणारे असें म्हटल्यानें निर्वाह लागत नाहीं. कारण व्यवहारांत पाहावें तों सनातनी हिंदु हा फक्त व्यक्तिदृष्ट्या हिंदुधर्माकडे पाहणारा आहे. तो खरोखर सनातनी असेल तर आपल्या मनाप्रमाणें शुद्ध परंपरागत असे आचार पाळून जगूं म्हणेल. पण सगळ्या हिंदु समाजाची वाट काय हें तो लक्ष घालून पाहणार नाहीं. किंवा इतर हिंदु समाजाची अनास्था होऊन तो नष्ट झाला असतां, आपल्या सनातनी आचारविचाराप्रमाणें राहून जगूं पाहणाऱ्या स्वतः आपणालाहि जगण्याला स्थान उरणार नाहीं ही गोष्ट त्याच्या लक्षांत येत नाहीं.

प्रस्तुत लेखकाला असेंहि म्हणणारे कांहीं लोक भेटले कीं, " आमच्यासारखे अस्सल पुराणमतवादी सनातनी शुद्ध हिंदु आचाराचे शंभर हिंदु लोक हिंदुस्थानांत उरलों तरी चालेल, पण तुमची ही बाटगी हिंदु-संघटना नको. " पण वरील वाक्य अंगोपांगांसह येथून तेथून सर्वच फोल आहे. अवघ्या हिंदु समाजापैकीं फक्त शंभर लोकच ज्या आचारांचा आश्रय करून राहतील त्यांना कालमानाप्रमाणें खरे हिंदु आचार असें कोणीच म्हणणार नाहीं ! पण याहून मोठी आपत्ति ही कीं, या शंभर अस्सल म्हणवणाऱ्या हिंदूंना आपल्या आचारविचारांप्रमाणें वागण्याला नव्या जगांतच काय, पण हिंदु समाजांतहि अबाधित किंवा निर्भय अशी जागाच उरणार नाहीं. खरा हिंदुधर्म तोच कीं, जो हिंदु म्हणविणारा,

हिंदु या नांवाचा अभिमान बाळगणारा, तत्कालीन हिंदु समाज इष्ट व योग्य धर्म म्हणून ठरवील आणि सर्वसाधारण अशा वैदिक संस्कृतीं-वरील प्रामाण्यबुद्धीमुळें व अभिमानामुळें त्याला सनातनत्वाचा अधिकारहि प्राप्त होईल.

पुराणमतवादी हिंदूंना हिंदुत्वाचा अभिमान भरपूर असतो ही गोष्ट आम्हांला मान्य आहे. पण व्यक्तिधर्माहून समष्टिधर्म किंवा राष्ट्रधर्म म्हणून कांहीं एक वेगळीच गोष्ट आहे हें त्यांच्या लक्षांत येत नाहीं. हिंदु–महासभावाले या राष्ट्रधर्माला व्यक्तिधर्मापेक्षां विशेष महत्त्व देतात. कारण नवयुगाच्या या महापुरांत हिंदुत्व जर जगावयाचें तर तें अखंड अशा हिंदु समाजाच्या नौकेचा आश्रय करूनच जगेल. हिंदुमहासभावाल्यांना हिंदुत्वाबरोबर स्वराज्यहि पाहिजे; पण स्वराज्याच्या मागें लागलें व हिंदुत्व बुडविलें असा आक्षेप त्यांच्यावर कोणास आणतां येणार नाहीं. त्यांना स्वराज्य पाहिजे. पण तें हिंदूंचें हिंदुत्व राहूनच पाहिजे. यांपैकीं कोणतेंहि एक कोणत्याहि दुसऱ्याकरितां गमवावयाला ते तयार नाहींत; आम्ही दोहोंकरितां लढूं व दोनहि मिळवूं, अशी महत्त्वाकांक्षा ते बाळगतात. ती सफल होणें न होणें हें अर्थात् ईश्वराधीन आहे. याच्या उलट निव्वळ सनातनी म्हणविणाऱ्या हिंदूंना स्वराज्याची आकांक्षा तीव्र असत नाहीं; आणि केवळ स्वराज्याच्या मागें लागलेल्या कांहीं हिंदूंना हिंदुत्वाची चाड राहत नाहीं. हिंदुस्थानांतील मुसलमानांनीं मात्र धर्म आणि स्वराज्य-सत्ता हीं दोनहि ध्येयें एकवटून आपल्या डोळ्यापुढें ठेविलीं आहेत. म्हणून मुसलमानांचा खरा विरोध येतो तो कट्टया सनातनीयांच्याशीं येत नाहीं तर प्रगमनशील अशा हिंदूंशीं येतो.

दिवेकरशास्त्री यांनीं ही वरील गोष्ट मुख्यतः लक्षांत ठेवूनच प्रस्तुतचें पुस्तक लिहिलें आहे. त्याच्या पहिल्या भागांत हिंदु समाजाला दुबळेपणा येणाऱ्या दोषांचा विचार केलेला असून, दुसऱ्या भागांत हिंदु समाज सुसंघटित व समर्थ करण्यास लागणाऱ्या आवश्यक अशा विधायक गोष्टींची चर्चा केली आहे.

---

## ९२ साधनचिकित्सा

( ले. वा. सी. बेंद्रे )

भारतइतिहाससंशोधक मंडळ पुणें, या संस्थेच्या पुरस्कृत ग्रंथमालेंतला हा सातवा ग्रंथ आहे. शिवरायाच्या त्रिशतसांवत्सरिक उत्सवाच्या वेळीं शिवशाहींतील शक्य तितक्या अस्सल पुराव्यावरून लिहिलेला इतिहास प्रसिद्ध करण्याची मंडळाची मनीषा आहे. त्या शिवशाहीच्या चर्चात्मक इतिहासांतला प्रस्तावनाखंड म्हणून हा साधनचिकित्सा ग्रंथ श्री.बेन्द्रे यांनीं प्रसिद्ध केला आहे. श्री. बेन्द्रे हे इतिहाससंशोधनाचें कार्य सुमारें एक तपपर्यंत करीत आले आहेत. आणि त्याचेंच हें फळ या साधनचिकित्सेच्या रूपानें त्यांनीं महाराष्ट्रापुढें ठेविलें आहे. या ग्रंथाच्या रचनेसाठीं त्यांनीं किती परिश्रम केले आणि किती पदरमोड केली याची कल्पना तज्ज्ञासच येऊं शकेल. इतिहासविषयीचा इतका मन:पूर्वक अभ्यास करणारे विरळाच. त्यांतूनहि आपल्या संशोधनाचें फळ स्वार्थत्यागपूर्वक जनतेला अर्पण करणारे लेखक तर क्वचितच आढळतात. यास्तव श्री. बेन्द्रे यांनीं नितांत परिश्रमपूर्वक केलेल्या इतिहासाच्या या सेवेबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तेवढें अपुरेंच होणार आहे.

श्री. बेन्द्रे यांच्या या ग्रंथाचें वैशिष्ट्य केवळ संशोधनांत किंवा स्वार्थत्यागांतच आहे असें नसून इतिहासलेखनाच्या कलेला इष्ट व अपेक्षित असें वळण लावण्याचा त्यांनीं मराठी भाषेंत अपूर्व असा हा प्रयत्न केला यांत त्यांच्या ग्रंथाचें खरें वैशिष्ट्य आहे. ऐतिहासिक साधनांची बाडें आजवर अनेकांनीं शोधलीं व पुढेंहि अनेकांकडून तें काम केलें जाईल; त्याचप्रमाणें प्रकाशित झालेल्या साधनांचा उपयोग करून त्यावरून एकेका कालविभागाचा इतिहास लिहिण्याचें कामहि यापूर्वी झालें व तसें तें पुढेंहि होत राहील. पण या सर्व वाङ्मयतपश्चर्येला कांहीं विशिष्ट नियम किंवा विधिनिषेध आहेत किंवा कसें आणि आपली तपश्चर्या योग्य मार्गानें चालून ती फलदायिनी होण्याला आपण कोणते निर्बंध पाळले पाहिजेत याचा शास्त्रीय पद्धतीनें विचार फारसा कोणी केलेला नव्हता. सुप्रसिद्ध इतिहासाचार्य राजवाडे यांचें सर्वच कर्तृत्व अपूर्व असल्यानें ते तेवढे

वरील विधानाला अपवादात्मक होते. अर्थातच राजवाडे यांनीं आपल्या प्रास्ताविक लेखांतून केलेली असली चिकित्सा वगळल्यास ऐतिहासिक साधनांचें संशोधन कसें करावें याविषयीं श्री. बेन्द्रे यांच्या या ग्रंथाच्या आधीं कोणीहि अशी मार्मिक चिकित्सा केलेली नव्हती. अशी चिकित्सा न करतां देखील संशोधनाचें व इतिहासरचनेचें काम अडून राहिलें होतें असा भाग नाहीं. जो जो संशोधक किंवा लेखक अशा कार्यासाठीं बद्ध-परिकर होऊन पुढें येतो तो तो आपल्यापुरते स्वतःच्या बुद्धीनें व मनो-धर्माप्रमाणें कांहीं तरी नियम स्वतःपुरतें बसवून त्यास अनुसरून काम करीतच असतो. पण त्या नियमांचा इतरांना मागमूसहि नसल्यानें एकाचे परिश्रम इतरांस उपयोगी पडूं शकत नाहींत आणि प्रत्येक नवीन संशो-धकास कालाचा व द्रव्याचा अपव्यय करून तेंच शहाणपण स्वतः विकत घ्यावें लागतें. ही आपत्ति लक्षांत घेऊन श्री. बेन्द्रे यांनीं आपला अनुभव या पुस्तकाच्या रूपानें भावी होतकरू संशोधकांपुढें मांडला आहे.

या साधनचिकित्सेंत शिवकालीन ऐतिहासिक साधनें कोणतीं उपलब्ध होण्याचा संभव आहे, त्यांचा तपास कोठें करावा, आजपर्यंत उपलब्ध झालेलीं साधनें कोणतीं आणि त्या साधनांची ऐतिहासिक सत्याच्या दृष्टीनें कसोटी कशी ठरवावी इत्यादि महत्त्वाच्या अंगाविषयींची माहिती सूत्र रूपानें दिलेली आहे. व्याकरणशास्त्राचें अध्ययन केलें नसलें तरी भाषेचा व्यवहार जाणणारा इसम व्याकरणशुद्धच बोलत असतो. तरी पण हें असेंच कां असा प्रश्न त्यापुढें टाकल्यास त्याचें सशास्त्र कारण कांहीं त्याला सांगतां येत नाहीं आणि म्हणूनच "हें शुद्ध कां व हें अशुद्ध कां हें व्याकरण शिकल्यानें समजतें" असें व्याकरणकार सांगत असतात. संशो-धनाचा व्यासंग थोडाबहुत तरी ज्यानें केला आहे त्यालाहि एखादा ऐतिहासिक लेख आढळला कीं, त्याची योग्यायोग्यता अजमावितां येते. पण अमकें एक साधन अधिक विश्वसनीय कां व बाह्यतः तशाच स्वरू-पाचें दिसणारें दुसरें एखादें साधन अविश्वसनीय कां असें त्यांस विचारलें असतां ही गोष्ट स्वानुभवानें मी ओळखूं शकतों एवढेंच तो उत्तर देईल. पण हें उत्तर शास्त्रशुद्ध नसून त्याच्या या अनुभवाचा इतरांना तर यत्किं-चित्‌हि उपयोग होऊं शकणार नाहीं. ही आपत्ति टाळण्याकरितां श्री. बेंद्रे यांनीं आपल्या एक तपाचा अनुभव या पुस्तकांत चिकित्सक पद्ध-

तीनें आणि सर्वसामान्य नियमांच्या स्वरूपानें मांडून नविन संशोधकांना हा एक अमूल्य ठेवा सुलभ करून ठेवला आहे. इतिहासलेखनासाठीं जीं साधनें जमवावयाचीं त्यांतील पुराव्याची ग्राह्याग्राह्यता कशी ठरवावी याचें विवेचन मुख्यत: या ग्रंथांत केलेलें आहे. आणि हें सामान्य: विवेचन वाचकांस पटण्यासाठीं म्हणून आणि इतिहासमंडळास शिवशाहीच्या इतिहासलेखनाचें जें कार्य करावयाचें आहे त्याला मार्गदर्शक म्हणून वरील सामान्य नियमांना या पुस्तकांत विशिष्ट उदाहरणांची पुस्ती जोडण्यांत आली आहे. त्यामुळें 'एका क्रिया द्व्यर्थकरी बभूव' या सुभाषितांत म्हटल्याप्रमाणें या साधनचिकित्सेच्या ग्रंथापासून वाचकांना दुहेरी लाभ होणार आहे. इतिहाससंशोधनाच्या व लेखनाच्या कार्यांत सत्यासत्यनिर्णय कसा करावा याचें ज्ञान तर या पुस्तकावरून होईलच, पण त्याबरोबरच शिवशाहीच्या इतिहासानें आजपर्यंत किती मजल गांठली आहे आणि आजपर्यंत अद्याप किती मजल गांठावयाची आहे, हा प्रवास सुखकर होण्याला कोणत्या साधनांचा उपयोग होण्याजोगा आहे, आणि या प्रवासांत दिशाभूल होण्याचा संभव कोठें कोठें आहे, याची माहिती या ग्रंथावरून मिळणार आहे.

या पुस्तकांतील सर्वच भाग मोठ्या शोधक बुद्धीनें लिहिला असल्यामुळें सर्वच ग्रंथ अभ्यासकास अत्यंत उपयुक्त असा आहे. पण त्यांतल्या त्यांत इतिहास रचनेंतील दृष्टि, लेखांचें सामान्य परीक्षण, लेखकांचे सामान्य दोष, अंतरंगपरीक्षण, संभाव्यासंभाव्यता, विधायक अनुमानपद्धति इत्यादि भाग संशोधकास दिशा दर्शविण्याच्या दृष्टीनें विशेष उपयुक्त आहेत. इतिहासलेखनाला साहित्य कोणकोणतें मिळूं शकेल याच्यासंबंधानें परदेशीय साधनें, स्वदेशीय साधनें, संस्कृत साधनें, प्राकृत साधनें, सरकारी जाबते, सरकारी व खासगी पत्रें, महजर, करीतें, पुरशिसी, शकावल्या व बखरी, पोवाडे व काव्यें इत्यादि प्रकरणांतून जी माहिती देण्यांत आली आहे, तिच्यावरून श्री. बेंद्रे यांच्या बहुश्रुततेची, दीर्घ व्यासंगाची व व्यापक दृष्टीची कोणीहि तारीफच करील.

इतिहासलेखनाला उपयोगी पडणाऱ्या विविध साधनांची नुसती जंत्री देऊनच न राहातां श्री. बेंद्रे यांनीं प्रत्येक साधनाची तारतम्य दृष्टीनें छाननी केली आहे आणि विशिष्ट साधनांचा उपयोग करतांना धोका कोठें असतो

व नवीन संशोधकानें सावधगिरी कोणत्या गोष्टींविषयीं ठेवावी याचा इषारा देण्याचें महत्कार्य या ग्रंथांत करण्यांत आलें आहे. नुसतीं साधनें हातांत पडलीं म्हणजे इतिहासाची पूर्व तयारी होत नसून त्या साधनांचा उपयोग कसा करावयाचा हें कळणें अधिक महत्त्वाचें असतें. अशी दक्षता व असें तारतम्य न राहिल्यास हस्तगत झालेल्या साधनांचा दुरुपयोग होण्याचाहि संभव असतो. याकरितां हातांत पडलेला कागद वाचावा कसा व त्यावरून ऐतिहासिक अनुमान काढावें कसें याचें एक शास्त्रच बनलें आहे. महायुद्धाच्या वेळीं वर्तमानपत्रांतून ज्या बातम्या प्रसिद्ध होत असत त्यांच्यातून खरा निष्कर्ष कसा काढावा हें न कळल्यानें वाचकांचा मोठा गोंधळ उडत असे. तो लक्षांत घेऊन त्या वेळीं वाचकांना दीपगृहाप्रमाणें मार्गदर्शक होण्यासाठीं " How to read War-news " या नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध झालें होतें. फ्रान्समधून आलेल्या बातम्यांवरून अनुमान कसें काढावें, शत्रुराष्ट्राकडून ज्या बातम्या प्रसिद्ध होतात त्यांवर कितपत विश्वास ठेवावा, माहिती प्रसिद्ध करण्यापूर्वी सेन्सॉरकडून तिच्यांत छाटाछाट कशी होते आणि म्हणूनच असला हा शब्द सोडलेला धडा तर्कानें पूर्ण करून वाचकांनीं कसा वाचावा इत्यादिसंबंधीं अनेक उपयुक्त नियम त्या पुस्तकांत दिलेले होते. श्री. बेंद्रे यांनीं परदेशीय फारशी साधनें, महजर, बखरी वगैरे मधून सत्यासत्याची निवड कशी करावी यासंबंधानें जे नियम दिले आहेत ते वर निर्दिष्ट केलेल्या इंग्रजी पुस्तकांतील नियमांच्या नमुन्याचे असून तितकेच गुणदोषक झाले आहेत.

वर दर्शविलेल्या चिकित्सेच्या अनुषंगानें व इतर ऐतिहासिक माहिती या पुस्तकांत देण्यांत आली असून जुने लेख वाचून त्यांचा अचूक अर्थ लावण्याच्या कामीं त्या माहितीचा विशेष उपयोग होण्याजोगा आहे. उदाहरणार्थ, लेखनप्रशस्ति हें प्रकरण पाहा. त्यांत लेखनपद्धति, मायन्यांचे नमुने, सरकारी कागदपत्रांचे प्रकार, चिटणिसी जाबते, शिक्के व मोर्तब, मराठी शक व संवत्सर, आरबी व फारशी महिने आणि वर्षे हीं लिहिण्याची पद्धति, आणि त्यावरून तारीख व मिती काढण्याविषयींचे नियम आणि ऐतिहासिक प्रसिद्ध पुरुषांच्या अक्षरांचे नमुने या सर्वांचा उपयुक्त असा संग्रह या पुस्तकांत एकत्र मिळण्यासारखा आहे. सारांश, या साधनचिकित्सेच्या अभ्यासानें

मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें शोधून काढणें, हातीं लागलेल्या रत्नांची जवाहिऱ्या ज्याप्रमाणें बिनचूक किंमत ठरवितो त्याप्रमाणें साधनांची योग्यायोग्यता ठरविणें आणि त्या साधनांचा इतिहास रचनेच्या कार्यांत योग्य ठिकाणीं उपयोग करणें इत्यादि कार्यांत प्राविण्य मिळवितां येईल. पावसाचें पाणी डोंगरावरून खालीं आलें कीं, यदृच्छेनें इतस्तत: वाहात जातें व त्यापासून लाभ अगर हानि यदृच्छेनें घडत असते; पण कुशल इंजिनियरानें त्या पाण्यास योग्य वाट काढून दिली असतां त्या पाण्याचा जसा योग्य काळीं व योग्य स्थळीं सदुपयोग होतो आणि दुरुपयोग टाळतां येतो, त्याप्रमाणेंच संशोधकांच्या प्रयत्नांचा जो अनिर्बंध प्रवाह आजपर्यंत चालू होता, त्याला श्री. बेंद्रे यांनीं आपल्या लेखनकौशल्यानें एकसूत्रता व सुसंबद्धता आणण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या ह्या कौशल्याबद्दल महाराष्ट्रांतील सर्व इतिहासप्रेमी गृहस्थ त्यांचें मन:पूर्वक व सक्रिय कौतुक केल्यावांचून राहणार नाहींत. असा आम्हांस भरंवसा वाटतो.

## ५३ इंग्रजी तुकाराम चरित्र

ज्ञानेश्वर–तुकारामादि महाराष्ट्रांतील संतांनीं प्रसृत केलेल्या भागवतधर्माशीं ख्रिस्ती धर्माचें जितकें साम्य जुळतें तितकें हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याहि धर्माशीं किंवा पंथाशीं जुळत नाहीं. या महाराष्ट्रीय भागवतधर्माचीं तत्त्वें साधुवर्य तुकाराममहाराजांच्या अभंगांत जितक्या प्रेमळ,साध्या,परंतु जोरदार भाषेंत मांडलेलीं आढळून येतात तितकीं दुसरीकडे आढळून येत नाहींत, आणि यामुळेंच ते अभंग सुशिक्षित-अशिक्षित आबालवृद्धांच्या नेहमींच्या परिपाठांतील होऊन बसले आहेत; भोळ्या भाविकांना तर भक्तीच्या निर्मळ सोपानानें मोक्षाचें द्वार खुलें करून देणारी ही अभंगवाणी अमृततुल्य वाटावी यांत नवल नाहीं. सारांश, ख्रिस्ती धर्माशीं निकट साम्य असलेल्या महाराष्ट्रीय भागवतधर्माचीं तत्त्वें प्रतिपादणारे म्हणून व ज्या लोकांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार करावयाचा त्या लोकांत रोज प्रेमादरानें गाइले जाणारे म्हणून, दोनहि कारणांनीं, तुकोबारायांच्या अभंगांकडे ख्रिश्चन मिशनऱ्यांचें प्रामुख्यानें लक्ष लागावें हें अगदीं साहजिक आहे. तुकारामबुवांच्या अभंगाचें

फ्रेजरसाहेबांनीं केलेलें इंग्रजी भाषांतर प्रसिद्धच आहे. याच फ्रेजरसाहेबांनीं तुकोबांचें इंग्रजी चरित्र लिहिण्याचाहि उपक्रम केला होता, पण तो पुरा होण्याच्या आधींच ते ख्रिस्तवासी झाले. त्यांच्या पश्चात त्यांचें काम रेव्ह० एड्वर्डस्साहेबांनीं पुढें चालवून हें इंग्रजी तुकारामचरित्राचें पुस्तक पुरें केलें व तें ‘ ख्रिश्चन लिटरेचर सोसायटी ’ नें प्रसिद्ध केलें आहे.

रेव्ह० साहेबांनीं देहू, लोहगांव, पंढरपूर वगैरे ठिकाणीं स्वत: जाऊन प्रत्यक्ष सर्व बारीक सारीक माहिती घेतली, अनेक तज्ज्ञांशीं चर्चा केली, व अगदीं परवां प्रसिद्ध ह. भ. पांगारकरांचें पुस्तक व त्यावरील टीकात्मक लेखा-पर्यंत या विषयावरील सर्व वाङ्मय पालथें घातलें. पुस्तकांत प्रतिपादन केलेल्या मतांबद्दल कोणास कांहींही वाटलें तरी त्यांच्या या खटाटोपाबद्दल कोणीही त्यांचें कौतुकच करील यांत शंका नाहीं. पुस्तकांत एकादी नवीन माहिती किंवा एखादा नवीन निर्णय नसला तरी, तुकारामबुवांच्या चरित्राशीं संबंध असलेल्या गोष्टींबद्दल सर्व उपलब्ध माहिती गोळा करण्याचा प्रयत्न केला आहे.

महिपतीबुवांच्या कथानकाखेरीज इतरत्र तुकारामबुवांच्या चरित्रा-संबंधानें माहिती फारच थोडी सांपडते. यामुळें त्यांच्याच कथानकाचा इंग्रजी अनुवाद रेव्हरेंडसाहेबांनीं केला आहे, हें योग्यच झालें. पण तुकारामबुवानंतर सवाशें वर्षांनीं महिपतिबुवांना जी जी माहिती उपलब्ध झाली ती ती त्यांनीं जशीच्या तशीच, त्यांत काडीचाहि फरक न करतां, दिलेली आहे आणि महिपतिबोवांच्या प्रामाणिकपणाबद्दल अमेरिकन लेखकांनीहि सर्टिफिकेट दिलें आहे. असें असतां त्यांच्या कथानकाचा अनुवाद करतांना त्या कथानकाचे ‘ संभाव्य गोष्टी ’ व ‘ भाकड कथा ’ असे दोन भाग पाडण्याचें कांहीं प्रयोजन नव्हतें असें आम्हास वाटतें.

रे० साहेब हे स्वत: मिशनरी असल्यामुळें त्यांनीं हें पुस्तक मिशनरी दृष्टिकोनानें व मिशनऱ्यांकरितां म्हणून लिहिलेलें आहे हें उघड दिसतें. ख्रि. रे. ना. वा. टिळक असें म्हणत असत कीं, तुकारामाचा मला ख्रिस्ताकडे जाणाऱ्या पुलासारखा उपयोग झाला. याच पुलावरून दुस-रींहि कांहीं कोकरें हिंदुधर्मांतून ख्रिस्ती धर्मांत यावींत अशी मिशनऱ्यांची इच्छा असणें अगदीं स्वाभाविक आहे. सर्व पुस्तक बारकाईनें वाचल्यास या दृष्टीनें पुढें मागें प्रयत्न करणाऱ्या मिशनऱ्यांस तें उपयोगी पडावें असाच या सर्व खटाटोपाचा मतितार्थ दिसतो.

उदाहरणार्थ, शेवटच्या भागांतील विवेचनांत तुकारामबुवांचा धर्म सध्याच्या काळास उपयोगी नाहीं, असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. फक्त खिस्ती धर्म हा एकच सध्याच्या काळाला अनुरूप असा धर्म आहे, अशी ज्यांची ठाम सममूत आहे अशांना तुकारामबुवांचा धर्म सद्यः परिस्थितीस अनुरूप आहे असें वाटणें संभवनीय नाहीं. पण हें विवेचन करतांनां वारकरी सांप्रदाय अथवा महाराष्ट्रीय भागवतधर्म यांचीं मूलतत्वें व खिस्ताच्या धर्माचीं मूलतत्वें यांची तुलना करावयाचा सरळ मार्ग सोडून व्यक्तिशः खिस्त व तुकाराम यांची तुलना करून खिस्ताचें श्रेष्ठत्व दाखविण्याचा हास्यास्पद प्रयत्न केला आहे.

खिस्त तुकारामापेक्षां श्रेष्ठ कां, तर त्याच्या मनांत पापाची जाणीव दाखविणारीं वाक्यें कोठेंच नाहींत म्हणून, अर्थात् तो पूर्ण निष्पाप होता; उलट तुकोबा तर पदोपदीं आत्मनिरीक्षण करून "माझे मज कळों येती अवगुण" असेंच कंठरवानें सांगत आहेत. हे व अशाच प्रकारचे स्वतःला पापी म्हणवून घेणारे अभंग पुढें करून रेव्ह. साहेब म्हणतात कीं, तुकारामबुवा पूर्णावस्थेस पोंचले नव्हते. पण तुकारामबुवांचे परिपूर्णावस्था दाखवणारे बरेच अभंग आहेत त्यांची रेव्ह. साहेब काय वाट लावणार? रचनेचा कालानुक्रम सिद्ध करण्यास दुसरीं साधनें उपलब्ध नाहींत तोंपर्यंत हेच पूर्णावस्था वर्णन करणारे अभंग शेवटचे असले पाहिजेत. अर्थात् आत्मशुद्धीच्या मार्गानें तुकोबाराय पूर्णावस्थेस गेले होते असें म्हणण्यास प्रत्यवाय कोणता? या सरळ कोटिक्रमाला रेव्ह. साहेबांच्या विवेचनांत समाधानकारक उत्तर सांपडत नाहीं. शिवाय जो स्वतःला पापी म्हणतो तो पापी व जो मुळींच तसें म्हणत नाहीं तो पुण्यवान ही रेव्ह. साहेबांची विचारसरणी अजब होय यांत शंका नाहीं. उलट कार्लाइलसाहेबांनीं म्हटल्याप्रमाणें "Greatest sin is to be conscious of none" कोणत्याही पापाची जाणीव नसणें हें सर्वांत मोठें पाप होय, हीच सामान्य लोकांची समजूत असते. रे. साहेबांच्या पद्धतीनें जगांतील पापी व निष्पाप लोक कोण हें ठरवावयाचें झाल्यास जगांतील सर्व पापी निष्पाप व सर्व पुण्यवान लोक पापी ठरूं लागतील. पण येन केन प्रकरेण खिस्ताचें व खिस्ती धर्माचें श्रेष्ठत्व सिद्ध करण्याच्या धांदलींत आपल्या अपसिद्धांतामुळें कोणकोणते घोटाळे उडतील याची रेव्ह. साहेबांस दाद राहिली नाहीं.

असो. या प्रकारास, तुकारामबुवांना गुरुस्थानीं मानणाऱ्या प्रार्थनासमाजिष्टांनीं 'सुबोधपत्रिके'त खरमरीत उत्तर दिलेंच आहे. हें योग्य झालें. पण प्रार्थनासमाजिष्ट डॉ. चंदावरकरसाहेबांनीं या पुस्तकाला प्रस्तावना लिहिली आहे तींतच याचा निषेध व्हावयास पाहिजे होता. डॉक्टरसाहेबांनीं दिलेल्या हिंदुस्थानांतील भक्तिमार्गाच्या पुरातन काळापासूनच्या लांबलचक इतिहासाची तितकीशी जरूरी नव्हती. पण डोळे मिटून फक्त आपल्या विद्वत्तेचें प्रदर्शन करण्याकरितां प्रस्तावना लिहावयास गेलें म्हणजे असेंच व्हावयाचें.

पुस्तकाच्या पहिल्या तीन भागांत महाराष्ट्र व महाराष्ट्रीय धर्म या संबंधाची इतर पुस्तकांतून गोळा केलेली व स्वतः प्रवास करून मिळवलेली माहिती दिली आहे. याचा उपयोग मिशनऱ्यांस बराच होणार असला तरी महाराष्ट्रीय हिंदूंना त्यांत नवीन असें कांहींच वाटणार नाहीं. पुढील दोन भागांत महीपतीचें दुभंग केलेलें चरित्र, नंतर अभंगांवरून उपलब्ध होणारें आत्मचरित्र देऊन शेवटचे पांच भाग उपयुक्त विवेचनात्मक लिहिले आहेत. शेवटीं पांच उपयुक्त परिशिष्टें व विषयांची व ग्रंथकर्त्यांची अशा दोन सूच्या दिलेल्या आहेत. यावरून पुस्तक किती परिश्रमपूर्वक तयार केलें आहे हें दिसून येईल. एकंदर सुमारें तीनशें पानांचें हें पुस्तक झालें आहे. निरनिराळ्या स्थळांचे, देवतांचे हस्ताक्षरांचे व वारकऱ्यांचे वगैरे मिळून १२ फोटोंचे ब्लॉकहि घातले असून बहिरंगहि मजबूत व सुबक केलें आहे. भाषा सुंदर व सोपी असल्यामुळें कोणत्याहि इंग्रजी जाणणाऱ्या तुकाराम-भक्तास तें अवश्य संग्राह्य झालें आहे यांत शंका नाहीं.

---

## ५४ राजा शिवाजी

(ले. कै. कुंटे, प्रकाशक गो. गो. अधिकारी, ५३३ सदाशिव पेठ, पुणें.) मराठी कवितेला नवीन वळण लावण्याच्या धाडशी हेतूनें प्रेरित होऊन लिहिलेलें कै. कुंटे यांचें राजा शिवाजी हें काव्य अलीकडे बहुतेक दुर्मिळ झालें होतें. त्याला फिरून एकवार पुनर्मुद्रणाचा संस्कार घडून तें

आज लोकदृष्टीपुढें येत आहे. सदर काव्य प्रथम प्रसिद्ध झालें तेव्हां त्याच्या धाडसी हेतूमुळें आणि अपूर्वतेमुळें तत्कालीन टीकाकारांना तो एक खळबळीचा विषय कांहीं दिवस होऊन राहिला होता. परंतु हल्लींच्या उत्क्रांत कवितेच्यां विस्तृत पात्रांत विहार करणाऱ्या वाचकांच्या दृष्टीनें आतां तो एक जिज्ञासेचा किंवा कौतुकाचा विषय एवढेंच फार तर त्याला महत्त्व राहील.

कारण केवळ कवित्वाच्या दृष्टीनें पाहिल्यास सदर काव्य वाचन निराश होणार नाहीं असा वाचकच विरळा. एकशेबारा पानांच्या या विस्तृत खंड–काव्यांत मनोरम अशीं स्थळें फार तर बोटावर मोजण्याइतकींच सांपडतील. आणि तीं स्थळें शोधण्याकरितां कांद्याकुटयांनीं भरलेला खड-बडीत वैराण मुलुखच इतका तुडवावा लागतो कीं, त्यामुळें संतापानें 'नको तो मोर आणि ती नको लांडोर' या गडकऱ्यांनीं वर्णन केलेल्या अनुभवाचा प्रत्यय आल्याखेरीज राहात नाहीं.

उठे लाट भारी समुद्रीं झरारा
चढे फेस लागे अती द्वाड वारा।
कडाडा शिडें वाजती जेवि डोलें
जळीं द्रोण, तैसे जहाजास झाले॥

किंवा

दमे बोलतांना मुखीं घाम आला
निघे हात तेव्हां पुसायास त्याला।
नथीखालचा घाम लागे पुसाया
निघे तेज तोंडीं, सुशोभे सुकाया॥
पदर ती धरती स्वकरीं जपी;
मुरडुनी उचली नथ ती टिपी।
हळुच घाम, सलज्ज, जरा भिते,
वळण हें रतिचें जणूं भासतें॥

किंवा

बाजूस कोनांत झरा उमाळे
पाणी दिसे निर्मळ स्वच्छ काळें।
मध्यें पुढें सुंदर कुंड झालें

हें पांडवांनीं म्हणतात केलें ॥
ह्या पायऱ्यांनीं स्थळ हें लखाके
पाणी तुडुंबे लहरींत फांके ।
ती थोर, ती भव्य गुहा झळाळे
ते खांब नामी दगडी निराळे ॥ इ०

प्रत्येक पानांत १२ श्लोक म्हणजे ११२ पानांतील १३४४ श्लोकांत त्यासारखीं चारदोनच स्थळें रमणीय म्हणून दाखवितां आलीं तर 'किंकळी' 'शूर' 'विर' असल्या अशुद्ध शब्दांची, 'खाल्चा' 'महक्रूर' 'बात्मी' 'अपार' 'जब्डा' असल्या विचित्र, लंगड्या व कर्णकटु शब्दप्रयोगांची, 'युद्धपोषाक' 'देशकैवारधारी' असल्या भिकार समासांची, 'गोड' 'मनोज्ञ' 'सुसंताप' 'सुशोभून' वगैरे निरर्थक शब्दांची आणि शब्द केवळ कवितेच्या साच्यांत बसविण्याकरितां केलेल्या धडपडीचीं, किंवा 'तीक्ष्ण घोडा' असल्या विचित्र विशेषणांचीं उदाहरणें पासरींभर तरी सहज दाखवितां येतील.

पडे, रूप हें गोड एथें पहातां
जरा थांब आली सखे, थोर माता ।
चपचपा उठली, दिसली कशी
झळकतो जणुं चंद्र नभीं तशी ॥

या चार चरणांत पहिल्या दोन चरणांतील एक वृत्त व पुढच्या दोन चरणांना दुसरें वृत्त अशी मजा आहे. आणि असलीं उदाहरणेंहि थोड-थोडकीं नाहींत.

जमे तो हजारों हजारोंचि घोडा,
गमे तो मला लाख, घोड्यांत घोडा ।
दिल्या कोण लावून रांगीहि रांगी ।
जशीं का मळ्यांतील आहेत वांगी ॥

किंवा

अस्ताव्यस्त तो म्लेंछ सारा असा कीं
ना बंदोबस्ती, ना पुरा बेत लोकीं ।
जेव्हां गेलों मी आंत सेना पहाया,
तेव्हां योद्धा हें एक लागे म्हणाया ॥

किंवा

असे रुंद जबुडा, दिसे क्रूर तोंडीं
मिशा लांब त्याच्या, खिळे शौर्य हाडीं ।
दिसे फार भेसूर, डोळ्यांत लाली
जराशी करी सर्व कामीं जलाली ॥

किंवा

मोठा भाला तो शूर घाली जिनांत
रेटी जोरानें दाबला शत्रु त्यांत ।
शके म्लेंछ, ना शूर घोडा हलाया
किती तोडतो म्लेंछ झ्या झ्या सुटाया ॥

किंवा

फांद्या फांद्याला झोडती नाद होती
शेंडे शेंड्याला घासती, त्रास देती ।
झाडा झाडांची चालली एक कुस्ती
झोंबी झोंबी ती माजली फार स्वस्ती ॥
धरी जेवि पैल्वान पैल्वान भारी
हणी हात काच्यांत झेलून मारी ।
पुढें पेंच सारे जसे संपती ते
अजुल्हा मरे देव राखी पतीते ॥

वगैरे नमुने पाहिले म्हणजे कै. शास्त्रीबुवांनीं उडविलेली कुंटे यांच्या काव्यांची टर जरा कठोर असली तरी अयोग्य नव्हती अशी खात्री पटल्याशिवाय रहात नाहीं.

कै. कुंटे यांच्या मराठीवरच्या अलोट प्रेमामुळेंच असले प्रकार घडले आहेत. ते आपल्या इंग्रजी प्रस्तावनेंत म्हणतात, ' संस्कृत शब्द संस्कृत आहेत म्हणून त्यास माझा विरोध नाहीं, तर मराठी लेखकानें अर्थ व्यक्त करण्यास मराठी शब्द नसतील तर संस्कृत शब्द वापरावे, या संस्कृत शब्दांच्या विरुद्ध आहें.' वरील विधान सकृतदर्शनीं योग्य वाटलें तरी व्यवहारांत तें युक्त ठरणार नाहीं. संस्कृत भाषा म्हणजे मराठीचा जिवंत झराच आहे व आज अगदीं संस्कृत शब्द न उपयोजितां लिहावयाचें म्हटल्यास दहापाच वाक्येंहि लिहावयास येणार नाहींत. विद्याधर वामन

भिडे किंवा वनविहार रणविहारकर्ते साधुदास यांच्याप्रमाणें भाषा संस्कृतप्रचुर क्लिष्ट होणार नाहीं अशी खबरदारी घेण्यास हरकत नाहीं व तशी ती हल्लीं घेतली जातहि आहे. पण संस्कृत शब्दांची सरसहा हाकालपट्टी करणें एक वेळ युक्त आहे असें जरी मानलें तरी तें शक्य मात्र नाहीं. खुद्द कै. कुंटे यांनाहि मध्यें मध्यें उगाच लुडबुडणाऱ्या 'मनोज्ञ' या संस्कृत शब्दाची हकालपट्टी करतां आली नाहीं असें ह्या काव्याच्या वाचकांस आढळून येईल. अगदींच संस्कृत शब्दांवर बहिष्कार टाकणें किंवा वेळीं अवेळीं त्यांचा पुरस्कार करणें हीं दोनहि एकांतिक टोंकें आहेत. रसापकर्ष न व्हावा पण प्रसाद तर राहावा अशा स्थितींत शब्द निवडण्यांत 'औचित्य' साधलें म्हणजे झालें.

'मराठी शब्द, बोलतांना आपण जसा उच्चारतों तसाच लेखनांतहि तो लिहावा म्हणजे उचलून हा शब्द 'उचलून' असाच लिहावा व उच्चारावा अशी सूचना करून कुंटे पुढें म्हणतात कीं 'असा प्रयत्न जोंपर्यंत होणार नाहीं तोंपर्यंत मराठी वाङ्मयाची हानि अशीच राहणार.' पण उदाहरणादाखल म्हणून वाचकांनीं हें काव्य एकदां वाचून पाहावें म्हणजे कै. कुंटे यांच्या या प्रयत्नाचा केवढा विपरीत परिणाम झाला आहे तो दिसून येईल. किंबहुना विवक्षित उद्देश आणि त्याचा विपरीत परिणाम यांच्या एकजात विरोधाचें इतकें उत्कृष्ट उदाहरण मराठी वाङ्मयांत तरी दुसरें सांपडेलसें दिसत नाहीं. सांप्रतकाळीं कवितेची इतकी सुधारणा झाल्यानंतरहि व कवितेला कोणतेंच बंधन असूं नये अशा मताच्या कांहीं चांगल्या आधुनिक कवींनींहि या बाबतींत औचित्य सोडून दिलेलें नाहीं ही गोष्ट कुंटे यांच्या मताचा विक्षिप्तपणा ठरविण्यास पुरेशी आहे.

असो. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे कै. कुंटे यांच्या काव्यापेक्षां त्यांची काव्यविवेचक प्रस्तावनाच—वरीलसारखीं तींत विधानें असलीं तरी ती अधिक वाचनीय उतरली आहे, म्हणून वाङ्मयप्रेमी लोकांनीं ती एकवार अवश्य वाचावी.

---

# ५५ हरिभाऊंचीं पत्रें

हें पुस्तक सातारा येथील ऐक्य–संपादन मंडळानें प्रसिद्ध केलें आहे. या पत्रांचे लेखक कै० हरि नारायण आपटे हे होत. ज्यांना तीं पत्रें लिहिलीं त्या श्री. काशीताई कानिटकर होत. या दोन विद्वान् व्यक्तींचीं नांवें सुप्रसिद्धच आहेत. पत्रें एकंदर ३५ च आहेत, व त्यांचा काळ मे १८८५ पासून मार्च १८९९ पर्यंतचा आहे. एवढ्या काळांत इतकींच पत्रें लिहिलीं गेलीं असें दिसत नाहीं. कदाचित् इतकींच शिल्लक राहिलीं असतील किंवा इतर आणखी असून तीं प्रसिद्ध करणें योग्य वाटलें नसेल. कसेंहि असो. हल्लीं छापलीं गेलीं तेवढ्या पत्रांवरून त्या एकंदर पत्रांची कल्पना येते. वास्तविक पत्रें खासगी व्यक्तींचीं, पण त्या व्यक्ति सुशिक्षित वर्गांत वरिष्ठ दर्जाच्या आणि ग्रंथकार म्हणून प्रसिद्ध असल्यानें त्यांच्या पत्रांना एक प्रकारचें महत्त्व आहे. लो. टिळकांच्या चरित्राच्या दुसऱ्या व तिसऱ्या खंडांत केळकर यांनीं प्रत्येक भागाच्या शेवटीं कांहीं कांहीं निवडक पत्रें छापलीं आहेत त्यावरून असलें वाङ्मय सद्यःस्थिति व मनुष्यस्वभाव दर्शविण्यास किती उपयोगी पडतें हें दिसून आलेंच आहे. हल्लींच्या पत्रांनीं केळकर यांनीं आरंभिलेल्या उपक्रमाचें समर्थनात्मक अनुकरण झालें आहे.

कै. आपटे हे डेक्कन कॉलेजांत होते. तेव्हां त्यांचा व काशीताई कानिटकर यांचा परिचय झाला. काशीताईंचे पति कै० गोविंद वासुदेव कानिटकर हे वाङ्मयप्रेमी व स्त्रीशिक्षणाचे अभिमानी होते व सुदैवानें त्यांना पत्नी लाभली तीहि बुद्धिमती व वाङ्मयप्रेमी. “ समानयन् तुल्यगुणं वधूवरं चिरस्य वाच्यं न गतः प्रजापतिः ” ही कालिदासाची उक्ति महाराष्ट्रासंबंधानें सार्थ ठरेल. असा पतिपत्नींचा जोडा क्वचितच पाहावयास सांपडतो. या दोघांत हरिभाऊ आपटे यांची भर पडल्यानें दुधांत साखर पडल्यासारखेंच झालें. हरिभाऊ हे भाऊ व काशीताई ही बहिण हें मानीव नातें अखेरपर्यंत खऱ्या नात्याप्रमाणें राहिलें. व या बहीणभावंडांच्या दरम्यानचा हा पत्रव्यवहार मोठा प्रेमळ व आदर उत्पन्न करणारा असा असून या नवीन प्रकारच्या ग्रंथाचें वाचकवर्गाकडून कौतुक झाल्याशिवाय राहा-

णारा नाहीं. इतकीच उणीव वाटते कीं, भावाच्या पत्रांप्रमाणें बहिणीचीं पत्रेंहि याच ग्रंथात छापलीं गेलीं असतीं तर या ग्रंथाच्या स्वारस्यांत अधिकच भर पडली असती.

या पत्रांतील मुख्य विषय मनोरंजन व करमणूक या मासिकाचा व साप्ताहिक पत्राचा तत्कालीन वृत्तान्त होय. यांपैकीं मनोरंजनाशीं काशीताई यांचा संपादक म्हणून संबंध होता. पत्रांतील दुसरा विषय म्हणजे आपटे यांनीं वेळोवेळीं निरनिराळया विषयांवर प्रगट केलेले विचार होत. मनोरंजन व त्यांतच समाविष्ट झालेली निबंध--चंद्रिका हीं दोनहि मासिकें चिपळूणकरांच्या निबंधमालेनंतर प्रसिद्ध होऊं लागलीं. तीं निबंधमालेनें उत्पन्न केलेल्या स्फूर्तीमुळेंच, निबंधमालेंत गंभीर विषयांबरोबर सुभाषित व विनोद असे. निबंध–चंद्रिका ईर्षेनें निघाली तरी तिनें ' माले'चें अनुकरणच केलें. करमणूक पत्र मात्र उच्च प्रतीच्या मनोरंजनालाच सर्वस्वी वाहिलेलें होतें.

हरिभाऊंनीं काशीताईस लिहिलेलीं हीं पत्रें मनोरंजन व करमणूक या नियतकालिकांसंबंधानें असलीं तरी त्यांचें महत्त्व तेवढ्यानें संपलें असें नाहीं. त्याखेरीज सदर पत्रांची वाङ्मयाच्या दृष्टीनेंहि योग्यता असून तीं वाचल्यानें हरिभाऊंचा स्वभाव, त्यांचें दांडगें वाचन, त्यांच्या अडचणी, त्यांस लागलेला लिहिण्याचा नाद, त्यांचीं सामाजिक व धार्मिक मतें हींहि कळून येतात. हरिभाऊ मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यानंतर डेक्कन कॉलेजांत बरींच वर्षें शिकत होते. परंतु गणितासारख्या विषयांत त्यांची मति न चालल्यामुळें व परीक्षेस नेमलेल्या पुस्तकांशिवाय इतर पुस्तकें वाचण्याची गोडी त्यांस लागल्यामुळें युनिव्हर्सिटीच्या पुढच्या परीक्षांतून पार पडून बी. ए. ची मजल गांठणें त्यांस अशक्य झालें आणि अखेर त्याच स्थितींत त्यांस कॉलेजांतील शिक्षणक्रमास रामराम ठोकणें भाग पडलें. आपण बी. ए. झालों नाहीं म्हणून घरच्या माणसांची आपणास टोंचणी कशी सतत चालू आहे व आपलें मनहि स्वतःस कसें खात आहे याबद्दलचे दुःखोद्गार त्यांच्या पत्रांतून ठिकठिकाणीं पाहावयास सांपडतात. कै. प्रि. आगरकर यांनीं केसरीशीं संबंध तोडून सुधारक हें स्वतंत्र पत्र काढण्याचें ठरविलें, त्या वेळीं त्यांच्या या कार्यास आपण जाऊन मिळावें अशी हरिभाऊंची फार इच्छा होती. परंतु केवळ पदवीधर नसल्यामुळें आपली

जगांत किंमत नाहीं या कल्पनेनें त्यांची त्यांसच आपल्या धाडसाबद्दल लाज वाटली.

हरिभाऊ यांचीं सामाजिक मतें सुधारक पक्षाचीं व राजकीय मतें नेमस्त पक्षाचीं होतीं हें पुष्कळांस माहीतच आहे. त्यांच्या सामाजिक व धार्मिक मतांचा अधिक उलगडा करणारीं कांहीं पत्रें या संग्रहांत आहेत. मिशनऱ्यांनीं चालविलेल्या दीनोद्धरणाच्या कार्यासंबंधीं हरिभाऊंस कौतुक व आदर फार. हें दीनोद्धरण करीत असतां मिशनऱ्यांनीं हिंदूंना बाटवून ख्रिस्ती बनविलें तरी त्याचें सुखदु:ख हरिभाऊ यांस मुळींच नव्हतें. कारण ' कोणी माणूस हिंदु असला काय किंवा ख्रिस्ती झाला काय मला धर्माचें कांहींच वाटत नाहीं ' असें हरिभाऊंनीं एका पत्रांत लिहिलें आहे. ते सदर पत्रांत म्हणतात, ' हिंदू हे हिंदू झाले काय किंवा ख्रिस्ती झाले काय मला सर्वच सारखें, कारण माझें धर्माविषयीं मत काय आहे तें तुम्हांस ठाऊकच आहे. " ख्रिस्ती मिशनरी व हिंदु ब्राम्हण यांची तुलना करतांना त्यांनीं केलेलें विधान असेंच उथळपणाचें व स्वाभिमानशून्यतेचें आहे. ' आफ्रिकेच्या अंतर्भागांत जाऊन परोपकारार्थ झटणारे मिशनरी कोणीकडे आणि रानावनांत बसून अप्पलपोटेपणानें तप करून ईश्वरप्राप्ति करून घेण्यास झटणारे भट कोणीकडे ? ' या त्यांनीं एका पत्रांत काढलेल्या उद्गारावरून त्यांची स्वधर्मीयांविषयीं दृष्टि कशी विकृत झाली होती, व परधर्मीयाविषयीं ते कसे अंध बनले होते याची कल्पना करतां येते. जणूं काय शंकराचार्य, ज्ञानेश्वर, एकनाथ रामदास इत्यादि असंख्य ब्राह्मणांस स्वार्थाशिवाय कांहीं दिसत नसून परोपकार माहीतच नव्हता. वस्तुतः मिशनरी हेच अप्पलपोटे होत. त्यांचा ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्यांत जगावर स्वसंस्कृति लादण्याचा स्वार्थी हेतु आहे. ख्रिस्ती धर्मप्रसाराचें कार्य अजिबात सोडून देऊन मिशनरी लोक परोपकारार्थ झटतील तरच त्यांचा नि:स्वार्थीपणा कोणासहि कबूल होईल.

असो. हरिभाऊंच्या मताविषयीं हें झालें. परंतु हरिभाऊंना जी महाराष्ट्रांत मान्यता मिळाली ती त्यांच्या विशिष्ट प्रकारच्या मतांमुळें नव्हे. म्हणून त्यांच्या मतांविषयीं कोणास पर्वा वाटत नाहीं. त्यांना कादंबरीकार या नात्यानें मान मिळत आहे, व त्या क्षेत्रांत श्रेष्ठ दर्जा प्राप्त करून घेण्याकरितां त्यांचें वाचन, लेखन व चिंतन कसें सतत सुरू होतें, इतरांस

ते या बाबतींत कसें उत्तेजन देत, मनोरंजन व करमणूक हीं नियतकालिकें नांवारूपास आणण्याकरितां ते कशी काळजी वाहत व खटपट करीत, यापासून होतकरू लेखकांनीं पुष्कळ धडा घेण्यासारखा आहे. त्यांनीं स्त्रियांची भाषा आपणास हुबेहूब साधावी म्हणून आपण लिहिलेला या-संबंधाचा भाग ते काशीताईस वाचून दाखवीत. वाङ्मयसेवा हा पैसे मिळविण्याचा हुन्नर नव्हे ही गोष्ट जितकी खरी आहे त्याहूनहि ती हरिभाऊंच्या काळांत अधिक खरी होती. त्यांचें करमणूक पत्र इतकें लोकप्रिय, पण कादंबऱ्यांची विक्री होऊन आलेला पैसा तिलाच चारापाणी मिळवून देण्याकडे त्यांस खर्चावा लागला. त्यांचा स्वभाव अत्यंत प्रेमळ, उदार व लाघवी होता. याची प्रतीति काशीताईस त्यांनीं लिहिलेल्या लांबलचक पत्रांवरून येते. सदर पत्रांस काशीताईकडून आलेलीं उत्तरें त्याबरोबरच प्रस्तुत पुस्तकांत छापलीं असतीं तर हरिभाऊंच्या पत्रांचें मर्म समजणें सोपें झालें असतें. त्या पत्रांच्या अभावीं हीं पत्रें आर्जवीपणाचीं किंबहुना खुशामतीचींहि कित्येकांस वाटण्यासारखीं आहेत. त्याचप्रमाणें हीं पत्रें एकाच व्यक्तीस लिहिलेलीं आहेत त्या ऐवजीं अनेक व्यक्तींस लिहिलेलीं अनेक पत्रें या संग्रहांत वाचावयास सांपडतीं तर हरिभाऊंचें तें एक आत्मचरित्रच बनलें असतें. असें आत्मचरित्र वाचण्याचा योग आज लाभला नसला तरी जीं पत्रें आज वाचकांसमोर आहेत त्यावरूनहि वाचकांस हरिभाऊविषयीं यथार्थ कल्पना येण्यास पुष्कळ मदत होईल यांत शंका नाहीं. अशा प्रकारचीं हीं पत्रें काशीताई कानिटकर यांनीं प्रसिद्ध होऊं दिलीं व तीं साताऱ्याच्या ऐक्य संपादन मंडळानें प्रसिद्ध केलीं याबद्दल उभयतां सारखींच गौरवास पात्र आहेत.

---

## ५६ प्रो. मोडक यांचें चरित्र

(ले. ग. बा. मोडक, बी. ए. प्रकाशक बी. बा. मोडक, कोल्हापूर.)

प्रस्तुत चरित्र, ग्रंथ या नात्यानें लहान व आटोपशीर आहे. चरित्रनाय-काच्या मोठेपणाचें एक लक्षण हें कीं, कोल्हापूरसारख्या मागसलेल्या

शहरीं राहून त्यांनीं आजन्म विद्याव्यासंग व ग्रंथनिर्मिती केली. त्यांचीं शास्त्रीय विषयांवरील २८ व ऐतिहासिक विषयांवरील १८ मिळून ४६ पुस्तकें प्रसिद्ध आहेत. या सर्वांची किंमत एकत्र केली असतां ५०।७५ रु. भरेल. यावरून कै. प्रो. मोडक यांना लहानसा चालताबोलता ज्ञानकोशच म्हणण्यास हरकत नाहीं. मिरज व कोल्हापूर यांचें सान्निध्य लक्षांत घेतां कै. वासुदेवशास्त्री खरे हे एकच गृहस्थ आम्हांला असे दिसतात कीं, त्यांची तुलना प्रो. मोडक यांच्याशीं करणें योग्य होईल.

प्रो. मोडक यांचा जन्म सन १८४७ सालीं ता. २२ मार्च रोजीं झाला व सन १९०६ सालच्या डिसेंबरच्या २ तारखेस ते कालवश झाले. म्हणजे त्यांना पुरतें ६० वर्षेंहि आयुष्य लाभलें नाहीं. इतक्या अल्पावधींत राजाराम हायस्कूल व राजाराम कॉलेज यांतील शिक्षकाचें काम करून उरलेल्या वेळांत त्यांनीं वर सांगितलेल्याप्रमाणें सुमारें ४८ ग्रंथ लिहिले. या ग्रंथांपैकीं सुमारें १० च ग्रंथ १ रुपया किंमतीच्या खालचे आहेत. पण बाकीच्यांतील कांहीं २, ३, ४, ४॥, ५ इतक्या किंमतीचे आहेत. या किंमती देण्याचें कारण इतकेंच कीं, त्यावरून ग्रंथ साधारणत: किती मोठे असतील याची कल्पना येईल.

कोल्हापूरसारख्या ठिकाणीं छापखान्यांची सोय प्रो. मोडक यांच्या वेळीं चांगलीशी नव्हती. तथापि त्यांनीं परिश्रमपूर्वक शिळाछापावरील आपलीं पुस्तकें बरीचशीं सुबक काढविलीं व त्याहून विशेष हा कीं आपल्या शास्त्रीय ग्रंथांतून छापील चित्रेंहि भरपूर घातलेलीं आहेत. ही सर्व कामगिरी त्यांनीं कोल्हापूर येथील आपल्या ३६ वर्षांच्या वास्तव्यांतच केली. ते बुद्धिमान व विद्याव्यासंगी असल्यामुळें राजाराम कॉलेजांत त्यांना प्रोफेसरीची जागा सहजच मिळाली. राजाराम कॉलेजांत प्रोफेसरी करून ज्यांनीं अखंड विद्याव्यासंग चालू ठेवला असे दुसरे गृहस्थ म्हटले म्हणजे प्रो. रघुनाथराव आपटे हे होत. या दोघांच्या नांवाशीं राजाराम कॉलेजाची कीर्ति अखंड निगडित आहे.

प्रो. मोडक यांच्या ग्रंथकर्तृत्वाविषयीं लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, त्यांनीं १८७५ सालीं रसायनशास्त्रावरील टिपणांचा ग्रंथ मराठींत प्रसिद्ध केला व तेथून पुढें शास्त्रीय विषयावरील ग्रंथमालेचा एक आराखडा मनानें तयार करून तो, शास्त्रीय ज्ञानकोशाचा नकाशा हळूहळू एक एक ग्रंथ

लिहून, छापून बहुतेक भरून काढला. 'आपण भले कीं आपलें काम भलें' या न्यायानें जन्मभर वागून त्यांनीं 'अजातशत्रु' हें नांव मिळविलें होतें. सन १९०६ सालीं ते वारले त्या वेळीं लो. टिळकांनीं त्यांच्यासंबंधीं खालील उद्गार केसरींतून प्रगट केले आहेत.

## लो. टिळकांचे उद्गार

"विद्वत्ता, साधें आणि निर्व्यसनी वर्तन हे यांच्या अंगचे मोठे गुण होते. कॉलेज सोडल्यानंतर नोकरीकरितां कोठेंहि राहावें लागलें तरी विद्याव्यासंग कायम ठेवल्यानें एकट्या गृहस्थास काय करतां येईल याचा यांच्या चरित्रापासून तरुण पिढीनें बोध घेण्यासारखा आहे. त्यांनीं ग्रंथलेखनाबरोबर कोल्हापूर येथील सार्वजनिक वाचनालय व सार्वजनिक पेढी म्हणजे बँक व स्वदेशी दुकान यांच्यासंबंधानें पुष्कळ खटपट केली होती. तसेंच पदार्थसंग्रहालय व औद्योगिक प्रदर्शनें यांतहि ते लक्ष घालीत. कोल्हापूर येथें भरलेल्या पहिल्या लोकप्रतिनिधींच्या सभेचें अध्यक्षपद त्यांना देण्यांत येणार होतें व या कामीं त्यांना दरबारची हरकत झाली नसती तर त्यांनीं आपल्या इतिहासज्ञानाचा योग्य उपयोग करून प्रातिनिधिक संस्थांचीं तत्त्वें कोल्हापूरच्या प्रजेला चांगलींच समजावून दिलीं असतीं यांत शंका नाहीं. पण तो योग आला नव्हता. आमच्या दरबारी पेन्शनरांना राजकारणी लोकसेवेचा मान याहून अधिक मिळणें फारसें शक्यच नाहीं. परंतु विद्याक्षेत्रांतील ध्येयें व उद्योग हे संस्थानी दरबारांतहि पुष्कळसे निर्वेध चालू शकतात. यामुळें प्रो. मोडक यांनीं आपलें ग्रंथलेखनाचें काम अव्याहत सुरू ठेवलें होतें. रॉयल केमिकल सोसायटीकडून फेलोशिप मिळाली असतां ती टिकविण्याइतकें द्रव्यसाहाय्य त्यांना नसल्यामुळें ती सोडावी लागली. यावरून श्री व सरस्वती यांचा विरोध त्यांना अनुभवावा लागला. पण त्यामुळें त्यांच्या उद्योगांत खळ पडला नाहीं व यांतील पुष्कळसा उद्योग त्यांनीं पैशापेक्षां विद्येच्याच हौसेनें केला." प्रो. मोडक हे कै. विष्णुशास्त्री यांचे समकालीन होत व शास्त्रीबोवांनीं मोडक यांच्या रसायनशास्त्राचें परीक्षण निबंधमालेंत केलें होतें. त्यांतील खालील वाक्यें लक्षांत ठेवण्यासारखीं आहेतः—

## विष्णुशास्त्र्यांचा अभिप्राय

"भाषापद्धतीसंबंधानें प्रस्तुत पुस्तकास नांव ठेवण्यास बिलकूल जागा

नाहीं. भाषासरणी अगदीं सुबोध आहे. विषय इंग्रजी व प्रौढ यामुळें मोठमोठे संस्कृत शब्द घातले असतां जरी शोभणारे आहेत, तरी वेडगुजरी किंवा आढ्यतेचा प्रकार यांत बिलकुल आणलेला नाहीं. गहन शास्त्रीय विषयांवर सदरील ग्रंथकारानें अगदीं स्वतंत्र रचना केली ही गोष्ट अत्यंत अभिनंदनीय होय. वाचकांना अत्यंत सुलभ प्रवेश कसा होईल व कोणत्या प्रकारांनीं तो मनावर ठसेल या दृष्टीनें स्वतंत्र ग्रंथ अधिक योग्यतेचा ठरतो. ”

पण दुसऱ्याहि एका दृष्टीनें प्रो. मोडक यांची योग्यता आम्हांला विशेष वाटते. ती ही कीं, सुमारें ३० वर्षांपूर्वीच महाराष्ट्र विद्यापीठाची कल्पना त्यांनीं योजून पुढें आणली होती. ही कल्पना मुंबई येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या १९०४ सालाच्या वार्षिक समारंभाच्या वेळीं ते अध्यक्ष होते त्या वेळीं केलेल्या भाषणांत त्यांनीं ही कल्पना जाहीररीतीनें पुढें मांडलीच. पण त्यापूर्वीहि कोल्हापूर, बडोदें येथील दरबार आणि मुंबईचें शिक्षणखातें यांच्यापुढेंहि त्यांनीं ती मांडली होती. त्यांच्यामतें मराठी भाषेंतून शिक्षण देण्याच्या दृष्टीनें विद्यमान ट्रेनिंग कॉलेजांना प्रथम व्हर्नाक्युलर कॉलेजें बनवावीं. डेक्कन एज्युकेशन सोसायटी मूळ निघाली तेव्हां तिचा उद्देश सर्व शिक्षण मराठीच्या द्वारें देऊन विषयपारंगतता सुलभ करावी असा मूळ विष्णुशास्त्री चिपळूणकरांपासून हेतु होता ही गोष्ट प्रो. मोडक यांना पक्की माहीत असल्यामुळें, त्यांनीं डे. ए. सोसायटी व नूतन मराठी विद्यालय यांनीं या कामीं लक्ष घालावें असें सुचविलें होतें. स्वभाषेच्या द्वारें जें शिक्षण मिळतें त्यासच राष्ट्रीयशिक्षण म्हणतां येईल हें त्यांचें ब्रीदवाक्य होतें, व त्यांच्या योजनेप्रमाणें सुमारें १५ हजार मुलांना देशी भाषेंतून उच्च प्रतीचेंहि शिक्षण मराठींतून देतां येईल असा त्यांचा अंदाज होता.

प्रो. मोडक हे भौतिक शास्त्राचे व्यासंगी होतेच, पण ते उपपत्तीपेक्षांहि प्रयोग व व्यावहारिक ज्ञान यांचे पुरस्कर्ते अधिक होते. यामुळें शाळा–कॉलेजांत ते शास्त्रीयप्रयोगांवर फार भर देत इतकेंच नव्हे, तर सुटीच्या दिवसांत ते शास्त्रीय प्रदर्शनें भरवून सामान्य मनुष्यालाहि शास्त्रीय ज्ञान इष्ट वाटून मनोरंजक करावें असा त्यांचा प्रयत्न होता. दुसरे पक्षीं शास्त्रीयज्ञान व्यावहारिक करण्याची खरी हौस असल्यामुळें

त्यांनीं महाराष्ट्राच्या औद्योगिक पाहणीकडेहि बरेंच लक्ष दिलें होतें व या उद्योगांत त्यांनीं कै. नामजोशी यांना बरीच मदत केली होती.

प्रो. मोडक यांच्या ऐतिहासिक ग्रंथासंबंधानें इतकेंच म्हणतां येईल कीं, त्यांचे हे ग्रंथ बरेचसे इतर ग्रंथांच्या आधारानें रचलेले आहेत. तथापि महाराष्ट्रांतील संस्थानांचा इतिहास, विशेषत: कोल्हापूर राज्याचा इतिहास लिहितांना त्यांनीं दरबारी दप्तरांतील कागदपत्रहि पुष्कळ वाचले होते. शिवाय सन १७२८ ते १८९३ पर्यंतची जंत्री त्यांनीं शक, सन, तिथि व तारीख यासुद्धां केली ती अभ्यासकांना विशेष उपयोगी आहे. असो.

अशा रितीने प्रो. मोडक यांच्या चरित्राचें अवलोकन केलें असतां त्यांचा विद्याव्यासंग व दुर्दम उद्योगप्रियता हीं फार चांगलीं नजरेस येतात. या दृष्टींनीं रा. गणपतराव मोडक यांनीं लिहिलेलें आपल्या वडिलांचें चरित्र लहानच असलें तरी तें अत्यंत उपयुक्त व स्फुर्तिदायक असें वाटतें. या चरित्रलेखनाप्रमाणें प्रो. मोडकांच्या कांहीं कांहीं ग्रंथांचें पुनर्मुद्रण होणें ही गोष्ट देखील अत्यंत अवश्य आहे व उभयतां चिरंजीव तीहि गोष्ट करून आपलें पितृऋण फेडतील अशी आम्हांस आशा आहे.

---

## ५७ सह्याद्रीच्या पायथ्याशीं

(ले. विनायक सदाशिव सुखठणकर, ध्रुवप्रकाशनालय, मलबार हिल मुंबई.) या पुस्तकांत ग्रंथकर्त्यानें गेल्या चार वर्षांत लिहिलेल्या आठ लघुकथा आहेत. त्या स्वतंत्र कल्पनेच्या असून त्यांचा विशेष हा कीं, सह्याद्री पर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या गोमांतक प्रांतांतील स्थलांच्या नांवांचा व गोमांतकांतील समाजाच्या चालीरीतींचा उपयोग करून त्या लिहिलेल्या आहेत. म्हणून हें प्रादेशिक नांव त्यांना यथार्थ आहे. सुप्रसिद्ध इंग्लिश कादंबरीकार टॉमस हार्डी यानें आपली जन्मभुमि कौंटी वेसेक्स या प्रदेशाचें ऋण, त्यासंबंधीं अनेक कादंबऱ्या लिहून व त्याशीं वेसेक्सचा नामसंबंध जोडून, फेडलें आहे. कदाचित् त्या कल्पनेवरून सुखठणकर

यांना 'सह्याद्रीच्या पायथ्याशीं' हें पुस्तकाचें नांव सुचलें असावें. कसेंहि असो, ही कल्पना फार चांगली आहे. कोणतीहि कादंबरी घेतली तर तींत कांहीं स्थळें हवींत. तसेंच पात्रांच्या रूपानें का होईना पण वर्णिलेलें, मनोरंजक केलेलें, प्रादेशिक समाजचरित्र असलेंच पाहिजे. अर्थात् उगीच कांहीं तरी काल्पनिक नांवें न घेतां, जर कथानकांत प्रादेशिक भूवर्णन यथार्थ केलें तर, विद्यार्थ्यांना भूगोल हा विषय शिकविण्याचें तें एक उत्कृष्ट साधन होईल. तीच गोष्ट समाजचरित्राची. कथानकांतील गोष्ट वाटेल तितकी काल्पनिक असावी, पण ती सांगतांना त्यांतल्या त्यांत भूगोल व सामाजिक इतिहास हा शुद्ध व यथार्थ स्वरूपांत सांगतां आला तर दुधांत साखर पडण्यासारखें होणार नाहीं काय?

रा. सुखठणकर यांनीं गोमांतकस्थ स्थलवर्णन व समाजवर्णन यांजबरोबर गोमांतकी भाषेचाहि उपयोग मधूनमधून केलेला आहे. त्यामुळें त्या प्रांतांतील वाचकांना आपुलकीचा जिव्हाळा वाटेलच. पण इतर प्रांतांतील मराठी वाचकांनाहि सहजासहजीं गोमांतकांतील अर्ध-कोंकणी मराठी भाषेचा परिचय होईल. या दृष्टीनें वाचक वाचूं लागला म्हणजे, अपरिचित शब्दांवर तो किंचित् अडखळला तरी, एका नवीन मराठी शब्दाचें ज्ञान झालें या आनंदानें त्याचा श्रमपरिहार होईल.

रा. सुखठणकरांच्या कथा सदभिरुचि संभाळून लिहिलेल्या आहेत ही पहिली गोष्ट होय. भाषा साधी आहे. पण कथानकांतील बीजभूत गोष्टींच्या मानानें अवांतर मजकुराचा पसारा प्रमाणाबाहेर वाटतो. 'जाईजुई' ही गोष्ट भावनेनें ओथंबलेली आहे. 'कटु-कर्तव्य' या गोष्टींत गोमांतकांतील एका जुन्या ग्रामसमाजाचा इतिहास असून कथा सरस आहे. 'ताम्रपटा'ची गोष्ट आमच्या मतें मुळींच चांगली साधली नाहीं. पुराणवस्तुसंशोधनाचा त्या गोष्टीला आधार असला तरी, तो संबंध मारून–मुटकून कसा तरी लावला आहे. 'महापुराची शिकवण' या गोष्टींत अगदीं ताजा अनुभव गोविलेला असून त्यांतील नैतिक सत्य हृदयस्पर्शी झालें आहे. तसेंच हल्लींच्या काळीं भरमसाट उपदेश करणारे कांहीं तरुण बाहेर पडतात त्यांचीहि हजिरी नाजूकपणानें घेतली आहे. 'वरंडा' ही गोष्ट लहान असली तरी तींत गोव्यांतील राण्यांच्या बंडाचा इतिहास खूप टिचून भरला आहे. यामुळें ती मनोरंजक होते. 'दुबळी श्रीमंती' ही गोष्ट त्यांत योज-

लेल्या शिकवणीच्या दृष्टीनें स्वतःच दुबळी ठरते. तींतील उन्मत्त श्रीमंताची फजीती याहून कांहीं वेगळ्या व अधिक ठसकेदार रीतीनें वर्णावयास पाहिजे होती. 'पाद्रयाची पुण्याई' ही गोष्ट गोमान्तकस्थ लोकांना खूप हंसवील; परंतु तींत पाल्हाळ फार झालेला आहे. 'वंदे मातरम्' ही गोष्ट चांगली आहे. भूवर्णनासंबंधानें एक गोष्ट नजरेला आली. व ती सदोष असावी असें वाटतें. एके ठिकाणीं 'खळखळणारी खाडी' असें वर्णन केलेलें वाचलें. परंतु समुद्राचें खारें पाणी वर नदींत जेथपर्यंत जातें तेथपर्यंतच तिला खाडी हें नांव देतां येतें. पण त्या जागेची उंची समुद्राच्या सपाटीच्या मानानें फार नसते. यामुळें खाडींत भरती व ओहोटी या दोनहि गोष्टी फारसा आवाज न करतां होतात असें वाटतें. तरी या संबंधानें निरीक्षण करावें. भूवर्णनांत शक्य तेथवर चुका न राहतील अशी खबरदारी घ्यावी. तात्पर्य, प्रादेशिक कथानकें लिहिण्याची ही कल्पना फार चांगली असून इतरांनीं तिचें अनुकरण करण्यासारखें आहे.

---

## ५८ जीवनज्योत

( ले. रामचंद्र जनार्दन जोशी, प्र. परचुरे-पुराणिक आणि मंडळी, मुंबई ). हें कादंबरीवजा पुस्तक वास्तविक नवमतवादि नाहीं; कारण त्यांत एका पुरुषद्वेष्ट्या कट्टया स्वातंत्र्यवादिनी स्त्रीचा अखेर पराभव होऊन ती विवाहाला तयार झाली असें कथानक आहे. पण नवमतवादाला उपांगभूत असें मनोविश्लेषण, शृंगारिक उत्तान वर्णनें कलाविलासाच्या नांवाखालीं खेचून भरलीं आहेत. नायक व नायिका यांच्यामध्यें कॉलेजांतील संगतीपासून मनांत दडविलेलें प्रेम होतें, व अखेर त्यांचा शेवट विवाहांत झाला ही परंपरा स्वाभाविक दिसली तरी एखाद्या चतुर कलावंत कादंबरीकाराला शोभण्यासारखी कांहींच हकीकत किंवा कथानकाची गुंतागुंत तींत नाहीं. त्यांतल्यात्यांत नायक हा संयमी व विवेकी दिसतो; पण नायिका ही अगदीं उथळ मनाची असतां आपण एखाद्या मोठ्या सामाजिक तत्त्वज्ञानाचें संशोधन करीत आहों असा आव आणते. नायक हा नायिकेला प्रारंभीं एका संकटापासून मुक्त करतो असें वाच-

त्यावर पुढें कांहीं गोष्ट रंगेल असें वाचकाला वाटतें. परंतु ती आशा फोल ठरून पुढें सर्व मनाला वीट येण्यासारखें मनोविश्लेषणच आढळतें. पुस्तकांतील भाषेवरून लेखक नवखा आहे हें सहज दिसतें. परंतु त्याच्या तत्त्वज्ञानांत जीवनज्योतीचा खरा प्रकाश नसला तरी लेखणींत मात्र थोडीबहुत जागती ज्योत आहे असें वाटतें. मात्र दुर्दैव हें कीं, अशा लेखणीला असे विषय लाभावे. हें पुस्तक गद्यरूपानें न लिहितां लेखकानें काव्यरूपानें लिहिलें असतें तर त्यांतले पुष्कळ दोष समावून गेले असते. परंतु ध्येय मोठें व दर्शन खोटें असाच या पुस्तकाचा प्रकार झाला आहे. पुस्तकांत कोणतें नक्की प्रमेय लेखकाला सांगावयाचें आहे हें नायकानें नायिकेला लिहिलेल्या अखेरच्या पत्रांत दिसून येतें. तरी त्याच्या परिणतेला शोभेशी करामत करण्याइतकी कल्पकता ग्रंथकाराच्या अंगीं नाहीं. त्याच्या हातून झालें आहे तें इतकेंच कीं, खुलें वाळवंट सांपडलें असतां कांहीं प्राणी त्यावर चोफेर लोळून अंगाचा कंडु शमवतात त्याप्रमाणें मनोविश्लेषणाचें निमित्त करून विविध प्रकाराच्या शृंगारिक कल्पना व वर्णनें हाताला येतील तशीं लिहून ११२ पानांच्या प्रदेशांत त्यानें मनसोक्त लोळण घेतली आहे. असलीं पुस्तकें निर्माण होत जाणें यांत वाङ्मयाची प्रगति आहे असें आम्हाला मुळीच वाटत नाहीं.

---

## ८९ गृहदेवी

(ले. प. स. देसाई, प्रकाशक, सुरसग्रंथमाला पंढरपूर,) या पुस्तकाचे कर्ते रा. प. स. देसाई यांनीं आजवर पुष्कळ कादंबऱ्या लिहिलेल्या असून, त्यांपैकीं कांहीं नांवाजल्या गेल्या आहेत. साहित्यसेवेवर चरितार्थ चालवूं शकणाऱ्या कांहीं थोड्या यशस्वी लेखकांपैकीं रा. देसाई हे आहेत. त्यांनीं कादंबऱ्या पुष्कळ लिहिल्या असल्या तरी त्यांतील ध्येयसूत्र बहुधा एकच म्हणजे हिंदु समाजांतील मध्यमवर्गातील लोकांच्या कौटुंबिक सुखदुःखाची चर्चा. त्यांच्या रूपांतरित कादंबऱ्या ध्येयाच्या दृष्टीनें अर्थातच जमेस धरतां येत नाहींत. सुमारें वीस वर्षांपूर्वी गृहलक्ष्मी या नांवाची एक कादंबरी रा. देसाई यांच्या विदुषी पत्नीनें आपल्या

पतीच्या सहकारितेनें लिहिलेली या किंवा अशाच एका मालेंत प्रसिद्ध झाली होती. तिचें नांव त्या वेळीं बहुतेक साहित्यिकांच्या तोंडीं झालें होतें. असो.

गृहदेवी या कादंबरीचा विषय कौटुंबिक सुखदु:खाची चर्चा हाच असून त्याचें ध्येय नसलें तरी प्रमेय 'गंगा-गौरी-संगम' म्हणजे सवतीविषयीं सहिष्णुता हें निघेल असें वाटतें. मौज ही कीं हल्लीं कित्येक नवमतवादी मासिकांतून या प्रमेयाच्या अगदीं दुसऱ्या बाजूस असणारें प्रमेय रंगविलें जात असतें. एका विद्यमान पत्नीनें पतीवरील प्रेमाकरितां जर सवतीविषयीं सहिष्णुता दाखविणें हें दाक्षिण्य तर एका पतीनें पत्नीवरील प्रेमाकरितां तिच्या प्रियकराविषयीं सहिष्णुता दाखविणें हेंहि दाक्षिण्याखालीं कां येऊं नये असा रोकडा प्रश्न उत्पन्न करण्यासारखा परिणाम या उलटसुलट दिशेनें लिहिलेल्या कादंबऱ्यांचा सहजच होतो. याच्या मुळाशीं खरें पाहतां अशी कल्पना नाहीं कीं, द्विपतित्व किंवा द्विपत्नीत्व हें सर्वश्रेष्ठ किंवा पहिल्या प्रतीचें ध्येय होय. नवमतवादी लेखकहि बहुधा असें म्हणत असावे कीं, मनुष्यस्वभाव हा स्त्रीपुरुष या दोघांनाहि सहज व सामान्य असल्यामुळें आजवर पुरुषांच्या हक्कांचें अवास्तव समर्थन झालें व स्तोम माजलें त्याचा बदला, स्त्रियांच्या हक्कांचें तसेंच समर्थन करून व स्तोम माजवून आम्ही नवमतवादी लोक घेणार! या दृष्टीनें पाहतां रा. देसाई यांनीं 'गंगा-गौरी-संगमाचें' जसें चित्र रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे तसा तो केला नसता तर अधिक बरें झालें असतें. कारण रा. देसाईसुद्धां अनेक पत्नीकत्वाचें मनापासून समर्थन करीत नसतील असें वाटतें. असें असतां एकाद्या अलौकिक स्त्रीच्या दाक्षिण्याचें काल्पनिक श्रेय भरीला घालून वेळ मारून नेण्यांत काय अर्थ? शाकुंतलांत कण्वानें शकुंतलेला सासरीं जातांना उपदेश करतांना 'कुरु प्रियसखीवृत्तिं सपत्नीजने' हा उपदेश केला तो साजून गेला. पण आतां ते दिवस राहिले नाहींत. गंगा-गौरी-संगम या पौराणिक दाखल्याचीहि तीच गोष्ट समजावी. हलाहल विष पिऊन पचविण्याचें वागें जसें पुराणांतल्या पुराणांतच राहील तसाच गंगा-गौरी-संगम या मोहक दाखल्याचें वागेंहि पुराणांतच राहूं दिलेलें बरें नव्हे काय? कोणाहि कादंबरीलेखकानें आपण निष्ठुर ध्येयवादी आहों, किंवा केवळ प्रसंगचतुर प्रमेयसाधक आहों हें मनाशीं नीट ठरवून लिहिलेलें बरें; असो.

रा. देसाई यांची कादंबरी त्यांच्या इतर कादंबऱ्यांप्रमाणेंच अन्य दृष्टीनें वाचनीय आहे. ह्यांत स्वाभाविक प्रसंग वर्णिले असून भाषा साधी पण चटकदार अशी आहे. या कादंबरींतील सवत-प्रकरण वगळलें असतां गृहदेवीचें जें निष्ठावंत चारित्र्य व सत्त्ववृत्ति लेखकानें वर्णिली आहे ती त्या-पुरती तरी नवमतवाद्यांनाहि ग्राह्य वाटेल यांत शंका नाहीं.

---

## ६० मराठी संप्रदाय व म्हणी

( ले. कै. विद्याधर वामन भिडे )

मनुष्यव्यक्तीप्रमाणें मानवी भाषेलाही मनोरचना म्हणून असते, व ही मनोरचना तिच्यांतील संप्रदाय, वाक्प्रचार वगैरेंच्या योगानें व्यक्त होते. व्याकरणाला भाषेच्या शरीरांतील स्नायूंची उपमा दिली, तर संप्रदाय वगैरेंना तिच्या ज्ञानतंतूंची उपमा शोभेल. मानवी मनाची रचना व त्याचा विलास हा जसा शरीरांतील ज्ञानतंतूंच्या द्वारें व्यक्त होतो, त्याचप्रमाणें भाषेच्या मनांतील त्रिगुणांचें मिश्रण, गुणदोष, खुब्या, खांचाखोंचा, क्रीडा व विलास हे संप्रदाय म्हणी वगैरेंवरून बिनचूक ओळखतां येतात. मृतभाषेच्या मनाची क्रिया थांबलेली असते, यामुळें तिच्या वाङ्मयांत नवीन म्हणी किंवा वाक्प्रचार पैदा होत नाहींत; पण सजीव भाषेच्या मनाची स्फुरणक्रिया सदा चालू असल्यामुळें तिच्या वाङ्मयांत या वस्तूंचा संग्रह दिवसेंदिवस वाढतच जातो. सजीव भाषेंतही झालें तरी व्याकरणाची ओढ मागें असते; व्याकरण हें सर्व भाषेस अवश्य असलें तरी तें एकंदरीनें निवृत्तिगुणच आहे; व भाषेला व्याकरणापासून जो उपयोग होतो, त्यापेक्षां निग्रह व विरोधच अधिक सोसावा लागतो. वाक्प्रचार व म्हणी हे प्रवृत्तिगुण असल्यामुळें त्यांचा ओढा पुढें असतो; व व्याकरणाच्या योगानें निगडित झालेल्या भाषेस बाहेर पडून मोकळेपणानें वावरतां यावें आणि स्वतंत्रपणें संचार करून तिला आपलें प्रामव्य मिळवितां यावें, या कामीं त्यांचा फार उपयोग होतो. भाषण व व्यवहार यांजमधील संबंध नित्य व निकट आहे. आपलें नांव, आपली कीर्ति मागें राहावी—स्मरणरूपानें तरी आपण अमर व्हावें—अशी ज्या समाजाची इच्छा असते, त्याचा अविनाशी अशा इतर सर्व साधनांपेक्षां

भाषेवरच अधिक दृढ भरंवसा असतो. भाषा हा इतिहासाचा आरसाच म्हणतां येईल. पण इतिहासाचें प्रतिबिंब पाडण्याची ही शक्ति भाषेंत जर कशाच्या योगानें येते असा प्रश्न विचारला, तर म्हणी व वाक्प्रचार हेंच उत्तर द्यावें लागेल.

संप्रदाय व वाक्प्रचार यांच्या योगानें भाषेची स्वातंत्र्यबुद्धि, प्रसरणशीलता व अर्थ व्यक्त करण्याच्या कामीं तिजकडून योजण्यांत येणाऱ्या हरतऱ्हेच्या खुब्या या तर दिसून येतातच; परंतु कित्येकांच्या अर्थामध्यें इतिहासाचें बीज संग्रहीत झालें असल्यानें त्यांजवरून ती भाषा बोलणाऱ्या लोकांचा इतिहास कळण्यासही मदत होते....

ही गोष्ट उदाहरणें देऊनच व्यक्त करावयास पाहिजे असें नाहीं. ती सर्वांच्या अनुभवास येणारीच आहे. जगांत असें कोणतेंही राष्ट्र नाहीं अगर भाषा नाहीं, कीं जीमध्यें म्हणी बनलेल्या नाहींत. कित्येक भाषेंत तर जवळ जवळ जितके शब्द तितक्या म्हणी आहेत कीं काय असें वाटतें ! स्पॅनिश भाषेंत तीस हजार व जर्मन भाषेंत सुमारें एक लक्ष म्हणी आहेत असें म्हणतात. निवळ मराठी अशा म्हणी सुमारें पांच हजारांवर सांपडतील कीं नाहीं याची शंका वाटते; परंतु त्याचें एक कारण, वर एके ठिकाणीं दर्शविल्याप्रमाणें, संस्कृताची मराठी भाषेवर असलेली छाप हें होय. संस्कृतापासून मराठी भाषा अगदीं वेगळी झाल्यास आज जीं कांहीं शतकें लोटलीं, त्यांपैकीं बऱ्याच काळांत गद्यमय मराठी वाङ्मयाचा प्रायशः अभावच होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि वाङ्मय पद्यमय असलें म्हणजे त्यांत म्हणी अगर संप्रदाय यांचा उपयोग सहसा करतां येत नाहीं व केल्यास थोडाबहुत वाईटच दिसतो. गेल्या पांच सहा शतकांतील मराठी कविता मुख्यतः धर्मविषयपर असून तिचा मूलाधार म्हटला म्हणजे वेदान्त वगैरे गहन विषयपर संस्कृत ग्रंथ व पुराण इतिहास असल्यामुळें निवळ मराठीस धरून असलेले वाक्प्रचार अगर म्हणी यांची वाढ होण्यास पहिल्या दर्जाच्या ग्रंथकारांकडून कां मदत झाली नाहीं याचें कारण कळून येण्यासारखें आहे. उलटपक्षीं, जेथें संस्कृत ग्रंथाचा अगर वेदांतासारख्या विषयांचा निकट संबंध सुटून कवितेस अधिक सार्वजनिक असें रूप आलें; म्हणजे रामदास, तुकाराम, अनंतफंदी व रामजोशी—यांच्या कवितेंत संप्रदाय व म्हणी यांचा अधिक उपयोग केलेला आढळून येतो. मात्र मराठी

म्हणींच्या जोडीला संस्कृतांतील लौकिक न्याय व सुभाषितें हींहि आमचींच असल्यामुळें त्यांचाही आम्हांस मराठी भाषेंत सररास उपयोग करतां येत असे, व अजूनही येतो; यामुळें केवळ मराठी म्हणी व संप्रदाय यांचा तुटवडा फारसा भासत नाहीं.

असो. म्हणी, संप्रदाय व वाक्प्रचार यांचा सकृद्दर्शनीं एकाच ग्रंथांत समावेश केलेला आढळतो व कित्येक प्रसंगीं त्यांतील परस्पर भेद खरोखर इतका सूक्ष्म असतो कीं, विवक्षित शब्दसमूहास म्हण हें नांव द्यावें, किंवा त्यांस संप्रदायाच्या सदराखालीं घालावें, अथवा वाक्प्रचाराखालीं त्याचा समावेश करावा, हें बिनतोड सांगणें फार कठीण असतें. परंतु एवढ्या गोष्टीवरून त्यांच्या दरम्यान मुळीं स्वरूपतः कांहीं भेदच नाहीं असें मात्र नाहीं. उदाहरणार्थ, संप्रदाय व वाक्प्रचार हे दोन शब्द रा. आपटे व रा. भिडे यांनीं एकाच वस्तूकरितां व जवळ जवळ एकाच अर्थानें घातलेले आहेत. पैकीं संप्रदाय हा शब्द सुटसुटीत व एकावयवी असल्यामुळें लोकांच्या तोंडांत अधिक बसण्याचा संभव आहे. उलटपक्षीं संप्रदाय हा शब्द चाल किंवा प्रघात या अर्थीं भाषेप्रमाणें इतर व्यवहारासही लावतां येत असल्यानें, ज्या मानानें त्याचा विस्तार जास्त, त्या मानानें त्याचें व्यवच्छेदकत्व, म्हणजे विशिष्ट अर्थ व्यक्त करण्याची पात्रता कमी असणार हें उघड आहे. व या दृष्टीनें पाहतां वाक्प्रचार हा शब्द प्रस्तुत प्रकरणीं अधिक समर्पक आहे असें आम्हांस वाटतें. परंतु हे दोनहि शब्द इंग्रजींतील ‘ Idiom ’ या शब्दाचें भाषांतर करण्याच्या विशिष्ट हेतूनें बनविले आहेत हें उघड आहे. संस्कृतांत तद्वाचक शब्द असेल, पण निदान आम्हांस तरी तो माहीत नाहीं. संप्रदाय किंवा वाक्प्रचार हे दोन्हीहि एका अर्थानें अपवादात्मक होत; म्हणजे व्याकरण किंवा शब्दार्थ किंवा वाक्यरचना किंवा वाक्यार्थ यांजविषयीं असलेल्या सनातन नियमांचें उल्लंघन करून जाणारे परंतु रूढी किंवा पुनरुक्ति यांच्यामुळें सर्वसंमत झालेले असे विशिष्ट प्रकार होत. असले इतर विशिष्ट प्रकार दाखविणारे दोन पारिभाषिक शब्द अपवाद व निपातन हे संस्कृतांत आहेत. व त्यांतल्यात्यांत पाहिलें तर अपवादापेक्षां निपातन हाच शब्द आम्हांस प्रस्तुत विषयांत अधिक उपयोगी पडण्यासारखा आहे. अपवाद व नियम हे परस्पर पूर्णता आणणारे अन्योन्यावलंबी आहेत. परंतु निपा-

तन हे स्वतंत्र व यदृच्छेनें बनलेले असतात. अपवादांचें वर्गीकरण करतां येतें, अपवाद हा जरी नियमांचें उल्लंघन करणारा असतो तरी अपवाद हे सुद्धां स्वतः नियमबद्धच असतात. किंबहुना मूळ नियम व अपवाद हे दोनही मिळून तिसरा एक स्वतंत्र नियम बनवितां येतो. अपवादास पोटनियम म्हटलें तरी चालेल. परंतु निपातन हे अनियमित असून त्यास कारण सांगतां येत नाहीं. किंवा एका निपातनासारखें दुसरें एखादें निपातन हटकून आढळेल असेंहि नाहीं. व या दृष्टीनें पाहतां वाक्प्रचार व सांप्रदाय हे निपातना जवळजवळ येतील.

संप्रदाय हे भाषेच्या सर्व अंगांशीं व उपांगांशीं इतके जखडून गेलेले असतात कीं, शब्दार्थ, शब्दरचना, वाक्यरचना, वाक्यार्थ व व्याकरणाचे नियम यांपैकीं प्रत्येकाचें उल्लंघन संप्रदायानें केलेलें आढळतें; व हें उल्लंघन करण्यास सर्व प्रकारच्या शब्दशक्ति म्हणजे अभिधा, लक्षणा व व्यंजना, आणि रूपक, उपमा, अतिशयोक्ति आदिकरून सर्व प्रकारचे अलंकार यांची मदत त्यांनीं घेतलेली आढळते. प्रत्येक भाषेचा स्वभाव इतर भाषांच्या स्वभावाहून वेगळा असतोच. परंतु सर्वसाधारण व्याकरण-शास्त्राला अपवादभूत असे जे भाषेचे गुण अथवा वैलक्षण्य याचा आप-ल्यास प्रस्तुत विचार कर्तव्य नाहीं. तर एखाद्या भाषेच्या पोटांत कित्येक प्रसंगीं तिचे नियम संभाळून व कित्येक प्रसंगीं जरूर तर तिचे नियम उल्लं-घून अर्थाचा फैलाव अथवा त्याची गहनता अधिक करण्याकरितां निपा-तनरूपी जे विशिष्ट प्रकार रूढ होतात, त्यांचाच समावेश संप्रदाय व वाक्प्रचार हे शब्द रूढ झाले असतां त्यांच्या खालीं करण्यांत येईल. म्हण या शब्दासंबंधानें मात्र अशा प्रकारची अर्थनिर्णयाची अडचण पडत नाहीं. म्हण या मराठी शब्दाला आभाणक हा संस्कृत प्रतिशब्द सांपडतो. तथापि आभाणक हा शब्द फारसा प्रचलित नाहीं, व म्हण हा शब्द मरा-ठींत फार दिवसांपासून चालत आलेला असून सर्व दर्जाचे लोक त्याचा सारखाच उपयोग करतात. संप्रदायांत जसें वैलक्षण्य असतें तसें म्हणीमध्यें असत नाहीं.

संप्रदाय अथवा वाक्प्रचार व म्हणी यामध्यें एक समान गुण आहे; तो हा कीं, या दोहोंस रूढीची जरूरी असते. म्हणजे असें कीं, त्या दोहों-चाही बहुजनसमूहानें स्वीकार केलेला असावा लागतो. असा स्वीकार

झालेला असला तरच तो वाक्प्रचार किंवा ती म्हण ह्यांचा त्या त्या प्रसंगीं व त्या त्या अर्थानें उपयोग होऊं शकतो. वाक्प्रचार आणि म्हण ह्या दोहोंत आणखीही एका बाबतींत साम्य आहे. ती बाबत ही कीं, त्या दोहोंतहि परिवृत्त्यक्षमत्व असतें, म्हणजे त्यांत कोणत्याही प्रकारचा फेरबदल करणें शक्य नसतें. एका शब्दाबद्दल दुसरा त्याच अर्थाचा शब्द, किंवा एका प्रत्ययाबद्दल त्याच अर्थाचा दुसरा प्रत्यय घालणें अशक्य असतें. इतकेंच नव्हे, तर त्यांतील शब्दांचीं स्थानें बदलणें देखील शक्य नसतें. उदाहरणार्थ, 'पाठीस लागणें' ह्याचा अर्थ अभिनिवेशपूर्वक धरणें किंवा अनुसरणें असा होतो. परंतु पाठीला लागणें ह्याचा अर्थ शरीराचा जो पृष्ठभाग त्याशीं संलग्न होऊन राहाणें असा होतो. तसेंच 'पांचा मुखीं परमेश्वर' किंवा 'पिंडीं तें ब्रह्मांडीं' किंवा 'जनीं जनार्दन' ही म्हण घेतली तर तींत यत्किंचित् फेरबदल करणें शक्य नाहीं असें आपणांस दिसून येईल. वाक्प्रचार आणि म्हणी ह्यांची रूढीमध्यें प्राणप्रतिष्ठा असते, व त्या दोहोंचेहि ठायीं परिवृत्त्यक्षमत्व असतें. ह्या दोन बाबतींत त्यांच्यांत साम्य आहे. परंतु त्यांच्यांत साम्यापेक्षां भेदाच्या बाबती ज्यास्ती आहेत. पहिला भेद असा कीं, वाक्प्रचार हा एकादा तुटक शब्द किंवा शब्दसमूह असतो; अर्थात् तें संपूर्ण वाक्य नसतें. म्हण ही नेहमीं वाक्यात्मक असते. कित्येक म्हणींत जरी प्रत्यक्ष क्रियापद उक्त नसतें तरी तें गृहीत घेतल्यासारखें असून तें कोणतें याविषयीं शंका असण्याचा संभव नसतो. अर्थात्, वाक्प्रचार हा जरी स्वतः एका दृष्टीनें बंदिस्त असला, तरी त्याचें तोंड खुलें व उपयोग करणाराचे हातीं असतें. उलटपक्षीं, म्हणीचें तोंड बांधलेलें असून एकाद्या मांठीव चिन्याप्रमाणें ती अखंड म्हणजे जशीची तशीच उपयोगांत आणण्याची असते. एक भेद असा दाखवितां येईल कीं, संप्रदाय व वाक्प्रचार यांजमध्यें अवयवीभूत शब्द प्रायः लाक्षणिक अर्थानें योजलेले असतात. अथवा मागें सांगितल्याप्रमाणें त्यांच्या पोटांत एकादा ना एकादा तरी अर्थालंकार असतो. परंतु, म्हणींतील शब्द केवळ त्यांच्या यौगिक अर्थानेंच उपयोगांत आणलेले असतात, त्यांत लक्षणेचा प्रकार असत नाहीं; व असें होण्याचें कारण आमच्या मतें असें आहे कीं, अर्थविस्तार करण्याच्या अवश्यकतेमुळें शब्दांचे अर्थ बदलावे लागून अथवा निपा-

त्यांचा अंगीकार करून गरज भागवून घ्यावी लागते; थांबतां येत नाहीं. केवळ यौगिक अर्थानेंच शब्द वापरून व व्याकरणाचे नियम न उल्लंघितां लिहिण्याची किंवा बोलण्याची इच्छा करणारांस आपला नियम मोडल्याशिवाय दहा पांच वाक्यें तरी लिहितां बोलतां येतील किंवा नाहीं, याची शंकाच आहे. अरुंद पायवाटेवर एका पायावर चालण्याइतकें तें अवघड आहे. दिल खुला करून, कल्पना पल्लवित होऊं देऊन, अर्थविस्तार करून ज्याला बोलावयाचें असेल, त्याला लक्षणा या शब्दशक्तीचा आणि बीजभूत अलंकाराचा फायदा करून घेतल्याशिवाय, म्हणजे संप्रदायांचा उपयोग केल्याशिवाय, मुळींच चालावयाचें नाहीं. म्हणींचें तसें नाहीं. म्हणींचा उपयोग लिहिण्याबोलण्यांत करणें किंवा न करणें, हें सर्वस्वीं ऐच्छिक असतें. म्हणी या गरम मसाल्याप्रमाणें आहेत. त्यांचा उपयोग केल्याशिवाय भाषेस रुचकरपणा किंवा स्वादिष्टपणा येणारच नाहीं असें नाहीं; परंतु, जे जिव्हालोलुप असतात, चमचमीत, गोड, किंवा फोडणीचे पदार्थ खाल्ल्याशिवाय ज्यांचें पोट भरत नाहीं, अशांच्याच हा मसाला विशेष उपयोगी असतो. पण सात्त्विक अन्न खाणाऱ्या मनुष्यानें हा मसाला केवळ निषिद्धच न मानला तरी, तो त्याचें सेवन विशेष प्रसंगीं व नियमितपणें करितो. लक्षणामूल व अलंकारमूल वाक्प्रचार हे उत्कृष्ट लेखकांच्या किंवा वक्त्यांच्या लेखांत भरपूर सांपडतात. कारण, त्यांशिवाय निर्वाह नसून ते शिष्टसंमत असतात, आणि त्यांच्या उपयोगानें भाषेच्या गंभीरपणाला किंवा उदात्तस्वरूपाला सहसा बाध येत नाहीं; पण म्हणींचा उपयोग ऐच्छिक असून टाळतां येण्यासारखा असतो; उठल्यासुटल्या म्हणीचा उपयोग करणारास लोक ग्राम्यच म्हणतील. नाटकांत प्राकृत भाषा ज्याप्रमाणें स्त्रियांच्या तोंडीं किंवा बोबडे बोल मुलाच्या तोंडीं शोभतात, त्याचप्रमाणें म्हणी ह्या केवळ मध्यम प्रतीच्या व केवळ अशिक्षित नाहीं तरी निम्नशिक्षित मनुष्याच्या तोंडीं आढळतात. सर्वच म्हणी म्हणजे ग्राम्य असतात असें नाहीं. उदाहरणार्थ, 'दैव देतें आणि कर्म नेतें,' 'पर दुःख शीतल,' अशा म्हणींत ग्राम्यता मुळींच नाहीं. परंतु 'चोराच्या हातची लंगोटी,' 'गांवढ्या गांवांत गाढवी सवाष्ण,' 'चांभाराच्या देवाला खेटराची पूजा,' 'बिगाराच्या घोड्याला तरवडाचा फोक,' 'मागून पुढून बापच नवरा,' 'मुंगीला मुताचा

धूर, ' असल्या म्हणी तिखट व गुणकारी असल्या तरी ग्राम्य होते, व म्हणून शिष्ट संभावित लोक त्यांचा उपयोग भाषणांत फारसा करीत नाहींत. ही गोष्ट मराठीप्रमाणें इंग्रजी वगैरे भाषांसही लागू आहे. ' लॉर्ड चेस्टरफील्डचीं आपल्या मुलांस पत्रें ' या नांवाचा ' शिष्टसंप्रदाय ' या विषयावरील ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यांत म्हणींचा उपयोग भाषणांत करणें हें संभावितपणाचें लक्षण नाहीं, असें म्हटलें आहे. व इंग्रजींतील चांगल्या वक्त्यांच्या किंवा लेखकांच्या भाषणांत अगर लेखांत ज्यास आपण म्हणी म्हणतों अशांचा उपयोग केलेला आढळणार नाहीं. याहून आणखी एक भेद म्हणी व वाक्प्रचार यांजमध्यें आहे; तो हा कीं, म्हणींमध्यें कित्येकवेळां यमक साधलेलें असतें. परंतु वाक्प्रचारामध्यें केवळ एकेरी कल्पना असल्यामुळें यमक असत नाहीं. व्यवच्छेदकत्वाचा हा मुद्दा अर्थात् विशेष महत्त्वाचा नाहीं. कारण, म्हणीस यमक हें केवळ आगंतुक आहे व त्यापासून अर्थात बदल होतो असें नाहीं.

कित्येक वाक्प्रचारांत शब्दरचनेचा विशिष्ट अनुक्रमच रूढ असतो, व यामुळें तो अनुक्रम बदलला कीं संप्रदाय बिघडतो, व क्वचित् अर्थहि विपरीत होतो. उदाहरणार्थ, 'रामभाऊंच्या डोक्यांत एकदां जें शिरलें तें काढून टाकणें महा कर्म कठीण आहे.' ह्या वाक्यांत महा कठिण कर्म असा अनुक्रम वाक्प्रचाराच्या उलट आहे. तसेंच 'पोट पाठीस लागलें आहे.' या शब्दांचा अर्थ व ' पाठीस पोट लागलें आहे ' या शब्दांचा अर्थ, या दोहोंचा अर्थार्थी कांहींच संबंध नाहीं. कारण, पहिल्यांत पाठीस या शब्दाचा उपयोग लाक्षणिक असल्यामुळें पोटास मिळविण्याकरितां उद्योग करण्याची आवश्यकता आहे असा अर्थ होतो; व दुसऱ्या शब्दसमूहांत शब्दांचा अर्थ यौगिक असल्यामुळें रोडलेल्या शरीरस्थितीचें तें वर्णन होतें. तसेंच, जोड शब्दांतहि सांप्रदायिक अनुक्रम राखावा लागतो. कानाकोपरा असें आपण म्हणतों; परंतु कोंपरा काना म्हटलें तर चूक होईल. त्याचप्रमाणें ताळमेळ, चीजवस्त, दिवाबत्ती, चूकभूल, गुरेंढोरें वगैरे जोडयांच्या ऐवजीं मेळताळ, वस्तचीज, बत्तीदिवा, भूलचूक, ढोरेंगुरें, असें म्हणणें चूक होईल. तसेंच, “ पायांत जोडा घालणें ” व “ जोडयांत पाय घालणें,” “ बोटांत आंगठी घालणें” व आंगठींत बोट घालणें, या निरनिराळ्या शब्दसमूहांच्या अर्थामध्यें भेदाची जी सूक्ष्म छटा आहे, ती

सज्ज मनुष्यास तेव्हांच कळते. हा प्रकार अर्थात् इंग्रजींतहि आहे. उदाहरणार्थ, इंग्रजींत बोलणारानें He and I असें म्हणावें I and he असें म्हणूं नये. A foot असें म्हणावें, On the foot असें म्हणूं नये, रद्द झालेल्या कायद्याला Dead letter म्हणावें, पण अमलांत असलेल्या कायद्याला Living letter म्हणूं नये, Stare one in the face असें म्हणावें, Stare in one's face असें म्हणूं नये; अशी रूढीनें नियंत्रणा लावून दिली आहे. व कोणत्याहि भाषेंत झालें तरी काय, असे जुलमी संप्रदाय असण्याचें कारण रूढी ही वेदाप्रमाणें स्वतःप्रमाण आहे. परतःप्रमाण नाहीं, हेंच होय. इंग्रजीमध्यें संप्रदायास Idiotism असा एक शब्द आहे; व वाक्प्रचारांस त्यांचा जुलमी स्वभाव, अविवेकशीलता दुर्विनीतत्व हे गुण लक्षांत आणूनच हें नांव दिलेलें असावें असें वाटतें.

आतां म्हणींसंबंधानें दोन शब्द सांगून हें विवेचन संपवूं. म्हण हा शब्द स्वतः इतका सोपा आहे कीं, त्याची व्याख्या करणें हेंच अविचाराचें होईल. म्हणी एकवाक्यात्मक द्विवाक्यात्मक किंवा अनेकवाक्यात्मकही असतात. उदाहरणार्थ, 'एका हातानें टाळी वाजत नाहीं,' ही एकवाक्यात्मक, 'गाढवा पुढें वाचली गीता, कालचा गोंधळ बरा होता,' ही द्विवाक्यात्मक आणि 'खिळ्यासाठीं नाल गेला, नालासाठीं घोडा गेला, घोड्यासाठीं स्वार गेला,' ही अनेकवाक्यात्मक म्हण होय. म्हणीस वाक्प्रचाराप्रमाणें रूढीचाच आधार असतो. जी अनेक वेळां म्हटली तीच म्हण स्पॅनिश भाषेमध्यें 'Refrans' असा म्हण ह्या अर्थी शब्द आहे. तो व इंग्रजी Refrain हा शब्द एकच धातूपासून निघालेला असून त्या मूळ धातूचा अर्थ पुनः पुनः उच्चार करणें असा आहे. डॉ. जॉन्सन यानें Proverb या शब्दाची व्याख्याही 'Sentences frequently repeated by people' अशीच दिलेली आहे. पण यावर असा प्रश्न स्वाभाविकपणेंच उत्पन्न होतो कीं, कांहीं विशिष्ट वाक्येंच लोक पुनः पुनः कां म्हणतात ? त्यांचा लोकांना इतका मोह पडावा, इतकें प्रेम वाटावें, असे त्यांच्यांत गुण कोणते ? याचें उत्तर सोपें आहे. कोणत्याही म्हणीच्या अंगीं दोन चार मुख्य गुण असतात. एक तर म्हणीमध्यें कांहीं तरी बोधपर, ज्ञान देणारा, असा अर्थ असावा लागतो. कारण, निरर्थक शब्दसमूह कोण

लक्षांत ठेवील ? पण एकादा शब्दसमूह केवळ ज्ञानप्रद असल्यानें तो म्हणीचा मान पावत नाहीं. कारण, ज्ञान झालें तरी तें वेडयावांकडया, लांबलचक व बेसूर शब्दांत सांठविलें असलें तर तें लोकांच्या आदरास तितकें पात्र होत नाहीं. म्हणून तेंच ज्ञान थोडक्या शब्दांत सांगितलेलें असावें लागतें. सूत्रें जशीं पाठ करण्यास सोपीं, तशा म्हणी तोंडांत राहण्यास सोप्या असतात. परंतु बोधप्रद असा शब्दसमूह नुसता सुटसुटीत असून भागत नाहीं, त्यांत कांहीं तरी चमत्कारिक अर्थ किंवा साधाच अर्थ परंतु तो चमत्कारिक रीतीनें मांडलेला असावा लागतो.

म्हणींच्या ठायीं अवश्य असावयास पाहिजेत ह्मणून जे चार गुण आम्हीं वर सांगितले, तेच थोडक्यांत सांगावयाचे तर आम्ही असें म्हणूं कीं, म्हण हें चिमुकलें, चतुरपणाचें, चटकदार वचन. ह्या चकारांनीं उपलक्षित असल्याशिवाय कोणतेंहि वचन म्हण ह्या संज्ञेस पात्र व्हावयाचें नाहीं. [ अपूर्ण ]

---

## ६१ मतिविकार

" In poets as true genius is but rare,
True taste as seldom is the critic's share,
...............
Each might his several province well command;
Would all but stoop to what they understand. "
—Pope,

माझे मित्र रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचें चवथें व नवीन नाटक 'मतिविकार' हें प्रसिद्ध होऊन व त्याचे प्रयोग रंगभूमीवर होण्यास पुण्याबाहेर सुरुवात होऊन बरेच दिवस झाले. नाटककार 'कोल्हटकर' व नाटकाचा विषय 'विधवाविवाह' असल्यामुळें त्याजवर या पूर्वींच टीका यावयास पाहिजे होत्या. कारण दोघांचेंहि महत्त्व तसेंच आहे. परंतु पुणें मुक्कामीं कोणत्याहि नवीन नाटकाचे प्रयोग झाल्याखेरीज त्याजवर मान्यामान्यतेचा शिक्का अगर छाप सहसा पडत नाहीं असा नेहमींचा अनुभव

आहे; व तोच याहि प्रसंगीं खरा ठरला. सदर नाटकाचे येथें एक दोन प्रयोग झाल्याबरोबर लोकमत निरनिराळ्या द्वारांनीं बाहेर पडूं लागलें. सुशिक्षित व नाट्यकलालोलुप अशा लोकांत त्याची चर्चा होऊं लागली; आणि स्थानिक वर्तमानपत्रांतून कांहीं नुसती टीकाकारांस उत्तेजनपर आव्हानें तर कांहीं टीका करण्याचीं धमकीचीं वचनें अगर प्रतिज्ञा, व कांहीं प्रत्यक्ष टीका अशा प्रसिद्ध झाल्या. परंतु मनाजोगी अशी टीका कोठेंच पहाण्यास सांपडली नाहीं. 'मनाजोगी' म्हणजे माझ्या स्वतःच्या मतांशीं मतें जुळणारी अशी नव्हे; तर समर्पक, भरपूर, सर्वांगपरामर्षी व निःपक्ष-पाती अशी. आजपर्यंत झालेल्या टीकांमध्यें कोठें नुसत्याच विषारी शिव्या तर कोठें टीकेच्या नांवाखालीं निव्वळ एकदेशीय धर्ममतांचें प्रतिपादन, अशीच गोष्ट दृष्टीस पडली. एका टीकाकारानें तर, स्वतःस टीका करण्याचें सामर्थ्य नाहीं हें लोकांचे निदर्शनास येईल ही गोष्ट लक्षांत न येतां, "अरे हा नाटककार इतका माजला काय, कीं त्यावर टीका करण्यासहि कोणी धजूं नये!" अशा अर्थाचे उद्‌गार काढून, शतानंदानें जानकी-स्वयंवराचे प्रसंगीं रंगसभेंत जमलेल्या क्षत्रियांस उद्देशून "निर्वीरमुर्वी-तलं?" असा जो प्रश्न विचारला त्याचा अनुवादहि केला आहे. या टीकाकाराचे मताप्रमाणें पाहतां टीका करणें म्हणजे प्रत्यक्ष रणसंग्राम करणें, क्षात्रतेज दाखविणें, घाव घालणें व घाव घेण्यास तयार होणें असें उघड दिसतें. यःकश्चित पुनर्विवाहाचे नाटकावर टीका करण्यास आव्हान करितांना जर सदर टीकाकारानें—अथवा 'टीकेच्छूनें' म्हटलें तर जास्त शोभेल—जुन्या काव्यग्रंथांतील वीर्योत्तेजक, क्षात्रधर्मोद्दीपक असें सर्वोत्तम वचन खर्ची घातलें, तर उद्यां लेखणीच्या रणसंग्रामाऐवजीं खराखुरा रण-संग्राम करण्याचा प्रसंग आला तर लोकांस हांक मारण्यास त्याला कोणतें वचन मिळेल याची थोडी काळजीच वाटते! पण टीका म्हणजे रागाचें प्रदर्शन, अपशब्दभांडाराचें संशोधन, वाक्ताडनाचा विधि, व दोष-दृष्टीचें आविष्करण अशीच जोंपर्यंत समजूत आहे, तोंपर्यंत हें असें व्हावयाचेंच. हा दोष आमच्या देशांतच व आजच्या काळींच आहे असें नाहीं. समकालीन व विशेषतः समव्यवसायी अशा लोकांनीं एकमेकांचे गुणदोष विवेकबुद्धीनें व निःपक्षपातीपणानें पहाण्याची शक्तीच कदाचित्

ईश्वरानें मनुष्यास दिली नाहीं असें वाटतें. मेकॉले यानें Madam D'arblay वरील निबंधांत खालीलप्रमाणें मार्मिक टीका केलेली आहे:—

"The more fervent the passion of each for his subject, the more unlikely is it that they will justly appreciate each other. Many persons who never handled a pencil probably do far more justice to Michael Angelo than would have been done by Gerard Douw, and far more justice to Gerard Douw than would have been done by Michael Angelo. It is the same with literature. Thousands who have no spark of the genius of Dryden or Wordsworth, do to Dryden the justice which has never been done by Wordsworth, and to Wordsworth the justice which we suspect, would never have been done by Dryden, Grey could see no merit in Rasselas, and Johnson could see no merit in the Bard. Fielding thought Richardson a solemn prig; and Richardson perpetually expressed contempt and disgust for Fielding's lowness."

ही मेकॉलेची टीका आपल्याकडेहि बरोबर लागूं पडेल. कोणास आपल्या गुणदोषांचें खरें परीक्षण करून घ्यावयाचें असल्यास त्यानें परीक्षणकालीं मृत तरी असलें पाहिजे किंवा दुसऱ्या देशांत जन्मून दुसऱ्या भाषेंत तरी लिहावयास पाहिजे. कोणतीहि वस्तु फार डोळ्यांजवळ असली म्हणजे दृष्टि—केंद्र (Focus) साधत नाहीं तशांतलाच तर कांहींसा हा प्रकार नसेलना?

असो. अशा स्थितींत मीं कोल्हटकर यांचे 'मतविकारा'वर टीका करण्यास प्रवृत्त झालों आहें, तें त्यांच्या कृतींतील गुण व दोष दोन्ही दाखविले जावेत या हेतूनें. आतां प्रस्तुत लेखक झाला तरी नाटककाराचा समकालीनच आहे व त्यांतल्या त्यांतहि खासगी स्नेहसंबंधानें तर इतरांपेक्षां त्याच्याशीं तो अधिक निकट आहे; असें म्हटलें तरी चालेल. अर्थात् ही दृष्टिकेंद्राची अडचण त्याच्याहि मार्गांत न येईल, कशावरून? त्याचेंहि परीक्षण याच कारणामुळें दूषित होणार नाहीं कशावरून? असा प्रश्न स्वाभाविकपणेंच उपस्थित होणार. परंतु टीकाकाराच्या नजरेपुढें हा प्रश्न उभा असला म्हणजे तेवढ्यानेंच बहुतेक कार्यभाग होण्यासारखा असतो. नेहमीं टीकाकारांचें चुकतें कोठें याविषयींची कल्पना त्यांच्या मनांत

जागरूक असली म्हणजे ती चूक सहसा त्याचे हातून होणार नाहीं असें गृहीत घेऊन चालण्यास हरकत नाहीं असें मला वाटतें. रा. कोल्हटकर यांस आज कोणी कितीहि नांवें ठेविलीं तरी त्यांची ग्रंथकार या नात्यानें जी योग्यता आहे ती पुढें मराठी भाषेच्या नाट्यविषयक भागाच्या इतिहासकारास नाकबूल करतां येणार नाहीं. कोल्हटकर यांजपेक्षांहि अधिक सरस नाटककार पुढें निपजोत अशी माझी इच्छा आहे व निपजतील असा भरंवसाहि आहे. परंतु आजच्या स्थितींत तरी त्यांस मराठी भाषेचे मोलिअर किंवा कॉरनेली, किंवा ॲरिसस्टोफेनीस किंवा शेरिडन किंवा कॉंग्रीव्ह म्हणण्यास हरकत आहे असें मला वाटत नाहीं.

'मतिविकार' नाटकाचे प्रस्तावनेंत रा. कोल्हटकर यांनीं वाचकवर्गास आपल्या नाट्यलेखनव्यवसायाविषयीं थोडीशी माहिती दिलेली आहे तिजवरून असें दिसून येतें कीं, त्यांनीं सुमारें दहा वर्षांपूर्वीं स्वतंत्र नाटकें लिहिण्याचा संकल्प केला; व आजपर्यंत प्रसिद्ध झालेलीं व रंगभूमीवर आलेलीं त्यांचीं चारहि संगीत नाटकें या संकल्पास अनुसरून आहेत. यापैकीं प्रत्येक नाटक लिहितांना त्यांनीं एक एक विशिष्ट हेतु मनांत धरिला होता व तो हेतु साधण्याकरितां त्या त्या नाटकांतील रचना व मांडणी त्यांनीं मुद्दाम केली. एका नाटकाचा विषय 'विधुरविवाह,' तर दुसऱ्याचा 'विधवाविवाह;' एकाचा विषय 'पुरुषास पशुवृत्तीप्रत पोंचविणारें व्यसन' तर दुसऱ्याचा 'स्त्रियांस देवतापदाप्रत नेणारें शिक्षण' हा होता. हे चारहि हेतु एकत्र केले असतां त्यांची एकवाक्यता करतां येण्यासारखी आहे, व अशा एकवाक्यतेपासून निघणारा संकीर्ण स्वरूपाचा हेतुहि फार उदात्त आहे. हा हेतु म्हटला म्हणजे स्त्रीपुरुषांनीं सुशिक्षित व सद्गुणी बनून व वैवाहिक स्थिति ही अवश्य आदरणीय अशी गोष्ट मानून, या जगांत प्रवृत्तिप्रवण राहून संसारसुख घ्यावें, अशा प्रकारचा बोध करणें हा होय. या बोधापैकीं सद्गुण व स्त्रीशिक्षण यांच्या प्रशंसनीयतेबद्दल मुळींच कधीं कोणाचा मतभेद होण्याचा संभव नाहीं; परंतु प्रत्येक विधुरानें होतां होईतों पुन्हां लग्न करावें अगर प्रत्येक विधवेनें पुनर्विवाह करावा असा सर्वसाधारण बोध करण्याचा जर रा. कोल्हटकर यांचा हेतु असेल, तर मात्र

कित्येकांचा या बाबतींत त्यांच्याशीं मतभेद होण्याचा संभव दिसतो. मतभेद इतकाच कीं, वैवाहिक स्थिति हीच मनुष्याच्या चरित्रांतील सर्वोत्कृष्ट स्थिति मानावी ? किंवा दुर्दैवानें पति अगर पत्नी नष्ट झाली असतां, विधवा व विधुर यांनीं, प्रेम ही पवित्र वस्तु मानून व आजन्म अविवाहितच राहून उरलेलें आयुष्य, अशा विकल स्थितींतहि करतां येण्यासारख्या सत्कृत्यांत घालवून, शरीरभोगेच्छेपेक्षां कर्तव्यप्रेमच अधिक चांगलें असें जगास दाखवावें ? या दोन्ही पक्षांत साधक बाधक अशीं बरींच प्रमाणें आहेत, परंतु अंतिम इष्ट Ideal म्हणूनच जर कांहीं शिकवावयाचें तर ते पहिल्या प्रकारापेक्षां दुसऱ्या प्रकारचेंच शिकविलेलें अधिक बरें नव्हे काय ? असा स्वाभाविकपणेंच प्रश्न उपस्थित होतो. रा. कोल्हटकर यांनांहि या दोहोंपैकीं अधिक चांगलें असें अंतिम इष्ट कोणतें असा प्रश्न केला तर, मला वाटतें तेहि असेंच उत्तर देतील कीं, पुनर्विवाहाची खटपट न करतां अविवाहित राहूनच जीविताचा अन्य रीतीनें उपयोग करण्यांत आला तर अधिक चांगलें. विधुरानें पुनः लग्न करण्यासंबंधानें तर 'मतिविकारांतील' 'मनोहरा'चे तोंडून कोल्हटकर-कर यांनीं "विधुराला प्रेमाची तहान भागविण्यास विवाहाकडेच धांव घेतली पाहिजे असें नाहीं" असेंच वदविलें आहे. तथापि, जगांतील साधारण प्रतीच्या किंवा शेंकडा ९०।९५ लोकांस संसारसुखाचा त्याग करवत नाहीं, व याकरितां जी मोकळीक आज पुरुषास दिली जाते तीच स्त्रियांसहि द्यावी इतकेंच काय तें कोल्हटकरांचें म्हणणें असेल, म्हणजे पुनर्विवाहाची प्रशंसा वरील विचारांनीं अवश्य मर्यादित करतां यावी ही गोष्ट त्यांस कबूल असेल असें मला वाटतें.

रा. कोल्हटकर यांच्या नाट्यलेखनाचे हेतूंचे प्रशंसनीयतेविषयीं याहून अधिक लिहिण्याचें कारण आहेसें वाटत नाहीं. तथापि, त्यांच्या हेतूंचे सफलतेविषयीं मात्र दोन शब्द सांगणें जरूर आहे. या दृष्टीनें प्रथमतः त्यांचे नाटकांचे नांवाविषयीं विचार करूं. या आधुनिक नाटककारास व कवीस विरोधाभासाइतका दुसरा कोणताच अलंकार आवडत नाहीं हें त्याच्या लेखांवरून सहज सिद्ध करून दाखवितां येण्यासारखें आहे; व त्यानें आपल्या नाटकांस दिलेलीं नांवें व त्या नाटकांचे विषय हे एकत्रपणें विचारांत घेतले असतां नाटकांचीं नांवें ठेवतांनाही त्याचे हातून कदाचित्

नकळतपणें याच अलंकाराचा प्रयोग झाला कीं काय असें क्षणभर वाटतें. कोणत्याहि ग्रंथाचें नांव त्यांतील विषयाचें सूचक असें असावें असा साधारणतः नियम, निदान अनुभव आहे; पण रा. कोल्हटकर यांचा प्रकार वेगळाच दिसतो. ज्या नाटकांतील विषय विधुरविवाह त्या नाटकाचें नांव 'वीरतनय.' वास्तविक नांवावरून, यांतील चिमुकल्या वीरानें केलेल्या तलवार–बहादरीकडे प्रायः लक्ष जातें; परंतु रा. कोल्हटकर यांच्या इच्छेवरून पहातां त्या तलवारबहादुरीपेक्षां, त्यानें आपल्या विधुर पित्यास फिरून विवाह करण्याचे कामीं मदत केली याचेंच कौतुक आम्हीं विशेष करावें असें ठरतें. नंबर दोनचे नाटकाचा विषय व्यसनाधीन झालेल्या मनुष्यास बोध करून परावृत्त करणें असा आहे. परंतु नांव पहावें तों 'मूकनायक'– अर्थात् मनोनुनय व बोध करण्यास मुक्या नायकाची योजना करणें याहून सदर नाटककर्त्याच्या विरोधाभासप्रियतेचें आणखी चांगलें उदाहरण तें कोणतें देतां येणार? तिसऱ्या नाटकाचा विषय स्त्रीशिक्षण; व शिक्षण हा शब्द उच्चारल्याबरोबर मोकळेपणा, खुलेपणा, इत्यादि गोष्टींची भावना हटकून उत्पन्न होते. परंतु या नाटकाचें नांव पहावें तों 'गुप्तमंजूष' म्हणजे गुप्त पेटी. चौथ्या नाटकाचा विषय पुनर्विवाहास प्रतिकूल असलेल्या लोकांचें मत त्याच गोष्टीस अनुकूल होणें असा आहे. आणि पुनर्विवाह ही एक चांगली सुधारणा म्हटली तर वरील प्रमाणें मतांतर होणें हा मतीचा एक प्रकारें **विकासच** म्हणतां येईल. परंतु इतर तीन नाटकांप्रमाणें या नाटकास अद्भुत–रम्य असें नांव न देतां सार्थ असेंच नांव देण्याचा उद्देश उघड दिसत असतांहि त्यांनीं 'मतिविकास' हें नांव न देतां तद्विरुद्ध '**मतिविकार**' हें नांव दिलें. वास्तविक नांवांत काय आहे? परंतु ग्रंथाचें नांव देण्यांतहि सदर नाटककर्त्याच्या रुचीचा विलास दृष्टीस पडतो.

नाटकांचीं कशींहि नांवें असलीं तरी केवळ त्यांपासून हेतु–सिद्धीस अनुकूलता अगर प्रतिकूलता येण्याचा फारसा संभव नाहीं; परंतु एकंदर नाटक पाहून अगर वाचून तरी नाटककर्त्याचा हेतु कितपत सिद्धीस जाण्यासारखा असतो ही पृच्छा मात्र सर्वस्वी सयुक्तिक आहे. एखाद्या नाटकापासून जें कार्य होणें तें नाटककर्त्यानें आपला हेतु अमुक आहे असें सांगून किंवा शपथेवर बजावूनहि होणार नाहीं; तर तें नाटक समग्र

वाचून अगर पाहून त्याच्या परिणामानेंच होणार आहे. व या दृष्टीनें पहातां रा. कोल्हटकर यांचा हेतु व त्या हेतूच्या सिद्धयर्थ त्यांनीं योजिलेलीं साधनें यांचा मात्र पडावा तितका मेळ पडेल असें वाटत नाहीं. वीरतनय नाटकांतील एकंदर कथाभाग विधुरविवाहाचे दिशेनें जितका रोखला जावा असें आपणांस वाटेल तितका तो नाहीं. मूकनायकांत, मद्याचे व्यसनापासून होणारे परिणाम प्रत्यक्ष व ढळढळीत दाखविण्याचा प्रयत्न कांहींसा साधला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं; परंतु गुप्तमंजूषांतील मुख्य विषय स्त्रीशिक्षणच होय असें म्हणणें फारसें सयुक्तिक दिसत नाहीं. सदर नाटकांतील कथाभाग अद्‌भुत-रम्य आहे; परंतु तें नाटक वाचून खालीं ठेविलें असतां अगर पाहून परत निघालें असतां वाचकाचे अगर प्रेक्षकाचे मनावर समुच्चयात्मक, अगर शेवटचाहि, ठसा स्त्रीशिक्षणासंबंधींच असेल असें म्हणणें जड जातें. मतिविकारांत मात्र मुख्य विषय डोळ्यापुढें बराच राहतो; तरी पण या नाटकांतहि विधवाविवाहासंबंधानें सर्वस्वी अनुकूल मतप्राप्ति करून देणाऱ्या विषयाचीच योजना झालेली आहे असें म्हणतां येणार नाहीं. सदहू नाटकावरून रा. कोल्हटकर यांचें स्वतःचें मत पुनर्विवाहास अनुकूल आहे असें निःसंशय दिसून येतें; परंतु त्यांतील कथाभाग, रचना, मांडणी व युक्तिवाद यांनीं पुनर्विवाहाची इष्टता बिनतोड सिद्ध केलेली आहे असें म्हणणें म्हणजे अतिशयोक्तिच होईल.

सदर नाटकांच्या हेतूंचा व त्यांतील विषयांचा मेळ इतक्या सूक्ष्म रीतीनें पाहूं जाण्याचें कारण इतकेंच कीं, हीं नाटकें लिहिण्यांत नाटककारास कांहीं विशिष्ट प्रयोजन साधावयाचें होतें. परंतु अशा प्रयोजनाव्यतिरिक्त सदर नाटकांचा विचार केला असतां केवळ नाटक ग्रंथ या दृष्टीनें पहातां त्यांचें महत्त्व विशेष आहे यांत शंका नाहीं. म्हणजे ग्रंथकर्तृत्वाचे बाबतींत जें प्रयोजन म्हणून कोल्हटकर दाखवितात तें जरी म्हणण्यासारखें साधलेलें दिसत नाहीं तरी, म्हणजे मुख्य हेतु सोडला असतां ज्या दुय्यम प्रतीच्या हेतूंनीं रा. कोल्हटकर यांनींहि चतुर्ग्रंथात्मक वाङ्मय सेवा केली ती, वाङ्मयाचे दृष्टीनें फारच मौल्यवान आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. पुष्कळ वेळां मनुष्याचे हातून जाणून बुजून होणाऱ्या सत्कृत्यापेक्षां त्यास नकळत होणारें त्याचें सत्कृत्य समाजास

अधिक फायदेशीर ठरतें, व रा. कोल्हटकर याचे नाटकांसंबंधानेंहि अशीच गोष्ट झालेली दिसते.

येवढी प्रस्तावना करून आपण 'मतिविकार' नाटकाकडे वळूं. प्रथमतः या नाटकाचे हेतुसंबंधानें विचार करितांना मला काय वाटतें याचा स्थूल निर्देश वर केलेलाच आहे. याच मुद्याचा सूक्ष्मपणें विचार करितांना हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं, मतिविकार नाटकाचा विषय जो विधवाविवाह याच्या इतका वादग्रस्त मुद्दा समाज सुधारणांच्या यादींत दुसरा कोणताच नाहीं. ही वादग्रस्तता ज्या प्रमाणानें अधिक त्याच प्रमाणानें विधवाविवाहाची इष्टता सिद्ध करण्याचें काम अधिक अवघड आहे; व या सुधारणेची तरफदारी किंवा वकिली करितांना रा. कोल्हटकर यांनीं घेतली याहून थोडी अधिक काळजी घेतली असती तर--मला वाटतें--फार चांगलें झालें असतें. कारण साधारणपणें जनमत पहातां तें मतिविकार नाटकास बरेंच प्रतिकूल आहे असें दिसतें. मात्र ही प्रतिकूलता केवळ कांहीं विशेष गोष्टींमुळें या नाटकास चिकटूं पहात आहे. पुष्कळ वेळां असें होतें कीं, कांहीं तरी यःकश्चित् कारणांनीं एखादें नाटक समाजास नापसंत व्हावें आणि मग तें मागें पडलें म्हणजे पडलें. परंतु खुद्द रा. कोल्हटकर यांचेहि दृष्टीनें पाहतां अशा आगंतुक कारणांनीं उत्पन्न झालेल्या अप्रियतेपासून नाटकविषयीभूत सुधारणेच्या कार्याची हानि व्हावी हें नीट नाहीं; व याकरितां या नाटकांतील चांगल्या व वाईट दोन्ही अंगांची चिकित्सा पृथकपणें व होतां होईतों निःपक्षपातीपणानें व्हावी, या बुद्धीनें परीक्षणात्मक असे दोन शब्द लिहिण्याचें मीं धाडस करीत आहें.

प्रस्तुत पुस्तकाचा दोन अंगांनीं विचार कर्तव्य आहे. एक 'विधवाविवाह' या दृष्टीनें, व दुसरा 'नाटक' या दृष्टीनें. पहिल्या मुद्यासंबंधानें मला असें वाटतें कीं, रा. कोल्हटकर यांची वकीली अनुकूल अशा युक्तिवादाचे दृष्टीनें पहातां बरीच साधली आहे. त्यांनीं मुख्यतः दोन तीन प्रवेशांत व इतर प्रसंगीं सांपडेल तेथें विधवाविवाहासंबंधानें साधक अशा बहुतेक कारणांचा समावेश केला आहे. परंतु बाधक कारणांचें खंडन या दृष्टीनें ती वकिली तितकीशी साधली नाहीं. बाधक कारणांचाहि थोडा बहुतेक उल्लेख आहे, पण तो गंभीरपणाचा नसून फक्त त्यांची टर

उडविण्याकरितां व अशा योगानें साधक कारणें अधिक खुलून दिसावीं येवढ्याकरितांच केलेला दिसतो. उदाहरणार्थ, हरिहरशास्त्री जेव्हां " घरांतील कामकाज करण्यास प्रत्येक कुटुंबांत एक एक विधवा पाहिजे असते या दृष्टीनें पाहतां आमच्यांत किती कुटुंबें अशीं सांपडतील कीं, ज्यांमध्यें विधवा नसल्यामुळें पोतेरें घालणें, स्वैपाक करणें, वगैरे काबाड-कष्ट घरांतील यजमानणीस करावे लागतात; पुनर्विवाह सुरू केले तर या अडचणी कमी होतील कीं वाढतील ? " –असला व्यावहारिक आक्षेप घेतो; अगर " विधवांना पुनर्विवाहाची अवश्यकताच वाटत नाहीं; त्यांच्या अंगीं जन्मतः जें सात्विक प्रेम असतें, त्याचें समाधान आप्तांचीं व इष्टमित्रांचीं मुलें खेळविल्यानें पूर्णपणें होतें. " –असल्या प्रकारचें मानसशास्त्रीय विवेचन करतो; तेव्हां तो युक्तिवाद इतका निर्दयपणाचा व विशेषतः बेशरमपणाचा असतो कीं, पुनर्विवाहाचें मंडन करणाऱ्या सुधारकासच काय पण पुनर्विवाहास प्रतिकूल असणाऱ्या, परंतु ज्याचें मन राक्षसी बनलेलें नाहीं, ज्याचें मनांत साधारण प्रकारची न्यायबुद्धि व मानुषतासुलभ दया वास करीत आहे अशा धर्माभिमान्यास देखील तो किळसवाणा वाटेल. नाहीं म्हणावयास चकोर व चंद्रिका यांच्या तुळशीकट्यावरील प्रवेशांत साधक व बाधक कारणांचा वाद केलेला आहे, पण त्यांत गंभीरपणापेक्षां प्रेमळपणाच अधिक आहे. हा वादविवाद तुल्यबल अशा प्रतिपक्षांत झालेला नसून, परस्परांवर प्रेम करणाऱ्या तरुण स्त्रीपुरुषांत झालेला आहे हें विसरतां कामा नये. चंद्रिका आधींच स्त्री जाति; तिला शिक्षण म्हणावें तर फारसें दिसत नाहीं. तें असतें तर कदाचित् ' सुशिक्षित सौदामिनी ' प्रमाणें ही हजरजबाबी व जहांबाज झाली असती, व पुनर्विवाहाविरुद्ध तिनें काढलेल्या आक्षेपांचें नेटानें प्रतिपादन केलें असतें; पण तेंहि नाहीं. त्यांतूनहि फारा दिवसांनीं जपानसारख्या देशांत शिक्षण मिळवून आलेल्या तरुण विद्वानाशीं वाद करावयाचा; व सर्वांत विशेष हें कीं तो तरुण विद्वान असा कीं त्याच्याशीं लटोपटीचें कां होईना पण लहानपणीं तिचें लग्न लागलेलें. असा सुंदर, तरुण, प्रिय पुरुष, लहानपणीं झालेल्या विवाहाचे जोरावर आपल्या ' वाग्दत्त वधू ' वरचा हक्क सांगायला आला असतां, जवळ कोणी हजर नाहीं अशा आपत्तींत, चंद्रिकेचा पुनर्विवाहास बाधक असा युक्तिवाद

लटपटला तर त्यांत कांहीं नवल नाहीं. ती चकोरासारखीच विद्वान् असती तर चकोरानें दिलेल्या उत्तरांची युक्तायुक्तता तिला अधिक कळली असती. अशिक्षित मनुष्यासहि ढोबळ न्याय कळतो; व न्यायाचे दृष्टीनें चकोरानें केलेलें पुनर्विवाहाचें समर्थन तिला समाधानकारक वाटलें तें ठीकच आहे. पण शास्त्र व रूढि या संबंधाचे आक्षेप पुढें आणण्या इतकी स्वाभाविक प्रगल्भ बुद्धि चंद्रिकेस असूनहि, चकोराच्या हेत्वाभासपूर्ण अशा उत्तरांनीं तिला भ्रम पडला यांतील मर्म ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. चंद्रिकेनें "पण वाईट रूढि नाहींशी करून चांगली पाडणें शक्य तरी आहे काय?" हा जो प्रश्न चकोरास घातला तो आमच्या मतें अत्यंत कठीण होता. या प्रश्नाचें खरें महत्त्व इतकें प्रचंड आहे कीं, तें स्वत: चंद्रिकेस पूर्णपणें कळलें असेल कीं नाहीं, याविषयीं आम्हांस शंकाच वाटते. असल्या बिकट प्रश्नास उत्तर देतांना चकोर उबड उबड गांगरून गेला असला पाहिजे. कारण त्यानें त्यास जें उत्तर म्हणून दिलें तें हेत्वाभासपूर्ण, लटपटीत व सर्वस्वी गैरलागू ( irrelevant ) असें आहे. "वाईट रूढि नाहींशी करून चांगली पाडणें शक्य तरी आहे कां?" हा चंद्रिकेचा प्रश्न हॅमलेटमधील 'To be or not to be' या जगद्विख्यात आत्मसंभाषणांतील एका गंभीर व अर्थपूर्ण शंकेचा अनुवादच आहे म्हटलें तरी चालेल.

"But that the dread of something after—puzzles the will,
And makes us rather bear those ills we have
Than fly to others that we know not of."

हॅमलेट यास फक्त आत्महत्या करावयाची होती; समाजाचा त्यांत कांहींएक संबंध नव्हता. असें असतां "**ज्या दु:खाचें आज आपणास ज्ञान नाहीं**" अशांच्या भीतीनें विद्यमान सर्व दु:खें सोसण्यास तो तयार झाला. पुनर्विवाहास प्रामाणिकपणानें प्रतिकूल असणारे लोकहि या सुधारणेवर जी मुख्य शंका घेतात ती, त्यांचे ठिकाणीं न्यायबुद्धि असत नाहीं किंवा त्यांस शास्त्र व रूढि हीं दोन्हींहि प्रगमनशील असावीं असें वाटत नाहीं म्हणून नव्हे, तर—खरोखर चंद्रिकेप्रमाणेंच "वाईट रूढि नाहींशी करून चांगली पाडतां येणें शक्य तरी आहे का?" असा गहन विचार त्यांचे मनांत येतो व त्याचें समाधानकारक असें उत्तर मिळत नाहीं

म्हणून. अशा प्रश्नास चकोरानें जें उत्तर दिलें आहे तें हें–" शक्य नसायला काय झालें ? सहगमनाची चाल सरकारला कलमाच्या एका फटकाऱ्यासरशी बंद करितां आली कीं नाहीं ? हाच प्रकार चांगल्या रूढींचा. मी आज प्रथमच एखादी गोष्ट केली तिला लहर म्हणतील, उद्यां तीच केली म्हणजे सवय म्हणतील, ती अनेकांनीं केली म्हणजे नवीन मार्ग म्हणतील, आणि तीच अनेक पिढ्यांनीं केली म्हणजे झाली रूढि या नांवास पात्र." बरोबर आहे, रूढि कशी पडते याचें हें उत्तर सशास्त्र आहे; परंतु पुनर्विवाहाची रूढि चांगली कीं वाईट हा जो प्रश्न आहे याचें उत्तर यांत नाहीं. शिवाय सहगमनाची चाल व सरकारची कलमाच्या एका फटकाऱ्यानें वाटेल तें करण्याची शक्ति, यांचाहि उत्तरास मेळ पडत नाहीं. एखाद्या रूढीचें आचरण थांबविणें व नवीन रूढी पाडणें यांत महदंतर आहे. पहिलें सरकारास शक्य आहे, पण सरकारास एक नाहीं हजारों कलमांच्या हजारों फटकाऱ्यांनीं तरी एखादी नवीन सामाजिक रूढि पाडणें शक्य आहे काय ? सरकारास फार तर विधायक असे कायद्याचे नियम करतां येतील; परंतु त्यांची अंमलबजावणी विधायक रीतीनें करतां येत नाहीं, तर अशा प्रकारचा नियम जो न पाळील त्यास शिक्षा करितां येते इतकेंच. कर्जदार न देईल किंवा विवाहित स्त्री आपल्या पतीजवळ नांदण्यास न जाईल तर या दोघांस दिवाणी तुरुंगांत सरकारास पाठवितां येतें; परंतु त्यांनीं जी गोष्ट करावी ती त्यांचे हातून करवून घेतां येत नाहीं. याच धोरणावर Specific Relief Act मध्यें कांहीं गोष्टीपुरताच या कायद्याचा अंमल करितां येतो इतर गोष्टीसंबंधानें करितां येत नाहीं असें सांगितलें आहे. अमुक गोष्टी करूं नये असा केवळ निषेधार्थक कायदा असतांहि त्या करणारास सरकारास हटकून थांबवितां येत नाहीं. मग अमुक गोष्ट करावी असा विधायक कायदा करून त्या गोष्टी सरकारास कशा करवितां येणार ? गुन्हे करणारांना सरकारास कदाचित् प्रतिबंध करितां येईल, पण लोकांनीं सद्गुणी व्हावें, त्यांनीं विशिष्ट सद्गुणांचें आचरण करावें, असा कायदा सरकारास करतां येत नाहीं व त्याचा अंमल तर त्याहूनहि होऊं शकत नाहीं.

पण हे हेत्वाभास चंद्रिकेच्या अर्थातच लक्षांत आले नाहींत व तिनें चकोराबरोबर मांडलेल्या या युक्तिवादांत तिचाच पराजय झाला. मात्र

पुनर्विवाहास तयार होऊन पाणिग्रहण करण्याचें जें अर्जिक्य पत्र तिनें त्यास लिहून द्यावयाचें तें मात्र कुलवधूच्या मर्यादेस शोभेल अशा रीतीनें, " दादाच्या संमतीवर " सोंपविलें हें ठीकच झालें. तात्पर्य, या युक्तिवादापासून पुनर्विवाहाचे कार्यास विशेष मदत होण्यासारखी आहे असें मला वाटत नाहीं. अशा कामीं एका तरुण विधवेनें दिलेला न्यायनिवाडा फार तर व्यक्तिविषयक दृष्ट्या कबुली ( Admission ) याप्रमाणें मानितां येईल, व कदाचित् पुढेंमागें चंद्रिका ' दादानें संमति ' दिली असतांहि नाकबूल केली असती तर ही कबुली तिचे विरुद्ध उपयोगांत आणण्याचा चकोरास अधिकार मिळाला असता. पण अशा तऱ्हेच्या प्रेमळ व 'चंद्रिका-चकोर' न्यायानें एकमेकांविषयीं आतुर झालेल्या पक्षकारांनीं आपसांत 'लवाद' करून जरी न्यायनिवाडा नोंदविला, तरी तो इतरांवर, विशेषतः सर्व समाजाचे तर्फे ज्यांनीं वकीलपत्र घेतलें आहे अशा आक्षेपकांवर, कसा बंधक होणार ? या निवाड्यावर ते बहुधा "संगनमतानें व आपस्वार्थीपणाने केलेला लवाद निवाडा " असाच आरोप आणतील; निदान तो निवाडा Judgment in rem या स्वरूपाचा म्हणजे सर्व जगावर बंधक होऊं शकत नाहीं.

चकोर व चंद्रिका यांचा पुनर्विवाहाबद्दल झालेला वाद व त्यांत चंद्रिकेचा झालेला पराजय वाचतांना आम्हांस व्हॉलटेअर याचे Zadig या कादंबरीची आठवण झाली. पूर्वी बॅबिलोन शहरामध्यें स्त्रीनें नवऱ्याच्या बरोबर सती जाण्याची चाल होती. झॅडिग हा या शहरीं गेला तेव्हां एक स्त्री सती जाण्यास उद्युक्त झाली होती, तिची गांठ घेऊन व तिच्याशीं गोडगोड बोलून त्यानें तिला सती जाण्यापासून पराङ्मुख केलें येवढेंच नव्हे तर स्वतःबरोबर लग्न लावण्यासहि तयार केलें. हें पाहून बॅबिलोन येथील अधिकाऱ्यांस अचंबा वाटला, व ही युक्ति बरी वाटून त्यांनीं त्यापुढें असा कायदा केला कीं, ' एखाद्या स्त्रीचा नवरा मरण पावला असतां, तिची व एखाद्या तरुण पुरुषाची एकांतांत निदान एक तास तरी गांठ पडल्याचा तिनें दाखला आणल्याखेरीज तिला सती जाण्याची परवानगी देण्यांत येऊं नये.'

( " Zadig advised them to make a law by which a widow should not be prmitted to burn herself till she had conversed

privately with a young man for the space of an hour. Since that time not a single woman burnt herself.")

या महत्वाच्या दाखल्याची पद्धत पाडल्यापासून बॅबिलोनमध्यें एकहि स्त्री सती गेली नाहीं, आणि अशा रीतीनें कोल्हटकरांच्या 'सरकारी कलमाच्या एका फटक्या' प्रमाणेंच 'झॅडिग' यानें सती जाण्याची चाल एका घटकेंत बंद करून टाकली. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, तरुण पुरुष व विधवा यांच्या वादाच्या निकालावरच जर विधवाविवाहाच्या सुधारणेचें नशीब अवलंबून असतें तर मग इतका प्रयासच पडताना. परंतु या कामीं समाजाची आडकाठी मध्यें येते व समाजाची खात्री करून देण्याचे दृष्टीनें रा. कोल्हटकर यांनीं पुनर्विवाहास बाधक अशा कारणांचा पूर्ण परामर्ष घेतला आहे असें वाटत नाहीं. जुन्या विचाराचे कट्टे व प्रामाणिक धर्माभिमानि लोकहि केवळ तात्विक विचारांचा वाद करतांना पुनर्विवाह, निदान बालविधवांचा तरी पुनर्विवाह होणें हें न्यायाचें आहे असें ते चंद्रिकेप्रमाणेंच कबूल करतात; पण मग चंद्रिकेप्रमाणेंच शास्त्र व रूढि यांच्या प्रचंड अडचणी त्यांचे डोळ्यापुढें उभ्या राहतात, आणि लक्षांत ठेवण्याचा मुद्दा हा कीं, चंद्रिकेप्रमाणें चकोराच्या उत्तरानें मात्र त्यांचें सामाधान होणार नाहीं. मग पुनर्विवाहाबद्दल त्यांस उल्हास वाटण्याचें तर दूरच. हें साधकबाधक कारणांच्या परामार्षा संबंधानें झालें. परंतु नाटकांतील कथानक, रचना व पात्रांचें स्वभावदर्शन या बाजूनें तरी पुनर्विवाहास अनुकूलता मिळण्यासारखें काय काय आहे याचा विचार करूं.

या नाटकांतील मुख्य कथाभाग लक्षांत आणला असतां असें दिसून येईल कीं, पुनर्विवाहास प्रतिकूल अशीं पात्रें म्हटलीं म्हणजे विहार, हरिहरशास्त्री, आनंदराव व सरस्वती. पकीं हरिहर शास्त्री हा इतका दुराचारी व नीच मनुष्य दाखविला आहे कीं, मागें सांगितल्याप्रमाणें सुधारणावाद्यांसच काय, पण धर्माभिमान्यांसही त्याची किळस येईल. तेव्हां त्याच्या प्रतिकूलतेस मुळींच किंमत नाहीं; किंबहुना त्याची प्रतिकूलता ही एक ईश्वरी कृपा, व अनुकूलता हें मात्र ईश्वरी संकट असें वाटण्यासारखें आहे, हिंदुसमाजांतील कोणताहि धर्माभिमानी गृहस्थ हरिहरशास्त्र्यास या वादांत वकीलपत्र देण्यास तयार होईल असें आम्हांस वाटत नाहीं. सर-

स्वती जरी सुरवातीस केशवपनाविषयीं आग्रही दिसते, व " या सुधारकांनीं पुनर्विवाहाचा प्रचार सुरू करून स्वैपाकिणी अगदीं महाग करून टाकल्या " असे उद्गार काढते तरी एकंदरीनें तिच्या अनुकूलत्वाची किंवा प्रतिकूलत्वाची किंमत कोणीहि सारखीच मानील. विवाहित स्थितींत जी स्त्री व्यभिचार करण्यास प्रवृत्त होते, तिनें विधवापुनर्विवाहाविरुद्ध कितीहि मुद्देसूद कळकळीचा किंवा समाजहितबुद्धीचा असा युक्तिवाद केला, तरी त्याची काय किंमत ! पण सरस्वतीचा पुढें पुढें विधवाविवाहाच्या प्रश्नाशीं संबंधच राहिला नाहीं. तिच्या स्वतःच्याच सुखदुःखाचा बोजा तिला डोईजड झाला होता. आनंदराव हे पुनर्विवाहास प्रतिकूल म्हणण्यापेक्षां एका विवक्षित पुनर्विवाहास प्रतिकूल असेच खरोखर म्हटलें पाहिजे. चंद्रिकेखेरीज इतर कोणाचाहि तो पुनर्विवाह असता तर त्यांनीं मदतच केली असती. तात्पर्य, पुनर्विवाहाचा या नाटकांतला खरा शत्रु म्हटला म्हणजे काय तो विहार. हा धर्माभिमानी, वक्ता, युक्तिवाद करण्यांत पटाईत, लोकांवर ग्रामण्यें करविणारा, सुधारकांचा हाडवैरी, आमची प्रत्येक जुनी गोष्ट चांगली असें म्हणणारा असा असल्यामुळें धर्माभिमानी समाज त्यास पुनर्विवाहाच्या वादांत वकीलपत्र देण्यास तयार होईल अशी नाटककर्त्याची खात्री दिसते. पूर्वकाळीं युद्धानें दिव्य करण्याची पद्धत असे. त्या वेळीं प्रत्येक पक्ष आपापल्या बाजूनें एक एक वीर देऊन त्यांच्या युद्धाच्या निकालावर आपल्या वादाचा निकाल अवलंबून ठेवण्यास कबूल होई. अशा वेळीं एका व्यक्तीचें जें बलाबल, जे गुणदोष तेंच आपण मंडन केलेल्या अगर उचलून धरलेल्या पक्षाचे बलाबल व गुणदोष असें कबूल करण्याची त्यांची तयारी असे. नाटककर्त्यानें विहाराची योजना धर्माभिमान्यांच्या पक्षाचा योद्धा, लढणारा मुख्य 'गडी' अशाच अर्थानें केलेली आहे. परंतु नाटकाची एकंदर बनावट पाहिल्यावर धर्माभिमानी लोक व पुनर्विवाहास अनेक इतर कारणांमुळें प्रतिकूल असणारे लोक विहारास आपला वकील अगर योद्धा नेमतील कीं नाहीं याची शंकाच आहे. नाटकांतील कथाभागाची मुख्य किल्ली विहाराचे स्वभावांत आहे. चंद्रिकेचा चकोराशीं पुनर्विवाह लावण्यास तो काय तो आडवा येत होता. पण वादाचे भरांत विहारानें असें प्रतिपादन केलें कीं, एकपत्नीत्वाचा धर्म श्रेष्ठ आहे, व पुरुषांस पत्नी मेली असतां अविवाहित राहून आयुष्य कंठितां येतें तर मग

विधवांनाहि तसेंच कां करितां येऊं नये ? त्यावर बोलणें होऊन विहार अशी प्रतिज्ञा करितो कीं आपली पत्नी मृत झाली असतां आपण दुसऱ्या स्त्रीवर प्रेम करणार नाहीं, व जर केलें तर चंद्रिकेच्या पुनर्विवाहास आपण कबूली देऊं. या प्रतिज्ञेचा आधार, व विहार आणि त्याची स्त्री यांच्या भांडणाचा फायदा घेऊन चकोर व मनोहर हे तरंगिणी मृत झाली असें भासवून तिच्याच करवीं, अन्य स्त्रीच्या मिषानें, विहारास प्रेमबद्ध करून नंतर त्याची फटफजीति करितात; आणि त्याच्या विफल प्रतिज्ञेची शिक्षा म्हणून चंद्रिकेच्या पुनर्विवाहास त्याची संमति घेतात. तात्पर्य, अविवाहित राहणें बोलण्यास किती सोपें परंतु आचरण्यास किती कठीण असतें याचा दाखला देऊन, आणि पुरुषांस जर हा कठिणपणा अनुभवास येतो तर स्त्रियांसहि तो कां येऊं नये, असें नजरेस आणून व त्यामुळें लोकांकडून पुनर्विवाहास संमति घेण्याचा रा. कोल्हटकर यांचा हेतु उघड दिसतो; परंतु हा प्रयत्न विशेष साधलेला नाहीं, व अशा तऱ्हेचा प्रयत्न साधणें शक्यहि नाहीं असें मला वाटतें. दुसऱ्याचें मन वळविण्याचे कामीं 'आत्मौपम्य' म्हणून जी एक विचार करविण्याची पद्धति असते तिचा रा. कोल्हटकर यांनीं या ठिकाणीं अंगीकार केलेला आहे. आत्मौपम्य म्हणजे उदाहरणार्थ याच नाटकांतील आनंदरावानें सरस्वतीस सांगितलेलें "दुसऱ्याविषयीं विचार करावयाचा तो नेहमीं आपण त्याच्या स्थितींत आहोंत असें कल्पून केला पाहिजे" हें तत्त्व. मानसशास्त्रांत या तत्त्वास बरेंच महत्त्व आहे. कारण जगांत दुसऱ्यावर दया करणें, त्यास न्याय देणें, किंवा त्यास संकटांतून सोडविणें वगैरे प्रकारांनीं जेव्हां आपण परोपकार करण्यास प्रवृत्त होतों, त्यावेळीं पुष्कळदां आपण खरोखर दुसऱ्यावर उपकार करण्याचे बुद्धीनें म्हणून उपकार करीत नसून, आपण त्याचे ठिकाणीं असतों तर आपणांस कसें वाटलें असतें अशी कल्पना करून, व तसें खरोखर आहोंच कीं काय असा क्षणभर भास होऊन आपण त्या 'परोपकारी' परंतु वस्तुत: 'आत्मोपकारी' कृत्यास प्रवृत्त होतों. दुसऱ्याचे ठिकाणीं आपण आहों अशी कल्पना करण्याची शक्ति जर आपणांस नसती, जर अशा रीतीनें एक तऱ्हेचा परकाया-म्हणा किंवा परमनः-प्रवेश आपणास करतां आला नसता तर, मला वाटतें, परोपकार या नांवाखालीं मोडणाऱ्या अर्ध्या अधिक सत्कृत्यांचे सुखास आपण आंचवलों असतों यांत शंका नाहीं.

परंतु या आत्मौपम्यासंबंधानें एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे ती ही कीं, या आत्मौपम्यबुद्धीनें आपण परकाया प्रवेश किंवा परमन:प्रवेश केला असतां आपणांस आपली कींव किंवा दया येण्यासारखी त्या दुसऱ्या मनुष्याची स्थिति असली पाहिजे. परंतु तसें न होतां आपला आपणास राग किंवा तिटकारा येण्यासारखी ती स्थिति असेल तर मग आपण परोपकार करण्यास तयार होत नाहीं. याचें नेहमींच्या व्यवहारांतलें उदाहरण द्यावयाचें तर असें देतां येईल कीं, आपण परोपकारबुद्धीनें ( धर्माच्या जुलमानें नव्हे ) जेव्हां भिक्षा घालतों तेव्हां ईश्वराचे अवकृपेनें दुबळ्या झालेल्या आंधळ्या प्राण्यास जशी हौसेनें घालतों तशी ती धष्टपुष्ट असून, जरीचा रुमाल डोक्यावर घालून केवळ धंद्याची सबब सांगून भिक्षा मागणाऱ्या पाटीलबुवास घालीत नाहीं. पहिल्याबद्दल आपणास कींव येते, दुसऱ्याबद्दल आपणास तिटकारा वाटतो. तर आतां हें आत्मौपम्याचें तत्त्व प्रस्तुत नाटकासंबंधीं कसें काय उपयुक्त होतें हें पाहूं. नाटककारानें विहारास आत्मौपम्याचे तत्त्वानें विधुर स्थितीचा अनुभव दाखवून त्यांजकडून पुनर्विवाहास संमति मिळविली; परंतु प्रेक्षक व वाचकवर्गहि आपण विहाराचे स्थितींत असतों तर आपण काय केलें असतें असा विचार करणार. येथेंच काय ती मख्खी आहे; व म्हणून कोल्हटकरांनीं विहाराचें जें चित्र रेखाटलें आहे, त्याची कल्पना चुकली असें म्हणावें लागतें. विहाराचे पात्रावर कायती सर्व भिस्त; परंतु धर्माभिमानीचसे काय पण सुधारणावादी असेहि कित्येक पुरुष आत्मौपम्याचे तत्त्वानें विहाराचे ठिकाणीं आपण आहों असा विचार करूं लागल्यास त्यांस स्वत:बद्दल कींव न येतां तिटकाराच येईल.

तरंगिणीचा खोटा मृत्यु होईपर्यंत दाखविलेली विहाराची कृति थोडीबहुत सदोष आहे, तरी पण तोंपर्यंतचा विहार कल्पनेनें होण्यास कोणी कदाचित् कबूल होतील; परंतु त्यानंतरचा जो बहकलेला, फाजील उल्लू असा विहार दाखविलेला आहे तो केवळ आत्मौपम्याखातरहि कोणी होण्यास तयार होईल असें मला वाटत नाहीं. पहिली स्त्री मेल्यानंतर पूर्वीचा निश्चय लटपटून जाऊन द्वितीय विवाह करण्यास तयार होणारे लोक पुष्कळ आढळतात. परंतु मुकाट्यानें दुसरा विवाह उरकून घेऊन आपल्या संसार मार्गास पूर्वीप्रमाणें लागण्याचें सोडून, स्वस्त्रीचें "चिंतन करितां करितां एकंदर स्त्रीजातीच्या विषयीं नुसता आदरच नव्हे तर स्वस्त्रीसारखें, स्वत:च्या

मुलाच्या मातेसारखें प्रेम वाटूं लागणारा, खराखुरांच "वसुधैव कुटुंबक" वृत्ति होणारा आचरट विहार आपण व्हावें असें कोणीहि समंजस मनुष्य कबूल करणार नाहीं. तात्पर्य, विहाराबद्दल कींव न येतां तिटकारा वाटतो; व अशा लहरी, चंचल स्वभावाच्या परस्पर विरुद्ध तत्त्वांचा अंगीकार खुशाल करणाऱ्या असाधारण कोटीमधील तरुण पुरुषाच्या स्वभावावर पुनर्विवाहाच्या युक्तायुक्ततेची बांधलेली इमारत ढासळल्याशिवाय राहणार नाहीं हें उघड आहे. विहारानें अंगीं पात्रता नसतां वल्गना व प्रतिज्ञा केली व ती फसल्यामुळेंच काय तो चंद्रिकेच्या पुनर्विवाहाचा मार्ग मोकळा झाला. परंतु अशा रीतीनें एखाद्या नादान मनुष्याच्या फसगमतीवर पुनर्विवाहासारखी सुधारणा अवलंबून राहूं शकत नाहीं. सुधारणा हा कांहीं पोरांच्या 'एकी का बेकीचा डाव' नव्हे, किंवा जुवा खेळणारांचा फांसा नव्हे, अगर सोडत किंवा शर्यत नव्हे; व धर्माभिमानामुळें अगर इतर कारणांनींहि पुनर्विवाहास प्रतिकूल असणारे लोक फसगमतीनें अशा गोष्टीस कबूल होणार नाहींत. आधीं विहारासारखेच स्त्रैण व चंचल लोक जगांत भरले आहेत हें ते कबूल करणार नाहींत, व त्यांतूनही अशा प्रकारचे लोक जगांत असतात एवढ्याचकरितां केवळ त्यांचे उदाहरणावरून विधवांनींहि तसेंच करावें, हें तर त्यांस मुळींच मान्य होणार नाहीं. या सर्व गोष्टींमुळें विहार या पात्राचा उल्लुपणा पाहून प्रेक्षकलोक हंसत हंसत नाटकगृहांतून बाहेर पडतील हें जरी खरें, तरी पुनर्विवाहाचे इष्टतेबद्दल खात्री होऊन ते बाहेर पडणार नाहींत.

तर मग कोल्हटकरांनीं काय करावयास पाहिजे होतें, म्हणजे ही इष्ट गोष्ट घडून आली असती? अशा प्रश्नाचें उत्तर देणें कठीण आहे. पण एका सामान्य सिद्धांतानें व एक दोन उदाहरणांनीं हें उत्तर देण्याचा मीं प्रयत्न करितों. माझें मत असें आहे कीं, पुरुषवर्गाची व विशेषतः धर्माभिमानी वर्गाची सहानुभूति व अनुकूलता जर पुनर्विवाहास मिळावी असें असेल तर प्रत्यक्ष व्यवहारांत काय किंवा नाटकांत काय विनोद, थट्टा व अतिशयोक्ति यांच्या अतिरेकाचा आश्रय करून चालणार नाहीं. समाजास वश करण्याचीं साधनें हीं नव्हत. निदान पुनर्विवाहासारख्या नाजुक विषयांत तरी हीं साधनें फारशीं उपयोगी पडणार नाहींत. कोल्हटकर यांनीं केलेल्या वकिलीस Militant Pleading असें नांव द्यावें लागेल. परंतु

अशा नाजुक कामांत असली धाडसी वकिली खपणार नाहीं. वकिलांचा मुख्य गुण म्हटला म्हणजे न्यायाधीशाचें मन वळविणें हा होय. कायद्याचीं कलमें व त्यांवरील ठराव हे सर्व वकिलांस सारखेच उपलब्ध असतात, पण न्यायाधीशाचें मन वळविणें यांतच मुख्य खुबी आहे. कारण, पुष्कळ कलमें व पुष्कळ ठराव असे असतात कीं, त्यांचा उपयोग करावा तसा होतो, व अशा वेळीं वादांतील जय हा न्यायाधीशाचे फक्त सुप्रसन्नतेवरच अवलंबून राहतो. रा. कोल्हटकर यांच्या या नाटकानें समाजाची सुप्रसन्नता मिळेलसें मला वाटत नाहीं. आतां पुनर्विवाहाची सुधारणा कांहीं विवक्षित मर्यादेत घडवून आणावी हें या नाटककर्त्यास जसें प्रिय आहे तसेंच प्रस्तुत टीकालेखकासही तें प्रिय आहे. अर्थात् प्रस्तुत नाटक लिहिण्याचा कोल्हटकरांचा हेतु फारसा सफल होण्यासारखा नाहीं असें म्हटलें असतां त्या लेखकाच्या टीकेच्या मुळाशीं असणाऱ्या हेतूबद्दल नाटककर्त्याचा गैरसमज होण्याचें कारण नाहीं. परंतु असल्या इष्ट सुधारणेची नाटकद्वारा तरफदारी करण्याची संधी नाटककर्त्यास आली असून त्यानें तिचा जितक्या काळजीपूर्वक उपयोग करावयास पाहिजे होता तितका केला नाहीं याबद्दल प्रांजलपणें खेद वाटतो, इतकेंच कायतें. कारण या नाटककर्त्याची एखादी गूढ कोटी प्रेक्षक जनांस कळली नाहीं तर फार तर, त्यांचे ठिकाणीं सहृदयताच कमी असें म्हणून स्वतःचें समाधान त्यास करतां येईल. पण "मीं पुनर्विवाहाचे सुधारणेचे इष्टतेबद्दल लोकांची खात्री करण्याकरितां व त्यांचा मनोनुनय करण्याकरितां नाटक लिहिलें, त्याचे योगानें त्यांची खात्री झाली नाहीं व त्यांचें मन वळलें नाहीं तर तोहि तसाच त्यांचा अपराध आहे, त्यांचे अंगीं सहृदयताच कमी" असें म्हणून रा. कोल्हटकर यांचें समाधान होईल असें आम्हांस वाटत नाहीं. कारण या नाटकाचे द्वारें हातीं घेतलेल्या कार्याबद्दल त्यांस खरीच मोठी कळकळ आहे हें आम्हांस माहीत आहे.

असो; तर मग रा. कोल्हटकर यांनीं कशा प्रकारची वकिली करावयास पाहिजे होती या प्रश्नाचें आमचें उत्तर असें आहे कीं, त्या वकिलीनें थट्टा न होतां दयेनें हृदय पाघळलें पाहिजे. कोल्हटकरांच्या मताप्रमाणें समाज हा मूर्ख आहे असें घेऊन चाललें तरी "मूर्खं छंदानुरोधेन" या वचनाचा त्यांनीं आपल्या वकिलींत अंगीकार करावयास

पाहिजे होता. ज्यांस पुनर्विवाहाचे सुधारणेसंबंधानें जुन्या मतांच्या वृद्ध मनुष्यांशीं आदरशीलतेनें या नाजुक विषयावर वादविवाद करण्याचा कधीं तरी प्रसंग आलेला असेल त्यांस मी म्हणतों यांतील मर्म कळेल; व एकंदर समाज झाला तरी त्याच्याशीं जो वादविवाद करावयाचा—त्याच्यापुढें जी वकिली करावयाची—तीहि अशी पोटांत शिरण्याची व आदरबुद्धि प्रेरितच असली पाहिजे. आतां ही दुसऱ्या तऱ्हेची वकिली कशी करावयाची, याचा तपशील सांगावयाचा म्हणजे आज कदाचित् दुसऱ्या प्रकारच्या एका नाटकाचें संविधानकच रचून सांगावयाचें असें होईल; परंतु टीका जरी विध्वंसक न करितां रचनात्मक करायची म्हटली तरी टीकाकारावर एवढा मोठा बोजा कोणी लादणार नाहीं असें मला वाटतें. शिवाय रचनात्मक टीकेंतहि इतके अनेक मुद्दे निघू शकतील कीं ते सर्व एकाच नाटकांत घालतां येतील असेंहि नाहीं. चांगल्या वाईटाचा विवेक करून चांगले मुद्दे असतील त्यांचा मेळ पडेल अशा रीतीनें उपयोग करणें हें प्रतिभासंपन्न कवीला जसें साधेल तसें कदाचित् केवळ तिऱ्हाईतपणानें टीका करणाराला साधणारहि नाहीं. टीकेचे आधीं बहुधा टीकाविषय जन्मास येतो याचेंहि कारण हेंच असेल; व पुनर्विवाहाचे सुधारणेस मदत केल्याचें श्रेय प्रस्तुतचें नाटक व त्यावरील अनेक टीका या दोहोंतून कोणास अधिक आहे असा प्रश्न निघाल्यास तें नाटककारासच अधिक आहे यांत शंका नाहीं.

तथापि माझे मतें कोल्हटकर यांनीं खालील गोष्टीकडे अधिक लक्ष पोंचवावयास पाहिजे होतें:—( १ ) प्रस्तुत नाटकांतील विहाराचे प्रतिज्ञाभंगावर पुनर्विवाहाची सिद्धि अवलंबून ठेविली ती तशी ठेवावयास नको होती. विहारापेक्षां अधिक स्थितप्रज्ञ, कमी चंचल, अधिक नीतिमान् व करारी अशा धर्माभिमान्याची खात्री होऊन अगर त्याचें मन द्रवून त्याची संमति मिळाली असें दाखवितां आलें असतें तर बरें होतें. ( २ ) विहारास विधुरस्थितीचा अनुभव आल्यावर व आत्मौपम्यप्रतीति झाल्यावर देखील, त्याचें मन स्वार्थाकडेच लागतें, जगांतील सर्व स्त्रिया त्याला "आपल्या मुलाच्या मातेसमान वाटूं लागतात" व अखेर 'कल्याणी'ला वश करण्याचे तो नादीं लागतो, असें नाटककारानें दाखविलें आहे, व त्याच्या विधुरस्थितींत आपल्या विधवा बहिणीच्या सुखदु:खाबद्दल त्याच्या

तोंडांतून एक शब्दहि काढलेला नाहीं. परंतु तीच विहाराच्या पात्राची थोडीशी निराळी कल्पना करून विधुरावस्थेंतील स्थितीच्या अनुभवानें आपल्या बहिणीच्या दुःखी स्थितीबद्दल त्याच्या हृदयांत एकदम प्रकाश पडला, व तेव्हांपासून तो तिचें दुःख निवारण करण्याच्या मार्गाला लागला आणि कल्याणीवर आपलें प्रेम बसल्यानें आपली प्रतिज्ञा मोडली, ही गोष्ट मनोहर व चकोर यांना कळण्यापूर्वीं आपण होऊनच त्यानें ती त्यांस सांगून टाकली असती--तसेंच, आपण पूर्वीं पुनर्विवाहास प्रतिकूल होऊन आपल्या प्रिय भगिनीच्या सुखाच्या मार्गांत आलों या पापाची निष्कृति त्यानें यापुढें अविवाहित राहण्याची, फिरून एक वेळ पण या वेळीं खऱ्या वैराग्यानें प्रेरित अशा बुद्धीनें, शपथ घेतली असती तर अनेक गोष्टी झाल्या असत्या. एक तर केवळ स्वार्थसाधनपर नव्हे अशा मनापासून चंद्रिकेच्या पुनर्विवाहास संमति मिळून त्या कार्याला अधिक प्रतिष्ठित स्वरूप आलें असतें. दुसरें असें कीं, विहाराची स्वतःची दानत अधिक उदात्त ठरली असती; व तिसरें हें कीं, भरपूर प्रत्यक्ष पुराव्यानें व्यभिचारास उद्युक्त होण्याच्या अपराधासंबंधानें दोषी ठरलेला असा आपला पति फिरून आपल्या बाहुपाशांत घेण्याची स्वाभिमानशून्यपणाची अशी गोष्ट तरंगिणीच्या नशिबांत हल्लींच्या योजनेनें येत आहे ती तशी आली नसती. या सर्व गोष्टी घडून येण्यास विहारास विधुरावस्थेचा अनुभव येतांच त्याचे मनांत चलबिचल झाली येवढयावरूनच प्रतिज्ञाभंग शाबीत केला असता म्हणजे झालें असतें. मनानें झालेला अपराध प्रत्यक्ष शरीरानें करण्यापर्यंत मजल नेणें ही गोष्ट या ठिकाणीं बिनतोड होतीच असें मला वाटत नाहीं. (३) चंद्रिका ही ज्या सामाजिक स्थितींतील घेतली आहे त्यापेक्षाहि गरिब स्थितींतली घेतली असती तर रसपरिपोषणास फायदा झाला असता. हल्लींच्या चंद्रिकेस वैधव्यांतहि पोटापाण्यास कमी पडणारें नाहीं; घरीं बाप, व जुन्या मताचा पण तिची काळजी करणारा भाऊ. बाप व भाऊ दोघेहि साधारण श्रीमंत स्थितींतले तात्पर्य, पतिसुखाचा सर्वस्वी लोप ही गोष्ट जरी खरी, तरी त्या व्यतिरिक्त कायमच्या घरीं आलेल्या माहेरवाशिणीस अब्रूनें दिवस काढण्यास साधारणतः जशी गृहस्थिति असावी, अशा प्रकारची गृहस्थिति चंद्रिकेची होती. अशा स्थितींत पुनर्विवाह हें तिला सुख वृद्धिंगत करण्याचें साधन जरी

निःसंशय झालें असलें पाहिजे, तरी एकंदरीचे मानानें पुनर्विवाह हा बिनतोड मार्ग अशी तिची परिस्थिति खास नव्हे. यास्तव नायिका अगर पुनर्विवाह विषयीभूत अशी विधवा पसंत करणें ती याहून गरीब स्थितींतली निराधार अशी पसंत केली असती तर समाजाचा अनुकंपाप्रसाद होण्यास ती अधिक पात्र झाली असती. कारण समाजांत अशा प्रकारच्या विधवा पुष्कळ असतात व त्यांस जें दुःख, आपत्ति व अपमान सोसावा लागतो त्याची दया येऊनच समाज वळला तर वळेल.

सुखाचा संसार अधिक सुखी करण्याकरितां कांहीं पुनर्विवाह करावयाचा नाहीं, तर दुःखविमोचनहेतु म्हणून त्याचा अंगीकार करावयाचा आहे. तो मार्ग बोलून चालून गौण आहे. तो आपद्धर्म आहे व म्हणून त्याचा अंगीकार करण्यास खरोखरच विशेष प्रकारची आपत्ति प्राप्त असली पाहिजे. हेंच मत सुधारणावाद्यांमध्येंहि बऱ्याच अंशांनीं प्रचलित आहे असें मला वाटतें. कोल्हटकर यांनींच स्वत: 'हिंदुधर्म आणि सुधारणा' या ग्रंथावर 'विविधज्ञानविस्तारां'त मागें एक वेळ टीका लिहिली आहे. त्या टीकेंत त्यांनीं फक्त एकाच पॅरिग्राफांत विधवादुःखवर्णन चटकदार रीतीनें केलेलें आहे त्याची या स्थळीं आम्हांस आठवण होते; तो पॅरिग्राफ असा आहे—"प्रथमतः विधवेची अनाथ व करुणरसपूर्ण मूर्ति डोळ्यापुढें उभी राहते. या दुर्दैवी प्राण्यानें असा कोणता अपराध केला होता, कीं तिचें सौभाग्य नष्ट होतांच तिच्या दुःखावर डाग देण्याकरितांच कीं काय, तिच्या आप्तांनीं तिचें सौंदर्य हिरावून हातीं पोळपाट लाटणें देण्यास तयार व्हावें? ज्या चांडाळहृदयी भिक्षुकानें मधल्यामध्यें पैसा खाऊन एखाद्या बालिकेस एका थेरड्याच्या गळ्यांत बांधून तिजवर अकालीं वैधव्य आणिलें तोच अधमाधम मंगलविधीमध्यें श्रेष्ठ गणिला जाऊन त्याच बालिकेचें दर्शन होतांच अपशकून समजतो. एखादें मांजर समोर आलें कीं जितका उत्साहभंग होत नाहीं, तितका विधवेचें तोंड दिसतांच होतो. स्वतःच्या एकुलत्या एक मुलाचा विवाहविधि कौतुकानें पहाण्याकरितां बोहल्यापर्यंतहि येण्याची त्या बापडीला चोरीच! अशा अपेक्षेमध्यें त्या बिचारीचें पाऊल वांकडें पडलें तर तिची दैना विचारावयासच नको. शेवटीं आईबापांकडून विषप्रयोग होऊन, स्वतःविहिरींत उडी टाकून किंवा बालहत्या झाली असतां फांसावर लटकून तिच्या दुःखपूर्ण जीवि-

ताचा अंत होतो." या वर्णनांत अशा पुष्कळ गोष्टी आहेत कीं त्यांची मदत घेऊन रा. कोल्हटकर यांस आपल्या नाटकाला अधिक करुणरस-मूलक असें सौंदर्य आणून देतां आलें असतें. तसेंच 'संगीत रूढिविनाशन' या नाटकावरील टीकेंत कोल्हटकर यांनीं असें लिहिलें आहे कीं, "या नाटकाचें पर्यवसान आनंदांत न होतां दुःखांत झालें असतें तर कर्त्याचा इष्ट हेतु बराच सिद्धीस गेला असता. समाजाकडून छळ होत असलेल्या व्यक्तींवरील संकटें व त्यांचा हृदयद्रावक अंत दाखवून त्यांजविषयीं सहानुभूति उत्पन्न होण्याचा विशेष संभव असतो." आम्हींहि आमच्या मित्रांच्या प्रस्तुत नाटकासंबंधानें हेंच म्हणतों. कारण कांहींहि असो, या नाटकांत चंद्रिकेबद्दल विधवा या नात्यानें जितका दुःखाचा व कळ-कळीचा उमाळा उत्पन्न व्हावा तितका होत नाहीं. विधवाविवाहाचे नाटकांत प्रत्यक्ष विधवाविवाह झालेलाच दाखविला पाहिजे असें थोडेंच आहे. काव्यांत जसें ध्वनिवाक्य म्हणजे सूत्रकाव्य श्रेष्ठ तसेंच नाटकांतहि सूचक नाटक श्रेष्ठ म्हणण्यास हरकत नाहीं; व कोल्हटकर यांनीं मनावर घेतलें असतें तर त्यांस शोकपर्यवसायी व विधवाविवाहाची इष्टता फक्त सुचविणारें असें नाटक सहज रचतां आलें असतें. स्वतः पुनर्विवाह करून घेणाऱ्या नायिकेपेक्षां, स्वतः दुःख सोसूनहि अविवाहित राहून आपणांहून कमी करारी व कमी सोशिक अशा कोंवळ्या मुलींच्या दुःखनिवारणाच्या परोपकारी हेतूनें खटपट करणारी, त्रास सोसणारी, किंबहुना मरणारी विधवा जरी नायिका केली असती, तरीहि अशाच प्रकाराचें कार्य साधलें असतें, असें मला वाटतें.

(४) चंद्रिकेच्या सुखदुःखावर ज्यांचें सुखदुःख अवलंबून आहे अशा प्रेमळ आईबापांची योजना करितां आली असती तरीहि अधिक बरें झालें असतें. ज्या स्त्रीस पति नाहीं तिचें दुःखतर कबूलच आहे. परंतु दुःखा-दुःखांत सुध्दां फरक असतो; व आपणास पति नाहीं या दुःखानें रडणाऱ्या स्त्रीच्या दुःखापेक्षां, आपल्या कन्येस पति नाहीं या दुःखामुळें रडणाऱ्या आईबापांचें दुःख अधिक अनुकंपा उत्पन्न करणारें असतें. याचें मानसशास्त्रदृष्ट्या असें कारण सांगतां येईल कीं, विधवेचें दुःख स्वार्थ-मूलक आहे व तिच्या आईबापांचें दुःख परार्थ किंवा परोपकारबुद्धि-मूलक आहे. दुःखांत सुद्धां सहेतुक (selfish) व निर्हेतुक

(disinterested) असा भेद करितां येतो, व पहिल्यापेक्षां दुसरें दुःखच अधिक पवित्र मानावें लागतें. अर्थात् दुःखनिवारणाचे दृष्टीनें पाहतां, आपल्या अपत्यप्रेमामुळें दुःखी असलेल्या मातापितरांनीं जर समाजाजवळ दयेची भिक्षा मागितली तर ती विनंति जितकी मान्य व आदरणीय होईल, तितकी विधवेनें स्वतःकरितां केलेली याचना मान्य होणार नाहीं. पण गंमत अशी आहे कीं प्रस्तुत नाटकांत चंद्रिकेकरितां ही भीक मागणारें असें कोणीच माणूस नाहीं. तिच्याकरितां चकोरास दुःख होतें पण तें अर्थातच आपस्वार्थीपणाचें म्हणून त्यास किंमत नाहीं. तरंगिणीनें तर त्याच्या मनःस्थितीची बरोबर मीमांसा केली आहे; "वन्संची सुटका म्हणजे स्वतःचेंच लग्न कीं नाहीं?" हेच तिचे शब्द. माहेरच्या माणसांपैकीं चंद्रिकेची नवीन आई तर तिला नांवें ठेवणारी, मग प्रेम करणें किंवा तिजकरितां दुःखी होणें तर दूरच. बाप आनंदराव याची प्रीति उघड दिसतच आहे! त्यानेंच तिला आपल्या लग्नाच्या मोबदल्यांत आपल्यापेक्षां पांच चार वर्षांनीं वडील अशा नवरदेवास दिली. व तिला वैधव्य आल्यावर तिनें आपल्या नवऱ्याकरितां हाय घेतली आहे व ती फार प्रेमळ मुलगी आहे म्हणून तिला पुनर्विवाहाची इच्छा नाहीं असें ठरवून तिला तिचा भाऊ विहार यानें आपल्या घरीं नेली असतां, बरी घरची ब्याद गेली असें तो मानतो! चंद्रिकेचा भाऊ तर कोल्हटकरांचे मताप्रमाणें दुर्धारक पडला! त्याला कसली दया व दुःख? त्यानें तिला बापाचे घरीं त्रास होऊं नये म्हणून आपल्या घरीं नेलें परंतु तिच्याबद्दल त्याची कळकळ यथायथाच! विधुरावस्थेंत घरीं तरंगिणी नसतांहि तो तिची वास्तपुस्त करीत नाहीं, व स्वतःस विधुरावस्थेच्या दुःखाचा तडाखा बसल्यावरहि चंद्रिकेच्या दुःखाची कल्पना करण्याचें सोडून उलट तिच्या केशवपनाची योजना करून तिच्या दुःखावर डाग देतो. माहेरच्या माणसांपैकीं येऊन जाऊन तरंगिणी; परंतु तिनेंहि चंद्रिकेच्या पुनर्विवाहाबद्दल कोठें नेट धरल्याचें दिसत नाहीं. आश्रमांत जाऊन राहण्याच्या व विहाराला भुलविण्याच्या युक्तीला ती कबूल झाली. परंतु ती युक्ति तिच्या दृष्टीनें पाहतां मुख्यतः पुनर्विवाह होण्यास साधनीभूत म्हणून नव्हे. तिला तो सर्व प्रकार गाजराच्या पुंगीसारखाच वाटतो. बरें माहेरचा नाहीं तर नाहीं, पण इतर कोणी तरी

चंद्रिकाचकोरांच्या पुनर्विवाहाबद्दल आग्रह व नेट धरतो आहे का? असा आग्रह धरण्यासारखा आशेचा व लोभाचा गड्डा येऊन जाऊन काय तो मनोहर. पण स्वतःच्या सत्यवक्तेपणाच्या प्रतिष्ठेपुढें आपल्या भावाचें सुख त्याला कांहींच नाहीं. विहाराला फसविण्याच्या व्यूहावर तर पुनर्विवाहाची सर्व भिस्त, असें असतां मनोहरपंत स्वतः कांहीं युक्ति सुचवीत नाहीं तर नाहीं, पण चकोरानें सुचविलेल्या युक्तीसहि मोडा घालतो; व शेवटीं—"येवढें खरें कीं, परकीयांच्या कारस्थानामुळें व स्वकीयांच्या खरेपणामुळें मी आणि चंद्रिका जन्मभर दुःखांत राहणार!" असा तीक्ष्ण वाक्प्रहार करून चकोर त्रागा करण्यास निघतो, तेव्हां कोठें, "खोटें सांगणार नाहीं व खरेंही बोलणार नाहीं" अशा दुटप्पी शर्तीवर तरंगिणी मेल्याचें पत्र घेऊन जाण्यास तो तयार होतो. तात्पर्य, अशा रीतीनें हें पुनर्विवाहाचें महत्कृत्य घडवून आणण्याचें काम बहुधा ज्याचें त्यावरच म्हणजे एकट्या चकोरावरच पडतें! म्हणजे अहेतुक व सहेतुक दुःख याचा जो भेद वर आम्हीं सांगितला त्या भेदास अनुलक्षून पाहतां, चकोराच्या कृत्यास सर्व खटपट स्वतः केल्यानें मिळावी तितकी सहानुभूति मिळत नाहीं. चंद्रिका तर अज्ञान, तिच्या तर्फेनें असें खटपट करणारें मनुष्य चकोराशिवाय दुसरें कोणीही नाहीं. परंतु तेंच चंद्रिकेकरितां रडणारीं आईबापें असतीं व तिच्या फटफटीत कपाळाकडे पाहून दुःख होत असल्यामुळें त्यांनीं निर्धार करून तिच्या सुखाकरितां म्हणून पुनर्विवाहाची खटपट केली अशी कल्पना कवीनें केली असती, तर लोकांच्या अनुकंपेस कदाचित् पाझर फुटण्याचा तो एक राजमान्य असा मार्ग होता.

तात्पर्य, सतरा वळसे दिले तरी या बाबतींत गांठ एकच, व ती ही कीं, पुनर्विवाहास लोकांची संमति मिळावी असें होतें तर नाटककर्त्यानें करुणरसाचा आश्रय हल्लींहून अधिक करावयास पाहिजे होता, व ज्या दुःखाचा उपशम करण्याकरितां समाजानें दयेची भिक्षा घालावयाची, तें दुःखहि परार्थमूलक दाखवावयाचें होतें. आतां पुनर्विवाहविषयक नाटक अमुकच तऱ्हेनें लिहावें म्हणजे आम्हीं या सुधारणेस आपली संमति देऊं, असें वचन समाजानें थोडेंच दिलें आहे म्हणा! परंतु एकंदरीनें विचार करितां वरील प्रकारच्या गोष्टीवर संविधानकाची रचना झाली असती तर अधिक बरें झालें असतें, असें माझ्या अल्प समजुतीस वाटतें. या दृष्टीनें हल्लीं जें

दोष म्हणून दिसतात ते वगळल्यानें isolation of phenomenon या तत्त्वाचाही अंगीकार करितां आला असता; व हें तत्त्व कोणत्याही समाजसुधारणेच्या कामांत तरी अवश्य अंगीकृत करावें लागतें. अमुक एक सुधारणा करावयाची झाली तर तें एकच कलम सर्वस्वी निर्दोष अशा परिस्थितींत जगापुढें ठेवलें असतां त्यास जनसंमति मिळण्याचा जितका संभव असतो, तितका तेंच कलम इतर वादग्रस्त अशा कलमांशीं मिसळून इतर रीतीनें सदोष अशा परिस्थितींत ठेविलें असतां नसतो. कोणतीहि सुधारणा ही एकधान्याचे फराळाप्रमाणें निर्मळ असावी, ती खिचडी नसावी कीं ज्यांत काय वाटेल तें घातलें आहे. पुनर्विवाहाचीच गोष्ट घेतली असतां कित्येक अविचारी सुधारकांचे अत्याचारी कृतीप्रमाणें त्यांतच जातिभेदछेदन, त्यांतच अति प्रौढविवाह, त्यांतच गणगोत्रपद्धतीचा उच्छेद, वगैरे सर्व प्रकारच्या कमीअधिक वादग्रस्त सुधारणांचा समावेश करून त्या एका कामांत उरकून घेऊं नये. अशा पंचमेळ सुधारणेस अर्थातच समाज वाईट मानितो, व इष्ट सुधारणेस योग्य तो न्याय मिळत नाहीं. परंतु तेंच इष्ट सुधारणेचें फक्त एकच कलम नेमकें समाजाच्या पुढें मांडून, त्याला विनवून अनुज्ञा मागितली असतां त्यास विचारच पडेल. समजा, अमुक एका गोत्राची कोंकणस्थ ब्राह्मणाची फक्त आठ दहा वर्षांची मुलगी लग्नास उभी आहे व सप्तपदी होते न होते तोंच तिचा पति वारला, अशा स्थितींत आईबापांनीं दुःखसमुद्रांत पडल्यामुळें, मनाचा निर्धार करून, गणगोत्र एरवीं पाहावयाचें तसेंच पाहून योग्य असा कोंकणस्थ ब्राह्मणाचा मुलगा प्रथमवर पाहून कुटुंबांतील सर्वांच्या संमतीनें पुनर्विवाह केला, तर अशा पुनर्विवाहावर जनमत व्यक्त होण्याचा प्रसंग आल्यास फक्त धर्माचे कट्टे अभिमानीच तेवढे दूषण देतील. परंतु ते देखील अशा आईबापांस निष्ठुरपणा न दाखवितां दयाच दाखवितील. मग सुशिक्षित व पुनर्विवाहास अर्धवट कबूल असणारे लोक दया दाखवितील यांत कांहीं नवल नाहीं. परंतु अशा प्रकारचा पुनर्विवाह न करितां अत्याचाराचा पुनर्विवाह केला, म्हणजे कोठली तरी धरली एक प्रौढ नवरी, कोठला तरी आला एक लग्न करण्यास अधीर झालेला नवरा; मग कोणी जात पाहिली नाहीं, गणगोत्र पाहिलें नाहीं, व केवळ शारीरिक प्रेमाखातर 'बाप महमदखान आणि आई साळूबाई' असें एका मेळयाचे पद्यांत म्हटल्याप्रमाणें केला पुन-

र्विवाह ! असो; तर इतर कोणत्याहि रीतीनें नांव न ठेवतां येईल अशा परिस्थितींतला पुनर्विवाह जर लोकांपुढें येईल, तर समाजाची कृपा लवकर होईल व याचकरितां या नाटकांत पुनर्विवाहाची जी परिस्थिति वर्णिलेली आहे, ती त्याहीपेक्षां लोकांस अधिक आवडणारी, अधिक निर्दोष, अधिक गंभीर मनोवृत्ति उत्पन्न करणारी व अधिक करुणरस परिपोषक असती तर बरें झालें असतें. हा आक्षेप उगाच कांहीं तरी काढावयाचा म्हणून काढलेला नाहीं. कारण वाटेल ती एक गोष्ट अनेक रीतींनीं करतां येते, व ती अमुक रीतीनें केली ती तमुक रीतीनेंहि करितां आली असती असें वाटेल त्यास सहज म्हणतां येईल. परंतु माझें म्हणणें तसें नाहीं; तर ज्या हेतूनें हें नाटक लिहिलें गेलें आहे, त्या हेतूचे दृष्टि-नेंच या सूचना मीं केल्या आहेत.

'मतिविकार' नाटकाच्या हेतूच्या फलप्राप्तीच्या दृष्टीनें येथवर विवेचन झालें आतां 'नाटक' या दृष्टीनें या ग्रंथाचें परीक्षण आपण थोडक्यांत करूं. नाटकाच्या दृष्टीनें पुष्कळ लोकांनीं यास नांवें ठेविलीं आहेत. परंतु या बाबतींत मात्र जितका न्याय व्हावयास पाहिजे तितका होत नाहीं असें मला वाटतें. धार्मिक व सामाजिक दृष्टीनें हें नाटक म्हणजे समाजावर एक संकटच अवतरलें आहे असें ज्यांस प्रामाणिकपणानें वाटत असेल त्यांनीं वाटेल तर तें हातींहि घेऊं नये. परंतु नाटक या दृष्टीनें टीका करण्याचा आव घालून मध्येंच धार्मिक आक्षेप घुसडून द्यावयाचे म्हणजे, तोंडानें बोलण्याचा आव घालून मध्येंच प्रतिपक्षी गैरसावध असतां त्याच्या कपाळांत भलें मोठें लाकूड घालून त्यास ठार करण्यासारखें आहे. नाटक या दृष्टीनें पाहतां तें जरी सर्वोत्कृष्ट आहे असें म्हणतां येणार नाहीं, तरी त्यास उकिरड्यावर फेंकून देण्याची सूचना कित्येकांनीं केली आहे तीहि बरोबर नाहीं. खुद्द कोल्हटकर यांचे नाटकांत जरी याचा पहिला नंबर लागणार नाहीं, तरी त्यांचे टीकाकार ज्यांस माना तुकवितील किंबहुना हल्लीं तुकवीत आहेत अशा कित्येक नाटकांपेक्षां तें काव्य व नाटक या दोन्ही दृष्टींनीं बरेंच चांगलें आहे असें निर्विवाद सिद्ध करून देतां येईल. चटकदार संभाषणें, सरस कोट्या, काव्यपूर्ण अशीं पद्यें, प्रतिभादर्शक प्रसंग वगैरे कोल्हटकरांच्या कृतींतील नेहमींचे गुण, व तसेंच कठिणशब्दपूर्ण कविता, कोट्या करण्याची अनावर हौस, वगैरे दोष त्यांच्या

इतर नाटकांप्रमाणें यांतहि असे उतरले आहेत कीं, हें नाटक कोल्हटकरांनींच लिहिलें असलें पाहिजे असें, मलपृष्ठावर त्यांचें नांव नसतें तरी, कोणींहि म्हटलें असतें.

नाटक या दृष्टीनें विचार करावयाचा असतां मला असें वाटतें कीं, यांतील संविधानक त्यांच्या इतर नाटकांतील संविधानकापेक्षां बरेंच सोपें झालें आहे. त्यांत 'गुप्तमंजूषा' प्रमाणें फाजील भानगड व गुंतागुंत नाहीं. त्यांचे नेहमींचे पद्धतीप्रमाणें या नाटकाची अखेरची जुळवाजुळव बरी साधली आहे; तथापि 'मूकनायकां'तील अखेरच्या प्रसंगाप्रमाणें यांतील प्रसंग उदात्त व रसपूर्ण असा वाटत नाहीं, आणि 'वीरतनय' वाचून जी एक प्रकारची शुद्ध भावना मनावर राहते, ती या नाटकाचे शेवटीं राहत नाहीं. चंद्रिका व तिच्या सख्या यांच्या प्रवेशांत प्रेमळपणा बराच उत्पन्न होतो. चंद्रिका व चकोर यांच्यामधील तुळशीकट्यावरच्या प्रसंगाचा पहिला भाग बराच करुणामय आहे. मनोहर व सरस्वती यांचे एक दोन प्रसंग निःसंशय उदात्तविचारपोषक आहेत. व कोल्हटकर यांचा जो विशेष गुण म्हणजे विनोद, त्यासंबंधानें पाहतां आनंदराव व सरस्वती यांचा प्रवेश व विहाराचे शाळेंतील एक दोन प्रवेश फारच चांगले साधले आहेत. कित्येक कोट्या तर फारच बहारीच्या आहेत. आतां रा. कोल्हटकर यांच्या बहुतेक कोट्या जुन्या धर्माभिमान्यांस न रुचणाऱ्या अशा विषयावर असल्यामुळें अशा मतांच्या वाचकांस त्यांचा आस्वाद मोकळ्या मनानें घेतां येत नाहीं याबद्दल मात्र वाईट वाटतें. परंतु या बाबतींत दोष नाटककर्त्याकडे नाहीं. तसेंच या नाटकांत कोल्हटकर यांनीं जुन्या व नव्या दोन्ही प्रकारच्या मतांवर अगदीं निःपक्षपातीपणानें शिस्त धरली आहे हें कोणासहि कबूल करावें लागेल. इकडे विहार तर इकडे आनंदराव, पुनर्विवाहाचें जन्मभर मंडन करून स्वतःवर वेळ आल्याबरोबर सतरा पिढ्या पलीकडच्या आजीबाईच्या नाखुषीच्या पडद्याचे आड दडणारा कोल्हटकरांचा सुधारक वीर कोण हें कोणास सांगावयास कां पाहिजे ?

पात्रांचा विचार करितां बराच मतभेद होण्यासारखा आहे. या नाटकांतील नायक कोण व नायिका कोण म्हणावी याचा निर्णय करणें कठिण आहे. भरत नाट्यशास्त्रांतील नायकनायिकांबद्दल सांगितलेल्या नियमांस आधुनिक नाटककारांनीं कधींच फांटा देऊन टाकला आहे. अशा

स्थितींत नायक व नायिका हीं नांवें द्यावीं तरी कोणास ? नाटकांत जें सर्वांत अधिक नीतिमान् पात्र दाखविलें असेल त्यास नायक म्हणावें असें म्हटलें तर मनोहर हा नायक होईल; मात्र तो नायक होण्यास फारच passive किंवा मठ्ठ दाखविला आहे. त्याचे ठिकाणीं कर्तृत्वाचें तेज मुळींच झळकत नाहीं. नीतिमत्तेच्या दृष्टीनें नायिका चंद्रिका होईल. ज्यांचा अखेर विवाह लागून नाटक संपतें तीं नायक—नायिका म्हणावीं तर चकोरचंद्रिका हीं होतील. पण चकोर हा अगदीं पोरकट असा दिसतो, त्याच्यांत उदात्त-पणा मुळींच नाहीं. व चंद्रिकेपेक्षां सरस्वतीचें जें चरित्र दाखविलें आहे त्यावरून तीच नायिकेच्या मानास अधिक पात्र होईल. वास्तविक विहाराचे प्रतिज्ञाभंगावर सर्व कथानक अवलंबून आहे. व तो जर 'नायका'चे मानास हक्क सांगण्यास पुढें सरसावला तर त्याला मागें हटविणें जड जाईल. तथापि इतका थिल्लर मनुष्य आपल्या नाटकाचा नायक असें कबूल करण्यास स्वतः नाटककार तयार होतील असें वाटत नाहीं. तात्पर्य, कदाचित् Thackeray याचे Vanity Fair प्रमाणें या नाटकास A Drama without a hero असें म्हणावेसें वाटतें, व रा. कोल्हटकर हे जडपरंपरेचे कट्टे शत्रु असल्यानें त्यांना ही गोष्ट पसंत पडण्याचा संभव आहे.

नायक व नायिका हीं कोणीहि ठरोत, परंतु ही गोष्ट निश्चित आहे कीं, मनोहराबद्दल अखेरपर्यंत आदर वाटतो. मात्र तो सुधारणावादी, धाकट्या भावावर प्रेम करणारा, व त्याचें सुख पाहणारा असल्यानें पुनर्विवाह जुळवून आणण्याचें काम त्यानें सर्वस्वीं आपल्या शिरावर घेणें अधिक शोभलें असतें. चकोराचे पात्राबद्दल मनावर मुळींच कसा तो ठसा उमटत नाहीं. तो जपानाहून विद्या शिकून येतो व स्वदेशबांधवांस कर्तृत्वशून्यतेबद्दल शिव्या देतो खरा, पण त्याचें स्वतःचें कर्तृत्वाचे नांवानें भोंपळ्याएवढें पूज्य. एक तर अथपासून इतिपर्यंत सामाजिक स्थिती-खेरीज--आणि तीहि एका विशिष्ट बाबीसंबंधानेंच--त्याला स्वदेशाबद्दल वाईट वाटलें आहे असें दिसत नाहीं. त्यानें स्वतः येऊन जाऊन जी काय तरवार मारली, जें काय कर्तृत्व दाखविलें तें वैराग्याचें सोंग घेऊन चंद्रिकेस एकटी गांठण्याचें धाडस केलें हें होय. पण अखेर त्याच्या प्रिये-देखत सर्वांनीं त्याच्या तोंडांत शेण घातलें तेव्हां निमूटपणें खालीं मान घालून तें त्यानें गिळलें. विहारानें कायद्याची भीति घातली, त्याला तरी

रोकडा जबाब त्यानें द्यावयाचा होता! अखेर दुसऱ्याचा पोषाख घालून बाळसंतोषासारखा हास्यास्पद होऊन प्रेक्षक वर्गापुढें जेव्हां तो उभा राहतो, तेव्हां तर त्याचेबद्दल तिटकाराच वाटतो; व जपानाहून विद्या शिकून येऊन स्वदेशबांधवांस लाखोली वाहणाऱ्या तरतरीत सुधारक वीराची हीच कां कर्तबगारी? असें म्हणून जो तो त्याला नाक मुरडील यांत अगदीं शंका नाहीं. पुढें स्वतःचे पुनर्विवाहाबद्दल तो होऊन युक्ति सुचवितो, व वडील भावानें असत्याचा आश्रय करावा अशाबद्दल आग्रह धरितो, पण तो कबूल होत नाहीं. पितृसम ज्येष्ठ भ्राता आपली दानत न टाकतां सत्य-भाषित्वाचाच अभिमान धरितो तेव्हां त्यावर त्रागा करून, असत्यकथन नाहीं तरी निदान सत्यगोपन करण्यास तो त्यास भाग पाडतो, व शेवटीं कायती एक विधवा नवरी मिळवून जिवाची धन्यता मानतो तेव्हां त्या-बद्दल प्रेम तर नाहींच पण खंती मात्र उत्पन्न होते. हाच चकोर जर स्वतःच्या पुनर्विवाहाहून दुसरी एखादी देशकार्याची गोष्ट अंगीकारून, तिकडे मन गुंतून जाऊन, स्वतः अविवाहित राहून, चंद्रिकेबरोबर तिचें वैधव्यदुःख भोगण्याची तयारी दाखविता, आणि बंधुप्रेमामुळें मनोहरच उलट त्याचे मागें लागून, ज्याप्रमाणें आपल्या इकडे कांहीं आईबाप विधुर झालेल्या पुत्रास "तूं फिरून लग्न कर नाहीं तर आम्हीं काशी-यात्रेस निघूं" असा आग्रह धरतात तसा त्यानें प्रेममूलक आग्रह धरल्या-मुळें, व स्वसुखलालसेपेक्षां बंधूची आज्ञा पाळण्याच्या या हेतूनें, चकोर पुनर्विवाहास तयार झाला असें दाखविलें असतें तर मात्र या जपानाहून आलेल्या सुधारक वीराचें चीज आम्हीं केलें असतें. नुसतें स्वसुखपरायण बनावयाचें व नुसतींच विधवांचीं लग्नें लावीत बसायचें तर मग त्याला जपानाला जा व दहापांच हजार रुपये खर्च करा, इतका खटाटोप तरी कशाला पाहिजे होता?

तात्पर्य, चकोरावर आम्ही अगदीं नाराज आहों. विहाराचें पात्र रंग-विण्यांत थोडीबहुत अतिशयोक्ति झाली आहे. मागें सांगितल्याप्रमाणें, विधुरावस्थेचा अनुभव येऊन परस्त्रीदर्शनानें त्याच्या मनाची चलबिचल होऊं लागली. इतकें होतांच तो उमजता व आपला प्रतिज्ञाभंग कबूल करून, त्याच्या परिणामानें कल्याणीकडे मोर्चा न फिरवितां स्वतःचे निरा-श्रित भगिनीचे दुःखी स्थितीकडे वळता, व इकडे मनोहर तर तिकडे

विहार परोपकार बुद्धीनें या पुःनर्विवाहाच्या खटपटीस लागते तर फार मौज झाली असती. परंतु विहार या पात्राची रचना नाटककर्त्यानें विनोद-भूमिका म्हणून योजली असून पुनर्विवाहास प्रतिकूल असणाऱ्या पुरुषा-वरचा राग त्याजवर काढण्याचा नाटककर्त्याचा निश्चय उघड असल्यामुळें, वेळोवेळीं त्याचेच तोंडून त्याची फजिती पाहून आम्हांसहि समाधान व गंमत वाटते. हरिहर शास्त्र्याच्या जातीला क्षय लागलेला असून त्याच्या प्रतिमा आज समाजांत क्वचितच सांपडतील. हरिहरशास्त्री हा जसा विधवा-धर्माचा स्तंभ, तसेंच उलटपक्षी 'दंडधारी' नाटकांतील 'काकशीर्षा' सारखे 'विधवांचे कनवाळू' सुधारक समाजांतहि आढळतात, मग धर्मा-भिमान्यांवरच असल्या निंद्य पात्रांच्या द्वारें आग पाखडण्यांत काय अर्थ आहे? आनंदराव हें पात्र हल्लींच्या समाजस्थितींत मधून मधून आढळतें. म्हातारपणीं लग्न करण्याचा त्याचा षोक, आपल्या नव्या नवरीस निबंध वाचून दाखवून स्त्रीधर्म व पतिप्रेम शिकविण्याचा भोळाभाव, 'हेंहि बरो-बर आहे, तेंहि बरोबर आहे,' असें म्हणण्याचा स्वभाव, समाजसुधारणे-बद्दल तोंडची सहानुभूति परंतु आपल्यावर प्रसंग आला असतां माघार घेऊन खोटया सबबी सांगणें वगैरे गोष्टींनीं तो हास्यास्पद होतो. परंतु मनोहराचे नीतिमत्तेबद्दल खात्री असल्यामुळें त्याजवर आपल्या स्त्रीचें शिक्षण सोंपविण्याचा त्याचा निर्धार, व त्यामुळें त्यास अखेर मिळालेलें चांगलें फळ, यांनीं त्याबद्दल सहानुभूति वाटते.

स्त्रीपात्रांसंबंधानें पाहतां चंद्रिकेचे एक दोन प्रवेश आहेत, तेवढ्या-वरूनच तिजविषयीं आदर वाटतो. सावत्र आई वाईट स्वभावाची अस-तांहि तिला वडीलपणाचा योग्य मान देण्याची तिची बुद्धि, सौभाग्यालंकार स्वीकारण्याचा तिच्या मैत्रिणींनीं जो आग्रह धरिला त्याचा प्रेमळपणानें व दृढनिश्चयानें निषेध करून आपल्या नशिबीं आलेलें दुःख कोणास दोष न देतां सोसण्याची तिची तयारी, वगैरे तिच्या गुणांबद्दल सहानुभूति वाटते; व सर्व नाटक पाहून अगर वाचून जर पुनर्विवाहाबद्दल सर्वस्वीं अनुकूल असा ग्रह झाला नाहीं तर त्याचा दोष चंद्रिकेकडे खास येत नाहीं असेंच म्हणावें लागतें. सरस्वती ही दुदैवानें वाईट अशा परिस्थितींत आपल्या नजरेपुढें येते. या स्थितीबद्दलचा दोष तिजकडे आहे असें नाहीं, तर तिच्या नवऱ्याकडे व मनुष्यस्वभावाकडे आहे. तरी पण

त्यांतल्या त्यांत ती हरिहरशास्त्र्याची खरडपट्टी काढते व मनोहरावर प्रेम असतांहि त्याच्या सात्त्विक उपदेशामुळें शेवटीं नीतिपथावर येते, या गोष्टी-मुळें तिच्याबद्दल तिटकारा असा येत नाहीं. मात्र तिच्या तोंडीं कामवशतेचीं दर्शक अशीं अत्यंत उत्तानार्थपूर्ण जीं कांहीं वाक्यें नाटककारांनीं घातलीं आहेत तीं न घालतां तो आणीबाणीचा प्रसंग सूचक अशा गोष्टींनीं मारून नेला असता तर बरें झालें असतें. राहतां राहिलें वेणूबाईचें पात्र. या पात्राचा प्रत्येक प्रवेश व भाषण किळसवाणें वाटतें. हें पात्र नाटककर्त्यानें अजिबात गाळावयास पाहिजे होतें, निदान तिची स्थिति आत्मगत भाषणें वगैरेंनीं अंधुकपणेंच दाखवावयाची होती. समाजांत अशा स्त्रिया असतात एवढ्याच सबबीवर त्यांस रंगभूमीवर ओढून त्यांच्या व त्यांना खराब करणाऱ्या नराधमांच्या तोंडून अमंगळ व किळसवाणे असे संवाद वदवा-वयाचे, तर मग त्याच कारणाकरितां आणखी अनिर्वाच्य अशा इतर शेंकडों गोष्टी रंगभूमीवर आणाव्या लागतील; परंतु त्यांस रा. कोल्हटकर हे तयार होतील असें वाटत नाहीं. तरंगिणीचे पात्राबद्दल विशेष लिहिण्याचें कारण नाहीं. यःकश्चित भांडणावरून नवऱ्यास सोडून जाऊन, जीव दिला असें पत्र पाठवून, विधवाश्रमांत शिरून, तेथें बरेच दिवस नुसत्या गुज-राथी बुरख्याचे जोरावर खुद्द नवऱ्याशीं लपंडाव खेळणारी व शेवटीं त्यास फशीं पाडणारी स्त्री हिंदुसमाजासंबंधानें पाहतां एकविसाव्या शतकांतलीच होय. परंतु अशा स्त्रीशिवाय या कथानकांत निभाव नव्हता, व म्हणून हा सर्व तिचा खेळ जरी अस्वभाविक दिसतो, तरी तें केवळ अवतार-कृत्य असें समजून स्वस्थ बसण्यास आमची कांहीं हरकत नाहीं. तात्पर्य, मनो-हर, चंद्रिका, सरस्वती, विहार व आनंदराव या पात्रांची योजना निव्वळ नाटक या दृष्टीनें, हेतुसिद्धीचे दृष्टीनें नव्हे, बरी आहे असें आम्हांस वाटतें. मनोहरांत थोडें अधिक कर्तृत्व व चकोरांत जरा अधिक भारदस्तपणा, विद्येस साजण्याच्या कल्पना व कृत्यें, यांची भर पडली असती तर नाटक अधिक खुललें असतें.

हें पात्रांच्या स्वभावाविषयीं झालें. परंतु पात्रांच्या भाषेविषयीं आमची एक मुख्य तक्रार आहे. ती ही कीं, सर्व पात्रें जवळ जवळ सारखींच व तींहि फारच प्रौढ व सुसंस्कृत भाषा बोलतात. संस्कृत भाषेचें झालें तरी 'सत्पात्रीं' च दान पाहिजे. पात्रभेदाला अनुसरून भाषावैचित्र्य दिसत

नाहीं. गोल्ड–स्मिथ यानें जॉनसनच्या Irene नामक नाटकांतील पात्रांच्या भाषेसंबंधानें जें वर्णन दिलें आहे, तेंच कदाचित् या नाटकांतील पात्रांस लावतां येईल. Even his little fishes talk like whales. कोल्हटकर यांची नाटक पात्रांनीं बोलण्याची भाषा पुष्कळच ठिकाणीं लिहिण्याच्या किंबहुना निबंधाच्या भाषेसारखी असते. परंतु जेव्हां स्त्रियांच्याहि तोंडांत ती भाषा येते, तेव्हां ती फारच बोजड वाटते. हिंदुस्थानांतहि अंगणांतला केर काढणाऱ्या बटकीसुद्धां संस्कृत बोलत असत, पण तें भोजराजाच्या व कालिदासाच्या वेळीं! असो या बाबतींत वाटतील तितकीं उदाहरणें देतां येतील.

सरस्वती—" माझा यत्न नेहमीं आपल्या इच्छेप्रमाणें वागण्याचा असतो." (पान १३)

" आपण जर स्वतःला शोभेशी प्रगल्भ वयाची व बुद्धीची गतभर्तृकाच बायको केली असती तर इ. (१६)

(पृष्ठ ९९) " आपणाला वाटतें कीं, पुनर्जन्म इ. हें भाषण खुद्द हर्बर्ट स्पेन्सरनें लिहावें त्याप्रमाणें घातलें आहे.

कमला—" आम्हीं शुद्धभावानें लाविलेलें लग्न, भटांनीं दक्षिणेच्या लोभानें केलेल्या लग्नापेक्षां हजारपट बरें " हें बोलणारी मुलगी गौर मांडून खेळणारी ८।१० वर्षांची आहे.

सरस्वती—" प्रेम ही अशी वस्तु नाहीं, कीं ती कोणी आपणाला अर्पण केली म्हणजे उलट त्यासारखी वस्तु ऋणविमोचनादाखल देतां येईल. (पा. ४०)

तरंगिणी—" सरकार वर्तमानपत्रांच्या तोंडाला कुलुप लावतें, तेव्हां एकच हाकाटी होते "!! (पान ५१)

सरस्वती—" शृंगाराच्या भोक्त्यांना वैराग्यपर असा अर्थ कसा रुचणार? " (पान ५७)

चंद्रिका—" न्यायाच्या दृष्टीनें केलेला हा विचार शास्त्राच्या आणि रूढीच्या दृष्टीनें कसासाच दिसतो " (पान ६९)

सरस्वती—" अशा स्त्रीचा प्रेमळ पती दुर्दैवानें गत जरी झाला, तरी त्याच्या सुखकर सहवासाची आठवणसुद्धां मजसारख्या अभागिणीच्या विवाहसुखापेक्षां शतपट बरी " (पान १०२)

पुरुषांच्या बोलण्यांत लांबलचक व गुंतागुंतीचीं वाक्यें आलीं तर तीं

कदाचित् अधिक क्षम्य होत. परंतु तीं कांहीं कमी रसहानिकारक नसतात. उदाहरणार्थ—" किनाऱ्यावर जमलेल्या मंडळींतून तुम्हांला अचुक शोधून काढल्यानंतर तुम्हांला भेटण्यापूर्वीची व नंतरची माझी जी स्थिति झाली, तिचें तुम्ही इतकें हुबेहूब वर्णन दिलें कीं, मला त्यापेक्षां अधिक कांहींच सांगावयाचें नाहीं " ( पान ३ ) हें चकोराचें वाक्य सातव्या यत्तेंतील मुलांस Analysis करण्यास विकट उदाहरण म्हणून देतां येईल. असले दोष थोड्याशा प्रयत्नानें निघणारे आहेत हें अर्थात् सांगावयास नकोच.

रा. कोल्हटकरांवर ते पद्यें कठिण करितात असा आक्षेप आहे व तो कांहीं अंशीं खराहि आहे. या बाबतींत मागें त्यांच्या वीरतनयावर एक टीका आली होती, तेव्हां तीस उत्तर न देतांना त्यांनीं खालीलप्रमाणें उद्गार काढले होते—" सुगमता ही काव्याचें फारच गौण अंग आहे. सुंदर विचार दुर्बोधतेशिवाय आणतां येत नसतील; तर ते न येण्यापेक्षां सुगमता न आलेली पुरवली " हें कदाचित् खोलींत बसून कोशाच्या सहाय्यानें वाचण्याचे काव्यासंबंधानें बरोबर असेल; परंतु जीं पद्यें नाटकांत डबल पेटीच्या दणदणाटामध्यें तिमजल्यापर्यंत ऐकू जाण्याची अपेक्षा असते त्यांस हा नियम लागू करतां येत नाहीं. शिवाय प्रसाद हा जो काव्यगुण मानिलेला आहे, त्याचें मग काय करावयाचें ? कल्पना सुंदर असून जर ती सोप्या भाषेंत—प्रसादयुक्त भाषेंत—घालतां आली तरच त्याची मौज; नाहीं तर मग गद्यच कां लिहूं नये ! पद्य करण्याचे श्रम तरी कां घ्यावे हें कळत नाहीं. पण सर्वांहून अधिक हें कीं, जी गोष्ट करतां येणें अशक्य असें कोल्हटकर वरील शब्दांनीं ध्वनित करितात तीच गोष्ट स्वतः कोल्हटकरांसच उत्तम करितां येते असें दाखविलें म्हणजे मग ? याचीं थोडींशीं उदाहरणें देतों.

वीरतनयांतील "श्यामकवचावरि घालुनियां"—" आजवरी जनक देइ जन्म सुताला " " नीज सुखें विश्रांतिसि पात्र ही निशा " हीं पदें; तसेंच मूकनायकांतील " ओष्ठ असति कोमल " हें पद किंवा " असे कालाचि जी भगिनी " हें, किंवा हल्लींच्या ' मतिविकारांतील ' " तो नीलकंठ दयाळु " " वेष योग्य हा, " किंवा " प्रेमें मज शिशुपणांत " " माता करी प्रीति " किंवा " सुंदर वदन नसेल कसें " किंवा " सुभगग भरतभूप्रती " या पद्यांतील कल्पना किती तरी उत्कृष्ट असून शिवाय त्यांत प्रसादगुणहि आहे; असें असतां नसतें कारण लावण्यांत काय अर्थ आहे ? सरळ गोष्टीस आड-

रानांत कां शिरावें हें कळत नाहीं. कोल्हटकरांनीं प्रांजलपणें डिफेन्स द्यावयाचा म्हणजे हवा तर असा द्यावा कीं, " प्रसादगुण नेहमींच कोणास साधतो असें नाहीं. " किंवा " मी घ्यावी तितकी काळजी घेत नाहीं. " किंवा " चाल कठिण, ताल कठिण, कल्पना अवघड या सर्वांचा मेळ पड-ल्यामुळें सरकशींत तारेवर कसरत करणारा ज्याप्रमाणें वाटेल तसे अंग-विक्षेप करून फक्त न पडतां कसें तरी अंग सांवरीत असतो, तसेंच मला केव्हां केव्हां कसे तरी शब्द घालून कशी तरी रचना करून ताल व यमक व अनुप्रास संभाळावे लागतात झालें " असें म्हणावें. वर त्यांनीं जो डिफेन्स दिला आहे, तो आम्हांस तरी मंजूर नाहीं, निदान अमक्या कल्प-नेच्या पद्याला अमुकच चाल किंवा अमुक इतकेच चरण घाला अशी जोंपर्यंत त्यांच्या डोक्यावर कोणी गोणी दिली नाहीं तोंपर्यंत तरी तो मंजूर होणार नाहीं.

रा. कोल्हटकर यांच्या कल्पना फार उत्कृष्ट व प्रतिभातेजोमय असतात, हें कबूल आहे; पण त्या व्यक्त करणारे शब्द कित्येक वेळां फारच अव-जड, बोजड, संस्कृत कोशाच्या कानाकोपऱ्यांत सांपडणारे असे असतात. याचीं कांहीं उदाहरणें देतों. " पुलकें खचिलें सगळें प्रचुरें " 'प्रेमौघ झरे' ( प्रेम पाझर सुटतो ). " त्रासेन कसा स्वासुसि विग्रहधारी " म्हणजे ( मी आपल्या मूर्तिमंत अशा प्राणांस कसा त्रासेन ) " जगिं परिमित आत्मवृं-दज्या " हें सर्व पद "त्यजुनिसरिदुदक हृद्गत निर्झर करित खुलें " " पर-स्परीं प्रसक्ति घडवोनि विजयशाली " " ना तरि योग्य तदाख्या तिजसि " " मनि शंकूं नका यौवना पूर्णबिंबा, द्या करालंबा " इ. तसेंच पुष्कळ ठिकाणीं अपप्रयोग, इंग्रजी धरतीवरचे प्रयोग वगैरे कानास वाईट लागतात. जसें:—" साधु संधि ही स्वर्णमया " ( golden opportunity ) " थोर वय निरखिण्याचे दैवीं नसे ". " जगिं परिमित आत्मवृंदज्या ' हें सर्व पद काव्यापेक्षां न्यायशास्त्रांतील उदाहरण अधिक शोभेल. " तुम्हीं जें बाबांना वचन दिलें तें त्यांच्याहि अपेक्षे पलीकडे पाळल्यामुळें " " अजाण बालक चुके कधीं भ्रमिं । ह्या करुणेमधिं " " ती वयानें तुमच्या सख्ख्या बहिणीसारखीच " " ( वयावरून बहिण सख्खी कीं सावत्र कसें ओळखावें ? नाटककाराचा भाव वयानें धाकट्या बहिणीसारखी असा म्हणण्याचा दिसतो " ) " तुमच्या व माझ्या पापाचा साक्षीदार " हे कानांस इंग्रजी

लागतें. पृष्ठ ३८ यामध्यें पर्जन्यकाल, वीज व मेघ यांचें वर्णन देतांना विश्वंभरास "भूमंडळ रुपी कढईस विद्युद्रूपी कथिलानें कल्हईच देत आहे कीं काय " ही कल्पना फारच ग्राम्य वाटते. थट्टा व विनोद करण्याचा उद्देश असता तर ती कानाला चांगली लागली असती पण पूर्वापर संबंध तसा नाहीं. पृष्ठ १७ मध्यें आनंदराव—सरस्वतीची व मनोहराची भेट इंग्रजी पद्धतीनें introduction करितो तेंहि कानास कसें-सेंच लागतें.

आतां उलटपक्षीं प्रसादपूर्ण व प्रतिभासंपन्न कवितेचीं उदाहरणें खालील होतः— " धनिपतिवनिता इ० " (पा० ४) " प्रेमें मम शिशुपणांत " (४) " स्त्रीचें दैवत पतिवीण " इ० (१६) " स्थानें एका वस्तुसि " (३०) " वेषयोग्य हा " (६५) " भेटसि कां भिन्न अंगिं " (६७) " दीन वेष दीनेकरितां ' (६८) " जी तुझी असे ती माझी गती " (६८) " सुख न लाधतें " (८३) " जिथें परम रुचि " (९९) माता करी प्रीति इत्यादि. विशेष एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, कोल्हटकर यांचे सर्व नाटकांपैकीं मतिविकारांतील पद्येंच अधिक सोपीं झालीं आहेत. व या बाबतींत खातेउतारा काढला तर वाइटापेक्षां चांगलीं पद्येंच अधिक भरतील. तथापि थोड्याशा काळजीनें घालवितां येण्यासारखा जो बिकट शब्दात्मकरचनेचा दोष तो याहि नाटकांत आढळतो. व रा. कोल्हटकर तो दोष पुढच्या कृतींत समूळ नाहींसा करतील अशी मला उमेद आहे.

पण रा. कोल्हटकर यांच्या प्रस्तुत नाटकावर व एकंदरीनें त्यांच्या लेखांवर जो आक्षेप आहे तो हा कीं, तें लिहिण्यांत म्हणजे, कल्पनांत व शब्दांतहि अश्लीलपणा फार आणतात. व या अश्लीलपणास दुसऱ्या एका दोषाची जोड आहे. तो हा कीं, त्यांची कोट्या करण्याची हौस बेसुमार आहे. या दोन कारणांमुळें कित्येकांनीं तर त्यांचे लेख संभावित वांच-कांनीं हातांतहि धरण्यास योग्य नाहींत असें साफ मत देऊन टाकलेलें आहे. तेव्हां या विषयाबद्दल जो विचार व्हावयाचा तो नीट लक्षपूर्वक होणें जरूर आहे. रा. कोल्हटकर यांचे लेखांत केव्हां केव्हां अश्लील असे विचार व शब्दरचना हीं आढळून येतात ही गोष्ट त्यांच्या स्नेह्यां-सहि नाकबूल करितां येणार नाहीं; मात्र त्यांना कोल्हटकरांच्या तर्फे एवढें खास म्हणतां येईल कीं, पुष्कळदां जेव्हां कोल्हटकरांवर त्यांच्या प्रतिप-

ऱ्यांकडून निंदेचा मारा होतो, तेव्हां ही निंदा अनीतीच्या प्रसाराच्या प्रतिबंधाच्या इच्छेपेक्षां, नावडतीचें मीठ आळणी या न्यायानें, त्यांजवर शिष्टसंमत अशा रीतीनें तोंडसुख घेण्यास मिळावें या इच्छेनें केली जाते. याचें प्रत्यंतर असें आहे कीं, इतर पुष्कळ नाटकांमधून अशाच तऱ्हेची अश्लीलता वगैरे दृष्टीस पडत असतां त्या टीकाकारांचा नीतिमूलक क्रोध प्रदीप्त झाल्याचें कोठें फारसें दिसत नाहीं. पूर्वीची 'तरुणी शिक्षण नाटिका " व हल्लींचा दंडधारी ' हीं बहुधा सख्खीं भावंडेंच म्हटलीं तरी चालेल. व त्यांत अश्लीलता बेसुमार आहे हें प्रसिद्धच आहे. तथापि हल्लींच्या 'मतिविकारा'नें ज्यांच्या मतीमध्यें विकाराची खळबळ करून सोडलेली दिसते त्यांची मति या दोन ग्रंथांसंबंधानें मात्र निद्रावश होते हें आश्चर्यकारक नव्हे काय? परंतु आश्चर्य तरी कसलें? कारण कोल्हटकर यांनीं जें एक मुख्य पाप केलें आहे तें हें कीं, त्यांनीं लेखक व नाटककार या नात्यानें आपली कुशाग्र बुद्धि, आपल्या तिखट कोट्या, व हातीं घेतील त्या विषयाचें पाणी करून सोडणारी विनोदशक्ति या सर्वांचा उपयोग समाजसुधारणेची तरफदारी करण्याकडे केलेला आहे. व त्यांच्या लेखांतील अश्लीलता पुढें ओढून त्यांची होईल तितकी निंदा टीकाकार करितात हें त्या पापाचें प्रायश्चित्तच ते भोगीत आहेत असें म्हटल्यावांचून माझ्याच्यानें राहवत नाहीं. एवढयावरून असें मात्र कोणीं समजूं नये कीं, त्यांच्या लेखांमध्यें जी अश्लीलता किंवा जो फाजील कोटिबाजपणा दिसून येतो तो त्यांच्या व्यवसायी अगर इतर मित्रांस सम्मत आहे. प्रसंग पडेल तेथें या बाबतींत सदरहू नाटककारास जितकें दूषण देणें न्यायाचें होईल तितकें देण्यास ते कधींही मागें पुढें पाहणार नाहींत. मात्र कोल्हटकर यांचा पाडाव करण्यास हें एक बरें मर्मस्थान सांपडलें आहे अशा हेतूनें ते आपली लेखणी चालविणार नाहींत, तर अश्लीलतेचा हा दोष कोल्हटकर यांचे लेखांतून निघून गेला असतां त्यांच्या लेखनकलेस पूर्णत्व येईल या बुद्धीनें!

अश्लीलतेचा हा दोष असा कांहीं चमत्कारिक आहे कीं, तो कोणास कोठें कसा मान्य होईल अगर अमान्य होईल हें ठरविणें मोठें मुष्किलीचें आहे. कारण संस्कृत भाषेंत काय किंवा इंग्रजी भाषेंत काय, मूर्धाभिषिक्त असे जे नाटककार होऊन गेले आहेत, त्यांच्या नाटकांत अश्लीलता सांपडत नाहीं

असें एकहि उदाहरण दाखवितां येणार नाहीं. कालिदास हा जसा संस्कृत नाटककारांचा राजा, तसाच अश्लील विचारांचाहि तो राजा होऊन गेला असें कबूल करणें भाग आहे. रघुवंशाच्या १९ व्या सर्गांत वर्णन केलेला अग्निवर्ण राजाचा विलास, शाकुंतलाचे तिसऱ्या अंकांतील उत्तान–शृंगार-रसपूर्ण असा प्रसंग, व तसेंच विक्रमोर्वशीय वगैरे नाटकांतील व्यभिचारी, कामुक व विलासी अशा नायकांचीं व नायिकांचीं वर्णनें हीं कोणीहि सभ्य मनुष्य मिश्र समाजांत बसून मोकळ्या मनानें वाचील अगर पाहील असें आम्हांस वाटत नाहीं; व "भासो हासः कवि कुलगुरुः कालिदासो विलासः" हें जें मार्मिक वर्णन कवीनें केलें आहे तें अगदीं योग्य आहे. उत्तररामचरित्रासारखें उदात्त व गंभीररसपूर्ण नाटक लिहिणाऱ्या विरागी मनोवृत्तीच्या भवभूतीलाहि मालतीमाधवामध्यें अश्लील प्रकार थोडाबहुत वर्णन करण्याची हुक्की आली व त्यास ती आवरून धरितां आली नाहीं. वरील ज्या श्लोकांत कालिदासास सरस्वतीचा विलास म्हटलें आहे, त्यांतच वाग्देवीसंबंधानें ज्याला पंचबाणाची अर्थात् मदनाची उपमा दिलेली आहे, त्या कादंबरीकर्त्याचे म्हणजे बाणाचे लेख धुतलेल्या तांदुळाप्रमाणें निर्मळ नाहींत हें कोणासहि सांगावयास नको. दंडीच्या लेखांत ग्राम्य व अश्लील असें पुष्कळच आहे. तात्पर्य असा कोणताहि संस्कृत नाटककार नाहीं कीं, ज्याच्या नाटकांत या दृष्टीनें कमी अधिक दोषस्थलें सांपडणार नाहींत परंतु याबद्दल कोणीहि विशेष हाकाटी करीत नाहीं, एवढेंच नव्हे तर असलीं नाटकें युनिव्हर्सिटीचे परीक्षेकरितां ठेवितात. इंग्रजी वाङ्मयासंबंधानेंहि पाहिलें तर असेंच दिसून येतें. शेक्सपियरच्या पूर्वीचे चॉसर, बेन जॉनसन वगैरे कवि अश्लील लिहिणारे होते. शेक्सपियरची तर मजल कोठवर जात होती हें सांगावयास नकोच. सतराव्या शतकांत स्टुअर्ट घराण्यांतील राजे फिरून गादीवर आल्यानंतर व अठराव्या शतकांत, फिल्डिंग विचरले, कॉनग्रिव्ह यांसारखे जे नाटककार कादंबरीकार वगैरे होऊन गेले त्यांनीं तर अश्लील लिहिण्याची कांहीं बाकीच ठेविली नाहीं. यापुढील काळांत झालेला कवि व नाटककार बायरन् याचें डॉन ज्युअन हें काव्य अत्यंत अश्लील आहे. पोप कवि हा इतका शिष्टसंमत नियमानें काव्य करणारा, परंतु त्याच्या ग्रंथांतहि अश्लीलपणा आहेच. तीच स्थिति हल्लींच्या इंग्लंडांतील पिनेरो वगैरेंच्या नाटकांची. तथापि या ग्रंथकर्त्यांचे ग्रंथ उकिरड्यावर फेंकून

दिल्याचें अगर पाटलाचे चावडीवर जाळल्याचें आम्हीं कधीं ऐकलें नाहीं; एवढेंच नव्हे, तर असल्या ग्रंथांसंबंधानें मेकॉले यानें जें मत दिलें आहे, तें ध्यानांत ठेवण्यांसारखें आहे. मेकॉले हा कांहीं अश्लील वाङ्मयाचा भोक्ता नव्हता हें खास. तथापि ले हन्ट (Leigh Hunt) यावरील निबंधांत त्यानें असें म्हटलें आहे कीं—

"We cannot wish that any work or class of 'works' which have exercised a great influence on the human mind, which illustrates the character of an important epoch in letters, in politics and morals, should disappear from the world. If we err in this matter we err with the gravest men and bodies of men in the empire, and especially with the Church of England and with the great schools of learning which are connected with her. The whole liberal education of our countrymen is connected on the principle that no book which is valuable either by reason of the excellence of its style, or by reason of the light which it throws on history, polity and manners of nations, should be withheld from the student on account of its impurity."

आणि मराठी वाङ्मयासंबंधानेंहि हाच नियम लागू करण्यास हरकत नाहीं. एखाद्या ग्रंथांतील अश्लीलता हा कांहीं त्यांतील गुण नव्हे हें उघड आहे; परंतु हा दोष तरी इतका प्रचंड आहे कीं काय, कीं त्यामुळें तो ग्रंथ हातांत धरण्याच्याहि लायकीचा नाहीं, अगर या दोषाची थोडीशी छाटाछूट केली असतां ग्रंथाचें ग्रंथत्वच नाहींसें होईल किंवा काय याचा विचार काळजीपूर्वक करावा लागतो. निदान अश्लीलत्वाचा दोष एखाद्या ग्रंथांत असला तरी त्यांतील गुण म्हणून जे आहेत ते प्रांजलपणें टीकाकारांनीं कबूल करूं नयेत असें तर केव्हांच म्हणतां येणार नाहीं.

रा. कोल्हटकर यांच्या ग्रंथासंबंधानें माझें असें मत आहे कीं, अश्लीलत्वाशीं संश्लिष्ट असलेले विचार हा त्यांच्या ग्रंथांतील स्वारस्याचा आत्मा नाहीं; म्हणजे ते विचार काढून टाकले असतां बाकी जें कवित्व, कल्पनारम्यत्व जी चटकदार व विनोदप्रिय भाषासरणी त्यांच्या लेखांत अवशिष्ट राहते ती त्यांच्या कार्यास किंवा कीर्तीस पुरेशी आहे. ही अश्लीलता त्यांच्या लेखांत केवळ एक 'अन्यथासिद्ध—उपाधि' अशा रीतीनें वास करीत आहे, व

तिच्यापासून ते आपली मुक्तता करून घेतील तर सर्वांचाच त्यांत फायदा आहे. सुमारें १५ वर्षांपूर्वी रा. कोल्हटकर यांनीं आपल्या ग्रंथकर्तृत्वास एका टीकात्मक लेखानें सुरवात केली, त्या वेळीं त्यांनीं या अश्लीलत्वाचे मुद्यावरच रा. पाटणकर यांच्या विक्रमशशिकला नाटकावर फारच प्रखर टीका केली होती. पुढें कांहीं दिवसांनीं त्यांनीं डोंगरे यांच्या संगीत चंद्रसेना नाटकावर टीका केली त्या टीकेमध्यें त्यांचेच शब्द खालीं दिल्याप्रमाणें आहेत.

" अश्लील विचार गाळण्यासंबंधानें आमचें असें मत आहे कीं, नुसती अश्लीलता सर्वथैव निंद्य होय. तीच जर एखाद्या सुंदर विचाराशीं अशा रीतीनें संलग्न असली कीं ती गाळली असतां तो विचारहि आणितां येत नाहीं तर ती क्षम्य असते. कारण अशा प्रसंगीं अश्लीलतेकडे गौणत्व येऊन प्रेक्षकांचें मन त्या सुंदर विचाराकडे वेधून जातें. "

रा. कोल्हटकर यांनीं घालून दिलेल्या या नियमाप्रमाणें त्यांचें वर्तन स्वतःच्या ग्रंथांत झालें आहे असें आम्हांस वाटत नाहीं. एकच उदाहरण द्यावयाचें असतां मतिविकारांतील पृष्ठ १०५ या वरील " मनि शंका नका सेवुं या यौवनपूर्ण बिंबा " इत्यादि पद घेऊन आम्ही रा. कोल्हटकर यांस असें विचारतों कीं, यांत अशी कोणती सुंदर अलौकिक कल्पना होती कीं या पदांतील कांहीं कांहीं शब्द बदलल्यानें त्या कल्पनेची व तिजबरोबर पुस्तकाची सर्वस्वी हानि झाली असती ? हें पद विक्रमशशिकलेंतील सर्वांत अश्लील पदा इतकेंच अश्लील आहे. मात्र फरक इतकाच कीं जिचे तोंडीं हें पद घातलें आहे ती सरस्वती, कोल्हटकरांसारख्या विद्वान नाटककाराचे उपकारामुळें, शोपेनहूरसारख्या तत्त्ववेत्त्याचे पुनर्जन्मावरील गहन सिद्धांत, हरबर्ट स्पेन्सरसारख्यांच्या उचितशब्दपरिपूर्ण भाषेनें प्रतिपादन करणारी. नुसत्या ' रात्रीचें ' वर्णन " रात्रि पसरि निजवदन " इ० या सुंदर पद्यानें करणारी अशी आहे; व तीच पाटणकरांची शशिकला बिचारी गरीब अशिक्षित आहे. कल्पना सुन्दर असली म्हणजे मग तिच्या बरोबर कितीही अश्लीलपणा आला तरी तो क्षम्य आहे असें कोल्हटकर यांस वाटतें; पण माझ्या मतें हें म्हणणें बरोबर नाहीं. कल्पना सुंदर असो वा नसो पण पात्र व प्रसंग जर चित्ताकर्षक व लोकांचें मन रमविणारा असेल तर अशा ठिकाणीं अश्लीलता संबद्ध असूं नये. चित्ताकर्षक असें पात्र, प्रसंग अगर

विचार यांशीं संलग्न असलेली अश्लीलता चिरपरिचयानें स्वतःच चित्ताकर्षक होऊं लागते.

तथापि इतर ग्रंथकार व कोल्हटकर यांमध्यें या बाबतींत एक फरक आहे. कोल्हटकर यांची अश्लीलता फक्त कांहीं गौण विचारांशीं संलग्न असते व कोठें कोठें शब्द थोडेसे अश्लील विचारसूचक असतात. परंतु त्यांच्या एकंदर नाटकप्रबंधांचें धोरण नीतिविजय दाखविण्याकडे व नीतीचा उपदेश करण्याकडेच असतें; आणि वादविवादांत जर पात्रांचे तोंडीं कोठें अश्लील विचार आले तर लगेच बहुधा ते विचार खोडून त्यांचे जागीं नीतिबोधप्रद विचार प्रस्थापित करण्याची त्यांची योजना सहसा चुकत नाहीं. याच नाटकांतील " मनिं शंकूं नका सेवुं या " हें पद घेतलें तरी एकंदरीनें वाचकांचे मनावर त्यांतील विचाराचा अखेर पगडा बसत नाहीं. याचें कारण असें कीं, ' सरस्वती ' जरी बेकायदेशीर अशा प्रेमानें बेहोष झाली, तरी शेवटीं मनोहाराचा सद्‌गुणविषयक उपदेशच विजय पावतो; आणि नाटकाचे शेवटींची सरस्वती पूर्णपणें नीतिपथावर परत आणून सोडलेली अशीच आढळते. कल्याणीशीं विहार बराच फाजीलपणा करितो, पण लवकरच त्याची जी सोळा आणे फजिती होते, तिजमुळें वाचकांचे मनावर शेवटचा ठसा नीतिमत्तेचाच राहतो. वर इतर कांहीं इंग्रजी वगैरे ग्रंथकारांचीं जीं आम्हीं नांवें दिलीं त्यांचें मात्र तसें नाहीं. कारण त्यांपैकीं पुष्कळ नाटकांतले नायक बोलून चालून अनीतिवान् आहेत येवढेंच नव्हे तर, त्यांच्या अनीतिमत्तेचें वर्णन करणें हाच मुळीं त्या त्या ग्रंथांचा हेतु आहे असें म्हणतां येईल. सतराव्या शतकांतील इंग्रजी नाटककारासंबंधानें मेकॉले यानें असें म्हटलें आहे कीं—

"The whole body of the dramatists invariably represent adultery, we do not say as a pecadillo, we do not say as an error which the violence of the passion may excuse, but as the calling of a fine gentleman, as a grace without which his character would be imperfect. It is as essential to his breeding and to his place in society that he should make love to the wives of his neighbours as that he should know French or that he should have a sword at his side. The hero intrigues just as he wears a wig, because if he did not he would be a queer fellow, a city prig, perhaps a Puritan. All

the agreeable qualities are given to the gallant; all the contempt and aversion are the portion of the unfortunate husband."

असें असूनही Charles Lamb सारख्या टीकाकारानें या नाटककारांची तरफदारी करण्याचाच प्रयत्न केला आहे. परंतु रा. कोल्हटकर यांचे प्रत्येक नाटकाचा एकंदरीनें कटाक्ष नीतिविजय दाखविण्याकडेच असतो, व कोठें अनीतिसूचक अगर अश्लीलशब्ददूषित प्रसंग आले तरी त्यांची पूर्ति पुढील प्रसंगाशिवाय होत नाहीं, व समग्र प्रबंधाचा परिणाम हितकर असाच होतो.

रा. कोल्हटकर कोटया फार करितात असा जो त्यांजवर आक्षेप आहे, त्या संबंधानें फारसें लिहिण्याचें कारण नाहीं. कोटिबाजपणास नांवें ठेवणें सोपें आहे, पण चांगली कोटी करणें कठिण आहे, व ज्यास कोटी करितां येते असा मनुष्य वरील प्रकारचा आक्षेप आणणार नाहीं. आनंदराव व सरस्वती या प्रवेशांतील कोटया, अगर विहार व हरिहरशास्त्री या प्रवेशांतील विनोद, तसेंच विहाराच्या शाळेच्या प्रवेशांतील विनोद हीं सर्व फार चांगलीं साधलीं आहेत हें कोणींहि निःपक्षपाती सहृदय मनुष्यास कबूल करावें लागेल. एकादे वेळीं कोटी ओढून ताणून आणल्यासारखी दिसते नाहीं असें नाहीं. (A quibble is the golden apple for which he will always turn aside from his career or stoop from his elevation) परंतु एकंदरीनें या बाबतींत कोल्हटकरांचे कोटीबाजपणास व विनोदीपणास खरें सर्टिफिकीट, नाटकगृहांत त्यांच्या नाटकांचे प्रयोग चालले असतां प्रेक्षकवर्गाचें हंसून हंसून जेव्हां पोट दुखूं लागतें तेव्हांच मिळतें.

कोल्हटकर यांचे कोटीमध्यें स्वारस्य किती असतें हें नुसत्या वाचकांसहि, त्यांचे टीकालेख अगर ज्याबद्दल इतका मतभेद आहे असे 'सुदाम्याचे पोहे' वाचीत असतां कळून येणार आहे. त्यांचे इतका कोटिबाज लेखक आजपर्यंत मराठी भाषेंत झाली नाहीं हें सप्रमाण सिद्ध करून दाखवितां येईल. परंतु याहूनहि उच्च दृष्टीनें पाहिलें तरी त्यांची कविता फार सरस, व प्रतिभातेजोमय असते, आणि त्यांच्या कल्पनाशक्तीची भरारी फारच उंच जाते हेंहि कबूल करावें लागेल.

१० तात्पर्य, कोल्हटकर यांची कृति मनुष्यकृतीप्रमाणेंच गुणदोषमिश्रित आहे. त्यांतील गुण घेणारास ते सहज दिसतील, व जे दोष आहेत ते

गुणांच्या मानानें फार महत्त्वाचे आहेत असें नाहीं, आणि एकंदरीनें पाहतां जॉनसन यानें आपल्या शेक्सपीअरच्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें रा. कोल्हटकर यांचेहि नाटकाबद्दल व इतर लेखांबद्दल असेंच म्हणावें लागतें कीं—

" Other poets display cabinets of precious rarities, minutely finished, brought into shape and polished into brightness. He opens a mine which contains gold and diamonds in unexhaust ble plenty, though clouded by incrustations, debase l by impurities and mingled with a mass of meaner minerals "

अर्थात् हे दोष थोडेसें अधिक लक्ष पुरविलें असतां निघून जाण्यासारखे आहेत, परंतु तें लक्ष न पुरविणें म्हणजे जवाहिऱ्यानें खच वांचविण्याकरितां ल्हानशी पोलादी कानस दुकानांत न बाळगणें किंवा मोत्यांच्या व्यापाऱ्यानें आपला माल पुरावयास लागणाऱ्या रेशमी फडक्यांवाचून चालढकल करूं पाहणें यासारखेंच आहे.

## ६२ बायकांचें बंड

( रंगभूमि १ सप्टेंबर १९०७ )

बायकांचें बंड? हें बंड आहे तरी काय बुवा? असा प्रश्न स्वाभाविकपणें पुष्कळ विचारतील, व रा० खाडिलकर यांनीं लिहिलेल्या या नवीन नाटकाचा विषय खरोखर बराच कुतूहल—कारक आहे. नाटक वास्तविक 'सामाजिक' आहे. आपल्या समाजस्थितीशीं सकृत्दर्शनीं त्याचा फारसा संबंध नाहीं. पण इंग्लंडांत स्त्रियांना पार्लमेंटच्या निवडणुकींत मत देण्याचा हक्क असावा अशाबद्दल आज जोराची चळवळ सुरू आहे. तसेंच कांहीं दिवसांपूर्वी मुंबई येथें न्यायमूर्ति बीमन साहेब यांनींहि याच विषयासंबंधानें व्याख्यान दिल्यानें व तें स्त्रीवर्गास बरेंच झोंबलें असल्याकारणानें मुंबईच्या दैनिक पत्रांमधूनहि या विषयावर चर्चेची झोड उठली होती. वर्तमानपत्रावरून या विषयाची ज्यांस माहिती झाली असेल त्यांचें खाडिलकरांच्या या नाटकांकडे विशेष लक्ष जाईल. ग्रंथकर्त्याचा उद्देश मात्र थोडासा भिन्न असावा. तें लिहितांना त्याच्या डोळ्यापुढें इंग्लंडपेक्षां हिंदुस्थानच विशेष

असावें, व नाटकांतील प्रमेय हें त्यांचें सामाजिक सुधारकांस एका बाबतीं-तलें उत्तर असावें असें वाटतें.

मानवी इतिहासांत बहुधा पुरुषराज्येंच आढळतात. कित्येक देशांमधून स्त्री ही मुळीं राज्याधिकारीच होऊं शकत नाहीं. फ्रान्समध्यें Salique Law नांवाच्या कायद्यानें स्त्रिया गादीवर बसण्याचा निषेध केलेला आहे. पौर्वात्य देशांत सर्वच ठिकाणीं असे कायदे नाहींत; परंतु स्त्री गादीनशीन झालेली क्वचितच आढळेल. निपुत्रिकास मुलगा दत्तक घेण्याची धर्मशास्त्रानें पर-वानगी असल्यामुळें बहुधा पुरुषपरंपरा कायम राहते. फक्त मुलगीच वारस उरली तर प्राय: बंडाळी वगैरे होऊन तिच्या हक्कावर पाणी पडतें. काय-द्यानें स्त्री राज्यपदारूढ होण्याची सवलत असून कायदा अमलांत येण्या-सारखी राज्यांत सुस्थिति असेल तरच स्त्री गादीवर बसण्याचा संभव. परंतु केवळ स्त्री गादीवर असल्यानें त्या राज्यास स्त्रीराज्य म्हणतां येत नाहीं. 'स्त्रीराज्य' या शब्दास कांहीं विशेष प्रकारचा अर्थ आहे व तो हा कीं, अशा राज्यांत पुरुष प्रजा असली किंवा नसली तरी राज्याचे सर्व अधिकार स्त्रियांचेच हातीं असावयाचे. रस्त्यांत शांतता राखणाऱ्या शिपायापासून तों तक्तावर बसून राजदंड पेलणाऱ्या व्यक्तिपर्यंत सर्वत्र स्त्रियांची नेमणूक. सृष्टिपरंपरा राखण्यास पुरुषांची गरज असल्यामुळें अशा राज्यांत पुरुषांचा शिरकाव अगर समावेश होणें शक्य असलें तरी त्यांस नागरिकत्वाचे अधि-कार बिलकूल नाहींत असाच स्त्रीराज्यांत नियम असावयाचा. अर्थात् अशीं राज्यें पृथ्वीच्या पाठीवर फारशीं झालेलीं नाहींत तरी पण स्त्रीराज्याची कल्पना ठाम झालेली आहे यांत संशय नाहीं.

स्त्रीराज्याची ही कल्पना खरोखरच फार अद्भुतरम्य आहे. आपले पुराणांतील प्रमिलेचें स्त्रीराज्य प्रख्यात असून रा० खाडिलकर यांनीं त्याच कथाभागावर प्रस्तुतचें नाटक रचलें आहे. तसेंच बंगाल्यांत पूर्वी स्त्रीराज्य एक वेळ होतें अशी समजूत आहे. गोपीचंद राजाची आई जी मैनावती तिचा गुरुबंधु मत्स्येंद्रनाथ हा या बंगाली स्त्रीराज्यांत तेथील राणीच्या प्रेम-पाशांत बद्ध होऊन राहिला होता अशी गोष्ट आहे सॅबिनिया येथेंहि एक जुनें स्त्रीराज्य होतें असें म्हणतात. कांहीं थोड्या वर्षांपूर्वी बोअरयुद्धानंतर 'रिव्ह्यू ऑफ रिव्ह्युज' चे कर्ते मि० स्टेड यांनीं आपल्या वाचकांस वार्षिक भेट म्हणून एक पुस्तक वाटलें होतें, त्यांत अशा स्त्रीराज्यांत कैद

झालेल्या एका इंग्रजानें आपल्या देशाची स्थिति वर्णिली आहे असें कल्पिलें होतें. स्त्रीराज्याचे कल्पनेंत जी मोहकता आहे ती मुख्यत: तिच्या एकदेशीयत्वामुळेंच आहे. राज्यपदारूढ होऊन ज्यांनीं पुरुषप्रजेवर राज्य केलें, आपला अम्मल गाजविला, आणि आपलें नांव अंगच्या अनेक सद्गुणांमुळें अगर दुर्गुणांमुळें इतिहासप्रसिद्ध करून ठेवलें, अशा राण्या कांहीं थोड्या झाल्या नाहींत. सेमिरामीस, क्लीओपाट्रा, बोअेडिशिया, आर्टिमिशिया, बॅबिलोन येथील प्रचंड भिंत बांधणारी राणी, पिरामिड बांधविणारी राणी ऱ्होडोप, एलिजाबेथ, स्काटलंडची राणी मेरी, व्हिक्टोरिया, अहिल्याबाई, झांशीची राणी लक्ष्मीबाई इत्यादि स्त्रियांनीं पुरुषांसारखींच कारस्थानें व पराक्रम केले. तथापि, त्यांच्या राज्यांस कोणी स्त्रीराज्यें म्हणत नाहीं; व त्याबद्दल इतकी अद्भुतरम्यताहि वाटत नाहीं.

स्त्रियांस नैसर्गिक हक्क पुरुषांप्रमाणेंच आहेत या कल्पनेचा आत्यंतिक उत्कर्ष स्त्रीराज्याचे कल्पनेंत आहे; परंतु कवि अगर नाटककार जेथें या कल्पनेचा आधार घेतात, तेथें त्यांचा हेतु प्राय: स्त्रियांचें गुणवर्णन व त्यांच्या हक्कांचें समर्थन करण्याचा नसून त्यांचे आंगचा कमीपणा व म्हणून हक्काचे बाबतींत त्यांची अपात्रता दाखविण्याचाच असतो. "स्त्रियांना हक्क असावे असें तुम्हीं म्हणतां खरें; परंतु प्रत्यक्ष स्त्रीराज्य होऊन या हक्कांच्या उपभोगाची परमावधि झाली तरी अखेर काय? त्यांची अपात्रता ठरून त्या हास्यास्पदच होतात ना?" असें सिद्ध करून देण्याचा त्यांचा हेतु असतो. व रा. खाडिलकर यांचा हेतूहि याहून फारसा भिन्न नाहीं. परंतु हा प्रकार इसापनीतींतील 'सिंह आणि मनुष्य' यांच्या चित्राप्रमाणेंच कांहींसा आहे. केवळ कल्पनातंतूंनींच जर चित्रपटाची भूमिका तयार करावयाची व कल्पनारूप रंगांनींच जर त्याजवर चित्र रंगवावयाचें तर मग नाटकांत स्त्रीराज्याचा विजय सिद्ध करून पुरुषांची फटफजिती उडालेली दाखविणेंहि फारसें कठीण जाणार नाहीं. स्त्रीराज्याचें नाटक पुरुषांनीं लिहिण्याचे ऐवजीं एखाद्या स्त्रीनेंच लिहिलें तर या गोष्टीचा प्रत्यय येण्यास उशीर लागावयाचा नाहीं; परंतु तसें त्या करीत नाहींत हें त्यांच्या बुद्धिहीनतेचें लक्षण नसून सौजन्याचेंच लक्षण मानलें पाहिजे. कल्पनासृष्टि सोडून जर प्रत्यक्ष व्यवहाराकडे वळलें तर स्त्रिया पुरुषांवर राज्य करण्याचा हक्क कधींहि सांगत नाहींत; त्या फार झालें तर फक्त कांहीं बाबतींतच पुरुषां-

सारखे हक्क मागतात. व अशा नेमस्त मागणीस 'स्त्रीराज्याचा फजिता' हें उत्तर असेल तर तें गैरलागू ठरतें. स्त्रियांस शिक्षण दिलें, अथवा निवडणुकीसारख्या कारभारांत त्यांस मत देण्याचा अधिकार दिला तर काय अनर्थ ओढवतील हें जर कोणी दाखविण्याचा प्रयत्न करील तर तो मात्र विचारांत घेण्यास पात्र ठरेल.

रा. खाडिलकर यांनीं मूळ कथाभाग पुराणांतून घेतला आहे असें वर म्हटलें आहे; तथापि कांहीं नांवें खेरीजकरून पुराणाची ओळखहि प्रस्तुत नाटकांत फारशी पटत नाहीं. ऐतिहासिक नाटकास जशी इतिहासाची नुसती पातळ 'अस्तरगारी' चालते तशीच पौराणिक नाटकासहि चालते. नुसत्या नांवांतच अशी कांहीं मोहनी असते कीं, तीं उच्चारल्याबरोबर एकदम आपल्या मनांत पुराणकाल अगर इतिहासकाल उभा राहतो. "बायकांचें बंडा"स पुराणांतील प्रमिलास्वयंवराख्यानाचा जितका आधार आहे, तितकाच कदाचित् 'टेनिसन' कवीच्या 'प्रिन्सेस' या काव्याचा आधार आहे म्हटलें तरी चालेल. खाडिलकरांची प्रमिला ही जरी टेनिसनची Ida नसली तरी रूपमाया ही Psyche व सत्यमाया किंवा स्थिरमाया ही Blanche म्हणण्यास फारसा प्रत्यवाय नाहीं. जागरूक व मैत्रेय यांच्याशीं कोणाचीच जोडी जुळत नाहीं. कारण हीं पात्रें विनोदाकरितां घातलीं आहेत. Cyril चें पुष्पधन्व्याशीं साम्य आहे. Princess मधील बायकांचें बंड मोडणारे सर्व तरुण वीर स्त्रीवेषानें स्त्री राज्यांत प्रवेश करून फजीत पावले आहेत. खाडिलकरांचे नाटकांत बहुधा नाटकाचे सोईकरितां अर्जुन व पुष्पधन्वा यांस पुरुषवेष कायम ठेऊं दिले आहेत. स्त्रीराज्यांत प्रवेश केल्याच्या पातकाचें प्रायश्चित्त घेण्याचें श्रेय, एखाद्या क्रियापदाचें प्रथमपुरुषी स्त्रीलिंगीरूप एकवेळ उच्चारल्यानें त्या गुन्हेगार पुरुषवीरांस मिळालें असा संकेत खाडिलकरांनीं केल्यामुळें प्रेक्षकांस त्यांचें दर्शन स्त्रीवेषांत घेण्याचा प्रसंग टळला. माझ्यामतें या बाबतींत खाडिलकरांनीं Princess मधील कथाभाग खुबीनें बदललेला आहे. बाकी, नायिका पाण्यांत पडली असतां तिला नायकानें वांचविणें वगैरे Princess मधील किरकोळ गोष्टी खाडिलकरांच्या नाटकांतील कथाभागाचें पोषण करण्यास उपयोगी पडलेल्या दिसत आहेत, परंतु अखेर नायिकेचा अनुनय होण्याचा खाडिलकरांचा मार्ग टेनिसनच्या

मार्गाहून फार भिन्न आहे. उभयतांच्या स्त्रीविषयगत विचारांच्या फरका-मुळें हे मार्ग कदाचित् भिन्न झाले असतील.

टेनिसनच्या काव्यांत असें दाखविलें आहे कीं, राजपुत्र व त्याचे मित्र हे स्त्रीवेषानें स्त्रीराज्यांत शिरल्यावर त्यांना विद्यालयांत दाखल करून लेडी Psyche च्या स्वाधीन करण्यांत आलें. कांहीं कालानें त्यांचें कपट उघडकीस आलें. तें Lady Psyche इनें प्रथम गुप्त ठेवलें असतांहि फुटलें आणि गुन्हेगारांस देहांत प्रायश्चित्तच व्हावयाचें, परंतु तें राजपुत्रानें Ida चा प्राण वांचविल्यामुळें फक्त हद्दपारीच्या शिक्षेवर भागलें. राजपुत्र परत आल्या-नंतर स्त्रीराज्यावर स्वारीच व्हावयाची; परंतु राजपुत्राच्या Ida वरील प्रेमा-मुळें तो बेत रहित झाला. तथापि Ida चा भाऊ व राजपुत्र या उभयतांचें द्वंद्वयुद्ध होऊन राजपुत्र जखमी झाला असतां तिनें आपल्या विद्यालयाचें इस्पितळ बनवून राजपुत्राची शुश्रूषा केली व अशा रीतीनें गुणांवरील प्रेमा-मुळें अखेर हें बायकांचें बंड मोडलें. रा. खाडिलकरांनीं आपल्या नाटकां-तील बंड याहून निराळ्या रीतीनें मोडलें आहे. अर्जुन व पुष्पधन्वा यांस स्त्रीराज्यांत दहा दिवस राहण्याची परवानगी मिळाली. त्या उभयतांचा समज असा होता कीं, स्त्रीपुरुषांची परस्पर गांठ पडावयाचा अवकाश कीं बायकांचें बंड मोडलेंच पाहिजे. पैकीं पुष्पधन्वाची व रूपमायेची दृष्टादृष्ट होतांच रूपसौन्दर्य व शारीरिक प्रीति यांचा जय होऊन स्त्रीराज्याचा सेना-पति क्षणार्धांत हस्तगत झाला. खुद्द राणीला स्त्रीराज्याचा अभिमान विशेष होता, तथापि वनांत शिकार करितांना अर्जुनाचें बाहुबल व धैर्य पाहून तो तिचा अभिमान निम्माशिम्मा गेला, व बाकी निम्मा जो सत्यमायेच्या भीतीनें उरला होता, तोहि त्या उभयतांचे प्राण अर्जुनानें सरस्वतीच्या प्रवा-हांत उडी घालून वांचविल्यावर नाहींसा होऊन, सत्यमाया उघड निषेध करीत असतां प्रमिला अर्जुनाचा हात धरून निघून गेली.

रा. खाडिलकरांच्या नाटकाचें नैतिक सार असें आहे कीं, स्त्रिया या जात्या कमकुवत, कामुक असल्यामुळें पालीपुढें विंचू जसा नांगी टाकतो, त्याप्रमाणें स्त्रियांना पुरुषांपुढें स्वत्व विसरून जाणें हेंच प्राप्त आहे, त्याशिवाय गत्यं-तर नाहीं. उलटपक्षीं टेनिसनच्या काव्यांत स्त्रियांविषयीं इतकी तिरस्कारबुद्धि दाखविलेली नाहीं. काव्यांतील नायकाचा बाप स्त्रियांविषयीं तिरस्काराचे उद्गार काढितो, नाहीं असें नाहीं. तो म्हणतोः—

... ... ... ... ... ... ... ... ... ... ... ... A lusty brace
Of twins may weed her folly.

... ... ... ... ... ... ... ... ... ... ... ... ...

" Man is the hunter, woman is his game.
The sleek and shining creatures of the chase
We hunt them for the beauty of their skins.
They love us for it and we ride them down,
Boy ! there is no rose that is half so dear to them
As he does the thing they dare not do. "

परंतु या विषयाची दुसरी बाजूहि टेनिसनचा नायक जो राजपुत्र त्याचे तोंडून दाखविण्यांत आली आहे. ' पुरुषाप्रमाणें स्त्रियांतहि वाईट व चांगल्या असा भेद असतोच व सद्गुणांचा मक्ता पुरुषांसच दिलेला असतो असें नाहीं. ' असें प्रतिपादन करून व

" What dares not Ida do that she should prize
The soldier ? I beheld her when she rose
The yester-night and storming in extremes
Stood for cause and flung defiance down
Gage-like to man and had not shunned the death
No, not the soldier's.

अशा शब्दांनीं नायिकेच्या गुणांचें ग्रहण करून तिच्याशीं युद्ध करावयाचें नाहीं असें ठरवितो. परंतु खाडिलकरांचे नाटकांतील अर्जुन प्रमिलेचें शौर्य पहात असतांहि स्वगत देखील तिजविषयीं स्तुतीचा किंवा गुणग्राहकतेचा असा एक शब्दहि काढीत नाहीं.

जैमिनी अश्वमेधाकडे पाहिलें तर त्यांतील प्रकार फार वेगळाच आहे. सदर पौराणिक कथेंत असें सांगितलें आहे कीं, प्रमिला (प्रेमळा) राणीच्या स्त्रीसैन्याची व अर्जुनाच्या सैन्याची गांठ पडल्यावर अर्जुन व वृषकेतु यांखेरीच बाकी सर्व सैनिक प्रतिपक्षीय स्त्रीसैनिकांच्या पाशांत सांपडले व त्यांचें युद्ध श्रृंगारमयवीररसाचें एक सुरसवर्णनच असें म्हणण्यास पात्र झालें. प्रेमळा राणीनें मात्र आपलें शौर्य कायम ठेवलें व अर्जुन प्रेमपाशांत सांपडत नाहीं असें पाहून तिनें त्यावर बाण सोडले. ब्राह्मण जसे ' शापादपि शरादपि ' असे दुटप्पी असतात तशीच ' प्रेमळाहि प्रेमादपि शरादपि '

अशा सजोड आयुधांनीं सज्ज होती; व अर्जुनास शेवटीं तिजवर अमोघ शक्तीच्या अस्त्राचा प्रयोग करण्याची पाळी आली. अखेर आकाशवाणीनें तंट्याचा न्याय होऊन प्रमिलेशीं लग्न करून अर्जुनानें स्त्रीराज्य मोडलें. 'अश्वमेध' काराच्या लिहिण्याचा झोंक स्त्रियांविरुद्ध नसून पुरुषांविरुद्ध आहे. म्हणजे स्त्री व पुरुष यांची गांठ पडली असतां स्त्रिया पुरुषांस आपल्या रूपसौंदर्याचे जोरावर गुलाम किंवा दास बनवितात. असा आहे. "नेत्रकटाक्षीं त्रिभुवन। जिंकिती ऐशा बलाढ्य" ॥ "ज्यांचे दर्शनें होय धैर्यगिरी कूट। फुटती नियमसरोवरपाट। भरिती घोट वीर्याचा ॥" "आम्हांसि अबला म्हणती सर्व लोक। परि ते विचारितां सर्व मूर्ख। दृष्टिमात्रें जिंकिले ब्रह्मादिक। त्या अबला कीं सबला?" अशीं वचनें प्रमिलेच्या तोंडीं घातलीं आहेत!

तात्पर्य टेनिसनच्या मताप्रमाणें पहातां स्त्री व पुरुष हे परस्परांच्या कह्यांत सारखेच आहेत, व त्यांच्या अन्योन्यावलंबीपणावर सर्व जग अवलंबून आहे. अश्वमेधकाराच्या मताप्रमाणें स्त्रीपुरुषप्रसंगांत स्त्रियाच आपल्या रूपगुणाच्या योगानें पुरुषांवर प्रभाव गाजवितात. खाडिलकरांच्या मताप्रमाणें पुरुष व स्त्री यांचे प्रसंगांत पुरुष हाच मात्र वाटेल तसा स्त्रीवर पगडा चालवूं शकतो, व स्त्रीचें जगांतील काम फक्त पुरुषाचे रूपगुणांत भुलून जाऊन त्याच्या इच्छाशक्तीची दासी बनणें याशिवाय कांहींएक नाहीं. अशा प्रकारचें हें मतवैचित्र्य दिसून येतें. यांपैकीं कोणाचा पक्ष अधिक ग्राह्य याचा वादविवाद करीत न बसतां त्यांचा निर्णय आम्ही वाचकांवरच सोंपवितों. येथें येवढेंच सांगावयाचें आहे कीं, रा. खाडिलकर यांनीं टेनिसनचें 'Princess' व जैमिनी अश्वमेधांतील 'प्रेमळाख्यान' यांतील ज्या गोष्टींचा आपल्या नाटकाकरितां उपयोग केला आहे व ज्या वगळल्या आहेत त्यांवरून पाहतां स्त्रियांविषयींच्या मताचा जो ध्वनि सदर नाटकामधून उठतो, तो वास्तविक ग्रंथकर्त्याच्या स्वतःच्या मताचाच ध्वनि आहे असें मानण्यास फारसा प्रत्यवाय दिसत नाहीं.

---

# ६३ मेनका

गोष्ट होऊं नये पण झालीशी दिसते खरी ! श्री. खाडिलकर हे गांधींचे शिष्य, असहकारितेचे सांप्रदायी, कट्टरांचे ऋणानुबंधी, व स्वराज्यपक्षाचे आजचे समर्थनकार. म्हणून त्यांनीं या सर्वांवर टीका करावयाची नव्हे. पण त्यांच्या नवीन 'मेनका' नाटकांत तसें घडलें आहे खास. नाटक लिहिण्याची घाई, विषयांची टंचाई व कुत्सित टीका करण्याची धिटाई, इतक्या गोष्टींच्या जुलुमानें त्यांनीं परकीयांपेक्षां स्वकीयांवरच या नाटकांत अधिक हत्यार उपसलें आहे. स्वराजिस्ट व कट्टर यांच्या मंगलकार्याला हा घरचा ठेवणींतला अहेर घरच्या माणसानें केलेला पाहून तिऱ्हाइताला मौज वाटल्यावांचून राहत नाहीं.

श्री. खाडीलकरांचें 'मेनका' नाटक हें चालू राजकारणावर एक रूपक असणार हें तें कोणीं न वाचतांपाहतांहि सांगेल. प्रश्न इतकाच कीं, राजकारणापैकीं कोणत्या भागाचें प्रतिबिंब या नाटकांत दाखविण्याची ग्रंथकाराला इच्छा असावी ? व दुसरा एक प्रश्न असा कीं, नाटकपात्रांचें सादृश्य कोणकोणत्या राजकीय व्यक्तींशीं सरासरी जुळतें ? पहिल्या प्रश्नाचें उत्तर असहकारितेचा अपकर्ष व स्वराज्यपक्षाचा उत्कर्ष असें दिलें पाहिजे. दुसऱ्या प्रश्नासंबंधानें असें दिसतें कीं, फोटोग्राफीच्या एकाच कांचेवर चुकून किंवा मुद्दाम दोन किंवा अधिक माणसांचे फोटो घेतले असतां जें घेडगुजरी संकीर्ण चित्र निघतें तसलींच चित्रें खाडिलकरांच्या पात्रांतून निघतात. एका प्रेक्षकानें अशी कल्पना चालविली आहे कीं, या नाटकांतील ज्वालामुखी—बालमूर्ती हे जयकर-केळकर होत. पण तें कांहीं खरें दिसत नाहीं. कारण एक तर जयकर-केळकरांवर खाडिलकरांचा राग असला तरी स्वराजिस्टांवरहि तितकाच आहे. कारण स्वराजिस्टांनींच मूळ बहिष्कार बुडवून विधायक कार्यक्रम लुळापांगळा करून, कौन्सिलप्रवेशाचें घोडें पुढें दामटलें. म्हणून वृद्धानंद हें पात्र पटेल यांच्याकरितां योजिलें आहे असें मान्य केलें तर, ज्वालामुखी व बालमूर्ती हे रंगा अय्यर, रंगास्वामी व जम्नादास वगैरेंच्या प्रतिमा असाव्यात असें वाटतें. बिचाऱ्या सौम्य जयकरांना 'ज्वालामुखी' हें नांवच शोभत नाहीं; आणि केळकर प्रतिसहकारवदी

असले म्हणून त्यांना स्वत:करितां प्रधानकीची हौस किंवा, इच्छा आहे हें म्हणणें, आणि श्री. खाडिलकर यांना नाट्यविषय आवडतो म्हणून त्यांना स्वत:ला स्त्रीवेष घेण्याची हौस व इच्छा आहे हें म्हणणें, हीं दोन्हीं सारखींच असंबद्ध होत हें श्री. खाडिलकर जाणतात.

पण, याशिवाय दुसरें एक निर्णायक गमक असें आहे कीं, त्यांतून सुटकाच नाहीं. त्यावरून श्री. खाडिलकर यांनीं केलेली कुचेष्टा जुन्या नाफेरवादी पण आजच्या स्वराज्य पक्षीयांचीच आहे हें सिद्ध होतें. तें गमक असें कीं, नाटकांतील विश्वामित्राचे शिष्य हे सर्व 'पांढरे दाढीवाले' आहेत, आणि पांढरी दाढी ही विश्वामित्री 'सांप्रदायाची खूण' म्हणून म्हटलें आहे. अर्थात् ही पांढरी दाढी म्हणजे 'पांढरी गांधी टोपी' होय. खादी घालणारे सुद्धां क्वचित् रंगीत खादी घालतात. पण गांधींचा खरा सांप्रदायिक म्हटला म्हणजे तो पांढरी टोपीच घालावयाचा. गांधीटोपीशीं पांढऱ्या दाढीचें सादृश्य मनांत नसतें तर, सर्व शिष्यांची दाढी पांढरीच पाहिजे असा आग्रह श्री. खाडिलकरांच्या नाट्यवधूनें धरला नसता व तो त्यांनीं पुरविलाहि नसता. शिष्यबटूंपैकीं एक बिनदाढीचा दाखविला आहे. पण त्याचीहि दाढी जळलेली असून ती होती तेव्हां पांढरीच होती हें लक्षांत ठेविलें पाहिजे! स्वराजिस्ट नेहरू, पटेल, जम्नादास व रंगा अय्यर हे सर्व एकजात पांढरी गांधी टोपी घालणारे व तिचे अभिमानी होत. उलट केळकर व जयकर यांनीं असहकारितेच्या अगदीं पहिल्या काळांत देखील पांढरी गांधी टोपी कधींच घातली नाहीं ही गोष्ट प्रसिद्ध असून तिच्यावर टीकाहि झालेली आहे. खाडिलकरांच्या मनांत या नाटकांत केळकरांनाहि हास्यास्पद करावयाचें नव्हतें असें नाहीं. कांहीं प्रेक्षकांनीं तसें भासल्याचें लिहिलेंहि आहे. पण पांढऱ्या दाढीनें किंचित् घाण केली खरी!

श्री. खाडिलकर नाटक लिहिण्यास सरसावले म्हणजे चालू राजकारण व पक्षभेद त्यांच्या डोळ्यांपुढें उभे राहतात. ते त्यांना कधींहि दृष्टिआड करितां येत नाहींत. तसेंच विनोदाकरितां प्रतिपक्षाची निंदा व टवाळी करण्याची त्यांना अनिवार बुद्धि होते; आणि ती टवाळीहि ते इतक्या विकृत आणि ओंगळ स्वरूपांत करितात कीं, त्यांत ग्राम्यपणा व संस्कृतांतील अर्थानें बीभत्सपणा बेसुमार उत्पन्न होतो. नाटकांत त्यांनीं विश्वामित्राच्या शिष्यांचें चित्र असेंच बीभत्स रंगविलें आहे. आणि कोणतें पात्र

कोणाकरितां त्यांनीं मनांत योजिलें असावें हें ध्यानांत आणिलें म्हणजे नेहरू, पटेल व जम्नादास यांपैकीं कोणाला कुत्रा, कोणाला पाणक्या, कोणाला स्त्रियांचीं लुगडीं काखेंत किंवा अंगावर घेणारा असें बनविलें आहे असें दिसतें. आणि हें कां, तर त्यांनीं कौन्सिलांत जाण्याचा हट्ट व लोभ धरून महात्मा गांधी यांचा बहिष्कारयोग व्यर्थ केला म्हणून. अप्सरांच्या पायां पडणाऱ्या शिष्यांची कोण ती विटंबना !

श्री. खाडिलकर लेखांत काय किंवा नाटकांत काय, एकाद्याची अभद्र-पणें टवाळी करूं लागले म्हणजे त्यांना सुमार कसा तो राहत नाहीं. कित्येक शिवराळ पत्रांप्रमाणें श्री. खाडिलकरांच्या 'नव्या काळां' त प्रत्यक्ष व्यक्तिविषयक गालिप्रदान नसतें खरें; तरी त्यांनीं त्या उपोषणाचें पारणें या नाटकांत फेडून घेऊन सगळा वचपा काढला आहे. आणि नाट्यप्रयोग साध्या वर्तमानपत्री लेखांपेक्षां जितका अधिक चित्ताकर्षक, तितकी ती टवाळी अधिक भेसूर व मनाला बोचण्यासारखी वाटावी यांत काय आश्चर्य ? बटूंनीं काखेंत अप्सरांचीं लुगडीं घेणें, त्यांच्या शालूशालजोड्यांच स्वतःकरितां लोभ धरणें, कुत्र्याप्रमाणें त्यांच्या पायांवर लोळण घेणें त्यांच्यापुढें स्वतःच्या तोंडांत मारून घेणें, इंद्रसभेंत शिरून तेथील मुगु डोक्यावर घालून घेण्याचा क्षुद्र लोभ दाखविणें—अशा कितीतरी निंदा व्यंजक व मनाला चीड येण्यासारख्या गोष्टी श्री. खाडिलकरांनीं या नाटकां चालू राजकारणाला उद्देशून घातल्या आहेत. मग त्यांचा रोख स्वराजि स्टांवर असो किंवा प्रतिसहकाऱ्यांवर असो. प्रत्यक्ष चित्र न काढतां राजकीय प्रतिपक्षीयांना रेडा, नंदी, बाल्या, लुगडीधुव्या, ढब्या, ओझ वाहणारा व राबणारा गाढव असलीं नांवें ठेवून तसली नाट्यकृति रंगवि ही गोष्ट सचित्र वर्तमानपत्रांत अशा देखाव्यांचीं प्रत्यक्ष चित्रें काढण्याहू कमी अधमपणाची ठरत नाहीं. बिचाऱ्या कागदांवरील चित्रांत नाटकांती बोलक्या पात्रांचा जिवंतपणा व झगझगीतपणा तरी नसतो !

आणि श्री. खाडिलकर यांनीं हें असें तोंडसुख स्वराजिस्ट व प्रतिस कारी यांजवर कां घ्यावयाचें, तर ते स्वतः या कोणत्याहि वर्गांत आ सामील नाहींत म्हणून. पण १९२० च्या पहिल्या सहामाहींत श्री खाडिलकर हे जेव्हां स्वतः कायदेकौन्सिलच्या निवडणुकींत उमेदवार म्हण उभे होते, तेव्हां हीं सगळीं विद्रूप वर्गानें त्यांना स्वतःला व त्यांच्या इ

कित्येक जिवलग दोस्तांना लागू पडत नव्हतीं काय ? श्री. खाडिलकर हे आपलें पूर्ववृत्त थोडें तरी स्मरतील तर बरें होईल. तेव्हांचे श्री. खाडिलकर कौन्सिलरूपी इंद्रसभेंत जावयास एका पायावर तयार झाले होते, तेव्हांचे खाडिलकर सुधारणरूपी अप्सरांचे शालू काखेंत मारीत होते, लुगडीं धूत होते व कुलंगी कुत्र्यासारखे त्यांचे पाय चाटीत होते, असें वर्णन करणें हें सुसंकृत अभिरुचीला सोडून असलें तरी यथार्थ होणार नाहीं काय ? पण श्री. खाडिलकरांना एक माहीत आहे कीं, योग, मंत्र, तंत्र, तप, अनुष्ठान व गुरुशिष्य असले पोकळ तत्त्वज्ञानाचे शब्द नाटकांत घातले, आणि कोणत्याहि पात्राच्या बापाला न समजण्यासारख्या अर्थांचीं, तत्त्वज्ञानाच्या फाल्गुनी बडबडीचीं, बोजड वाक्यें नाटकांत पेरलीं म्हणजे सगळया जगाची निंदा करण्याचा अधिकार आपणाला बिन-हरकत लाभतो.

'नाचाच्या मंजूळ ध्वनींतून तपश्चर्येच्या महामंत्राचे स्वर निघत नसतात.' पण नाच व मंजुळ ध्वनि यांची हौस ज्याला नव्हती किंवा ज्याची नाहींशी झाली त्यानेंच महामंत्राची, तपश्चर्येची, व योगसाधनाची उठाठेव केलेली शोभेल. पण श्री. खाडिलकर हे जसे कौन्सिलांत जात नाहींत, तसेंच ते गांधीचा विधायक कार्यक्रमहि कांहीं करीत नाहींत. कां तर ते स्वतः कांहींच न करण्याच्या केवळ अजगरी तपश्चर्येचे व निष्क्रिय कर्मयोगाचे पुरस्कर्ते, किंबहुना अशा विद्यापीठाचे आचार्यहि शोभण्यासारखे आहेत. व ही गोष्ट खरी कीं नाहीं हें ज्यांच्यावर त्यांनीं या नाटकांत टीका केली त्या स्वराजिस्टांनीं व प्रतिसहकारवाद्यांनीं त्यांना निक्षून ठासून विचारलें तर ते काय उत्तर देतील ?

विश्वामित्राचे बटुशिष्य अप्सरांशीं नाचरंग करण्यांत दंग असतां विश्वामित्र प्रगट होतो तेव्हां " गुरुजी आले म्हणून इतकें भ्यावयाचें काय कारण ? त्यांचा सन्मान करण्याकरितां त्यांना नाच दाखवा " असें एक अप्सरा म्हणते, व बटुशिष्य ती सूचना उचलतात, असें श्री. खडिलकरांनीं नाटकाच्या दुसऱ्या अंकांत दाखविलें आहे. आणि हें सर्व पाहून दुःखी विश्वामित्र निराश होऊन विचारतो " हें फल काय मम तपाला ? " पण हाच प्रश्न श्री. खाडिलकरांच्या नव्याजुन्या दोन्ही श्रीगुरूंना स्वतः खाडिल-

करांसच विचारण्याचा प्रसंग आला होता व आहे. १९१४ सालीं टिळक मंडालेहून परत आल्यावर श्री. खाडिलकर यांनीं, त्यांच्या पश्चात् केलेली आपली कामगिरी म्हणून संगीत नाटकांचा एक सेट सुंदर बाइंडिंग करून टिळकांना नजर केला व त्यांना आपलीं नाटकें पाहावयास नेलें असें म्हणतात. तेव्हां टिळकांच्या तोंडून काय उद्गार बाहेर पडले असतील याची कल्पना कोणींहि करावी. आपल्या पुढच्या 'खारका' खाणाऱ्या शिष्याला त्या 'गुरुमाउली' नें "हें फल काय मम तपाला" अशाच अर्थाचा प्रश्न उघड किंवा निदान मनांत तरी केला असावा.

बरें, आतां श्री. खाडिलकरांची नवी गुरुमाउली घ्या. तिचें तरी शिष्यत्व श्री. खाडिलकरांनीं कितीसें एकनिष्ठेनें केलें ? विधायक कार्यक्रम स्वतः त्यांनीं कितीसा आचरिला ? अनत्याचारी असहकारिता त्यांच्या मनांत कितीशी खरी बिंबलेली आहे ? त्यांच्या एका आठवड्याच्या वर्तमानपत्राला दोरेहि त्यांनीं काढलेल्या हातसुताचे पुरणार नाहींत. आणि महात्मा गांधींना स्वत: कौन्सिलांत जावयाचें नसलें तरी, आणि मेनका नाटकांत कौन्सिलवाल्यांची निंदा असली तरी, श्री. खाडिलकरांचा हा रंगीत-संगीत विधायक कार्यक्रम महात्मा गांधींना कितीसा पटणार आहे ? खाडिलकरांची ही नवी गुरुमाउली देखील "हें फल काय मम तपाला ?" असा प्रश्न या आपल्या संगीत शिष्यवराला विचारणार नाहीं काय ? नवें नाटक सजविण्यांत खादीला कितीसें उत्तेजन आहे ? त्यांतील स्त्रीपुरुषविषयक चर्चा हें राष्ट्रीय शिक्षणाचें कोणतें अंग होय ? इकडे गांधींनीं पोषाकाच्या साधेपणाचें नवें योगशास्त्र किंवा तत्त्वज्ञान निर्माण करून उदाहरण घातलें, आणि तिकडे एकाद्या त्यांच्या शिष्यानें नाटकपात्रांचे शाल्, शालजोड्या, पोषाक, सीनसीनेरी यांच्या हौसेखातर हजारों रुपये खर्च करवून स्त्रीपात्रांची पदरपट्टी साफ बसली न बसली याच्या विचारांत लक्ष व वेळ हीं खर्च केलीं, तर "हें फल काय मम तपाला ?" असा सवाल गुरूनें शिष्याला विचारण्याचा प्रसंग प्राप्त झालाच कीं नाहीं ?

मेनका नाटकांत वास्तविक मेनकेला तरी प्रथम प्रवेश करतांना नाच घालावयास हवा होता. तेवढेच तिचे सोपस्कार उरले होते ! आणि तसें झालें असतें तर खाडिलकरांनीं आचरणांत आणलेल्या असहकारितेच्या व विधायक कार्यक्रमाच्या तपश्चर्येचे महामंत्र नाचाच्या मंजूळ ध्वनींतून ऐकावयास

मिळाले असते. 'बहिष्कार' 'बहिष्कार' फार काय 'कौन्सिल बहिष्कार' असे स्पष्ट शब्दहि मेनकेच्या पैंजणांतून 'मास्तरांना' काढून दाखवितां आले असते. पूर्वी अशा गोष्टी घडल्याहि आहेत. जालंदरनाथ स्त्रीराज्यांत जाऊन राणीच्या मोहपाशांत पडला, तेव्हां त्याला आत्मस्वरूपाची आठवण करून देणें जरूर होतें. ती कोण कशी करून देणार ? स्त्रीराज्यांत पुरुषांना प्रवेश नव्हता. तेव्हां एका शिष्यानें गाणारणीचें आणि दुसऱ्यानें तबलजीचें सोंग घेतलें. आणि स्त्रीनगरीच्या दरबारांत नाच सुरू झाला. तेव्हां मत्स्येंद्रनाथानें तबल्यांतून 'चलो जालंदर अया मछींदर' असे बोल इतके स्पष्ट उमटविले कीं, ते ऐकून जालंदर शुद्धीवर आला, व स्त्रीमोहपाश तोडून आपल्या मेळ्यांत येऊन मिसळला. 'स्थानिक स्वराज्य' नाटकांतहि गटूलालजींच्या म्युनिसिपल निवडणुकीच्या मोहिमेंतील नायकिणीचा तबलेवाला 'शेठजी को मत देना' असे बोल स्पष्ट काढतो म्हणतात ! 'मेनका' नाटकांत जर कांहीं अंतस्थ अडचण न येऊन नाच घालतां आला असता, तर श्री. खाडिलकरांनाहि 'नव्या गुरुजींच्या तपश्चर्येच्या महामंत्राचे बोल' नाचांतून काढून दाखवितां आले असते, आणि नाटकगृहांतील प्रेक्षकहि काठींचा ताल धरून 'चरखा' 'बहिष्कार' 'विधायक कार्यक्रम' अशा शब्दांचा प्रतिध्वनी उमटवून इमारत दणाणून सोडते ! पण तो योग नव्हता !

तपस्वी गुरूच्या मंत्रांच्या नांवावर निष्क्रिय शिष्यांनीं प्रतिपक्षांची ग्राम्य निंदा करण्याच्या तोडीला बसविण्याहूनहि सरस अशी एक गोष्ट आम्ही ऐकली आहे. ती गोष्ट कदाचित् प्रस्तुत नाटककारास माहित असेलहि ! एका तपस्वी गुरुमाउलीच्या मृत्यूच्या तिसऱ्या दिवशीं तिचे मंत्रोच्चारबल असे एक शिष्य, आपलें नवीन नाटक लवकर बसविण्याच्या हौसेनें, आपल्या राज्यांतील—नाटककंपनी—प्रजेवर तालिमीस बसण्याचा जुलूम करूं लागले. पण बिचाऱ्या नटांनाच लाज वाटून, व दुखवटयाच्या सभेला जाण्याची त्यांना अनिवार इच्छा झाली म्हणून, या नाटकांतील वृद्धानंदाचें त्यांनीं अनुकरण केलें; आणि "आतां कांहीं आम्ही गुरुजींना तितके भीत नाहीं, तशी वेळ आली तर तोंडावर सांगू, ऐकत नाहीं म्हणून," असे उद्गार काढले; व ते ऐकल्यामुळें नाट्यगुरुजींचा नाइलाज झाला. तेव्हांहि "हें फल काय मम तपाला ?" असा प्रश्न विचारण्याला योग्य असाच प्रसंग होता.

असो. श्री. खाडिलकरांनीं कौन्सिलवाल्या लोकांना प्रतिमाभूत अशा या नाटकांतील बटुशिष्य वगैरे पात्रांच्या दाखविलेल्या दुर्दशेबद्दल इतकी चर्चा पुरे झाली. असहकारितेच्या प्रमुख निष्क्रिय अनुयायाचें चरित्र नाट्यरूपानें असेंच कोणी दाखवावयास बसला तर त्याला तें सहज करतां येईल. तें रंगभूमीवर आणण्याला एखाद्या बालगंधर्वाची जोड त्याला न मिळाली तर वेगळी गोष्ट. पण असली यथार्थ निंदा करतां येणें अशक्य नाहीं व त्या निंदेचा खेळ कोणासहि खेळतां येईल. हल्लीं पुण्यास रंगभूमीवर असलेल्या स्थानिक स्वराज्य नाटकाच्या कर्त्यांनीं नाहीं का बहार उडवून दिली! त्यानें स्थानिक स्वराज्याच्या यच्चयावत् सभासदांवर घाण फांसण्याकरितां आपल्या नाटकांतील पात्रांवर एकजात डांबर पसरून त्यांना विद्रूप केलें आहे. गेल्या चार वर्षांतील लोकचरित्र पाहिलें म्हणजे असहकारितेच्या कळपांतील काळ्या रंगाच्या शेळ्या मेंढ्या रंगभूमीवर, निदान नाटकाच्या छापील पुस्तकांत, आणून नाचविणें काय कठीण आहे! पण कोणीं असें केल्यानें ग्राम्य विनोदांत ग्राम्य विनोदाची आणखी भर, याहून दुसरा लाभ जनतेला काय होणार?

पण बटुशिष्य सोडून दिले तरी खुद्द गुरुजींचें जें पात्र श्री. खाडिलकर यांनीं विश्वामित्राच्या रूपानें रगविलें आहे, तें पाहून गुरूला 'Save me from my friends' असेंच म्हणण्याची पाळी येईल. मेनका हें पुढच्या नाटकाचें नांव पूर्वींच जाहीर झालें नसतें तर श्री. खाडिलकरांनीं विश्वामित्राचे जागीं एकदा ऋषि व तपश्चर्याभंगापेक्षां दुसरा एकादा विषय, आपल्या नाटकाला घेतला असता. पण दुर्दैव हें ज्याचें त्याच्याच वाणीनें वदवितें, ही जी म्हण आहे ती या नाटकांत यथार्थतेनें दिसून येते. नाटकाचा विषय कायम राहिला, पण इकडे कौन्सिलप्रवेश सिद्ध होऊन असहकारितेचा पाडाव झाला. अर्थात् आपलें नाटक चालू राजकारणाचें प्रतिबिंब करावयाचें तर खाडिलकरांनीं अगदीं आजतारखेपर्यंतच्या ताज्या गोष्टींचा त्यांत समावेश केल्याशिवाय चित्र कसें रंगणार? आणि अशा अगदीं ताज्या गोष्टींपर्यंत हकीकत आणून भिडवावयाची म्हणजे तींत महात्माजींच्या असहकारिताव्रताचा सोळा आणे मोड दाखविल्याशिवाय कसें होणार?

या नाटकांतील मेनका ही काँग्रेस. स्वराज्य पक्ष व राजकीय सुधारणा

यांचा मिळून एक रांधा असेल. पण विश्वामित्र म्हणजे महात्मा गांधी याबद्दल वादच नाहीं. पुराणकथेंतील मूळचा विश्वामित्र हा कशा प्रकारचा होता हें वाचकांना माहीतच आहे. तो आग्रही, आततायी, महत्त्वाकांक्षी व खुनशी असा होता. त्यानें वसिष्ठाचा परोपरीनें कसा छळ केला, तो क्रोधाचा मूर्तिमंत अवतारच कसा होता, प्रतिसृष्टि निर्माण करण्याची महत्त्वाकांक्षा त्याला कशी होती, ब्रह्मर्षि म्हणवून घेण्याची हाव त्याला किती होती, पण मेनकेच्या मोहानें तो तपोभ्रष्ट कसा झाला हें प्रसिद्ध आहे. अर्थात् गांधींना विश्वामित्राचें स्वरूप दिल्यानें वरील सर्व दुर्गुण मनांत उभे राहून नाटकाच्या नायकाविषयीं म्हणजे गांधीविषयीं दुष्ट ग्रहच उत्पन्न होतात. विश्वामित्र पराक्रमी असेल; परंतु तो आणि महात्मा गांधी हे–दोघेहि ज्या गुणांच्या कारणानें प्रसिद्ध आहेत त्यांच्या दृष्टीनें–उत्तरदक्षिणध्रुवांइतके दूर आहेत. बरें, पूर्वचरित्रांत विश्वामित्रानें काम जिंकला व उत्तरचरित्रांत त्यानें क्रोध जिंकला असें विश्वामित्राचें वर्णन श्री. खाडिलकरांनीं केलें आहे. पण पूर्वचरित्रांत आपली कामुक वृत्ति असल्याचें महात्माजीच आपल्या आत्मचरित्रांत लिहीत असतात. बरें, खाडिलकरी विश्वामित्रानें काम जिंकला होता असें म्हणावें, तर नाटकांत दाखविलेली त्यांची वृत्ति अगदींच वैराग्याची नाहीं आणि शेवट तर शकुंतला–जन्मानेंच झालेला आहे! मेनका ही "मी कामुम नाहीं," असें वरचेवर बजावून सांगत असतां फिरून अपत्ययाचना करतेच, व त्यामुळें 'Methinks the lady doth protest too much' असें तिजबद्दल म्हणावें लागतें.

अशा रीतीनें एका लोकप्रसिद्ध पौराणिक कथेच्या अगदीं उलट कल्पनेनें या उभयतांचें नाट्यचित्र खाडिलकरांनीं रंगविलें असल्यामुळें, त्यांनीं कितीहि लिंपालिंपी केली तरी लोकांचा पूर्वग्रह वर उमटल्याखेरीज राहत नाहीं. शिवाय नाटकांतील विश्वामित्र इतका दुबळा, लवचिक, बिनहाडाचा व परप्रत्ययनेय दाखविला आहे कीं, स्त्रीमोहप्रतापाच्या दृष्टीनें तो पौराणिक विश्वामित्राच्या जवळजवळ जातो. आपले शिष्य अप्सरांच्या पाशांत सांपडण्याच्या बेतांत आहेत असें पाहून त्याला किंचित् राग येतो, व आपल्या शिष्यांच्या अंगीं कोंवळेपणा उपयोगी नाहीं असें त्याला वाटतें. परंतु मेनका ही एकाद्या कैदाशिणीप्रमाणें "ही पहा मी आलें जळायला" असें म्हणून पुढें येते, आणि नेत्रांशीं नेत्र भिडविते, तेव्हां

तिला न जाळण्याकरितां निमित्त हुडकून काढावें म्हणून विश्वामित्र तिला म्हणतो, "तूं कोण? तुझें नांव काय? कोणत्या अप्सरेला मीं जाळून टाकिलें हें मला समजावयाला नको का?" जणूं काय हें नांव न कळतें तर 'मृत्यूचा पास' मिळाला नसता! किंवा विश्वामित्राला जणूं काय इंद्राच्या सगळ्या अप्सरांचीं नांवें इतकीं माहीत होतीं कीं, हें एक कळल्यानें त्याला इतरांचें सविकल्पक ज्ञान होणार होतें!

मेनका बोलूनचालून चंचलतेचें सुख भोगण्याकरितां, आपल्या पुढ्यां-तल्या पोरी घेऊन, हें स्थान उत्तम असें पाहून विश्वामित्राच्या आश्रमांत आली होती. आणि 'या खुळ्या विध्वंसकाला मी विधायक बनविणार' असें ती तोंडानें बजावीतहि होती. हें सर्व दिसत असतां, आणि तोंडानें तिला लबाड उद्दाम असें म्हणत असतां, विश्वामित्र मनांत विरघळतो; व तिला जाळण्याऐवजीं "तुला जाळणार होतों, तुला जाळीनहि कदाचित्" असा उतरता सूर लावून कांपऱ्या कांपऱ्या बोलतो. आणि पुढें जेव्हां मेनका आपला हल्ला चढवून "मला जाळा तरी, नाहींतर आश्रमांत तरी ठेऊन घ्या" असा पेंच घालते, तेव्हां "बायकांची वटवट विद्वानांनाहि घोटाळ्यांत टाकते तें खोटें नाहीं. मला गोंधळून गेल्यासारखें झालें आहे!" असें म्हणण्याची ऋषिवर्यांना पाळी येते. "मी तुला जाळीत नाहीं आणि ठेवूनहि घेत नाहीं. पण तूं होऊन राहिलीस तर माझी हरकत नाहीं. मात्र दृष्टीआड रहा." असें म्हणून या लचांडांतून तो कसा तरी सुटका करून घेतो; व "पहिल्या चकमकींत माझाच जय झाला" असें त्याची पाठ फिरतांच मेनका ठणकावते! अशा रीतीनें या पहिल्या अंकांत महात्मा गांधी व व्यवहार्यता यांच्या युद्धांत, असहकारितेचें पेकाट पहि-ल्याच तडाक्यांत मोडल्याचें चित्र खाडिलकरांनीं दाखविलें आहे. कौन्सि-लांचें स्वागत नाहीं, पण त्यांचा तीव्र बहिष्कारहि नाहीं; कौन्सिलकुतूहलाचे सगळे चाळे आश्रमांत सुरू होतात; व हें ज्ञान असतां फिरून मी आपला असहकारितावादी तो असहकारितावादीच असें शपथेवर सांगण्याला महा-त्माजी मोकळेच राहतात! अर्थात् यांत कोणाचें ढोंग असलें तर तें मेन-केचें नाहीं. ती स्पष्ट बोलणारी आहे. आणि ज्ञान असतां अज्ञानाचें पांघ-रूण घेणें याला जर ढोंग म्हणावयाचें तर तें विश्वामित्रालाच (गांधींना) चिकटतें. श्री. खाडिलकरांनीं केलेली ही गांधींची प्रशस्ति कीं टवाळी?

दुसऱ्या अंकाचें स्थळ विश्वामित्राची पर्णकुटिका हें असून त्यांतच बटु-शिष्यांचा आणि अप्सरांचा धांगडधिंगा सुरू आहे. आणि हें पाहिलें म्हणजे या नाटकानें खाडिलकर महात्माजींवर उपकार न करितां त्यांना अपकार करीत आहेत असेंच म्हणावें लागतें. पण या धूर्त शिष्यांना भावी गोष्टींचा पोंच होता; व ज्वालामुखी म्हणतोच कीं, "गुरुजी मेनकेच्या अंगाला स्पर्श करीपर्यंत (!) आम्ही अप्सरांच्या अंगाला हात लावतां कामा नये." पण गुरुजींविषयीं शिष्यानें केलेलें हें कुलपी भविष्य पुढें लवकरच खरें झालें. आणि कायदेभंग कमिटीनें कौन्सिलप्रवेशाला तोंड पाडून महात्मा गांधींची जी स्थिति केली तीच, गुरुजींनीं मेनकेचें पाणि-ग्रहण करण्याची वेळ जवळ यावी म्हणून, धूर्त बटुशिष्यांनीं तिच्या इतर वाटा बंद करून तिला विहिरींत पडावयास लावून केली. अर्थात् हेंहि निमित्त खाडिलकरांचा विश्वामित्र फुकट जाऊं देत नाहीं; व "तुला विहिरींत कोण मरूं देतो, ये अशी बाहेर, ये अशी हात धरून बाहेर काढतों," असें वारवार वेळां म्हणून प्रत्यक्ष तसें करतोहि. आणि लगेच या 'पाणिग्रहणा'च्या आधारावर मेनका स्वतःला विश्वामित्राच्या तोंडा-वर त्याची अर्धांगी म्हणविते आणि 'पहिल्या स्पर्शसुखा'च्या गोष्टी बोलते. फसलेलें सांवरून घेण्याकरितां "माझी तसली बुद्धि नव्हती ग" असें विश्वा-मित्र अर्धवट पुटपुटतो. पण तो निषेध आपला असा तसाच !

"आतां पुढें काय ?" हा प्रश्न येतोच. तेव्हां मेनका अर्थातच मायावीपणानें त्याला सांगते कीं, "अशा जितकाम तपोधनाची शिष्यीण होऊन, ब्रह्मचर्य-व्रत कडकडीत पाळण्याहून, अधिक सुखाचा स्वर्ग कोणता ?" पण या नाग-पुरी आंकड्यांत पुष्कळसा नाद घालावयास पाहिजे हें विश्वामित्र मनांत जाणत असतो. आणि "अप्सरा ब्रह्मचारी होणार अँ ?" असा शंकात्मक लाडीगोडीचा निषेधहि तो करतो. पण हातचें सावज जाऊं देऊं नये या हेतूनें, मात्र इंद्राची फजिती करण्याचें निमित्त काढून, तिला तो आश्रमांत ठेवून घेतो. इतकेंच नव्हे तर आपल्या गैरहजेरींत शिष्यांना नवी व्यवस्था समजावून सांगण्याला तिला मुख्याध्यापिका नेमतो ! पुढील प्रवेशांत शिष्य व अप्सरा यांचा तमाशा रंगविला आहे. पण त्यासंबंधानें आम्ही पूर्वीं निषेध केलाच आहे. गांधींच्या नांवाशिवाय घास न उचलणाऱ्या पंडित मोतीलाल नेहरू, दास, पटेल वगैरे गांधीशिष्यांची जी हास्यास्पद दुर्दशा

श्री. खाडिलकरांनीं नाटकांत केली आहे ती मराठींत आहे म्हणूनच बरी गोष्ट ! नाहीं तर आज स्वराज्य पार्टीचें ढोलगें वाजविणारे तबलजी तिची साथ करतां करतां तिला मागें किती वाकुल्या दाखवीत आहेत, व मधून-मधून तोंड फिरवून तिच्या पुढाऱ्यांना रेडे नंदी कुत्रीं आणि पाणक्ये ढबे वगैरे अपशब्दप्रचुर शिव्या कशा देत आहेत, हें त्यांचें त्यांनाच कळून आलें असतें. पण पटेल जम्नादास हे मुंबईंतच आहेत व त्यांना मराठीहि समजतें. तेव्हां त्यांनीं तरी हें नाटक एक वेळ पाहवें.

असो. दुसऱ्या अंकाच्या शेवटीं, ताटाजवळच्या मांजराप्रमाणें, मेनका हळुहळू पुढें सरते. ऋषिसन्निध राहून बाकी सर्व सुख मिळालें, फक्त आतां विश्वकल्याणाकरितां (!) संतानोत्पत्तीच उरली. आणि ही इच्छा धरली तर " पुरुषांनीं बायकांना नांवें कां ठेवावीं " असा सरळ सवाल ती विश्वामित्राला टाकते. पण विश्वामित्रहि कांहीं या कामांत मनानें मागें नाहीं ! आतां मेनकेची इच्छा तृप्त करण्याकरितां विश्वामित्र अगदींच कांहीं विश्वकल्याणाचें निमित्त सांगत नाहीं. तो पडला सत्यवक्ता. म्हणून तो परंपरा चालविण्याच्या अहंकाराचा आपला दोष कबूल करतो. पण या प्रांजल दोषदर्शनाचें भाषांतर हेंच कीं, " अपत्योत्पादनाच्या तुझ्या विनंतीला मी मान्यता देतों. " मनांतून विश्वामित्राला शिष्यांचा इतका भारीभारी राग आला असें प्रेक्षकांनीं व वाचकांनीं समजावयाचें आहे कीं, प्रेमळ प्रियकर मेनकेचा ' ॲसबेस्टॉस ' चा ज्वालाप्रतिबंधक ' ड्रॉप ' पडदा मध्यें असतो म्हणूनच ते बिचारे निभावतात, नाहीं तर आश्रमाचें नाटकगृह जळून खाक ! मेनकेच्या अंगावरील पारदर्शक अशा झिरझिरीत शालूचा हा केवढा तरी पराक्रम ! असो. क्रोध नाहींसा होणें ही गोष्ट गुरुजींनीं गंगेंत एका बुडी मारण्यानें होणारी होती, ती मारल्यावर शिष्यां-वरचें संकट टळलें. आणि बटु ज्वालामुखीचें भविष्य खरें ठरण्याची वेळ येऊन विश्वामित्रानें, कित्येक आधुनिक बुवांप्रमाणें, " अमुक वेळीं माझ्या दर्शनास ये म्हणजे तुला मंत्रोपदेश देऊन पट्टशिष्यीण करतों " असें सांगून संकेतस्थान व संकेतकाल ठरविला. हें स्थळ जुहू हें असेल काय ?

विश्वामित्राचा मंत्रोपदेश घेऊन मेनका तपश्चर्येला बसली. ती अवधी किती महिन्यांची हें माहित नाहीं. पण अपत्योत्पादनाचा मोसमच आलेला तेव्हां जी जी गोष्ट घडावी ती ती त्याला अनुकूलच व्हावी यांत काय

नवल ? वस्तुतः आश्रमांत अशी स्थिति घडून आली कीं, अप्सरा व बटुशिष्य हे जरी कामुकपणाचा वरवर धांगडधिंगा घालीत होते, तरी त्या अप्सराच मेनकेपेक्षां अधिक निग्रही ठरल्या. त्या आपल्या प्रियकरांना स्वर्गांत लोभवून नेऊन मग तेथें विलास भोगणार होत्या. पण मेनका ही आचारांत स्वतःप्रमाण होती; व प्रियकराला नादाला लावून त्याच्या छळाचें सुख सोसण्याकरितां दांपत्यसुख लांबणीवर टाकण्याइतकी मेनका मूर्ख नव्हती. विश्वामित्र हातीं आल्याचा बार दवडण्याची तिची इच्छाच नव्हती. पंडित जगन्नाथरायाप्रमाणें, एवढा विश्वामित्र हातीं आला म्हणून, ' अवनीतलमेव साधु मन्ये न वनी माघवनी विलासहेतुः ' असलें चतुर व्यवहारशास्त्र जाणणारी ती होती, म्हणून ती आपल्या सोबतिणींच्या आधींच प्रियकर ऋषीपासून ' मंत्रोपदेश ' पावून तपश्चर्येची विश्रांति घेत बसली. अप्सरा वेड्या ! त्यांना मंत्रोपदेशाचें निमित्त करण्याचें माहीत नव्हतें. पण ' खुळ्याचा त्राता भगवान् ' या म्हणीप्रमाणें इंद्राला या वेळीं असें सुचलें कीं, " अपत्यवती झाल्याशिवाय अप्सरांना स्वर्गलोकांत येण्याची मनाई करावी." त्यामुळें अप्सरांना " आमच्याकडून संसार करून घ्या," असें बटुशिष्यांना उलट विनवावें लागलें. अशा रीतीनें अप्सरा, मेनका, बटुशिष्य व त्यांचे गुरुजीहि अपत्यसंपन्नतेच्या मार्गाला लागले ! खरा बहिष्कारवादी असा एकहि उरला नाहीं !

अजूनहि शिष्य दृष्टीस पडल्याबरोबर क्रोधाची आराधना करावीशी विश्वामित्राला वाटे. पण बोलूनचालून ' आराधना ' करून आणण्याचा तो क्रोध, स्वयंस्फूर्त नव्हे. मग या क्रोधदमनाला मेनकेच्या मध्यस्थीचें काडीचें निमित्त पुरल्यास काय नवल ? अर्थात्, गुरुजी शिष्यांवर रागावत नाहीसे झालेच. पण उलट " ही मेनका तुम्हांला कल्पवृक्षाप्रमाणेंच काय वाटेल तें देईल, " असें गुरुजींनीं शिष्यांना सर्रास सांगून टाकलें. कौन्सिलांत जावेंसें वाटलें जाऊं देईल, कोर्टांत फिरून वकिली करावीशी वाटली करूं देईल, मुलांना सरकारी शाळेंत पाठवावेंसें वाटलें पाठवूं देईल, सूत काढूं नये असें वाटलें नको म्हणेल, त्याला पर्याय हुडकून देईल, असा आशीर्वाद मिळाल्यावर मग शिष्यांना व शिष्यवरांना काय कमी ? आणि गुरुजींची तरी ही केवढी वत्सलता ! पण गुरुजी हे थोडेसे धूर्तहि होते. लोक काय म्हणतील याचाहि थोडासा अंदाज त्यांना होता. म्हणून त्यांनीं शिष्यांना

एक कानगोष्ट सांगून ठेवली, ती अशी कीं, माझ्या क्रोधाच्या तपःश्चर्येचे मंत्र तुम्ही कनवठीला लावून ठेवा, म्हणजे तुम्हांला वेळोवेळीं लोकांवर गुरकावतां येईल. स्वराज्यपक्षाच्या लोकांना पूर्ववृत्ताची आठवण करून देऊन जर कोणीं मेंढ्याबकऱ्यांत काढलें तर, " छे छे, असें कसें होईल? जाळीन ! पोळीन ! असहकारिता आणून मूर्तिमंत उभी करीन ! बहिष्काराचा वणवा पेटवीन ! " सर्वनाश करीन, असें शिरा ताणून बोलतां यावें अशा प्रकारचे ते मंत्र होते; व शिष्यांनीं ही युक्ति चांगली उपयोगांत आणली असल्यास नवल नाहीं.

असो. शेवटीं विश्वामित्र मेनकेचें पाणिग्रहण करून अर्धांगी या नात्यानें तिचा स्वीकार करतो, व " प्रिय विश्वामित्र मेनकेला " असे शब्द ऋषीच्या तोंडून निघून सर्व आनंदीआनंद होतो ! ब्रह्मचारी अकामुक अशा विश्वामित्रमेनकेचें अपत्य जी शकुंतला ती मेनकेनें आणून विश्वामित्राच्या पायांवर ठेवल्यावर, रविवर्म्याच्या चित्रांतील विश्वामित्राप्रमाणें तो लज्जेनें आपले डोळे झांकीत नाहीं तर, अर्थात् या लोभनीय अपत्याला कुरवाळतो ! मेनकेचें पुढें काय होतें ? त्याचें उत्तर बटुशिष्यांनीं या खालील ओळींत दिलें आहे.

महातापसी काम जिंकावयाला (!)
स्वर्गेहीं पहा धाडितो मेनकेला

मेनका तपस्वी ऋषीच्या आश्रमांत येऊन राहिली तीच प्रथमपासून धीट बनली. इतकीं कीं, नाटकाच्या पहिल्या पानांतच ' पाणिग्रहण, अर्धांगी, दासी, बटीक आणि गडे ' हा प्रेमपाशांतला पांच पायऱ्यांचा संबोधन-सोपान चढून जाऊन, ती व्याघ्रांबरपरिवेष्टित अशा ऋषि-मंचकावर जाऊन बसली. अशी ती मेनका स्वर्गेहीं म्हणजे विलासप्रिय देवांच्या राज्यांत गेल्यावर ' काम जिंकावयाला ' कितपत समर्थ होईल हें दिसतेंच आहे! निदान कामदेवाला तिनें जिंकल्याच्या पराक्रमाचें वर्णन देणारें पुराण अजून व्हावयाचें आहे. कदाचित् मेनका वृद्ध झाल्यावर ही गोष्ट घडून आली असती. पण दुर्दैवानें अप्सरा व देव यांना वार्धक्य येत नाहीं ! यामुळें जरा पंचाईत. असो. विश्वामित्रानें आपल्या अपत्याविषयींचें कर्तव्य किती पाळलें तें मार्मिक अप्सरांनीं बोलून दाखविलेंच आहे. स्वतः जन्म दिलेल्या अर्भकाचें पालनपोषण परक्याकडून परस्पर झालेलें पाहावें,

किंबहुना करवावें, हें आश्रमांतील वृक्षावरच्या एकाद्या धूर्त कोकिळेला शोभेल ! पण तो वनवासी ऋषि झाला म्हणून पुरुषाला खचित शोभणार नाहीं. वाममार्गानें जन्मास घातलेल्या अपत्याविषयीं एकाद्या बेजबाबदार पित्यानें केल्यासारखीच ही विश्वामित्राची करणी दिसते. शकुंतला ही भाग्यशाली होती व प्रत्यक्ष बापानें टाकलें तरी तिचें कांहीं उणें पडलें नाहीं हें वेगळें. तिलाहि पुढें ऐश्वर्याचे दिवस येऊन चक्रवर्ती भरत तिच्या उदरीं आला हें सर्व झालें. पण या कर्तव्यपराङ्मुख बापाची अब्रु जगानें काढलीच. क्षणांत अपत्य आपलें म्हणावयाचें व क्षणांत तें परकें मानावयाचें यांत काय थोरवी ?

खाडिलकरांच्या विश्वामित्राबद्दल फक्त एकच गोष्ट बरी वाटते ती ही कीं, ब्रह्मदेवाशीं स्पर्धा करून प्रतिसृष्टि निर्माण करण्याचा हव्यास त्यानें पौराणिक विश्वामित्राप्रमाणें फार वेळ धरला नाहीं. लवकरच त्यापासून तो पराङ्मुख झाला. एरवीं करावयाला जावें घोडें तो व्हावें गाढव, करावें मनुष्य पण बनावें माकड, करावयाला जावें अंजीर बनावें उंबर; असें व्हावयाचें ! पण श्री. खाडिलकरांच्या विश्वामित्राच्या हातून असली विचित्र सृष्टि निर्माण न होतां शेवटीं ब्रह्मदेवाच्या सृष्टिक्रमानुसार सजातीय असें गोड सुकुमार बालकच त्यानें निर्माण केलें. या विश्वामित्राला देखील पूर्वी एकजात पुरुषांची सृष्टीच निर्माण करण्याची लालसा होती. ब्रह्मचाऱ्यापासून ब्रह्मचारी, ब्रह्मचाऱ्यापासून पुनः ब्रह्मचारी ! आणि तसें जर घडतें तर मग आणखी काय हवें होतें ? उदाहरणार्थ, सर्व हिंदुस्थानभर एकजात कट्टया असहकारवाद्यांची पलटण उभी राहिली असती तर स्वराज्य कांहीं दूर नव्हतें. पण दैवाला लीला पहावयाची म्हणून स्वराज्यपक्षाची मेनका महात्माजींच्या आश्रमांत अवतरली त्यामुळें पुढचा सगळा घोटाळा झाला ! असो.

श्री. खाडिलकरांनीं लिहिलेल्या नाटकरूप अन्योक्तिवर आम्हीं ही जी अन्योक्तिरूप टीका केली आहे, तिचें मर्म वाचकांच्या लक्षांत येईलच. अन्योक्तीचा बोगदा मोठा; म्हणून त्यांत मधूनमधून खाडिलकरांप्रमाणें आम्हीहि 'प्रस्तुत' वस्तुपरिचयाच्या सूचक शब्दांचे कंदील लावलेले आहेत. त्यांच्या प्रकाशानें वाचकांस बिनचूक मार्ग काढतां आला असेल. आम्हीं टीका केली ती सर्वस्वीं मूळचा आधार धरूनच केली आहे. शिवाय मूळ

नाटकांत असहकारितेच्या ऱ्हासाचें जें क्रमशः वर्णन खाडिलकरांनीं केलें आहे, त्यापासून आम्ही आजूबाजूस गेलों नाहीं. अर्थात् या नाटकरूपानें असहकारितेच्या अपकर्षाचें चित्र जर नाटकाच्या वाचकांच्या किंवा प्रेक्षकांच्या मनावर ठसेल तर त्याचा दोष सर्वस्वीं श्री. खाडिलकरांकडेच येतो. कारण विश्वामित्र व मेनका यांचा स्वभावपरिपोषच त्यांनीं असा दोषास्पद केला आहे कीं, विश्वामित्राच्या चरित्रावर वैराग्यचिकित्सेचें, तात्विक अवडंबराचें, व पोकळ वेदान्ताचें कितीहि पांघरूण घातलें तरी तें झांकून जातच नाहीं. मांत्रिकानें दुसऱ्यावर मूठ मारावी, पण मांत्रिकाचें मंत्रानुष्ठान मुळांतच कच्चें पडल्यामुळें ती मूठ त्याच्यावरच परतावी, अशीच श्री. खाडिलकरांची या नाटकांत स्थिति झाली आहे. त्यांना कांहीं राजकीय व्यक्ती रंगभूमीवर हास्यास्पद करून दाखवावयाच्या होत्या. पण तसें करतांना नुसती ग्राम्यता मात्र त्यांच्या गळ्यांत पडली, आणि अपयश त्यांच्या गुरुमाउलीच्या पदरीं पडलें. आम्हीं वर दर्शविल्याप्रमाणें धूर्त व प्रेमासक्त अशी मेनका, आणि प्रेमप्रवण पण भोळा विश्वामित्र, यांच्या लीलांपुढें बटुशिष्यांच्या लीला मार्मिक वाचक तेव्हांच विसरून जातात. बटुशिष्य सुखविलासाची उघड भाषा बोलतात. पण गुरूची दाढी शिष्याहून सव्वा हात झाली तरी, व त्यानें गंभीर शब्दावडंबरानें आपल्या अधीर मनोवृत्ति झांकण्याचा प्रयत्न केला तरी, मार्मिक व रसिक यांच्या दृष्टीनें गुरुजींचा अपकर्षच अधिक बोधप्रद ठरतो.

वास्तविक हल्लीं मराठी रंगभूमीवर चाललेल्या एकंदर दोषास्पद प्रकारासंबंधानें विचारी लोक जशी नुसती तुच्छतादर्शक उपेक्षा करतात, तशीच श्री. खाडिलकरांच्या या नाटकांतील प्रकाराचीहि झाली असती. पण कोणी कांदा खाऊन एकादशी मोडावी, त्याप्रमाणें बाष्कळ ग्राम्य विनोदांत प्रचलित राजकारणांतील व्यक्तिद्वेष घुसडून देऊन, श्री. खाडिलकरांनीं आपला अपराध द्विगुणित केला आहे. यामुळें आम्हीं केली याहून अधिक कडक टीका त्यांच्यावर कोणीं केली असती तरी तें क्षम्यच झालें असतें. कोणाचा रंगभूमीवर हात चालला तर कोणाचा इतर ठिकाणीं चालेल. श्री. खाडिलकर हे नाटककार झाले म्हणून प्रतिपक्षीयांना 'नंदी, बैल, रेडे, गाढव, कुत्रे, स्त्रियांच्या लाथा खाणारे व पाय चाटणारे, स्त्रैण, त्यांची लुगडीं धुणारे व काखेंत घेणारे बाल्ये' असलीं अन्योक्तिरूप विशेषणें

लावण्याचा मोह जर त्यांना आवरला नाहीं, तर श्री. खाडिलकरांच्या विधायक कार्यक्रमावर त्यांच्या असहकारितेच्या आचरटपणावर, त्यांच्या मंत्रसामर्थ्यावर, त्यांच्या तपश्चर्येवर हल्ला चढवून कोणीं जर त्यांनाहि अशींच विशेषणें लावलीं तर त्यांत काय वावगें? नाटकांतील बटुशिष्यांच्या रूपांनीं ओळखल्या जाणाऱ्या व्यक्ती राजकारणांतील अप्सरांचे शालू कदाचित् लाक्षणिक अर्थानेंच काखेंत घेत असतील. पण खाडिलकरांना आपल्या या नाटकाच्या विधायक कार्यक्रमांत तो प्रसंग अगदीं प्रत्यक्षच कितीदां तरी आला असेल! कारण एरवीं नाटक चांगलें बसतें कसें? ज्ञानेश्वरांनीं रेड्याच्या तोंडून वेद वदविले तसें बालगंधर्व खाडिलकरांच्या हातून गद्यमय पद्यें लिहवितात ते लिहवोत. तितक्यानेंच श्री. खाडिकरांचें समाधान झालें असतें तर आम्हीं या विषयांत लक्षच घातलें नसतें. परंतु या नाटकाला सर्वस्वीं राजकारणाचें स्वरूप असल्यामुळें आम्ही तें नाटक असें मानीतच नाहीं. तर एका प्रतिपक्षीयाचें राजकीय व्याख्यान किंवा लेख असेंच मानतों. आणि एवढ्याचकरितां आज लेखणीला हे अप्रिय श्रम द्यावे लागले.

## ६४ भास कवींचीं नाटकें



( अनुवादक श्री. कृष्णाजी लक्ष्मण सोमण, ऊर्फ किरात, मुद्रक व प्रकाशक–चित्रशाळा प्रेस, पुणें. ) प्रस्तुत ग्रंथ आमचेकडे अभिप्रायास आल्याला बरेच दिवस झाले तरी त्याचा परामर्ष आम्हांला आजवर घेतां आला नाहीं याबद्दल दिलगिरी वाटते हें आम्ही प्रांजलपणें म्हणतों. पण ग्रंथाचें महत्त्व व परीक्षणाला लागणारा काळ यांचें प्रमाण नेहमीं सम असतें. यामुळें तें महत्त्व जितकें अधिक तितका परीक्षणाला काळ अधिक हें उघड आहे! नाटककार पंचवीसशें वर्षांचा जुना आहे. नाटकांचें भाषांतर १९१६ च्या ऑक्टोबर महिन्यांत अनुवादकानें सर्व तयार केलें असतां तें छापून प्रसिद्ध होण्याचा योग १९३१ पर्यंत म्हणजे १५ वर्षें आला नाहीं. अर्थात् परीक्षणालाहि फक्त कांहीं महिने अवधि लागल्यास अनुवादक तो फारसा मानणार नाहींत.

भास कवीचें नांव मराठी वाचकांना प्रथमपासून परिचित असलें तरी, त्याचा अप्रत्यक्ष असाहि प्रथम परिचय फार थोडया वर्षांपूर्वींच मराठी वाचकांनाच काय पण इतर कोणत्याहि वाचकांना झाला असेल. हा परिचय महामहोपाध्याय पंडित गणपतीशास्त्री (त्रावणकोर) यांनीं प्रथम करून दिला. त्यांची नेमणूक त्रिवेंद्रम् संस्कृत ग्रंथालयांतील ग्रंथ प्रसिद्ध करण्याच्या कामगिरीवर असतां, त्रावणकोर संस्थानांत पद्मनाभपुराजवळ असलेल्या एका मठामध्यें ताडपत्रावर मल्लयाळी लिपींत लिहिलेलें भास कवीच्या ११ नाटकांचें एक बाड त्यांना सांपडलें; आणि पुढील दौऱ्यांत कांहीं अपुरीं व पुरीं अशीं तीन नाटकें मिळालीं. त्यावरून शोध करतां करतां हीं नाटकें भास कवीचीं असें त्यांचें अनुमान निश्चित झालें; व त्याप्रमाणें त्यांनीं त्यांचें परिशीलन करून तीं सर्व छापून प्रसिद्ध केलीं.

## हें बाड नसून घबाड आहे

हें भास कवींच्या नाटकांचें बाड म्हणजे साहित्यसेवकांना मोठें घबाडच होय. गुप्तधन-संशोधनाची हकीकत केव्हांहि रम्यच. पण गुप्तधनसंशोधनाच्या कार्यांत नेहमीं यशापेक्षां अपयशच येत असल्यामुळें, या धनसंशोधनाला एक प्रकारची उदास व दुःखकारक भावना चिकटून राहिलेली आहे. पण डयूमा किंवा रॉबर्ट ल्यूइस स्टिव्हन्सन अशा ग्रंथकारांनीं या गुप्तधन-संशोधनाच्या कार्यांत यश आलेला अद्भुत प्रकार वर्णन केलेला असल्या-मुळें, अशा संशोधनाला आशेची आनंदी भावनाहि थोडीशी चिकटून राहूं शकते. पण फिरून असा विचार येतो कीं, गुप्तधनसंशोधनाचे प्रयत्न यशस्वी होऊन ठेवा हस्तगत झाला असें हें वर्णन असलें तरी तेंहि फिरून कादंबरींतच म्हणजे स्वप्नांत! आशा विफल झाल्यापेक्षां आशा सफल झाल्यानेंच मनाला बरें वाटतें खरें, पण स्वप्नांत सुधारस प्याल्यानें स्वप्न पडणाराचें तोंड, गोड कसें होणार? म्हणून गुप्त धन संशोधनाचा प्रयत्न विफल झाल्यापेक्षां तो सफळ झाल्याचें वर्णन अधिक अद्भुत व आनंददायक असलें तरी, प्रत्यक्ष व्यवहारांत तो प्रयत्न सफल होऊन हातांत खेळवितां येण्यासारखें व बाजारांत बटवडा करतां येण्यासारखें गुप्तधन जमिनींतून निघेल तर ती गोष्ट वरच्याहिपेक्षां अधिक अद्भुत व आनंददायक समजली पाहिजे. प्रत्यक्ष व्यवहारसृष्टींत गुप्तधनसंशोधनाचा प्रयत्न सफळ होऊं शकतो हें पुराणवस्तु संशोधन खात्यानें सिद्ध केलें आहे, व सरकारनेंहि 'ट्रेझर

ट्रोव्ह ' नांवाचा कायदा करून सिद्ध केलें आहे. असो; गणपतीशास्त्री यांना अवचित एकाच ठिकाणीं भास कवीचीं १३ नाटकें उपलब्ध व्हावीं ही गोष्ट, अद्भुत रसाच्या दृष्टीनें, ड्यूमा स्टीव्हन्सन् यांच्या कादंबरींतील वर्णनाइतकीच अद्भुत असून शिवाय मूर्तिमंत व सत्यस्वरूपाची असल्यामुळें आनंददायकहि ठरतें.

कै. हरीभाऊ आपटे यांनीं भासाचीं नाटयकथानकें थोडीं थोडीं ' करमणूक ' पत्रांत प्रसिद्ध केलीं. फिरून १२ वर्षांनीं कै. हिवरगांवकर यांनीं चार नाटकें, रा. वि. दा. देशपांडे यांनीं १ नाटक, चित्रशाळेनें ९ नाटकें, व मागाहून चार नाटकें अशीं खंडाखंडानें या नाटकांना प्रसिद्धी मिळाली. पण हल्लींच्या रा. सोमण यांच्या आवृत्तींत तेराहि नाटकें एकाच ग्रंथांत प्रसिद्ध होत आहेत. प्रो. ऊर्ध्वरेषे ( इंदूर ) यांनींहि या नाटकांची हिंदींत भाषांतरें केलीं आहेत. याचें कारण स्वतः भासाच्या नाटकांची योग्यता, व त्याहूनहि विशेष म्हटलें म्हणजे त्यांची अपूर्वता. जुन्या संस्कृत नाटकांचा एवढा मोठा संग्रह प्रसिद्ध झाल्यावर युरोपियन पंडित त्यांचा परामर्ष घेण्यास चुकतील हें शक्यच नव्हतें. आणि प्राग युनिव्हर्सिटीचे प्रो. विंटरनिडस् यांनीं तीं नाटकें वाचून त्यांचें परीक्षण करून त्यांचें यथार्थ गुणवर्णन केलें आहे.

## भासकवीचा काळ

भास कवी हा इ. स. पूर्वी पांचशें वर्षें होऊन गेला. अर्थात् तो आतांपर्यंत उपलब्ध असलेल्या सर्व संस्कृत नाटककारांच्या पूर्वीचा होय. अलीकडील काळांत जरी भासाचीं नाटकें लुप्त झालीं होतीं तरी, जुन्या संस्कृत कवींनीं व नाटककारांनीं तीं वाचलीं असावीं व त्या योगानें पिढयान्पिढया भासाची कीर्ति पसरत आली असावी असें उघड दिसतें. कालिदास, बाण, जयदेव या सर्वांनीं भासाची स्तुती केली आहे. कालिदासानें भासाबरोबर सौमिल्ल कवी पुत्राच्या नाटयप्रबंधाचीहि स्तुती केली आहे. अर्थात् त्यांचीं हीं नाटकें उपलब्ध होतील तर गुप्तधन सांपडल्याचा हा आनंद द्विगुणित होईल. असो. भासाची कीर्ति गाइली जात असतां, त्याच्या नाटकांचा उपयोग उघड किंवा चोरून त्याच्या नंतरचे कवी करीत, व ही चोरी सहसा न उमगावी इतका जुना पुराणा हा भास कवी पूर्वींच होऊन गेला होता.

प्रस्तुत उपलब्ध झालेल्या १३ नाटकांवरून भासाची ही कीर्ति सुप्रतिष्ठित आहे असें म्हणावें लागतें. मात्र या १३ मध्यें सरस निरस असा भेद बराच आहे; व प्रतिमा, अविमार, स्वप्नवासवदत्ता, चारुदत्त वगैरे नाटकें वरच्या दर्जाचीं असून इतर खालच्या दर्जाचीं आहेत असें म्हणावें लागतें. पण असें होणारच. कोणताहि कवी आपलीं सर्वच नाटकें सारख्या गुणांचीं लिहूं शकत नाहीं; किंबहुना कोणत्याहि नाटककाराची नाट्यकौशल्यांतील प्रगति हटकून वाढतीच राहते अशीहि गोष्ट नाहीं. यामुळें नाटकांच्या गुणांवरून काल किंवा कालानुक्रमावरून गुण ठरविणें हें धोक्याचें टरतें. हें सांगण्याचें कारण इतकेंच कीं, रा. सोमण यांनीं आपल्या विवेचनाच्या एका भागांत असा क्रम लावल्यासारखा दिसतो. जेथें नाटककारानें आपल्या कृतींचा काल स्पष्ट निर्दिष्ट केलेला नाहीं व त्यांचा अनुक्रम अनुमानानेंच ठरवावा लागतो, तेथें वरील प्रकारची विचारसरणी अनुसरण्याचा मोह सहजच होतो. परंतु प्राचीन किंवा अर्वाचीन अनेक नाटककारांविषयीं असें दाखवितां येईल कीं, त्यांच्या पहिल्या कृती जितक्या रम्य किंवा गुणमंडित तितक्या नंतरच्या कृती तशा नाहींत. आणि याचें कारण हेंच कीं, स्फूर्ति किंवा प्रतिभा ही अमुक एका वयांतच उज्ज्वल असते असें नाहीं, किंवा ती प्रगतीपर असते असेंहि नाहीं. तर ती सर्वस्वीं लहरी असते, व कोणत्या परिस्थितींत व कोणत्या वयांत ती चमकून जाईल याचा कोणीच कांहीं नेम सांगूं शकत नाहीं.

पण हा मुद्दा एकंदरीनें गौणच म्हणून सोडून देण्यास हरकत नाहीं. कोणताहि कवी किंवा नाटककार कालवश झाल्यावर तरी त्याची सर्व कृति एक व अविभक्त अशीच समजून चालणें योग्य आहे. जसा त्याचा देह व आत्मा हे एकेकच व अविभाज्य, त्याचप्रमाणें त्याच्या प्रतिमेनें निर्माण केलेलीं काव्यें व नाटकें हीं देखील एकच व अविभाज्य मानिलीं पाहिजेत. त्यांतील चांगलें तें कोणत्याहि वयांत लिहिलेलें असलें तरी चांगलें आणि तीच गोष्ट त्यांतील वाईटासंबंधानेंहि समजावी. सरस–निरस निर्मितींचा उपयोग, प्रकाश व अंधकार याप्रमाणें किंवा मनुष्यस्वभावांतील गुण व दोष यांच्याप्रमाणें, कवी व नाटककार यांचें चित्र चांगलें रेखाटण्याला होतो इतकेंच घेऊन चालावयाचें आहे.

## नाट्यगुणांतील प्रमुख गुण

भासकवीच्या नाट्यगुणांतील प्रमुख गुण म्हटला म्हणजे आमच्या मतें ध्वन्युत्पादकता हा होय. म्हणजे जें सांगावयाचें तें प्रत्यक्ष शब्दांनीं व वाच्यार्थानें न सांगतां, दिसण्यांत एक बोलून खरोखर कांहीं दुसरेंच सुचवावयाचें. हा गुण या नाटकांमध्यें विशेष दिसतो. आणि रस हा काव्याचा आत्मा किंवा ध्वनी हा काव्याचा आत्मा, या परस्पर स्पर्धा करणाऱ्या दोन उपपत्तींपैकीं भासांच्या वेळीं ही दुसरी उपपत्ती रसिक वर्गाला अधिक मान्य असावी असें दिसतें. असो. भासाचा दुसरा गुण हा कीं, त्याची पद्यें म्हणजे श्लोक हे फार सोपे व गोड असतात. त्याच-प्रमाणें ज्यांना सुभाषितें म्हणतां येतील अशीं वचनेंहि त्यांच्या नाटकांतून इतःस्ततः सढळ हातानें विखुरलेलीं दिसतात. भासाच्या नाटकाचे विषय सर्वस्वी कपोलकल्पित असे फार थोडे आहेत. त्यानें मुख्यतः भारत, रामायण, हरिवंश, इतिहास, पुराणें यांच्या आधारें आपलीं कथानकें बनविलीं आहेत. प्रतिमा व अभिषेक यांना रामायणाचा आधार. बाल-चरित्राला हरिवंशाचा आधार. मध्यम व्यायोग, पंचरात्र, दूतवाक्य, दूतघटोत्कच, कर्णभार, उरुभंग या ६ नाटकांना महाभारताचा आधार. आणि प्रतिज्ञायौगंधरायण, स्वप्नवासवदत्ता, अविमारक व चारुदत्त या नाटकांना बृहत्कथांचा आधार आहे.

## रा. सोमण यांची योग्यता

अशा या अपूर्व नाटकसंग्रहासंबंधानें अनुवादक भाषांतरकार रा. सोमण यांनीं इतकी सांगोपांग चर्चा व चिकित्सा या मोठ्या ग्रंथांत केली आहे कीं, त्या नाटकासंबंधानें केवळ रुचिभेदामुळें सुचलेल्या मतभेदाहून वेगळें असें कांहींच कोणास बहुधा म्हणण्याचें शिल्लक राहिलेलें नाहीं. रा. सोमण नुसते नाट्यप्रेमी नसून नाट्यव्यवसायीहि आहेत. त्यांनीं स्वतः लिहिलेल्या नाटकांची यादी कदाचित् भास कवीच्या नाटकांच्या यादी-हूनहि अधिक मोठी होईल. त्यांचा नाट्यव्यासंग शं. मो. रानडे यांच्या नाट्यकथार्णवापासून असून कै. प्रो. वासुदेव बाळकृष्ण केळकर नाटिका-कर्ते व शाहू नगरवासी मंडळी यांच्या सहवासांत तो वृधिंगत झाला. त्यांच्या सर्वच नाटकांना रंगभूमीवर येण्याची संधि मिळाली आहे असें नाहीं.

आणि रंगभूमीवर यशस्वी होण्याचा गुण त्यांच्या सर्व नाटकांत सारखा नसला तरी, तीं हातीं घेऊन वाचलीं असतां चांगल्या प्रकारची करमणूक करतात. स्वतः नट नसतां नाटयव्यवसायांत सर्व जन्म घालविणाऱ्या रा. शंकरराव मुजुमदारांप्रमाणें, स्वतः नट नसतां आजन्म नाटयलेखनाची हौस धरून नित्य कांहीं ना कांहींतरी नाटक स्वरूपाचा प्रबंध लिहिण्यांत ज्यानें आपला सर्व जन्म खर्च केला, असा दुसरा एकही व्यवसायी रा. सोमण यांच्यासारखा मिळणार नाहीं. आणि स्वतःला नाटककार या नात्यानें इतरांप्रमाणें विशेष कीर्ति किंवा द्रव्यलाभ न झाला तरी, केवळ नाटयविषयाच्या प्रेमामुळें व आवडीमुळें त्यांनीं आपला व्यासंग सतत चालू ठेवला. भास कवीच्या १३ हि नाटकांचा अनुवाद व त्याचप्रमाणें अत्यंत समर्पक अशी चिकित्सा, जी बारातेराशें पानांच्या ग्रंथांत त्यांनीं प्रसिद्ध केली, ती त्यांच्या या आवडीच्याच व्यासंगाचें फळ होय. ग्रंथ-निर्मिति जितकी अधिक करावी तितक्या छापण्याच्या अडचणीच अधिक बळावत जाणार असें दिसत असतांहि, स्वतंत्र असें जें काम तें आपण आपल्या विश्वासावर करावें आणि जें उरलें तें परतंत्र काम तें यदृच्छेनें होणार तर होवो, व न होणार तर न होवो; पण आपल्या आवडीचा व्यासंग घडला तितकाच आपणाला लाभ, असें समजून रा. सोमण हे हा उद्योग न करते तर त्यांच्या हातून झाले इतके परिश्रम झालेच नसते.

---

## ६५ आंधळ्याची शाळा

वरील नांवाचें एक नवीन नाटक रा. श्रीधर विनायक वर्तक बी. ए. यांनीं लिहिलें असून तें मुंबईस 'नाटय मन्वंतर' नांवाची नवीन नाटक मंडळी करीत असते. म्हणून हें नवें नाटक व नवीन मंडळी यांच्या संबंधानें दोन शब्द लिहितों—

हें नाटक व ही नाटक मंडळी यांचा मुख्य विशेष म्हटला म्हणजे नाटयविषयक एक नवीन ध्येय समाजापुढें ठेवणें हा आहे. पण त्यांतल्या-त्यांत प्रयोग करणारी नाटक मंडळी नवीन ध्येयाच्या आवडीची न लाभेल तर हल्लींच्या दिवसांत रा. वर्तक यांनीं लिहीलें तसलें नव्या पद्धतीचें नाटक

लिहून छापूनहि कांहीं उपयोग होणार नाहीं. या कामीं नवीन नाटक मंडळीच्या ध्येयाला नाट्य ग्रंथापेक्षांहि अधिक महत्त्व ओघानेंच येतें. म्हणून नाटक ग्रंथासंबंधानें ओझरतें लिहून या ध्येयवादी नाटक मंडळीसंबंधानें दोन शब्द अधिक लिहिणें प्राप्त आहे.

नाटकांतील विषय सामाजिक आहे. त्याची भाषा फार साधी, सुबोध व व्यवहारांतील आहे. भावना किंवा विनोद रंगवितांना कोठेंहि अतिशयोक्ति केलेली नाहीं. नाटकाचा विषयहि मनुष्यस्वभावाचें चित्र रंगण्यासारखा आहे. तथापि एकदोन दोष वाटतात ते असे. सामाजिक प्रश्नच घ्यावयाचा तर त्याचें स्वरूप विद्यमान समाजस्थितीला जितकें धरून व जवळ असेल तितकें असावें. प्रस्तुत नाटकांत प्रश्न घेतला आहे तो असा कीं, लग्नव्यवहारांत उभयपक्षांच्या वर्तनाच्या नैतिक संशोधनांत किती खोलांत शिरणें योग्य होईल ? पण या प्रश्नाची चर्चा करतांना जी समाजस्थिति दाखविली आहे ती महाराष्ट्रांत आजची आहे असें वाटत नाहीं. कदाचित एका पिढीनंतर ती अनुभवाला येईल. वरचाच प्रश्न पण विद्यमान समाजस्थिति लक्षांत घेऊन, कांहीं जुन्या सनातनी मतांचे कांहीं नव्या सुधारकी मतांचे असे लोक कल्पून, त्यांच्या मतविरोधांतून कथानक तयार केलें असतें तर, कदाचित आहे यापेक्षां स्वाभाविक विनोदालाहि अधिक वाव मिळाला असता. हल्लीच्या रचनेंत एकाच सुधारकी मतांचीं सगळीं पात्रें आल्यामुळें विनोदाला फारसा वाव राहिलेला नाहीं. आणि नाटक पाहात असतांना एखाद्या परकी समाजाचें चित्र आपण पाहात आहों असा भास होतो तो वेगळाच. तथापि विनोदाची मदत नसतां कथाभाग सर्वच्या सर्व गंभीरपणाचा ठेवूनहि नाटक वाचण्याला व पाहण्याला मोठें परिणामकारक होतें यांत शंका नाहीं.

## नाटकांतील खटके

नाटकाच्या भाषेंतील खटके ठीक आहेत. परंतु कथानक समजण्याच्या दृष्टीनें कांहीं खटके फारच खटकेदार होतात. त्यामुळें कथानक चट्दिशीं लक्षांत भरण्याला अडचण पडते. म्हणून अशा खटक्याऐवजीं किंचित् कथानकाचा खुलासा केला व त्यामुळें अधिक वाक्यें पडलीं तर तीं पोषकच होतील. इब्सेन, जॉर्सन, यांचा मुख्य नाट्यगुण सूचक संभाषणांत असतो.

त्यांतल्या त्यांत जॉर्सनपेक्षांहि इबसेनचा विशेष. यामुळें नाटकांतला शब्दन्शब्द वाचावा लागतो; व तेथें ती पद्धत मार्मिकपणाचीहि ठरते. पण ग्रंथवाचकाला जशी एकाग्रता मिळते तशी नाट्यप्रेक्षकाला ती मिळत नाहीं ही गोष्ट नाटकप्रयोगाच्या दृष्टीनें विशेष लक्षांत ठेविली पाहिजे. विलायतेंत प्रेक्षकांना असें शिक्षण मिळालें आहे कीं, नाटकगृहांत टांचणी पडल्याचा आवाज ऐकूं यावा इतकी शांतता प्रत्येकानें राखण्याचा प्रयत्न करावा. पण मुंबईच्या रिपन थिएटरमध्यें प्रस्तुत नाटकाचा प्रयोग चालू असतां दारासमोरून जाणाऱ्या ट्रामगाड्या व मोटारींचीं शिंगें यांच्या योगानें आंतील शांततेचा उच्छेद किती होतो याची कल्पना नाट्यग्रंथकार करील तर तो आपली पद्धति अवश्य बदलील. कारण प्रयोग सुरू असतां मुद्याचे शब्द किंवा खटके ऐकूं न आले तर प्रेक्षकांच्या मनांत नाट्यकथानकांचा प्रकाश पडावा तितका पडत नाहीं. कांहीं तरी सुटलें असें वाटतें. पण काय सुटलें हें कळत नाहीं. सांधा तुटला असा वाटतो पण तो खरोखर कशानें जोडलेला आहे हें ध्यानांत भरत नाहीं. असो. एकंदरीनें नाटक चांगलें लिहिलें गेलें आहे इतकेंच नव्हे तर जॉर्सनचे मूळ 'गॉंटलेट' हें नाटक आम्हीं वाचलें व 'आंधळ्याची शाळा' हें नाटक वाचलें. म्हणून या दोहोंची तुलना करतां रा. वर्तक यांचा अखेरचा कथाभाग अधिक चांगला साधला आहे, व अधिक परिणामकारक होतो असें आम्हांला वाटतें. जॉर्सनच्या नायिकेपेक्षां वर्तकांची नायिका अखेरपर्यंत अधिक पाणीदार भासते.

## नाट्यप्रयोग

नाट्यप्रयोगासंबंधानें विशेष कांहीं लिहावयाचें नाहीं. मंडळीनीं प्रयोग परिश्रमपूर्वक व सदभिरुचि ठेऊन बसविला आहे. तथापि विश्वनाथकाका या पात्राची कल्पना जॉर्सन याच्या किंवा प्रस्तुत नाटकांतहि जशी आहे तशी ती प्रयोगांत वठत नाहीं. म्हणजे मूळ कल्पना तत्त्ववेत्त्याची व वृद्ध किंवा निदान पोक्त माणसाची असतां, पात्राची सजावट व नाट्य हीं दोन्ही चलाख तरुणाप्रमाणें वाटतात. मनोहर, सुशीला, विश्वनाथ व अण्णासाहेब हीं चारहि पात्रें जवळ जवळ समवयस्क व प्रौढ अशीं आहेत. तथापि मनोहर हा वार्धक्यांत तारुण्य भासविणारा आहे तर विश्वनाथ हा प्रौढ वयांत वार्धक्य पावलेला असा आहे. यामुळें तो मेंदूच्या श्रमानें

अकालीं केस पिकलेला, स्थगित, संथ, समदृष्टि, सत्प्रवृत्त, असा म्हातारा दिसला पाहिजे.

नाटयप्रयोगांत सामाजिक नाटकाला अनुरूप असा साधेपणा आहे. परंतु रंगभूमीवर येणाऱ्या प्रकाशाची वांटणी साधली नाहीं. नाट्याला संगीताची म्हणून जी जोड दिली जाते ती अनुरूप नसून आक्षेपार्हहि वाटते. रंगभूमीवर पात्र नसतां, किंवा तें भावनावश स्थितींत असल्यामुळें निष्क्रिय असतां, सुस्वरांची लकेर ओझरती कानावर आली व ती भावनासदृश असली तर बरी नवी टूम होईल. परंतु प्रत्यक्ष प्रयोगांत एकीकडे संभाषण सुरू असतां स्पष्ट ऐकूं येईल असें ( रसानुकूल कां होईना पण प्रत्यक्ष ) पद किंवा गत पियानोवर वाजविलेली कानावर आल्यामुळें प्रेक्षकांचें मन द्विधा होतें. म्हणून या बाबतींत सुधारणा म्हणून योजली ती कुधारणा होते.

## स्त्रियांची भूमिका

स्त्रियांची भूमिका स्त्रियांनीं करावी हें ध्येय नाटकमंडळीनें नुसतें डोळ्यापुढें ठेवलें इतकेंच नाहीं तर प्रत्यक्ष अमलांतहि आणलें आहे. कारण स्वतः ग्रंथकार यांच्या पत्नीच सुशीलेचें काम करतात व संगीताचे चालक रा. केशवराव भोळे यांची पत्नी मुख्य नायिकेचें काम करते. अशा रीतीनें स्वतः पतिपत्नीच्या दोन जोड्या एक प्रकारें नाटक मंडळींत समाविष्ट झाल्याकारणानें, स्त्रियांनीं स्त्रियांचीं कामें करण्याची अडचण बिनतोड रीतीनें घालविण्यांत आली असें सहज म्हणतां येईल. यांपैकीं सौ. वर्तक यांना तीन मुलें आहेत. आणि असें ऐकिवांत आहे कीं, स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनीं कराव्या म्हणून इतर रीतीनें प्रयत्न झाला असतां, उपलब्ध स्त्रिया नाटक मंडळींत घेतल्यास एकंदरीनें लाभापेक्षां हानिच जास्ती होईल असें दिसून आल्यावरून या तीन मुलांच्या आईनें, ती सुशिक्षित व कलाप्रेमी म्हणून व अर्थात् आपल्या पतीच्या नाट्यप्रेमाची हौस पुरविण्याकरितांहि, आपण होऊन नाटकांत भूमिका करण्याचें पत्करलें ! आणि हें खरें असेल तर स्त्रियांनी स्त्रियांची भूमिका करण्यासंबंधानें लोकांचा जो दूषित पूर्वग्रह होता, तो मूळापासून उपटून पाडण्याचें हें नैतिक धैर्याचें कृत्य झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि खरोखर या बाबतींत जो दूषित पूर्वग्रह म्हणून आहे तो, स्त्रिया

नाटकांतून कामें करण्याला पुरुषांपेक्षां अपात्र अशा बुद्धीचा नसतो. साध्या शिक्षणाच्या कामीं देखील सहशिक्षणाविरुद्ध आक्षेप सहज येतातच तसे स्त्रियांनी नाटकांत कामें करण्याविरुद्ध यावे यांत नवल काय? उलट-पक्षीं स्त्रियांनी स्त्रियांची भूमिका करावी या मताचे लोक म्हणतात कीं; कोणत्याहि गोष्टीला संभवनीय दुष्परिणामांच्या योगानें दूषण देणें हें ठीक नाहीं. चुलींतील विस्तवानें स्वयंपाक करणाराचा हात भाजूं शकतो म्हणून बिनविस्तवानें स्वयंपाक व्हावा हेंच इष्ट आहे या म्हणण्यांत काय अर्थ? पण व्यवहारांतील अनुभव पाहतां स्त्रिया व नाटयभूमिका या विषयांतील सुधारणेंत प्रवेश करावयाचा तर तो प्रस्तुत उदाहरणाप्रमाणें प्रौढ कुलीन स्त्रियांनी रंगभूमीवर सात्त्विक आवेशानें उडी घातल्यानेंच निरपवाद रीतीनें होऊं शकेल. प्रस्तुत नाटकमंडळीनें कलाविषयक प्रेमानें ही धाड-साची उडी घेऊन हा प्रश्न आपणापुरता सोडविला आहे. तरी तेवढयानें तो सर्व प्रश्न कायमचा सुटला असें मात्र म्हणतां येणार नाहीं. तो सुटा-वयाचा तर सुशिक्षण, सद्गुण व कलाप्रेम यांचा मेळ नाटयव्यवसायांत जसजसा अधिक पडत जाईल तसतसाच तो अधिक सुटेल.

## लक्षांत ठेवण्याची गोष्ट

सर्वसाधारण रीत्या या ध्येयवादी नाटक मंडळीनें एक गोष्ट मात्र खास केली. ती ही कीं, सौम्य सोज्ज्वळ, अतिशयोक्तिविरहित, बिनधांगड-धिंग्याचें व बाष्कळ विनोद नसलेलें असें नाटक रंगभूमीवर चित्ताकर्षक होऊं शकणार नाहीं असें म्हणण्याची जी एक प्रथा पडून गेली आहे तिला या नाटक मंडळीनें चांगलें उत्तर दिलें आहे. आणि या मंडळीचा हा प्रयत्न जर यशस्वी होऊन टिकला तर सदभिरुचिनिष्ठ नाटकें लिहिणें म्हणजे व्यर्थ श्रम करणें अशी जी वाङ्मयलेखकांची समजूत होऊन राहिली आहे ती कदाचित् कांहींशी बदलेल.

रंगभूमीचें अलीकडील वळण पाहतां दिवसेंदिवस नाटककर्ता हा नाटक मंडळीच्या आधीन व तिचा गुलाम अशी स्थिति येऊन ठेपलेली आहे. बरें! नाटक मंडळ्यांनीं तरी काय करावें? त्यांच्या चालकांनाहि सदभि-रुचीची चाड नसेल असें तरी कसें म्हणावें? पण नाटक मंडळीची संस्था चालविणें इतकें खर्चाचें काम होऊन बसलें आहे कीं, थिएटरभर लोक जमल्याशिवाय जरूर तें उत्पन्न होत नाहीं; व थिएटरभर लोक जमावयाचे

तर त्यांना साधेंसुधें सोज्ज्वळ असें कांहीं चालावयाचें नाहीं. तें अतिशयोक्तिपूर्ण व परम विकृत असें असेल तरच चालेल अशी स्थिति होऊन बसली आहे. राजकारणांत लोकशाही प्रबळ होण्याच्या अनुषंगानें जे परिणाम इतर खात्यांत अनुभवास येतात तेच नाटकाच्या खात्यांतहि अनुभवास येऊं लागल्यास काय नवल?

## नाटकांचा वाद

मग चांगलीं नाटकें कीं केवळ उत्पन्न देणारीं नाटकें, याचा वाद कसा मिटावा? त्याचें आमचें उत्तर हेंच कीं, दोनहि आपापल्या परीनें नांदण्याला समाजांत अवकाश आहे. इतकेंच नव्हे तर एकाच प्रकारची अभिरुचि सर्व समाजावर लादण्याचा प्रयत्न अशक्य म्हणून सोडून द्यावा; आणि समाजांतील ज्या वर्गाला जशा प्रकारचे नाटकप्रयोग व नाटकें पाहिजेत तशीं त्यांना मिळण्याची व्यवस्था हटकून होईल इतकें ध्येय व त्या दृष्टीचा प्रयत्न झाला तरी पुष्कळ झालें. प्रचलित रंगभूमीवर होणाऱ्या नाटकांवर टीका करण्याचें आम्हांला कारण नाहीं. परंतु इतकें खास म्हणतां येईल कीं, सोज्ज्वळ अभिरुचीच्या प्रेक्षकांना समान भावनेच्या प्रेक्षकांसह स्वस्थ बसून पहाण्याची हौस वाटेल अशीं नाटकें आज रंगभूमीवर नाहींत यांत मात्र शंका नाहीं; व ही गरज भागविण्याचें काम 'नाट्य—मन्वंतर नाटक मंडळीला' वाढत्या प्रमाणांत करतां आलें तर तिनें एक मोठेंच कार्य केलें असें म्हणतां येईल.

पण असें होण्याच्या मार्गांत पुष्कळच अडचणी आहेत. कारण नाट्यमन्वंतर करूं पाहणाऱ्या नाटक मंडळीमध्यें सर्वच बिनधंदेवाले लोक असें नाहीं. कांहीं केवळ हौसेनें येतील तर कांहीं धंदा म्हणूनहि येतील. अर्थात् धंद्याच्या दृष्टीनें येणाऱ्यांनीं जर केवळ कलेच्या हौसेनें स्वार्थत्यागाचें प्रेम दाखविलें, व इतर चार सार्वजनिक संस्थांतून केवळ निर्वाहापुरतें द्रव्यसाहाय्य घेऊन काम करणारीं माणसें भेटतात त्याप्रमाणें या नाटक मंडळीलाहि माणसें येऊन मिळतील, तरच त्यांतील हौशी लोकांना यश मिळण्याची धडगत दिसते. तथापि आज या नव्या संस्थेच्या सुरुवातीला अधिक खोलांत शिरणें अवश्य नाहीं. या नाटक मंडळीचा, संस्था या दृष्टीनें, नाटकासारखाच नवा प्रयोग आहे. तेव्हां पुढील काळांत त्या संस्थेला जो अनुभव येईल तो जमा धरूनच याहून सूक्ष्म अशीं

अनुमानें काढावीं लागतील. आज तरी स्थूल दृष्टीनें या नव्या ध्येयवादी नाटक मंडळीचें अभिनंदन कोणालाहि केलें पाहिजे. त्याच्या ध्येयवादी प्रयत्नानें समाजांतील नाट्य-प्रेमी अशा विशिष्ट वर्गाला आशेचा एक नवीन किरण दिसला असें निश्चितपणानें म्हणतां येईल. म्हणून तूर्त आम्हीं इतकेंच लिहून थांबतों.

नाट्य वाङ्मयांत व नाट्यप्रयोगांच्या सृष्टींत क्रांति होण्याची वेळ आली आहे. इबसेन, जॉर्सन यांच्या ज्या नाटकांनीं प्रस्तुत नाटककाराला स्फूर्ति मिळाली, तीं नाटकें स्वतः त्या नाटककारांच्या देशांत साठ सत्तर वर्षांपूर्वी रंगभूमीवर प्रथम आलीं हें लक्षांत घेतलें म्हणजे एका ठराविक नियमाला नवीन पुरावा मिळतो. तो नियम असा कीं, कांहीं कांहीं बाबतींत हिंदुस्थानांत आम्ही युरोपियन समाजाच्या मागें साठ पाऊणशें वर्षें असतों. आणि नवीन इंग्रजी शिक्षणाच्या द्वारें त्या बाबतींतील क्रांतिकारक विचारांचा ओघ युरोपांतून वाहून आमच्यापर्यंत येऊन पोचण्याला साठ—पाऊणशें वर्षांचा कालावधि लागत असतो. ही क्रांति सर्वस्वी चांगली किंवा वाईट हें ठरविणें मोठें कठिण आहे. परंतु नाटकांत साधेपणा व सदभिरुचि असून केवळ नाट्य—गुणोत्कर्षामुळें नाटक मनोरंजक व हृदयस्पर्शी व्हावें असें ध्येय बाळगणाऱ्या सुशिक्षित वर्गाची गरज नाट्यमन्वंतर नाटक मंडळींच्या प्रयत्नानें, व तेंच ध्येय असणाऱ्या इतरांच्या प्रयत्नानें, अखेर साध्य होणार काय, अशी आकांक्षा नाटक पाहून व वाचून मनांत उत्पन्न होते.

---

## ६६ रंगभूमीवरील उमाजी नाईक

सुमारें शंभर वर्षांपूर्वी पुणें जिल्ह्यांत मोठा दरवडेखोर म्हणून जो उमाजी नाईक रामोशी प्रसिद्धीस आला त्याचे पोवाडे पुण्यांत रस्तोरस्तीं ऐकूं येत असत. पण हल्लीं उमाजी नाईकावर एका सुंदर नाटकाची रचना झालेली असून नूतन महाराष्ट्र मंडळीनें हें नाटक नीट बसवून रसिक प्रेक्षकांचें मनोरंजन करण्याचें श्रेय घेतलें आहे. नाटककर्ते रा. देशपांडे हे याच नाटकमंडळींतले एक अनुभविक नट आहेत. स्वतः नाटकमंडळींतील

नटानें लिहिलेलें नाटक करून दाखविणें हा योग नाटकमंडळ्यांस क्वचित् येणारा म्हणून विशेष अभिनंदनास्पद होय. अशा या योगानें नाटकाच्या कलेची व धंद्याची पूर्ण सफलता होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. पूर्वी डोंगरे, किर्लोस्कर, पाटणकर वगैरे गृहस्थांमध्यें नट व नाटककार या भूमिका एकवटल्या होत्या. त्यानंतर रा. यशवंतराव टिपणीस, औंधकर, कारखाननीस, बोडस व आतां रा. देशपांडे यांनीं तीच प्रथा पुढें चालविली आहे. नट नसणारे बुद्धिमान् लोक नाटकें लिहीत, पण स्वतः धंदेवाईक नट असणाऱ्या लोकांनीं नाटकें लिहिण्यांत आपली बुद्धि खर्चली तर नाटकमंडळ्यांना बरेंचसें स्वावलंबी होतां येईल.

' उमाजी नाईक ' हें नाटक लिहिण्यांत रा. देशपांडे यांनीं उच्च प्रतीचें रचनाचातुर्य दाखविलें आहे. प्रयोग सुमारें ४॥ तासांचा होऊनहि त्यांत कंटाळवाणा भाग असा फारच थोड्या ठिकाणीं आढळतो. विनोदाकरितां म्हणून विनोद घातलेला नाहीं; व विनोद नसतांहि प्रयोग रंगतो हें विशेष आहे. प्रत्येक अंकाचा शेवट अद्भुत रीतीनें होतो, व शेवटला प्रवेश तर इतका चांगला साधला आहे कीं, तसे शेवटचे प्रवेश फार थोड्या नाटकांत आढळतात. भाषा फारशी कृत्रिम नाहीं. परंतु कुणबाऊ व पांढरपेशी भाषांचें सरमिसळ मिश्रण झालेलें आहे. मनुष्यस्वभाव रंगविण्यांत बहुधा कोठेंहि चूक झालेली नाहीं. इतकेंच नाहीं तर, कांहीं कांहीं स्वभावचित्रें रेखीव झालीं आहेत. पण नाटककाराचें सर्वांत अधिक कौशल्य उमाजी नाईक दरवडेखोर व त्याला पकडण्याला सिद्ध झालेले कंपनी—सरकार यांचे संबंध रंगविण्यांत दिसून येतें. कां कीं, राजकारण रंगभूमीवर सजविणें हें किंचित् नाजूक काम आहे असें असतां, नाटककारानें उमाजीचा उमदा स्वभाव व ध्येयवादित्व हीं उज्ज्वल रंगवून त्याबरोबर इंग्रज लोकांचे व त्यांच्या राजनीतीचे गुणदोष मार्मिकपणें दाखविले आहेत.

नाटकांतील राजकारण ' प्रचलित ' नाहीं हें खरें; परंतु शंभर वर्षीपूर्वीचा हिंदुस्थानांतला इंग्रज व आजचा इंग्रज यांच्यामध्यें जसा फरक झालेला नाहीं, तसाच शंभर वर्षांपूर्वीचा तेजस्वी हिंदी प्रजाजन व आजचा तेजस्वी हिंदी प्रजाजन यांच्यामध्येंहि फारसा फरक पडलेला नाहीं. इंग्रज हा चिकाटी न सोडणारा, धैर्यशील, आपल्या स्वार्थाला नेहमीं शक्य तितकें उज्ज्वल रूप देणारा, सामान्य न्यायनीति ( ती आपल्या स्वार्थाच्या आड

विशेष न येईल तेव्हां ) तिचें कौतुक व स्वीकार करणारा, शत्रूचीहि योग्य किंमत आपल्या मनांत करणारा, दीर्घद्वेषी व पाताळयंत्री असा वीर, मुत्सद्दी व बनिया यांची त्रिमूर्ति आहे. शंभर वर्षांपूर्वीचें त्याचें हेंच रूप; व आजचेंहि तेंच. त्याच्या उलट हिंदी मनुष्य, मग तो शंभर वर्षांपूर्वीचा पराक्रमी रामोशी दरवडेखोर असो किंवा आजचा स्वातंत्र्यप्रिय तेजस्वी नवजवान असो, त्याला स्वदेश परतंत्र झाल्याची हळहळ वाटते, परिस्थितिरूपी प्रचंड शिळेखालीं सांपडलेल्या हाताची रग त्याला दुःख देते, आणि आत्माहुति करण्यापेक्षां स्वातंत्र्य रोकडें हस्तगत करून घेण्याला ईश्वरानें आज दुसरें अधिक परिणामकारक साधन ठेविलें नाहीं असें पाहून, पाण्यांतून बाहेर निघालेल्या माशाप्रमाणें, त्याला तडफडावें लागतें. या दुर्दैवी स्थितींत तो आपल्या चरित्रांतील उपाख्यान म्हणून क्वचित् खेळ खेळो; हास्यविनोद करो; परंतु त्याचें ध्येय केव्हांहि दृष्टीआड होत नाहीं. आणि वेळ आली असतां तो कसोटीला उतरल्याशिवाय सहसा राहत नाहीं. राज्यकर्ते या नात्यानें इंग्रजांच्या स्वभावाचें नित्य स्वरूप, व स्वातंत्र्यप्रेमी पण कचाटींत सांपडलेल्या हिंदी प्रजाजनांच्या स्वभावाचें नित्य स्वरूप, दीं दोनहि प्रस्तुत नाटककारानें यथार्थ दाखविलीं आहेत असें म्हटलें पाहिजे.

इतिहासदृष्ट्या हें नाटक सत्याला बहुधा धरूनच आहे. पण प्रेमाच्या व श्रीमंतीच्या पाशांत सांपडलेला जो उमाजी या नाटकांत दाखविला आहे तो, त्या बाजूपुरता खऱ्या इतिहासावर आधारलेला आहे असें वाटत नाहीं पोवाडयांत या बाजूची हकीकत नाहीं. फक्त पराक्रम व विश्वासघात यांचें वर्णन आहे. ऐतिहासिक नाटकांत अशा तऱ्हेचा वाढावा थोडाबहुत क्षम्य असतो, असें कोणी म्हणेल; परंतु मूळ नाटकाच्या कथानकांत, व याहूनहि विशेष रंगभूमीवरच्या प्रयोगांत, उमाजीसंबंधानें कांहीं कांहीं गोष्टी अशा दाखविल्या आहेत कीं; त्या सत्याला सोडून असतील असें तर वाटतेंच; पण त्यामुळें उमाजीला सांप्रदायिकपणाच्या दृष्टीनेंच नव्हे तर मार्मिकपणाच्या दृष्टीनेंहि दूषण येतें. पहिली गोष्ट:—ज्या मॅकेंटॉशसाहेबानें उमाजीला पकडला त्यानेंच या रामोशांच्या नाइकाला आपल्या लेखानें चरित्रनायक बनविलें आहे; त्या चरित्रांत उमाजी हा सामान्य रामोशाहून रंगानें अधिक उजळ असल्याचें लिहिलें आहे. पण प्रत्यक्ष रंगभूमीवर तो नुसता उजळ रामोशासारखा न दिसतां

एकाद्या प्राचीन-ऐतिहासिक ' सरदारा'प्रमाणें दिसतो. रामोशी झाला तरी तो सुरूप नसावा असें नाहीं. उमाजी हा देखील त्याच्या चरित्रावरून नीटस बांध्याचा, पाणीदार चेहऱ्याचा, स्वच्छ पोषाकाचा, दिसण्यांत उग्र पण मोहक असा असावा, पण रंगभूमीवर तो ज्या श्रीमंती थाटानें येतो तो थाट बरोबर नाहीं. त्याचा वेष कदाचित् किंचित् अद्भुत असेल व मुद्दाम तसा दाखवावाहि, उंची वस्त्रालंकारांनीं मंडित दाखविणें बरोबर नाहीं. तसेंच पोषाकाच्या श्रीमंतीपेक्षांहि सर्व नाटकभर त्याजकडून भोगण्यांत येणारी ऐश्वर्यसंपन्नता भरीव व भरदार दाखविली आहे. त्याला रामोशी देशमुख (?) घराण्यांतील एका स्त्रीबरोबर अलोट संपत्ति मिळो ! पण एक तर लग्नापूर्वी उमाजी रंगभूमीवर येतो तोच जरीचें मंदिल बांधून येतो ही मूळ कल्पनेंतील चूक. आणि याहिपेक्षां मोठी चूक अशी कीं, खऱ्या उमाजीच्या कीर्तीप्रमाणें, तो दरवड्यांत श्रीमंतांकडून मिळविलेली संपत्ति गरीबांच्या कार्याला देत असे असें मुळींच कोठें न दिसतां, उलट त्या ऐश्वर्याचा उपभोग तो स्वत:च चवदारपणानें घेतो असें दाखविलें जातें ही दुसरी चूक. इंग्रजींतील 'रॉबिनहुड व मेड मेरियन ' या नाटकाचा आधार प्रस्तुत नाटकाला उपयोगी पडला आहे कीं नाहीं माहीत नाहीं. पण त्या रॉबिनहुडचें सर्व चरित्र रानावनांत व झोंपडींत झालेलें दाखविलेलें आहे. प्रस्तुत नाटकांतील राजवाड्याला शोभणारे महाल, शय्यापलंग, तलम रेशमी जरतारी कपडे व हिरे मोतीं या सर्वांना अजिबात फाटा देऊन, जर एकजात अरण्यांतील वन्यदेखाव्यांत प्रसंग दाखविले तर ते अधिक पटतील. प्रेमविलास, सोंगट्यांचा खेळ, हे सर्व झाडांच्या वनांत व झोंपडीच्या आवारांतहि रंगूं शकतात. या नाटकांतील उमाजी हा मूळ गर्भश्रीमंत, व भरींत भर म्हणून बायकोच्या पैशानें झालेला श्रीमंत, असें सर्वत्र दिसतें. त्याचा तेजस्वी स्वभाव व आवेश सर्वत्र प्रकट होतो; पण परोपकारित्व कोठेंच दिसून येत नाहीं. आणि परोपकारित्व हेंच तर उमाजी किंवा रॉबिनहुड यांच्या दरवडेखोरीचें खरें समर्थन होऊं शकतें ! आज सामाजिक वातावरणांत जें साम्यवादित्व ऐकूं येतें त्याचा ध्वनि प्रस्तुत नाटकांत सहजच उमटला आहे. पण मौज ही कीं, समाजांतील खऱ्याखुऱ्या साम्यवादी लोकांत स्वतः संपत्ति व चैन भोगीत असतां गरिबांविषयीं नुसता

कळवळा दाखविणारे कांहीं तात्त्विक महानुभाव आढळतात, अशाच तऱ्हेचा या नाटकांतील उमाजीहि वाटतो.

असो, आम्ही दाखविलेले हे दोष अर्थात् सूक्ष्म नजरेचे आहेत. ह्यांतूनहि रंगभूमीवर दिसणारे कांहीं दोष केवळ पुस्तक वाचीत असतां कदाचित् भासणारहि नाहींत. कारण नाटक वाचणारा हा पात्रांचें नेपथ्य-विधान आपल्या कल्पनेनें हवे तसे रचतो किंवा गृहीत घेतो. तथापि सामान्यपणें उमाजी नाईक रामोशी दरवडेखोर याची जी कल्पना लोकांच्या मनांत वावरते ती कथानकानें व विशेषत: नेपथ्यविधानानें किंचित् ढळ-ल्यासारखी वाटते, ती शक्य तर सुधारावी अशा हेतूनें हें दोष दर्शन सहेतुक केलेलें आहे. कलेच्या दृष्टीनें नाटक वाखाणण्यासारखें झालें आहे. पण सत्य हें जें नाट्यकलेचें एक प्रमुख अंग आहे तेंहि संभा-ळलें जाणें अवश्य आहे.

उमाजी नाईक या ' दिलदार दरवडेखोरां'चें दु:ख पर्यवसायी जीवित रा. देशपांडे यांनीं अशा रीतीनें आपल्या नाट्यकृतींत चांगलें चित्रित केलें आहे. हिंदवी स्वातंत्र्याचा सूर्य अस्तमानास गेल्यावर पारतंत्र्याच्या काळरात्रीं उमाजी नाईक हा एक दैदिप्यमान तारा चमकून गेला ! तारा हाहि आपल्या तेजानें विश्वावर पसरलेलें तमोपटल दूर करण्याचा अट्टा-हास करतो. पण त्याचें सामर्थ्य तें किती ! तथापि ' मुहूर्तं ज्वलितं श्रेयो न च धूमायितं चिरम् ' या न्यायानें ताऱ्याचा तितका पराक्रम हाहि अभिनंदनीयच होय. उमाजी नाइकाचें समग्र चरित्र महाराष्ट्रीयांच्या कर्ण-पथांवर आलेलें नसलें तथापि त्याच्या चारित्र्य–महात्म्यानें त्यांचीं अन्त:-करणें हीं सादर अभिमानानें स्पंदन पावत असतात. या उमाजी नाइ-कानेंच म्हटल्याप्रमाणें " उमाजी स्वराज्यकाळीं जन्माला आला असता तर तो आपल्या मायभूमीसाठीं रक्ताचा सडा घालणारा स्वतंत्र सेनेचा शूर सेनानी म्हणूनच चमकला असता. आणि त्याच्या नांवामागें बंडखोर हा काळा किताब लावण्याची कोणाचीहि छाती झाली नसती. " परंतु विधिघटना ही गहन आहे. उमाजी परक्यांकडून बंडखोर ठरला गेला !!

---

# ६७ ग्यारिक चरित्रावरील अभिप्राय

ग्यारिक हा एक मोठा नट होऊन गेला हें इकडे सर्वश्रुत आहे, तथापि त्याच्या मोठेपणाची सांगोपांग कल्पना तुमचें चरित्र वाचून जशी आली तशी ती मला पूर्वी नव्हती. त्याच्या काळीं त्याला प्राप्त झालेली मान्यता सर्वव्यापी व सर्वंकष होती हें उघड दिसतें. या बाबतींत अगदीं वेगवेगळ्या लोकांचीं तीन उदाहरणें दिलीं असतां ही गोष्ट ढळढळीतपणें नजरेस येईल. त्या वेळचा इंग्लंडचा राजा व पिट्सारखा मुख्य प्रधान हे त्याचीं नाटकें पहावयाला मुद्दाम जात व त्याला बहुमानपुरःसर भेटीला बोलावीत. जॉन्सनसारखा एककल्ली, खत्रुड, नीरस पण पहिल्या प्रतीचा जाडा वाङ्मयसेवक याला ग्यारिक यांस नाहीं नाहीं म्हणतां आपल्या सुप्रसिद्ध वाङ्मयचर्चा-मंडळाचें सभासदत्व द्यावेंच लागलें व ग्यारिकनें आपलें नाटक बसविणें हा आपल्यावर एक मोठा उपकार अशी अप्रत्यक्ष कबूली द्यावी लागली. तिसऱ्या लोकांची गोष्ट म्हटली म्हणजे एक फ्रेंच नटी त्याचें नाट्यचातुर्य पाहून इतकी बेहोषीनें खुषींत आली कीं, तिनें चार लोकांदेखत त्याच्या गळ्याला घट्ट मिठी मारून त्याचें चुंबन घेतलें. आपल्या इकडे नाटकाचा धंदा खरा असा गेल्या पांचपन्नास वर्षांतलाच आहे; तथापि नाटक कंपन्यांतले नट व मालक व मॅनेजर यांचे अनुभव व दीडशें वर्षांपूर्वी विलायतेंत उत्कर्ष पावलेल्या या धंद्यांतील धंदेवाइकांचे अनुभव हे दोन्ही एकाच जातीचे आहेत याचें कारण मनुष्यस्वभाव तेव्हां व आतां, तिकडे व इकडे एकसारखाच असणार. तथापि या पुस्तकांत तुम्हीं मधूनमधून एखादे ठिकाणीं इकडील अनुभवांचा ओझरता उल्लेख केला आहे, तो केला नसता तर अधिक चांगलें झालें असतें असें मला वाटतें. कारण या उल्लेखा-मुळें टीका करणारे कांहीं वाचक भेटतील अशी भीति वाटते. असल्या ग्रंथ-वाचनाच्या वेळीं व्यक्तिविषयक आठवणी कोणासही न झालेल्या बऱ्या.

ग्यारिक हा गंभीर व विनोदी ह्या दोन्हीं भावना प्रगट करणारा कुशल नट होता व आपल्या धंद्याला रामराम ठोकतांना त्यानें जे प्रयोग केले त्यांतला शेवटला प्रयोग एका प्रहसनाचा होता. यावरून जर कोणी असें अनुमान काढील कीं, विनोदाला तो गंभीर भावनेपेक्षां अधिक महत्व देत

होता, तर तें बरोबर होईल असें वाटत नाहीं. कारण त्याच्या सर्व जन्माचा उद्योग या अनुमानाविरुद्ध आहे. तसेंच हाताशीं इतर नाटकग्रंथ असतां त्यानें शेक्स्पीअरचीं नाटकेंच हातीं घेतलीं आणि तीं पुढें आणलीं यावरून त्याची अभिरुचि उच्च दर्जाची असावी असें दिसतें; म्हणजे समाज हा थिल्लरपणाकडे झुकण्याला केव्हांही एका पायावर तयार असतोच, तसा तेव्हांही तो असणारच. तथापि आपण समाजाच्या आधीन न होतां त्यानें समाजाला आपल्या आधीन ठेविलें व शेक्स्पीयरचें नाट्यमर्म जगाला पटविण्याला मदत केली हा त्याच्या अंगचा मोठेपणा होय. स्वतः तो लेखक व कवि होता हें त्यानें लिहिलेल्या पद्यात्मक नाट्यप्रयोग प्रस्तावनांवरून उघड दिसून येतें व जॉन्सननें त्याच्याविषयीं दाखविलेला तुच्छतामिश्रित मत्सर हा अयोग्य होता असेंही वाटतें. ग्यारिकनें येऊन जाऊन दुसऱ्यानें लिहिलेले शब्द तोंडपाठ म्हणून किर्ति मिळवली, असा डॉ० जॉन्सननें ग्यारिकला टोमणा दिला खरा; पण स्वतः जॉन्सनला ज्या शब्दकोशरचनेबद्दल जगविख्याति लाभली त्या कोशांतले शब्द झाले तरी जॉन्सननें स्वतः थोडेच निर्माण केले होते? शिवाय स्वतःची शब्दरचना हीच महत्त्वाची असा दिमाख मिरविणाऱ्या जॉन्सननें आयरिन नांवाचें जें नाटक लिहिलें तें ग्यारिकसारखा पुरस्कर्ता व आश्रयदाता भेटूनही आठ दिवसदेखील प्रेक्षकसमाजापुढें तग धरूं शकलें नाहीं याही गोष्टीवरून बराच बोध घेण्यासारखा आहे. असो. हें पुस्तक दीडशें वर्षांपूर्वीच्या विलायतेंतील लोकसमाजाची व विशेषतः रंगभूमीची वस्तुस्थिति समजण्याला बरेंच उपयोगी पडेल.

---

## ६८ खरा प्रेमसंन्यास

---

( ले. शंकर नारायण सहस्रबुद्धे, प्रकाशक गणेश काशिनाथ परचुरे, ' परचुरेबंधु ' ४६४ नारायणपेठ, पुणें २, ) दिवसेंदिवस पौराणिक नाटकांची प्रथा मागें पडत चालली असून सामाजिक व ऐतिहासिक प्रसंगच नाट्यकृतीच्या कोंदणींत बसविण्याचे प्रयत्न हल्लीं नाटककारांकडून होत आहेत. श्री. सहस्रबुद्धे यांनींहि ' विधवा–विवाह ' हा विषय निवडून त्याची प्रतिकूल बाजू आपल्या तीक्ष्ण पण विनोदी लेखणीनें रंगविण्याचा

प्रयत्न केला आहे व तो बऱ्याच अंशीं यशस्वीहि झाला आहे. नाटकाला जयंताच्या फांशीपासून सुरवात होऊन त्याचें पर्यवसान जयंत–लीला यांच्या बंधुत्वांत आणि विद्याधर व सुशीला यांच्या कृतकबंधुत्वांत होतें. नाटकांतील नायक विद्याधर असून नायिका सुशीला आहे. जयंताचा मित्र विद्याधर यानें जयंताची वधस्तंभावरून सुटका केली याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठीं सुशीला त्याला बोलाविते व त्याच वेळीं विद्याधर तिच्या जवळ पुनर्विवाहाची प्रथम गोष्ट काढतो. जयंत व लीला हीं दोघें तर फुलपांखराप्रमाणें पुनर्विवाहाच्या कल्पनामय वातावरणांत स्वच्छंदानें भराऱ्या मारीत आहेत. परंतु त्या बिचाऱ्यांना काय माहीत कीं, थोडयाच वेळांत सुशीलेच्या परिणामकारक मतपरिवर्तनाच्या सूत्रानें तीं उभयतांहि सत्यसृष्टीच्या आवारांत येऊन पडणार आहेत ! लीला व सुशीला या दोघीजणी सख्ख्या बहिणी. परंतु पुनर्विवाहाच्या बाबतींत मात्र दोघीहि दोन टोकाला उभ्या राहिलेल्या. लीला पुनर्विवाहाविषयीं अत्यंत आतुर झालेली तर सुशीला पहिल्यापासूनच त्याविषयीं पूर्ण उदासीन. तात्यासाहेब हे प्रथम विधवाविवाहानुकूल परंतु वीणेच्या दुर्वर्तनाची ठेंच लागल्यानें त्यांचे डोळे उघडतात व ते विधवाविवाहाच्या विरुद्ध मताचे बनतात. बाबासाहेब उलटसुलट परिस्थितीच्या तडाख्यानें भांबावून जाऊन त्याचे पुरस्कर्ते बनतात. परंतु सुशीलेच्या दृढ मनोनिग्रहानें त्यांची भ्रांति साफ नाहींशी होते. विद्याधर हा ध्येयवेडा असून आपल्या समाजांतलें केवळ बालविधवांचें दुःख हलकें व्हावें व त्यांना दुर्मार्गापासून परावृत्त करावें यासाठीं पुनर्विवाह रूढ व्हावा म्हणून प्रामाणिकपणानें व निःस्वार्थ बुद्धीनें प्रयत्न करीत असल्याचें दिसतें. जयंताविषयीं मात्र मन साशंक होतें. विद्याधर आपल्याकडून ही पुनर्विवाहाची प्रथा पाडण्याचा पुष्कळच अट्टाहास करतो व त्यासाठीं आपल्या लग्नाची हकीकतहि सुशीलेपासून गुप्त ठेवतो. परंतु येथेंहि सुशीलेच्या अढळ पातिव्रत्यामुळें त्याच्या ध्येयाचे फुगे पार फुटून जातात व शेवटीं बिचारा लग्नाच्या बायकोलाहि मुकतो ! सुशीला ही पहिल्यापासूनच पुनर्विवाहाच्या विरुद्ध असल्यानें विद्याधराला नकार देण्यांत तिला कांहींच वाटलें नाहीं. परंतु लीलेची गोष्ट तशी नाहीं. ती जयंताच्या मुक्ततेपासून तर पुनर्विवाहाच्या सुखसागरांत एखाद्या हंसीप्रमाणें डौलानें विहार

करीत होती. परंतु दुसऱ्या अंकाच्या ३ ऱ्या प्रवेशांत लीला–सुशीलेचा संवाद दाखवून नाटककारानें लीलेला एका क्षणांत पुनर्विवाहाच्या विरुद्ध बनविली आहे! लीलेचें हें मतपरिवर्तन जरा असंभवनीयच वाटतें. जयंताची स्थिति तर फारच केविलवाणी आहे. 'मारून मुटकून मुसलमान' या म्हणीप्रमाणें त्याला विधवाविवाहाविरुद्ध करून लीलेचें बंधुत्व पत्करावें लागतें! नाटकांत वीणेचें दाखविण्यांत आलेलें चित्र अत्यंत किळसवाणें, हिंदु समाजांत न दिसणारें व पराकोटीचें आहे. मात्र त्यामुळें चवचाल स्त्रियांचा एकदां अधःपात होऊं लागला म्हणजे त्यांचा शेवटीं कसा सत्यनाश होतो एवढें दिसून येतें. विलायतेंतील आधिभौतिक सुधारणांच्या भपक्यानें भुललेल्या व युरोपीय स्त्रियांच्या स्वेच्छाचारांचें अंधळेपणानें अनुकरण करण्यास चटावलेल्या अर्धशिक्षित स्त्रीचें चित्र म्हणजे वीणा होय. व सामाजिक सुधारणांच्या व भ्रामक व विपरीत कल्पनांनीं आडमार्गाला गेलेल्या आणि पाश्चात्य संस्कृतीच्या मद्यानें गुंगलेल्या आधुनिक तरुणाचें चित्र म्हणजे नेभळट, कृतिशून्य व पुस्तकी पंडित वसंतराव! कमलाकर हा खलपुरुष तर प्रत्यक्ष राक्षसच भासतो. सूडाची जळती कोलीत हातांत घेऊन समाजाची होळी करण्यास मुळीं तो निघाला आहे. परंतु मथुरेनें आपल्या बालबोध पण तिखट उपायानें त्याच्या डोळ्यांत अंजन टाकून त्याला चांगलाच गोगलगाय बनविला. गोकूळची भूमिका विनोदप्रधान असल्यानें गंभीर वातावरणांत हास्याचें कारंजें फुलून त्याच्या फवाऱ्यानें प्रेक्षकांचीं अन्तःकरणें स्पंदित झाल्याशिवाय राहात नाहींत. स्वभावपरिपोषाच्या दृष्टीनें विचार करतां सुशीलेची भूमिका सुसंगत, उदात्त व यशस्वी झाली आहे. खलपुरुष म्हणून कमलाकराचें चित्रहि जितकें तिरस्करणीय आणि कलेच्या दृष्टीनें उठावदार उठावयास पाहिजे तितकें तें उठलें आहे. गोकूळचा विनोदहि कित्येक प्रसंगीं मार्मिक व निर्व्याज असा साधला आहे. नाट्यवस्तूचा विचार करतां मात्र लेखकानें ध्येयनिष्ठ सुधारकांवर कठोर आरोप करून कित्येक ठिकाणीं निष्कारण आग पाखडली आहे असें म्हणावें लागतें. असो. एकंदरींत विधवाविवाहाला प्रतिकूल अशा या खरा–प्रेमसंन्यासाची कलेच्या दृष्टीनें बऱ्यापैकीं सजावट झाली आहे. पुस्तकांत १०–१२ फोटो देण्यांत आले असून त्याचें बहिरंग आकर्षक करण्यांत आलें आहे.



६३४